# गीतामहात्म्यसार.

## ओंव्या.

श्रीगणेशायनमः । श्रीराधारमणायनमः । नमश्चिद्बोधा परब्रह्मा । निर्विकारा निजविश्रामा । रूढमायानिजधामा । परात्परा ॥ १ ॥ अनंतवेषा अनंतगुणा । अनंतपराक्रमा भक्तशरणा । अनंतब्रह्मांडधारणा । अनाद्यंता ॥ २ ॥ कर्मासक्त देहधारी । प्रारब्ध फिरथी भोगांवरी । सुटका नोहे काळांतरीं । यातें उपाय कायसा ॥ ३ ॥ बालकांची दया येउनी । पृथ्वीमातेनें शार्ङ्गपाणी । विनविला वराहपुराणीं । कथिलें विस्तारें ॥ ४ ॥ भोगितां प्रारब्धभोग । अव्यभिचारी भक्तियोग । कैसा काधेल तो नियोग । प्रभो मज निरूपावा ॥ ५ ॥ वेद-शास्त्रींचें सार काढिलें । वसुंधरेसीं बोधिलें । तेसें आचारितां भले । मुक्त होती ॥ ६ ॥ जरी प्रारब्ध भोगीत । नित्य गीताभ्यासीं रत । जगीं तो सुखी तो मुक्त । कर्मातीत ॥ ७ ॥ एक गीताध्यान करी । महापापें होती दुरी । जैं कमलपत्रावरी । नीर न साहे ॥ ८ ॥ गीता पुस्तक वसे जेथें । गीता पठन जेथ प्रवर्ते । प्रयागादि सर्व तीर्थें । तेथेंचि राहती ॥ ९ ॥ देव ऋषी योगी सकळ । भुजंग गोपी गोपाल । नारदोद्धव वैराग्यशीळ । साहाय्य गीता स्थळीं ॥ १० ॥ जेथें गीता चिंतन । पठन पाठन श्रवण । तें निश्चयें माझें स्थान । जाण वसुंधरे ॥ ११ ॥ गीताश्रयीं माझें राहणें । गीता श्रेष्ठ गृह जाणणें । आश्रयूनि गीता ज्ञानें । तिन्हीं लोक पाळितों ॥ १२ ॥ गीता माझी मुख्य विद्या । अर्धमात्राक्षरावेद्या । ब्रह्मरूपा जगद्वंद्या । अनिर्वाच्यपदा-त्मिका ॥ १३ ॥ वेदत्रयीतें मथिलें । तत्वार्थज्ञान काढिलें । गीता रूपें उप-देशिलें । कृष्णें स्वमुखें अर्जुना ॥ १४ ॥ अठरा अध्याय पठन । नित्य करी निश्चळ मन । ज्ञानसिद्धी पावेल जाण । अंतीं मोक्षपद ॥ १५ ॥ समग्र पाठ न होय जरी । गीतार्धपाठ आचरी । गोदानज पुण्य तरी । पावतें निःसंशयें ॥ १६ ॥ तृतीयांश पठन करितां । गंगास्नान फळ कामता । गीता षष्ठांश

जपितां । सोमयाग फल ॥ १७ ॥ नित्य भक्तीसंयुत । एक अध्याय पढत । रुद्रलोकीं वसत । गण होउनी ॥ १८ ॥ अध्याय वा श्लोकपाद । नियमें करी संवाद । मन्वंतर नरपद । पावेल पृथ्वी ॥ १९ ॥ नित्य गीतेचे दाहा श्लोक । सात पांच चार द्विक । तीन एक तदर्धक । जो नर पढे ॥ २० ॥ दाहासहस्र वर्षावरी । चंद्रलोकीं वास करी । तेथ पतन होय जरी । मनुष्यदेह लाभे ॥ २१ ॥ तेथें करोनी गीताभ्यास । मुक्ती न करितां सायास । म्रिय-माण गीताक्षरांस । बोलतां उत्तम गती ॥ २२ ॥ जरी महापापसंयुक्त । गीतार्थश्रवणीं आसक्त । वैकुंठीं विष्णु समवेत । आनंद भोगी ॥ २३ ॥ सकल कर्में करोनी । सदा रत गीतार्थध्यानीं । तो जीवन्मुक्त महाज्ञानी । पावे श्रेष्ठलोक ॥ २४ ॥ जनकादि बहु भूप । गीताश्रयें निष्पाप । लोकीं गीतकीर्ति दुराप । परपदा पावले ॥ २५ ॥ सदां गीतापाठ करी । परी माहात्म्य अन्हेरी । व्यर्थ पठन होय तरी । श्रमचि केवळ ॥ २६ ॥ या माहात्म्या समवेत । जो गीताभ्यास करीत । तैं सर्व फल पावत । दुर्लभ मुक्ती ही ॥ २७ ॥ सूत सांगे शौनकातें । कथिलें गीतामाहात्म्यातें । गीतांतीं पढे तयातें । लाभे सर्व फळ ॥ २८ ॥ नामोच्चार सुलभ अंती । रात्रंदिन गर्जना होती । यश गाती संत किती । नरदेहें ॥ २९ ॥

---

# भगवद्गीता.

## वामनकृतस्तव.

श्रीमद्वामन-पाद-पद्म-युगुलीं अर्पूं मना षट्पदा ।
स्वात्मा जो जगिं सत्पद स्मरतसे दावी स्वयें चित्पदा ॥
आनंदात्मक तोचि श्रीहरि गुरू आत्मा नसे वेगळा ।
ऐसा श्रीभगवान् तया नमितसें प्रेमें जगन्मंगळा ॥ १ ॥

तो श्रीहरी सारथि वामनाचा । होवोनियां प्रेरक जो मनाचा ॥
अध्याय-अंतीं कथि एक श्लोका । ह्मणोनि दावी स्व कृपात्रलोका ॥ २ ॥

अध्यायीं प्रथमांत पार्थ स्वजना देखोनियां मोहला ।
कीं हे गोत्रज सोयरे कुल-गुरू मारीं च ना मी मला ॥
लागे पाप ह्मणोनि "युद्ध न करीं" कृष्णा असें बोलिला ।
बाणेशीं धनु टाकुनी मग रथीं तो ऊगला बैसला ॥ ३ ॥

सांख्यें आत्म अनात्मता निवडुनी योगें चि स्वात्मैक्यता ।
पाहे हा न मरे न मारित असे आत्मा असें तत्वता ॥
अध्यायीं दुसऱ्या परेश वदला तो श्रीगुरू वामनें ।
टीका हे सम-पद्य-रूप रचिली संतीं पहावी मनें ॥ ४ ॥

अध्याय हा तृतीय नामक कर्मयोग ।
कर्मांग ब्रह्ममय जाणुनि स्वात्मयोग ॥
नित्या अनित्य अवघीं हरिच्याचि पायीं ।
अर्पा असें वदतसे निजसौख्य दायी ॥ ५ ॥

चतुर्थी अध्यायीं गुरुवर वदे ज्ञान-पथ हा ।
तयाची हे टीका करि बहु सुखाचा सुपथ हा ॥
बरा हा जाणोनी सुजन समजोनी तुह्मि पहा ।
सम-श्लोकीचा हो निशिदिनिं करावाच जप हा ॥ ६ ॥

अध्याय हा पंचम स्वात्मयोगी । जो कर्मसंन्यास करी सुयोगी ॥
तो श्रेष्ठ संन्यास ह्मणे हरी तो । जो पार्थ-मोहास हि संहरीतो ॥ ७ ॥

षष्ठाध्यायीं योग अभ्यास नामा । बोधी पार्था श्रीहरी तो अनामा ॥
अभ्यासीतां तत्व बोधावलोका । दे सौख्यातें क्षिप्र हा संत लोका ॥ ८ ॥

अध्याय हा सप्तम योग नाम । विज्ञान विख्यात स्वयें अनाम ॥
अभ्यास अभ्यास करी महात्मा । चतुर्विधा माजि हि भक्ति-वर्मा ॥ ९ ॥

अध्याय हा अक्षर-योगनामा । जो आठवा आठवितां अनामा ॥
पावाल हो सद्यचि स्वात्म-ठेवा । अविस्मरें हेंचि मनांत ठेवा ॥ १० ॥

नवमाध्यायीं नवविध भक्ती । अनुभवणें या नव नव युक्ती ॥
विज्ञानासह ज्ञानहि एथें । सेवा नव नव रस हो स्वार्थें ॥ ११ ॥

दशमाध्यायीं हरी विभूती- । योगा सांगे सकळां भूतीं ॥
त्यातें जें....मुख्यत्वें नामें । अनुभवरसिका निज सुखधामें ॥ १२ ॥

अध्याय एकादश विश्वरूपी । अयोग्य ऐश्वर्य निजस्वरूपीं ॥
दावीतसे ध्यान करा विशेषीं । अहर्निशी कीटक भृंगि जैशी ॥ १३ ॥

अध्याय हा द्वादश भक्ति-योग । सप्रेम जे वाचिति स्वात्मयोग ॥
जे प्रीति ते भक्ति असो जयाला । कळे तया तारक देव झाला ॥ १४ ॥

अध्याय तो हाचि त्रयोदशावा । निरीक्षिती संत मनांत ठेवा ॥
क्षेत्रज्ञ हा चिद्गुण सर्व क्षेत्रीं । व्यापीतसे तोचि हि भूतमात्रीं ॥ १५ ॥

अध्यायीं चवदावियांत वदला श्रीकृष्णजी अर्जुना ।
श्रोत्रादी गुण या विभाग वदतों ऐकें ह्मणे सज्जना ॥
तीन्ही हे गुण कंचुनी निजसुखा जाणोनि जे वर्तती ।
ते योगी निजभक्त ते गुणत्रयातीतात्मता पावती ॥ १६ ॥

अध्याय हा पंचदशाख्य नामें । जे वांचिती ऐकाति अर्थ प्रेमें ॥
ते जाणती श्रीपुरुषोत्तमातें । क्षरक्षरा होउनि उत्तमा ते ॥ १७ ॥

अध्याय हा षोडश निर्णयाचा । कीं दैव ही आणिक आसुरीचा ॥
विभाग एथें विशदार्थ वाणी । बोले हरीची न सुखासि वाणी ॥ १८ ॥

अध्याय हा सप्त दशाख्य योग । श्रद्धा त्रिधा तीं गुणिचा विभाग ॥
जें कर्म तें ब्रह्ममय स्वरूपीं । पाहे वदे हा हरि विश्वरूपी ॥ १९ ॥

अध्याय अष्टादश सौख्य-धामा । हा मोक्षसंन्यासचि मोक्षनामा ॥
वाचाळ मावें जयिं सर्वदा हो । तयीं नुरे लेश प्रपंच-दाहो ॥ २० ॥

अध्यायांतीं एक हा श्लोक जाणा । पुष्प प्राय श्रीगुरूतें सुजाणा ॥
पायीं त्याच्या केहुनी अर्पिला हो । मार्गे हाची सर्वदा स्वात्मलाहो ॥ २१ ॥

× × × टीका प्रकटलि जगीं ज्ञान-सरिता ।
सदा स्नानें पानें करुनि करि आनंदभरिता ॥
अनंता जन्मांच्या हरुनि सकळा साच दुरिता ।
स्वयें दे मोक्षातें श्रवण-पठणीं हेचि त्वरिता ॥ २२ ॥

सत्संगासि धरीं कुसंग न करीं आत्मैक्यता मोहरी ।
चित्तातें अवरीं कुकर्म न करीं वेदोदितें आचरीं ॥
सप्रेमें श्रवणादरीं अनुदिनी गातां सुखें अंतरीं ।
हे टीका वरदायिनी झडकरी अज्ञान हो संहरी ॥ २३ ॥

---

# गीतामहात्म्य.

## अभंग.

गीता गीता गीता वाचें जे ह्मणती । नाहीं पुनरावृत्ति तया नरा ॥ १ ॥
नित्य नेम वाचें वदतां अक्षरें । भवसिंधु तरे अर्ध क्षणीं ॥ २ ॥
एका जनार्दनीं जयाचा हा नेम । तया पुरुषोत्तम न विसंबे ॥ ३ ॥

भाव धरूनिया वाची ज्ञानेश्वरी । कृपा करी हरि तयावरी ॥ १ ॥
स्वमुखें आपण सांगे तो श्रीविष्णू । श्रीगीता हा प्रश्नु अर्जुनेंसी ॥ २ ॥
तेची ज्ञानेश्वरी वाचें वदतां साचे । भय कळिकाळाचें नाहीं तया ॥ ३ ॥
एका जनार्दनी संशय सांडोनी । दृढ धरी मनीं ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥

अजान वृक्षाचें पर्ण । जो भक्षुनी करी अनुष्ठान ॥
त्यासी साध्य होय ज्ञान । येथें संशय नाहीं ॥ १ ॥

आणि हे ज्ञानेश्वरी । तीन सप्तकें जो श्रवण करी ॥
तोही ज्ञानाचा अधिकारी । येथें संशय नाहीं ॥ २ ॥
मनकर्णिका भागीरथी । इंद्रायणीचें स्नान करिती ॥
तेही मोक्षपदा जाती । येथें संशय नाहीं ॥ ३ ॥
अश्वत्थ सिद्धेश्वर । समाधीस करील नमस्कार ॥
तोही पावे मोक्षपुर । येथें संशय नाहीं ॥ ४ ॥
येथींचे वृक्ष पाषाण । ते अवघेची भगवान ॥
ऐसें एकाजनार्दन । सांगतसे ॥ ५ ॥

आणिक एक चमत्कार । जेव्हां उद्वस अळंकापुर ॥
तेव्हां रंकासी आदर । ज्ञानेश्वरें केला ॥ १ ॥
वाणी होउनी आपण । प्रत्यक्ष मांडिलें दुकान ॥
अन्न उदक तृप्त जाण । सर्वही केले ॥ २ ॥
ऐसें हें कौतुक । आश्चर्य मानिती लोक ॥
एकाजनार्दनाचा रंक ॥ चरणारविंदींचा ॥ ३ ॥

गीतेचें आवर्तन त्याचें ऐका पुण्य । सावध अंतःकरण करूनिया ॥ १ ॥
गीतेच्या सुकृता मौनावला विधाता । हरिहरा तत्वतां बोध जाला ॥ २ ॥
वैकुंठापासुनी जाण . तेणें बांधलें सदन । त्रैलोकींचें तीर्थाटन घडलें त्यासी॥३॥
वाराणशी यात्रा तेणें केल्या अपारा । लक्ष लक्षांतरा द्विज भोजनें ॥ ४ ॥
आणिक मेरूसमान वांटिलें सुवर्ण ॥ कोट्यानकोटी पूजन साधूंचें केलें ॥ ५ ॥
एकाजनार्दनीं जाण इतुकें घडे महापुण्य । हें सत्य सत्य वचन गीता आवर्तनीं ६

वेद शास्त्र पुराणें अनेक शब्द ज्ञानें । भारताचें श्रवणें सर्वस्व जोडे ॥ १ ॥
तें सव्वालक्ष भारत जोडे पैं सुकृत । तेंचि गीते सात शतें प्राप्त होय ॥ २ ॥
ऐशी भगवद्गीता कृष्णार्जुन संवादता । तेंची श्रुति फळ लाभे वाचितां ऐक्य भावें
गीतेचें महा नेमें करा श्रवण पठन । ऐसें एकाजनार्दन सांगतसे ॥ ४ ॥

गीतेचें सुकृत । ज्यासी जालें प्राप्त ॥
त्याचे पितर मुक्त । सहजचि जाले ॥ १ ॥
नष्ट चांडाळ दुर्जन । परद्वारी तस्कर मात्रा गमन ॥
त्यासी गीता आवर्तन । श्रवणें मोक्ष होय ॥ २ ॥
सुवर्णस्तेय सुरापान । भूत पिशाच्य राक्षस गण ॥
मित्रद्रोही कृतघ्न । गीता आवर्तन मोक्ष त्यासी ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं गीतार्थी । पठणें श्रवणें सर्वांसी मुक्ती ॥
ऐसें पार्वतीप्रती । शंभु सांगे ॥ ४ ॥

---

# भगवद्गीता स्तोत्र.

## अभंग.

धन्य धन्य देवी गीता । आदिमाया वेदमाता ।
जाणेल जो अर्था । धन्य माता पितर ॥ १ ॥
एक श्लोक अथवा चरण । अर्थ अनुभवा अंगी लेण ।
भव मोक्षाचें साधन । नलेग कोठें शोधावें ॥ २ ॥
एका चरणाचा अर्थ । राजा जनक जाणंत ।
मग विदेहाची मात । अंगीं येउनी ठसावी ॥ ३ ॥
एका चरणाचा अर्थ । मुनी वसिष्ठ जाणत ।
शांतीच्या सदनांत । निजशयनीं पहुडला ॥ ४ ॥
एका चरणाचा अर्थ । मुनी वाल्मिकी जाणत ।
दृश्य करुनी निवांत । ब्रह्मपदीं पहुडला ॥ ५ ॥
एका चरणाचा अर्थ । पंडुपुत्र धर्म जाणत ।
सत्य भाषण यथार्थ । शत्रु मित्र समान ॥ ६ ॥

अर्जुन नरनारायण । हे तों सिद्ध साधक जाण ।
दुष्ट करावया निर्दळण । तुका ह्मणे अवतरले ॥ ७ ॥
आहे भगवत् गीता । पूर्ण अमृत सरिता ॥ १ ॥
एक एक अक्षरांत । आहे माझा रमाकांत ॥ २ ॥
जो हा सगुण निर्गुण । एक रुक्मिणीरमण ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्ञानेश्वरी । आत्मपदींची सोयरी ॥ ४ ॥

## पद.

भगवद्गीता षडक्षरी हा मंत्र उच्चार ॥
करितां वाचे साधक होती मुक्तचि साचार ॥ धृ० ॥
भगवंतें अर्जुनाप्रति जो सांगितला गर्भ ॥
भगवद्गीता ह्मणिजे केवळ सर्व वेदगर्भ ॥
भगवत्प्राप्तीस जें कां सर्व मुळारंभ ॥
भगवद्वाक्य भगवन्मूर्ति हेचि मुळस्तंभ ॥ १ ॥
गर्भाशय हृद्गत भगवंतें बोधियला योग ॥
गति मोक्षाप्रति साधुनी देत हाचि ज्ञानयोग ॥
गति सर्वा उत्पत्तिस्थान स्थिति हे अव्यंग ॥
गति स्वरूपीं सद्गुरु दाता अक्षय अभंग ॥ २ ॥
वरिष्ठ जे कां सर्वांहुनियां स्वप्रकाश भरिव ॥
वर्णाश्रमरूपाकृति विरहित केवळ निरवयव ॥
वस्तु परात्पर अद्वय जेथें नाहीं जाणीव ॥
वरूनि शांति पावति निजसुख अव्यय मुनिराव ॥ ३ ॥
तत्र तत्र ह्मणवुनि ठेलीं जेथें श्रुतिशास्त्र ॥
तया स्वरूपा मायायोगें ह्मणिजे भगवंत ॥
तंतुपटीं जैसा तैसा व्यापक विश्वांत ॥
तया स्वरूपीं ऐक्य जाहालें स्वानुभवें संत ॥ ४ ॥

गीता गीता जप जो करितो होय वीतरागी ॥
गीतार्थ गुरुमुखें कळतां सर्व विषय त्यागी ॥
गीता श्रवण मनन होय तोचि महायोगी ॥
गीता सेवुनि अखंड राहे निजात्मसुखभोगी ॥ ५ ॥
तारक मंत्र सद्गुरुमुखें निज श्रवणीं पडतां ॥
तारी भवसिंधूपासुनियां संशयांत बुडतां ॥
तामस राजस निरसुनि शुद्ध सत्वात्मक गीता ॥
तारक साधक मुमुक्षूसि हे सुखदायक गीता ॥ ६ ॥
भगवद्गीता महामंत्र हें सद्गुरुवाक्य ॥
श्रद्धा भक्ति करुनी साधक होती ब्रह्मैक्य ॥
जीवन्मुक्तगुरुरूपें मन नमन बुद्धिसी ऐक्य ॥
सच्चित्सुख अनुभवें होय गुरुचरणीं ऐक्य ॥ ७ ॥

---

# ज्ञानेश्वरीची अध्यायानुक्रमणिका.



एकंदर ९७४०

श्री

# ज्ञानेश्वरी।

## (भावार्थ दीपिका.)

### अध्याय १ ला.

ओं नमोजी आद्या[1] । वेद[2]प्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या[3] । आत्मरूपा ॥ १ ॥ देवा तूंचि गणेश । सकळमतिप्रकाश । ह्मणे निवृत्तिदास । अवधारिजो[4] जी ॥ २ ॥ हें शब्द[5]-ब्रह्म अशेष[6] । तेचि मूर्ति सुवेष[7] । तेथ वर्णवपु[8] निर्दोष । मिरवत असे ॥ ३ ॥ स्मृती[9] तेचि अवयव । देखा आंगिक[10]भाव । तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ॥ ४ ॥ अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें[11] । पदपद्धती [12]लेवणें । प्रमेयरत्नांचीं[13] ॥ ५ ॥ पदबंध नींगरु[14] । तेंचि रंगां[15]थिलें अंबरु[16] । जेथ साहित्य वाणें सपुरु[17] । उजाळाचें[18] ॥ ६ ॥ देखा काव्यनाटका ॥ जें निर्धारितां सकौतुका । त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका । अर्थध्वनी ॥ ७ ॥ नाना प्रमेयांची[19] परी । निपुणपणें पाहतां कुसरी[20] । दिसती उचित पदें माझारीं । रत्नें भलीं ॥ ८ ॥ जेथ व्यासादिकांची मती । तेचि मेखळा[21] मिरवती । चोखाळपणें[22] झळकती । पल्लवसडका[23] ॥ ९ ॥ देखा षड्दर्शनें[24] ह्मणिपती । तेचि भुजांची आकृती । ह्मणऊनि विसंवाद[25] धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥ तरी तर्क[26] तोचि फरशु । नीतिभेद[27] अंकुशु । वेदान्त तो महारसु । मोदक मिरवे ॥ ११ ॥ एके हातीं दंत । जो स्वभावता खंडित[28] । तो बौद्धमतसंकेत । वार्तिकांचा[29] ॥ १२ ॥ मग सहजें सत्कारवाद । तो पद्मकर वरद । धर्मप्रतिष्ठा तो सिद्ध । अभयहस्त ॥ १३ ॥ देखा विवेकवंत सुविमळ[30] । तोचि शुंडादंड सरळ । जेथ परमानंद केवळ । महासुखाचा ॥ १४ ॥ तरी संवाद तोचि दशनें[31] ॥ जो समताशुभ्रवर्ण । देव

---

१ उत्पत्तिनाशरहित अनादि, किंवा पुरातन. २ वेदवर्णित. ३ स्वतःसच जाणणाऱ्या. ४ ऐका. ५ वेद. ६ सर्व. ७ सुंदर. ८ शरिरकांति. ९ धर्मशास्त्र. १० शरीराचे. ११ रत्नाचे अलंकार. १२ कोंदण. १३ तत्वार्थ. १४ उत्तम. १५ रंगयुक्त. १६ वस्त्र. १७ बारीक तंतूचें. १८ प्रकाशाचे. १९ प्रकारची. २० कुशलता. २१ कडदोरा. २२ स्वच्छपणानें. २३ पदराचे अग्रभाग. २४ पातंजल, सांख्य, वैशेषिक, न्याय, मीमांसा आणि वेदांत हीं सहा दर्शनें. २५ मतांतर. २६ न्यायशास्त्र. २७ अर्थशास्त्र. २८ अर्धा. २९ वेदांत सूत्रावरील व्याख्यान. ३० अतिनिर्मळ. ३१ दांत.

उन्मेष[1]सूक्ष्मेक्षण । विघ्नराज ॥ १५ ॥ मज अवगमलिया[2]दोनी । मीमांसा[3] श्रवणस्थानीं । बोधमदामृत मुनी । अली[4] सेविती ॥ १६ ॥ प्रमेय[5]प्रवाल सुप्रभ । द्वैताद्वैत तेंचि निकुंभ[6] । सरिसे एकवटती इभ[7] । मस्तकावरी ॥ १७ ॥ उपरि दशोपनिषदें । जियें उदार[8]ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुकुटीं सुगंधें । शोभती भलीं ॥ १८ ॥ अकार चरण[9]युगुल । उकार उदर विशाल । मकार महामंडल । मस्तकाकारें ॥ १९ ॥ हे तिन्ही एकवटले । तेथ शब्द[10]ब्रह्म कवळलें[11] । तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज[12] ॥ २० ॥ आतां अभिनव[13] वाग्विला[14]सिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी । ते श्रीशारदा विश्व[15]मोहिनी । नमिली मियां ॥ २१ ॥ मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु । म्हणऊनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥ २२ ॥ जैसें डोळयां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे । मग वास[16] पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥ २३ ॥ कां चिंतामणी आलिया हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं । तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्तीं । ज्ञानदेव म्हणे ॥ २४ ॥ म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे । जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥ कां तीर्थे जियें[17] त्रिभुवनीं । [18]तियें घडती समुद्रावगाहनीं[19] । ना तरी अमृतरसस्वादनीं[20] । रस सकळ ॥ २६ ॥ तैसा पुढतपुढती तोचि । मियां अभिवंदिला[21] श्रीगुरूचि । अभिलाषित[22] मनोरुचि । पुरविता तो ॥ २७ ॥ आतां अवधारा कथा गहन । जे सकळ जन्मस्थान । कीं अभिनव[23] उद्यान[24] । विवेकतरूचें ॥ २८ ॥ ना तरी सर्वसुखाची आदि । जे प्रमेय[25]महानिधि । नाना नवरस[26]सुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २९ ॥ कीं परमधाम[27] प्रगट । सर्व विद्यांचें मूळपीठ । शास्त्रजातां वसौट[28] । अशेषांचें[29] ॥ ३० ॥ नातरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार[30] । लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ३१ ॥ नाना कथारूपें भारती[31] । प्रगटली असे त्रिजगतीं । आविष्करोनि[32] महामती । व्यासाचिये ॥ ३२ ॥ म्हणोनि हा काव्यां रावो[33] । ग्रंथ[34]गुरुवतीचा ठावो । एथूनि रसां झाला आवो[35] । रसाळपणाचा ॥ ३३ ॥ तेवींचि आइका आणीक एक । एथूनि शब्दश्री[36] सच्छास्त्रिक[37] । आणि महाबोधीं [38]कोवळीक । दुणावली ॥ ३४ ॥ एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेय[39] रुचीस आलें । आणि सौभाग्य पोखलें[40] । सुखाचें एथ ॥ ३५ ॥ माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता । रूढपण[41] उचितां । दिसे भलें ॥ ३६ ॥ एथ कळाविदपण[42] कळा । पुण्यासि प्रताप आगळा[43] । म्हण-

---

१ ज्ञानाचीवारि दृष्टी. २ वाटल्या. ३ धर्म आणि वेदांत शास्त्रें. ४ भ्रमर. ५ तत्वार्थरूप पोवळें. ६ गंडस्थळ. ७ हत्ती. ८ ज्ञानसुगंधें करून युक्त. ९ दोन. १० वेद. ११ गुंडाळिलें. १२ ॐकार. १३ अपूर्व. १४ सरस्वती. १५ जगाला भुलविणारी. १६ मार्गें. १७ जेवढीं. १८ तेवढीं. १९ स्नानानें. २० अमृताची गोडी घेण्यांत. २१ नमिला. २२ इच्छित. २३ टवटवित. २४ बाग. २५ सिद्धांताची. २६ नवरस अमृत सागर. २७ मूळ ठिकाण. २८ आश्रय. २९ पूर्ण. ३० जिव्हाळा. ३१ सरस्वति. ३२ प्रवेशोनी. ३३ राजा. ३४ थोरपणाचा. ३५ डौल. ३६ शब्द शोभा. ३७ उत्तम शास्त्र. ३८ कोमलता. ३९ तत्वार्थ. ४० पुष्ट झालें. ४१ श्रेष्ठता. ४२ कुशलता. ४३ अधिक.

ऊनि जन्मेजयाचे अवलीळा[1] । दोष हरले ॥ ३७ ॥ आणि पाहतां नावेक[2] । रंगीं सुरंगतेची आगळिक[3] । गुणा सगुणपणाचें बिक[4] । बहुवस[5] एथ ॥ ३८ ॥ भानुतेजें धवळलें[6] । जैसें त्रैलोक्य दिसे उजाळिलें । तैसें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥ कां सुक्षेत्रीं[7] बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारिलें । तैसें भारतीं सुरवाडलें[8] । अर्थजात[9] ॥ ४० ॥ ना तरी नगरीं वसिजे । तरी नागरचि[10] होइजे । तैसें व्यासोक्तितेजें । धवळत सकळ ॥ ४१ ॥ कीं प्रथमवयसाकाळीं[11] । लावण्याची नव्हाळी[12] । प्रगटे जैसी आगळी । अंगना[13]-आंगीं ॥ ४२ ॥ ना तरी उद्यानीं[14] माधवी[15] घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासोनि[16] अपाडें[17] । जियापरी ॥ ४३ ॥ नाना घनीभूत[18] सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अळंकारीं बरवेपण । निवाड[19] दावी ॥ ४४ ॥ तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडे तें बरवेपण पातलें[20] । तें जाणोनि आश्रयिलें[21] । इतिहासीं ॥ ४५ ॥ नाना पुरेतिये[22] प्रतिष्ठेलागीं । सानीव[23] धरूनि आंगीं । पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता[24] आलीं ॥ ४६ ॥ ह्मणऊनि महाभारतीं नाहीं । तें नोहे लोकीं तिहीं । येणें कारणें ह्मणिपे[25] पाहीं । "व्यासोच्छिष्ट जगत्त्रय" ॥ ४७ ॥ ऐसी जगीं सुरस कथा । ते जन्मभूमि परमार्था । मुनि[26] सांगे नृपनाथा । जन्मेजया ॥ ४८ ॥ जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम[27] । परम मंगळधाम[28] । अवधारिजो ॥ ४९ ॥ आतां भारतकमळपराग[29] । गीताख्य[30] प्रसंग । जो संवादला श्रीरंग । अर्जुनेसीं ॥ ५० ॥ ना तरी शब्दब्रह्माब्धि[31] । मथियला व्यासबुद्धि । निवडिलें निरवधि[32] । नवनीत हें[33] ॥ ५१ ॥ मग ज्ञानाग्निसंपर्कें[34] । कढसिलें[35] विवेकें । पद आलें परिपाकें[36] । आमोदासी[37] ॥ ५२ ॥ जें अपेक्षिजे विरक्तीं । सदां अनुभविजे संतीं । सोहंभावें पारंगतीं[38] । रमिजे जेथ ॥ ५३ ॥ जें आकर्णिजे भक्तीं । जें आदिवंद्य त्रिजगतीं । ते भीष्मपर्वीं संगतीं । सांगिजेल ॥ ५४ ॥ जें भगवद्गीता ह्मणिजे । जें ब्रह्मेशानीं[39] प्रशंसिजे । जें सनकादिकीं सेविजे । आदरेंसीं ॥ ५५ ॥ जैसें शारदीचिये[40] चंद्रकळे । माजि अमृतकण कोंवळे । ते वेंचिती मनें मवाळें[41] । चकोरतलगें[42] ॥ ५६ ॥ तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा । अति हळुवारपण[43] चित्ता । आणूनियां ॥ ५७ ॥ [44]हें शब्देंवीण संवादिजे[45] । इंद्रियां नेणतां भोगिजे । बोलाआदि झोंबिजे[46] । प्रमेयासी ॥ ५८ ॥ जैसे

---

१ सहज. २ क्षणभर. ३ विशेषेंकरून. ४ सामर्थ्य. ५ फार. ६ प्रकाशलें. ७ चांगल्या शेतांत. ८ प्रकाशलें. ९ सर्व अर्थ. १० नगरवासी, शहाणा. ११ तारुण्यदशेंत. १२ शोभा. १३ सुंदर स्त्री. १४ बाग. १५ वसंतशोभा. १६ पहिल्यापेक्षां. १७ विशेषतः. १८ लगडी. १९ शेवटीं. २० प्राप्त झालें. २१ स्विकारिलें. २२ पूर्ण. २३ नम्रता. २४ भारतामध्यें. २५ ह्मटलें जातें. २६ वैशंपायन. २७ पुण्यदायक, मुक्तिकर. २८ कल्याणाचें स्थान. २९ पुष्परेणु. ३० गीताचें आख्यान. ३१ उपनिषद भाग. ३२ अमर्याद. ३३ गीता. ३४ संयोग. ३५ कढविलें. ३६ पक्वतेनें. ३७ रुचीला. ३८ मुक्त पुरुषीं. ३९ ब्रह्मा आणि शंकर यांनीं. ४० शरदृतूच्या. ४१ कोंवळ्या. ४२ चकोर पक्ष्यांचीं पिलें. ४३ मऊपणा. ४४ गीता. ४५ बोलावी. ४६ समजावें.

भ्रमर पैराग[1] नेती । परी कमळदळें नेणती । तैसी परी आहे सेविती । ग्रंथीं इये ॥ ५९ ॥ कां आपुला ठाय न सांडितां । आलिंगिजे चंद्र प्रगटतां । हा अनुराग[2] भोगितां । कुमुदिनी[3] जाणे ॥ ६० ॥ ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंतःकरणें । आथिला[4] तोचि जाणे । मानूं ईये[5] ॥ ६१ ॥ अहो अर्जुनाचिये पांती[6] । जे परिसणया[7] योग्य होती । तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान[8] द्यावें ॥ ६२ ॥ हें सलगी[9] म्यां म्हणीतलें । चरणां लागोनि विनविलें । प्रभू सखोल[10] हृदय आपुलें । म्हणूनियां ॥ ६३ ॥ जैसा स्वभाव मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा । तरी अधिक तयाचा । संतोष आथी[11] ॥ ६४ ॥ तैसा तुम्हीं मी अंगिकारिला । सज्जनीं आपुला म्हणीतला । तरी उणें सहजें उपसाहला[12] । प्रार्थू कायीं ॥ ६५ ॥ परी अपराध तो आणीक आहे । जें मी गीतार्थ कवळूं[13] पाहें । तें अवधारा[14] विनवूं लाहें । म्हणऊनियां ॥ ६६ ॥ हें अनावर[15] न विचारितां । वायांचि धिंवसा[16] उपनला[17] चित्ता । येरवीं काय भानुतेजीं खद्योता[18] । शोभा आथी ॥ ६७ ॥ कीं टिटिभू[19] चांचुवरी[20] । माप सूये[21] सागरीं । मी नेणत त्यापरी । प्रवर्तें एथ ॥ ६८ ॥ आयका आकाश गिंवसावें[22] । तरी आणीक त्याहूनि थोर होआवें । म्हणऊनि अपाड[23] हें आघवें[24] । निर्धारितां[25] ॥ ६९ ॥ तया गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी[26] । जेथ भवानी प्रश्न करी । चमत्कारोनी[27] ॥ ७० ॥ तेथ हर म्हणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरूप तुझें । तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ॥ ७१ ॥ हा वेदार्थसागर । जया निद्रितांचा[28] घोर । तो स्वयें श्रीसर्वेश्वर । प्रत्यक्ष अनुवादला[29] ॥ ७२ ॥ ऐसें जें अगाध[30] । जेथ वेडावती[31] वेद । तेथ अल्प मी मतिमंद । काय होय ॥ ७३ ॥ हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें[32] । गगन मुठीं सुवावें[33] । मशकें केवीं ॥ ७४ ॥ परी एथ असे एक आधारु । तेणेंचि बोलें मी सधरु[34] । जे सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥ ७५ ॥ येऱ्हवीं तरी मी मूर्ख । जरी जाहला अविवेक । तऱ्ही संतकृपादीपक । सोज्वळ[35] असे ॥ ७६ ॥ लोहाचें कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे । कां मृतही जीवित लाहे[36] । अमृतसिद्धि ॥ ७७ ॥ जरी प्रगटे सिद्धिसरस्वती । तऱ्ही मुकया आथि भारती[37] । एथ वस्तुसामर्थ्यशक्ती । नवल कायी ॥ ७८ ॥ कां जयातें कामधेनु माय । तयासी अप्राप्य[38] कांहीं आहे । म्हणऊनि मी प्रवर्तों लाहें[39] । ग्रंथीं इये ॥ ७९ ॥ तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें[40] । करूनि घ्यावें हें तुम्हांतें[41] । विन-

---

१ पुष्परेणु. २ प्रीति. ३ चंद्रविकासी कमलिनी. ४ भाग्यवान्. ५ एथिचा. ६ पंक्तींत. ७ श्रवणाला. ८ लक्ष. ९ लडिवाळपणानें. १० मोठें. ११ आहे. १२ क्षमा करण्याला. १३ आकळूं. १४ ऐका. १५ आवरण्याला कठिण. १६ धैर्य. १७ उपजला. १८ काजव्याला. १९ टिटवी. २० चोंचीनें. २१ घाली. २२ मोट बांधावी. २३ अशक्य. २४ सर्व. २५ विचार करितां. २६ वर्णन करितात. २७ आश्चर्ययुक्त होऊन. २८ योगनिद्रेंतील घोरणें. २९ बोलला. ३० खोल. ३१ स्तब्ध होतात. ३२ प्रकाशावें. ३३ धरावें. ३४ समर्थ. ३५ लखलखीत. ३६ पावतो. ३७ वाणी. ३८ दुर्लभ. ३९ धजावतों. ४० मान्य. ४१ तुम्हाला.

वेत असें ॥ ८० ॥ आतां देइजो अवधान । तुह्मी बोलविला मी बोलेन । जैसें [2]चेष्टे सूत्राधीन । [3]दारुयंत्र ॥ ८१ ॥ तैसा मी [4]अनुगृहीत । साधूंचा निरूपित । ते आपला अलंकारित भलतयापरी ॥ ८२ ॥ तंव श्रीगुरु ह्मणती राहीं । हें तुज बोलावें नलगे कांहीं । आतां ग्रंथा चित्त देईं । झडकरी वेगां ॥ ८३ ॥ या बोला निवृत्तिदास । पावूनि परम उल्हास । ह्मणे परिसा मना [5]अवकाश । देवूनियां ॥ ८४ ॥

धृतराष्ट्र उवाच–**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

तरी पुत्रस्नेहें मोहित । धृतराष्ट्र असे पुसत । ह्मणे संजया सांगें मात । कुरुक्षेत्रींची ॥ ८५ ॥ जें धर्मालय ह्मणिजे । तेथ पांडव आणि माझे । गेले असती [9]व्याजें । झुंझाचेनि ॥ ८६ ॥ तरी तिहीं येतुला [11]अवसरीं । काय [12]किजेत असे [13]येरयेरीं । तें झडकरी कथन करीं । मजप्रती ॥ ८७ ॥

संजय उवाच–**दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**
**पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥**

तिये वेळीं तो संजय बोले । ह्मणे पांडवसैन्य [14]उचललें । जैसें महाप्रळयीं पसरलें । [15]कृतांतमुख ॥ ८८ ॥ तैसें तें [16]घनदाट । उठावलें [17]एकवाट । जैसें उसळलें [18]कालकूट । धरी कवण ॥ ८९ ॥ नातरी वडवानल [19]सांदुकला । प्रलयवातें [20]पोखला । सागर शोषूनि [21]उर्ध्वला । [22]अंबरासी ॥ ९० ॥ तैसें दळ दुर्धर । [23]नानाव्यूहीं परि[24]कर । [25]अवगमलें भयासुर । तिये काळीं ॥ ९१ ॥ तें देखोनि दुर्योधनें । [26]अव्हेरिलें [27]कवणें मानें । जैसें न गणिजे [28]पंचाननें । [29]गजघटांतें ॥ ९२ ॥ मग द्रोणापासीं आला । तयातें ह्मणे हा देखिला । कैसा दळभार उचलला । पांडवांचा ॥ ९३ ॥ गिरि[30]दुर्ग जैसें चालतें । तैसे विविध व्यूह भंवते । रचिले [31]आथि बुद्धिमंतें । [32]द्रुपदकुमरें ॥ ९४ ॥ जो कां तुह्मी शिष्य आपुला । विद्या देऊनि [33]कुरुठा केला । तेणें हा सैन्यसिंधु [34]पाखरिला । देखदेख ॥ ९५ ॥

---

१ लक्ष. २ नाचे. ३ कळसूत्री बाहुली. ४ उपकार केलेला. ५ अज्ञापिलेला. ६ शोभिवंत करोत. ७ स्थीरता. ८ धर्माचें स्थान. ९ निमित्तानें. १० ह्या. ११ वेळीं. १२ करिते झाले. १३ परस्परांत. १४ खवळलें. १५ काळाचें तोंड. १६ भयंकर. १७ एकदम. १८ जलाल विष. १९ भडकला. २० पोसला. २१ प्रदीप्त झाला. २२ आकाशापर्यंत. २३ सैन्य रचना. २४ तयार. २५ भासलें. २६ तिरस्कारिलें. २७ कसें. २८ सिंहानें. २९ हत्तींचा कळप. ३० डोंगरी किल्ले. ३१ आहेत. ३२ धृष्टद्युम्नानें. ३३ शहाणा. ३४ पसरिला.

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

आणीकही [1]असाधारण । जे शस्त्रास्त्रीं प्रवीण । क्षात्रधर्मीं निपुण । वीर [2]आहाती ॥ ९६ ॥ जे बळें [3]प्रौढी पौरुषें । भीमार्जुनासारिखे । ते सांगेन कौतुकें । प्रसंगेंची ॥ ९७ ॥ एथ युयुधान सुभट । आला असे विराट । महारथी श्रेष्ठ । द्रुपद वीर ॥ ९८ ॥

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥

युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

चेकितान धृष्टकेतु । काशीराज विक्रांतु । उत्तमौजा नृपनाथु । शैब्य देख ॥ ९९ ॥ हा कुंतिभोज पाहें । एथ युधामन्यु आला आहे । आणि पुरुजितादि राय हे । सकळ देख ॥ १०० ॥ हा सुभद्राहृदयनंदन । जो अपर नवार्जुन । तो अभिमन्यु ह्मणे दुर्योधन । देखें द्रोणा ॥ १ ॥ आणीकही द्रौपदीकुमर । हे सकळही महारथी वीर । [10]मिती नेणिजे परि अपार । [11]मीनले असती ॥ २ ॥

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥

भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

आतां आमुच्या दळीं [12]नायक । जे [13]रूढ वीर सैनिक । ते प्रसंगें आइक । [14]सांगिजती ॥ ३ ॥ उद्देशें एक दोनी । [15]जाणिजती बोलोनी । तुह्मी आदिकरूनी । मुख्य जे जे ॥ ४ ॥ हा भीष्म गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु । [16]रिपुगजपंचाननु कर्ण वीर ॥ ५ ॥ एकेकाचेनि [17]मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे । हा कृपाचार्य न पुरे । एकलाचि ॥ ६ ॥ एथ विकर्ण वीर आहे । हा अश्वत्थामा पैल पाहें । याचा [18]अडदर सदा वाहे । कृतांत मनीं ॥ ७ ॥ समितिंजय सौमदत्ति ।

---

[1] महान्. [2] आहेत. [3] मोठे. [4] पुरुषार्थानें. [5] योद्धा. [6] पराक्रमी. [7] राजे. [8] निराळा. [9] हा नवा अर्जुनच काय. [10] गणती. [11] मिळाले. [12] सेनाधिपति. [13] मुख्य. [14] सांगतो. [15] जातात. [16] शत्रु हेच कोणी हत्ती त्यांचा नाश करणारा सिंह. [17] संकल्पमात्रानें. [18] धाक.

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

**ऐसे आणीक**ही बहुत आहाती[1] । जयांचिया बळा मिती । धाताही[2] नेणे ॥ ८ ॥ **जे शस्त्रविद्यापारंगत**[3] । मंत्रावतार मूर्त[4] । हो कां जें अस्त्रजात[5] । एथूनि रूढ[6] ॥ ९ ॥ हे अप्र-**तिमल्ल**[7] **जगीं** । पुरता प्रताप आंगीं । परी सर्व प्राणें मजचिलागीं । आरायिले[8] असती **॥ ११० ॥ पतिव्रते**चें हृदय जैसें । पतिवांचूनि न स्पर्शे । मी सर्वस्व यां तैसें । सुभटांसी **॥ ११ ॥ आम्हु**चिया काजाचेनि पाडें । देखती आपुलें जीवित्व थोकडें[10] । ऐसे निरवधि[11] **चोखडे**[12] **। स्वामि**भक्त ॥ १२ ॥ झुंझती कुळकरणी[13] जाणती । कळे[14] कीर्तिसी[15] जिती । हें **बहु असो क्षात्र**[16]नीती । एथोनियां ॥ १३ ॥ ऐसे सर्वांपरी पुरते । वीर दळीं आमुते[17] । आतां **काय गणूं यांतें** । अपार हे ॥ १४ ॥

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥**

**वरी क्षत्रियां**माजि श्रेष्ठ । जो जगजेठी जगीं सुभट । तया दळवैपणाचा[19] पट[20] । भीष्मासि **पैं ॥ १५ ॥** आतां याचेनि बळें गवसलें[21] । हें दुर्ग[22] जैसे पंजरासिलें[23] । येणें पाडें[24] थेंकुलें[25] । **लोकत्रय ॥** १६ ॥ आधींच समुद्र पाहीं । तेथ दुर्वाडपण[26] कवणा नाहीं । मग वडवानळ **तैसयाही । विरजा**[27] जैसा ॥ १७ ॥ नातरी प्रलयवन्हि[28] महावात । या दोघां जैसा सांघातें[29] । **तैसा हा गांगा**[30]सुत । सेनापति ॥ १८ ॥ आतां येणेंसीं कवण भिडे । हें पांडवसैन्य कीर[31] **थोकडें**[32] **। वैर**[33]चिलेनि पाडें । दिसत असे ॥ १९ ॥ वरी भीमसेन बेथु[34] । तो जाहला असे **सेनानाथु ।** ऐसें बोलोनियां मातु[35] । सांडिली तेणें ॥ १२० ॥

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।**
**भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥ ११ ॥**

**मग पुनरपि** काय बोले । सकळ सैनिकांतें म्हणितलें । आतां दळभार आपुलाले । **सरसे**[36] **करा** ॥ २१ ॥ जया जिया अक्षौहिणी[37] । तेणें तिया आरणी[38] । वैरगण[39] कवणकवणी ।

---

१ **आहेत.** २ ब्रह्मा. ३ शस्त्रविद्येंत निपुण. ४ मूर्तिमंत. ५ समग्र अस्त्रें. ६ प्रसिद्ध झाली, **उत्पन्न झाली.** ७ ज्यांस प्रतिस्पर्द्धी नाहीं असे योद्धे. ८ अनुसरले. ९ योग्यतेनें. १० **उणें.** ११ **निःसीम.** १२ उत्तम. १३ चातुर्य. १४ युद्धकला. १५ जिंकिती. १६ क्षत्रियांचा धर्म. १७ आमच्या. १८ **इंद्रियनिग्रही.** १९ सेनापतित्वाचा. २० अधिकार. २१ आच्छादिलें. २२ किल्ले. २३ रचिलें. २४ **याच्या** योग्यतेपुढें, तुलनेनें. २५ अल्प. २६ दुर्घटत्व. २७ साह्यकर्ता. २८ प्रलयकाळाचा **अग्नी. २९** संयोग. ३० भीष्म. ३१ निश्चयें. ३२ थोडें. ३३ वर सांगितलेल्या आमच्या सैन्याच्या **तुलनेनें. ३४** दांडगा. ३५ बोलणें. ३६ सज्ज. ३७ रथ २१८७०, तितकेच हत्ती, हत्तींचे तिप्पट **घोडे, पांचपट** पायदळ=२१८७००. ३८ युद्धस्थानीं. ३९ वांटणी.

[1]महारथिया ॥ २२ ॥ तेणें तिया आवरिजे । [2]भीष्मातळीं राहिजे । द्रोणातें ह्मणे [3]पाहिजे । तुह्मी सकळ ॥ २३ ॥ [4]हाचि एक रक्षावा । मी तैसा हा देखावा । येणें दळभार आघवा । [5]सोच आमुचा ॥ २४ ॥

**तस्य संजनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।**
**सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥**

या राजयाचिया बोला । [6]सेनापति संतोषला । मग तेणें केला । [7]सिंहनाद ॥ २५ ॥ तो गाजत असे अद्भुत । दोहीं सैन्यांआंत । प्रतिध्वनि न [8]समात । उपजत असे ॥ २६ ॥ तयाचि [9]तुलगासवें । वीरवृत्तीचेनि [10]थांवें । दिव्य शंख भीष्मदेवें । [11]आस्फुरिला ॥ २७ ॥ ते दोन्ही नाद [12]मिनले । तेथ त्रैलोक्य [13]बधिरीभूत जाहलें । जैसें आकाश कां पडिलें । तुटोनियां ॥ २८ ॥ घडघडीत अंबर । उचंबळत सागर । क्षोभलें [14]चराचर । कांपत असे ॥ २९ ॥ तेणें महाघोषगजरें । दुमदुमिताती [15]गिरिकंदरें । तंव दळामाजि [16]रणतुरें । आस्फुरिलीं ॥ १३० ॥

**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।**
**सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥**

उदंड [17]सैंघें वाजतें । भयानकें [18]खाखातें । महाप्रळय जेथें । [19]धोकंडांसीं ॥ ३१ ॥ [20]भेरी निशाण [21]मांदळें । शंख [22]कोहळा [23]भोंगळें । आणि भयासुर [24]रणकोल्हाळ । [25]सुभटांचे ॥ ३२ ॥ आवेशें भुजा [26]थांहाटिती । [27]विसणेले हांका देती । जेथ [28]महामद [29]भद्रजाती । आवरती ना ॥ ३३ ॥ तेथ [30]भेडांची कवण मात । [31]कांचयां केर फिटत । जेणें दचकला कृतांत । आंग नेघे ॥ ३४ ॥ एकां [32]उभयांचि प्राण गेले । [33]चांगांचे दांत बैसले । [34]बिरुदाचे दादुले । [35]हिंवताती ॥ ३५ ॥ ऐसा अद्भुत [36]तूरबंबाळ । ऐकोनि ब्रह्मा व्याकुळ । देव ह्मणती प्रळयकाळ । वोढवला आजि ॥ ३६ ॥

---

१ दहा हजार योद्ध्यांशीं एक युद्ध करणारा. २ आज्ञेखालीं. ३ व्यवस्था ठेवा. ४ भीष्म. ५ खरा. ६ भीष्म. ७ सिंहा सारखी गर्जना. ८ सामावत नाहीं. ९ प्रतिध्वनीप्रमाणें. १० बळें. ११ वाजविला. १२ एकत्र झाले. १३ बहिऱ्यासारिखें. १४ स्थावर जंगम. १५ पर्वतांच्या गुहा. १६ रणवाद्यें. १७ बहुतप्रकारचीं वाजंत्रें. १८ कर्कश. १९ बळवानांस. २० नौबद. २१ रणवाद्य-विशेष. २२ झांज. २३ तुतारी. २४ वीरांचे ओरडणें. २५ योद्ध्यांचें. २६ थोपटती. २७ सरसावून. २८ मस्त झालेले. २९ हत्ती. ३० भित्र्यांची. ३१ कच्चे तर कचऱ्यासारखें उडाले. ३२ उभे असतां. ३३ चांगल्याचे. ३४ ब्रीद बांधलेले असे थोर ह्मणविणारे पुरुष. ३५ कांपतात. ३६ वाद्यध्वनी.

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।
माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥
पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

ऐसी स्वर्गीं मात । देखोनि तो आकांत । तंव पांडवदळाआंत । वर्तलें कायी ॥ ३७ ॥ हो कां निजसार विजयाचें । कीं तें भांडार महातेजाचें । जेथ गरुडाचिये जावळिचे । कांतले चौंन्ही ॥ ३८ ॥ कीं पाखांचा मेरु जैसा । रहंवरें मिरवतसे तैसा । तेजें कोंदाटलिया दिशा । जयाचेनि ॥ ३९ ॥ जेथ अश्ववाहक आपण । वैकुंठींचा राणा जाण । तया रथाचे गुण । काय वर्णूं ॥ १४० ॥ ध्वजस्तंभावरी वानर । तो मूर्तिमंत शंकर । सारथी शार्ङ्गधर । अर्जुनेसी ॥ ४१ ॥ देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्ताचें । जें सारथ्यपण पार्थाचें । करीत असे ॥ ४२ ॥ पाइक पाठिसीं घातला । आपण पुढां राहिला । तेणें पांचजन्य आस्फुरिला । अवलीळाचि ॥ ४३ ॥ परी तो महाघोष थोरु । गर्जत असे गंहिरु । जैसा उदेला लोपी दिनकरु । नक्षत्रांतें ॥ ४४ ॥ तैसें तुरबंबाळ भंवतें । कौरवदळीं गाजत होतें । तें हारपोनि नेणों केउतें । गेलें तेथ ॥ ४५ ॥ तैसाचि देवें [17] थोरें । [18] निनादें अतिगजरें । देवदत्त धनुर्धरें । आस्फुरिला ॥ ४६ ॥ ते दोन्ही शब्द अचाट । [21] मिनले एकवट । तेथ ब्रह्मकटाह शतकूट । हों पाहत असे ॥ ४७ ॥ तंव भीमसेन विसणैला । जैसा महाकाळ खवळला । तेणें पौंड्र आस्फुरिला । महाशंख ॥ ४८ ॥ तो महाप्रळयजलधर । जैसा गडगडित गंहिर । तंव अनंतविजय युधिष्ठिर । आस्फुरित असे ॥ ४९ ॥ नकुळें सुघोष । सहदेवें मणिपुष्पक । जेणें नादें अंतक । गजबजला ठाके ॥ १५० ॥

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥

---

१ बरोबरीचे. २ जोडले. ३ घोडे. ४ उत्तम रथ. ५ भरल्या. ६ सारथि. ७ मारुति. ८ आश्चर्य. ९ सेवक. १० शंखाचें नांव. ११ वाजविला. १२ सहज. १३ गंभीर. १४ सूर्य. १५ वाद्यगजर. १६ कोठें. १७ त्यानें. १८ मोठ्या आवाजानें. १९ अर्जुनानें. २० अद्भुत. २१ मिळाले. २२ ब्रह्मांड २३ शंभर तुकडे. २४ आवेशला. २५ प्रळयकालींचा मेघ. २६ गंभीर. २७ यम.

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

तेथ भूपती होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक[1] । हा काशीपति देख । महाबाहू ॥ ५१ ॥ तेथ अर्जुनाचा सुत[2] । सात्यकि अपराजित । धृष्टद्युम्न नृपनाथ । शिखंडी हेन[3] ॥ ५२ ॥ विराटादि नृपवर । जे सैनिक मुख्य वीर । तिहीं नानाशंख । निरंतर आस्फुरिले ॥ ५३ ॥ तेणें महाघोषनिर्घातें[4] । शेष कूर्म अवचितें । गजबजोनि भूभारातें । सांडूं पाहाती ॥ ५४ ॥ तेथ तिन्ही लोक डळमळित[5] । मेरु मांदार आंदोलित[6] । समुद्रजळ उसळत । कैलासवरी ॥ ५५ ॥ पृथ्वीतळ उलथों पहात । आकाश असे आंसुडत । तेथ सडा[7] होत । नक्षत्रांचा ॥ ५६ ॥ सृष्टि गेलीरे गेली । देवां मोकळवाही[8] जाहली । ऐसी एक टाळी पिटिली । सत्य-लोकीं[9] ॥ ५७ ॥ दिहांचि[10] दिन थोकला[11] । जैसा प्रळयकाळ मांडला । तैसा हाहाकार जाहला । तिहीं लोकीं ॥ ५८ ॥ तें देखोनि आदिपुरुष[12] विस्मित । म्हणे झणें[13] होय पां अंत । मग लोपिला अद्भुत । संभ्रम[14] तो ॥ ५९ ॥ म्हणोनि विश्व[15] सांवरलें । एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें । जैं महाशंख आस्फुरिले । कृष्णादिकीं ॥ १६० ॥ तो घोष तरी उपसंहरला[16] । परी पडिसाद[17] होता राहिला । तेणें दळभार विध्वंसिला[18] । कौरवांचा ॥ ६१ ॥ जैसा गजघटाआंत[19] । सिंहलीलां[20] विदारित[21] । तैसा हृदयातें भेदित । कौरवांचिया ॥ ६२ ॥ तो गाजत जंव आइकती । तंव उभेचि [22] हियें घालिती । एकमेकांतें म्हणती । सावध रे सावध ॥ ६३ ॥

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥**

तेथ बळें[23] प्रौढीपुरते । महारथी[24] वीर होते । तिहीं पुनरपि दळातें । आवरिलें ॥ ६४ ॥ मग सरिसेपणें[25] उठावले । दुणवटोनि[26] उचलले । तया दंडीं[27] क्षोभलें । लोकत्रय ॥ ६५ ॥ तेथ बाणवरी[28] धनुर्धर । वर्षताति निरंतर । जैसे प्रळयांत जलधर । अनिवार कां ॥ ६६ ॥ तें देखिलिया अर्जुनें । संतोष घेऊनि मनें । मग संभ्रमें[29] सेने । दिठी[30] घालीतसे ॥ ६७ ॥ तंव संग्रामीं[31] सज्ज[32] जाहले । सकळ कौरव देखिले । तंव लीलां[33] धनुष्य उचलिलें । पांडु-कुमरें ॥ ६८ ॥

---

१ प्रतिविंध्यादि द्रौपदीचे मुलगे. २ अभिमन्यु. ३ ही, आणखी. ४ मोठ्या आवाजाच्या धक्यानें. ५ डळमळतात. ६ हालत. ७ वर्षाव. ८ आश्रयरहित. ९ ब्रह्मलोकीं. १० दिवसासच. ११ झाकला. १२ ब्रह्मा. १३ कदाचित्. १४ आवेश. १५ जगत्. १६ लय पावला. १७ प्रतिध्वनि. १८ पळापळ केली. १९ हत्तीच्या कळपांत. २० सहज. २१ थरकांप उठवितो. २२ धैर्य सोडून. २३ बलवत्तेनें पूर्ण. २४ दहा हजारांशीं युद्ध करणारा. २५ सिद्धतेनें. २६ दोहींकडून. २७ सैन्ययोगानें. २८ बाणावर बाण. २९ त्वरेनें. ३० दृष्टी. ३१ युद्धांत. ३२ सिद्ध. ३३ सहज.

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

र्जुन उवाच–सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥

ते वेळीं अर्जुन ह्मणतसे देवा । आतां झडकरी रथ पेलांवा । नेऊनि मध्यें घालावा । दोहीं दळां ॥ ६९ ॥

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥

योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

तंव मी नावेक[1] । हे सकळ वीर सैनिक[2] । न्याहाळीन अशेख । झुंझते जे ॥ १७० ॥ एथ के असती आघवे । परी कवणेंसीं म्यां झुंझावें । हें रणीं लागे पहावें । ह्मणऊनियां ॥ १ ॥ बहुतकरूनि कौरव । हे आतुर दुःस्वभाव । वाढिवावीण हांव । बांधिती झुंझीं ॥ २ ॥ झुंझाची आवडी धरिती । परी संग्रामीं धीर न्हती । हें सांगोनि रायाप्रती । ऐसें संजयो ह्मणे ॥ ७३ ॥

य उवाच–एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥

नाइका अर्जुन इतुकें बोलिला । तंव श्रीकृष्णें रथ पेलिला । दोहीं सैन्यांमाजि केला । तेणें ॥ ७४ ॥

भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥

तत्रापश्यत् स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥

श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥

तेथ भीष्मद्रोणादिक । जवळिकेचि सन्मुख । पृथिवीपति आणिक । बहु आहाती ॥ तेथ स्थिर करूनियां रथ । अर्जुन असे पाहत । तो दळभार समस्त । संभ्रमेंसीं

---

[1] क्षणभर. [2] योद्धे. ४ पाहीन. ५ संपूर्ण. ६ सर्व. ७ उतावळे. ८ पराक्रमावांचून. ९ डौल. १० गंभीर. ११ धृतराष्ट्राला. १२ नेला. १३ नातेवाईक. १४ राजे. १५ आहेत. सेना. १७ त्वरेनें.

॥ ७६ ॥ मग देवा ह्मणे देख देख। हे गोत्र[1] गुरु अशेख[2] । तंव कृष्णा मनीं[3] नावेक[4] । विस्मो[5] जाहला ॥ ७७ ॥ [6]तो आपणयां[7] आपण ह्मणे । एथ कायी कवण जाणे । हें मनीं धरिलें येणें[8] । परी कांहीं आश्चर्य असे ॥ ७८ ॥ ऐसी पुढील सेघेत[9] । तो सहजें जाणे हृदयस्थ[10] । परि उगा असे निवांत । तिये वेळीं ॥ ७९ ॥ तंव तेथ पार्थ सकळ । पितृ पितामह केवळ । गुरु बंधु मातुळ । देखता जाहला ॥ १८० ॥ इष्ट मित्र आपुले । कुमर जन देखिले । हे सकळ असती आले । तयांमाजी ॥ ८१ ॥ सुहृज्जन[11] सासरे । आणीकही सखे सोइरे । कुमर पौत्र[12] धनुर्धरें । देखिले तेथ ॥ ८२ ॥ जयां उपकार होते केले । कीं आपदीं[13] जे रक्षिले । हें असो वडिल धाकुले[14] । आदिकरुनी ॥ ८३ ॥ ऐसें गोत्रचि दोहीं दळीं । उदित[15] जालें असे कळीं[16] । हें अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें ॥ ८४ ॥

## कृपया परयाऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

तेथ मनीं गजबज जाहली । आणि आपैसी[17] कृपा[18] उपजली । तेणें अपमानें[19] निघाली[20] । वीरवृत्ति[21] ॥ ८५ ॥ जियां[22] उत्तमकुळींचिया होती । आणि गुणलावण्य[23] आथि[24] । तियां[25] आणिकींतें न साहती[26] । सुतेजपणें[27] ॥ ८६ ॥ नवयि[28] आवडिचेनि भरें । कामुक[29] निजवनिता[30] विसरे । मग पाडेवीण[31] अनुसरे[32] । भ्रमला[33] जैसा ॥ ८७ ॥ कीं तपोबळें[34] ऋद्धी[35] । पातलिया[36] [37]भ्रंशे बुद्धी । मग तया विरक्तातासिद्धी[38] । नाठवे ती ॥ ८८ ॥ तैसें अर्जुना तेथ जाहालें । असतें[39] पुरुषत्व गेलें । जे अंतःकरण द्रवलें[40] । कारुण्यासी ॥ ८९ ॥ देखा मंत्रज्ञ बरळ[41] जाय । तेथ कां जैसा संचार[42] होय । तैसा तो धनुर्धर महामोहें । आकळिला[43] ॥ १९० ॥ ह्मणऊनि असता धीर गेला । हृदया द्रव[44] आला । जैसा चंद्रें कळीं[45] शिवतला[46] । सोमकांत[47] ॥ ९१ ॥ तयापरी पार्थ । अतिस्नेहें मोहित । मग सखेद[48] असे बोलत । श्रीअच्युतेसीं[49] ॥ ९२ ॥ तो ह्मणे अवधारीं देवा । म्यां पाहिला हा मेळावा[50] ।

---

१ गोत्री. २ सर्व. ३ कृष्णाच्या मनांत. ४ क्षणभर. ५ आश्चर्य. ६ श्रीकृष्ण. ७ आपणाशीं. ८ अर्जुन. ९ आठवण करितो. १० हृदयांत राहणारा श्रीकृष्ण. ११ मित्र. १२ नातू. १३ संकटसमयीं. १४ लहान. १५ उत्सुक. १६ कलहीं. १७ आपोआप. १८ दया. १९ तो अपमान न साहून. २० नाहिंसी झाली. २१ शूरपणा. २२ ज्या. २३ अती सुंदर. २४ आहेत. २५ त्या. २६ सहन करीत. २७ पातिव्रत्याच्या तेजानें. २८ नव्या. २९ विषयी पुरुष. ३० आपली स्त्री. ३१ योग्यतेवांचून. ३२ अनुकूल होतो. ३३ वेडावला. ३४ तपश्चर्येच्या जोरानें. ३५ संपत्ति. ३६ प्राप्त झाली असतां. ३७ भांबावते. ३८ वैराग्यवानास. ३९ असलेलें. ४० ममतेस. ४१ अभिष्ट, मंत्रोच्चारांत प्रमाद. ४२ बाधा. ४३ आकर्षला. ४४ दयेचा पाझर. ४५ कळांनीं, किरणांनीं. ४६ स्पर्शिला. ४७ चंद्रकांतमणि. ४८ दुःखयुक्त. ४९ कृष्णाशीं. ५० ऐक. ५१ समुदाय.

तंव गोत्रवर्ग आघवा । देखिला एथ ॥ ९३ ॥ हे संग्रामीं उदित । जाहाले असती कीरें[1] समस्त । पण आपणपेयां उचित । केवि होय ॥ ९४ ॥

अर्जुन उवाच—दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥
सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥
गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥

येणेंनावेंचि[4] नेणों कायी । मज आपणपें सर्वथा नाहीं । मन बुद्धी ठायीं । स्थीर नोहे ॥ ९५ ॥ देखें देह कांपत । तोंड असे कोरडें होत । विकळता उपजत । गात्रांसी ॥ ९६ ॥ सर्वांगा कांटोळा आला । अति संताप उपजला । तेथें वेंबळ हात गेला । गांडीवाचा ॥ ९७ ॥ तें न धरतांचि निष्टलें[11] । परि नेणेंचि हातोनि पडिलें । ऐसें हृदय असे व्यापिलें । मोहें येणें ॥ ९८ ॥ जें वज्रापासोनि कठिण । दुर्धर अतिदारुण । तयाहून असाधारण[13] । हें स्नेह नवलें ॥ ९९ ॥ जेणें संग्रामीं हरु जिंतिला । निवातकवचांचा[16] ठावो फेडिला । तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजी ॥ २०० ॥ जैसें भ्रमर भेदी[15] कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें । परि कळिकेमाजि सांपडे । कोंवळिये ॥ १ ॥ तेथ उत्तीर्ण[22] होईल प्राणें । परि तें कमळदळ चिरूं नेणे । तैसें कठिण कोंवळें-पणें । स्नेह[23] देखा ॥ २ ॥ हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मयाही नयेचि आया । म्हणऊनि भुलविला ऐकें राया । संजयो म्हणे ॥ ३ ॥ अवधारीं मग तो अर्जुन । देखोनि सकळ स्वजन । विसरला अभिमान । संग्रामींचा ॥ ४ ॥ कैसी नेणों सदयता । उपनली तेथ चित्ता । मग म्हणे कृष्णा आतां । नसिजे एथ ॥ ५ ॥ माझें अतिशयें मन व्याकुळ । होतसे वाचा बरळ । जे वधावे हे सकळ । येणेंनावें ॥ ६ ॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनु पश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

या कौरवां जरी वधावें । तरी युधिष्ठिरादिकां कां न वधावें । हे[33] येरयेर आघवे ।

---

१ उद्युक्त. २ निश्चयें. ३ आपणालाच. ४ यामुळें. ५ आपलेपण. ६ अगदींच. ७ व्याकुळपणा. ८ इंद्रियें. ९ कांटा. १० ढिला. ११ निसटलें. १२ वज्रापेक्षां. १३ मोठें. १४ हा मोहाचा झटका. १५ शंकर. १६ या नांवाचे दैत्य. १७ ठिकाण. १८ नाहींसा केला. १९ आवडीनें. २० कोणतेंही. २१ कळींत. २२ मरेल. ( मरेल, पण कमळ चिरणार नाहीं असा भावार्थ. ) २३ ममता. २४ ब्रह्मदेवाला. २५ आटोक्यांत. २६ धृतराष्ट्रा. २७ ऐक. २८ दयाभूतपणा. २९ उपजली. ३० न राहावें. ३१ अनिष्ट. ३२ यामुळें. ३३ एकमेक.

गोत्रज आमुचे ॥ ७ ॥ ह्मणोनि जळो हें झुंझें । प्रत्येया नये मज । एणें काय काज । महापापें ॥ ८ ॥ देवा बहुतांपरी पाहतां । एथ वोखटें होईल झुंझतां । वरी कांहीं चुकविता । लाभ आंथी ॥ ९ ॥

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥
येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥

तया विजयवृत्ती कांहीं । मज सर्वथा काज नाहीं । एथ राज्य तरी कायी । पावोनियां ॥ २१० ॥ या सकळांतें वधावें । मग जे भोग भोगावे । ते जळोत आघवे । पार्थ ह्मणे ॥ ११ ॥ तेणें सुखेंवीण होईल । तें भलतसें साहिजेल । वरि जीवितही वेंचिजेल । याचिलागीं ॥ १२ ॥ परी यांसी घात कीजे । मग आपण राज्यसुख भोगिजे । हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥ १३ ॥ तरी आह्मीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें । जरी वडिलां यां चिंतावें । विरुद्ध मनें ॥ १४ ॥ पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ । जे [13]निर्दळिजे केवळ । गोत्र आपुलें ॥ १५ ॥ हें मनींचि केविं धरिजे । आपण वज्राचेया होईजे । वरि घडे तरी कीजे । भलें इयां[16] ॥ १६ ॥ आह्मीं जें जें जोडावें । तें समस्तीं [19]ईहीं भोगावें । हें जीवितही उपकारावें । काजीं ईयांच्या ॥ १७ ॥ आह्मी दिगंतींचे[20] भूपाळ । विभांडूनि सकळ । मग संतोष विजे कुळ । आपुलें जें ॥ १८ ॥ तेचि हे समस्त । परि कैसें कर्म विपरीत । जे जहाले असती उद्यत । झुंझावया ॥ १९ ॥ अंतारियों कुमरें । सांडोनियां भांडारें । शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी ॥ २२० ॥ ऐसियांतें केसेनि मारूं । कवणावरी शस्त्र धरूं । निजहृदया करूं । घात केवीं[29] ॥ २१ ॥

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥

हें नेणसी तूं कवण । परि पैलें भीष्म द्रोण । जयांचे उपकार असाधारण । आह्मां

---

१ युद्ध. २ विचाराला, ( माझ्या विचाराला येत नाहीं, युद्ध करावेसें मला वाटत नाहीं. ) ३ वाईट. ४ आहे. ५ जयाकांक्षा. ६ कार्य. ७ कोणतेंही. ८ सोसवेल. ९ जीवही जरी. १० खर्चिला. ११ मारावें. १२ जगावें. १३ संहारावें. १४ वंश. १५ वज्रासारखा कठोर. १६ यांस. १७ यांनीं. १८ उपयोगीं लावावें. १९ यांच्या. २० सर्व दिशांचे. २१ राजे. २२ जिंकून. २३ सिद्ध. २४ स्त्रिया. २५ मुलें. २६ खजिने. २७ आपले जीव. २८ ठेवून. २९ कसा. ३० पलीकडील. ३१ सामान्य नव्हेत.

बहुत ॥ २२ ॥ एथ शालक सासरे मातुळ । आणि बंधु की हे सकळ । पुत्र नातू केवळ । इष्टही असती ॥ २३ ॥ अवधारीं अति जेवळिकेचे । हे सकळही सोयरे आमुचे । ह्मणोनि शेष आथि वाचे । बोलतांचि ॥ २४ ॥.

**एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥**

हे वैरी भलतें करितु । आतांचि एथें मारितु । परी आपण मनें घातु । न चिंतावा ॥ २५ ॥ त्रैलोक्यींचें अनकळित । जरी राज्य होईल प्राप्त । तरी हें अनुचित । नाचरें मी ॥ २६ ॥ जरी आजि एथ ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे । सांगें मुख केवीं पाहिजे । तुझें कृष्णा ॥ २७ ॥

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

जरी वध करीं गोत्रजांचा । तरी वसौटा होऊनि दोषांचा । मज जोडिलासि तूं हातींचा । दूर होसी ॥ २८ ॥ कुळहरणीं पातकें । तियें आंगीं जडती अशेखें । तये वेळीं तूं कवणें कें । देखावासी ॥ २९ ॥ जैसा उद्यानामाजि अनळ । संचरला देखोनि प्रबळ । मग क्षणभरी कोकिळ । स्थिर नोहे ॥ २३० ॥ कां सकर्दम सरोवर । अवलोकुनी चकोर । न सेवित अव्हेर । करूनि निघे ॥ ३१ ॥ तयापरी तूं देवा । मज झकऊन नयेसि मांवा । जरी पुण्याचा वोलावा । नाशिजैल ॥ ३२ ॥

**तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥**

ह्मणोनि मी हें न करीं । इये संग्रामीं शस्त्र न धरीं । हें किडाळ बहुतीं परीं । दिसतसे ॥ ३३ ॥ तुजसीं अंतराय होइल । मग सांगें आमुचें काय उरेल । तेणें दुःखें हियें फुटेल । तुजवीण कृष्णा ॥ ३४ ॥ ह्मणऊनि कौरव हे वधिजैती । मग आह्मी भोग भोगिजती । हे असो मात अघडती । अर्जुन ह्मणे ॥ ३५ ॥

---

१ मेहुणा, बायकोचा भाऊ. २ जवळचे. ३ आहे. ४ पुनः. ५ करोत. ६ उपद्रवरहित. ७ करणार नाहीं. ८ उरावें. ९ आश्रयस्थान. १० सांपडलेला. ११ कुलाच्या घातानें. १२ सर्व. १३ कोठें. १४ बागेंत. १५ अग्नि. १६ फार. १७ चिखलानें युक्त. १८ तिरस्कार. १९ ठकवून. २० परत पुन्हा. २१ वाईट. २२ वियोग. २३ हृदय. २४ मारले जातील. २५ न घडणारी.

**यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः ।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥**

**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥**

हे [1]अभिमानमदें भुलले । जऱ्हीं पां संग्रामा आले । तऱ्हीं आह्मां हित [2]आपुलें । जाणावें लागे ॥ ३६ ॥ हें ऐसें कैसें करावें । जे [2]आपुले आपण मारावे । [3]जाणतजाणतांचि सेवावें । [4]काळकूट ॥ ३७ ॥ [5]हां जी मार्गे चालतां । पुढां सिंह जाहाला [6]अवचितां । तो तंव चुकवितां । लाभ [7]आथि ॥ ३८ ॥ असता प्रकाश सांडावा । मग [8]अंधकूप [9]आश्रावा । तरी तेथ कवण देवा । लाभ सांगें ॥ ३९ ॥ कां समोर अग्नि देखोनी । जरी न [10]वंचिजे [11]वोसंडोनी । तरी क्षणीं एका [12]कवळूनी । जाळूं सके ॥ २४० ॥ तैसे दोष हे [13]मूर्त । अंगीं [14]वोजों असती पाहात । हें जाणतांही कांवि एथ । [15]प्रवर्तावें ॥ ४१ ॥ ऐसें पार्थ तिये अवसरीं । ह्मणे देवा अवधारीं । या [16]कल्मषाची थोरी । सांगेन तुज ॥ ४२ ॥

**कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥**

जैसें काष्ठें काष्ठ [17]मंथिजे । तेथ [18]वन्हि एक उपजे । तेणें [19]काष्ठजात जाळिजे । [20]प्रज्वळलेनी ॥ ४३ ॥ तैसा [21]गोत्रींचि परस्परें । जरी वध घडे मत्सरें । तरी तेणें महादोषें [22]घोरें । कुळचि नाशे ॥ ४४ ॥ ह्मणवूनि एणें पापें । [23]वंशजधर्म लोपे । मग अधर्मेचि [24]आरोपे । कुळामाजी ॥ ४५ ॥

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥**

एथ सारासार विचारावें । कवणें काय आचरावें । आणि [25]विधिनिषेध आघवे । [26]पैरुषाति ॥ ४६ ॥ असता दीप दवडिजे । मग अंधकारीं [27]राहाटिजे । तरी [28]उजूचि कां अडखुळिजे । जयापरी ॥ ४७ ॥ तैसा कुळीं कुळक्षय होय । तये वेळीं तो [29]आद्यधर्म

---

१ उन्मत्तपणानें. २ भाउबंध. ३ समजूनउमजून. ४ कालकूट नांवाचें विष. ५ अहोजी. ६ अकस्मात्. ७ आहे. ८ अंधारयुक्त विहीर. ९ स्वीकारावा. १० न जाइजे. ११ टाकून. १२ व्यापून. १३ प्रत्यक्ष. १४ लागो. १५ चालावें. १६ पातकाची. १७ घासावें. १८ अग्नि. १९ लांकडांचा समुदाय. २० प्रदीप्त झाल्यानें. २१ एका कुळांत. २२ महान. २३ कुलधर्म. २४ उत्पन्न होतो. २५ कर्तव्याकर्तव्य. २६ नष्ट होती. २७ वापर करणें. २८ लागलेंच चांगल्या स्थळीं ( अडखळण्यासारखी जागा नसतांना अडखळावें ). २९ अनादि.

जाय । मग आन कांहीं आहे । पापावांचुनी ॥ ४८ ॥ जैं येमनियम ठाकती । तेथ इंद्रियें सैरें राहाटती । म्हणऊनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियां ॥ ४९ ॥ उत्तम अधमीं संचरती । ऐसे वर्णावर्ण मिसळती । तेथ समूळ उपडती । जातिधर्म ॥ २५० ॥ जैसी चोहटाचिये बळी । पाविजे सैरें कावळीं । तैसीं महापापें कुळीं । संचरती ॥ ५१ ॥

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।

पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥

मग कुळा तया अशेखा । आणि कुळघातकां । [13]येरयेरां नरका । जाणें आथि ॥५२॥ देखें वंशवृद्धि समस्त । यापरी होय पतित । मग [16]वोवांडिती स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ॥५३॥ जेथ नित्यादि क्रिया ठाके । आणि [19]नैमित्तिक क्रिया पारुखे । तेथ कवणा [21]तिळोदकें । कवण अर्पी ॥ ५४ ॥ तरी पितर काय करिती । कैसेनि स्वर्गीं वसती । म्हणोनि तेही येती । कुळापासीं ॥ ५५ ॥ जैसा नखाग्रीं व्याळ लागे । तो शिखांत व्यापी वेगें । तेवीं आब्रह्म कुळ अवघें । आप्लविजे ॥ ५६ ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।

उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।

नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।

यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

देवा अवधारीं आणीक एक । एथ घडे पहा पातक । जें संगदोषें हा लौकिकें । अधों पडे ॥ ५७ ॥ जैसा घरीं आपुला । वैरिवसें अग्नि लागला । तो आणिकांहीं प्रज्वळिला । जाळूनि घाली ॥ ५८ ॥ तैसिया तया कुळसंगती । जे जे लोक वर्तती । तेही बाधा पावती । निमित्तें येणें ॥ ५९ ॥ तैसें नाना दोषें सकळ । अर्जुन म्हणे तें कुळ । मग महाघोर केवळ । निरय भोगी ॥ २६० ॥ पडिलिया तिये ठायीं । मग कल्पांतींही उकल नाहीं । येतुलें पतन कुलक्षयीं । अर्जुन म्हणे ॥ ६१ ॥ देवा हे विविधें कानीं ऐकिजे । परि अझुनिवरी त्रास नुपजे । हृदय वज्राचें हें काय कीजे । अवधारीं पां ॥ ६२ ॥

---

१ अन्य. २ यम=मनाचें आकलन, नियम=इंद्रियांचें आकलन. ३ राहती. ४ स्वेच्छ. ५ पापाचरण. ६ नीच. ७ ब्राह्मणशूद्रादि परस्पर. ८ उच्छेद पावती. ९ चव्हाटा. १० सहज. ११ कावळ्यांनीं. १२ सदा, सर्वांना. १३ परस्परांला. १४ आहे. १५ दोषी, पातकी. १६ पडतात. १७ नित्य स्नानसंध्यादि कर्म. १८ राहते. १९ पर्व आदि उद्देशून कर्म. २० बंद होते. २१ तर्पण. २२ सर्प. २३ शेंडीपर्यंत. २४ बुडविजे. २५ लोकाचार. २६ नाश पावे. २७ माजघरीं. २८ पीडा. २९ भयंकर. ३० नरक. ३१ कोण्याही काळीं. ३२ सुटका. ३३ एवढें. ३४ नानाप्रकारें. ३५ उद्भवत नाहीं.

[1]अपेक्षिजे राज्यसुख । जयालागीं तें तंव क्षणिक । ऐसें जाणतांही [2]दोखें । [3]अव्हेरू ना ॥ ६३ ॥ जे हे वडिल सकळ आपुले । वधावया [4]दिठी [5]सूदले । सांग पां काय [6]थेंकुलें । घडलें आह्मा ॥ ६४ ॥

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

आतां यावरी जें [7]जियावें । [8]तयापासूनि हें बरवें । जे शस्त्रें सांडूनि [9]साहावे । बाण यांचे ॥६५॥ तयावरी होय जितुकें । तें मरणही वरि [10]निकें । परी येणें [11]कल्मषें । [12]चाड नाहीं ॥६६॥ ऐसें देखून सकळ । अर्जुनें आपुलें कुळ । मग ह्मणे राज्य तें केवळ । [13]निरयभोग ॥ ६७ ॥

संजय उवाच—एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-
संवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

ऐसें तिये [14]अवसरीं । अर्जुन बोलिला [15]समरीं । संजय ह्मणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥६८॥ मग अत्यंत [16]उद्वेगला । न [17]धरैत [18]गहिंवर आला । तेथ उडी घातली [19]खोलां । [20]रथौनियां ॥ ६९ ॥ जैसा राजकुमर [21]पदच्युत । सर्वथा होय [22]उपहत । कां रवि राहुग्रस्त । [23]कळाहीन ॥ २७० ॥ नातरी [24]महासिद्धिसंभ्रमें । जिंतिला [25]तापस भ्रमें । मग आकळूनि [26]कामें । दीन कीजे ॥ ७१ ॥ तैसा तो धनुर्धर । अत्यंत दुःखें जर्जर । दिसे जेथ [27]रहंवरें । त्यजिला तेणें ॥ ७२ ॥ मग धनुष्यबाण सांडिले । न धरैत अश्रुपात आले । ऐसें एक राया वर्तलें । संजयो ह्मणे ॥ ७३ ॥ आतां यावरी तो वैकुंठनाथ । देखोनि [28]सखेद पार्थ । कवणेपरी [29]परमार्थ । निरूपील ॥७४॥ वेदीं त्रिकांड निरूपण । कर्म उपासना ज्ञान । हेंचि श्रीकृष्ण आपण । निरूपित असे ॥ ७५ ॥ जेणें अर्जुनाचा मोह नाशे । [30]सम्यक् ज्ञान प्रकाशे । ऐसीं उत्तरें विश्वेशें । बोलिजती ॥ ७६ ॥ जे [31]उत्तरमीमांसा उपनिषदें । ते मथूनियां गोविंदें । निरूपिजेल स्वानंदें । जेणें पार्थ उमजे ॥७७॥ ते सविस्तर [32]पुढारी कथा । अति सकौतुक ऐकतां । ज्ञानदेव ह्मणे आतां । निवृत्तिदास ॥ २७८ ॥

इति श्रीज्ञानदेवकृत भावार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

श्लोक ४७, ओव्या २७८.

---

१ इच्छावें. २ दोष. ३ टाकीत नाहीं. ४ दृष्टीपुढें. ५ घातले. ६ कमी. ७ जगावें. ८ त्याहून. ९ सोसावे. १० चांगलें. ११ पापेंकरून. १२ गरज. १३ नरकभोग. १४ समयीं. १५ समरांगणांत. १६ उदास झाला. १७ आवरण्यास अशक्य. १८ हुंदका. १९ खालीं. २० रथांतून. २१ राज्यभ्रष्ट. २२ मानरहित. २३ निस्तेज. २४ समारंभानें. २५ तपस्वी. २६ इच्छेनें. २७ रथोत्तम. २८ दुःख-युक्त. २९ तत्वज्ञान. ३० यथार्थ. ३१ वेदांतज्ञान. ३२ पुढील.

# अध्याय २ रा.

संजय उवाच—**तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।**
**विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥**

मग संजयो ह्मणे रायातें । आइकें तो पार्थ तेथें । [1]शोकाकुळ रुदनातें । करीत असे ॥ १ ॥ तें कुळ देखोनि समस्त । स्नेह [2]उपनलें [3]अद्भुत । तेणें [4]द्रवलें असे चित्त । [5]कवणेपरी ॥ २ ॥ जैसें [6]लवण जळें [7]झळंबलें । नातरी अभ्र [8]वातें हालें । तैसें [9]सधीर परि [10]विरमलें । हृदय तयाचें ॥ ३ ॥ ह्मणोनि [11]कृपा [12]आकळिला । दिसतसे अति [13]कोमाइला । जैसा [14]कर्दमीं रुपला । राजहंस ॥ ४ ॥ तयापरी तो पांडुकुमर । महामोहें अति [15]जर्जर । देखोनि श्रीशार्ङ्गधर । काय बोले ॥ ५ ॥

श्रीभगवानुवाच—**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥**

ह्मणे अर्जुना आदि पाहीं । हें उचित काय [16]इये ठायीं । तूं कवण हें कायी । करीत [17]आहासी ॥ ६ ॥ तुज सांगें काय झालें । कवण [18]उणें आलें । करितां काय [19]ठेलें । खेद [20]कायिसा ॥ ७ ॥ तूं [21]अनुचिता चित्त [22]नेदिसी । धीर [23]कहीं न [24]सांडिसी । तुझेनि नामें [25]अपयशीं । दिशा [26]लंघिजे ॥ ८ ॥ तूं शूरवृत्तीचा [27]ठावो । क्षात्रियांमाजि [28]रावो । तुझिया [29]लोठेपणाचा [30]आवो । तिहीं लोकीं ॥ ९ ॥ तुवां [31]संग्रामीं [32]हरें जिंकिला । निवातकवचांचा [33] [27]ठाय फेडिला । [34]पवाडा तुवां केला । [35]गंधर्वांसीं ॥ १० ॥ पाहतां तुझेनि [36]पाडें । दिसे त्रैलो-[37]क्यही [38]थोकडें । ऐसें [39]पुरुषत्व [40]चोखडें । पार्था तुझें ॥ ११ ॥ तो तूं कीं आजि येथें । सांडूनियां [41]वीरवृत्तीतें । [42]अधोमुख रुदनातें । करीत आहासी ॥ १२ ॥ [43]विचारीं तूं अर्जुनु । कीं [44]कारुण्यें [45]कीजसी दीनु । सांग पां अंधकारें भानु । ग्रासिला [46]आथी ॥ १३ ॥ ना तरी [47]पवन मेघासि [48]बिहे । कीं अमृतासि मरण आहे । पाहें पां [49]इंधनेंचि गिळोनि जाये ।

---

१ शोकानें व्याप्त. २ उपजलें. ३ अपूर्व. ४ विरघळलें. ५ कशा रीतीनें. ६ मीठ. ७ विरघळतें. ८ वाऱ्यानें. ९ धैर्ययुक्त. १० विरघळलें. ११ ममतेनें. १२ मोह पावला. १३ म्लान झाला. १४ चिखलांत. १५ व्याकुळ. १६ ह्या जागीं. १७ आहेस. १८ कमी. १९ राहिलें. २० कशाकरितां. २१ अयोग्याला. २२ दिलें नाहींस. २३ कधींही. २४ सोडला नाहींस. २५ अपयशानें. २६ उल्लंघावी. २७ ठिकाण. २८ श्रेष्ठ. २९ मोठेपणाची. ३० प्रतिष्ठा. ३१ युद्धांत. ३२ शंकर. ३३ नाम विशेष. ३४ शूरपणा. ३५ देवलोकिचे गवई. ३६ बरोबरीनें. ३७ स्वर्ग, पाताळ आणि पृथ्वी. ३८ लहान. ३९ पराक्रम. ४० चांगलें. ४१ क्षात्रियांचा धर्म. ४२ खालीं तोंड घालून. ४३ विचार कर. ४४ दयेनें. ४५ केला गेलास. ४६ आहे? ४७ वारा. ४८ भय पावे. ४९ जळण.

पावकातें[1] ॥ १४ ॥ कीं लवणेंचि[2] जळ विरे । संसर्गें[3] काळकूट[4] मरे । सांग पां महा-फणी[5] दर्दुरें[6] । गिळिजे कायी ॥ १५ ॥ सिंहासि झोंबे कोल्हा । ऐसा अपाड[7] आथि[8] कें[9] जाहाला । परी तो त्वां सांच[10] केला । आजि एथ ॥ १६ ॥ म्हणोनि अझुनी अर्जुना । झणें[11] चित्त देसी या हीनीं[12] । वेगीं धीर करूनियां मना । सावध होईं ॥ १७ ॥ सांडीं हें मूर्खपण । ऊठीं घे धनुष्यबाण । संग्रामीं हें कवण । कारुण्य[13] तुझें ॥ १८ ॥ हां गा[14] तूं जाणता[15] । तरी न विचारिसी[16] कां आतां । सांगें झुंझावेळे सदयता । उचित[17] कायी ॥ १९ ॥ हे असतिये[18] कीर्तिसी नाश । आणि पारत्रिकासि[19] अपभ्रंश[20] । म्हणे जगन्निवास । अर्जुनातें ॥ २० ॥

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥**

म्हणोनि शोक[21] न करीं । तूं पुरता धीर धरीं । हे शोच्यता[22] अव्हेरीं । पांडुकुमरा ॥२१॥ तुज नव्हे हें उचित । येणें नासेल जोडलें[23] बहुत । तूं अझुनि तरी हित । विचारीं पां ॥ २२ ॥ येणें संग्रामाचेनि अवसरें[24] । एथ कृपाळुपण[25] नुपकरे[26] । हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज ॥ २३ ॥ तूं आधींचि काय नेणसी । कीं हे गोत्रज नोळखसी । वायांचि काय करिसी । अतिशय[27] आतां ॥ २४ ॥ आजिचें हें झुंझ । काय जन्मा[28] नवल[29] तुज । हें परस्परें तुह्मां[30] व्याज[31] । सदांचि आथी[32] ॥ २५ ॥ तरी आतां काय जाहालें । कायि स्नेह उपनलें[33] । हें नेणिजे[34] परि कुडें[35] केलें । अर्जुना तुवां ॥ २६ ॥ मोह धरिलिया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल । आणि परलोकही अंतरेल[36] । ऐहिकेंसीं[37] ॥ २७ ॥ हृदयाचें[38] ढिलेपण । एथ निकयासि[39] नव्हे कारण । हें संग्रामीं पतन[40] जाण । क्षत्रियांसी ॥ २८ ॥ ऐसेनि तो[41] कृपावंत । नानापरी असे शिकवित । हें ऐकोनि पांडुसुत । काय बोले ॥२९॥

अर्जुन उवाच—**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥**

देवा हें येतुलेवरी[42] । बोलावें नलगे अवधारीं[43] । आधीं तूंचि विचारीं । संग्राम हा

---

१ अग्नीला. २ मीठ. ३ पोटांत घेतल्यानें. ४ विष. ५ मोठा सर्प. ६ बेडूकानें. ७ विलक्षणपणा. ८ आहे. ९ कोठें. १० खरा. ११ चित्त देऊं नको. १२ वाईट, हलकें. १३ माया. १४ अगा. १५ ज्ञाता. १६ विचार न करिसी. १७ योग्य. १८ असलेल्या. १९ परलोकगतीला. २० मुकणें. २१ खेद. २२ टाक. २३ मिळविलें यश. २४ प्रसंगीं. २५ दयाळूपणा. २६ उपयोगीं नाहीं. २७ पराकाष्ठा, पाल्हाळ. २८ जन्मीं. २९ आश्चर्य. ३० कौरवांपांडवांना. ३१ निमित्त. ३२ आहे. ३३ उत्पन्न झालें. ३४ मला समजत नाहीं. ३५ वाईट. ३६ चुकेल. ३७ इहलोकासह. ३८ मनाचें. ३९ चांगुलपणाला. ४० पातकर. ४१ श्रीकृष्ण. ४२ इतकें. ४३ ऐक.

॥ ३० ॥ हें झुंझ नव्हे प्रमाद[1] । एथ प्रवर्तलिया दिसतसे बाध[2] । हा उघड लिंगभेद[3] । वोडवला[4] आह्मां ॥ ३१ ॥ देखें मातापितरें अर्चिजती[5] । सर्वस्वें तोषें[6] पावविजती[7] । तियें पाठीं[8] केवि वधिजती । आपुलिया हातीं ॥ ३२ ॥ देवा संतवृंदें[9] नमस्कारिजे । कां घडे तरी पूजिजे । हेंवांचुनि[10] केवि निंदिजे । स्वयें वाचा ॥ ३३ ॥ तैसे गोत्रगुरु[11] आमुचे । हे पूजनीय[12] आह्मां नेमाचे । मज बहुत भीष्मद्रोणांचें । वर्ततसे[13] ॥ ३४ ॥ जयालागीं मनें विरूं[14] । आह्मी स्वप्नीं न शकों धरूं । तयां प्रत्यक्ष केवीं[15] करूं । घात[16] देवा ॥ ३५ ॥ वरि जळो हें जियालें[17] । एथ अवघेयांसि[18] हेंचि काय जाहालें । जे यांच्या वधीं अभ्यासिलें[19] । मिरविजे[20] आह्मी ॥ ३६ ॥ मी पार्थ द्रोणाचा केला[21] । येणें धनुर्वेद मज दिधला । तेणें उपकारें काय आभारैला[22] । वधीं तयातें ॥ ३७ ॥ जेथींचिया कृपा[23] लाहिजे[24] वर । तेथेंचि मनें व्यभिचार[25] । तरी काय मी भस्मासुर । अर्जुन ह्मणे ॥ ३८ ॥

**गुरूनहत्वा हि महानुभावान् । श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ॥**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव । भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥**

देवा समुद्र गंभीर आइकिजे । वरि तोहि आहाच[26] देखिजे । परी क्षोभ मनीं नेणिजे । द्रोणाचिये ॥ ३९ ॥ हें अपार जें गगन[27] । वर तयाही होईल मान[28] । परी अगाध[29] भलें गहन[30] । हृदय याचें ॥ ४० ॥ वरि अमृतही विटे[31] । कीं काळवशें[32] वज्रही फुटे । परि मनोधर्म न लोटे[33] । विकारविलाही[34] ॥ ४१ ॥ स्नेहालागीं माये[35] । ह्मणिपे[36] कीर[37] होये । परि कृपा ते मूर्त[38] आहे । द्रोणीं[39] इये[40] ॥ ४२ ॥ हा कारुण्याची आदि[41] । सकळगुणांचा निधि[42] । विद्यासिंधु निरवधि[43] । अर्जुन ह्मणे ॥ ४३ ॥ हा येणें मानें महंत[44] । वरि आह्मांलागीं कृपावंत । आतां सांग पां येथें घात । चिंतू येईल ॥ ४४ ॥ ऐसे हे रणीं वधावे । मग आपण सुखें राज्य भोगावें । तें मना नये आघवें[45] । जीवितेंसीं[46] ॥ ४५ ॥ हे येणें मानें दुर्धर[47] । जे यांहीहूनि[48] भोग सधर[49] । ते असतु[50] एथवर । भिक्षा मागतां भली

---

१ चूक. २ दोष. ३ मोठ्यांचा उच्छेद. ४ प्राप्त झाला. ५ पूजिली जातात. ६ संतोष. ७ पावतात. ८ त्याच्या उलट. ९ साधुसमूह. १० हें सोडून. ११ कुलगुरु. १२ पूज्य. १३ स्मरतें. १४ वैर, वाकडें. १५ कोणत्या प्रकारें. १६ शस्त्रांचा मार. १७ शरीर, जिणें. १८ अवघेयांसी. १९ साधलें, मिळविलें. २० उपयोग करावा. २१ शिकविलेला. २२ आभारी. २३ कृपेनें. २४ लाभिजे. २५ विपर्यास. २६ बाहेरूनच, वरवरच. २७ आकाश. २८ माप. २९ खोल. ३० मोठें. ३१ बिघडेल. ३२ काळाधीनतेनें. ३३ जात नाहीं. ३४ विकृत केला असताही, क्षोभविला. ३५ आई. ३६ ह्मणावी. ३७ खरें, निश्चयानें. ३८ मूर्तिमंत. ३९ द्रोणाचार्यांच्याठायीं. ४० हा. ४१ मूळ. ४२ ठेव, खाण. ४३ मर्यादारहित. ४४ श्रेष्ठ. ४५ सर्व. ४६ जीवापासून. ४७ दुर्घट. ४८ राज्यसुखापेक्षां. ४९ मोठें. ५० असोत.

॥ ४६ ॥ नातरी देशत्यागें जाइजे । कां गिरिकंदर[1] सेविजे । परी शस्त्र आतां न धरिजे । ईयांवरी[2] ॥ ४७ ॥ देवा नैवनिशितीं[3] शरीं । वावरोनि[4] यांचा जिव्हारीं[5] । भोग गिंवसावे[6] रुधिरीं[7] । बुडाले जे[8] ॥ ४८ ॥ ते काढूनि काय कीजती । लिप्त[9] केवि सेविजती । मज नये हे उपपत्ती[10] । यांचिलागीं ॥ ४९ ॥ ऐसें[11] अर्जुन ते अवसरीं । ह्मणे श्रीकृष्णा अवधारीं । परि तें मना नयेचि[12] मुरारी । आइकोनियां ॥ ५० ॥ हें जाणोनि पार्थ भ्याला । मग पुनरपि बोलों लागला । ह्मणे देवो कां चित्त या बोला । देतीचि[12] ना ॥ ५१ ॥

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥**

येऱ्हवीं माझ्या चित्तीं जें होतें । तें मी विवरूनि[13] बोलिलों एथें । परि[14] निकें काय यापरौतें[15] । तें तुह्मी जाणा ॥ ५२ ॥ पैं विरु[16] जयांसि ऐकिजे । आणि या[17] बोलींचि प्राण सांडिजे । ते एथ संग्राममव्याजें[18] । उभे आहाती[19] ॥ ५३ ॥ आतां ऐसें यांतें वधावें । कीं अव्हेरूनियां[20] निघावें । या दोहींमाजि बरवें । तें नेणों आह्मी ॥ ५४ ॥

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः । पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ॥**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे । शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥**

आह्मां काय उचित[21] । तें पाहतां न स्फुरे[22] येथ । [23]जे मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥ ५५ ॥ तिमिरोंवरुद्ध[24] जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे[25] । मग पैंसींच[26] असतां न दिसे । वस्तुजात[27] ॥ ५६ ॥ देवा तैसें मज जाहलें । [23]जे मन हें भ्रांती[28] मैसिलें[29] । आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ॥ ५७ ॥ तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें । [30]निकें तें आह्मां सांगावें । [23]जे सखा सर्वस्व आघवें[31] । आह्मांसि तूं ॥ ५८ ॥ तूं गुरु बंधु पिता । तूं आमुची इष्ट देवता । तूंचि सदा रक्षिता । आपदीं[32] आमुतें ॥ ५९ ॥ जैसा शिष्यातें गुरु । सर्वथा नेणे अव्हेरू । कीं सरितांतें[33] सागरू । त्यजी केवीं ॥ ६० ॥ नातरी अपत्यातें[34] माये । सांडूनि जरी जाये । तरी तें कैसेनि[35] जिये । ऐकें कृष्णा ॥ ६१ ॥ तैसा सर्वांपरी आह्मांसी । देवा तूंचि एक आहासी[36] । आणि बोलिलें जरी न मानिसी[37] । मागील माझें ॥ ६२ ॥ तरी उचित काय आह्मां । जें अव्यभिचरना[38] धर्मा । तें झडकरीं पुरुषोत्तमा । सांग आतां ॥ ६३ ॥

---

१ पर्वताची गुहा. २ यांवर. ३ ताजीधार लावलेल्या बाणांनीं. ४ प्रहार करून. ५ मर्मस्थानीं ६ शोधावे. ७ रक्तांत. ८ करावेत. ९ माखलेले. १० युक्ति. ११ ह्मणोन. १२ देत नाहीं. १३ स्पष्ट करून. १४ चांगलें. १५ पलीकडे. १६ वैर. १७ असें बोलतांच. १८ युद्धाच्या निमित्तानें. १९ आहेत. २० टाकून. २१ योग्य. २२ न सुचे. २३ कारण. २४ अंधारानें वेष्टित. २५ विकार पावते. २६ आपणाजवळ. २७ कोणताही पदार्थ. २८ संशयानें. २९ व्यापिलें. ३० निश्चयात्मक. ३१ सर्व. ३२ संकटकाळीं. ३३ नद्यांला. ३४ मुलाला. ३५ वांचेल. ३६ आहेस. ३७ मानीत नाहींस. ३८ विरुद्ध नाहीं.

मि ममापनुद्या । द्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ॥
असपत्नमृद्धं । राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥

ोनी । जो शोक उपनलासे मनीं । तो तुझिया वाक्यावांचुनी । न
४ ॥ एथ पृथ्वीतल आप होईल । हें महेंद्रपदही पाविजेल । परि मोह
ांचा ॥ ६५ ॥ जैसीं सर्वथा बीजें आहाळलीं । तीं सुक्षेत्रीं जन्हीं
ढती सिंचलीं । आवडे तैसीं ॥ ६६ ॥ नातरी आयुष्य पुरलें आहे ।
ाहे । एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ॥ ६७ ॥ तैसें राज्यभोग-
ोहे इये बुद्धी । एथ जिव्हाळा कृपानिधी । कारुण्य तुझें ॥६८॥ ऐसें
। तंव क्षण एक भ्रांति सांडिला । मग पुनरपि व्यापिला । उर्मी तेणें
हतां उर्मी नोहे । हें अनारिसें गमत आहे । तो ग्रासिला महामोहें ।
वर्म हृदयकल्हारीं । तेथ कारुण्यवेळेच्या भरीं । लागला ह्मणोनि
॥ ७१ ॥ हें जाणोनि ऐसी प्रौढी । जो दृष्टिसवेंचि विष फेडी । तो
ी । पातला कीं ॥ ७२ ॥ तैसिया पंडुकुमरा व्याकुळा । मिरवैतसे
ा कृपावशें अवलीळा । रक्षील आतां ॥ ७३ ॥ ह्मणोनि तो पार्थु ।
ां ह्मणितला हा हेतु । जाणोनियां ॥ ७४ ॥ मग देखा तेथ फाल्गुनु ।
वळूनु । जैसा घनपडळीं भानु । आच्छादिजे ॥ ७५ ॥ तयापरी तो
दुःखें जर्जरू । जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरू । वणवला कां ॥ ७६ ॥
ळ । कृपामृतें सजळ । तो वोळला श्रीगोपाळ । महामेघ ॥ ७७ ॥
ती । तेचि विद्युल्लता झळकती । गंभीर वाचा ते आयती । गर्जनेची
उदार कैसा वर्षेल । तेणें अर्जुनाचळ निवेल । मग नवी विरूढी
॥ ७९ ॥ ते कथा आइका । मनाचिया आराणुका । ज्ञानदेव ह्मणे
॥ ८० ॥

---

उपजला आहे. ३ उपदेशावाचून. ४ प्राप्त. ५ इंद्रपद. ६ बियांचें धान्य.
ांगल्या शेतांत. ९ उगवत नाहींत. १० पाणी शिंपितांही. ११ मनाजोगें.
ोगीं येते. १४ मोठें अमृततुल्य औषध, भगवन्नामामृत. १५ या बुद्धीनें
. १६ आश्रय. १७ कृपा. १८ वेग, लहर. १९ मला वाटते. २० वेगळेंच.
ंयुक्त. २३ कमळीं. २४ वेगानें. २५ मोडेना. २६ मोठा प्रसंग. २७ धांवून
ालेला. २९ असतां. ३० सहज. ३१ मोहरूपी सर्पानें ग्रासलेला. ३२ अर्जुन.
ढगांच्या पडद्यांनीं. ३५ उन्हाळ्यांत. ३६ डोंगर. ३७ वणवा लागला.
ा. ३९ कृपेनें पाझरलेला. ४० वर्षला. ४१ दांतांचें तेज. ४२ विस्तार.
ा. ४४ पालवी. ४५ ज्ञानाची. ४६ समाधान, शांति.

संजय उवाच–एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूवह ॥ ९ ॥

ऐसें संजय असे सांगत । ह्मणे राया तो पार्थ । पुनरपि [1]शोकाकुळित । काय बोले ॥ ८१ ॥ आइकें [2]सखेद बोले श्रीकृष्णातें । आतां [3]नाळवावें तुह्मी मातें । मी [4]सर्वथा न झुंझें एथें । [5]भरंवसेनी ॥ ८२ ॥ ऐसें येकिहेळां बोलिला । मग मौन धरूनि [6]ठेला । तेथ श्रीकृष्ण [7]विस्मयो पावला । देखोनि तयातें ॥ ८३ ॥

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥

मग [8]आपुलां चित्तीं ह्मणे । एथ हें कायि [9]आदरिलें येणें । अर्जुन सर्वथा [10]कांहीं नेणे । काय कीजे ॥ ८४ ॥ हा [11]उमजे आतां कवणेपरी । कैसेनि धीर स्वीकारी । जैसा महातें [12]पंचाक्षरी । [13]अनुमानी कां ॥ ८५ ॥ ना तरी [14]असाध्य देखोनि व्याधि । अमृतासम दिव्य ओषधि । वैद्य [15]सूची [16]निरवधि । [17]निदानीची ॥ ८६ ॥ तैसें [18]विवरीत असे श्रीअनंत । तया दोहीं सैन्यांआंत । [19]जैयापरी पार्थ । भ्रांति सांडी ॥ ८७ ॥ तें कारण मनें धरिलें । मग [20]सरोष बोलों [21]आदरिलें । जैसें मातेच्या [22]कोपीं [23]थांकलें । स्नेह [24]आथी ॥ ८८ ॥ कीं औषधाचिया कडवटपणीं । जैसी अमृताची [25]पुरवणी । ते [26]आहाच न दिसे परि गुणीं । प्रकट होय ॥ ८९ ॥ तैसी वरिवरी पाहतां [27]उदासें । आंत तरी अतिसुरसें । तियें वाक्यें हृषीकेशें । बोलों [28]आदरिली ॥ ९० ॥

श्रीभगवानुवाच–अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ ११ ॥

मग अर्जुनातें ह्मणितलें । आह्मी आजि हें नवल देखिलें । जें तुवां एथ [29]आदरिलें । [30]मांझारींचि ॥ ९१ ॥ तूं जाणता तरी ह्मणविसी । परी [31]नेणिवेतें न सांडिसी । आणि शिकवूं ह्मणों तरी बोलसी । [32]बहुसाल नीति ॥ ९२ ॥ [33]जात्यंधा लागे पिसें । मग तें [34]सैरों

---

१ शोकानें व्याप्त. २ दुःखित. ३ भीड घालूं नये. ४ निश्चयेंकरून. ५ एकदम. ६ राहिला. ७ आश्चर्य. ८ आपल्या. ९ आरंभिलें. १० कांहीं केल्या ऐकत नाहीं. ११ समजेल. १२ ज्योतिषी, मंत्री. १३ परीक्षा करी. १४ बरी न होण्यासारखी. १५ योजतो. १६ शेवटचें, निश्चयाचें. १७ आणीबाणीची. १८ विचार करीत. १९ जेणेंकरून. २० क्रोधयुक्त. २१ आरंभिलें. २२ क्रोधांत. २३ गुप्त झालेलें. २४ आहे. २५ व्याप्ती, भरती. २६ वरवरच. २७ रागीट. २८ प्रारंभ केला. २९ आरंभिलें. ३० मध्येंच. ३१ अज्ञानपणाला. ३२ नानाप्रकारची. ३३ जन्मांधाला. ३४ हवें तिकडे, यथेच्छ.

धांवे जैसें । तुझें शाहाणपण तैसें दिसतसें ॥ ९३ ॥ तूं आपणापें तरी नेणसी । परी या कौरवांतें शोचूं[2] पाहासी । हा बहु विस्मय[3] आह्मांसी । पुढतपुढती[4] ॥ ९४ ॥ तरी सांग पैं[5] अर्जुना । तुजपासूनि स्थिति[6] या त्रिभुवना । हे अनादि विश्वरचना । तें लटिकें[10] कायी ॥ ९५ ॥ एथ समर्थ[7] एक आथी[8] । तयापासूनि भुतें[9] होतीं । तरी हें वांयांचि काय बोलती । जगामाजी ॥ ९६ ॥ हो कां सांप्रत ऐसें जाहालें । जे हे जन्ममृत्यू तुवां सृजिले[11] आणि नाश पावे नाशिलें । तुझेंनि कायी ॥ ९७ ॥ तूं भ्रमलेपणें अहंकृती । यांसि घात न धरिसी चित्तीं । तरी सांगें कायि हे होती । चिरंतनें[12] ॥ ९८ ॥ कीं तूं एक वधिता । आणि सकळ लोक हा मरता । ऐसी भ्रांति झणें[13] चित्ता । येवों देसी ॥ ९९ ॥ अनादिसिद्ध हें आघवें[14] । होत जात स्वभावें । तरी तुवां कां शोचावें[15] । सांगें मज ॥ १०० ॥ परी मूर्खपणें नेणसी । न चिंतावें ते चिंतिसी । आणि तूंचि नीति सांगसी । आह्माप्रति ॥ १ ॥ देखें [16]विवेकी जे होती । ते [17]दोहींतेंही न शोचिती । जे होय जाय हे भ्रांती । ह्मणऊनियां ॥ २ ॥

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥**

अर्जुना सांगेन आइक । एथ आह्मी तुह्मी देख । आणि हे भूपति[18] अशेख[19] । आदिकरूनी ॥ ३ ॥ निरंतर[20] ऐसेचि असोनी[21] । नातरी निश्चित क्षया जाउनी[22] । हे भ्रांति वेगळी करूनी । दोन्ही नाहीं ॥ ४ ॥ हें उपजे आणि नाशे । तें मायावशें[23] दिसे । येऱ्हवीं तत्त्वता[24] वस्तु[25] जें असे । ते अविनाशचि[26] ॥ ५ ॥ जैसें पवनें[27] तोय[28] हालविलें । आणि तरंगाकार जाहालें । तरी कवण कें[29] जन्मलें । ह्मणों ये[30] तेथ ॥ ६ ॥ तेंचि वायूचें स्फुरण[31] ठेलें[32] । आणि उदक सहज सपाट[33] जाहालें । तरी आतां काय निमालें[34] । विचारीं पां ॥ ७ ॥

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥**

आइकें शरीर तरी एक । परी वयसाभेदें[35] अनेक । हें प्रत्यक्षचि देख । प्रमाण तूं ॥ ८ ॥ एथ कौमारत्व[36] दिसे । मग तारुण्यीं तें [37]भ्रंशे । परी देहींचा[38] न नाशे । एकेकासवें[39] ॥ ९ ॥

---

१ स्वताला. २ शोक करूं. ३ आश्चर्य. ४ वारंवार. ५ गा. ६ पालन, आधार. ७ ईश्वर. ८ आहे. ९ प्राणिमात्र, पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश. १० व्यर्थ, खोटें. ११ उत्पन्न केले. १२ चिरंजीव. १३ कदाचित् नको. १४ सर्व. १५ शोक करावा. १६ विचारवान्. १७ जन्मणें आणि मरणें या दोहींलाही. १८ राजे. १९ संपूर्ण. २० नित्य. २१ असणार. २२ जाणार. २३ मायेच्या योगानें. २४ खरेपणानें. २५ परब्रह्म. २६ नाशरहित. २७ वाऱ्यानें. २८ उदक. २९ कोठें. ३० ह्मणतां येईल. ३१ वहाणें. ३२ बंद झालें. ३३ स्थिर. ३४ नाश पावलें. ३५ वयपरत्वें. ३६ बाळपण. ३७ नाहींसें होतें. ३८ देहांत राहणारा, देहाभिमानी जीव. ३९ एकएकासंगें.

तैसीं चैतन्याच्या ठायीं । इयें शरीरांतरें होती जाती पाहीं । ऐसें जाणे तया नाहीं । व्यामोहदुःख ॥ ११० ॥

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥**

एथ नेणावया हेंचि कारण । जें इंद्रियां आधीनपण । तिहीं आकळिजे अंतःकरण । म्हणऊनि भ्रमे ॥ ११ ॥ इंद्रियें विषय सेविती । तेथ हर्ष शोक उपजती । ते अंतर आप्लविती । संगें येणें ॥ १२ ॥ जयां विषयांचा ठायीं । एकनिष्ठता केंहीं नाहीं । तेथ दुःख आणि कांहीं । सुखही दिसे ॥ १३ ॥ देखें शब्दाची व्याप्ति । निंदा आणि स्तुती । तेथ द्वेषाद्वेष उपजती । श्रवणद्वारें ॥ १४ ॥ मृदु आणि कठिण । हे स्पर्शाचे दोनी गुण । जे वपूचेनि संगें कारण । संतोषखेदां ॥ १५ ॥ भ्यासुर आणि सुरेख । हें रूपाचें स्वरूप देख । जें उपजवी सुखदुःख । नेत्रद्वारें ॥ १६ ॥ सुगंध आणि दुर्गंध ॥ हा परिमळाचा भेद । जो घ्राणसंगें विषाद । तोष देता ॥ १७ ॥ तैसाचि द्विविध रस । उपजवी प्रीतित्रास । म्हणूनि हा अपभ्रंश । विषयसंग ॥ १८ ॥ देखें इंद्रियां आधीन होइजे । तैं शीतोष्णातें पाविजे । आणि सुखदुःखीं आकळिजे । आपणपें ॥ १९ ॥ या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं । ऐसा स्वभावचि पाहीं । इंद्रियांचा ॥ १२० ॥ हे विषय तरी कैसे । [२५]रोहिणीचें जळ जैसें । कां स्वप्नींचा आभासे । भद्रजाति ॥ २१ ॥ देखें अनित्य [२७]ते यापरी । म्हणऊनि तूं अव्हेरीं । हा सर्वथा संग न धरीं । धनुर्धरा ॥ २२ ॥

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

हे विषय जयातें नाकळिती । तया सुखदुःखें न पवती । आणि गर्भवाससंगती । नाहीं तया ॥ २३ ॥ तो नित्यरूप पार्था । वोळखावा सर्वथा । जो या इंद्रियार्थां । नागवेचि ॥ २४ ॥

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥**

आतां अर्जुना कांहीं एक । सांगेन मी आइक । [३३]जें विचारें परलोक । वोळखती

---

१ चिच्छक्ति. २ हीं. ३ भ्रांति. ४ वश्य, स्वाधीन. ५ ओढावें. ६ भ्रांति पडते. ७ बुडविती. ८ स्थैर्य. ९ कधीं. १० व्यापकपणा. ११ शरीराचे. १२ सुखदुःखास. १३ भयंकर. १४ वासाचा. १५ नाकानें वास घेतला असतां. १६ दुःख. १७ आनंद. १८ दोन प्रकारचा. १९ स्वरूपापासून भ्रष्ट करणारा. २० इंद्रियांचा आणि त्यांच्या विषयांचा संग. २१ स्वाधीन. २२ बुडून जावें. २३ स्वतः आपण. २४ रमविणारे. २५ मृगजळ. २६ गजांतलक्ष्मी. २७ विषय. २८ सोड. २९ न आकर्षती. ३० न पावती. ३१ जन्माला येणें. ३२ न सांपडे, स्वाधीन होत नाहीं. ३३ जेणें. ३४ स्वर्ग.

॥ २५ ॥ या उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्त्वज्ञ सतत । स्वीकारिती ॥ २६ ॥ सलिलीं पय जैसें । एक होऊनि मिनलें असे । परी निवडूनि राजहंसें । वेगळें कीजे ॥ २७ ॥ कीं अग्निमुखें किडाळ । तोडोनियां चोखाळ । निवडिती केवळ । बुद्धिमंत ॥ २८ ॥ ना तरी जाणिवेच्या आयणी । करितां दधि कडसणी । मग नवनीत निर्वाणीं । दिसे जैसें ॥ २९ ॥ कीं भूस बीं एकवट । उपाणितां राहे घनवट । तेथ उडे तें फोलकट । जाणों आलें ॥ १३० ॥ तैसें विचारितां निरसलें । तें प्रपंच सहजें सांडवलें । मग तत्त्वता तत्त्व उरलें । ज्ञानियांसि ॥ ३१ ॥ म्हणोनि अनित्याच्या ठायीं । तयां आस्तिक्यबुद्धि नाहीं । निष्कर्ष दोहींहीं । देखिला असे ॥ ३२ ॥

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥**

देखें सारासार विचारितां । भ्रांति ते पाहीं असारता । तरी सार तें स्वभावता । नित्य जाणें ॥ ३३ ॥ हा लोकत्रयाकार । तो जयाचा विस्तार । तेथ नाम वर्ण आकार । चिन्ह नाहीं ॥ ३४ ॥ जो सर्वदा सर्वगत । जन्मक्षयातीत । तया केलियाहि घातु । कदा नोहे ॥ ३५ ॥

**अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥**

आणि शरीरजात आघवें । हें नाशवंत स्वभावें । म्हणोनि तुवां झुंझावें । पंडुकुमरा ॥ ३६ ॥

**य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ १९ ॥**

तूं धरूनि देहाभिमानातें । दिठी सूनि शरीरातें । मी मारिता हे मरते । म्हणत आहासी ॥ ३७ ॥ तरी अर्जुना तूं हें नेणसी । जरी तत्त्वता विचारिसी । तरी वधिता तूं नव्हसी । ते वध्य नव्हती ॥ ३८ ॥

---

१ जगामध्यें. २ चिच्छक्ति. ३ सर्वव्यापक. ४ ब्रह्मस्वरूप जाणणारे. ५ उदकांत. ६ दूध. ७ मिळालें. ८ हीन, डांकलग. ९ शुद्ध सुवर्ण. १० कसबी सोनार. ११ ज्ञानाच्या. १२ चातुर्यानें. १३ घुसळणें. १४ लोणी. १५ शेवटीं. १६ कोंडा व धान्य. १७ पाखडतां. १८ उत्तम धान्य. १९ फोल. २० यथार्थ. २१ सार किं सत्य. २२ नाशिवंत. २३ ज्ञान्यांला. २४ भाविक बुद्धि. २५ निर्णय, सिद्धांत. २६ अनित्य, नाशिवंत. २७ तीन लोक उत्पत्ति. २८ जाती, रंग, रूप. २९ सर्व ठिकाणीं असणारा. ३० जन्मनाश रहित. ३१ मारिलें. ३२ सर्व शरीरधारी, आकारास आलेले सर्व. ३३ दृष्टि. ३४ ठेवून. ३५ आहेस. ३६ मारणारा. ३७ नाश पावणारे.

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥२०॥
वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम्।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम् ॥ २१ ॥

जैसें स्वप्नामाजि देखिजे। तें स्वप्नींचि साच आपजे। मग चेऊनियां पाहिजे। तंव कांहीं नाहीं ॥ ३९ ॥ तैसी हे जाण माया। तूं भ्रमत आहासि वायां। शस्त्रें हाणितलिया छाया। जैसी आंगीं न रुपे ॥ १४० ॥ कां पूर्ण कुंभ उलंडला। तेथ बिंबाकार दिसे भ्रंशला। परी भानु नाहीं नासला। तयासवें ॥ ४१ ॥ नातरी मठीं आकाश जैसें। मठाकृती अंतरलें असे। तो भंगलिया आपैसें। स्वरूपचि ॥ ४२ ॥ तैसें शरीराच्या लोपीं। सर्वथा नाश नाहीं स्वरूपीं। म्हणऊनि तूं हे नारोपीं। भ्रांति बापा ॥ ४३ ॥

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ॥
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥

जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे। मग नूतन वेढिजे। तैसें देहांतरातें स्वीकारिजे। चैतन्यनाथें ॥ ४४ ॥

नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः।
न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥
अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥

हा अनादी नित्यसिद्ध। निरुपाधि विशुद्ध। म्हणऊनि शस्त्रादिकीं छेद। न घडे यया ॥४५॥ हा प्रळयोदकें नाप्लवे। हा अग्नीदाह न संभवे। एथ महाशोष न प्रभवे। मारुताचा ॥ ४६ ॥ अर्जुना हा नित्य। अचळु हा शाश्वत। सर्वत्र सदोदित। परिपूर्ण हा ॥ ४७ ॥

---

१ सत्य. २ वाटे. ३ जागें होऊन. ४ भुलतोस. ५ आहेस. ६ वार केल्यास. ७ लागत नाहीं. ८ भरलेला. ९ प्रतिबिंबरूप. १० नष्ट झाला. ११ घर इत्यादिकांत. १२ पोकळी. १३ आकारास आलें. १४ मोडिला असतां. १५ आपोआप. १६ नाशांत. १७ चिन्कळेच्या ठायीं, आत्म्याच्या ठायीं. १८ आरोपूं नको. १९ फाटकें, जुनें. २० नेसावें. २१ दुसरें शरीर. २२ आत्म्यानें. २३ उत्पत्तिरहित. २४ नित्य असणारा. २५ मायावरणादिरहित. २६ शुद्ध. २७ याला. २८ न बुडे. २९ घडे. ३० सुकविण्याची शक्ति. ३१ न घडे. ३२ वायूचा. ३३ कालत्रयीं अबाध्य. ३४ अढळ. ३५ नित्य असणारा.

**अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥**

हा तर्काचिये[1] दिठी । गोचर[2] नोहे किरीटी[3] । ध्यान[4] याचिये भेटी । उत्कंठा[5] वाहे ॥ ४८ ॥ हा सदा दुर्लभ मना । आप[6] नोहे साधना । निःसीम[7] हा अर्जुना । पुरुषोत्तम ॥ ४९ ॥ हा गुणत्रया[8] रहित । अनादि अविकृत[9] । व्यक्तीसि[10] अतीत । सर्वरूप ॥ १५० ॥ अर्जुना ऐसा हा जाणावा । सकळात्मक[11] देखावा । मग सहजें शोक आघवा[12] । हरेल तुझा ॥ ५१ ॥

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथाऽपि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥**

अथवा ऐसें[13] नेणसी । तूं अंतवंतचि[14] मानिसी । तऱ्हीं शोचूं[15] न पवसी । पंडुकुमरा ॥ ५२ ॥ जे आदि[16] स्थिति[17] अंत[18] । हा निरंतर असे नित्य । जैसा प्रवाह अनस्यूत[19] । गंगा-जळाचा ॥ ५३ ॥ तें आदिं नाहीं खंडलें । समुद्रीं तरी असे[20] मिनलें । आणि आंतांचि[21] मध्यें उरलें । दिसे जैसें ॥ ५४ ॥ [22]हें तीन्हीं तयापरी । सरिसींच[23] सदा अवधारीं । भूतांसि[24] कवणीं अवसरीं[25] । ठाकतीना[26] ॥ ५५ ॥ म्हणोनि हें आघवें । एथ तुज नलगे शोचावें[27] । जे स्थितीचि[28] हे स्वभावें । अनादि ऐसी ॥ ५६ ॥ नातरी हें अर्जुना । नयेचि तुझिया मना । [29]जे देखोनि लोक अधीनां । जन्मक्षया ॥ ५७ ॥ तरी एथें कांहीं । तुज शोकासि कारण नाहीं । हे जन्म मृत्यु पाहीं । अपरिहरें ॥ ५८ ॥

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे । हें घटिकायंत्र[32] तैसें । [33]परिभ्रमे गा ॥ ५९ ॥ ना-तरी उदो[34] अस्तु[35] आपैसे[36] । अखंडित होत जात जैसें । हें जन्ममरण तैसें । अनिवार[37] जगीं

१ तर्कशास्त्राच्या दृष्टीनें. २ प्रत्यक्ष. ३ अर्जुनाचें नांव. ४ योग्याचें ध्यान. ५ उत्सुकता. ६ प्राप्त. ७ पाररहित. ८ सत्व, रज आणि तमोगुण. ९ विकार न पावणारा. १० रामकृष्णादि आकारास. ११ सर्वस्वरूप, सर्वव्यापक. १२ सर्व. १३ वर सांगितल्याप्रमाणें. १४ नाशवंत. १५ शोक करूं नको. १६ उत्पत्ति. १७ पालन. १८ संहार. १९ अखंड. २० मिळालें. २१ वाहत्या प्रवाहांत. २२ हीं. २३ एकत्र. २४ निर्मित सृष्टी. २५ समयीं. २६ प्राप्त होत नाहींत. २७ चिंता करावी. २८ सृष्टिक्रम. २९ लोक जन्मक्षयाचे आधीन आहेत हें पाहून. ३० स्वाधिन. ३१ दूर करण्यास कठीण. ३२ कालज्ञानार्थ वाळूचें घड्याळ, रहाटगाडगें. ३३ फिरे. ३४ उदय. ३५ अस्त. ३६ आपोआप. ३७ निवारण्यास कठिण.

॥ १६० ॥ महाप्रळय[1]अवसरें । हें त्रैलोक्यही संहरे । म्हणोनि हा न परिहरे । आदि अंत ॥ ६१ ॥ तूं जरी हें ऐसें मानिसी । तरी खेद कां करिसी । काय जाणतचि नेणसी । धनुर्धरा ॥ ६२ ॥ एथ आणिकही एक पार्था । तुज बहूतीं[2] परी पाहातां । दुःख करावया सर्वथा । [3]विषो नाहीं ॥ ६३ ॥

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥**

[4]जियें समस्तें [5]ईयें भूतें । [6]जन्माआदि [7]अमूर्तें । मग पातलीं [8]व्यक्तीतें । जन्मलेया ॥ ६४ ॥ तियें[9] क्षयासि जेथ जाती । तेथ निभ्रांत[10] [11]आनें नव्हती । देखें पूर्वस्थितीच येती । आपुलिये ॥ ६५ ॥ येरें[12] मध्यें जें [13]प्रतिभासे । तें निद्रिता स्वप्न जैसें । तैसा [14]आकार हा मायावशें । [15]सत्स्वरूपीं ॥ ६६ ॥ ना तरी [16]पवनें स्पर्शिलें नीर[17] । [18]पाढियांसे [19]तरंगाकार । कां [20]परापेक्ष अळंकार । [21]व्यक्ती [22]कनकीं ॥ ६७ ॥ तैसें सकळ हें [23]मूर्त । जाण पां [24]मायाकारित । जैसें आकाशीं [25]बिंबतें । [26]अभ्रपटळ ॥ ६८ ॥ तैसें [27]आदीचि जें नाहीं । तयालागीं तूं [28]रडसी कायी । तूं [29]अवीट तें पाहीं । [30]चैतन्य एक ॥ ६९ ॥ [31]जयाची [32]आर्तीचि भोगित । विषयीं त्यजिले संत । जयालागीं [33]विरक्त । [34]वनवासिये ॥ १७० ॥ दृष्टी [35]सूनि जयातें । [36]ब्रह्मचर्यादि व्रतें । मुनीश्वर तपातें । आचरताती ॥ ७१ ॥

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदे । नमाश्चर्यवद्वदति तथैव चाऽन्यः ॥**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति । श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥२९॥**

एक अंतरीं [37]निश्चळ । जें [38]निहाळितां केवळ । विसरले सकळ । [39]संसारजातें ॥ ७२ ॥ एकां गुणानुवाद करितां । [40]उपरती होऊनि चित्ता । [41]निरवधि [42]तल्लीनता । निरंतर ॥ ७३ ॥ एक एकतांचि [43]निवाले । ते [44]देहभावीं सांडिले । एक अनुभवें पातले । [45]तद्रूपता ॥ ७४ ॥ जैसे [46]सरितओघ समस्त । समुद्रामाजि मिळत । परी [47]माघौते न [48]समात । परतले नाहीं

---

१ वेळीं. २ अनेक तऱ्हांनीं. ३ विषय, ठिकाण. ४ जीं. ५ हीं. ६ जन्मापूर्वीं. ७ निराकार. ८ आकाराला. ९ तीं. १० निःसंशय. ११ अन्य. १२ दुसरें. १३ भासतें, दिसतें. १४ दृश्य वस्तु; जग. १५ आत्म्यावर. १६ वायूनें. १७ उदक. १८ भासे. १९ लाटारूप. २० दुसऱ्याच्या इच्छेनें होणारें. २१ प्रकटपणा. २२ सुवर्ण. २३ साकार. २४ मायेनें केलेलें. २५ दृश्य. २६ ढगाचा पडदा. २७ मूळचें. २८ रडसी. २९ न विटणारें. ३० ज्ञानकला. ३१ ज्या चैतन्याची इच्छा उत्पन्न झाल्यावर मनुष्यास विषय आपोआप सोडतात. ३२ आवडी. ३३ वैराग्यसंपन्न. ३४ वनवास भोगितात. ३५ घालून, ठेवून. ३६ ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ व संन्यास. ३७ चलनरहित. ३८ पाहतां. ३९ खटपट. ४० विषयनिवृत्ति. ४१ निःसीम. ४२ त्यांत निमग्नपणा. ४३ शांत झाले. ४४ मीपणानें. ४५ तदाकारता. ४६ नद्यांचे प्रवाह. ४७ माघारें. ४८ समुद्रांत न मातां.

॥ ७५ ॥ तैसिया योगीश्वरांचिया मती। मिळणीं सर्वे एकवटती। परी जे विचारूनि पुनरावृत्ती। भजतीचिना ॥ ७६ ॥

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥**

जें सर्वत्र सर्वही देहीं। जया करितांही घात नाहीं। तें विश्वात्मक तूं पाहीं। चैतन्य एक ॥ ७७ ॥ इयाचेनि स्वभावें। हें होत जात आघवें। तरी सांग काय शोचावें। एथ तुवां ॥ ७८ ॥ एऱ्हवीं तरी पार्था। तुज कां नेणों ने मनें चित्ता। परी किडाळ हें शोचितां बहुतां परी ॥ ७९ ॥

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥**

तूं अझुनि कां न विचारिसी। काय हें चिंतित आहासी। स्वधर्म तो विसरलासी। तरावें जेणें ॥ १८० ॥ या कौरवां भलतें जाहालें। अथवा तुजचि कांहीं पातलें। कीं युगचि हें बुडालें। जऱ्ही एथ ॥ ८१ ॥ तरी स्वधर्म एक आहे। तो सर्वथा त्याज्य नोहे। मग तरिजेल काय पाहें। कृपाळूपणें ॥ ८२ ॥ अर्जुना तुझें चित्त। जऱ्ही जाहालें द्रवीभूत। तऱ्ही हें अनुचित। संग्रामसमयीं ॥ ८३ ॥ अगा गोक्षीर जरी जाहालें। तरी पथ्यासि नाहीं घेतलें। ऐसेनिहि विष होय सेविलें। नवज्वरीं देतां ॥ ८४ ॥ (तैसें आणीं आन करितां) । नाश होईल स्वहिता। म्हणऊनि तूं आतां। सावध होईं ॥ ८५ ॥ वायांचि व्याकुळ कायी। आपुला निजधर्म पाहीं। जो आचरितां बाध नाहीं। कवणे काळीं ॥ ८६ ॥ जैसें मार्गेचि चालतां। अपायो न पवे सर्वथा। कां दीपाधारें वर्ततां। नाडळिजे ॥ ८७ ॥ तयापरी पार्था। स्वधर्मे राहाटतां। सकळ कामपूर्णता। सहजें होय ॥ ८८ ॥ म्हणोनि योलागीं पाहीं। तुम्हां क्षत्रियां आणिक कांहीं। संग्रामावांचूनि नाहीं। उचित जाणें ॥ ८९ ॥ निष्कपट होआवें। उसिणा घाई जुंझावें। हें असो काय सांगावें। प्रत्यक्षावरी ॥ १९० ॥

---

१ मिळतांच. २ पुनर्जन्म. ३ सेवितच नाहींत, पावत नाहींत. ४ केला असतांही. ५ जगद्रूप ६ याच्या. ७ सर्व. ८ शोक करावा. ९ तुझ्या चित्ताला कां मानवत नाहीं हें मला समजत नाहीं. १० गौण. ११ आहेस. १२ कोणतेंही वाईट. १३ मान झालें. १४ सोडण्यास योग्य. १५ स्नेहयुक्त. १६ अयोग्य. १७ गाईचें दूध. १८ घातलें. १९ विषम ज्वराला. २० एका वर्णानें दुसऱ्या वर्णाचे धर्म आचरले असतां मलतेंच. २१ व्यर्थ. २२ म्लान. २३ दोष. २४ हानि. २५ दिव्याच्या आश्रयानें. २६ अडखळत नाहीं. २७ वर्तणूक करतां २८ मनोरथसिद्धि. २९ याकरितां. ३० व्हावें. ३१ समोरासमोर घाव करून.

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥**

अर्जुना झुंझ देख आतांचें । हें हो कां दैव तुमचें । कीं निधान[1] सकळ धर्माचें । प्रगटलें असे ॥ ९१ ॥ हा संग्राम काय म्हणिपे[2] । कीं स्वर्गचि येणें रूपें । मूर्त[3] कां प्रतापें । उदय केला ॥ ९२ ॥ नातरी गुणाचेनि पतिकरें[4] । आर्तीचेनि[5] पडिभरें[6] । हे कीर्तीचि स्वयंवरें । आली तुज ॥ ९३ ॥ क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तैं झुंझ ऐसें लाहिजे[7] । जैसें मार्गे जातां आडळिजे[8] । चिंतामणीसी[9] ॥ ९४ ॥ ना तरी जांभैयां[10] पसरे मुख । तेथ अवचटें[11] पडे पीयूख[12] । तैसा हा संग्राम देख । पातला असे ॥ ९५ ॥

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥**

आतां हा ऐसा अव्हेरिजे[13] । मग नाथिलें[14] शोचूं[15] बैसिजे । तरी आपण ओहाणा[16] होइजे । आपणपेयां[17] ॥ ९६ ॥ पूर्वजांचें जोडलें । आपणचि होय धाडिलें[18] । जरी आजि शस्त्र सांडिलें । रणीं इये[19] ॥ ९७ ॥ तरी असती[20] कीर्ति जाईल । जगचि अभिशाप[21] देईल । आणि गिंवसित[22] पावतील । महादोष ॥ ९८ ॥ जैसी भर्तारेंहीन[23] वनिता[24] । उपहती[25] पावे सर्वथा । मग तैसी दशा जीविता । स्वधर्मेवीण ॥ ९९ ॥ ना तरी रणीं शव[26] सांडिजे । चौमेरीं[27] गिधीं[28] विदारिजे । तैसें स्वधर्महीना अभिभविजे[29] । महादोषीं[30] ॥ २०० ॥

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥**

म्हणोनि स्वधर्म हा सांडसील । तरी पापा वरिपैंडा होसील । आणि अपेश तें न वचेल[31] । कल्पांतवरी ॥ १ ॥ जाणतेनि[32] तंवचि जियावें[33] । जंव अपकीर्ति आंगा न पवे[34] । आणि सांग पां केविं[35] निगावें[36] । एथोनियां ॥ २ ॥ तूं निर्मत्सर[37] सदयता[38] । एथूनि निघसील कीर[39] माघौतां[40] । परी ते गति[41] समस्तां । न मनेल[42] येथां ॥ ३ ॥ हे चहूंकडूनि

१ ठेवा. २ म्हणावा. ३ मूर्तिमंत. ४ अनुभवानें, प्रतीतीनें. ५ मनाच्या. ६ आसक्तीनें. ७ प्राप्त व्हावें. ८ अडखळावें. ९ इच्छित फळ देणारा मणि. १० जांभईनें. ११ अकस्मात्. १२ अमृत. १३ टाकावा. १४ नसतें. १५ शोक करीत. १६ हानी करणारा. १७ स्वतः आपणाला. १८ गमावलें. १९ ह्या. २० असलेली. २१ तळतळाट. २२ शोधीत. २३ पतिविरहित. २४ स्त्री. २५ अपमान. २६ प्रेत. २७ चोहोंकडून. २८ गिधाडांनीं. २९ महादोष जिंकतात. ३० प्राप्त. ३१ दूर होणार नाहीं. ३२ ज्ञात्यानें. ३३ जगावें. ३४ पावत नाहीं. ३५ कसें. ३६ निघावें. ३७ अभिमानरहित. ३८ कनवाळूपणानें. ३९ निश्चयें. ४० माघारा. ४१ पलायन. ४२ न मानेल, वाटेल. ४३ झाला.

केवळितील । बाण [2]वैरी घेतील । तेथ पार्था न सुटिजेल । कृपाळूपणें ॥ ४ ॥ ऐसेनिहि [3]प्राणसंकटें । जरी [4]विपायें पां निघणें घटे । तरी तें [5]जियालें [6]चोखटें मरणाहुनी ॥ ५ ॥

**भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः ।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥**

तूं आणिकही एक न विचारिसी । एथ [7]संभ्रमें झुंझों आलासी । आणि [8]सकणवपणें निघालासी । [9]मागुता जरी ॥ ६ ॥ तरी तुझें तें[10] अर्जुना । या वैरियां दुर्जना । कां [11]प्रत्यया येईल मना । सांगें मज ॥ ७ ॥

**अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यंति तवाहिताः ।**
**निंदंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥**

हे ह्मणती गेलारे गेला । अर्जुन आह्मा [12]बिहाला । हा सांगें बोल उरला । [13]निका कायी ॥ ८ ॥ लोक सायासें करूनि बहुतें । वेंचिती[14] आपुलीं जीवितें । परी वाढविती कीर्तीतें । धनुर्धरा ॥ ९ ॥ ते तुज अनायासें । [15]अनकळित जोडिली असे । हें [16]अद्वितीय जैसें । [17]गगन आहे ॥ २१० ॥ तैसी कीर्ति निःसीम[18] । तुझ्या ठायीं [19]निरुपम । तुझे गुण उत्तम । तिहीं लोकीं ॥ ११ ॥ [20]दिगंतींचे भूपती । [21]भाट होऊनि वाखाणिती । जे ऐकिलियां [22]दचकती । [23]कृतांतादिक ॥ १२ ॥ एक ऐसी महिमा [24]घनवट । गंगा तैसी [25]चोखट । [26]जयां देखी जगीं [27]सुभट । [28]वांठ जाहाले ॥ १३ ॥ तें [29]पौरुष तुझें अद्भुत । आइकोनियां हे समस्त । जाले अति [30]विरक्त । [31]जीवितेंसी ॥ १४ ॥ जैसा सिंहाचिया [32]हांकी । [33]युगांत होय [34]मैंदमुखा । तैसा कौरवां [35]अशेखां । धाक तुझा ॥ १५ ॥ जैसे पर्वत वज्रातें । नातरी सर्प गरुडातें । तैसे अर्जुना हे तूतें । मानिती सदा ॥ १६ ॥ तें [36]अगाधपण जाईल । मग [37]हीनत्व आंगा येईल । जरी मागुता निघसील । न झुंझतचि ॥ १७ ॥ आणि हे पळतां पळों नेदिती । धरूनि [38]अवकळा करिती । न [39]गणितें [40]कुंटी बोलती । [41]आइकतां तुज ॥ १८ ॥ मग ते वेळीं [42]हियें फुटावें । आतां [43]लोठेपणें कां न झुंझावें । हें [44]जिंतलें तरी भोगावें । [45]महीतळ ॥ १९ ॥

---

१ वेढितील. २ नंतर. ३ जिवाच्या आकांतानें. ४ कदाचित्. ५ वांचणें. ६ वाईट. ७ समारंभानें. ८ ममताळूपणानें. ९ माघारा. १० दयालुत्व. ११ अनुभवास. १२ भ्याला. १३ चांगला. १४ खरचितात. १५ सहज. १६ एकच–आकाशाला जशी दुसरी जोड नाहीं, तशी तुझ्या कीर्तीलाही नाहीं. १७ आकाश. १८ अतीशय. १९ उपमारहित. २० देशांतरींचे. २१ स्तुतिपाठ करणारे. २२ भितात. २३ यमादिक. २४ गहन. २५ चांगली. २६ ज्यास पहातां. २७ महायोद्धे. २८ तटस्थ, स्तब्ध. २९ शौर्य. ३० उदार. ३१ जिवावर. ३२ गर्जनेनें. ३३ प्रळय. ३४ उन्मत्त हत्तीला. ३५ सर्वांस. ३६ थोरपण. ३७ नीचपणा. ३८ फाजिती. ३९ अपमान करून. ४० कुडी, निंदा. ४१ तुझ्या देखत. ४२ हृदय. ४३ शूरपणानें. ४४ जिंकिलें. ४५ पृथ्वीचें राज्य.

3

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।**
**तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥**

नातरी रणीं एथ । झुंझतां वेंचलें[1] जीवित । तरी स्वर्गसुख [2]अनकळित । पावसील ॥ २२० ॥ म्हणोनि ये गोष्टी । विचार न करीं किरीटी[3] । आतां धनुष्य घेऊनि उठीं । झुंझ वेगीं ॥ २१ ॥ देखें स्वधर्म हा आचरतां । दोष नाशे [4]असता । तुज भ्रांति हे कवण चिंता । पातकाची ॥ २२ ॥ सांगें प्लवेंचि काय बुडिजे । कां मार्गीं जातां [6]आडळिजे । परी विपायें चालों नेणिजे । तरी तेंही घडे ॥ २३ ॥ अमृतें तरीचि मरिजे । जरी [8]विखेंसीं सेविजे । तैसा स्वधर्मीं दोष पाविजे । हेतुकपणें[9] ॥ २४ ॥ म्हणोनियां पार्था । हेतु[10] सांडूनि सर्वथा । तुज क्षात्रवृत्ति[11] झुंझतां । पाप नाहीं ॥ २५ ॥

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

सुखीं संतोषा न यावें । दुःखीं [12]विषादा न [13]भंजावें । आणि लाभालाभ न धरावे । मनामाजी ॥ २६ ॥ ऐथ[14] विजयपण[15] होईल । कीं सर्वथा देह जाईल । हें आधींचि कांहीं पुढील । [16]चिंतावेंना ॥ २७ ॥ [17]आपणयां उचिता । स्वधर्में [18]राहटतां । जें पावे तें [19]निवांतीं । सोसोनि जावें ॥ २८ ॥ ऐसेयां[21] मनें [22]होआवें । तरी दोष न घडे स्वभावें । म्हणोनि आतां झुंझावें । निर्भ्रांत तुवां ॥ २९ ॥

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धियोंगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥**

हे [23]सांख्यस्थिति [24]मुकुळित । सांगितली तुज एथ । आतां [25]बुद्धियोग निश्चित । [26]अवधारीं पां ॥ २३० ॥ जया बुद्धियुक्ता[27] । जालिया पार्था । कर्मबंध सर्वथा । बाधूं [28]न पवे ॥ ३१ ॥ जैसें [29]वज्रकवच लेइजे । मग शस्त्रांचा [30]वर्षाव साहिजे । परी [31]जैतेंसीं वरिजे । [32]अचुंबित ॥ ३२ ॥

---

१ गेलें. २ सहज, अनायासें. ३ अर्जुना. ४ असलेला. ५ नावेनें. ६ आपटावें, अडखळावें, ठेच लागावी. ७ कदाचित्. ८ विषाबरोबर, विषमिश्रित. ९ हेतु धरून. १० फलाची इच्छा. ११ क्षत्रियधर्मानें. १२ खेद मानूं नये. १३ मानावें. १४ समरांगणांत. १५ जिंकलेपण. १६ चिंतूं नये. १७ आपल्याला. १८ व्यवहार करितां. १९ स्वस्थपणें. २० सहन करावें. २१ असें हृद. २२ व्हावें. २३ ज्ञानयोग. २४ संक्षिप्त. २५ कर्मयोग, कर्मानुष्ठान. २६ ऐक. २७ हेतुरहित कर्म केलें असतां. २८ न शके. २९ वज्रकट कवच. ३० वृष्टि. ३१ जय मिळविण्यास, जिंकण्यास. ३२ दुखापत झाल्यावांचून.

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥

तैसें [1]अैहिक तरी न [2]नेशे। आणि मोक्ष तो [3]उरला असे। जेथ [4]पूर्वानुक्रम दिसे। चोखाळत ॥ ३३ ॥ कर्माधारें [5]राहाटिजे। परी [6]कर्मफळा न [7]निरीक्षिजे। जैसा [8]मंत्रज्ञ न [9]बाधिजे। भूतबाधा ॥ ३४ ॥ तियापरी जे सुबुद्धि। [10]आपु जालिया [11]निरवधि। हा भवस्ताचि उपाधि। आकळूं न सके ॥ ३५ ॥ जेथ न [12]संचरे पुण्यपाप। जे सूक्ष्म आणि [13]निष्कंप। गुणत्रयादि लेप। न [14]लेंगति जेथ ॥ ३६ ॥ अर्जुना [15]ते [16]पुण्यवशें। जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे। तरी अशेषही नाशे। संसारभय ॥ ३७ ॥

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

जैसी [17]दीपकळिका धाकुटी। परी बहु [18]तेजातें प्रगटी। तैसी सद्बुद्धि हे [19]थेंकुटी। ह्मणों नये ॥ ३८ ॥ पार्था बहुतीं परी। हे [20]अपेक्षिजे [21]विचारचतुरीं। जे दुर्लभ चराचरीं। [22]सद्वासना ॥ ३९ ॥ [23]आणिकांसारिखा [24]बहुवस। जैसा [25]न जोडे परिस। कां अमृताचा [26]लेशें। [27]दैवगुणें ॥ २४० ॥ तैसी दुर्लभ सद्बुद्धि। जिये परमात्माचि [28]अवधि। जैसा गंगेसि [29]उदधि। निरंतर ॥ ४१ ॥ तैसें ईश्वरावांचुनि कांहीं। [30]जिये आणिक [31]लोहाणें नाहीं। ते एकचि बुद्धि पाहीं। अर्जुना जगीं ॥ ४२ ॥ [32]येर ते [33]दुर्मती। जे बहुधा असे [34]विकरती। तय निरंतर रमती। [35]अविवेकिये ॥ ४३ ॥ ह्मणोनि तयां पार्था। स्वर्ग संसार नरकावस्था। [36]आत्मसुख सर्वथा। [37]दृष्ट नाहीं ॥ ४४ ॥

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥

वेदाधारें बोलती। केवळ कर्म [38]प्रतिष्ठिती। परी कर्मफळीं [39]आसक्ती। धरूनियां ॥ ४५ ॥ ह्मणती संसारीं जन्मिजे। यज्ञादिक कर्म कीजे। मग स्वर्गसुख भोगिजे। [40]मनोहर ॥ ४६ ॥

---

१ ऐहिक. २ न नाशे. ३ न अंतरतां. ४ ज्या बुद्धियोगांत पूर्वानुक्रम (सांख्ययोग) स्पष्ट दिसतो. ५ वर्तावें. ६ कर्मापासून होणाऱ्या फळाला. ७ न इच्छावें. ८ मंत्रशाली. ९ बाधा पावत नाहीं. १० प्राप्त. ११ निःशेष. १२ न शिरे. १३ निश्चल. १४ लागत नाहींत. १५ सद्बुद्धि. १६ पुण्याईनें. १७ दिव्याची ज्योत. १८ प्रकाशाला. १९ अल्प. २० इच्छावी. २१ विचारवंतांनीं. २२ सुबुद्धि. २३ दगडादिक दुसरे. २४ पुष्कळ. २५ न मिळे. २६ अंश. २७ नशीबानें. २८ शेवट, सीमा. २९ समुद्र. ३० जिला. ३१ प्राप्त करून घेणें. ३२ याशिवाय दुसऱ्या. ३३ वाईट इच्छा. ३४ विकार पावविणारी. ३५ अविचारी. ३६ स्वरूपानंद. ३७ दृष्टीस पडत. ३८ स्थापिती ३९ लोभ. ४० रमणीय, सुंदर.

ऐथ हेंवांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं । ऐसें अर्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि ते ॥ ४७ ॥

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**

देखें कामनाअभिभूत । होऊनि कर्मे आचरत । ते केवळ भोगीं चित्त । देऊनियां ॥ ४८ ॥ क्रियाविशेषें बहुतें । न लोपिती विधीतें । निपुण होऊनि धर्मातें । अनुष्ठिती ॥ ४९ ॥

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥**

परी एकचि कुडें करिती । जे स्वर्गकाम मनीं धरिती । यज्ञपुरुषा चुकती । भोक्ता जो ॥ २५० ॥ जैसी कर्पूराची राशि कीजे । मग अग्नि लाऊनि दीजे । कां मिष्टान्नीं संचरविजे । काळकूट ॥ ५१ ॥ दैवें अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला । तैसा नासिती धर्म निपजला । हेतुकपणें ॥ ५२ ॥ सायासें पुण्य अर्जिजे । मग संसार कां अपेक्षिजे । परी नेणती ते काय कीजे । अप्राप्त देखें ॥ ५३ ॥ जैसी रांधवणी रंधे - सोय निकी । करूनियां मोलें विकी । तैसा भोगासाठीं अविवेकी । धाडिती धर्म ॥ ५४ ॥ म्हणोनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा । तयां वेदवादरतां । मनीं वसे ॥ ५५ ॥

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**
**निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥**

तिहीं गुणीं आवृत्त । हे वेद जाण निभ्रांत । म्हणोनि उपनिषदादि समस्त । सात्त्विक ते ॥ ५६ ॥ येर रजतमात्मक । जेथ निरूपिजे कर्मादिक । जे केवळ स्वर्गसूचक । धनुर्धरा ॥ ५७ ॥ म्हणोनि तूं जाण । हे सुखदुःखासीच कारण । एथ झणें अंतःकरण । रिघों देसी ॥ ५८ ॥ तूं गुणत्रयातें अव्हेरीं । मी माझें हें न करीं । एक आत्मसुख अंतरीं । विसंबें झणीं ॥ ५९ ॥

---

१ पृथ्वीवर. २ अविचारी. ३ कामाच्या स्वाधीन. ४ अनेक प्रकारचीं अनुष्ठानें. ५ नाशिती. ६ कर्तव्य प्रयोगादिकांला. ७ निष्णात. ८ आचरतात. ९ वाईट. १० स्वर्गेच्छा. ११ ईश्वरास. १२ मिसळवें. १३ कालकूट नांवाचें विष. १४ उत्पन्न झालेला. १५ सकामपणानें. १६ श्रमानें. १७ संपादावें. १८ इच्छावा. १९ अज्ञानी. २० स्वयंपाक करणारी. २१ स्वयंपाक. २२ चांगला. २३ अविचारी. २४ गमाविती. २५ वेदांतील अर्थवादांत मग्न झालेले. २६ तीन गुणेंकरून. २७ वेष्टित. २८ वेदांतील ज्ञानभाग. २९ अन्य. ३० सांगितलें. ३१ कदाचित्, नको. ३२ शिरूं देऊं. ३३ टाक. ३४ अहंमता. ३५ विसरूं.

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान्सर्वेषुवेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

जरी वेदें बहुत बोलिलें । [1]विविध भेद [2]सूचिले । तऱ्ही आपण हित आपुलें । तेंचि घेपे[3] ॥ २६० ॥ जैसा प्रगटलिया [4]गभस्ती । [5]अशेषही मार्ग दिसती । तरी [6]तेतुलेहि काय [7]चालिजती । सांगें मज ॥ ६१ ॥ कां [8]उदकमय सकळ । जऱ्ही जाहालें असे [9]महीतळ । तरी आपण [10]घेपे केवळ । आर्तीचजोगें ॥ ६२ ॥ तैसे ज्ञानी जे होती । ते [11]वेदार्थातें [12]विवरिती । मग [13]अपेक्षित तें स्वीकारिती । [14]शाश्वत जें ॥ ६३ ॥

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥**

म्हणोनि आइकें पार्था । याचि परी पाहातां । तुज उचित होय आतां । स्वकर्म हें ॥ ६४ ॥ आम्ही समस्तही विचारिलें । तंव ऐसेंचि हें मना आलें । जे न सांडिजे तुवां आपुलें । [15]विहित कर्म ॥ ६५ ॥ परी [16]कर्मफळीं [17]आस न करावी । आणि [18]कुकर्मीं संगती न व्हावी । हे [19]सत्क्रियाचि आचरावी । [20]हेतूविणें ॥ ६६ ॥

**योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥**

तूं योग [21]युक्त होउनी । फळाचा संग टाकुनी । मग अर्जुना चित्त देउनी । करीं कर्में ॥ ६७ ॥ परी [22]आदरिलें कर्म दैवें । जरी समाप्तीतें पावे । तरी विशेषें तेथ [23]तोषावें । [24]तेंही नको ॥ ६८ ॥ कीं निमित्तें कोणें एकें । तें सिद्धी न वचतांचि [25]ठाके । तरी तेथिचेनि [26]अपरितोखें । [27]क्षोभावें ना ॥ ६९ ॥ आचरतां सिद्धी गेलें । तरी [28]कामाचि [29]कीर आलें । परी [30]ठलेंयाही [31]सगुण जाहालें । ऐसेंचि मानीं ॥ २७० ॥ देखें [32]जेतुलालें कर्म [33]निपजे । [34]तेतुलें आदि[35]पुरुषीं समर्पिजे । तरी परिपूर्ण सहजें । जाहालें जाणें ॥ ७१ ॥ देखें [36]सतासतकर्मीं । हें जें [37]सरिसेपण मनोधर्मीं । तेचि योगस्थिती उत्तमीं । प्रशंसिजे ॥ ७२ ॥

---

१ अनेक. २ सुचविले. ३ घ्यावें. ४ सूर्य. ५ अवघे. ६ तितकेही. ७ चालले जातात. ८ जलरूप. ९ पृथ्वीभर. १० इच्छेपुरतें. ११ उपनिषद भाग. १२ विचार करतात. १३ इच्छित. १४ नाश न पावणारें. १५ कर्तव्यकर्म. १६ कर्मजन्य फळाविषयीं. १७ आस्था. १८ निषिद्धकर्मी. १९ सत्कर्म. २० फल इच्छेशिवाय. २१ कर्मयोगी. २२ आरंभिलेलें. २३ संतोषावें. २४ न आतां. २५ राहे. २६ असंतोषानें. २७ भासूं नये. २८ फळास. २९ निश्चयें. ३० राहिलें असतांही. ३१ सफळ. ३२ जेवढें. ३३ उत्पन्न होतें. ३४ तेवढें. ३५ ईश्वरीं. ३६ बरें वाईट. ३७ सारखेंपण.

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥
बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥

अर्जुना समत्व[1] चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें । जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य [2]आथि ॥ ७३ ॥ तो बुद्धियोग [3]विवरितां । बहुतें [4]पाडें पार्था । दिसे हा [5]अरुता । कर्मयोग ॥ ७४ ॥ परी तेंचि कर्म आचरिजे । तरीच हा[6] योग पाविजे । जे [7]कर्मशेष सहजें । योगस्थिती[8] ॥ ७५ ॥ ह्मणोनि बुद्धियोग [9]सधर । तेथ अर्जुना होईं स्थिर । मनें करीं [10]अव्हेर । फळहेतूचा ॥ ७६ ॥ जे बुद्धियोगा [11]योजिले । तेचि [12]पारंगत जाहाले । [13]ईहीं [14]उभयसंबंधीं सांडिले । पापपुण्यीं ॥ ७७ ॥

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ ५१ ॥

ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा [15]नातळती । आणि [16]यातायाती लोपती[17] । अर्जुना तयां ॥ ७८ ॥ मग निरामयभरित[18] । पावती पद [19]अच्युत । ते बुद्धियोगयुक्त । धनुर्धरा ॥ ७९ ॥

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

तूं ऐसा तैं[20] होसी । जैं मोहातें [21]येथा सांडिसी । आणि वैराग्य मानसीं । [22]संचरेल ॥ २८० ॥ मग [23]निष्कळंक [24]गहन । उपजेल आत्मज्ञान । तेणें [25]निचाड होईल मन । [26]अपैसें तुझें ॥ ८१ ॥ तेथ आणिक कांहीं जाणावें । कां मागील तें स्मरावें । हें अर्जुना [27]आघवें । [28]पारुषेल ॥ ८२ ॥

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

इंद्रियांचिया संगती । [29]जिये [30]पसर होतसे मती । ते स्थिर होईल [31]मागुती । आत्मस्व-

---

१ साम्यता. २ आहे. ३ विचार करितां. ४ पुष्कळ प्रकारें. ५ आलीकडचा. ६ बुद्धियोग. ७ सर्व कर्में करून. ८ योगावस्थाप्राप्ति. ९ बळकट. १० तिरस्कार. ११ उद्युक्त झाले. १२ पार. १३ यांनीं. १४ बरेवाईटाचे ठायीं, द्वंद्वाच्या ठायीं. १५ न शिवती. १६ जन्ममरणादि एरझारा. १७ नाहींशा होतात. १८ ब्रह्मानंदभरित, सुखानें भरलेला. १९ अविनाशी. २० तेव्हां. २१ ह्या. २२ शिरेल. २३ निर्दोष. २४ अतिखोल. २५ निष्काम. २६ आपोआप. २७ सर्व. २८ राहील. २९ जी. ३० विस्तृत. ३१ पुनः

रूपीं ॥ ८३ ॥ समाधिसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ । तैं पावसी तूं सकळ । योगस्थिति ॥ ८४ ॥

अर्जुन उवाच–**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥**

तेथ अर्जुन ह्मणे देवा । हाचि अभिप्रावो आघवा । मी पुसेन आतां सांगावा । कृपानिधी ॥ ८५ ॥ मग अच्युत ह्मणे सुखें । जें किरीटी तुज [1]निकें । तें पूस पां [2]उन्मेखें । मनाचेनि ॥ ८६ ॥ या बोला पार्थें । ह्मणीतलें सांग पां श्रीकृष्णातें । काय [3]ह्मणिपे स्थितप्रज्ञातें । वोळखों केवीं ॥ ८७ ॥ आणि स्थिरबुद्धि जो ह्मणिजे । तो केसिया चिन्हीं जाणिजे । जो समाधिसुख [?]भुंजे । अखंडित ॥ ८८ ॥ तो कवणे स्थिती असे । कैसेनि रूपीं विलसे । देवा सांगावें हें ऐसें । लक्ष्मीपती ॥ ८९ ॥ तंव पर-ब्रह्म [9]अवतरण । जो [10]षड्गुणाधिकरण । तो काय श्रीनारायण । बोलत असे ॥ २९० ॥

श्रीभगवानुवाच–**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

ह्मणे अर्जुना [1]परियेसीं । जो हा [12]अभिलाष [13]प्रौढ मानसीं । तो अंतराय स्वसुखेंसीं । करीत असे ॥ ९१ ॥ जो सर्वदा नित्यतृप्त । अंतःकरणभरित । परी विषयांमाजि पतित । जेणें संगें कीजे ॥ ९२ ॥ तो काम सर्वथा जाय । जयाचें आत्मसंतोषीं मन राहे । तोचि स्थितप्रज्ञ होये । पुरुष जाणें ॥ ९३ ॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

नाना दुःखीं [21]प्राप्तीं । जया [22]उद्वेग नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया [23]आर्ती । [24]अडपे-चिजेना ॥ ९४ ॥ अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोध सहजें नाहीं । आणि भयातें नेणे [25]कहीं । परिपूर्ण तो ॥ ९५ ॥ ऐसा जो निरवधी । तो जाण पां स्थिरबुद्धी । जो निरसूनि [28]उपाधी । भेदरहित ॥ ९६ ॥

---

१ चांगलें. २ संतोषानें. ३ ह्मणावें. ४ प्रज्ञ. ५ ह्मटला जातो, ह्मणावा. ६ गुणेनें. ७ भोगी. ८ रममाण होतो. ९ अवतार. १० ऐश्वर्य, धर्म, यश, लक्ष्मी, ज्ञान, आणि विज्ञान हे सहा गुण यांचा आधार. ११ ऐक. १२ इच्छा. १३ प्रबल. १४ विघ्न. १५ सदा संतोषीत. १६ समाधान-युक्त. १७ इंद्रियसुखेंकरून. १८ भ्रष्ट. १९ वासना. २० आपल्या ठायीं स्थिर. २१ प्राप्त झालीं असतां. २२ त्रास. २३ आशा. २४ अडचणींत पडत नाहीं. २५ कधीं. २६ बुद्धिमंत. २७ सोडून. २८ संसार व्यत्यय.

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।
नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥

जो सर्वत्र सदा [1]सरिसा । परिपूर्ण चंद्र कां जैसा । [2]अधमोत्तम प्रकाशा । माजि न ह्मणे ॥ ९७ ॥ ऐसी [3]अनवच्छिन्न समता । [4]भूतमात्रीं सदयता । आणि पालट नाहीं चित्ता । कवणे वेळे ॥ ९८ ॥ [5]गोमटें कांही पावे । तरी संतोषें तेणें [6]नाभिभवे । जो [7]ओखटेनि [8]नागवे । [9]विषादासी ॥ ९९ ॥ ऐसा [10]हरिखें शोकरहित । जो [11]आत्मबोधभरित । तो जाण पां [12]प्रज्ञायुक्त । धनुर्धरा ॥ ३०० ॥

यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

कां [13]कूर्म जिया परी । [14]उवाइला [15]अवेव पसरी । नातरी [16]इच्छावशें आवरी । आपुले आपण ॥ १ ॥ तैसीं इंद्रियें [17]आपैतीं । जयाचें [18]आणितलें करिती । तयाची [19]प्रज्ञा जाण [20]स्थिती । पावली असे ॥ २ ॥

विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

अर्जुना आणिकही एक । सांगेन ऐकें [21]कवतिक । जे विषयातें [22]साधक । त्यजिती [23]नियमें ॥ ३ ॥ [24]श्रोत्रादि इंद्रियें आवरिती । परी [25]रसने नियम न करिती । ते [26]सहस्रधा [27]कवळिजती । विषयीं इहीं ॥ ४ ॥ जैसी वरिवरी पालवी [28]खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे । तरी कैसेनि नाश निपजे । तया वृक्षा ॥ ५ ॥ तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा [29]आडवेनि आंगें [30]फांके । तैसा मानसीं विषय [31]पोखे । [32]रसनाद्वारें ॥ ६ ॥ [33]येरां इंद्रियां विषय तुटे । तैसा नियमूं नये [34]रसें हटें । जे [35]जीवनाचि हें न [36]घटे । [37]येणेंविण ॥ ७ ॥ मग अर्जुना स्वभावें । ऐसियाही नियमातें पावे । जें कां परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ॥ ८ ॥ तैं [38]शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती । जैं [39]सोहंभावप्रतीती । प्रगट होय ॥ ९ ॥

---

१ सारखा. २ वाईटबरा. ३ अखंड. ४ प्राणिमात्रावर. ५ चांगलें. ६ सहज पावत नाहीं. ७ वाईटानें. ८ पावत नाहीं. ९ दुःखाला. १० हर्ष. ११ आत्मज्ञानेंकरून पूर्णता पावलेला. १२ ज्ञानसंपन्न. १३ कांसव. १४ आनंदांत असतां. १५ अवयव. १६ स्वइच्छेनें. १७ स्वाधीन. १८ म्हटलेलें. १९ बुद्धि. २० पूर्णता. २१ नवल. २२ मुमुक्षु. २३ नियमन करून, दमन करून. २४ कान वगैरे. २५ जिव्हा–मनास येईल तसें खाणें. २६ हजारों प्रकारांनीं. २७ वेढले जातात. २८ खुडावी, छेदावी. २९ बाजूच्या. ३० विस्तारतो. ३१ वृद्धि पावतो. ३२ जीभ. ३३ इतर. ३४ खाणें. ३५ जगणें. ३६ घडे. ३७ रसावांचून, अन्नाशिवाय. ३८ मी देह ऐसा भाव. ३९ आपण ब्रह्म असा अनुभव.

**यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

येऱ्हवीं तरी अर्जुना । हें [1]आया नये साधना । जे जे [2]राहाटताति [3]जतना । निरंतर ॥ ११० ॥ जयातें अभ्यासाची [4]धेरटी । यमनियमांची [5]तांठी । जे मनातें सदा [6]मुठी । धरूनि [7]आहाति ॥ ११ ॥ [8]तेही किंजती [9]कांसाविसी । या इंद्रियांची [10]प्रौढी ऐसी । जैसी मंत्र[12]ज्ञातें [13]विवसी । भुलवी कां ॥ १२ ॥ देखें विषय हे तैसे । पावती [14]ऋद्धिसिद्धीचेनि मिषें । मग [15]आकाळिती स्पर्शें । इंद्रियांचेनी ॥ १३ ॥ तिये संधी मन जाये । मग अभ्यासीं [16]थोटावलें ठाये । ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें ॥ १४ ॥

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥**

ह्मणोनि आइकें पार्था । यांतें [17]निर्दळी जो सर्वथा । सर्वविषयीं आस्था । सांडुनियां ॥ १५ ॥ तोचि तूं जाण । [18]योगनिष्ठेसि कारण । जयाचें विषयसुखें अंतःकरण । [19]झकवे ना ॥ १६ ॥ जो आत्मबोधयुक्त । होऊनि असे सतत । जो मातें हृदयाआंत । विसं[20]बेनां ॥ १७ ॥ येऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं । परी मानसीं होईल जरी कांहीं । तरी [21]सांग्यंतचि पाहीं । संसार असे ॥ १८ ॥ जैसा कां विषाचा [22]लेशें । घेतलियां होय [23]बहुवस । मग निभ्रांत करी नाश । जीवितासीं ॥ १९ ॥ तैसी विषयाची शंका । मनीं वसती देखा । घात करी [24]अशेखा । [25]विवेकें जाता ॥ ३२० ॥

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥**

**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥**

जरी हृदयीं विषय[26]स्मृति । तरी निःसंगाही [27]आपजे संगती । संगें प्रगटे मूर्ती । अभिलाषाची ॥ २१ ॥ जेथ काम उपजला । तेथ क्रोध आधींचि आला । क्रोधीं असे ठेविला ।

---

१ स्वाधीनतेस. २ वागतात. ३ यत्नानें. ४ गस्त. ५ बांध. ६ स्वाधीन. ७ आहेत. ८ योगाभ्यासीही. ९ केले जातात. १० दुःखी, घाबरे. ११ बळ. १२ मंत्रविद्या जाणते. १३ भूत, विघ्नदेवता. १४ देवता प्रसन्नतेनें प्राप्त होणाऱ्या अमानुष शक्ति. १५ वश्य करितात. १६ निर्बल होऊन राहतें. १७ संहारी. १८ योगस्थितीस. १९ फसत नाहीं. २० विसरत नाहीं. २१ सर्व प्रकारें. २२ अल्पस्वल्प. २३ फार. २४ सर्व प्रकारें. २५ सर्व विचारांचा. २६ स्मरण. २७ उपजे.

संमोह जाणें ॥ २२ ॥ संमोहा जालियां व्यक्ती । तरी नाश पावे स्मृती । [1]चंडवातें [2]ज्योती । [3]हत जैसी ॥ २३ ॥ कां अस्तमानीं [4]निशि । जैसी सूर्यतेजातें मासी । तैसी दशा [5]स्मृतिभ्रंशीं । प्राणियासी ॥ २४ ॥ मग [6]अज्ञानांध केवळ । तेणें [7]आप्लविजे सकळ । तेथ बुद्धि होय [8]व्याकुळ । हृदयामाजी ॥ २५ ॥ जैसें [9]जात्यंधा पेळणी पावे । मग तें [11]काकुळती [12]सैरा धांवे । तैसी बुद्धीसि होती [13]भंवे । धनुर्धरा ॥ २६ ॥ ऐसा [14]स्मृतिभ्रंश घडे । मग सर्वथा बुद्धि [15]अवघडे । तेथ समूळ हें [16]उपडे । [17]ज्ञानजात ॥ २७ ॥ [18]चैतन्याच्याभ्रंशीं । शरीरा दशा जैसी । तैसें पुरुषा बुद्धिनाशीं । होय देखें ॥ २८ ॥ म्हणोनि आइकें अर्जुना । जैसा [19]विस्फुलिंग लागे [20]इंधनीं । मग तो [21]प्रौढ जालिया त्रिभुवना । पुरों शके ॥ २९ ॥ तैसें विषयांचें ध्यान । जरी [22]विपायें वाहे मन । तरी [23]येसणें हें पतन । [24]गिंवसीत पावे ॥ ३३० ॥

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

म्हणोनि विषय आघवे । सर्वथा [25]मनौनि सांडावे । मग राग द्वेष स्वभावें । नाशतील ॥ ३१ ॥ पार्था आणिकही एक । जरी नाशले हे रागद्वेष । तरी [26]इंद्रियां विषयीं बाधक । रमतां नाहीं ॥ ३२ ॥ जैसा सूर्य आकाशगत । [27]रश्मिकरें जगातें स्पर्शत । तरी संगदोषें काय [28]लिंपत । तेथिचेनि ॥ ३३ ॥ तैसा [29]इंद्रियार्थीं [30]उदासीन । [31]आत्मरसेंचि [32]निर्भिन्न । जो [33]कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥ ३४ ॥ तरी विषयांतही कांहीं । [34]आपणपेंवांचूनि नाहीं । मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ॥ ३५ ॥ जरी उदकीं उदकें बुडिजे । कां अग्नि आगी पोळिजे । तरी विषयसंगें [35]आप्लविजे । [36]परिपूर्ण तो ॥ ३६ ॥ ऐसा आपणचि केवळ । होऊनि असे [37]निखिळें । तयाची [38]प्रज्ञा अचळ । [39]निर्भ्रांत मानीं ॥ ३७ ॥

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

देखें अखंडित [40]प्रसन्नता । [41]आथी जेथ चित्ता । तेथ [42]रिगणें नाहीं समस्तां

१ प्रचंड वाऱ्यानें. २ वात. ३ नष्ट. ४ रात्र. ५ बुद्धि नाशीं. ६ ज्ञानदृष्टि नाहीं तो. ७ बुडवावें बुडतें. ८ म्लान, कासावीस. ९ जन्मांधाला. १० धांवाधांव. ११ दीनतेनें. १२ हवें तिकडे. १३ भ्रम. १४ याद जाणें. १५ अवघडली जाते. १६ उपडून जातें. १७ सर्व प्रकारचें ज्ञान. १८ जीवाच्या नाशानें. १९ ठिणगी. २० सरपण. २१ मोठा. २२ कदाचित्. २३ येवढें. २४ शोधित येतें. २५ मनापासून. २६ इंद्रियांस विषयसेवनानें. २७ किरणांनीं. २८ लिप्त होतो. २९ इंद्रिय ग्रहीत विषयांचे ठायीं. ३० इच्छारहीत. ३१ आत्मज्ञानेंकरून. ३२ परिपूर्ण. ३३ रहित. ३४ स्वतःआपणाशिवाय. ३५ बुडेल. ३६ पूर्ण ज्ञानी. ३७ सर्व. ३८ बुद्धि. ३९ संशयरहित. ४० स्थीरता, शांति. ४१ आहे. ४२ प्रवेश करणें.

संसारदुःखां ॥ ३८ ॥ जैसा अमृताचा निर्झर । प्रसवे जयाचा जठर । तया क्षुधेतृषेचा अडदर । कांहींचि नाहीं ॥ ३९ ॥ तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैंचें कें आहे । तेथ अपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥ ३४० ॥ जैसा निर्वातींचा दीप । सर्वथा नेणें कंप । तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूप । योगयुक्त ॥ ४१ ॥

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चाऽयुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥**

ये युक्तीची कडसणी । नाहीं जयाच्या अंतःकरणीं । तो आकळिला जाण गुणीं । विषयादिकीं ॥ ४२ ॥ तया स्थिरबुद्धि पार्था । कहीं नाहीं सर्वथा । आणि स्थैर्याची आस्था । तेही नुपजे ॥ ४३ ॥ निश्चळत्वाची भावना । जरी नव्हेचि देखें मना । तरी शांति केवीं अर्जुना । आप होय ॥ ४४ ॥ जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं । तेथ सुख विसरोनि न रिघे कहीं । जैसा पापियाच्या ठायीं । मोक्ष न वसे ॥ ४५ ॥ देखें अग्निमाजि घापती । तियें बीजें जरी विरूढती । तरी अशांता सुखप्राप्ती । घडों शके ॥ ४६ ॥ म्हणोनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें । याकारणें इंद्रियांचें । दमन कीजे ॥ ४७ ॥

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥**

इंद्रियें जें जें म्हणती । तें तेंचि जे पुरुष करिती । ते तरलेचि न तरती । विषयसिंधु ॥ ४८ ॥ जैसी नाव थडिये ठाकितां । जरी वरपडी होय दुर्वाता । तरी चुकलाही मागौता । अपावो पावे ॥ ४९ ॥ तैसी प्राप्तेंही पुरुषें । इंद्रियें लाळिलीं जरी कौतुकें । तरी आक्रमिला जाण दुःखें । सांसारिकें ॥ ३५० ॥

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

म्हणोनि अपुलीं आपणपयां । जरी इंद्रियें येतीं आया । तरी अधिक कांहीं धनंजया । सार्थक असे ॥ ५१ ॥ देखें कूर्म जियापरी । उवाइला अवयव पसरी । नातरी इच्छावशें आवरी । आपणपेंचि ॥ ५२ ॥ तैसीं इंद्रियें अपैतीं होतीं । जयाचें म्हणितलें करिती ।

---

१ झरा. २ उत्पन्न करतो. ३ उदर. ४ भय. ५ कोठें. ६ आविर्भाव. ७ निवाऱ्यांतला. ८ योगी. ९ विचार. १० पाशांनीं. ११ शब्दादिकांनीं. १२ कधीं. १३ स्थिरपणाची. १४ इच्छा. १५ कशी. १६ प्राप्त. १७ उद्भव. १८ घातलेलीं. १९ डगमगती. २० द्वैतभाव असणाऱ्यास. २१ अनियमितपण. २२ निग्रह. २३ तीरास. २४ प्राप्त. २५ वादळ. २६ पुनः. २७ अपाय. २८ योगी किंवा ज्ञान्यानें. २९ पोशिलीं. ३० ओढिला. ३१ संसारसंबंधी. ३२ आपणास. ३३ स्वाधीन. ३४ कांसव. ३५ सुखावलेला, स्वेच्छा. ३६ आपले इच्छेनें. ३७ स्वतः. ३८ वश.

तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पातली असे ॥ ५३ ॥ आतां आणिक एक गैहन । पूर्णाचें चिन्ह । अर्जुना तुज सांगेन । परिसें पां ॥ ५४ ॥

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥**

देखें भूतजात निदेलें । तेथेंचि जया पाहलें । आणि जीव जेथ चेइले । तेथ निद्रित जो ॥ ५५ ॥ तोचि तो निरुपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि । तोचि जाणें निरवधि । मुनीश्वर ॥ ५६ ॥

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥**

पार्था आणीकही परी । तो जाणों येईल अवधारीं । जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥ ५७ ॥ जऱ्ही सरितौघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तऱ्ही अधिक नोहे ईषेंत । मर्यादा न सांडी ॥ ५८ ॥ ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता । परी न्यून नव्हे पार्था । समुद्र जैसा ॥ ५९ ॥ तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धी । तयासि क्षोभ नाहीं बुद्धी । आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ॥ ३६० ॥ सांगें सूर्याच्या घरीं । प्रकाश काय वातीवेन्हीं । कां न लविजे तरी अंधकारीं । कोंडेल तो ॥ ६१ ॥ देखें ऋद्धि सिद्धि तयापरी । आली गेली से न करी । तोचि गुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥ ६२ ॥ जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें म्हणे । तो कावें रंजे पालवणें । भिल्लांचेनि ॥ ६३ ॥ जो अमृतातें ठि ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥ ६४ ॥ पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुखा लेखणी नाहीं । तेथ ऋद्धिसिद्धि कायी । मोकृता होती ॥ ६५ ॥

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥**

ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला । तोचि स्थिरप्रज्ञ भला । वोळख तूं ॥ ६६ ॥ तो अहंकारातें दवडुनी । सकळ काम सांडुनी । विचरे विश्व होऊनी । विश्वामाजी ॥ ६७ ॥

---

१ बुद्धि. २ स्थिरता पावली. ३ गूढ. ४ प्राप्ती पावलेल्या पुरुषाचें. ५ ऐक. ६ प्राणिमात्र. ७ निजलेलें. ८ उजाडलें. ९ जागे झाले. १० व्यग्रता न पावलेला. ११ स्थिर बुद्धीचा. १२ शांतता. १३ नद्यांचा प्रवाह. १४ किंचित्. १५ नदी. १६ अधैर्य. १७ सारखा, एवढा. १८ न लावील. १९ आठवण. २० शहाणपणानें, आपल्या घराच्या सौंदर्यानें. २१ तुच्छ, हलकें. २२ संतोष पावे. २३ पर्णकुटीनें. २४ नांव, दोष. २५ ताक. २६ आत्मसुखी. २७ परवा, गणना. २८ अल्प, साधारण. २९ पोसला, पुष्ट झाला. ३० स्थिरबुद्धि. ३१ फिरे.

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।**
**स्थित्वाऽस्यामंतकालेऽपि ब्रह्म निर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

हे ब्रह्मस्थिती निःसीम[1] । जे अनुभविती निष्काम[2] । ते पावले परब्रह्म । अनायासें
६८ ।। जे चिद्रूपीं[3] मिळतां । देहांतींची व्याकुळता । आड ठाकों न सके चित्ता ।
ाज्ञा जेया[4] ॥ ६९ ।। तेचि हे स्थिति । स्वमुखें श्रीपति । सांगत अर्जुनाप्रति । संजयो
ाणे ॥ ३७० ।। ऐसें कृष्णवाक्य ऐकिलें । तेथ अर्जुनें मनीं ह्मणितलें । आतां आमुचिया
ाजा आलें । उपपत्ती[7] इया ॥ ७१ ॥ जें कर्मजात[8] आघवें । एथ निराकारिलें[9] देवें । तरी
हरिषलें[11] म्यां झुंझावें । ह्मणूनियां ॥ ७२ ॥ ऐसा श्रीअच्युताचिया बोला । चित्तीं धनुर्धर
ावायिला । आतां प्रश्न करील भला । आशंकोनी[12] ॥ ७३ ॥ तो प्रसंग असे नागर[13] । जो
सकळ धर्मासी आगर[14] । कीं विवेकामृतसागर[15] । प्रांतहीन[16] ॥ ७४ ॥ जो आपण सर्वनाथ ।
नेरूपिता होईल श्रीअनंत । ज्ञानदेव सांगेल मात । निवृत्तिदास ॥ ३७५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥
श्लोक ७२, ओव्या ३७५.

---

## अध्याय ३ रा.

**अर्जुन उवाच–ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥**

मग आइका अर्जुनें ह्मणितलें । देवा तुह्मीं जें वाक्य बोलिलें । तें म्यां निकें[17] परिसिलें ।
कृपानिधी ॥ १ ॥ तेथ कर्म आणि कर्ता । उरेचिना पाहतां । ऐसें मत[18] तुझें श्रीअनंता ।
निश्चित जरी ॥ २ ॥ तरी मातें केविं श्रीहरी । ह्मणसी पार्था संग्राम[19] करीं । [20]इये लाज-
सीना[21] महाघोरीं । कर्मी सुतां[22] ॥ ३ ॥ हां गा कर्म तूंचि अशेष[23] । निराकरिसी[24] निःशेषें[25] ।

---

१ सीमारहित. २ निरिच्छ. ३ ज्ञानस्वरूपांत. ४ ज्ञान्याला. ५ ज्या ब्रह्मस्थितीनें. ६ कामास. ७ युक्ति. ८ सर्व कर्में. ९ निषेधिलें. १० राहिलें. ११ हर्ष पावला. १२ शंका घेऊन. १३ सुंदर. १४ उत्पत्तिस्थान. १५ विचाररूपी अमृताचा समुद्र. १६ अमर्याद. १७ चांगलें. १८ अभिप्राय. १९ युद्ध. २० ह्या. २१ महा पाप करविण्यास. २२ घालितां. २३ सर्व. २४ निषेधिसी. २५ अगदीं.

तरी मजकरवीं हें सिंहक । कां करविसी ॥ ४ ॥ तरी हेंचि विचारीं श्रीहृषीकेशा । तूं मान देसी कर्मलेशा । आणि येसणी हे हिंसा । करवीत आहासी ॥ ५ ॥

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

देवा तुवांचि ऐसें बोलावें । तरी आह्मी नेणतीं काय करावें । आतां संपलें ह्मणों पां आघवें । विवेकाचें ॥ ६ ॥ हां गा उपदेश जरी ऐसा । तरी अपभ्रंश तो कैसा । आतां पुरला आह्मा धिंवसा । आत्मबोधाचा ॥ ७ ॥ वैद्य पथ्य वारूनि जाये । मग जरी आपणचि विष सुये । तरी रोगिया कैसेनि [13]जिये । सांगें मज ॥ ८ ॥ जैसें आंधळें सुईजे आव्हांटा । कां माजवण दिजे मर्कटा । तैसा उपदेश हा गोमटा । वोढवला आह्मां ॥ ९ ॥ मी आधींचि कांहीं नेणें । वरी कवळिलों [21]मोहें येणें । श्रीकृष्णा विवेक याकारणें । पुसिला तुज ॥ १० ॥ तंव तुझी एकेक नवाई । एथ उपदेशामाजि गोवाई । तरी अनुसरलिया काई । ऐसें कीजे ॥ ११ ॥ आह्मीं तनुमनाजिवें । तुझिया बोला वोठंगावें । आणि तुवांचि ऐसें करावें । तरी सरलें ह्मणें ॥ १२ ॥ आतां ऐसियापरी बोधिसी । तरी [28]निकें आह्मां करिसी । एथ ज्ञानाची आस कायसी । अर्जुन ह्मणे ॥ १३ ॥ तरी ये जाणिवेचें कीर सरलें । परी आणीक एक असें जाहालें । जे थितें डहुळलें । मानस माझें ॥ १४ ॥ तेवींचि श्रीकृष्णा हें तुझें । चरित्र कांहीं नेणिजे । जरी चित्त पाहसी माझें । [34]येणें मिषें ॥ १५ ॥ नातरी झकवीत आहासी मातें । कीं तत्त्वचि कथिसी ध्वनितें । हें अवगमितां निरुतें । जाणवेना ॥ १६ ॥ ह्मणोनि आइकें देवा । हा भावार्थ आतां न बोलावा । मज विवेकु सांगावा । म्हाटा जी ॥ १७ ॥ मी अत्यंत जड असें । परि ऐसाहि निकें[44] परियेसें । श्रीकृष्णा बोलावें तुवां तैसें । ऐकनिष्ठ ॥ १८ ॥ देखें रोगातें जिणावें । औषध तरी देयावें । परी तें अति रुच्य व्हावें । मधुर जैसें ॥ १९ ॥ तैसें सकळार्थभरित । तत्त्व सांगावें तरी उचित । परी [50]बोधे माझें चित्त । जयापरी

---

१ हिंसा. २ कर्ममार्गास. ३ एवढी. ४ आहेस. ५ अज्ञान्यांनीं. ६ आटपलें काय ? ७ विचार करण्याचें. ८ भ्रष्टपणा. ९ पूर्ण झाला. १० मनोरथ, इच्छा. ११ सांगून. १२ घेईल. १३ वांचेल. १४ धाडावें, घालवावें. १५ आडमार्गी. १६ मद्य आदि कैफी पदार्थ. १७ माकडाला. १८ सुरेख. १९ प्राप्त झाला. २० व्यापलों. २१ भ्रांतीनें, २२ नवल. २३ गुंतागुंत. २४ शरणागताला. २५ सर्वप्रकारें. २६ आश्रय करावा. २७ ठाव राहिला नाहीं. २८ घोटाळा. २९ आशा. ३० ज्ञानाचें. ३१ निश्चयें. ३२ स्थिर असलेलें. ३३ खवळलें. ३४ या निमित्तानें, ३५ फसवीत आहेस. ३६ गमज्ञान. ३७ गूढार्थानें. ३८ अनुमान करितां. ३९ निश्चित. ४० यामध्यें. ४१ खरा बोध. ४२ स्पष्ट. ४३ मंदमति. ४४ चांगलें. ४५ भरंवसा ठेवण्यासारिखें, निश्चयाचें. ४६ जिंकावें. ४७ द्यावें. ४८ स्वादिष्ट, रुचिकर. ४९ योग्य. ५० समज घेईल.

। देवा तुजऐसा निज गुरु । आजि आर्तीधणी कां न करूं । एथ भीड कवणाची तूं माय आमुची ॥ २१ ॥ हां गा कामधेनूचें दुभतें । दैवें जाहालें जोपैतें । तरी ची कां तेथें । वांणि कीजे ॥ २२ ॥ जरी चिंतामणी हाता चढे । तरी वांछेचें सांकडें । कां आपुलेनि सुरवाडें । इच्छावें ना ॥ २३ ॥ देखें अमृतसिंधूतें ठाकावें । हानाचि जरी फुटावें । तरी सायास कां करावे । मागील ते ॥ २४ ॥ तैसा तरीं बहुतीं । उपासितां श्रीकमळापती । तो तूं दैवें आजि हातीं । आहालासि ॥ २५ ॥ तरी आपुलिया सवेसीं । कां न मागावासि परेशी । देवा सुकाळ हा ा । पाहिलें असे ॥ २६ ॥ देखें सकळार्तिचें जियालें । आजि पुण्य यशासि आलें । रथ जाहाले । विजयी माझे ॥ २७ ॥ जी जी परममंगळधामा । सकळदेवदेवो- । तूं स्वाधीन आजि आह्मां । ह्मणऊनियां ॥ २८ ॥ जैसें मातेच्या ठायीं । अपत्या सर नाहीं । स्तन्यालागूनि पाहीं । जियापरी ॥ २९ ॥ तैसें देवा तूतें । पुसिजैतसें डे तें । आपुलेनि आर्तें । कृपानिधी ॥ ३० ॥ तरी पारत्रिकीं हित । आणि आच- तरी उचित । तें सांगें एकनिश्चितें । पार्थ ह्मणे ॥ ३१ ॥

गवानुवाच—लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।
ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥

। बोला श्रीअच्युत । ह्मणत असे विस्मित । अर्जुना हा ध्वनित । अभिप्रावो ॥ ३२ ॥ बुद्धियोग सांगतां । सांख्यमतसंस्था । प्रकटिली स्वभावता । प्रसंगें आह्मी ॥ ३३ ॥ हेतु तूं नेणसीचि । ह्मणोनि क्षोभलासि वायांचि । तरी आतां जाणें मीचि । उक्त ॥ ३४ ॥ अवधारीं वीरश्रेष्ठा । ये लोकीं या दोनी निष्ठा । मजचिपासूनि प्रगटा । दिसिद्धा ॥ ३५ ॥ एक ज्ञानयोग ह्मणिजे । जो सांख्यीं अनुष्ठिजे । जेथ ओळखी- पाविजे । तद्रूपता ॥ ३६ ॥ एक कर्मयोग जाण । जेथ साधकजन निपुण । होऊ- ां निर्वाण ॥ पावती वेळे ॥ ३७ ॥ हे मार्ग तरी दोनी । परी एकवटती निदानीं ।

---

१ माझा. २ इच्छेची तृप्ति. ३ मर्यादा. ४ दूध आदि गोरस. ५ मान. ६ इच्छेनी. ७ कमतार्ई. कट. ९ सुखें, आवडेल तसें. १० मान व्हावें. ११ आहानेनें तडफडावें. १२ अमृताजवळ पूर्वी तहानेनें जसें दुःख होत होतें तसें. १३ आपल्या. १४ स्वेच्छेनें. १५ पदार्थाचेचा धनी. समृद्धि. १७ झाला. १८ सर्व इच्छेचे. १९ जीवसाफल्य. २० फळास. २१ मनांतील इच्छा. जयशाली. २३ कल्याणाचें स्थान. २४ सर्व देवांच्या देवांत उत्तम जो तूं. २५ अपेक्षा. दुग्धपानाला. २७ विचारितों. २८ इच्छेनें. २९ परलोकीं. ३० निश्चयानें. ३१ आपर्ये. सांगित. ३३ ज्ञानयोग. ३४ आत्मानात्मविचार. ३५ हेतु, मतलब. ३६ भ्रमलास. ३७ वोलि- लों. ३८ ज्ञानयोग व कर्मयोग. ३९ नियम, मार्ग. ४० नित्यसिद्ध. ४१ आचराया. ४२ तन्म- यत्व. ४३ मुमुक्षु. ४४ कुशल. ४५ साधन तत्पर. ४६ काळांतरेंकरून. ४७ एकत्र होतात. ४८ शेवटीं.

जैसी सिद्धसाध्यभोजनीं । तृप्ति एक ॥ ३८ ॥ कां पूर्वापर सरिता । भिन्न दिसती वाहतां । मग सिंधूमिळणीं ऐक्यता । पावती शेखीं ॥ ३९ ॥ तैसीं दोनीही मतें । सूचिती एका कारणातें । परी उपास्ति ते योग्यते । आधीन असे ॥ ४० ॥ देखें उत्प्लवनासरिसा । पक्षी फळासि झोंबे जैसा । सांगें नर केंवि तैसा । पावे वेगा ॥ ४१ ॥ तो हळू हळू डाळेंडाळें । केतुलेनि एके वेळे । मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी ॥ ४२ ॥ तैसें देख पां विहंगममतें । अधिष्ठूनि ज्ञानातें । सांख्य सद्य मोक्षातें । आकळिती ॥ ४३ ॥ येर योगिये- कर्माधारें । विहितें निजाधारें । पूर्णता अवसरें । पावते होती ॥ ४४ ॥

न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।
न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥

वांचोनि कर्मारंभ उचित । न करितां सिद्धवत । कर्महीनां निश्चित । होईजेना ॥ ४५ ॥ कीं प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होईजे । हें अर्जुना वाया बोलिजे । मूर्खपणें ॥ ४६ ॥ सांगें पैलतीरा जावें । ऐसें व्यसन कां जेथ पावे । तेथ नावेतें त्यजावें । घडे केवीं ॥ ४७ ॥ ना तरी तृप्ति इच्छिजे । तरी कैसेनि पाक न कीजे । कीं सिद्धही न सेविजे । केंवि सांगें ॥ ४८ ॥ जंव निरार्तता नाहीं । तंव व्यापार असे पाहीं । मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजें ॥ ४९ ॥ म्हणोनि आइकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था । तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ५० ॥ आणि आपुलालिये चाडे । आपादिलें हें मांडे । कीं त्यजिलें कर्म सांडे । ऐसें आहे ॥ ५१ ॥ हें वायांचि सैरा बोलिजे । उकल तरी देखोनि पाहिजे । परी त्यजितां कर्म न त्यजे । निभ्रांत मानीं ॥ ५२ ॥

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ॥
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥

जंव प्रकृतीचें अधिष्ठान । तंव सांडीमांडी हें अज्ञान । जे चेष्टा ते गुणाधीन । आपैसी

---

१ तयार व तयार करण्याचें अन्नीं. २ किंवा. ३ पूर्वपश्चिम नद्या. ४ समुद्रांत मिळाल्यानें. ५ अखेरीस. ६ सुचवितात. ७ अभ्यास. ८ उड्डाणाबरोबर. ९ मनुष्य. १० या डाळीवरून त्या डाळीवर. ११ कांहीं वेळानें. १२ साधतो. १३ पक्षीपद्धतीनें. १४ आश्रय करून. १५ ज्ञानी. १६ लगेच. १७ इतर. १८ कर्मयोगी. १९ वर्णाश्रमधर्माला विहित कर्मानें. २० अवकाशानें. २१ शास्त्राप्रमाणें. २२ कर्म केल्यावांचून. २३ ओढवलेलें कर्तव्यकर्म. २४ एवढ्यानें. २५ कर्मरहित. २६ आशा. २७ स्वयंपाक. २८ तयार आलेलें अन्न. २९ निरिच्छपणा. ३० कर्म करण्याची जरूरी. ३१ नसतें. ३२ मोक्षपदीं. ३३ सोडण्यास योग्य. ३४ इच्छेकरितां. ३५ संपादिलेलें. ३६ फळ देईल. ३७ सोडलेलें. ३८ नाहींसें होईल, फळ देणार नाहीं. ३९ व्यर्थ, फुकट. ४० विचार करून पहा. ४१ निःसंशय. ४२ मायेचें. ४३ आश्रय. ४४ त्याग व ग्रहण. ४५ वर्तन. ४६ त्रिगुणाच्या स्वाधीन. ४७ आपोआप.

असे ॥ ५३ ॥ देखें विहित कर्म जेतुलें । तें सगळें जरी वोसंडिलें । तरी स्वभाव काय निमोले । इंद्रियांचे ॥ ५४ ॥ सांगें श्रवणीं ऐकावें ठेलें । कीं नेत्रींचें तेज गेलें । हें नासारंध्र बुझालें । परिमळ नेघे ॥ ५५ ॥ ना तरी प्राणापानगति । कीं निर्विकल्प जाहाली मति । कीं क्षुधातृषादि आर्ति । खुंटलिया ॥ ५६ ॥ हे स्वप्नावबोध ठेले । कीं चरण चालों विसरले । हें असो काय निमोले । जन्म मृत्यू ॥ ५७ ॥ हें न ठेकेची जरी कांहीं । तरी सांडिलें तें कायी । ह्मणोनि कर्मत्याग नाहीं । प्रकृतिमंतां ॥ ५८ ॥ कर्मपराधीनपणें । निपजत असे प्रकृतिगुणें । येरीं धरी मोकळीं अंतःकरणें । वाहिजे वायां ॥ ५९ ॥ देखें रथीं आरूढिजे । मग जरी निश्चळ बैसिजे । तरी चळ होऊनि हिंडिजे । परतंत्रा ॥ ६० ॥ कां उचलिलें वायुवेशें । चळे शुष्क पत्र जैसें । निश्चेष्ट आकाशें । परिभ्रमे ॥ ६१ ॥ तैसें प्रकृतिआधारें । कर्मेंद्रियविकारें । निष्कर्मही व्यापारे । निरंतर ॥ ६२ ॥ ह्मणऊनि संग जंव प्रकृतीचा । तंव त्याग न घडे कर्माचा । ऐसियाहि करूं ह्मणती तयांचा । आग्रहचि उरे ॥ ६३ ॥

**कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥**

जे उचित कर्म सांडिती । मग नैष्कर्म्य हों पाहती । परी कर्मेंद्रियप्रवृत्ती । निरोधुनी ॥ ६४ ॥ तयां कर्मत्याग न घडे । जें कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती तें फुडें । दरिद्र जाण ॥ ६५ ॥ ऐसे ते पार्था । विषयासक्त सर्वथा । वोळखावे तत्त्वतां । भ्रांति नाहीं ॥ ६६ ॥ आतां देईं अवधान । प्रसंगें तुज सांगेन । या नैराश्याचें चिन्ह । धनुर्धरा ॥ ६७ ॥

**यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥**

जो अंतरीं दृढ । परात्मरूपीं गूढ । बाह्य तरी रूढ । लौकिकीं जैसा ॥ ६८ ॥ तो इंद्रियां

---

१ शास्त्रोक्त. २ जितकें. ३ टाकिलें. ४ विषय ग्रहण करण्याचें सामर्थ्य. ५ नाहींसे झालें. ६ बंद झालें. ७ नाकाचें भोंक. ८ सुगंध. ९ श्वासोच्छ्वास चालणें. १० कल्पनारहित. ११ मन. १२ इच्छा. १३ निजणें व जागणें. १४ चुकले. १५ न राहे. १६ देहाभिमान्यांला. १७ देहाच्या आधारेंकरून. १८ समजणें व्यर्थ. १९ चढून. २० गति. २१ वाऱ्यानें. २२ वाळलेलें पान. २३ चेतनारहित. २४ निष्काम. २५ करितो. २६ इतक्यावर. २७ हट्ट. २८ कर्मविमुक्त होऊं. २९ हस्तपादादि अवयवांची कर्में करण्याची गति. ३० आवरून. ३१ करण्याची इच्छा. ३२ शोभवितात. ३३ स्पष्ट. ३४ व्यर्थ. ३५ विषयभोगाची इच्छा करणारे. ३६ लक्ष. ३७ निरिच्छाचें. ३८ गढलेला. ३९ बाह्यात्कारी. ४० आचरणारा. ४१ लोकाचार.

आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी । प्राप्त कर्म नोव्हेरी[1] । उचित जें जें ॥ ६९ ॥ तो कर्मेद्रियें कर्मीं । राहटतां[2] तरी न नियमी[3] । परी तेथिचेनि ऊर्मी[4] । झांकोळेना[5] ॥ ७० ॥ तो कामनामात्रें[6] न घेपे[7] । मोहमळें न लिंपे । जैसें जळीं जळें न शिंपे[8] । पद्मपत्र[9] ॥ ७१ ॥ तैसा संसर्गामाजि[10] असे । सकळां सारिखा दिसे । जैसें तोयसंगें[11] आभासे[12] । भानुबिंब[13] ॥ ७२ ॥ तैसें सामान्यत्वें[14] पाहिजे । तरी साधारणचि[15] देखिजे । येरवीं निर्धारितां[16] नेणिजे । सोयं[17] जयाची ॥ ७३ ॥ ऐशा चिन्हीं चिन्हित । देखसी तोचि मुक्त । आशापाशरहित । वोळख पां ॥ ७४ ॥ अर्जुना तोचि योगी । विशेषीजे[18] जो जगीं । म्हणोनि ऐसा होय यालागीं । म्हणिपे[19] तूतें ॥ ७५ ॥ तूं मानसा[20] नियम[21] करीं । निश्चळ होयें अंतरीं । मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्ततु सुखें ॥ ७६ ॥

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**
**शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥**

म्हणोनि नैष्कर्म्य होआवें[23] । तरी एथ तें नें संभवे[24] । आणि निषिद्ध[25] केवि राहाटावें[26] । विचारीं पां ॥ ७७ ॥ म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि[27] प्राप्त । तें कर्म हेतुरहित[28] । आचरें तूं ॥ ७८ ॥ पार्था आणिकही एक । नेणसी तूं हें कवतिक[29] । जें ऐसें कर्म मोचक । आपैसें[30] असे ॥ ७९ ॥ देखें अनुक्रमाधारें[31] । स्वधर्म जो आचरे । तो मोक्ष तेणें व्यापारें[32] । निश्चित पावे ॥ ८० ॥

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।**
**तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर ॥ ९ ॥**

स्वधर्म जो बापा । तोचि नित्य यज्ञ जाण पां । म्हणोनि वर्ततां तेथ पापा । संचार नाहीं ॥ ८१ ॥ हा निजधर्म जैं सांडे । आणि कुकर्मीं रति[34] घडे । तैंचि बंध पडे । सांसारिक ॥ ८२ ॥ म्हणोनि स्वधर्मानुष्ठान[35] । तें अखंड यज्ञ याजन । जो करी तया बंधन ।

---

१ न टाकी. २ वागत असतां. ३ आवरीत नाहीं. ४ वेगानें. ५ विकार पावत नाहीं. ६ वासनेनें. ७ आकळला जात नाहीं. ८ भिजत नाहीं. ९ कमळाचें पान. १० संसारांत. ११ पाण्यासंगें. १२ दिसे. १३ सूर्यबिंब. १४ साधारणपणें. १५ सामान्य. १६ ठरवितां, निर्धार करितां. १७ मार्ग, -स्थिति. १८ खुणेनें. १९ आगळा आहे. २० म्हणतों. २१ मनाचा. २२ आकलन, दमन. २३ कर्मरहित व्हावें. २४ शक्य नाहीं. २५ शास्त्रविरुद्ध. २६ आचरावें. २७ समयानुसार. २८ कामना सोडून, निष्काम. २९ कौतुक. ३० आपोआप कर्मबंधाचा नाश करणारें. ३१ वर्णाश्रमानुरूप अधिकाराप्रमाणें. ३२ तेणेंकरून. ३३ शिरकाव, रीघ. ३४ आवड. ३५ स्वधर्माचरण.

[1]कहींच न घडे ॥ ८३ ॥ हा लोक कर्मे बांधिला । जो [2]परतंत्रा भूलला । तो नित्य यज्ञातें चुकला । म्हणोनियां ॥ ८४ ॥ आतां येचि विषयीं पार्था । तुज सांगेन एक मी कथा । जैं [3]सृष्ट्यादिसंस्था । [4]ब्रह्मेनें केली ॥ ८५ ॥

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥**

तैं नित्य यागसहितें । [5]सृजिलीं भूतें समस्तें । परी नेणतीचि [6]तियें यज्ञातें । सूक्ष्म म्हणउनी ॥ ८६ ॥ ते वेळीं प्रजीं [7]विनविला [8]ब्रह्मा । देवा काय आश्रयो एथ आम्हां । तंव म्हणे तो कमळजन्मा । भूतांप्रति ॥ ८७ ॥ तुम्हा [9]वर्णविशेषवशें । आम्ही हा स्वधर्म [10]विहिलां असे । यातें [11]उपासा मग [12]आपैसे । पुरती काम ॥ ८८ ॥ तुम्ही व्रत नियम न करावे । शरीरातें न पीडावें । दूरि [13]कहीं न [14]वेंचावें । तीर्थांसि गा ॥ ८९ ॥ योगादिकें साधनें । [15]साकांक्ष आराधनें । [16]मंत्रयंत्रविधानें । [17]झणीं करा ॥ ९० ॥ [18]देवतांतरा न भजावें । हें सर्वथा कांहीं न करावें । तुम्हीं [19]स्वधर्मयज्ञीं [20]यजावें । अनायासें ॥ ९१ ॥ [21]अहेतुकें चित्तें । [22]अनुष्ठा पां यातें । पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ ९२ ॥ तैसा स्वधर्मरूप [23]मख । हाचि [24]सेव्य तुम्हां एक । ऐसें सत्यलोकनायक । बोलता जाहला ॥ ९३ ॥ देखा स्वधर्मातें भजाल । तरी [25]कामधेनु हा होईल । मग प्रजा हो न संडिल । [26]तुमतें कदा ॥ ९४ ॥

**देवान्भावयतानेन ते देवा भावयंतु वः ।**
**परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

जैं येणेंकरूनि समस्तां । [27]परितोष होईल देवतां । मग ते तुम्हा [28]ईप्सितां । [29]अर्थातें देती ॥ ९५ ॥ या स्वधर्मपूजा पूजितां । [30]देवतागणां समस्तां । [31]योग[32]क्षेम निश्चिता । करिती तुमचा ॥ ९६ ॥ तुम्ही देवांतें भजाल । देव तुम्हां [33]तुष्टतील । ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ ॥ ९७ ॥ तेथ तुम्ही जें करूं म्हणाल । तें [12]आपैसें सिद्धी जाईल । वांछितही [34]पुरेल । मानसींचें ॥ ९८ ॥ [35]वाचासिद्धी पावाल । [36]आज्ञापक होआल । [37]म्हणियें तुमतें मागतील ।

---

१ कधींही. २ प्रकृतीनें, मायेनें. ३ जग (सृष्टि) इत्यादिकांची व्यवस्था. ४ ब्रह्मदेवानें. ५ उत्पन्न केलीं. ६ तीं. ७ प्रार्थिला. ८ ब्रह्मा. ९ ब्राह्मणादि वर्णपरत्वें. १० नियमित केला. ११ आचरा. १२ आपोआप. १३ कोठेंही. १४ जावें. १५ सकाम, कामनिक. १६ तांत्रिक अनुष्ठानें. १७ करूं नका. १८ इतर देवतांस. १९ स्वधर्म व वर्णधर्म हाच यज्ञ. २० वागावें. २१ निष्काम. २२ भजा. २३ यज्ञ. २४ आचरण्यास योग्य. २५ इच्छिलेलें देणाऱ्या कामधेनूसारखा हेतु पुरविणारा. २६ तुम्हाला. २७ संतोष. २८ इच्छिलेल्या. २९ वस्तूस. ३० देवांचा समुदाय. ३१ अप्राप्त वस्तूची प्राप्ति. ३२ प्राप्त वस्तूचें पालन. ३३ तृप्त करतील. ३४ पूर्ण होईल. ३५ वाचेनें बोलाल तें होईल. ३६ आज्ञाकर्ते. ३७ चाकर, आज्ञा.

[1]महाऋद्धि ॥ ९९ ॥ जैसें [2]ऋतुपतीचें द्वार । [3]वनश्री निरंतर । [4]वोळगे फळभार । लावण्येंसीं ॥ १०० ॥

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥

तैसें सर्व सुखेंसहित । दैवचि मूर्तिमंत । येईल देखा [5]काढत । तुम्हांपाठीं ॥ १ ॥ ऐसे समस्त [7]भोगैंभरित । होआल तुम्ही [8]अनार्त । जरी [9]स्वधर्मैकनिरत । वर्ताल बापा ॥ २ ॥ कीं जालिया सकळ संपदा । जो अनुसरेल [10]इंद्रियमदा । [11]लुब्ध होऊनियां [12]स्वैरा । विषयांचिया ॥ ३ ॥ तिहीं [13]यज्ञभावितीं सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी । तयां स्वधर्मी [14]सर्वेश्वरीं । न भजेल जो ॥ ४ ॥ अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन । [15]प्राप्तवेळ भजन । ब्राह्मणाचें ॥ ५ ॥ [16]विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील [17]अतिथी । संतोष [18]नेदील ज्ञाती । आपुलिये ॥ ६ ॥ ऐसा स्वधर्मक्रियारहित । [19]आथिलपणें गर्वित । केवळ भोगासक्त । होईल जो ॥ ७ ॥ तया मग [20]अपावो थोर आहे । जेणें तें हातिंचें सकळ जाये । देखा प्राप्तही न [21]लाहे । भोग भोगूं ॥ ८ ॥ जैसें [22]गतायु शरीरीं । [23]चैतन्य वास न करी । कां निर्दैवाच्या घरीं । न राहे लक्ष्मी ॥ ९ ॥ तैसा स्वधर्म जरी लोपला । तरी सर्व सुखाचा [24]थारा मोडला । जैसा दीपासवें हरपला । प्रकाश जाय ॥ ११० ॥ तैसी [25]निजवृत्ति जेथ सांडे । तेथ [26]स्वतंत्रते वस्ती न घडे । आइका प्रजाहो पुढें । [27]विरिंचि म्हणे ॥ ११ ॥ म्हणऊनि स्वधर्म जो [28]सांडील । तयातें काळ दंडील । चोर म्हणूनि हरील । सर्वस्व तयाचें ॥ १२ ॥ मग सकळ दोष [29]भंवते । [30]गिंवसोनि घेती तयातें । रात्रिसमयीं श्मशानातें । भूतें जैसीं ॥ १३ ॥ तैसीं त्रिभुवनींचीं दुःखें । आणि नानाविधें पातकें । [31]दैन्यजात तितुकें । तेथेंचि वसे ॥ १४ ॥ ऐसें होय तया उन्मत्ता । मग न सुटे बापा [32]रुदतां । कल्पांतींही सर्वथा । प्राणिगण हो ॥ १५ ॥ म्हणऊनि [33]निजवृत्ति हे न सांडावी । इंद्रियें [34]वेरखीं नेदावीं । ऐसें प्रजांतें सिकवी । [27]चतुरानन ॥ १६ ॥ जैसें जळचरां जळ सांडे । मग तत्क्षणीं मरण

---

१ अद्भुत शक्ति. २ वसंतसमयीं. ३ अरण्यशोभा. ४ आश्रय करी. ५ मार्ग शोधित. ६ पाठलाग करीत. ७ भोगसाधनेंकरून. ८ सुखी, पूर्णकाम. ९ स्वधर्मैकरून. १० इंद्रियांच्या उन्मत्तपणास. ११ भुलून. १२ गोडी. १३ यज्ञानें संतुष्ट झालेल्या देवांनीं. १४ सर्व पालक, परमात्मा. १५ आले वेळीं, यथाकाळीं. १६ पाठमोरा. १७ प्रवासी. १८ न देईल. १९ संपन्नपणें. २० दुःख. २१ लाभत नाहीं. २२ आयुष्य सरलेल्या. २३ जीवात्मा. २४ आश्रय, स्थान. २५ आपआपला वर्णाश्रम धर्म. २६ सुख. २७ ब्रह्मा. २८ सोडील. २९ आसपास. ३० वेढून. ३१ सर्व दुःखें. ३२ रडतां. ३३ स्वधर्म. ३४ पाहिजे तसें वागूं देऊं नये.

मांडे । हा स्वधर्म तेणें पोडें । विसंबों नये ॥ १७ ॥ म्हणोनि तुह्मी समस्तीं । आपुला- लिया कर्मीं उचितीं । निरंत व्हावें पुढतपुढती । म्हणिपत असे ॥ १८ ॥

**यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ॥**

**भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥ १३ ॥**

देखा विहितें क्रियाविधि । निर्हेतुका बुद्धि । जो असतिये संपत्ति । विनियोगें करी ॥ १९ ॥ गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं । निमित्तादिकीं यजी । पितरोद्देशें ॥ १२० ॥ या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करितां । हुतशेष स्वभावता । उरे जें जें ॥ २१ ॥ तें सुखें आपुले घरीं । कुटुंबेसीं भोजन करी । कीं भोग्यचि तें निवारी । कल्मषातें ॥ २२ ॥ तें यज्ञावशिष्ट भोगी । म्हणोनि सांडिजे तो अघीं । जयापरी महारोगी । अमृतसिद्धी ॥ २३ ॥ कीं तत्त्वनिष्ठ जैसा । नागवे भ्रांतिलेशा । तो शेषभोगी तैसा । नाकळे दोषा ॥ २४ ॥ म्हणोनि स्वधर्मे जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे । मग उरे तें भोगिजे । संतोषेसीं ॥ २५ ॥ हें वांचूनि पार्था । राहाटों नये अन्यथा । ऐसी आद्य हे कथा । श्रीमुरारि सांगे ॥ २६ ॥ जे देहचि आपणपें मानिती । आणि विषयांतें भोग्य म्हणती । यापरतें न स्मरती । आणिक कांहीं ॥ २७ ॥ हें यज्ञोपकरण सकळ । नेणत- साते बरळ । अहंबुद्धि केवळ । भोगूं पाहती ॥ २८ ॥ इंद्रियरुचीसारिखें । करविती पाक निकें । ते पाविये पातकें । सेविती जाण ॥ २९ ॥ हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें । मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ १३० ॥ हें नेणोनियां मूर्ख । आपण- पेयालागीं देख । निपजविती पाक । नानाविध ॥ ३१ ॥ जिहीं यज्ञ सिद्धी जाये । परेशीं तोषु होये । तें हें सामान्य अन्न न होये । म्हणोनियां ॥ ३२ ॥ हें न म्हणावें साधारण । अन्न ब्रह्मरूप जाण । हें जीवनहेतु कारण । विश्वा यया ॥ ३३ ॥

**अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।**

**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**

---

१ त्याप्रमाणें. २ विसरूं नये. ३ तत्पर. ४ वारंवार. ५ सांगत. ६ आचरण्यास योग्य. ७ कर्मानुष्ठान. ८ निरिच्छ. ९ यथाशक्ति. १० संपत्ति. ११ खर्च, उपयोग. १२ समयोचित. १३ पर्वकाळीं. १४ पितरांच्या हेतूनें. १५ होम करून उरलेले पदार्थ. १६ भक्षिण्यास योग्य. १७ पापातें. १८ यज्ञ करून उरलेलें अन्न. १९ सेवन करी, खाई. २० पातक. २१ महाविष. २२ न सांपडे. २३ भ्रांतिचा स्पर्श. २४ यज्ञावशिष्ट. २५ दोष लागत नाहीं. २६ संपादावें. २७ खर्चावें. २८ वागूं. २९ पुरातन. ३० धर्म. ३१ मी देह या अहंकारानें. ३२ भोगण्यास योग्य. ३३ या पलीकडे. ३४ यज्ञसंबंधी. ३५ न जाणून. ३६ भ्रांत. ३७ अहंकारानें. ३८ उत्तम पक्वान्नें. ३९ सर्व संपत्ति. ४० यज्ञाचे पदार्थ. ४१ परमेश्वरीं. ४२ त्यजून. ४३ आपल्याकारितां. ४४ तयार करितात. ४५ परमेश्वराला. ४६ संतोष. ४७ जगण्याचें साधन. ४८ जगताला.

अन्नास्तव भूतें । प्ररोह पावती समस्तें । मग पर्जन्य या अन्नातें । सर्वत्र प्रसवे ॥ ३४ ॥ तया पर्जन्या यज्ञीं जन्म । यज्ञातें प्रगटी कर्म ।

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

कर्मासि आदि ब्रह्म । वेदरूप ॥ ३५ ॥ मग वेदांतें परात्पर । प्रसवतसे अक्षर । ह्मणकानि हें चराचर । ब्रह्मबद्ध ॥ ३६ ॥ परी कर्मांचिये मूर्ति । यज्ञीं अधिवास श्रुति । ऐकें सुभद्रापति । अखंड गा ॥ ३७ ॥

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।**
**अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥**

ऐसी हे आदि परंपरा । [11]संक्षेपें तुज धनुर्धरा । सांगीतली या अध्वरा । लागूनियां ॥ ३८ ॥ ह्मणूनि समूळ हा उचितु । स्वधर्मरूप क्रतु । नानुष्ठी जो मत्तु । लोकीं इये ॥ ३९ ॥ तो पातकांची राशी । जाण भार भूमीसी । जो कुकर्मे इंद्रियांसी । उपेगा गेला ॥ १४० ॥ तें जन्मकर्म सकळ । अर्जुना अति निष्फळ । जैसें कीं अभ्रपटळ । अकाळींचें ॥ ४१ ॥ कां गळां स्तन अजेचे । तैसें जियालें देखें तयाचें । जया अनुष्ठान स्वधर्माचें । घडेचिना ॥ ४२ ॥ ह्मणोनि ऐकें पांडवा । हा स्वधर्म कवणें न संडावा । सर्वभावें भजावा । हाचि एक ॥ ४३ ॥ हां गा शरीर जरी जाहलें । तरी कर्तव्य वोझें[22] आलें । मग उचित कां आपलें । [23]वोसंडावें ॥ ४४ ॥ परिस पां [24]सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची । खंती करिती कर्माची । ते [26]गांवढे गा ॥ ४५ ॥

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥**

देखें [27]असतेनि देहधर्में । एथ तोचि एक न लिंपे[28] कर्में । जो अखंडित रमे । [29]आपणपें ॥ ४६ ॥ जे तो आत्मबोधें तोषला । तरी [30]कृतकार्य देख जाहला । ह्मणोनि सहजें [31]सांडवला । [32]कर्मसंगा ॥ ४७ ॥

---

१ अन्नापासून. २ वाढ, वृद्धि. ३ निपजवितो. ४ यज्ञापासून ५ उत्पन्न करतो. ६ अविनाशी ब्रह्म. ७ ब्रह्माधीन. ८ कर्मांच्या. ९ राहणें. १० मालिका. ११ थोडक्यांत. १२ हा युद्धरूप यज्ञ. १३ यज्ञ. १४ आचरीत किंवा पूजीत नाहीं. १५ उन्मत्त. १६ वाईट कर्मानें. १७ उपयोगी झाला. १८ व्यर्थ. १९ शेळीचे. २० जीवित. २१ सांडावा. २२ स्वभावें, प्रवाहानें. २३ टाकावें. २४ दोनीं हातांनीं बाण सोडणाऱ्या अर्जुना. २५ प्राप्त होऊन. २६ अडाणी. २७ देहव्यापार चालत असतां. २८ बद्ध होत नाहीं. २९ आपणाशीं. ३० सफल. ३१ सुटला. ३२ कर्तव्यकर्मांपासून.

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।
न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

तृप्ति जालिया जैसीं । साधनें सरतीं अपैसीं । देखें आत्मतुष्टी तैसी । कर्मे नाहीं ॥ ४८ ॥ जंववरी अर्जुना । तो बोध भेटेना मना । तंवचि या साधना । भजावें लागे ॥ ४९ ॥

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥

म्हणऊनि तूं नियत । सकळ कामनारहित । होऊनियां उचित । स्वधर्मे रहाटें ॥ १५० ॥ जे स्वधर्में निष्कामता । अनुसरले पार्था । ते कैवल्यपद तत्वतां । पावले जगीं ॥ ५१ ॥

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

देख पां जनकादिक । कर्मजात अशेख । न सांडितां मोक्षसुख । पावले आहाले ॥ ५२ ॥ याकारणें पार्था । होआवी कर्मी आस्था । हे आणिकाही एका अर्था । उपकारेल ॥ ५३ ॥ जे आचरतां आपणपयां । देखी[15] लागेल लोका यया । तरी चुकेल हा अपाया । प्रसंगेंचि ॥ ५४ ॥ देखें प्राप्तार्थ जाहाले । जे निष्कामता पावले । तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥ ५५ ॥ मार्गी अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा । अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥ ५६ ॥ हां गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे । तिहीं कवणेंपरी जाणिजे । मार्गातें या ॥ ५७ ॥

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

एथ वडील जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती । तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ ५८ ॥ हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें । विशेषें आचरावें । लागे संतीं ॥ ५९ ॥

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥

---

१ आपोआप. २ स्वरूपानंदांत. ३ आचरावें. ४ सदोदित. ५ वाग. ६ विरक्तपणें. ७ तृप्त झाले. ८ स्वरूपस्थिति. ९ वास्तविक. १० सर्व कर्मे. ११ संपूर्ण. १२ असावी. १३ उपयोगी पडेल. १४ स्वतः. १५ मार्ग, दीक्षा. १६ दुःखाला. १७ पूर्ण मनोरथ. १८ डोळस. १९ समजेल. २० श्रेष्ठ, वृद्ध, आप्त. २१ टाकावें.

आतां आणिकाचिया गोठी । कायशा सांगों किरीटी । देखें मीच्चि इये रहाटी । आचरें मी वर्तत असें ॥ १६० ॥ काय सांकडें कांहीं मातें । कीं कवणें एकें आर्तें । आचरें मी धर्मातें । म्हणसी जरी ॥ ६१ ॥ तरी पुरतेपणालागीं । आणिक दुसरा नाहीं जगीं । ऐसी सामग्री माझ्या आंगीं । जाणसी तूं ॥ ६२ ॥ मृत गुरुपुत्र आणिला । तो तुवां पवाडा देखिला । तोही मी उगेला । कर्मी वर्ते ॥ ६३ ॥

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।**
**मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥**

परी स्वधर्मी वर्ते कैसा । सांकांक्ष कां होय जैसा । तयाच्चि एका उद्देशें । लागोनियां ॥ ६४ ॥ जें भूतजात सकळ । असे आम्हां आधीनाचि केवळ । तरी न व्हावें बैरळ । म्हणोनियां ॥ ६५ ॥

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।**
**संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥**

आम्ही पूर्णकाम होउनी । जरी आत्मस्थिती राहुनी । तरी प्रजा हे कैसेनी । निस्तरेल ॥ ६६ ॥ इहीं आमुची वाट पाहावी । मग वर्ततीपरी जाणावी । ते लोकस्थिति आघवी । नासिली होईल ॥ ६७ ॥ म्हणोनि समर्थ जो एथें । आथिला सर्वज्ञते[२५] । तेणें विशेषें कर्मातें । त्यजावें ना ॥ ६८ ॥

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत ।**
**कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥**

देखें फळाचिया आशा । आचरे कामुक जैसा । कर्मी भरें होआवा तैसा । निरीशाही ॥ ६९ ॥ जे पुढतपुढती पार्था । हे सकळ लोकसंस्था । रक्षणीय सर्वथा । म्हणऊनियां ॥ १७० ॥ मार्गाधारें वर्तावें । विश्व हें[३३] मोहरें लावावें । अलौकिक[३५] नोहावें । लोकांप्रति ॥ ७१ ॥

---

१ दुसऱ्याच्या. २ गोष्टी. ३ मार्गी, प्रकारें. ४ संकट. ५ इच्छेनें. ६ पूर्णपणानें. ७ शक्ति. ८ मेलेला. ९ सांदीपनीचा पुत्र. १० मोठेपणा, कीर्ति. ११ उगाच. १२ आशावंत. १३ हेतु-करितां. १४ सृष्टी. १५ स्वाधिन. १६ भ्रष्ट. १७ तृप्त, समाधानयुक्त. १८ चिदात्मस्थितींत. १९ वर्तेल, पार पडेल. २० वर्तन, वाट. २१ वर्तनक्रम. २२ वर्णाश्रमधर्मव्यवस्था. २३ श्रेष्ठ. २४ संपन्न. २५ सर्व जाणते. २६ फलेच्छु. २७ आवड. २८ निरिच्छास देखील. २९ वारंवार. ३० लोकाचार. ३१ पाळली पाहिजे. ३२ रस्त्यानें. ३३ मार्गास. ३४ वाईट. ३५ न व्हावें.

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

जें सायासें स्तन सेवी । तें पक्वान्नें केंवि जेवी । म्हणोनि बाळका जैसीं नेदावीं । धनुर्धरा ॥ ७२ ॥ तैसी कर्मी जयां अयोग्यता । तयांप्रति नैष्कर्म्यता । न प्रगटावी खेळतां । आदिकरुनी ॥ ७३ ॥ तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी । निष्कर्मींही दावावी । आचरोनी ॥ ७४ ॥ तया लोकसंग्रहालागीं । वर्ततां कर्मसंगीं । तो कर्मबंध आंगीं । वाजेलना ॥ ७५ ॥ जैसी बहुरूपियांचीं रावो राणी । स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं । परी लोकसंपादणी । तैसीच करिती ॥ ७६ ॥

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ २७ ॥

देखें पुढिलाचें वोझें । जरी आपुला माथां घेइजे । तरी सांगें कां न दाटिजे । धनुर्धरा ॥ ७७ ॥ तैसीं शुभाशुभें कर्में । जियें निपजती प्रकृतिधर्में । तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ॥ ७८ ॥ ऐसा अहंकारारूढ । एकदेशी मूढ । तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ॥ ७९ ॥ हें असो प्रस्तुत । सांगिजेल तुज हित । तें अर्जुना देऊनि चित्त । अवधारीं पां ॥ १८० ॥

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।
गुणा गुणेषु वर्तंत इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

जे[३२] तत्त्वज्ञानियांच्या ठायीं । तो प्रकृतिभाव नाहीं । जेथ कर्मजात पाहीं । निपजत असे ॥ ८१ ॥ ते देहाभिमान सांडुनी । गुणकर्में वोलांडुनी । साक्षिभूत होउनी । वर्तती देहीं ॥ ८२ ॥ म्हणोनि शरीरी जरी होती । तरी कर्मबंधा नाकळती । जैसा कां भूतचेष्टा गभस्ती । घेपवेना ॥ ८३ ॥

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥

---

१ कष्टानें. २ देऊं नयेत. ३ अनधिकार. ४ कर्म न करणें, कर्मांविषयीं उदासीनपणा. ५ दाखवावी. ६ उगाच. ७ मुख्यत्वेंकरून. ८ स्तवावी. ९ निष्काम जनांमीं. १० वर्णाश्रमधर्मसंरक्षणासाठीं. ११ लागणार नाहीं. १२ राजा. १३ लोकांची समजूत. १४ दुसऱ्याचें. १५ दबावें. १६ बरीवाईट. १७ प्रकृतीच्या गुणांच्या योगानें. १८ मनाच्या भ्रमानें. १९ अहंकारी. २० विपरीत बुद्धि. २१ गहन, समजण्यास व आचरण्यास कठीण. २२ भासित करूं नये. २३ सांप्रत. २४ कारण. २५ अज्ञान. २६ कर्मसमूह. २७ सर्वसाक्षी. २८ बद्ध होत नाहींत. २९ सृष्टीच्या व्यापारांत. ३० सूर्य. ३१ सांपडत नाहीं.

एथ कर्मीं तोचि लिंपे । जो गुणसंभ्रमें घेपे[2] । प्रकृतीचेनि आटोपें । वर्तत असे ॥ ८४ ॥ इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें । तें परकर्म बलात्कारें । आपादी जो ॥ ८५ ॥

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥**

तरी उचित कर्में आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति विन्यसावी । आत्मरूपीं ॥ ८६ ॥ हें कर्म मी कर्ता । कां आचरेन येणें अर्था । ऐसा अभिमान झणें चित्ता । रिघों देसी ॥ ८७ ॥ तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें । मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ॥ ८८ ॥ आतां कोदंड घेऊनि हातीं । आरूढ पां इये रथीं । देई आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ ८९ ॥ जगीं कीर्ति रूढवीं । स्वधर्माचा मान वाढवीं । इया भारापासोनि सोडवीं । मेदिनी[20] हे ॥ १९० ॥ आतां पार्था निःशंक होईं । या संग्रामा चित्त देईं । एथ हेंवांचूनि कांहीं । बोलों नये ॥ ९१ ॥

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः ।**
**श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**

हें अनुपरोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजे । श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे । धनुर्धरा ॥ ९२ ॥ तेही सकळ कर्मीं वर्तत । जाण पां कर्मरहित । म्हणोनि हें निश्चित । करणीय गा ॥ ९३ ॥

**ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥**

ना तरी प्रकृतिमंत होउनी । इंद्रियां लाड देउनी । जे हें माझें मत अव्हेरूनी । वोसंडिती[28] ॥ ९४ ॥ जे सामान्यत्वें लेखिती[30] । अवज्ञा करूनि देखिती । कां हे अर्थवाद म्हणती । वाचाळपणें ॥ ९५ ॥ ते मोहमदिरा भुलले । विषयविखें धारले । अज्ञानपंकीं

---

१ त्रिगुणें करून भ्रमाच्या योगें. २ पावतो. ३ स्वाधीन होऊन. ४ वागतात. ५ आपआपल्या कर्माच्या ठायीं. ६ दुसऱ्याचें कर्म. ७ जबरदस्तीनें. ८ स्वीकारी, घेतो. ९ विहित, योग्य. १० ठेवावी, योजावी. ११ या फलासाठीं. १२ कदाचित्. १३ देहाधीन. १४ सर्व हेतु. १५ समयोचित. १६ धनुष्य. १७ चढ. १८ शौर्याला. १९ वाढीव. २० पृथ्वी. २१ अबाध. २२ मोठ्या पूज्य बुद्धीनें. २३ आचरावें. २४ करण्यास योग्य. २५ देहाभिमानी होऊन. २६ लाड. २७ तिरस्कारून. २८ टाकून देतात. २९ क्षुल्लकपणेंकरून. ३० गणतात. ३१ अपमान. ३२ बडबड. ३३ मोह हीच कोणीएक दारू त्यानें. ३४ माजले. ३५ अज्ञान चिखलांत.

बुडाले । निर्भ्रांत[1] मानीं ॥ ९६ ॥ देखें शेंवाच्या[2] हातीं दिधलें । जैसें कां रत्न वायां गेलें । ना तरी जात्यंधा[3] पाहलें । प्रमाण[4] नोहे ॥ ९७ ॥ कां चंद्राचा उदय जैसा । उपयोगा नवेचे[5] वांयसा[6] । मूर्खा विवेक हा तैसा । रुचेल ना ॥ ९८ ॥ तैसे जे पार्था । विमुख या परमार्था । तयांसीं भाषण सर्वथा । करावेंना ॥ ९९ ॥ ह्मणोनि ते न मानिती । आणि निंदाही करूं लागती । सांगें पतंग काय साहाती[7] । प्रकाशातें ॥ २०० ॥ पतंगा दीपीं आलिंगन । तेथ त्यासि अचुक मरण । तेंवि विषयाचरण[8] । आत्मघाता[9] ॥ १ ॥

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥**

ह्मणोनि इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें[10] । लाळावीं[11] ना कौतुकें । आदिकरुनी[12] ॥ २ ॥ हां गा सर्पेसीं खेळों येईल । कीं व्याघ्रसंसर्ग[13] सिद्धी जाईल । सांगें हालाहल[14] जिरेल । सेविलेंया काई ॥ ३ ॥ देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उंधवला[15] । तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ॥ ४ ॥ येरवीं तरी अर्जुना । या शरीरा पराधीना । कां नानाभोगरचना[16] । मेळवावी ॥ ५ ॥ आपण सायासेंकरूनि बहुतें । सकळाही समृद्धिजातें[17] । उदोअस्त[18] या देहातें । प्रतिपाळावें कां ॥ ६ ॥ सर्वस्वें अशोनि[19] एथें । आंर्जवावी[20] संपत्तिजातें[21] । तेणें स्वधर्म सांडुनि देहातें । पोखावें[22] काई ॥ ७ ॥ मग हें तंव पांचें[23] मेळावा[24] । शेखीं[25] अनुसरेल[26] पंचत्वा[27] । ते वेळीं केला कें गिवसावा[28] । शीण आपुला ॥ ८ ॥ ह्मणूनि केवळ देहभरण[29] । तें जाणें उघडी नागवण[30] । यालागीं एथ अंतःकरण[31] । देयावेंना[32] ॥ ९ ॥

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥**

येऱ्हवीं इंद्रियांचियाअर्था[33] । सारिखा विषय पोषितां[34] । संतोष कीरं[35] चित्ता । उपजेल[36] ॥ २१० ॥ परी तो संवचोराचा[37] सांगात । जैसा नावेक[38] स्वस्थ । जंव नगराचांप्रांत[39] । सांडिजेना ॥ ११ ॥ बापा विषयाची मधुरता । झणें[40] आवडी उपजे चित्ता । तो परिणाम

१ निश्चयेंकरून. २ मठ्ठाच्या. ३ जन्मतः आंधळा. ४ खरें. ५ न पडे. ६ कावळ्याला. ७ सहन होईल. ८ विषयभोग. ९ आत्मज्ञानास पतनास. १० पुरुषानें. ११ लाड करूं नयेत. १२ मूळपासून. १३ वाघाचा सहवास. १४ कालकूट विष. १५ भडकला. १६ विषयभोग. १७ सर्व सामुग्रि करून. १८ अहोरात्र. १९ असून. २० मिळवावी. २१ सर्व प्रकारची संपत्ती. २२ पोसावें. २३ पांच तत्वांचा. २४ जमाव, समूह. २५ शेवटीं. २६ जाऊन मिळणें. २७ पांच ठिकाणीं पांच तत्त्वांस. २८ कोठें शोधावा. २९ शरीरपोषण. ३० हानि, बुडवणूक. ३१ मन. ३२ देवूं नये. ३२ इंद्रियांस योग्य, आवडता. ३४ सेवितां. ३५ निश्चयें. ३६ उपजेल. ३७ सावासारख्या चोराची सोबत. ३८ क्षणभर. ३९ गांवाची सिमा. ४० जर.

विचारितां । प्राण हरी ॥ १२ ॥ देखें इंद्रियीं काम असे । तो लावी सुखदुराशे[1] । जैसा गळीं मीनें[2] आमिषें[3] । भुलविजे गा ॥ १३ ॥ परी तयामाजि गळु[4] आहे । जो प्राणातें घेऊनि जाये । तो जैसा टांउवा[5] नोहे । झांकलेपणें ॥ १४ ॥ तैसें अभिलाषें येणें कीजेल[6] । विषयांची आशा धरिजेल । तरी वरपडा[7] होइजेल । क्रोधानळा ॥ १५ ॥ जैसा कवळोनियां[8] पारधी । घातेचिये संधी[9] । आणी मृगातें बुद्धी । सींधावया[10] ॥ १६ ॥ एथ तैसीचि परी आहे । म्हणूनि संग हा तुज नोहे । पार्था दोन्ही काम क्रोध हे । घातक जाणें ॥ १७ ॥ म्हणऊनि हा आश्रयोचि न करावा । मनेंही आठवो न धरावा । एक निजवृत्तीचा[11] वोलावा[12] । नासों नेदीं[13] ॥ १८ ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

अगा स्वधर्म हा आपुला । जरी कां कठिण जाहाला । तरी हाचि अनुष्ठिला[14] । भला देखें ॥ १९ ॥ येर[15] आचार जो परावा[16] । तो देखतां कीर[17] बरवा । परी आचरतेनि[18] आचरावा । आपुलाचि ॥ २२० ॥ सांगें शूद्रघरीं आघवीं[19] । पक्वान्नें आहाति बरवीं । तीं द्विजें[20] कांवि सेवावीं । दुर्बळ[21] जरी जाहाला ॥ २१ ॥ हें अनुचित[22] कैसेनि कीजे । अग्राह्य कैंवि इच्छिजे । अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥ २२ ॥ तरी लोकांचीं धवळारें[23] । देखोनियां मनोहरें[24] । असतीं आपुलीं तृणारें[25] । मोडावीं केवीं ॥ २३ ॥ हें असो वनिता[26] आपुली । कुरूप जरी जाहाली । तऱ्ही भोगितां तेचि भली । जियापरी ॥ २४ ॥ तेवि आवडे तैसा सांकड[27] । आचरतां जऱ्ही दुवाड । तऱ्ही स्वधर्मचि सुरवाड[28] । परत्रींचा[29] ॥ २५ ॥ हां गा साकर आणि दूध । हें गौल्यें[30] कीर प्रसिद्ध । परी कृमिदोषीं[31] विरुद्ध । घेपे[32] केवीं ॥ २६ ॥ ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते अळुकीचि[33] उरेल । जे तें परिणामीं पथ्य[34] नव्हेल । धनुर्धरा ॥ २७ ॥ म्हणोनि आणिकांसि[35] जें विहित[36] । आणि आपणपेयां[37] अनुचित[38] । तें नाचरावें[39] जरी हित । विचारिजे ॥ २८ ॥ या स्वधर्मातें अनुष्ठितां[40] । वेंचु[41] होईल जीवितें[42] । तोहि निकें[43] वरें[44] उभयतां[45] । दिसत असे ॥ २९ ॥ ऐसें समस्त सुरांचि-

---

१ सुखासारखी वाटणारी दुराशा. २ मत्स्य. ३ आवेशानें. ४ गरी. ५ ठाकक. ६ स्वाधीन. ७ क्रोधाग्नीला. ८ आडून, आंग मारून. ९ मारण्याची संधि साधून. १० मारण्याकरितां. ११ आत्मचिंतनाचा. १२ जिव्हाळा. १३ बिघडवूं नको. १४ आचरिला. १५ दुसरा. १६ दुसऱ्याचा. १७ निश्चयें. १८ करणारांनीं. १९ सर्व. २० दरिद्री. २१ वाईट. २२ करण्यास अयोग्य. २३ चुनेगच्ची घरें. २४ सुंदर. २५ गवताचीं झोपडीं. २६ स्त्री. २७ कठीण. २८ सुखकर. २९ परलोकीं. ३० गोडीनें. ३१ जंतांच्या व्याधिनीं. ३२ घ्यावें. ३३ तृप्तता, आवड. ३४ हितकर होणार नाहीं. ३५ दुसऱ्यांस. ३६ करण्यास योग्य. ३७ आपणाला. ३८ अयोग्य. ३९ करूं नये. ४० आचरण करितां. ४१ खर्च. ४२ जिवंतपणास. ४३ चांगला. ४४ श्रेष्ठ. ४५ दोन्ही लोकीं.

शिरोमणी । बोलिले जेथ श्रीशार्ङ्गपाणी । तेथ अर्जुन म्हणे विनवणी । असे देवा ॥ २३० ॥ हें जें तुम्हीं सांगीतलें । तें सकळ कीर म्यां परिसिलें[2] । तरी आतां पुसेन कांहीं आपुलें । अपेक्षित ॥ ३१ ॥

अर्जुन उवाच—अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥

तरी देवा हें कैसें । जे ज्ञानियांचिही स्थिति भ्रंशे[4] । मार्ग सांडूनि अनारिसे । चालत देखों ॥ ३२ ॥ सर्वज्ञही जे होती । हे उपायही जाणती । तेही परधर्में व्यभिचरती । कवणें गुणें ॥ ३३ ॥ बीजा आणि भुसा । अंध निवाड नेणे जैसा । नावेक देखणाही तसा । बरळे कांपां ॥ ३४ ॥ जे असता संग सांडिती । तेचि संसर्ग करितां न धाती । वनवासीही सेविती । जनपदातें ॥ ३५ ॥ आपण तरी लपती । सर्वस्वें पाप चुकविती । परी बळात्कारें सुइजती । तयाचि माजी ॥ ३६ ॥ जयाची जीवें घेती विवसी । तेंचि जडोनि ठाके[15] जीवेंसी । चुकवितां ते गिंवसी । तयातेंचि ॥ ३७ ॥ ऐसा बळात्कारु एक दिसे । तो कवणाचा एथ आग्रहो असे । हें बोलावें हृषीकेशें । पार्थ म्हणे ॥ ३८ ॥

श्रीभगवानुवाच—काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥

तंव हृदयकमळआराम । योगियांचा निष्काम । तो म्हणतसे पुरुषोत्तम । सांगेन आइक ॥ ३९ ॥ तरी हे काम क्रोध पाहीं । जयांतें कृपेची सांठवण नाहीं । हे कृतांताच्या ठायीं । मानिजती ॥ २४० ॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरीचे वाघ । भजनमार्गींचे मांग[4] । मारके जे ॥ ४१ ॥ हे देहदुर्गींचे धोंडे । इंद्रियग्रामींचे कोंडे । यांचें व्यामोहादिक बंड । जगावरी ॥ ४२ ॥ हे रजोगुणें मानसाचे । समूळ आसुरियेचे । धायपण ययांचें । अविद्या केलें ॥ ४३ ॥ हे रजाचे कीर जाहाले । परी तमासी पढियंते भले । तेणें निजपद यां दीधलें । प्रमाद मोह ॥ ४४ ॥ हे मृत्यूच्या नगरीं । मानिजैती निकि-

---

१ सर्व देवांमध्यें श्रेष्ठ असा श्रीकृष्ण. २ ऐकिलें. ३ इच्छित. ४ बिघडतें. ५ वेगळे. ६ स्वतःचा सोडून परकीय आचरतात. ७ निराळेपणा. ८ एकादे वेळीं. ९ चांगल्या दृष्टीचा. १० चुकतो. ११ तृप्त होत नाहींत. १२ गांवाला, देशाला. १३ घातले जातात. १४ पिशाच. १५ रहातें. १६ शोधी. १७ हृदयाला आनंद करणारा, हृदयविश्रांति. १८ योगीयांचें निर्हेतुक साधन. १९ लवलेश. २० काळाच्या. २१ ज्ञानरूप ठेव्यावरील सर्प. २२ इंद्रियांच्या भोगांच्या दरीतले. २३ भक्तिमार्गांतील. २४ चोर, ठग. २५ मारेकरी. २६ दगड. २७ गांवकुसू. २८ अज्ञानादिक. २९ रजोगुणरूप दोर. ३० आसुरी=अविद्या, तिजपासून झाले, आसुरी संपत्तीचे. ३१ दाईपणा. ३२ मायेनें. ३३ रजोगुणाचे. ३४ तमोगुण. ३५ आवडते. ३६ असावधपणा. ३७ मानिले जातात.

यापरी । जे जीविताचे वैरी । ह्मणऊनियां ॥ ४५ ॥ जयांसि भुकेलियां[2] आमिषा । हें विश्व न पुरेचि घांसा । कुळवाडियाचिया[3] आशा । चाळीत असे ॥ ४६ ॥ कौतुकें कवळितां मुठी । जिये चवदा भुवनें थेंकुटीं । तिये भ्रांतिही धाकुटी । वाल्हीदुल्ही ॥ ४७ ॥ जे लोकत्रयाचें भातुकें । खेळतांचि खाय कवंतिकें । तिच्या दासीपणाचेनि[11] बिकें । तृष्णाजिये ॥ ४८ ॥ हें असो मोहें मानिजे । यातें अहंकारें[13] घेपे दीजे । जेणें जग आपुलिया[14] भोजें । नाचवीत असे ॥ ४९ ॥ जेणें सत्याचा भोकसा काढिला । मग असत्य तृणकुटा भरिला । तो दंभ रूढविला । जगीं इहीं ॥ २५० ॥ साध्वी शांति नागविली । मग माया मांगी शृंगारिली । तियेकरवीं विटाळविली । साधुवृंदें ॥ ५१ ॥ इहीं विवेकाची त्रांथिफेडिली । वैराग्याची साल काढिली । जितया मान मोडिली । उपशमाची ॥ ५२ ॥ इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिलें । आनंदरोप सांडिलें । उपडूनियां ॥ ५३ ॥ इहीं बोधाचीं रोपें[25] लुंचिलीं । सुखाची[26] लिपिही पुसिली । जिव्हारीं आगी सूदली । तापत्रयाची ॥ ५४ ॥ हे आंगा तंव घडले । जीवींचि आथि जडले । परी नातुडती[32] बैसिलें । ब्रह्मादिकां ॥ ५५ ॥ हे चैतन्याचे शेजारी । वसती ज्ञानाच्या एकाहारीं । ह्मणोनि प्रवर्तती महामारी । सांवरती ना ॥ ५६ ॥ हे जळेंवीण बुडविती । आगीवीण जाळिती । न बोलतां कवळिती । प्राणियांतें ॥ ५७ ॥ हे शस्त्रेंवीण सांधिती । दोरेंवीण बांधिती । ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेउनी ॥ ५८ ॥ हे चिखलेंविण रोविती । पाशेंवीण गोविती[39] । हे कवणाजोगे न होती । आंतुवटपणें ॥ ५९ ॥

धूमेनाव्रियते वह्निर्यथाऽदर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

जैसी चंदनाची मुळी । गिंवसोनि घेपे[42] व्याळीं[43] । ना तरी उल्बाची[44] खोळी । गर्भस्यासी ॥ २६० ॥ कां प्रभावीण भानु । धूमेंवीण हुताशनु[45] । जैसा दर्पण मळहीनु । कहींच

१ मित्राप्रमाणें. २ भक्ष्य. ३ उदीम, व्यापार. ४ उलटापालट करताहेत. ५ सहज. ६ खेळ करितां. ७ तुच्छ. ८ फार प्रिय, जिवलग. ९ मुलांचे खाण्याचे पदार्थ. १० कौतुकानें. ११ बळें. १२ इच्छा जिवंत असते. १३ देवघेव होते. १४ हौसेनें. १५ आंतील गर्भ. १६ गवताचा केलेला सांगाडा. १७ शोभविला. १८ पतिव्रता. १९ साधूंचे समूह. २० आश्रय नाहींसा केला. २१ कातडी. २२ जिवंत असतांच. २३ खोदलें. २४ आनंदाचें रोप. २५ तोडलीं. २६ लेख. २७ जिव्हाळ्यांत. २८ अग्नी. २९ पेटला. ३० आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक. ३१ आहेत. ३२ सांपडत नाहींत. ३३ शोधिले. ३४ आत्म्याचे. ३५ अनुसरतात. ३६ महाघातकी. ३७ आटोपत नाहींत. ३८ मारितात. ३९ बांधतात. ४० बळकटपणें. ४१ कवटाळून, शोधून. ४२ घेतली जाते. ४३ सर्पांनीं. ४४ गर्भवेष्टनाची. ४५ अग्नी. ४६ कोठेंच.

नसे ॥ ६१ ॥ तैसें इहींवीण एकलें । आह्मीं ज्ञान नाहीं देखिलें । जैसें कोंडेनि पांगुतलें । बीज निपजे ॥ ६२ ॥

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणाऽनलेन च ॥ ३९ ॥

तैसें ज्ञान तरी शुद्ध । परी इहीं असें प्रेरुद्ध । ह्मणोनि तें अगाध । होऊनि ठेलें ॥ ६३ ॥ आधीं यांतें जिणावें । मग तें ज्ञान पावावें । तंव पैराभवो न संभवे । रागद्वेषां ॥ ६४ ॥ यांतें सैाधावया लागीं । जें बळ आणिजे आंगीं । तें इंधनें जैसीं आगीं । सोवावो होय ॥ ६५ ॥

इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

तैसे उपाय किजती जे जे । ते यांसीच होती विरंजे । ह्मणोनि हटियांतें जिणिजे । इहींचि जगीं ॥ ६६ ॥ ऐसियाही सांकडां बोला । एक उपाय आहे भला । तो करितां जरी आंगवेला । तरी सांगेन तुज ॥ ६७ ॥

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
पाप्मानं प्रजाहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

इयांचा पहिला कुरुठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये । आधीं निर्दळूं घालीं तियें । सर्वथैवें ॥ ६८ ॥

इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥

मग मनाची धांव पैरुखेल । आणि बुद्धीची सोडवण होईल । इतुकेनि थैारा मोडेल । या पापियांचा ॥ ६९ ॥

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

---

१ आच्छादिलेलें. २ उपजतें. ३ रोधलेलें. ४ साधण्यास कठीण. ५ जिंकावें. ६ पराभव होत नाहीं. ७ मारण्यास. ८ सरपण. ९ सहाय. १० हटानें. ११ अशाही संकटाला एक उपाय. १२ मानवला, अनुकूल झाला. १३ घरटें. १४ उत्पत्ती. १५ होतें. १६ नाशून. १७ सर्व प्रकारें. १८ कुंठित होईल. १९ सोडवणूक. २० आश्रय.

योपरी । जे जीविताचे वैरी । ह्मणऊनियां ॥ ४५ ॥ जयांसि भुकेलियां आमिषा[२] । हें विश्व न पुरेचि घांसा । कुळवाडियाचिया[३] आशा । चौळीत[४] असे ॥ ४६ ॥ कौतुकें[५] कवळितां[६] मुठी । जिये चवदा भुवनें येंकुटीं[७] । तिये भ्रांतिही थाकुटी । वाल्हीदुल्ही[८] ॥ ४७ ॥ जे लोकत्रयाचें भातुकें[९] । खेळतांचि खाय कवतिकें[१०] । तिच्या दासीपणाचेनि[११] बिकें । तृष्णा[१२] जिये ॥ ४८ ॥ हें असो मोहें मानिजे । यांतें अहंकारें[१३] घेपे दीजे । जेणें जग आपुलिया[१४] भोजें । नाचवीत असे ॥ ४९ ॥ जेणें सत्याचा ओकसा[१५] काढिला । मग असत्य तृणकुटा[१६] भरिला । तो दंभ रूढविला[१७] । जगीं इहीं ॥ २५० ॥ साध्वी[१८] शांति नागविली । मग माया मांगी श्रृंगारिली । तियेकरवीं विटाळविली । साधुवृंदें[१९] ॥ ५१ ॥ इहीं विवेकाची थांयफेडिली[२०] । वैराग्याची साल[२१] काढिली । जितया[२२] मान मोडिली । उपशमाची ॥ ५२ ॥ इहीं संतोषवन खांडिलें[२३] । धैर्यदुर्ग पाडिलें । आनंदरोप[२४] सांडिलें । उपडूनियां ॥ ५३ ॥ इहीं बोधाचीं रोपें[२५] लुंचिलीं । सुखाची[२६] लिपिही पुसिली । जिव्हारीं[२७] आगी[२८] सूदली[२९] । तापत्रयाची[३०] ॥ ५४ ॥ हे आंगा तंव घडलें । जीवींचि आथि[३१] जडले । परी नातुडती[३२] गिंवसिलें[३३] । ब्रह्मादिकां ॥ ५५ ॥ हे चैतन्याचे[३४] शेजारी । वसती ज्ञानाच्या एका हारीं । ह्मणोनि प्रवर्तती[३५] महामारी[३६] । सांवरती[३७] ना ॥ ५६ ॥ हे जळेंवीण बुडविती । आगीवीण जाळिती । न बोलतां कवळिती । प्राणियांतें ॥ ५७ ॥ हे शस्त्रेंवीण सांधिती[३८] । दोरेंवीण बांधिती । ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेउनी ॥ ५८ ॥ हे चिखलेंविण रोविती । पासेंवीण गोविती[३९] । हे कवणाजोगे न होती । आंतुवटपणें[४०] ॥ ५९ ॥

धूमेनाव्रियते वह्निर्यथाऽदर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

जैसी चंदनाची मुळी । गिंवसोनि[४१] घेपे[४२] व्याळीं[४३] । ना तरी उल्बाची[४४] खोळी । गर्भस्यासी ॥ २६० ॥ कां प्रभावीण भानु । धूमेंवीण हुताशनु[४५] । जैसा दर्पण मळहीनु । कैंहांच[४६]

१ मित्राप्रमाणें. २ भक्ष्य. ३ उदीम, व्यापार. ४ उलटापालट करताहेत. ५ सहज. ६ बंध करितां. ७ तुच्छ. ८ फार प्रिय, जिवलग. ९ मुलांचे खाण्याचे पदार्थ. १० कौतुकानें. ११ बळें. १२ इच्छा जिवंत असते. १३ देवघेव होते. १४ हौसेनें. १५ आंतील गर्भ. १६ गवताचा केलेला सांगाडा. १७ शोभविला. १८ पतिव्रता. १९ साधूंचे समूह. २० आश्रय नाहींसा केला. २१ कातडी. २२ जिवंत असतांच. २३ खोदलें. २४ आनंदाचें रोप. २५ तोडलीं. २६ लेख. २७ जिव्हाळ्यांत. २८ अग्नी. २९ पेटला. ३० आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक. ३१ आहेत. ३२ सांपडत नाहींत. ३३ शोधिले. ३४ आत्म्याचे. ३५ अनुसरतात. ३६ महापातकी. ३७ आटोपत नाहींत. ३८ मारितात. ३९ बांधतात. ४० बळकटपणें. ४१ कवटाळून, शोधून. ४२ घेतली जाते. ४३ सर्पांनीं. ४४ गर्भवेष्टनाची. ४५ अग्नी. ४६ कोठेंच.

नसे ॥ ६१ ॥ तैसें इहींवीण एकलें । आह्मीं ज्ञान नाहीं देखिलें । जैसें कोंडेनि पांगुतलें । बीज निपजे[2] ॥ ६२ ॥

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**

**कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणाऽनलेन च ॥ ३९ ॥**

तैसें ज्ञान तरी शुद्ध । परी इहीं असें प्ररुद्ध[3] । ह्मणोनि तें अगाध[4] । होऊनि ठेलें ॥ ६३ ॥ आधीं यांतें जिणावें[5] । मग तें ज्ञान पावावें । तंव पराभवो[6] न संभवे । रागद्वेषां ॥ ६४ ॥ यांतें साधावया[7] लागीं । जें बळ आणिजे आंगीं । तें इंधनें[8] जैसीं आगीं । सावावो होय ॥ ६५ ॥

**इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**

**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

तैसे उपाय किजती जे जे । ते यांसीच होती विरजे[9] । ह्मणोनि हटियें[10] तें जिणिजे । इहींचि जगीं ॥ ६६ ॥ ऐसियाही सांकडां[11] बोला । एक उपाय आहे भला । तो करितां जरी आंगवला[12] । तरी सांगेन तुज ॥ ६७ ॥

**तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**

**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

इयांचा पहिला कुरुठा[13] इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति[14] कर्मातें विये[15] । आधीं निर्दळूं[16] घालीं तियें । सर्वथैवें[17] ॥ ६८ ॥

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**

**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

मग मनाची धांव पारुषेल[18] । आणि बुद्धीची सोडवण[19] होईल । इतुकेनि थारा[20] मोडेल । या पापियांचा ॥ ६९ ॥

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**

**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

---

१ आच्छादिलेलें. २ उपजतें. ३ रोधलेलें. ४ साधण्यास कठीण. ५ जिंकावें. ६ पराभव होत नाहीं. ७ मारण्यास. ८ सरपण. ९ सहाय. १० हट्टानें. ११ अशाही संकटाला एक उपाय. १२ मानवला, अनुकूल झाला. १३ घरटें. १४ उत्पत्ती. १५ होते. १६ नागून. १७ सर्व प्रकारें. १८ कुंठित होईल. १९ सोडवणूक. २० आश्रय.

हे अंतरींहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले । जैसें रश्मीवीण उरलें । मृग-जळ नाहीं ॥ २७० ॥ तैसे राग द्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें । मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥ ७१ ॥ ते गुरुशिष्याची गोठी । पिंडापदाची गांठी । तेथ स्थिर राहोनि तुठी । कवणे काळीं ॥ ७२ ॥ ऐसें सकळ सिद्धांचा रावो । देवी लक्ष्मीयेचा नाहो । राया ऐकें देवदेवो । बोलता जाहला ॥ ७३ ॥ आतां पुनरपि तो अनंत । आद्य एकी मांत । सांगेल तेथ पंडुसुत । प्रश्न करील ॥ ७४ ॥ तया बोलाचा हेने पोंड । कीं रसवृत्तीचा निर्वाड । येणें श्रोतयां होईल सुरवाड । श्रवणसुखाचा ॥ ७५ ॥ ज्ञान-देवो ह्मणे निवृत्तीचा । चांग उठावा करूनि उन्मेषाचा । मग संवाद श्रीहरिपार्थाचा । भोगावा बापा ॥ २७६ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

श्लोक ॥ ४३ ॥ ओव्या ॥ २७६ ॥

---

## अध्याय ४ था.

आजि श्रवणेंद्रिया पोहलें । जे येणें गीतानिधान देखिलें । आतां स्वप्नचि हें तुकलें । सोन्यासारिखें ॥ १ ॥ आधींचि विवेकाची गोठी । वरि प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी । आणि भक्तराज किरीटी । परिसेंत असे ॥ २ ॥ जैसा पंचमालाप सुगंध । कीं परिमळ आणि सुस्वाद । भला जाहला विनोद । कथेच्या इये ॥ ३ ॥ कैसी आगळिक दैवाची । जे गंगा जोडिली अमृताची । हो कां जे तपें श्रोतयांचीं । फळा आलीं ॥ ४ ॥ आतां इंद्रियेंजात आघवें । तिहीं श्रवणाचें घर रिघावें । मग संवादसुख भोगावें । गीताख्य हें ॥ ५ ॥ हा अतिसो अति प्रसंगें । सांडूनि कथाचि ते सांगें । जे कृष्णार्जुन दोघे । बोलत होते ॥ ६ ॥ ते वेळीं संजयो रायातें ह्मणे । अर्जुन अधिष्ठिला दैवगुणें । जे अति-प्रीती श्रीनारायणें । बोलिजत असे ॥ ७ ॥ जें न सांगेचि पितया वसुदेवासी । जें न सांगेचि माते देवकीसी । जें न सांगेचि बंधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंसीं बोलत

---

१ अंतःकरणांतून. २ दूर झाले. ३ मेले. ४ किरणांशिवाय. ५ नाश पावले. ६ बोध. ७ जीव-ब्रह्माची. ८ नवरा. ९ प्रथम. १० गोष्ट. ११ सर्व. १२ योग्यता. १३ रसभरितपणाचा. १४ निवाडा. १५ सुख. १६ चांगला. १७ ज्ञानाचा. १८ कानांला. १९ वजावलें. २० ठेवा. २१ तुल्य झालें. २२ सोन्याप्रमाणें. २३ गोष्ट. २४ सांगितली. २५ जगश्रेष्ठ. २६ अर्जुन. २७ ऐकत. २८ सप्तस्वरांतील पंचम सुर. २९ सुवास. ३० मधुर स्वाद. ३१ कौतुक, रमणूक. ३२ अपूर्वाई. ३३ सर्व इंद्रियें. ३४ भाषणाचें सुख. ३५ गीतेंत सांगितलेलें. ३६ पाल्हाळ. ३७ युक्त झाला. ३८ दैवेंकरून.

॥ ८ ॥ देवी लक्ष्मीये एवढी जवळिक । तेही न देखे या प्रेमाचें सुख । आजि श्रीकृष्णप्रेमाचेंक । यातेंचि आथी ॥ ९ ॥ सनकादिकांचिया आशा । वाढीनल्या कीर बहुवसा । परी त्याही येणें मानें यैशा । येतीचिना ॥ १० ॥ या श्रीजगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसे निरुपम । कैसें पार्थें येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥ ११ ॥ हो कां जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती । मज एकवंकी याची स्थिती । आवडत असे ॥ १२ ॥ येऱ्हवीं हा योगियां नाकळे । वेदार्थासि नाकळे । जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना ॥ १३ ॥ तो हा निजस्वरूप । अनादि निष्कंप । परी कवणें मानें सकृप । जाहला आहे ॥ १४ ॥ हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी । कैसा याचिये आवडी । आवरला असे ॥ १५ ॥

श्रीभगवानुवाच—इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥

मग देव ह्मणे पंडुसुता । हाचि योग आह्मीं विवस्वता । कथिला परी ते वार्ता । बहुवा दिवसांची ॥ १६ ॥ मग तेणें विवस्वतें रवी । हे योगस्थिती आघवी । निरूपिली बरवी । मनूप्रति ॥ १७ ॥ मनुनें आपण अनुष्ठिली । मग इक्ष्वाकुश उपदेशिली । ऐसी परंपरा विस्तारिली । आद्य हे गा ॥ १८ ॥

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

मग आणिकही या योगातें । राजर्षि जाहले जाणते । परी तयांनि आतां सांप्रतें । नेणिजे कोण्ही ॥ १९ ॥ जे प्राणीयां कामीं भर । देहाचिवरी आदर । ह्मणौनि पडिला विसर । आत्मबोधाचा ॥ २० ॥ अव्हांटलिया आस्था बुद्धि । विषयसुखचि परमावधि । जीव तैसा उपाधि । आवडे लोकां ॥ २१ ॥ येरवीं तरी दिगंबरांच्या गांवीं । पाटावें काय करावीं । सांगें जात्यंधा रवी । काय आथि ॥ २२ ॥ कां बहिरयाच्या आस्थानीं ।

---

१ सन्निध राहणारी. २ बळ. ३ आहे. ४ निश्चयें. ५ अतिशय. ६ याप्रमाणें. ७ पूर्णतेस. ८ उपमेस अतोल. ९ निर्गुण. १० आकारास. ११ अद्वैत व्यापक. १२ आकळत नाहीं. १३ कळत नाहीं. १४ दृष्टि. १५ जन्मरहित. १६ अचल. १७ दयाळू. १८ मर्यादी. १९ परतीर, पलीकडे. २० स्वाधीन झाला. २१ कर्मयोग. २२ सूर्याला. २३ फार. २४ योगनीति, प्रकार. २५ सांगितली. २६ चवदा मनूंतील सातवा वैवस्वत मनु. २७ आचरिली. २८ इक्ष्वाकुनामक पुत्राला. २९ पुरातन. ३० ज्ञानयोगी. ३१ सध्यां. ३२ विषयसेवनीं आवड. ३३ प्रीति. ३४ आत्मानुभव. ३५ आडमार्गानें गेल्या. ३६ भाव. ३७ पराकाष्ठा. ३८ वाटे. ३९ दिगंबर. ४० उंची वस्त्रें. ४१ जन्मांधाला. ४२ उपयोगी आहे. ४३ सभेंत.

कवण गीतातें मानी । कीं कोल्हेयां चांदणी । आवडी उपजे ॥ २३ ॥ [२]पैं चंद्रोदया आंधळें । जयांचे डोळे फुटती असते । ते कावळे केवि चंद्रातें । वोळखती ॥ २४ ॥ तैसी वैराग्याची शिंवें न देखती । जे विवेकाची भाषा नेणती । ते मूर्ख केवि पावती । मज ईश्वरातें ॥ २५ ॥ कैसा नेणों मोहें वाढिनला । तेणें बहुतेक काळ व्यर्थ गेला । म्हणोनि योग हा लोपला । लोकीं इये ॥ २६ ॥

## स एवाऽयं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः
## भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥

तोचि हा आजि आतां । तुजप्रति कुंतीसुता । सांगीतला आम्हीं तत्त्वता । भ्रांति न करीं ॥ २७ ॥ हें [७]जीवींचें निज गुज । परी केवि राखों तुज । जे पढियेसी तूं मज । म्हणऊनियां ॥ २८ ॥ तूं प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा । मैत्रियेची चित्कळा । धनुर्धरा ॥ २९ ॥ तूं अनुसंगाचा ठावो । आतां तुज काय वंचों [१३] आवों । जन्हीं संग्रामारूढ आहों । जाहालों आम्ही ॥ ३० ॥ तरी नावेक हें सहावें । गाजावज्यही न धरावें । परी तुझें अज्ञानत्व हरावें । लागे आधीं ॥ ३१ ॥

## अर्जुन उवाच–अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।
## कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

तंव अर्जुन म्हणे श्रीहरी । माय आपुलेयाचा स्नेह करी । तेथ विस्मय काय अवधारीं । कृपानिधे ॥ ३२ ॥ तूं संसारश्रांतांची साउली । अनाथ जीवांची माउली । आमुतें [२१]कीर प्रसवली । तुझीच कृपा ॥ ३३ ॥ देवा पांगुळ एकाधें विइजे । तरी [२३]जन्मौनि जोजार साहिजे । तें बोलों काय तुझें । तुजचि पुढां ॥ ३४ ॥ आतां पुसेन जें मी कांहीं । तेथें [२५]निकें चित्त देईं । तर्वीचि देवें कोपावें नाहीं । बोला एका ॥ ३५ ॥ तरी मागील जे वार्ता । तुवां सांगीतली होती अनंता । ते नावेक मज चित्ता । मानेचिना ॥ ३६ ॥ जे तो विवस्वत म्हणजे कायी । ऐसें हें वडिलां ठाउवें नाहीं । तरी तुवांचि केवि कैंहीं । उपदेशिला ॥ ३७ ॥ तो आइकिजे बहुतां काळांचा । आणि तूं तंव श्रीकृष्ण सांपेचा ।

---

१ थोराला. २ पहा, निश्चयार्थक अव्यय. ३ अगोदर. ४ सीमा, हद्द. ५ विचाराचें नांव देखील. ६ भ्रम. ७ जिवापाड गुप्त गोष्ट. ८ न सांगतां ठेवूं. ९ जिव्हाळा, आवडता. १० मूर्ति. ११ जीव. १२ विश्वासास. १३ फसवणूक. १४ युद्धाला तयार. १५ क्षणभर. १६ गडबड. १७ बाळकाचा. १८ आश्चर्य. १९ संसारांत श्रमलेल्यांची. २० निश्चयेंकरून. २१ उपजली. २२ व्यावें. २३ जन्मापासून. २४ कष्ट, त्रास. २५ चांगलें. २६ ठाऊक. २७ कधीं. २८ सांप्रतचा.

ह्मणोनि गा इये मातुचा । विसंवाद ॥ ३८ ॥ तवींचि देवा चरित्र तुझें । आपण कांहींचि नेणिजे । हें लटिकें केवि ह्मणिजे । एकिहेळां ॥ ३९ ॥ परी हेचि मातु आघवी । मी परिसेंसें ऐशी सांगावी । जे कां तुवां तया रवी । उपदेश केला ॥ ४० ॥

श्रीभगवानुवाच–**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥**

तंव श्रीकृष्ण ह्मणे पंडुसुता । तो विश्वस्त जैं होता । तैं आह्मी नसों ऐसी चित्ता । भ्रांति जरी तुज ॥ ४१ ॥ तरी तूं गाहें नेणसी । पैं जन्में आह्मा तुह्मासी । बहुतें गेलीं परी न स्मरसी । आपुलीं तूं ॥ ४२ ॥ मी जेणें जेणें अवसरें । जें जें होऊनि अवतरें । तें तें समस्तही स्मरें । धनुर्धरा ॥ ४३ ॥

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥**

ह्मणोनि हें आघवें । मागील मज आठवे । मी अजही परि संभवें । प्रकृतियोगें ॥ ४४ ॥ माझें अव्ययत्व तरी न नसे । परी होणें जाणें एक दिसे । तें प्रतिबिंबे मायावशें । माझ्याचि ठायीं ॥ ४५ ॥ माझी स्वतंत्रता तरी न मोडे । परी कर्माधीन ऐसा आवडे । तेंही भ्रांति बुद्धि तरी घडे । येऱ्हवीं नाहीं ॥ ४६ ॥ कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें । येऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे ॥ ४७ ॥ तैसा अमूर्तचि मी किरीटी । परी प्रकृति जैं अधिष्ठीं । तैं साकारपणें नटनटीं । कार्यालागीं ॥ ४८ ॥

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥**

जें धर्मजात आघवें । युगायुगीं म्यां रक्षावें । ऐसा ओघ हा स्वभावें । आद्य असे ॥ ४९ ॥ ह्मणोनि अजत्व परतें ठेवीं । मी अव्यक्तपणही नाठवीं । जे वेळीं धर्मातें अभिभवी । अधर्म हा ॥ ५० ॥

---

१ गोष्टीचा. २ विरोध. ३ एकदम. ४ गोष्ट. ५ विश्वास बसेल अशी, खरी वाटेल अशी. ६ सूर्य. ७ ज्या ज्या वेळीं. ८ आठवितों. ९ सर्व. १० जन्मरहित. ११ देहधारण करितों, अवतार घेतों. १२ माया अंगीकारून. १३ अविनाशिता, नाशरहितपण. १४ बिघडत नाहीं. १५ प्रतिभासतें. १६ मायेच्यायोगें. १७ कर्माच्या स्वाधीन. १८ लोकांस वाटतो. १९ माह; अर्धवट बुद्धि. २० आरशाच्या. २१ खरेपणाच्या विचारें करून. २२ निराकर. २३ माझी माया जी शुद्धसत्वात्मिक शक्ति. २४ स्वीकारून. २५ साकारपणानें स्त्रीपुरुषाच्या वेषाप्रमाणें. २६ ज्यावेळीं अधर्म वाढतो त्यावेळीं. २७ प्रवाह. २८ पुरातन. २९ जन्मराहितपणा. ३० निराकारपणा. ३१ पराभव, किंवा ऱ्हास करतो.

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

ते वेळीं आपुल्याचेनि[1] कैवारें । मी साकार होऊनि अवतरें । मग अ[2]
आंधारें । गिळूनि[3] घालीं ॥ ५१ ॥ अधर्माची[4] अवधी तोडीं । दोषांचीं लिहिलीं[5]
सज्जनाकरवीं[6] गुढी । सुखाची[7] उभवीं ॥ ५२ ॥ दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूं[8]
गिंवशीं । धर्मासीं नीतीसीं । शेंसे[9] भरीं ॥ ५३ ॥ मी अविवेकांची[11] काजळी ।
विवेकदीप उजळीं । तैं योगियां[12] पाहे दिवाळी । निरंतर ॥ ५४ ॥ स्वसुखें विश्व
धर्मचि जगीं नांदे । भक्तां निघती[14] दोंदें । सात्विकांचीं[15] ॥ ५५ ॥ तैं पापांचा
फिटे[17] । पुण्याची[18] पहांट फुटे । जें मूर्ति माझी प्रगटे । पंडुकुमरा ॥ ५६ ॥
[19]काजालागीं । अवतरें मी युगीं युगीं । परी हेंच वोळखे जो जगीं । तो विवेकियां[20]

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥**

माझें[21] अजत्वें जन्मणें । अक्रियता[22]चि कर्म करणें । हें अविकार[23] जो जाणे । तो
मुक्त ॥ ५८ ॥ तो चालिलों[24] संगें न चले । देहींचा देहीं नाकळे[25] । मग पंचत्वीं[26] तंव
माझ्याचि रूपीं ॥ ५९ ॥

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

येऱ्हवीं परापर[27] न शोचिती[28] । जे कामनाशून्य[29] होती । वांटा[30] कोणे वेळीं न ये
क्रोधाचिया ॥ ६० ॥ (सदा मियांचि[32] आथिले[33]) । माझिया सेवा जियाले[34] । कीं आ
तोषले[35] । वीतराग[36] जे ॥ ६१ ॥ जे तपोतेजाचिया राशी । कीं एकायतन[37] ज्ञा
जे पवित्रता तीर्थांसी । तीर्थरूप ॥ ६२ ॥ ते मद्भावा[38] सहजें आले । मी तेचि ते

---

१ माझ्या भक्तांच्या कैवारानें. २ बंड, वाढ. ३ टाकितों. ४ सीमा, अवकाश.
६ ध्वजा. ७ उभारितों. ८ सांभाळितों. ९ मळवट भरितों, पूज्यता आणितों. १० अ
११ आंधार. १२ आहे, विकासे. १३ भरे. १४ सुखदर्शक चिन्हें. १५ शुद्धसत्त्व मायेच्या
१६ पर्वत. १७ मोडे. १८ उदय. १९ कार्याकारितां. २० ज्ञानी २१ जन्मादिविकाररहित
२२ अकर्तेपणें. २३ विकाररहितपणा. २४ भ्रमल्यासंगें. २५ आकळला जात नाहीं. २६ मर
२७ आपपर, मागील पुढील. २८ शोक करीत नाहींत. २९ वासनारहित. ३० मार्गाला.
जाती. ३२ (मींच ज्यांच्या अंतःकरणांत निरंतर भरून राहिलों आहें). ३३ योग्य
३४ वांचले. ३५ तृप्त झाले. ३६ निरिच्छ. ३७ एकच स्थान. ३८ माझ्या स्वरूपाला.

जे मज तयां उरले । पैरर नाहीं ॥ ६३ ॥ सांगें पितळेंचि गंधिकाळिक । जैं होय निःशेख । तैं सुवर्ण काइ आणिक । जोडूं जाइजे ॥ ६४ ॥ तैसे यमनियमीं के । जे तपोज्ञानें चोखाळले । मी तेंचि ते जाहले । एथ संशयो कायसा ॥ ६५ ॥

**ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**मम वर्त्माऽनुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥**

र्वीं तरी पाहीं । जे जैसे माझ्याठायीं । भजती तयां मीही । तैसाचि भजें ॥ ६६ ॥ नुष्यजात सकळ । हें स्वभावता भजनशीळ । जाहालें असे केवळ । माझ्या ठायीं परी ज्ञानेंवीण नाशिले । जे बुद्धिभेदासि आले । त्यांणीं एकाची यया कल्पिलें । त्वें ॥ ६८॥ म्हणऊनि अभेदीं भेदें देखती । यया अनामया नामें ठेविती । देवी-पाती । अचर्चातें ॥ ६९ ॥ जें सर्वत्र सदा सम । तेथ विभाग अधमोत्तम । मतिवशें विवंचिती ॥ ७० ॥

**कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥**

नानाहेतुप्रकारें । यथोचितें उपचारें । मानिलीं दैवतांतरें । उपासिती ॥ ७१ ॥ एथ पेक्षित । तें तैसेंचि पावती समस्त । परी तें कर्मफळ निश्चित । वोळख तूं ॥७२॥ देतें घेतें आणिक । निभ्रांत नाहीं सम्यक । एथ कर्मचि फळदायक । मनुष्य- ॥ ७३ ॥ जैसें क्षेत्रीं जें पेरिजे । तेवांचूनि आन न निपजे । का पाहिजे खिजे । दर्पणाधारें ॥ ७४ ॥ ना तरी कडेया तळवटीं । जैसा आपलाचि बोल । पडिसाद होऊनि उठी । निमित्तयोगें ॥ ७५ ॥ तैसा समस्तां यां भजना । मी न पैं अर्जुना । एथ प्रतिफळे भावना । आपुलाली ॥ ७६ ॥

---

दा, अंतर. २ गंज, कीट. ३ शुद्ध, चोख. ४ यम, नियम आदि अष्टांगयोगांनीं. ५ शुद्ध ६ निर्मळ झाले. ७ सर्व मनुष्य. ८ स्वाभाविक रीतीनें, आदेशावांचून. ९ अर्थ गेले. भेद. ११ या (मला) एकालाच. १२ देवतेदेवकल्पन. १३ अद्वैतीं. १४ द्वैत. १५ मायारहिता. १६ मायाभ्रम. १७ चर्चा करण्यास अशक्य, अनिर्वाच्य. १८ अविकार. १९ भेद. उत्तम. २१ बुद्धीनें. २२ भ्रांतिष्ट. २३ मानितो. २४ उपासतांनीं. २५ दुसरें देव आणि, दि. २६ इच्छित. २७ मजशिवाय दुसरें. २८ खरें पाहतां. २९ शेतांत. ३० दुसरें. न होत नाहीं. ३२ जें पहावें तेंच दृष्टीस पडतें. ३३ डोंगराच्या कड्यांखालीं, गिरिकंदरीं. - ३५ प्रतिध्वनि, पडशब्द. ३६ सिद्धि पावे.

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

आतां याचिपरी जाण । चाऱ्ही हे वर्ण । सृजिले[1] म्यां गुण[2] । कर्मविभागें[3] ॥ ७७ ॥ जे प्रकृतीचेनि आधारें । गुणाचेनि व्यभिचारें । कर्मे तदनुसारें । विवंचिलीं[4] ॥ ७८ ॥ एथ एकचि हें धनुष्यपाणी[5] । परी जाहलें गा चहूंवर्णीं । ऐसी गुणकर्मकडसणी[6] । केली सहजें ॥ ७९ ॥ ह्मणोनि आइकें पार्था । हे वर्णभेदसंस्था[7] । मी कर्ता नव्हे सर्वथा । याचि-लागीं ॥ ८० ॥

**न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न बद्ध्यते ॥ १४ ॥**

हें [8]मजचिस्तव जाहालें । परी म्यां नाहीं केलें । ऐसें जेणें जाणितलें । तो सुटला गा ॥८१॥

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥**

मागील मुमुक्षु[9] जे होते । तिहीं ऐसिया जाणोनि मातें । कर्मे केलीं समस्तें । धनुर्धरा[5] ॥ ८२ ॥ परित्तां बीजें जैसीं दग्धलीं[10] । नुगवतीचि[11] पेरिलीं । तैसीं कर्मेचि परि तयां जाहालीं । मोक्षहेतु[12] ॥ ८३ ॥ एथ आणिकही एक अर्जुना । हे कर्माकर्मविवंचनें[13] । आपुलिये चोंडें[14] सज्ञाना । योग्य नोहे ॥ ८४ ॥

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥**

कर्म ह्मणिपे[15] तें कवण । अथवा अकर्मीं काय लक्षण । ऐसें विचारितां विचक्षण[16] । [17]गुंफोनि ठेलें ॥ ८५ ॥ जैसें कां कुडें[18] नाणें । खऱ्याचेनि सारखेपणें । डोळ्याचेंचि [19]देखणें । संशयीं घाली ॥ ८६ ॥ तैसें नैष्कर्म्यतेचेनि[20] भ्रमें । गिंवसिजत[21] आहाती कर्मे ।

---

१ उत्पन्न केले. २ गुण व कर्मे यांच्या भेदानें. ३ उलटापालटीनें. ४ मानिलीं. ५ धनुर्धरा. ६ गुण व कर्म यांचा विचार. ७ ब्राह्मणक्षत्रियादि उत्तम, मध्यम, नीच, ही विभागस्थापना. ८ मजपासून. ९ मोक्षाची इच्छा करणारे. १० भाजलेलीं. ११ रुजत नाहींत. १२ मुक्तीला कारण. १३ कर्म व अकर्म याची वाटाघाट. १४ (आपल्याच मतानें कर्म व अकर्म यांची वाटाघाट करणें हें सज्ञान्याला योग्य नाहीं.) १५ ह्मटलें जातें. १६ विचारी, शाहाणे. १७ गोंधळून राहिले. १८ खोटें. १९ पहाणें. २० कर्मरहितपणा मिळविण्याच्या भ्रमानें. २१ गुंततात, जातात.

जे दुजी सृष्टि मनोधर्में[1] । करूं सकती ॥ ८७ ॥ वांचूनि[2] मूर्खांची गोठी[3] कायसी । एथ मोहिले[4] गा दीर्घदर्शी[5] । म्हणोनि आतां तेचि परियेसीं । सांगेन तुज ॥ ८८ ॥

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

तरीं कर्म म्हणिजे स्वभावें । जेणें विश्वाकारसंभवे[6] । तें सम्यक्[7] आधीं जाणावें । लागे एथ ॥ ८९ ॥ मग वर्णाश्रमासि[8] उचित[9] । जें विशेष कर्म विहित[10] । तेंही वोळखावें निश्चित । उपयोगेंसीं[11] ॥ ९० ॥ मौठी[12] जें निषिद्ध म्हणिपे[13] । तेंही बुझावें[14] स्वरूपें । येतुलेनि[15] कांहीं न गुंफे[16] । आपैसेंचि[17] ॥ ९१ ॥ येऱ्हवीं जग हें कर्माधीन । ऐसीयाची व्याप्ती[18] गहन[19] । परी तें असो आइकें चिन्ह । प्रांप्तांचें[20] ॥ ९२ ॥

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥**

जो सकळकर्मीं वर्ततां । देखे आपुली नैष्कर्म्यता[21] । कर्मसंगें निराशता[22] । फळाचिया ॥ ९३ ॥ आणि कर्तव्यतेलागीं । जया दुसरें नाहीं जगीं । ऐसिया नैष्कर्मता तरी चांगी[23] । बोधला[24] असे ॥ ९४ ॥ तरी क्रियाकलाप[25] आघवा[26] । आचरत दिसे बरवा । तोचि तो येचिन्हीं जाणावा । ज्ञानिया गा ॥ ९५ ॥ जैसा कां जळापाशीं उभा ठाके । तो जरी आपणपें[27] जळामाजि देखे । तरी तो निभ्रांत वोळखे । म्हणे मी वेगळा आहें ॥ ९६ ॥ अथवा नावे[28] हूनि[29] जो रिगे । तो थडियेचे[30] रुख[31] जातां देखे वेगें । तेचि साचोकारें[32] पाहों जों लागे । तंव रुख म्हणे अचळ[33] ॥ ९७ ॥ तैसें सर्वकर्मीं असणें । तें फुडें[34] मानूनि वायाणें[35] । मग आपण जो जाणे । नैष्कर्म्य ऐसा ॥ ९८ ॥ आणि उदोअस्ताचेनि[36] प्रमाणें । जैसें नचलतां[37] सूर्याचें चालणें । तैसें नैष्कर्म्यतत्त्व[38] जाणे । कर्मीचि असतां ॥ ९९ ॥ तो मनुष्यासारिखा तरी आवडे[39] । परी मनुष्यत्व तया न घडे । जैसें जळामाजी न बुडे । भानुबिंब ॥ १०० ॥ तेणें न पाहतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें । न

---

१ मनाच्या सामर्थ्यानें. २ याशिवाय, यापुढें. ३ गोष्ट, कथा. ४ भ्रम पावले. ५ दूरदृष्टीचे, ज्ञानी. ६ विश्वरचना होते. ७ यथार्थ. ८ वर्ण व आश्रम यांस. ९ योग्य. १० आचरण्यास योग्य. ११ फळासह. १२ याउलट. १३ म्हटलें. १४ जाणावें. १५ एवढ्यानें. १६ गुंतत नाहीं. १७ आपोआप. १८ व्यापकपण. १९ कळण्यास कठीण. २० मुक्तांचें. २१ अकर्तेपण. २२ निरिच्छपणा. २३ चांगल्या. २४ समजला. २५ अनुष्ठानआदि. २६ सर्व. २७ आपलें स्वरूप. २८ नौकेंत. २९ (हें समुच्चयार्थक अव्यय आहे.) ३० नदीच्या तीराचे. ३१ वृक्ष. ३२ खरें. ३३ स्थीर. ३४ स्पष्ट. ३५ खोटें. ३६ उदय. ३७ चालत नसतां. ३८ कर्ममुक्तत्व. ३९ वाटे.

भोगितां भोगिलें । [1]भोग्यजात ॥ १ ॥ एकेचि ठायीं बैसला । परि सर्वत्र तोचि गेला । हें असो विश्व जाहाला । [2]आंगेंचि तो ॥ २ ॥

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥**

जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी [3]खेद नाहीं । तरी [4]फळापेक्षा कांहीं । [5]संचरेना ॥ ३ ॥ आणि हें कर्म मी करीन । अथवा [6]आदरिलें सिद्धी नेईन । येणें संकल्पेंही जयाचें मन । विटाळे ना ॥ ४ ॥ ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्में [7]अशेखें । तो परब्रह्मचि [8]मनुष्यवेखें । वोळख तूं ॥ ५ ॥

**त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥**

जो शरीरीं उदास । फळभोगीं निरास । नित्यता [10]उल्हास । होऊनि असे ॥ ६ ॥ जो संतोषाचा [11]गाभारां । आत्मबोधाचिया [12]वोगरां । पुरे न ह्मणेचि धनुर्धरा । [13]आरोगितां ॥ ७ ॥

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥**
**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥ २२ ॥**

कैसी अधिकाधिक आवडी । घेत महासुखाची गोडी । सांडोनियां आशा [14]कुरोंडी । अहंभावेसीं ॥ ८ ॥ ह्मणोनि [15]अवसरें जें जें पावे । तेणेंचि तो सुखावे । जया आपुलें आणि [16]परावें । दोन्हीं नाहीं ॥ ९ ॥ तो [17]दिठी जें पाहे । तें आपणचि होऊनि जाये । आइके तें आहे । तोचि जाहाला ॥ ११० ॥ चरणीं [18]हेन चाले । मुखें जें जें बोले । ऐसें [19]चेष्टाजात [20]तेतुलें । आपणचि जो ॥ ११ ॥ हें असो [21]विश्वें पाहीं । जयासि [22]आपणपें-वांचूनि नाहीं । आतां कवण तें कर्म कायी । बाधी तयातें ॥ १२ ॥ हा मत्सर जेथ उपजे । [20]तेतुलें नुरेचि जया दुजें । तो निर्मत्सर काइ ह्मणिजे । [23]बोलेंवरी ॥ १३ ॥ ह्मणोनि सर्वांपरी मुक्त । तो [24]सकर्मचि कर्मरहित । सगुण परि [25]गुणातीत । एथ भ्रांति नाहीं ॥ १४ ॥

---

१ सर्व विषय. २ स्वतः ३ वियोग. ४ फलांची इच्छा. ५ शिरेना. ६ प्रारंभिलेलें. ७ संपूर्ण. ८ मनुष्यवेषानें. ९ निरिच्छ. १० आनंद. ११ मध्यगृह. १२ जेवण. १३ भोजन करितां. १४ ओवाळणी. १५ समयानुसार. १६ दुसऱ्याचें. १७ दृष्टीनें. १८ सहज. १९ चलनवलनादि. २० तितकें, तेवढें. २१ विश्वाविषयीं विचार करितां. २२ स्वतःशिवाय. २३ शब्दांनीं. २४ कर्म आचरीत असतां. २५ गुणांपलीकडचा ब्रह्मस्वरूपी.

**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥**

तो देहसंगें तरी असे । परि[1]चैतन्यासारिखा दिसे । पाहतां परब्रह्माचेनि [2]कसें । [3]चोखाळ भला ॥ १५ ॥ ऐसाही परी [4]कौतुकें । जरी कर्म करी यज्ञादिकें । तरी तियें [5]लया जाती [6]निःशेखें । तयाच्याचि ठायीं ॥ १६ ॥ [7]अकाळींचीं अभ्रें [8]जैशीं । [9]ऊर्मीवीण आकाशीं । [10]हारपती आपैशीं । [10]उदयलीं सांतीं ॥ १७ ॥ तैसीं विधिविधानें [11][12]विहितें । जरी आचरे तो समस्तें । तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें । पावतीचि गा ॥ १८ ॥

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥**

हें हवन मी [13]होतों । कां [14]ईये यज्ञीं हा भोक्ता । ऐसिया बुद्धीसि नाहीं भिन्नता । म्हणऊनियां ॥ १९ ॥ जे [15]इष्टयज्ञ [16]यजावे । तें हविमं[17]त्रादि आघवें । तो देखतसे अवि[18]नाशभावें । [19]आत्मबुद्धि ॥ १२० ॥ म्हणऊनि ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें बोधा आलें जया सम । तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा ॥ २१ ॥ आतां अविवेक [20]कुमारत्वा [21]मुकलें । जयां [22]विरक्तीचें पाणि[23]ग्रहण जाहालें । मग [24]उपासन जिहीं आणिलें । योगा[25]ग्नीचें ॥ २२ ॥

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥**

जे [26]यजनशील [27]अहर्निशीं । जिहीं [28]अविद्या [29]हविली [30]मनेंसीं । [31]गुरुवाक्यहुताशीं । हवन केलें ॥ २३ ॥ तिहीं योगा[32]ग्निकीं [33]यजिजे । तो दैवयज्ञ म्हणिजे । जेणें आत्मसुख [34]कामिजे । पंडुकुमरा ॥ २४ ॥ दैवास्तव पाळण । जो चित्तीना देहा[35]भरण । तो महायोगी जाण । दैवयोगें ॥ २५ ॥ आतां अवधारीं सांगेन आणिक । जे [36]ब्रह्माग्नी [37]साग्निक । तयांतें यज्ञेंचि यज्ञ देख । उपासिजे ॥ २६ ॥

---

१ निर्गुण. २ कसोटीनें. ३ शुद्ध. ४ सहज. ५ व्यर्थ होतात. ६ संपूर्ण. ७ वृष्टीवांचून. ८ नाहींशीं होतात. ९ आपोआप. १० उत्पन्न झाल्याबरोबर. ११ यज्ञादिकर्मे. १२ आचरण्यास योग्य. १३ यज्ञ करणारा आचार्य. १४ या. १५ आवडते. १६ अनुष्ठावे. १७ होमाचे मंत्र व द्रव्ये इत्यादि. १८ न नासणारे. १९ अभेदबुद्धि. २० बाल्यपणास. २१ अंतरले. २२ वैराग्याचें. २३ लग्न, परिग्रह. २४ भक्ति. २५ योग हाच अग्नी, त्याची उपासना म्हणजे योगाभ्यास करणें. २६ यज्ञ करणारे. २७ रात्रंदिवस. २८ अज्ञान. २९ जाळली. ३० मनांतून. ३१ गुरुवाक्यरूप अग्नींत. ३२ योगरूप अग्नींत. ३३ अनुष्ठिजे. ३४ इच्छावें. ३५ अन्नवस्त्र. ३६ आत्मज्ञानाग्नि. ३७ अग्नियुक्त, अग्निहोत्री.

श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।
शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

एक संयमाग्निहोत्री[१] । ते युक्तित्रयाच्या[२] मंत्रीं । यजन करिती पवित्रीं । इंद्रियद्रव्यीं ॥ २७ ॥ एकां वैराग्य रवि[३] विवळे[४] । तंव संयतीविहीर[५] केले । तेथ अपावृत्त[७] जाहाले । इंद्रियानळ[८] ॥ २८ ॥ तिहीं[९] विरक्तीची ज्वाळा घेतली । तंव विकारांचीं इंधनें[१०] पळिपैलीं[११] । तेथ आशाधूमें[१२] सांडिली । पांचैही[१३] कुंडें ॥ २९ ॥ मग वाक्यविधीचिया[१४] निरवडी[१५] । विषय आहुती उदंडीं । हवन केलें कुंडीं । इंद्रियाग्नीच्या ॥ १३० ॥

सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।
आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

एकीं ययापरी पार्था । दोष क्षाळिले सर्वथा । एकीं हृदयारणीं[१६] मंथीं[१७] । विवेक केला ॥ ३१ ॥ तो उपशमें[१८] निहटिला[१९] । धैर्यभारें दाटिला[२०] । गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें ॥ ३२ ॥ ऐसें समरसें[२१] मंथनें[२२] केलें । तेथ झडकरी काजा आलें । जे उज्जीवन[२३] जाहलें । ज्ञानाग्नीचें ॥ ३३ ॥ पहिला ऋद्धिसिद्धीचा[२४] संभ्रमें[२५] । तो निवर्तोनि[२६] गेला धूम । मग प्रगटला सूक्ष्म । विस्फुलिंग[२७] ॥ ३४ ॥ तया मनाचें मोकळें । तेंचि पेटवण घातलें । जें यमनियमीं[२८] हळुवारलें[२९] । आइतें होतें ॥ ३५ ॥ तेणें सांदुकपणें[३०] ज्वाळा समृद्धा[३१] । मग वासनांतरींचिया[३२] समिधीं[३३] । स्नेहेंसि[३४] नानाविधा । जाळिलिया ॥ ३६ ॥ तेथ सोहंमंत्रें[३५] दीक्षितीं । इंद्रियकर्मांचिया आहुती । तिये ज्ञानानळीं[३६] प्रदीप्तीं[३७] । दिधलिया ॥ ३७ ॥ पाठीं प्राणकर्मांचिये[३८] स्रुवेनिशीं । पूर्णाहुती पडलिया हुताशीं[३९] । तेथ अवभृथ[४०] समरसीं । सहजें जाहालें ॥ ३८ ॥ मग आत्मबोधिचें सुख[४१] । जें संयमाग्नीचें हुतशेष[४२] । तोचि पुरोडाश[४३] देख । घेतला तिहीं ॥ ३९ ॥ एक ऐशिया[४४] ईहीं यजनीं[४५] । मुक्त ते जाहाले त्रिभुवनीं । या यज्ञक्रिया तरी आनानी[४६] । परि प्राप्य[४७] तें एक ॥ १४० ॥

---

१ आत्मसंयमरूप अग्नीमध्यें होम करणारे. २ मूळबंध, जालंधर, उडियान हे तीन बंध हेच मंत्र. ३ सूर्य. ४ प्रकटे. ५ नेम, संयम—इंद्रियनिग्रह. ६ कुंडें. ७ उघड केलेला. ८ इंद्रियद्रव्य-अग्नी. ९ त्यांनीं. १० लांकडें. ११ पेटविलीं. १२ धुरानें. १३ ज्ञानेंद्रियपंचक. १४ गुरुवाक्य. १५ कौशल्य. १६ हृदयामध्यें विवेकरूप अरणी ( मंथनकाष्ठ ) च्या. १७ घर्षणानें. १८ शांतीनें. १९ नेट धरेला. २० दृढ झाला. २१ सर्व वृत्तींच्या ऐक्यानें. २२ घर्षण. २३ प्रकाश. २४ अद्भुत शक्ति. २५ मोह. २६ नाहींसा होऊन. २७ ठिणगी. २८ मन आणि इंद्रिय निग्रह. २९ वाळून हलकें झालें. ३० प्रदीप्तपणानें. ३१ भडकलेल्या. ३२ नाना प्रकारच्या वासना. ३३ होमांत टाकण्याचीं काष्ठें. ३४ मोहरूप तुपासहित. ३५ यज्ञकर्ते यांनीं. ३६ ज्ञानाग्नींत. ३७ भडक्यांत. ३८ होमांत आहुति घालण्याचें यज्ञपात्र त्यासह. ३९ अग्नींत. ४० यज्ञाच्या शेवटचें स्नान. ४१ समाधि सुख. ४२ होम करून राहिलेलें द्रव्य. ४३ यज्ञसंबंधी चरु. ४४ या. ४५ यज्ञेंकरून. ४६ भिन्नभिन्न. ४७ प्राप्त फळ.

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथाऽपरे ।
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

एक द्रव्ययज्ञ म्हणिपती । एक तपसामग्रिया निपजविती । एक योगयागही आहाती । जे सांगितले ॥ ४१ ॥ एकीं शब्दीं शब्द यजिजे । तो वाग्यज्ञ म्हणिजे । ज्ञानें ज्ञेय गमिजे । तो ज्ञानयज्ञ ॥ ४२ ॥ हें अर्जुना सकळ कुवाडें । जें अनुष्ठितां अतिसांकडें । परी जितेंद्रियांसीचि घडे । योग्यतावशें ॥ ४३ ॥ ते प्रवीण तेथ भले । आणि योगसमृद्धि आथिले । म्हणोनि आपणपां तिहीं केलें । आत्महवन ॥ ४४ ॥

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे ।
प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

मग अपानाग्नीचे मुखीं । प्राणद्रव्यें देखीं । हवन केलें एकीं । अभ्यासयोगें ॥ ४५ ॥ एक अपान प्राणीं अर्पिती । एक दोहींतेंही [18] निरुंधिती । ते प्राणायामी म्हणिपती । पंडुकुमरा ॥ ४६ ॥

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

एक वज्रयोगक्रमें । सर्वाहारसंयमें । प्राणीं प्राण संभ्रमें । हवन करिती ॥ ४७ ॥ ऐसे मोक्षकाम सकळ । समस्त हे यजनशीळ । जिहीं यज्ञद्वारां मनोमळ । क्षाळण केले ॥ ४८ ॥ जया अविद्याजात जाळितां । जें उरलें निजस्वभावता । जेथ अग्नि आणि होता । उरेचिना ॥ ४९ ॥ जेथ यजितयाचा काम पुरे । यज्ञींचें विधान सरे । मागुतें जेथोनि वोसरे [32] । क्रियाजात ॥ १५० ॥ विचार जेथ न रिगे । हेतु जयातें न निघे । जें द्वैतदोष-संगें । लिंपेचिना ॥ ५१ ॥

---

१ म्हटला जातो. २ साहित्य. ३ अष्टांगयोगरूप यज्ञ. ४ होम केला जातो. ५ वाग्यज्ञ. ६ जाणण्यास योग्य. ७ पाविजे. ८ बिकट. ९ कठीण. १० इंद्रियें स्वाधीन असणारांना. ११ योग्यतेनुरूप. १२ कुशल. १३ भाग्यवान्. १४ आपल्याचठायीं. १५ अहंकार जाळला. १६ अपानवायुरूप अग्नींत. १७ प्राणवायु. १८ निरोध करितात. १९ म्हटले जातात. २० हठयोग. २१ सर्व विषय हेच आहार ते बंद करून. २२ योगेंकरून. २३ मोक्षेच्छु. २४ यज्ञकर्ते. २५ धुतले. २६ सर्व अज्ञान. २७ आत्मस्वरूप. २८ होम करणारा. २९ यज्ञ करणाराचा. ३० इच्छा. ३१ यज्ञक्रिया. ३२ नाहींसें होतें. ३३ द्वैताचाभ्रम. ३४ न्याय.

**यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥**

ऐसें अनादिसिद्ध चोखट[1]। जें ज्ञान येज्ञावशिष्ट[2]। तें सेविती ब्रह्मनिष्ठ। ब्रैह्माहंमंत्रें[3] ॥ ९२ ॥ ऐसे शेषामृतें धाले[4]। कीं अमर्त्यभावा[5] आले। म्हणोनि ब्रह्म ते जाहाले। अनायासें ॥ ९३ ॥ येरां विरक्ति[6] माळ न घालिचि। जयां संयमाग्नीची[7] सेवा न घडेचि। जे योगयाग न करितीचि। जन्मलेयांते[8] ॥ ९४ ॥ जयां ऐहिक[9] धड नाहीं। तयांचें परत्र[10] पुसशी काई। म्हणोनि असो हे गोष्टी पाहीं। पंडुकुमरा ॥ ९५ ॥

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥**

ऐसें बहुतीं परी अनेग[11]। जे सांगितले तुज कां योग[12]। ते विस्तारूनि वेदें चांग[13]। म्हणितले[14] आहाती ॥ ९६ ॥ परि तेणें विस्तारें काय करावें। हेंचि[15] कर्मसिद्ध[16] जाणावें। येतुलेनि[17] कर्मबंध स्वभावें। पावेलना ॥ ९७ ॥

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

अर्जुना वेद जयांचें मूळ। जे क्रियाविशेष[18] स्थूळ। जया नैष्कर्म्याचें[19] फळ। स्वर्गसुख ॥ ९८ ॥ ते द्रव्यादियाग[20] कीर[21] होती। परी ज्ञानयज्ञाची सैरी[22] न पवती। जैसी तारातेजसंपत्ती[23]। दिनकरापाशीं[24] ॥ ९९ ॥ देखें परमात्म सुखनिधान[25]। साधावया योगीजन। जें न विसंबिती[26] अंजन। उन्मेषनेत्रीं[27] ॥ १६० ॥ जें धांवतया कर्माची लोणी[28]। नैष्कर्म्य[29] बोधाची खाणी। जें भुकेलिया धणी[30]। साधनाची ॥ ६१ ॥ जेथ प्रवृत्ति[31] पांगुळे[32] जाहाली। तर्काची दृष्टी गेली। जेणें इंद्रियें विसरलीं। विषयसंग ॥ ६२ ॥ मनाचें मनपण गेलें। जेथ बोलाचें बोलकेपण ठेलें। जयामाजि सांपडलें। ज्ञेयें[33] दिसे ॥ ६३ ॥

---

१ चांगलें, शुद्ध. २ यज्ञाचें शिल्लक. ३ 'अहं ब्रह्मास्मि' या मंत्रानें. ४ तृप्त झाले. ५ अमरपणाला. ६ वैराग्य. ७ समाधीची. ८ जन्मास येऊन. ९ या लोकींचें. १० परलोकींचें. ११ अनेक. १२ यज्ञ. १३ चांगले. १४ सांगितले. १५ ज्ञान. १६ कर्मानें पूर्णता पावणारे, प्राप्त होणारे. १७ एवढें समजल्यानें. १८ यज्ञादि कर्मे. १९ पूर्ण. २० अपूर्वतेचें. २१ होमार्पणें करून केलेले यज्ञ. २२ निश्चयें. २३ बरोबरी. २४ नक्षत्रांचा प्रकाश. २५ सूर्य. २६ सुखाचा ठेवा. २७ न सोडिती. २८ ज्ञाननेत्रीं. २९ शेवट. ३० कर्मबंध न बाधण्याची. ३१ तृप्ति. ३२ व्यवहारिक बुद्धि. ३३ लंगडी. ३४ जाणण्यास योग्य.

जेथ वैराग्याचा पांग[1] फिटे । विवेकाचाही सोस[2] तुटे । जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें[3] ॥ ६४ ॥

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

तें गा ज्ञान पैं बरवें । जरी मनीं आथि[4] जाणावें । तरी संतांतें भजावें । सर्वस्वेंसीं ॥ ६५ ॥ जे ज्ञानाचा कुरुठा[5] । तेथ सेवा हा उंबरठा[6] । तो स्वाधीन करी सुभटा[7] । वोळगोनी[8] ॥ ६६ ॥ तरी तनुमनुजीवें[9] । चरणासी लागावें । आणि अगर्वता[10] करावें । दास्य सकळ ॥ ६७ ॥ मग अपेक्षित[11] जें आपुलें । तेंही सांगतील पुसिलें । जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा[12] नये ॥ ६८ ॥

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥**

जयाचेनि वाक्य उजिवडें[13] । जाहलें चित्त निधडें[14] । ब्रह्माचेनि पाडें[15] । निःशंक होय ॥ ६९ ॥ ते वेळीं आपणपेंया सहितें[16] । इयें अशेषेंहि भूतें । माझ्या स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥ १७० ॥ ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल[17] । तें मोहांधकार जाईल । जैं श्रीगुरुकृपा होईल । पार्था गा ॥ ७१ ॥

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

जरी कल्मषाचा[18] आगर[19] । तूं भ्रांतीचा[20] सागर । व्यामोहाचा[21] डोंगर । होऊनि अससी ॥ ७२ ॥ तरी ज्ञानशक्तिचेनि[22] पाडें । हें आघवेंचि गा थोकडें[23] । ऐसें सामर्थ्य असे चोखडें[24] । ज्ञानीं इयें ॥ ७३ ॥ देखें विश्वसंभ्रमा[25] ऐसा । जो अमूर्ताचा[26] कवडसा[27] । तो जयाचिया प्रकाशा । पुरेचिना ॥ ७४ ॥ तया कायसे हे मनोमळ । हें बोलतांचि अति किडाळ[28] । नाहीं यया पाडें दिसौळ । दुजें जगीं ॥ ७५ ॥

---

१ हीनता. २ उत्कंठा. ३ आपलेंपण, आत्मरूप. ४ आहे. ५ घर. ६ उंबरा. ७ महायोद्ध्या. ८ सेवा करून. ९ सर्वथैव. १० अभिमान सोडून. ११ इच्छित. १२ मनोव्यापार. १३ उजेडानें. १४ धैर्यवान्, पराक्रमी. १५ योग्यतेनें, बरोबरीनें. १६ आपणासह. १७ उजेडेल. १८ पापाचा. १९ खाण. २० भ्रमाचा. २१ विचाराच्या. २२ सर्व. २३ लहान. २४ चांगलें. २५ विश्ववैभवासारखा. २६ निराकाराचा. २७ गवाक्षछिद्रादिकांतून पडणारे किरण, कवडसा. २८ वाईट. २९ मोठें.

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥**

सांगें भुवनत्रयाची[1] काजळी[2] । जे गगनामाजि उधवली[3] । तिये प्रळयींचे काय अभ्र पुरे ॥ ७६ ॥ कीं पवनाचेनि कोपें । पाणियेंचि जो पळिपे[6] । तो वडपे । तृणकाष्ठें काई ॥ ७७ ॥

**नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८**

ह्मणोनि असो हें न घडे । तें विचारितांचि असंगडें[8] । पुढती ज्ञानाचे पवित्र न दिसे ॥ ७८ ॥ एथ ज्ञान हें उत्तम होये । आणिकही एक तैसें जैसें चैतन्य कां नोहे । दुसरें गा ॥ ७९ ॥ या महातेजाचेनि कैसें[11] । ज प्रतिबिंब दिसे । कां गिंवसिलें[13] गिंवसे । आकाश हें ॥ १८० ॥ नातरी पृथ्वी कांटोळें[14] जरी जोडे । तरी उपमा ज्ञानीं घडे । पंडुकुमरा ॥ ८१ ॥ ह्मणूनि पाहतां । पुढतपुढती[15] निर्धारितां । हे ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींचि आ जैसी अमृताचि चवी निवडिजे । तरी अमृताचिसारिखी ह्मणिजे । तैसें ह्मिजे । ज्ञानेंसींचि ॥ ८३ ॥ आतां यावरी जें बोलणें । तें वायांचि वेळ फे सांचचि हें पार्थ ह्मणे । जें बोलत असां ॥ ८४ ॥ परि तेंचि ज्ञान केवि ऐसें अर्जुनें जंव पुसावें । तंव तें मनोगत देवें । जाणीतलें ॥ ८५ ॥ मग ह्मण आतां चित्त देयीं इये गोठी[22] । सांगेन ज्ञानाचिये भेटी[23] । उपाय तुज ॥

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९**

[24]आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो कां सकळ विषयां । जयाच्या मान नाहीं ॥ ८७ ॥ जो मनासी चाड[25] न सांगे । जो प्रकृतीचें[26] केलें नेघे । [28]संभोगें । सुखिया जाहला ॥ ८८ ॥ तयातेंचि गिंवसितें । तें ज्ञान

१ त्रैलोक्याची. २ काजळ, धूर. ३ उधळली. ४ वायधुळी, वावटळ. ५ वाऱ्या ७ प्रळयकाळींचा अग्नि. ८ असंगत. ९ योग्यतेनें, बरोबरीनें. १० कोठें. ११ कसो १३ कवटाळलें असतां. १४ योग्यतेनें, तुलनेनें, बरोबर. १५ वारंवार. १६ अ गोडी. १८ उपमा करिजे. १९ वेळ घालविणें. २० खरेंच. २१ कसें. २२ गोष्टीस २४ निजानंदाच्या गोडीनें. २५ लालन. २६ मायेचें. २७ आस्तिक्यबुद्धि. २८ २९ शोधीत. ३० येई.

जयामाजि अचुंबित । शांति असे ॥ ८९ ॥ तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे । मग विस्तार बहु प्रकटे । आत्मबोधाचा ॥ १९० ॥ मग जेउती वास पाहिजे । तेउती शांतीचि देखिजे । तेथ आपपर नेणिजे । निर्धारितां ॥ ९१ ॥ ऐसा हा उत्तरोत्तर । ज्ञानबीजाचा विस्तार । सांगतां असे अपार । परि असो आतां ॥ ९२ ॥

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥**

ऐकें जया प्राणियाच्या ठायीं । इया ज्ञानाची आवडी नाहीं । तयाचें जियालें म्हणों काई । वरी मरण चांग ॥ ९३ ॥ शून्य जैसें गृह । कां चैतन्यवीण देह । तैसें जीवित तें संमोह । ज्ञानहीन ॥ ९४ ॥ अथवा ज्ञान कीर आपु नाहे । परि तें व्हावें ऐसी जरी चाड आहे । तरी तेथ जिव्हाळा कांहीं आहे । प्राप्तीचा पैं ॥ ९५ ॥ वांचूनि ज्ञानाची गोठी कायसी । परि ते आस्थाही न धरी मानसीं । तरि तो संशयरूप हुताशीं । पडिला जाण ॥ ९६ ॥ जें अमृतही परि नावडे । ऐसें सावियाचि अरोचक जें पडे । तें मरण आलें असे फुडें । जाणों ये कीं ॥ ९७ ॥ तैसा विषयसुखें रंजे । जो ज्ञानेसीं माजे । तो संशय अंगिकारिजे । एथ भ्रांति नाहीं ॥ ९८ ॥ मग संशयीं जरी पडिला । तरी निभ्रांत जाणें नासला । तो ऐहिकें परत्रा मुकला । सुखासि गा ॥ ९९ ॥ जया काळज्वर आंगीं बाणे । तो शीतोष्णें जैसीं नेणे । आगी आणि चांदिणें । सरिसेंचि मानी ॥ २०० ॥ तैसें साच आणि लटिकें । विरुद्ध आणि निकें । संशयी तो नोळखे । हिताहित ॥ १ ॥ हां रात्री दिवस पाहीं । जैसा जात्यंधा ठाउवा नाहीं । तैसें संशयीं असतां कांहीं । मना नये ॥ २ ॥

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।**
**आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४१ ॥**

म्हणऊनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर । हा विनाशाची वागुर । प्राणियांसी ॥ ३ ॥ येणें कारणें तुवां त्यजावा । आधीं हाचि एक जिणावा । जो ज्ञानाचिया अभावा । माजि असे ॥ ४ ॥ जैं अज्ञानाचें गडद पडे । तैं हा बहुवसें मनीं वाढे ।

१ निर्लेप, संपूर्ण. २ उत्पन्न होई. ३ जेथें, जेवढा. ४ वास. ५ तेथें, तेवढी. ६ जाणणें, जिणें. ७ चांगलें. ८ ओसाड. ९ मेलेलें मढें. १० अज्ञान. ११ निश्चयें. १२ नाश. १३ वागविता. १४ तत्व. १५ गोष्ट. १६ अग्नींत. १७ सहजच. १८ अरुचि. १९ सुख पावे. २० ज्ञानाला माजतो. २१ या लोकास व स्वर्गास. २२ विषमज्वर. २३ ऊन. २४ अनुकूल. २५ चांगले वाईट. २६ जन्मांधास. २७ ठाऊक. २८ भयंकर. २९ पाश घेणारें. ३० जाळें. ३१ जिंकावा. ३२ आंत, मध्यें. ३३ निबिड, अंधार. ३४ अत्यंत.

ह्मणोनि सर्वथा मार्ग मोडे । विश्वासाचा ॥५॥ हृदयीं हाचि न समाये[1] । बुद्धीतें गिंवसूनि[2] ठाये । तेथें संशयात्मक होये । लोकत्रय ॥ ६ ॥

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ब्रह्मार्पणयोगोनाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

ऐसा जरी थोरावे[3] । तरी उपायें एकें आंगवे[4] । जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग[5] ॥७॥ तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें[6] । निखळें[7] हा निर्वटे[8] । मग निःशेष खेता फिटे । मानसींचा ॥ ८ ॥ याकारणें पार्था । उठीं वेगीं वरौता[10] । नाश करोनि हृदयस्था[11] । संशयासी ॥ ९ ॥ ऐसें सर्वज्ञाचा बाप । जो श्रीकृष्ण ज्ञानदीप । तो ह्मणतसे सकृप[12] । ऐकें राया ॥ २१० ॥ तंव या पूर्वापार बोलाचा । विचारूनि कुमर पंडूचा । कैसा प्रश्न अवसरींचा[13] । करिता होईल ॥ ११ ॥ ते कथेची संगती । भावाची संपत्ती । रसाची उन्नती[14] । ह्मणिपेल[15] पुढां ॥ १२ ॥ जयाचिया बरवेपणीं । कीजे आठां रसांची[16] वोंवाळणी । जो सज्जनाचिये आयणी[17] । विसावा जगीं ॥ १३ ॥ जो शांतचि अभिनवेल[18] । ते परियेसा[19] मऱ्हाटे बोल । जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित ॥ १४ ॥ जैसें बिंब[20] तरी बचकेचि एवढें । परि प्रकाशासि त्रिभुवन थोकडें[21] । शब्दाची व्याप्ति तेणें[22] पाडें । अनुभवावी ॥ १५ ॥ ना तरी कामितयांचिया[23] इच्छा । फळे कल्पवृक्ष जैसा । बोल व्यापक होय तैसा । तरी अवधान द्यावें ॥ १६ ॥ हें असो काय ह्मणावें । सर्वज्ञ जाणती स्वभावें । तरी निकें चित्त द्यावें ॥ हे विनंति माझी ॥ १७ ॥ जेथ साहित्य[24] आणि शांति । हे रेखा[25] दिसे बोलती । जैसी लावण्यगुण कुळवती । आणि पतिव्रता ॥ १८ ॥ आधींचि साखर आवडे । तेचि जरी ओखदीं[26] जोडे । तरी सेवावी ना कां कोडें[27] नावानावां[28] ॥ १९ ॥ सहजें मलयानिल[29] मंद सुगंध । तया अमृताचा होय स्वाद । आणि तेथेंचि जोडे नाद । जरी दैवगत्या[30] ॥ २२० ॥ तरी स्पर्शें सर्वांग निववी । स्वादें जिव्हेतें नाचवी । तेविंचि कानां करवीं ह्मणवी । बाप माझा

---

१ सामावत नाहीं. २ आच्छादून. ३ माजला. ४ स्वाधीन होतो. ५ ज्ञानरूप तरवार. ६ तीक्ष्ण. ७ अगदीं निवळ. ८ मरे. ९ किंतु. १० वर. ११ मनांत असणाऱ्या. १२ दयाळू. १३ समयोचित. १४ अधिकपणा, वाढ. १५ ह्मटली जाईल. १६ अलंकार शास्त्रांतील आठ रस. १७ बुद्धीला. १८ अपूर्व प्रकटेल. १९ ऐका. २० सूर्याचें मंडळ. २१ लहान, अल्प. २२ त्या प्रकारें. २३ कामिक लोकांच्या. २४ सामुग्री. २५ कवित्वरचना. २६ औषधांत. २७ आनंदानें. २८ वारंवार. २९ चंदनाचें रान. ३० दैवें करून.

॥ २१ ॥ तैसें कथेचें इये ऐकणें । एक श्रवणासि होय पारणें । आणि संसारदुःख मूळवणें । विकृतीविणें ॥ २२ ॥ जरी मंत्रेंचि वैरी मरे । तरी वायां कां बांधावें कुटारें । रोग जाय दुधें साखरें । तरी निंब कां पियावा ॥ २३ ॥ तैसा मनाचा मार न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां । एथ मोक्ष असे आयता । श्रवणाचिमाजि ॥ २४ ॥ म्हणोनि आंथिलिया ारानुका । गीतार्थ हा निका । ज्ञानदेव म्हणे आइका । निवृत्तिदास ॥ २२५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

श्लोक ४२, ओव्या २२५.

## अध्याय ५ वा.

अर्जुन उवाच–**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥**

मग पार्थ श्रीकृष्णातें म्हणे । हांहो हें कैसें तुमचें बोलणें । एक होय तरी अंतःकरणें । वेचारूये ॥ १ ॥ मागां सकळकर्मांचा संन्यास । तुम्हींच निरोपिला होता बहुवस । तरी कर्मयोगीं केवि आतिरस । पोखीतसां पुढती ॥ २ ॥ एसें द्व्यर्थ हें बोलतां । आम्हा ेणतयांच्या चित्ता । आपुलिये चाडे श्रीअनंता । उमज नोहे ॥ ३ ॥ ऐकें ऐकसारातें ोधिजे । तरी एकैनिष्ठचि बोलिजे । हें आणिकीं काय सांगिजे । तुम्हांप्रति ॥ ४ ॥ तरी ाचिलागीं तुमतें । म्यां राउळासि विनविलें होतें । जे हा परमार्थ ध्वनितें । न बोलावा ५ ॥ परी मागील असो देवा । आतां प्रस्तुतीं उकल देखावा । सांगें दोहींमाजि बरवा । ार्ग कवण ॥ ६ ॥ जो परिणामींचा निर्वाळो । अचुंबित ये फळा । आणि नुष्ठितां प्रांजळा । सोवियाचि ॥ ७ ॥ जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि ार्ग तरी बहुसाल सांडे । तैसें सुखासना सांगडें । सोहपें होय ॥ ८ ॥ येणें र्जुनाचेनि बोलें । देवो मनीं रिझले । मग होईल ऐकें म्हणितलें । संतोषोनियां ॥ ९ ॥

---

१ तृप्ती. २ घालवणें. ३ दुःख न देतां. ४ तरवारी. ५ संपन्न असतां. ६ समाधान. ७ मनानें. ठरवितां येईल. ९ वारंवार. १० वाढवितां. ११ पुनः. १२ दोन अर्थांचें. १३ अज्ञान्याच्या. ४ तुमच्याप्रमाणें. १५ समज. १६ एकच तत्वांश. १७ एक निश्चयाचें. १८ दुसऱ्यानें. १९ तु- ाला. २० भगवंतासी. २१ गूढार्थानें. २२ स्पष्ट. २३ दाखवा. २४ शेवटींचा. २५ निवाडा. ६ बिनचूक. २७ आचरितां. २८ सुगम. २९ सहज. ३० पुष्कळ. ३१ चालला जातो. ३२ पाल- ीसारखें. ३३ योगेंकरून. ३४ सोपें. ३५ संतोषले.

देखा कामधेनुऐसी माये । सदैवा जया होये । तो चंद्रही परि लाहे । खेळावया ॥ १० ॥ पाहें पां श्रीशंभूची प्रसन्नता । तया उपमन्युचिया आर्ता[2] । काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचिना ॥ ११ ॥ तैसा औदार्याचा कुरुठा[4] । श्रीकृष्ण आपु जाहालिया सुभटा[5] । कां सर्व सुखाचा वसौटा[7] । तोचि नोहावा ॥ १२ ॥ एथ चमत्कार कायसा । गोसावी श्रीलक्ष्मीकांताऐसा । आतां आपुलिया [10]सवेसा । मागावा कीं ॥ १३ ॥ म्हणोनि अर्जुनें म्हणितलें । तें हांसोनि येरें दिधलें । तेंचि सांगेन बोलिलें । काय कृष्णें ॥ १४ ॥

श्रीभगवानुवाच—**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**

तो म्हणे गा कुंतीसुता । हे संन्यासयोग विचारितां । मोक्षकर[11] तत्त्वता । दोनीही होती ॥ १५ ॥ तरी जाणानेणां[12] सकळां । हा कर्मयोग करीं[13] प्रांजळां[14] । जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणी[16] ॥ १६ ॥ तैसें सारासार पाहिजे । तरी सोहेंगा[17] हाचि देखिजे । येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥ १७ ॥ आतां याचिलागीं सांगेन । तुज संन्यासियाचें चिन्ह । मग सहजें हें[19] अभिन्न[20] । जाणसी तूं ॥ १८ ॥

**ज्ञेयः सः नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

तरी गेलियाची से[21] न करी । न पवतां[22] चाड[23] न धरी । जो सुनिश्चळ[24] अंतरीं । मेरु जैसा ॥ १९ ॥ आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥ २० ॥ जो मनें ऐसा जाहला । [25]संगीं तोचि सांडिला । म्हणोनि [26]सुखें सुख पावला । अखंडित ॥ २१ ॥ आतां गृहादिक आघवें[27] । तें कांहीं नलगे त्यजावें । जें घेतें[28] जाहालें स्वभावें । निःसंग म्हणऊनि ॥ २२ ॥ देखें अग्नि विझोनि जाये । मग जे राखोंडी केवळ होये । तैं ते कापुसें विवसुये[29] । जियापरी ॥ २३ ॥ तैसा [30]असतेनि उपाधी । [31]नोकाळिजे तो कर्मबंधीं । जयाचिये बुद्धि । संकल्प नाहीं ॥ २४ ॥ म्हणोनि [32]कल्पना जैं सांडे । तैंचि गा संन्यास घडे । इयें कारणें दोनी [33]सांगडे । संन्यास योग ॥ २५ ॥

---

१ लाभे. २ इच्छेसाठीं. ३ दुधाचा समुद्र. ४ घर. ५ प्राप्त. ६ योद्ध्याला. ७ आश्रय. ८ न व्हावा. ९ धनी. १० स्वेच्छा. ११ मोक्ष देणारे. १२ जाणत्यानेणत्यांस. १३ निश्चयें. १४ निर्मळ अंतःकरणीं जनांस. १५ नौका. १६ उदकांतून जाण्यास. १७ सुलभ. १८ मिळवावें. १९ कर्मयोग व संन्यासयोग. २० एकच असे. २१ आठवण. २२ प्राप्त झालें तरी. २३ इच्छा. २४ अतिस्थिर. २५ संसारानें. २६ समाधानानें. २७ सर्व. २८ भोक्ते. २९ झांकतां येते. ३० असतांही. ३१ बांधला जात नाहीं. ३२ विकल्प. ३३ सांगडीनें.

**सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥**

येऱ्हवीं तरी पार्था । जे मूर्ख होती सर्वथा । ते सांख्ययोगसंस्था[1] । जाणती केवीं ॥ २६ ॥ सहजें ते अज्ञान । ह्मणोनि ह्मणती ते भिन्न[2] । येऱ्हवीं दीपाप्रति काइ आन[3] । प्रकाश आहती ॥ २७ ॥ पैं[4] सम्यक एकें अनुभवें । जिहीं देखिलें तत्त्व आघवें । ते दोहींतेंही ऐक्यभावें । मानिती गा ॥ २८ ॥

**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥**

आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे । ह्मणोनि ऐक्य दोहींतें सहजें । इयापरी ॥ २९ ॥ देखें आकाशा आणि अवकाशा । भेद नाहीं जैसा । तैसें ऐक्य योग-संन्यासा । वोळखे जो ॥ ३० ॥ तयासींचि जगीं पाहिलें । आपणपें तेणेंचि देखिलें । जया सांख्ययोग जाणावले । भेदेंविण ॥ ३१ ॥

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाऽधिगच्छति ॥ ६ ॥**

जो युक्तिपंथें पार्था । चढे मोक्षपर्वता । तो महासुखाचा निमथा । वहिलां पावे ॥ ३२ ॥ येरीं योगस्थिती जया सांडे । तो वायांचि गा हव्यासीं पडे । परि प्राप्ति कहीं न घडे । संन्यासाची ॥ ३३ ॥

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥**

जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें । मग आत्मस्वरूपीं घातलें । रोखोनियां ॥ ३४ ॥ जैसें समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें अल्प आवडे । मग होय सिंधूचि एवढें । मिळे तेव्हां ॥ ३५ ॥ तेसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य

---

१ ज्ञानयोग व कर्मयोग यांची व्यवस्था. २ निरनिराळे. ३ आहेत. ४ तथापि. ५ यथार्थ. ६ परब्रह्मस्वरूप. ७ ज्ञानमार्गानें. ८ कर्मयोगानें. ९ पावावें. १० पोकळीला. ११ उघड झालें. १२ स्वतः आपणास. १३ योगमार्गानें. १४ आत्मसुखाचा. १५ मस्तक. १६ सत्वर. १७ दुसऱ्यास. १८ कर्मयोग. १९ छंदांत. २० कधीं. २१ हिरावून घेतलें. २२ आंत खोंचून. २३ मीठ. २४ वाटतें. २५ संकल्पापासून. २६ ब्रह्मरूप.

जाहालें । तेणें ऐकदेशियें[1] परी व्यापिलें । लोकत्रय ॥ ३६ ॥ आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें[2] तया स्वभावें । आणि करी जर्‍ही आघवें[3] । तर्‍ही अकर्ता तो ॥ ३७ ॥

**नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।**
**पश्यन्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ८ ॥**

**प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥**

जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठऊ नाहीं । तरी कर्तृत्व[4] कैचें काई । उरे सांगें ॥ ३८ ॥ ऐसें तनुत्यागेंविण[5] । अमूर्ताचे[6] गुण । दिसती संपूर्ण । योगयुक्तां ॥ ३९ ॥ येर्‍हवीं आणिकांचिये[7] परी । तोही एक शरीरी । अशेषांही[8] व्यापारीं । वर्तत दिसे ॥ ४० ॥ तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकत आहे । परी तेथिंचा सर्वथा नोहे । नवल देखें ॥ ४१ ॥ स्पर्शासि तरी जाणे । परिमळ[9] सेवी घ्राणें[10] । अवसरोचित[11] बोलणें । तयाहि आथि[12] ॥ ४२ ॥ आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी[13] । निद्रेचिया अवसरीं । निदिजे[14] सुखें ॥ ४३ ॥ आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालत दिसे । पैं सकळ कर्म ऐसें । राहाटे[15] कीर[16] ॥ ४४ ॥ हें सांगों काइ एकैक । देखें श्वासोश्वासादिक । आणि निमिषोन्मिषें[17] । आदिकरूनि ॥ ४५ ॥ पार्था तयाचे ठायीं । हें आघवेंचि आथि पाहीं । परि तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें[18] ॥ ४६ ॥ जैं भ्रांतिसेजे सुतला[19] । तैं स्वप्नसुखें भुंतला[20] । मग तो ज्ञानोदयीं चेइला[21] । म्हणोनियां ॥ ४७ ॥

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥**

आतां अधिष्ठानसंगती[22] । अशेषाही[23] इंद्रियवृत्ती[24] । आपुलालिया अर्थीं[25] । वर्तत आहाती ॥ ४८ ॥ दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे । देहीं कर्मजात[26] तैसें । योगयुक्ता[27] ॥ ४९ ॥ तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे । जैसें न सिंपे[28] जळीं जळें । पद्मपत्र[29] ॥ ५० ॥

---

१ परिच्छिन्नतेनें. २ राहिलें. ३ सर्व. ४ कर्तेपणाचा अहंकार. ५ शरीर असतांही. ६ विदेहीचें. ७ इतरांप्रमाणें. ८ सर्व. ९ सुगंध. १० नाकानें. ११ समयोचित. १२ आहे. १३ टाकतो. १४ निजतो. १५ वागतो. १६ निश्चयें. १७ नेत्र मिटणें व उघडणें. १८ अनुभवाच्या. १९ निजला. २० अनुभविला. २१ जागृत झाला. २२ आत्म प्राप्ती झाली असतां. २३ सर्व. २४ इंद्रियांचे धर्म. २५ विषयांमध्यें. २६ सर्व कर्में. २७ योग्यास. २८ भिजे. २९ कमळाचें पान.

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥ ११ ॥**

देखें बुद्धीची भाष नेणिजे । मनाचा अंकुर नुरेजे । ऐसा व्यापार तो बोलिजे । शारीर गा ॥ ५१ ॥ हेंच मेराठें परियेसीं । तरी बाळकाची चेष्टा जैसी । योगिये कर्में करिती तैसीं । केवळा तनु ॥ ५२ ॥ मग पांचभौतिक संचलें । जेव्हां शरीर असे निदेलें । तेथें मनचि राहाटे एकलें । स्वप्नीं जेवीं ॥ ५३ ॥ नवल ऐकें धनुर्धरा । कैसा वासनेचा संसारा । देहा हों नेदी उजगरा । परी सुखदुःखें भोगी ॥ ५४ ॥ इंद्रियांच्या गांवीं नेणिजे । ऐसा व्यापार जो निपजे[10] । तो केवळ गा म्हणिजे । मानसाचा ॥ ५५ ॥ योगिये तोही करिती । परी कर्में ते न बंधिजेती । जे[13] सांडिली आहे संगती । अहंभावाची ॥ ५६ ॥ आतां जाहालिया भ्रमहत । जैसें पिशाचाचें चित्त । मग इंद्रियांचें चेष्टित । विकळ दिसे ॥ ५७ ॥ स्वरूप तरी देखे । बोलाविलें आइके । शब्द बोले मुखें । परि ज्ञान नाहीं ॥ ५८ ॥ हें असो काजेंविण । जें जें कांहीं करणें । तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें ॥ ५९ ॥ मग सर्वत्र जें जाणतें । तें बुद्धीचें कर्म निरुतें[18] । बोळखे अर्जुनातें । म्हणे श्रीहरी ॥ ६० ॥ ते बुद्धि धुरे[19] करुनी । कर्म करिती चित्त देउनी । परि ते कर्मापासुनी । मुक्त दिसती ॥ ६१ ॥ जे बुद्धीचिये ठावूनि वरी[21] । तया अहंकाराची सोयचि नाहीं । म्हणोनि कर्म करितां पाहीं । चोखाळले ॥ ६२ ॥ अगा करितेनवीण कर्म । तेंचि तें निष्कर्म । हें जाणती सुवर्म । गुरुगम्य जें ॥ ६३ ॥ आतां शांतरसाचें भरितें[26] । सांडीतें[27] आहे पात्रातें । जें बोलणें बोलापरौतें[28] । बोलवलें ॥ ६४ ॥ एथ इंद्रियांचा पांगें । जया फिटली आहे चांग । तयासीचि आथि लाग । परिसावया ॥ ६५ ॥ हा असो अतिप्रसंग । न संडी[36] पां कथालाग । होईल श्लोकसंगती भंग । म्हणऊनियां ॥ ६६ ॥ जें मना आकळितां कुवाडें । धांडोळितां बुद्धीसी नातुडे । तें दैवाचेनि सुरवाडें । सांगवलें तुज ॥ ६७ ॥ जें शब्दातीत स्वभावें । तें बोलींचि

---

१ भास, वार्ता. २ उगवत नाहीं. ३ देहाचा. ४ उघड रीतीनें. ५ ऐक. ६ नुसतें, केवळ. ७ बनलेलें, घटित. ८ निजलें. ९ वागतें. १० उत्पन्न होतो. ११ मनाचा. १२ बांधले जात नाहींत. १३ कारण. १४ भ्रमयुक्त. १५ अव्यवस्थित. १६ हाक मारलेली. १७ निष्कारण. १८ खरें. १९ पुढें, प्रमुख. २० आरूढ होऊन. २१ बुद्धीपासून देहापर्यंत ज्याला अहंकाराची आठवण नाहीं. २२ शुद्ध. २३ कर्तृत्वाच्या अभिमानावांचून. २४ तात्पर्य, गुरुकिल्ली. २५ गुरूपासून मिळणारें. २६ भरलेलें भांडें. २७ वाहीत आहे. २८ पलीकडे. २९ दैन्य, पराधीनपणा. ३० नाहींसा झाला. ३१ उत्तम. ३२ आहे. ३३ सवड, अधिकार. ३४ ऐकायास. ३५ विषयांतराचें वर्णन. ३६ सोडून. ३७ कथेचा संबंध. ३८ नाश. ३९ अवघड. ४० शोधितां. ४१ न सांपडे. ४२ अनुकूलतेनें. ४३ बोलण्यापलीकडचें.

जरी फावे । तरी आणिकें काय करावें । कथा सांगें ॥ ६८ ॥ हा [1]आर्तिविशेष श्रोतयांचा । जाणोनि दास निवृत्तीचा । ह्मणे संवाद दोघांचा । परिसोनि परिसा ॥ ६९ ॥ मग श्रीकृष्ण ह्मणे पार्थातें । आतां [3]प्राप्ताचें चिन्ह पुरतें । सांगेन तुज निरुतें । चित्त देईं ॥ ७० ॥

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**आयुक्तः कामकारेण फले सक्तो निबद्ध्यते ॥ १२ ॥**

तरी [5]आत्मयोगें आथिला । जो कर्मफळाशीं विटला । तो घर रिघोनि वरिला । शांती जगीं ॥ ७१ ॥ येर कर्मबंधें किरीटी । अभिलाषाचिया गांठीं । कळासला खुंटी । फळभोगाच्या ॥ ७२ ॥

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽस्ते सुखं वशी ।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥**

जैसा फळाचिये [1]हांवे । तैसें कर्म करी आघवें । मग न कीजेचि येणें भावें । उपेक्षी जो ॥ ७३ ॥ तो जयाकडे [11]वास पाहे । तेउती सुखाची सृष्टि होये । तो ह्मणे तेथ राहे । महाबोध ॥ ७४ ॥ नवद्वार देहीं । तो असतचि परि नाहीं । करितचि न करी कांहीं । [14]फळत्यागी ॥ ७५ ॥

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥**

जैसा कां सर्वेश्वर । [15]पाहिजे तंव निर्व्यापार । परि तोचि रची विस्तार । त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥ आणि कर्ता ऐसें [16]ह्मणिपे । तरी कवणें कर्मीं न [18]लिंपे । जे हातपावो न लिंपे । उदासवृत्तीच्या ॥ ७७ ॥ योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणा [20]सळु न घडे । परि महाभूतांचें [21]दळवाडें । उभारी भलें ॥७८॥ जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा [22]केहीं नोहे । जगचि हें होय जाये । तो शुद्धीही नेणे ॥ ७९ ॥

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ १५ ॥**

पापपुण्यें अशेषें । [23]पासींचि असतु न देखे । आणि [24]साक्षीही होऊं न [25]ठाके । येरीं

१ स्पष्ट होतें. २ इच्छाविशेष. ३ योग्याचें. ४ खरें. ५ आत्मज्ञानानें. ६ पूर्ण झाला. ७ शांतीनें. ८ फलाची इच्छा. ९ खिळला, बद्ध केला. १० आशेनें. ११ सर्व. १२ मार्ग. १३ तेवढी. १४ निरपेक्ष. १५ पाहावा. १६ अकर्ता. १७ ह्मणावा. १८ लिप्त होत नाहीं. १९ पाय. २० छल, अभिमान. २१ समुदाय. २२ कधीं. २३ जवळ असतांही. २४ द्रष्टा, पाहणारा. २५ राहे.

ोटी कायसी ॥ ८० ॥ पैं मूर्तीचेनि मेळें । तो मूर्तचि होऊनि खेळे । परि अमूर्तपण न ळे[3] । सावुल्याचें ॥ ८१ ॥ तो सृजी पाळी संहारी । ऐसें बोलती जें चराचरीं । तें अज्ञान । अवधारीं । पंडुकुमरा ॥ ८२ ॥

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥**

तें अज्ञान जैं समूळ तुटे । तैं भ्रांतीचें मैसेरें फिटे । मग अकर्तृत्व प्रकटे । मज ईश्वराचें ८३ ॥ एथ ईश्वर एक अकर्ता । ऐसें मानलें जरी चित्ता । आणि तोचि मी हें स्वभावता । ादीचि आहे ॥ ८४ ॥ ऐसेनि विवेकें उदो चित्तीं । तयासि भेद कैंचा त्रिजगतीं । देखे ापुलिया प्रतीती । जगचि मुक्त ॥ ८५ ॥ जैसी पूर्वदिशेच्या राउळीं । उदया येतांचि र्य दिवाळी । कीं येरीही दिशां तियेचि काळीं । काळिमा नाहीं ॥ ८६ ॥

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**
**गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥**

बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी आपणा आपण । ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । त्परायण अहर्निशीं ॥ ८७ ॥ ऐसें व्यापक ज्ञान भलें । जयांचिया हृदया गिव- तें आलें । तयांची समतादृष्टि बोलें । [18]विशेषूं काई ॥ ८८ ॥ एक आपणपेंचि जैसें । देखती विश्व तैसें । हें बोलणें कायसें । नवल एथ ॥ ८९ ॥ परी दैव जैसें कौतिकें । हींचि दैन्य न देखे । कां विवेक हा नोळखे । भ्रांतीतें जेवीं ॥ ९० ॥ ना तरी अंधका- ाची वार्ता । जैसा सूर्य न देखे स्वप्नीं । अमृत नायके कानीं । मृत्युकथा ॥ ९१ ॥ हें सो संताप कैसा । चंद्र न स्मरे जैसा । भूतीं भेद नेणती तैसा । ज्ञानिये ते ॥ ९२ ॥

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**

मग हा मशकु हा गज । कीं श्वपच हा द्विज । पैलें इतर हा आत्मज । हें उरलें कें ९३ ॥ ना तरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन । हें असो कैचें स्वप्न । जागतया

---

१ आकार, देही. २ निराकार. ३ बिघडत नाहीं. ४ प्रभूचें. ५ उत्पन्न करी. ६ अंधकार, काजळी. ७ अकर्तेपणा. ८ उदय. ९ अनुभवानें. १० घरीं. ११ उजाळी. १२ अंधार. १३ मानी. १४ त्याच्याच मार्गे लागलेला, तोच अभ्यास करणारा. १५ रात्रंदिवस. १६ शोधीत. १७ अभेद- दृष्टी. १८ विशेषेंकरून सांगूं. १९ स्वतः आपण. २० कौतुकानें. २१ लाचारी. २२ नमुना. २३ डास. २४ माशी. २५ अंत्यज. २६ पलीकडचा. २७ कोठें. २८ थोर. २९ जागृताला.

॥ १४ ॥ एथ भेद तरी कीं देखावा । जरी अहंभाव[1] उरला होआवा[2] । तो आधींचि नाहीं आघवा[3] । आतां विषम[4] काई ॥ १५ ॥

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥**

ह्मणोनि सर्वत्र सदा सम[5] । तें आपणचि अद्वय[6] ब्रह्म । हें संपूर्ण जाणें[7] वर्म । समदृष्टीचें ॥ १६ ॥ जिहीं विषयसंग[8] न सांडितां । इंद्रियांतें न दंडितां । परि भोगिली निःसंगता[9] । कामनेविण ॥ १७ ॥ जिहीं लोकांचेनि आधारें । लौकिकेंचि[10] व्यापारें । परि सांडिलें निदसुरें[11] । लौकिक हें ॥ १८ ॥ जैसा जनामाजि खेचर[12] । असतुचि[13] जना नव्हे गोचर[14] । तैसा शरीरीं परि संसार । नोळखे तयातें ॥ १९ ॥ हें असो पवनाचेनि[15] मेळें । जैसें जळींचि जळ लोळे । ते आणिकें ह्मणती वेगळें । कल्लोळ[16] हे ॥ १०० ॥ जैसें नाम रूप तयाचें । येऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें[17] । मन साम्या[18] आलें जयाचें । सर्वत्र गा ॥ १ ॥ ऐसेनि समदृष्टी जो होये । तया पुरुषा लक्षणही आहे । अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें । अच्युत ह्मणे ॥ २ ॥

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाऽप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥**

तरी मृगजळाचेनि पूरें । जैसें न लोटिजे कां [19]गिरिवरें । तैसा शुभाशुभीं न विकरे[20] । पातलिया[21] जो ॥ ३ ॥ तोचि तो निरुता[22] । समदृष्टि तत्त्वता । हरी ह्मणे पंडुसुता । तोचि ब्रह्म ॥ ४ ॥

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥**

जया आपणपें[23] सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरि[24] येणें नाहीं । तो विषय न सेवी हें काई । विचित्र[25] येथ ॥ ५ ॥ सहजें स्वसुखाचेनि अपारें[26] । सुरवाडलेनि[27] [28]अंतरें । रचिला ह्मणऊनि बाहिरें । पाउल न घेली[29] ॥ ६ ॥ सांगें कुमुददळाचेनि[30] ताटें । जो जेविला चंद्रकिरणें

---

१ मीपणा. २ व्हावा. ३ सर्व. ४ भिन्न, विरुद्ध. ५ अविकारी. ६ अद्वितीय. ७ जाण. ८ विषयाची इच्छा. ९ संगरहितपणा. १० व्यावहारिक. ११ अज्ञानी, मूढ. १२ भूत, समंध. १३ असून. १४ दिसत नाहीं. १५ वायूच्या. १६ तरंग, लाटा. १७ साक्षात्. १८ समतेला. १९ डोंगर. २० विकार पावत नाहीं. २१ प्राप्त झाला असतां. २२ खरा. २३ आपले स्वरूपास. २४ इंद्रियसमुदाय. २५ चमत्कारिक. २६ अमर्याद. २७ सुख पावलेल्या. २८ मनानें. २९ घाली. ३० चंद्रविकासी कमल.

ोखटें । तो चकोर काय वाळुवंटें । चुंबित असे ॥ ७ ॥ तैसें आत्मसुख उपाइलें ।
यासि आपणपेंचि फावलें । तया विषय सहज सांडवले । ह्मणों काई ॥ ८ ॥ येऱ्हवीं
री कौतुकें । विचारूनि पाहें पां निकें । या विषया वेनि सुखें । हे कवि जती कवण ॥ ९ ॥

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥**

जिहीं आपणपें नाहीं देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले । जैसें रंकें कां भुकेलें ।
ुषातें सेवी[१२] ॥ ११० ॥ नातरी मृगें तृषापीडितें । संभ्रमें[१५] विसरोनि जळातें । मग
ार्येंबुद्धी बरडीतें । टाकूनि येती ॥ ११ ॥ तैसें आपणपें नाहीं [१८]दिठे । जयातें स्वसु-
ाचें सदा खरांटें । तयासीचि विषय हे [२०]गोमटे । आवडती ॥ १२ ॥ येऱ्हवीं विषयीं सुख
ाहे । हें बोलणेंचि सारिखें नोहे । तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे । जगामाजीं ॥ १३ ॥
ागें वातवर्ष आतपधेरे । ऐसें अभ्रच्छायाचि जरी सरे । तरी त्रिमाळिके धवळारें ।
करावीं कां ॥ १४ ॥ ह्मणोनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणतां गा वायां जल्पिजे । जैसें
ाहुर कां ह्मणिजे । विषकंदातें ॥ १५ ॥ ना तरी भौमीं नाम मंगळ । रोहिणीतें[३१] ह्मणती
ाळ । तैसा सुखप्रवाद बरळ । विषयिक हा ॥ १६ ॥ हें असो ओषधी बोली । सांग पां
र्पफणीची साउली । ते शीतळ होईल केतुली । मूषिकासी ॥ १७ ॥ जैसा आमिषकवळ
ांडवा । मीनें न सेवी तंवचि बरवा । तैसा विषयसंग आघवा । निभ्रांत जाणें ॥ १८ ॥
विरक्तांचिये दृष्टी । जें ग्राहाळिजे किरीटी । तें पांडुरोगाचिये पुष्टी । सारिखें दिसे
। १९ ॥ ह्मणोनि विषयभोगीं जें सुख । तें साद्यंतचि जाण दुःख । परि काय करिती
ूर्ख । न सेवितां नेसरे ॥ १२० ॥ तें अंतरें नेणती बापुडे । ह्मणोनि अगत्य सेवणें घडे ।
ागें पूयपंकींचे किडे । काय चिळसी घेती ॥ २१ ॥ तयां दुःखियां दुःखचि जिव्हार ।
विषयकर्दमींचे दर्दुर । ते भोगजळींचे जळचर । सांडिती केवीं ॥ २२ ॥ आणि

१ चांगली. २ वाळवंट. ३ उत्पन्न झालें. ४ प्राप्त झालें. ५ फसती. ६ स्वस्वरूप. ७ इंद्रिय-सुखांत. ८ सुखावले. ९ दरिद्री. १० भुकेलें. ११ कोंडयाला. १२ खातात. १३ अथवा. १४ ताहानेलीं. १५ भ्रमानें. १६ पाणी असें मानून. १७ माळ जमीनीवर. १८ अनुभवलें. १९ शेतांतील कापलेल्या धाटांचे जमिनींतील खुंट. २० सुंदर. २१ योग्य. २२ विजेच्या चमक-ण्यानें. २३ वायु, पाऊस आणि ऊन निवारण होईल. २४ ढगेंकरून. २५ कार्य होईल. २६ तीन मजली चुनेगच्ची घरें. २७ बडबडावें. २८ मधुर. २९ बचनागास. ३० मंगळ ग्रह. ३१ मृग-जळास. ३२ उपभोगांत सुख आहे हें बोलणें. ३३ व्यर्थ. ३४ सर्प. ३५ किती. ३६ उंदरास. ३७ मांसाचा घांस. ३८ मत्स्य. ३९ निःसंशय. ४० वैराग्यवानाच्या. ४१ पाहावें. ४२ भर. ४३ मुळापासून अखेरपर्यंत. ४४ चालत नाहीं. ४५ यांचें गुख. ४६ पुवाच्या चिखलांतील. ४७ कंटाळा, किळस. ४८ जीवाचें सुख, जिव्हाळा. ४९ विषयरूप घाणींतले. ५० बेडूक. ५१ मासे.

दुःखयोनी जिया आहती । तिया निरर्थका तरी नव्हती । जरी विषयांवरी विरक्ती । विसाँ[2]-धरिती जीव ॥ २३ ॥ ना तरी गर्भवासादि संकट । कां जन्ममरणींचे कष्ट । हे विसांवेवीण वाट । [3]वाहवी कवणें ॥ २४ ॥ जरी वि[4]षयीं विषयो सांडिजेल । तरी महादोषीं कें[5] वसिजेल । आणि संसार हा शब्द न[6]व्हेल । लटिका जगीं ॥ २५ ॥ म्हणोनि अवि[7]-द्याजात नाथिलें । तें तिहींचि सा[9]च राविलें । जिहीं सुखबुद्धी घेतलें । विषयदुःख ॥ २६ ॥ यालागीं[?] कारणें गा सुभटा । हा विचारितां विषय वोखटा । तूं [13]झणें कोंही[12] या वाटा । विसं-[11]रोनि जाशी ॥ २७ ॥ पैं[14] यातें विरक्त पुरुष । त्यजिती कां जैसें विष । निराशा तयां दुःख । हाविलें नावडे ॥ २८ ॥

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

ज्ञानियांच्या हें[15] ठायीं । याची मातही[16] कीर[17] नाहीं । देहीं देहभाव जिहीं । स्वैंवश[18] केले ॥ २९ ॥ जयांतें बा[19]ह्याची भाष । नेणिजेचि निःशेष । अंतरीं सुख । एक आथि ॥ १३० ॥ परि तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे । तैसें नव्हे तेथ विस-रिजे । भोगितेपणही ॥ ३१ ॥ भोगीं अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अं[21]चळ [22]लोटी । मग सुखेंसि घे [23]आंठी । गाढेपणें[24] ॥ ३२ ॥ तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप [25]कैवळी । तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥ ३३ ॥ कां आकाशीं वा[26]यो हरपे । तेथ दोन्ही[27] हे भा[28]ष लोपे । तैसें सुखचि उरे स्वरूपें । सुरती[29] तिये ॥ ३४ ॥ ऐसी द्वैताची भा[28]ष जाय । मग म्हणों जरी एकचि होय । तरी तेथ साक्षी कवण आहे । जाणतें जें ॥ ३५ ॥

योऽतःसुखोऽतरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥

लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।
छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥

म्हणोनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें । ते खुणाचि पावेल स्वभावें ।

---

१ ज्या आहेत. २ विश्रांतीवांचून. ३ चालावी. ४ विषयासक्तांनीं. ५ कोण. ६ होणार नाहीं काय? ७ सर्वअज्ञान. ८ लटकें. ९ खरें. १० वाईट. ११ कदाचित्. १२ कधीं. १३ चुकून. १४ परंतु. १५ समुच्चयार्थक अव्यय. १६ वार्ताही. १७ निश्चयें. १८ आपल्या स्वाधीन. १९ विषयाचा भास. २० आहे. २१ पदर, पडदा. २२ सोडी. २३ आलिंगन. २४ दृढतेनें. २५ एकवटपण. २६ वाव, अवकाश. २७ निराळेपणाची. २८ बोलणें. २९ ऐक्यपणांत.

आत्माराम ॥ ३६ ॥ जे ऐसेनि सुखें मातले[1] । आपणपांचि[2] आपण राहिले । ते मी जाणें[3] निखिळ[4] वोतले । सामरस्याचे[5] ॥ ३७ ॥ ते आनंदाचे अनुकार[6] । सुखाचे अंकुर । कीं महाबोधें विहार[7] । केले जैसे ॥ ३८ ॥ ते विवेकाचे गांव । कीं परब्रह्मींचे स्वभाव । ना तरी अळंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे[8] ॥ ३९ ॥ ते सत्वाचे सात्विक । कीं चैतन्याचे[9] आंगिक[10] । हें बहु असो एकैक । वानिसी[11] काई ॥ १४० ॥ तूं संतस्तवनीं रतसी[12] । तरी कथेची से[13] न करिसी । कीं निराळीं[14] बोल देखसी । सैनागर[15] ॥ ४१ ॥ परि तो रसातिशयो[16] मुकुळीं[17] । मग ग्रंथार्थदीप उजळीं । करीं साधुहृदयराउळीं[18] । मंगळ[19] उखा[20] ॥ ४२ ॥ ऐसा गुरूचा उवायिला[21] । निवृत्तिदासासी पातला । मग तो ह्मणे कृष्ण बोलिला । तेंचि आइका ॥ ४३ ॥ अर्जुना अनंतसुखाच्या डोहीं । एकसरां[22] तळींचि[23] घेतला जिहीं । मग थिरोऊनि[24] तेही । तेंचि जाहाले ॥ ४४ ॥ अथवा आत्मप्रकाशें चोखें[25] । जो आपणपेंचि[26] विश्व देखे । तो देहेंचि परब्रह्म सुखें । मानूं येईल ॥ ४५ ॥ जें साचोकारें[27] परम । ना तें अक्षर[28] निःसीम[29] । जिये गांवींचे निष्काम[30] । अधिकारिये ॥ ४६ ॥ जें महर्षी वाढलें । विरक्तां[31] भागा फिटलें । जें निःसंशया पिकलें । निरंतर ॥ ४७ ॥

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥**

जिहीं विषयांपासोनि हिरतलें[32] । चित्त आपुलें आपण जिंतिलें[33] । ते निश्चित जेथ सुतले[34] । चेतीचिना[35] ॥ ४८ ॥ तें परब्रह्म निर्वाण[36] । जें आत्मविदांचें[37] कारण । तेंचि ते पुरुष जाण । पंडुकुमरा ॥ ४९ ॥ ते ऐसे कैसेनि जाहाले । जे देहींचि ब्रह्मत्वा आले । हें पुससी तरी भलें । संक्षेपें सांगों ॥ १५० ॥

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥**

तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय दवडुनि[38] बाहिरें । शरीरीं एकदरें[39] । केलें मन

---

१ माजले. २ स्वस्वरूपानें. ३ मी समजतों. ४ निखालस, सर्व. ५ ब्राह्मानंदाचे. ६ आकार. ७ क्रीडास्थान. ८ आत्मज्ञानाचे. ९ जीवात्म्याचे. १० शरीरावयव. ११ वर्णन करिसी. १२ रमसी. १३ आठवण. १४ निर्गुणविषयांत; निरालंबीं. १५ अति चांगले, प्रेमयुक्त. १६ रसाचा अतिशयपणा. १७ संक्षिप्त कर, आटप. १८ हृदयमंदिरांत. १९ कल्याणाचा. २० उदय. २१ प्रसन्नपणा. २२ ऐक्यतेनें. २२ बुडी. २४ स्थीर होऊन. २५ चांगल्या. २६ आपणच, स्वतःच. २७ खरेपणानें. २८ अविनाशी. २९ निश्चयेंकरून. ३० निरिच्छ. ३१ विरक्तांच्या हिस्शास आले. ३२ हिरावून घेतलें. ३३ जिंकलें. ३४ निजले. ३५ जागे होत नाहींत. ३६ कैवल्यपद. ३७ आत्मज्ञान्यांचें ३८ बाहेर घालवून. ३९ एकनिष्ठ.

॥ ५१ ॥ सहजें तिहीं[1] संधी भेटी । जेथ भ्रूपल्लवा[2] पडे गांठी । तेथ पाठिमोरी दिठी[3] । पारुखोनियां[4] ॥ ५२ ॥ सांडूनि दक्षिण वाम । प्राणापानसम । चित्तेंसी व्योमें । गामिये[5] करिती ॥ ५३ ॥

यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥

तेथ जैसीं रथ्योदकें[7] सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे । मग एकैक वेगळें । निवडूं नये ॥ ५४ ॥ तैसी वासनांतराची[8] विवंचना[9] । मग आपैसी[10] पारुखे अर्जुना । जे वेळीं गगनीं लयो मना । पवनें[12] कीजे ॥ ५५ ॥ जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूप पेटे फाटे । जैसें सरोवर आटे । मग प्रतिभे[14] नाहीं ॥ ५६ ॥ तैसें मन एथ मुदल जाय । मग अहंभावादिक कें[15] आहे । ह्मणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥ ५७ ॥

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥

इति श्रीमद्भगवद्गीता सूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
संन्यासयोगो नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

आह्मी मागां हें[16] सांगितलें । जे देहींचि ब्रह्मत्व पावले । ते येणें मार्गें आले । ह्मणऊनियां ॥ ५८ ॥ आणि यमनियमांचे[17] डोंगर । अभ्यासाचे सागर । क्रमोनि हे पार । पातले ते ॥ ५९ ॥ तिहीं आपणपें[18] करूनि निर्लेप[19] । प्रपंचाचें घेतलें माप । मग सोंग[20] शांतीचें चित्स्वरूप[21] । होऊनि ठेले ॥ १६० ॥ ऐसा योगयुक्तीचा उद्देशें[22] । जेथ बोलिला हृषीकेश । तेथ अर्जुन सुदेश[23] । ह्मणोनि चमत्कारिला[24] ॥ ६१ ॥ तें देखिलियां[25] कृष्णें जाणितलें । मग हांसोनि पार्थातें ह्मणितलें । काइ पां चित्त उबाइलें[26] । इये बोलीं तुझें ॥ ६२ ॥ तंव अर्जुन ह्मणे देवो । परचित्तलक्षणाचा[27] रावो[28] । भला जाणितला जी भावो । मानस माझा ॥ ६३ ॥ ह्यां जें कांहीं विवरूनि[29] पुसावें । तें आधींचि जाणितलें देवें । तरी बोलिलें तेंचि सांगावें । विवळ[30] करूनि ॥ ६४ ॥ येऱ्हवीं तरी अवधारा । जो दाविला तुह्मी अनुसारा । तो पैहत[31]-

---

१ इडा, पिंगला व सुषुम्ना या तिहींची जेथें भेट होते. २ डोळ्यांच्या पापण्यांची. ३ दृष्टि. ४ माघारी राहून, ठेवून. ५ उजवें डावें. ६ आकाशांत जाणारे. ७ रस्त्यावरील उदकें. ८ इतर इच्छेची. ९ विचार. १० आपोआप. ११ राहे. १२ वायूनें. १३ वक्र. १४ प्रतिबिंब. १५ कोठें. १६ सर्व. १७ यम, नियम, आसन, धारणादिक योगमार्गाचे. १८ आपलें, आपणास. १९ उपाधि-रहित. २० खरें. २१ जीव, चिच्छक्ति. २२ अभिप्राय. २३ मार्मिक, ज्ञाता. २४ चमत्कार पावला २५ पाहतांच. २६ प्रसन्न झालें. २७ दुसऱ्याच्या मनोगताचा. २८ जाणणारा. २९ विचार करून. ३० स्पष्ट, विस्तार. ३१ ऐका. ३२ मार्ग. ३३ खोल पाण्यांत पोंहून जाण्यापेक्षां पायउतारा सोपा.

ण्याहूनि पायउतारा। सोहपा जैसा ॥ ६५ ॥ तैसा सांख्याहूनि प्रांजळा[1]। आह्मासारिखिया अबळां[2]। एथ आहे कांहीं पैं[3]काळा। तो साहों ये वर ॥ ६६ ॥ ह्मणोनि एक वेळ देवा। तोचि पेंडताळा[4] घेयावा। विस्तारिल तरी सांगावा। सोद्यंतचि[5] ॥ ६७ ॥ तंव श्रीकृष्ण ह्मणती होकां। तुज हा मार्ग गमला निका[6]। तरी काय जाहलें आइकीं जो कां। सुखें बोलों ॥ ६८ ॥ अर्जुना तूं परिससी। परिसोनि अनुष्ठिसी[7]। तरी आह्मासीचि वाणि[8] कायसी। सांगावयाची ॥ ६९ ॥ आधींच चित्त मायेचें[9]। वरी मिषें[10] जाहालें पढियंतयाचें[11]। आतां तें अद्भुतपण स्नेहाचें। कवण जाणे ॥ १७० ॥ ते ह्मणे कारुण्यरसाची वृष्टी। कीं नवेया[12] स्नेहाची सृष्टी। हें असो नेणिजे दृष्टी। हरीची वानूं[13] ॥ ७१ ॥ जे अमृताची वोतली। कीं प्रेमचि पिऊन मातली। ह्मणोनि अर्जुनमोहें गुंतली। निघों नेणें ॥ ७२ ॥ हें बहु जें जें जल्पिजेल[14]। तेथें कथेसि फांकें[15] होईल। परि तें स्नेहरूपा न येल। बोलवरी[16] ॥ ७३ ॥ ह्मणोनि विसुरा काय येणें। तो ईश्वर कवळावा कवणें। जो आपुलें मान[17] नेणे। आपणचि ॥ ७४ ॥ तरी मागील ध्वनी[18]अतां। मज गमला सावियाचि[19] मोहितें[20]। जे बळात्कारें असे ह्मणत। परिस बापा ॥ ७५ ॥ अर्जुना जेणे जेणें भेदें[21]। तुझें फां चित्त बोधे। तैसें तैसें विनोदें[22]। निरूपिजेल ॥ ७६ ॥ तो कोइसया[23] नांव योग। तयाचा कवण उपेग[24]। अथवा अधिकारप्रसंग। कवणा एथ ॥ ७७ ॥ ऐसें जें जें कांहीं। उक्त[25] असे इये ठाईं। तें आघवेंचि[26] पाहीं। सांगेन आतां ॥ ७८ ॥ तूं चित्त देऊनि अवधारीं। ऐसें ह्मणोनि श्रीहरी। बोलिजेल ते पुढारी[27]। कथा आहे ॥ ७९ ॥ श्रीकृष्ण अर्जुनासीं संगें[28]। न सांडोनि सांगेल योग। तो व्यक्त[29] करूं प्रसंग। ह्मणे निवृत्तिदास ॥ १८० ॥

इति श्रीज्ञानदेवकृतायां भावार्थदीपिकायां पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

श्लोक २९, ओव्या १८०.

---

## अध्याय ६ वा.

मग रायातें[30] संजयो ह्मणे जो। तोचि अभिप्राय अवधारिजो। श्रीकृष्ण सांगती आतां जो। योगरूप[31] ॥ १ ॥ सहजें ब्रह्मरसाचें पैंगुणें[32]। केलें अर्जुनालागीं नारायणें। कीं तेचि अवसरीं[33] पाहुणे। पातलों आह्मी ॥ २ ॥ कैसी दैवाची थोरी[34] नेणिजे। जैसें

---

१ सुगम. २ निर्बळांला. ३ परंतु कांहीं काळानें. ४ अनुभव. ५ आरंभापासून शेवटपर्यंत. ६ चांगला. ७ आचरसी. ८ न्यूनता. ९ ममतेचें. १० निमित्त. ११ आवडत्याचें. १२ नवीन लग्नाचीं मुलें. १३ वर्णन करूं. १४ बोलवेल. १५ विस्तार. १६ आश्चर्य. १७ प्रमाण. १८ सूचित अभिप्राय. १९ सहज, अकस्मात्. २० वश झालेला. २१ प्रकारें. २२ कौतुकानें. २३ काय नांवाचा. २४ उपयोग. २५ सांगितलेलें. २६ सर्व. २७ पुढें. २८ सहवास. २९ स्पष्ट. ३० धृतराष्ट्राला. ३१ आत्मज्ञानरूप. ३२ मेजवानी, भोजन. ३३ प्रसंगीं. ३४ महत्व.

तान्हेलिया तोय[1] सेविजे । कीं तेंचि चवी[2] करूनि पाहिजे । तंव अमृत आहे ॥ ३ ॥ तैसें आह्मा तुह्मा जाहालें । जें [3]आडमुठी [4]तत्त्व फावलें । तंव धृतराष्ट्रें ह्मणितलें । हें न पुसों तूतें ॥ ४ ॥ तया संजया येणें बोलें । रायाचें हृदय चोजवलें । जे [7]अवसरीं आहे घेतलें । [8]कुमरांचिया ॥ ५ ॥ हें जाणोनि मनीं हांसिला । ह्मणे ह्मातारा [9]मोहें नाशिला । येऱ्हवीं बोलें[10] तरीं भला जाहाला । अवसरीं इये ॥ ६ ॥ परि तें तैसें कैसेनि होइल । [11]जात्यंधा कैसें [12]पाहेल । तेवींचि येरू[13] रोषें[14] घेइल । ह्मणोनि बिहे[15] ॥ ७ ॥ परि आपण चित्तीं आपुला । निकियापरि[16] संतोषला । जे तो संवादें[17] फावला । श्रीकृष्णार्जुनाचा ॥ ८ ॥ तेणें आनंदाचेनि [18]धालेपणें । [19]साभिप्राय अंतःकरणें । आतां आदरेसीं बोलणें । घडेल तया ॥ ९ ॥ तो गीतेमाजि षष्ठांचीं[20] । प्रसंग असे [21]आयणीचा । जैसा क्षीरार्णवीं अमृताचा । निवाड जाहाला ॥ १० ॥ तैसें गीतार्थाचें सार । जें विवेकसिंधूचें पार[22] । [23]नाना योगवि[24]भवभांडार । उघडलें कां ॥ ११ ॥ जें [25]आदिप्रकृतीचें वि[26]सवणें । जें श[27]ब्दब्रह्मासि न बोलणें । जेथूनि गी[28]तावल्लीचें [29]ठाणें । प्ररोहो[30] पावे ॥ १२ ॥ तो अध्याय साहावा । वारे [31]साहित्याचिया बरवा । सांगिजेल ह्मणोनि परिसावा । चित्त देउनी ॥ १३ ॥ माझा [32]मऱ्हाठाचि बोल कौतुकें । परि अमृतातेंही पैजा[33] जिंके । ऐसीं अक्षरें रसिकें[34] । मेळवीन ॥ १४ ॥ जिये कोवळिकेचेनि[35] पाडें । दिसती नादीं[36]चे रंग थोडे । [37]वेधें परिमळाचें[38] बीकें[39] मोडे । जयाचेनि ॥ १५ ॥ ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं [40]श्रवणाचि होती जिभा । बोलें इंद्रियां लागे कळंभी[41] । एकमेकां ॥ १६ ॥ सहजें शब्द तरी [42]विषो श्रवणाचा । परि र[43]सना ह्मणे रस हा आमुचा । घ्राणा[44]सि भाव[45] जाय परिमळाचा । हा [46]तोचि होईल ॥ १७ ॥ नवल बोलतीये [47]रेखेची वाहाणी[48] । देखतां डोळा पुरों लागे धणी[49] । ते ह्मणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ १८ ॥ जेथ संपूर्ण पदें[50] उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें । बोलें[51] भुजाही आविष्करे । आलिंगा-

---

१ पाणी. २ चाखून. ३ अनायासें. ४ आत्मज्ञान. ५ प्राप्त झालें. ६ समजलें. ७ बाधेनें, संचारानें. ८ मुलांच्या. ९ पुत्रवात्सल्यानें. १० कृष्णार्जुनाचें भाषण. ११ जन्मांधाला. १२ दिसेल. १३ हा. १४ कोपेल. १५ भय पावे. १६ चांगल्या रीतीनें. १७ भाषणाचें सुख. १८ तृप्तीनें. १९ मनांतल्या अर्थासह. २० सहाव्या अध्यायांतील. २१ तत्वनिर्णयाचा. २२ पैलथडी. २३ अनेक. २४ योगसंपत्तीचा जामदारखाना. २५ आदिमायेचें. २६ विश्रांतिस्थान. २७ वेदाला. २८ गीतारूप वेलीचें. २९ ठिकाण. ३० अंकुर. ३१ अलंकारें करून भरलेला. ३२ साधा. ३३ प्रतिज्ञेनें. ३४ मधुर. ३५ मृदुतेच्या बरोबरीनें. ३६ सतसुरांचे. ३७ छंदें. ३८ सुगंधाचें. ३९ बळ. ४० कान. ४१ कलह. ४२ विषय. ४३ जिव्हा. ४४ नाक. ४५ वास. ४६ तो बोल परिमळच होईल. ४७ अक्षरांची; कवित्वाची. ४८ पद्धत, सराणि. ४९ तृप्ति. ५० अर्थावबोधक शब्द अथवा वाक्य. ५१ मन आवेशानें बाहु उभारून बोलास आलिंगावयास धांवतें.

वया ॥ १९ ॥ ऐसीं इंद्रियें आपुलालिया भावीं[1] । झोंबती परि तो सरिसेपणेंचि[2] बुझावी[3] । जैसा एकला जग चेववी[4] । सहस्रकर[5] ॥ २० ॥ तैसें शब्दाचें व्यापकपण[6] । देखिजे असाधारण । पाहातयां भावज्ञां[7] फावती[8] गुण । चिंतामणीचे[9] ॥ २१ ॥ हें असो तयां बोलांचीं ताटें भलीं । वरी कैवल्यरसें[10] वाढलीं[11] । ही प्रतिपत्ति[12] मियां केली । निष्कामासी[13] ॥ २२ ॥ आतां आत्मप्रभा[14] नित्य नवी । तेचि करूनि ठाणदिवी[15] । जो इंद्रियांतें चोरूनि जेवी । तयासीचि फावे[16] ॥ २३ ॥ तेथ श्रवणाचेनि पांगें[17] । वीण श्रोतयां व्हावें लागे । हे मनाचेनि निजांगें । भोगिजे गा ॥ २४ ॥ अहांच[18] बोलाची वालीफ[19] फेडिजे । आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे[20] । मग सुखेंसीं सुरवाडिजे[21] । सुखाचिमाजि ॥ २५ ॥ ऐसें हळुवारपण[22] जरी येइल । तरीच हें उपेगा[23] जाइल । येऱ्हवीं आघवी[24] गोष्टी होइल । मुकयां बहिरयांची ॥ २६ ॥ परि तें असो आतां आघवें[24] । नलगे श्रोतयांतें कडसावें[25] । जे अधिकारिये एथ स्वभावें । निष्कामकाम ॥ २७ ॥ जिहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची[26] कुरोंडी[27] । तेवांचूनि एथिंची गोडी । नेणती आणिक ॥ २८ ॥ जैसा वायसीं[28] चंद्र नोळखिजे । तैसा प्राकृतीं[29] ग्रंथ हा नेणिजे । आणि तो हिमांशुचि[30] जैसें खाजें[31] । चकोराचें ॥ २९ ॥ तैसा सज्ञानासी[32] तरी हा ठावो । आणि अज्ञानासी[33] आन गावो । म्हणोनि बोलावया विषय पहाहो । विशेष नाहीं ॥ ३० ॥ परि अनुवादलों[34] मी प्रसंगें । तें सज्जनीं उपसहावें[35] लागे । आतां सांगेन काय श्रीरंगें । निरोपिलें जें ॥ ३१ ॥ तें बुद्धीही आकळितां सांकडें[36] । म्हणऊनि बोलीं विपायें[37] सांपडे । परि श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखेन मी ॥ ३२ ॥ जें दिठीही[38] न पविजे । तें दिठीवीण देखिजे । जरी अतींद्रिय[39] लाहिजे[40] । ज्ञानबळ[41] ॥ ३३ ॥ नातरी जें धातुवादाही[42] न जोडे । तें लोहींचि[43] पंधरें[44] सांपडे । जरी दैवयोगें चडे[45] । परिस हाता ॥ ३४ ॥ तैसी सद्गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु[46] नोहे । म्हणऊनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेव म्हणे ॥ ३५ ॥ तेणें कारणें मीं बोलेन । बोलीं[47] अरूपाचें रूप दावीन । अतींद्रियें[48] परि भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥ ३६ ॥ आइका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य । हे साही गुणवर्य । वसती जेथ ॥ ३७ ॥

---

१ विषयाच्यां ठायीं. २ ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें. ३ बोध करी. ४ जागवी, प्रकाशवी. ५ सूर्य. ६ विशेष प्रकारेंकरून. ७ अर्थ जाणणारांस. ८ आढळती. ९ इच्छित देणाऱ्याचे. १० मोक्षरसानें. ११ वाढली. १२ मेजवानी, ग्रंथरचना. १३ निरिच्छांसी. १४ आत्मज्योति. १५ ठाण (स्थान) दाखविणारा दिवा. १६ लाभे. १७ गरजेवांचून. १८ ह्याच. १९ आच्छादन, गवसणी. २० व्हावे. २१ सुख भोगावे. २२ नाजूकपणा. २३ उपयोगास. २४ सर्व. २५ सावध करावें. २६ इहपर. २७ ओवाळणी. २८ कावळे. २९ साधारण. ३० चंद्र. ३१ खाद्य. ३२ बुद्धिमंतासीं. ३३ अन्य. ३४ बोललों. ३५ क्षमा करावें. ३६ कठीण. ३७ कष्टानें. ३८ दृष्टीस. ३९ इंद्रियातीत. ४० लाभेल. ४१ ज्ञानाच्या बळानें. ४२ किमयाकरणारास. ४३ लोखंडांत. ४४ सोनें. ४५ मिळे. ४६ प्राप्त. ४७ शब्देंकरून. ४८ इंद्रियास अगम्य.

ह्मणोनि तो भगवंत । जो निःसंगाचा सांगात[1] । तो ह्मणे पार्था दत्तचित्त[2] । होईं आतां ॥ ३८ ॥

**श्रीभगवानुवाच–अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥**

आइकें योगी[3] आणि संन्यासी[4] जनीं । हे एकचि सिनाने[5] ह्मणीं[6] मानीं । येऱ्हवीं विचारिजती जंव दोन्ही । तंव एकचि ते ॥ ३९ ॥ सांडिजे दुजया नामाचा आभास[7] । तरी योग तोचि संन्यास । पाहातां ब्रह्मीं नाहीं अवकाश[8] । दोहींमाजि ॥ ४० ॥ जैसें नामाचेनि अनारिसेपणें[9] । एका पुरुषातें बोलावणें[10] । कां दोहीं मार्गीं जाणें । एकाचि ठाया ॥ ४१ ॥ ना तरी एकचि उदक सहजें । परि सिनाना[11] घटीं भरिजे । तैसें भिन्नत्व जाणिजे । योगसंन्यासाचें ॥ ४२ ॥ आइकें सकळ संमतें जगीं । अर्जुना पाहें तोचि योगी । जो कर्मे करूनि रागी[12] । नोहेचि फळीं ॥ ४३ ॥ जैसी मही[13] हे उद्भिजें[14] । जैनी[15] अहंबुद्धीवीण सहजें । आणि तेथिचीं तियें बीजें । अपेक्षीना[16] ॥ ४४ ॥ तैसा अन्वयाचेनि[17] आधारें । जातीचेनि अनुकारें[18] । जें जेणें अवसरें । करणें पावे ॥ ४५ ॥ तें तैसेंचि उचित करी । परि सांटोप[19] नोहे शरीरीं । आणि बुद्धीही करोनि फळवेरी[20] । जायेचिना ॥ ४६ ॥ ऐसा तोचि संन्यासी । पार्था गा परियेसीं । तोचि भरंवसेनिसीं । योगीश्वर ॥ ४७ ॥ वांचूनि[21] उचित कर्म प्रासंगिक[22] । तयातें ह्मणे हें सांडावें बद्धक[23] । तरी टांकोटांकीं[24] आणिक एक । मांडीचि[25] तो ॥ ४८ ॥ जैसा क्षाळूनियां[26] लेप[27] एक । सवेंचि लाविजे आणिक । तैसेनि आग्रहाचा[28] पाइक[29] । विचंबे[30] वायां ॥ ४९ ॥ गृहस्थाश्रमाचें वोझें । कपाळीं आधींचि आहे सहजें । कीं तेंचि संन्यासें वाढविजे । सरिसें[31] पुढती[32] ॥ ५० ॥ ह्मणूनि अग्निसेवा[33] न सांडितां । कर्माची रेखा[34] नोलांडितां । आहे योगसुख स्वभावता । आपणपांचि[35] ॥ ५१ ॥

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।**
**नह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥**

ऐकें संन्यासी तोचि योगी । ऐसी ऐकवाक्यतेची[36] जगीं । गुढी[37] उभविली अनेगीं[38] ।

---

१ सोबती. २ लक्ष दे. ३ निरिच्छ कर्माचरण करणारे. ४ कर्म त्याग करणारा. ५ वेगळे वेगळे. ६ मानूं नको. ७ आरोप. ८ समावेष. ९ वेगळेपणे. १० हाक मारणें. ११ वेगळे वेगळे कुंभात. १२ फलेच्छा धरून. १३ जमिन. १४ वृक्षादिका. १५ विये, उत्पादी. १६ इच्छित नाहीं. १७ आत्मव्याप्तीच्या. १८ अनुरूप. १९ अहंकारयुक्त. २० फलाच्या आशेपर्यंत. २१ याशिवाय. २२ नैमित्तिक. २३ बाधक. २४ टांकतां टांकतां, लागलाच. २५ उभें किंवा उत्पन्न करितो. २६ धुवून. २७ दोष. २८ हट्टानें करणारा. २९ चाकर. ३० गुटमळतो. ३१ लागलेंच. ३२ पुनः. ३३ श्रौत, स्मार्त होमादि. ३४ मर्यादा. ३५ आपल्या जवळ. ३६ एक अर्थाची. ३७ ध्वजलाविला. ३८ बहुतांनीं.

शास्त्रांतरीं ॥ ५२ ॥ जेथ संन्यासिला संकल्प तुटे । तेथचि योगाचें सार भेटे । ऐसें हें अनुभवाचेनि घेंटे । साचें जया ॥ ५३ ॥

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥**

आतां योगाचळाचा निमथा । जरी ठाकावा आथि पार्था । तरी सोपाना या कर्मपथा । चुका झणीं ॥ ५४ ॥ येणें यमनियमाचेनि तळवटें । रिगे आसनाचिये पाउलवाटे । येई प्राणायामाचेनि आडकाठें । वरौतें गा ॥ ५५ ॥ मग प्रत्याहाराचा अधाडा । जो बुद्धीचियाहि पायां निसरडा । जेथ हटिये सांडिती होडा । कडेलग ॥ ५६ ॥ तरी अभ्यासाचेनि बळें । प्रत्याहारीं निराळें । नखी लागेल ढाळेंढाळें । वैराग्याची ॥ ५७ ॥ ऐसा पवनाचेनि पाठारें । येतां धारणेचेनि पैसारें । क्रमी ध्यानाचें चवरें । सांडे तंव ॥ ५८ ॥ मग तया मार्गाची धांव । पुरेल प्रवृत्तीची हांव । जेथ साध्यसाधना खेंव । समरसें होय ॥ ५९ ॥ जेथ पुढील पैस पारुखे । मागील स्मरावें तें ठाके । ऐसिये सरिसीये भूमिके । समाधि राहे ॥ ६० ॥ येणें उपायें योगारूढ । जो निरवधि जाहाला प्रौढ । तयाचिया चिन्हाचा निर्वाड । सांगेन आइकें ॥ ६१ ॥

**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥**

तरी जयाचिया इंद्रियांचिया घरां । नाहीं विषयांचिया येरझारा । जो आत्मबोधाच्या वोवरां । पहुडला असे ॥ ६२ ॥ जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो

---

१ सोडलेला. २ निश्चयानें, दृढतेनें. ३ खरें. ४ कर्मरूप पर्वताचा. ५ मस्तक. ६ चढावा. ७ आहे. ८ जिन्यास. ९ चुकूं नको. १० कधींही नये. ११ मन आणि इंद्रिय निग्रह. १२ तळाकडून. १३ योगांतील आसनांच्या. १४ सुलभ मार्गानें. १५ प्राणाकर्षण पद्धतीनें. १६ कडयानें. १७ वर. १८ विषयांपासून इंद्रियें रोखणें. १९ मध्यभाग. २० घसरण्याजोगा. २१ हठयोगी. २२ प्रतिज्ञा, पैज. २३ कडेलोट होईल म्हणून. २४ आधाररहित. २५ आश्रय, आधार. २६ हळूहळू. २७ वैराग्येंकरून. २८ पाठबळानें. २९ यमनियमादि गुणयुक्त मनाचे स्थिरतेच्या. ३० मार्गे. ३१ उलंघी. ३२ मनाची एकाग्रता. ३३ शेवट. ३४ चालणें. ३५ इच्छा. ३६ वस्तु आणि प्रयत्न. ३७ भेट, आलिंगन. ३८ अभेद. ३९ पाऊल बंद होतें. ४० नाहींसें होतें. ४१ अशा अवस्थेच्या. ४२ ठिकाणीं. ४३ मनाची एकाग्र स्थिति. ४४ योगी. ४५ अत्यंत. ४६ पूर्ण. ४७ निर्णय. ४८ ठिकाणीं. ४९ खोलींत. ५० निजला. ५१ संपादित झालेलें. ५२ उत्कंठा.

नेघे । विषय पासींही आलियां [2]से न रिघे । हें काय ह्मणऊनि ॥ ६३ ॥ इंद्रियें कर्माच्याठायीं । वाढीनलीं परि कहीं[3] । फळहेतूची [4]चाड नाहीं । अंतःकरणीं ॥ ६४ ॥ असतेनि देहें [6]एतुला । जो [7]चेतुचि दिसे निदेला । तोचि योगारूढ भला । वोळखें तूं ॥ ६५ ॥ तेथ अर्जुन ह्मणे अनंता । हें मज विस्मीं बहु आइकतां । सांगें तया ऐसी योग्यता । कवणें दीजे ॥ ६६ ॥

उद्धरेदात्मनात्मानमात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

तंव हांसोनि कृष्ण ह्मणे । तुझें नवल ना हें बोलणें । कवणासि काय दिजेल कवणें । अद्वैती एथ ॥ ६७ ॥ पैं [11]व्यामोहाचिये [12]शेजे । बळियें [13]अविद्या निद्रित होइजे । [14]ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूचा ॥ ६८ ॥ [16]पाठीं [17]अवसांत ये [18]चेवो । [19]तैं तें अवघेंचि होय वांवो । ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोही [20]आपणपांचि ॥ ६९ ॥ ह्मणऊनि आपणचि आपणयां । [21]घात कि[22]जेत असे धनंजया । चित्त देऊनि [23]नाथिलिया । देहाभिमाना ॥ ७० ॥

बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

हा विचारूनि अहंकार सांडिजे । मग [24]असतीचि [25]वस्तु होइजे । तरी आपली [26]स्वस्ति सहजे । आपण केली ॥ ७१ ॥ येऱ्हवी को[27]शकीटकाचिया परी । तो आपणयां आपण वैरी । जो [28]आत्मबुद्धि शरीरीं । [29]चारुस्थळीं ॥ ७२ ॥ कैसे प्राप्तीचिये वेळे । नि[30]देवीं आंधळेपणाचे [31]डोहळे । कीं असते आपुले डोळे । आपण झांकी ॥ ७३ ॥ कां कवण एक भ्रमलेपणें । मी तों नव्हे गा चो[32]रलों ह्मणे । ऐसा [33]नाथिला छंद अंतःकरणें । घेऊनि ठाके ॥ ७४ ॥ येरवीं होय तें तोचि आहे । परि काइ कीजे बुद्धि तैसी नोहे । देखा स्वप्नींचेनि घायें । कीं मरे साचें ॥ ७५ ॥ जैसी ते [33]शुकाचेनि आंगभारें । नळिका [34]भोंविन्नली [35]ऐरी मोहरे । तरी तेणें उडावें परि न पुरे । मनशंका ॥ ७६ ॥ वायांचि मान [36]पिळी । [37]अदुवें [38]हियें आंवळीं । टिटां[39]तु नळी । धरूनि ठाके ॥ ७७ ॥ ह्मणे बांधला मी

१ अवळ. २ स्मरण. ३ कधीं. ४ इच्छा. ५ असतां. ६ एवढा. ७ जागा असतां. ८ निजला. ९ ज्ञानी. १० नवल. ११ भ्रांतीचे. १२ अंथरुणावर. १३ जाणूनबुजून. १४ अज्ञानानें. १५ वाईट स्वप्न. १६ नंतर. १७ अकस्मात्. १८ जागृती. १९ व्यर्थ. २० आपोआप, स्वतःच. २१ नाश. २२ केला जात. २३ लटिक्या. २४ अविनाशी. २५ ब्रह्म. २६ कल्याण. २७ आपल्या आंगाभोंवतीं घर बांधणारा किडा. २८ शरीर हेंच आपण आहों असा मानणारा. २९ रम्य जागीं. ३० हतभाग्याला. ३१ हौस. ३२ हरवलों. ३३ राघूच्या भारानें. ३४ फिरली. ३५ उलट, दुसरीकडे. ३६ संकोचित, वांकडी. ३७ छाती. ३८ पायांत.

फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां[2] । कीं मोकळिया पायांचा चवडा । गोंवी[3] आधिकें । ॥ ७८ ॥ ऐसा कांजेंवीण[4] आंतुडला । तो सांग पां काय आणिकें बांधला । मग न सोडीच जर्‍ही नेला । तोडूनि अर्धा ॥ ७९ ॥ ह्मणऊनि आपणयां आपणचि रिपु[6] । जेणें वाढविला हा संकल्पु । येरें[7] स्वयंबुद्धी ह्मणे बापु । जो नोथिलें नेघे ॥ ८० ॥

**जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।**

**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥**

तया स्वांतःकरणजिता[12] । संकल्पकामोपशांता[13] । परमात्मा परौती[14] । दूर नाहीं ॥ ८१ ॥ जैसा कि‍डाळाचा शेष जाय । तरी पंधरें[16] तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं[17] ॥ ८२ ॥ हा घटाकार जैसा । निर्मालिया तया अवकाशा । नलगे मिळों जाणें आकाशा । आना ठाया ॥ ८३ ॥ तैसा देहाहंकार नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला[21] । आधींचि आहे ॥ ८४ ॥ आतां शीतोष्णाचिया वोहणी । तेथ सुखदुःखाची कडसणी[23] । इयें नसमाती[24] कांहीं बोलणीं । मानापमानाचीं ॥ ८५ ॥ जे जिथेंवाटा सूर्य जाये । [26]तेउतें तेजाचें विश्व होये । तैसें तया पावे तें आहे । तोचि ह्मणउनी ॥ ८६ ॥ देखें [27]मेघौनि सुटती धारा । तिया न रुपती जैसिया सागरा । तैसीं शुभाशुभें योगीश्वरा । नव्हती आनें ॥ ८७ ॥

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।**

**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥**

जो हा विज्ञानात्मक भावो । तया विचारितां[31] जहला वावो । मग लागला जंव पाहों । तंव ज्ञान तें तोचि ॥ ८८ ॥ आतां व्यापक कीं एकदेशी । ऊहापोहि[34] जे ऐसी । ते करावी टेली[35] आपैसी । दुजेनवीण ॥ ८९ ॥ ऐसा शरीरींचि परि कौतुकें । परब्रह्माचेनि पाडें तुके । जेणें जिंतिलीं[39] एकें । इंद्रियें गा ॥ ९० ॥ तो जितेंद्रिय[40] सहजें । तोचि योगयुक्त[41]

---

२ खवटा. २ खोडयांत. ३ गुंतवी. ४ कारणाशिवाय. ५ बांधला गेला. ६ दुसऱ्यानें. ७ वैरी. ८ संशय. ९ इतर. १० ज्ञानी. ११ लटिकें. १२ मन जिंकणाराला. १३ इच्छा शांत झालेल्याला १४ पलीकडे. १५ हिणकटाचा. १६ उत्तमकशी सोनें. १७ चित्तवृत्ति निवृत्ति करून. १८ नाश पावला असतां. १९ प्रसंगीं. २० अन्य स्थलीं. २१ भरीव, सर्वत्र सांठलेला. २२ येरझारी. २३ भोग. २४ संभवत नाहींत. २५ ज्या मार्गानें. २६ तितकें. २७ मेघापासून. २८ खुपत नाहींत. २९ भिन्न नाहींत. ३० दृश्यसंबंधीं ज्ञान. ३१ विचारितां. ३२ व्यर्थ. ३३ जो सर्व व्यापक नाहीं तो. ३४ तर्क वितर्क. ३५ राहिली. ३६ आपोआप. ३७ बरोबरीनें. ३८ तोलला जातो. ३९ जिंकिलीं. ४० इंद्रियें स्वाधीन ठेवणारा. ४१ योगी.

ह्मणिजे। जेणें सानें थोर नेणिजे। कवणें काळीं ॥ ९१ ॥ देखें सोनयाचें निखिळ। [3]मेरु-येसणें ढिसाळें। आणि मातियेचें डिखळें। कीं सरिसेंचि मानी ॥ ९२ ॥ पाहतां पृथ्वीचें मोल थोडें। ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें। देखें दगडाचे निपाडें। निचाड ऐसा ॥ ९३ ॥

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

तेथ सुहृद आणि शत्रु। कां उदास आणि मित्रु। हा भावभेद विचित्रु। कल्पू कैंचा ॥ ९४ ॥ तया बंधु कोण काह्याचा। द्वेषिया कवण तयाचा। मीचि विश्व ऐसा जयाचा। बोध जाहला ॥ ९५ ॥ मग तयाचिये दृष्टी। अधमोत्तमें असे किरीटी। काय परिसीचिये कसवटी। वानिया कीजे ॥ ९६ ॥ ते जैसी निर्वाणें सुवर्णचि करी। तैसी जयाची बुद्धी चराचरीं। होय साम्यचि उजरी। निरंतर ॥ ९७ ॥ जे ते विश्वाळंकाराचे विसुरे[23]। जरी आहाती आनानें आकारें। तरी घडलें एकचि भांगारें। परब्रह्में ॥ ९८ ॥ ऐसें जाणणें जें बरवें। तें फावलें तया आघवें। ह्मणोनि अहाचवाहाचे न झकवे। येणें आकारचित्रें ॥ ९९ ॥ धांपे पटामाजि दृष्टी। दिसे तंतुची सैघ सृष्टी। परि तो एक-वांचूनि गोष्टी। दुजी नाहीं ॥ १०० ॥ ऐसेनि प्रतीती हें गवसे। ऐसा अनुभव जयातें असे। तोचि समबुद्धी हें अनारिसें। नव्हे जाणें ॥ १ ॥ जयाचें नांव तीर्थरावो। दर्शनें प्रशस्तीसि ठावो। जयाचेनि संगें ब्रह्मभावो। भ्रांतासिही ॥ २ ॥ जयाचेनि बोलें धर्म जिये[41]। दिठी[42] महासिद्धीतें विये[44]। देखें स्वर्गसुखादि इयें। खेळ जयाचा ॥ ३ ॥ विपायें जरी आठवला चित्ता। तरी दे आपुली योग्यता। हें असो तयातें प्रशंसितां। लाभ आथि ॥ ४ ॥

---

१ लहान. २ शुद्ध. ३ मेरुपर्वताएवढें. ४ मोठें. ५ ढेंकूळ. ६ सारखेंच. ७ अमोल. ८ चांगलें. ९ प्रमाणें. १० निष्काम. ११ हितेच्छू. १२ परका. १३ भिन्नभाव. १४ निराळेपणा. १५ विचित्र कल्पना. १६ कशाचा. १७ बरावाईट. १८ परिसावर कसवटी केली तर निरनिराळे वानाचें (हीन, मध्यम, उत्तम आदि) सोनें होईल काय? १९ भिन्नपदार्थ, वान. २० केवळ, उत्तम. २१ सम, सारखी. २२ स्पष्ट, स्पष्टता. २३ समुदाय. २४ अनेक. २५ सुवर्ण. २६ समजलें. २७ वरचेवर. २८ फसवत नाहीं. २९ चित्रविचित्र विश्वरचनेनें. ३० घातल्यानें. ३१ वस्त्रावर. ३२ सूतमय. ३३ केवळ, सर्व. ३४ अनुभवानें. ३५ सांपडतें. ३६ खोटें, वेगळें. ३७ तीर्थांस पावन करणारा. ३८ पूज्यतेला. ३९ ठिकाण. ४० संशयी मनाच्या पुरुषांस. ४१ जगतो. ४२ दृष्टी. ४३ मनांत आणील तसें करण्याची शक्ति. ४४ प्रसवे. ४५ सहज. ४६ स्तुति केली असतां. ४७ आहे.

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥**

पुढती अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतदिवसें । मग आपणपांचि आपण असे । अखंडित ॥ ५ ॥ ऐसिया दृष्टी जो विवेकी । पार्था तो एकाकी । सहजें अपरिग्रही जो तिहीं लोकीं । तोचि म्हणउनी ॥ ६ ॥ ऐसियें असाधारणें । निष्पन्नाचीं लक्षणें । आपुलेनि बहुवसपणें । श्रीकृष्ण बोले ॥ ७ ॥ जो ज्ञानियांचा बाप । देखणेयांचि दिठीचा दीप । जया दीवलयाचा संकल्प । विश्व रची ॥ ८ ॥ प्रणवाचिये पेठे[14] । जाहालें शब्द-ब्रह्म मोजिरें । तें जयाचिये यशा धाकुटें । वेढूं[18] न पुरे ॥ ९ ॥ जयाचेनि आंगिकें तेजें । आवो रविशशीचिये वाणिजे[22] । म्हणऊनि जग हें[23] वेसजे । वोण असे तया ॥ ११० ॥ हां गा नामचि एक जयाचें । पाहतां गगनही दिसे टांचें[24] । गुण एकैक काय तयाचे । कोलिशील[25] तूं ॥ ११ ॥ म्हणोनि असो हें वानणें । सांगों नेणों कवणाचीं लक्षणें । दावावीं मिषें येणें । कां बोलिलों तें ॥ १२ ॥ ऐकें द्वैताच्या ठावोचि फेडी[29] । तें ब्रह्मविद्या किजेल[30] उघडी । तरि अर्जुना पढिये[31] हे गोडी । नासेल हें[32] ॥ १३ ॥ म्हणोनि तें तैसें बोलणें । नव्हे सैंपातळ[33] आड लावणें । केलें मनाचि वेगळिवाणें[34] । भोगावया ॥ १४ ॥ जया सोऽहंभाव अटक[35] । मोक्षसुखालागोनि रंकें[36] । तयाचिये दिठीचा झणें[38] कळंक । लागेल तुझिया प्रेमा ॥ १५ ॥ विपायें[37] अहंभाव ययाचा जाइल । मी तोचि हा जरी होइल । तरि मग काय कीजेल । एकलेया ॥ १६ ॥ दिठीचि[39] पाहतां निवजे[40] । कां तोंड भरोनि बोलिजे । ना तरी दाटूनि खेंव[42] दीजे । ऐसें कोण आहे ॥ १७ ॥ आपुलिया मना बरवी । असमाई[43] गोठी[44] जीवीं । ते कवणेंसि चावळावी । जरी ऐक्य जाहलें ॥ १८ ॥ इया काकुळती जनार्दनें । अन्योपदेशाचेनि हातासनें । बोलांमाजि मन मनें । आलिंगूं सरलें ॥ १९ ॥ हें परिसतां जरी कानडें । तरि आण पां पार्था उघडें । श्रीकृष्ण

---

१ पुनः. २ लोपेना. ३ प्रातःकाळ झाला, उदय झाला. ४ अद्वैत सूर्यैकरून. ५ आपला आपणच. ६ एकला एक. ७ संग्रह न करणारा, संसार रहित. ८ असामान्य विशेषणाचीं. ९ सिद्धाचीं. १० षड्गुणैश्वर्यसंपन्नतेनें. ११ पाहाणाऱ्यांच्या. १२ समर्थाचा. १३ ॐकाराच्या. १४ बाजारांत. १५ वेद. १६ उत्कृष्ट वस्त्र. १७ विशाळपणास. १८ आच्छादूं शकत नाहीं. १९ अंगींच्या. २० प्रतिष्ठा. २१ सूर्यचंद्र. २२ वाणिज्यास, व्यापारास. २३ प्रकाशावांचून. २४ लहान. २५ आणशील. २६ वर्णन करणें. २७ या निमित्तानें दाखवावीं. २८ भेदभावाचा. २९ नाहींसा करी. ३० केली जाईल. ३१ अतिप्रिय. ३२ सर्व. ३३ पडदा. ३४ भिन्न. ३५ अडथळा. ३६ दीन. ३७ कदाचित्. ३८ कदाचित्. ३९ दृष्टीनें. ४० शांत व्हावें. ४१ आनंदानें दृढ. ४२ आलिंगन. ४३ न मावणारी. ४४ गोष्ट. ४५ बोलावी. ४६ युक्तीनें, मिषानें. ४७ बोलण्यांत. ४८ अवघड.

सुखाचेंचि रूपडें । वोतलें[1] गा ॥ १२० ॥ हें असो वेयसेचिये[2] शेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी । मग ते मोहाची त्रिपुटी[3] । नाचों लागे ॥ २१ ॥ तैसें जाहालें श्रीअनंता । ऐसें तरि मी न ह्मणता । जरी तयाचा न देखता । अतिशय एथ ॥ २२ ॥ पाहा पां नवल कैसें चोज । कें[5] उपदेश [6]कोउतें जुंझ । परि पुढें वालभाचें[7] भोज[8] । नाचत असे ॥ २३ ॥ आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी । पिसें[9] आणि न भुलवी । तरि तें काई[10] ॥ २४ ॥ ह्मणऊनि भावार्थ तो ऐसा । अर्जुन मैत्रियेचा कुवासा[11] । कीं सुखें शृंगारलिया मानसा । दर्पण[12] तो ॥ २५ ॥ यापरी बाप पुण्यपवित्र । जगीं-भक्तिबीजासि [13]सुक्षेत्र । तो श्रीकृष्णकृपे पात्र[14] । याचिलागीं ॥ २६ ॥ हो कां आत्मनिवेद-नौतळींची[15] । जे पीठिका[16] होय सख्याची । पार्थ अधिष्ठात्री[17] तेथिंची । मातृका[18] गा ॥ २७ ॥ पासींचि गोसांवी[19] वर न वानिजे[20] । मां[21] गा पाइकाचा[22] गुण घेइजे । ऐसा अर्जुन तो सहजें । [23]पढिये हरी ॥ २८ ॥ पाहा पां अनुरागें[24] भजे । जे [25]प्रियोत्तमें मानिजे । ते पती-हूनि काय न वानिजे[26] । पतिव्रता ॥ २९ ॥ तैसा अर्जुनचि विशेषें स्तवावा । ऐसें आवडलें मज जीवा । जे तो त्रिभुवनींचिया दैवा । एकायतन[27] जाहाला ॥ १३० ॥ जयाचिया आवडीचेनि [28]पांगें । अमूर्तही[29] मूर्ति[30] ओवगे[31] । पूर्णाहि[32] परि लागे । अवस्था[33] जयाची ॥ ३१ ॥ तंव श्रोते ह्मणती दैव । कैसी बोलाची हेवाव[34] । काय नादातें[35] हन बैरव[36] । [37]जिणोनि आली ॥ ३२ ॥ हां हो नवल नोहे [38]देशी । मऱ्हाटी बोलिजे तरि ऐसी । वाणें[39] उमटता हे आकाशीं[40] । साहित्य[41] रंगाचें ॥ ३३ ॥ कैसें उन्मेखचांदिणें[42] तारे[43] । आणि भावार्थ पडे गोर[44] । हेचि श्लोकार्थ कुमुदिनी फांर[45] । सावियां[46] होती ॥ ३४ ॥ चाडचि निचाडा[47] करी । ऐसी मनोरथीं ये थोरी । तेणें विवळले[48] अंतरीं । तेथ डोलें[49] आला ॥ ३५ ॥ तें निवृत्तिदासें जाणितलें । मग अवधान द्या ह्मणितलें । नवल पांडवकुळीं पाहलें[50] । कृष्णदिवसें[51] ॥ ३६ ॥ देवकीयें[52] उदरीं वाहिला । यशोदा सायासें पाळिला । [53]शेखीं उपेगा[54] गेला । पांडवांसी ॥ ३७ ॥ ह्मणऊनि बहुदिवस वोळगावा[55] । कां अवसरु[56] पाहोनि विनवावा[57] । हाती सोसें

---

१ बनविलें. २ उमर सरतां. ३ प्रपंचरचना. ४ आवड. ५ कोठें. ६ कोणीकडे युद्ध. ७ प्रीतीचें. ८ प्रेम, कौतुक. ९ वेड. १० मग त्याची प्रतिष्ठा काय? ११ आश्रय. १२ आरसा. १३ चांगलें शेत. १४ योग्य. १५ आठवी भक्ति. १६ आसन. १७ आश्रयभूत. १८ देवता. १९ धनी, मालक. २० वर्णन करावा. २१ मग. २२ सेवकाचा. २३ अतिप्रिय. २४ प्रीतीनें. २५ नवऱ्यानें. २६ वाखाणावी. २७ एकच अधिष्ठान. २८ करून. २९ निराकार. ३० आकार. ३१ स्वीकारी. ३२ व्यापक. ३३ उत्कंठा. ३४ आवड. ३५ गायन, वाजंत्र. ३६ सौंदर्य. ३७ जिंकून. ३८ देशभाषा. ३९ प्रकार. ४० स्वरूपीं. ४१ श्रवणसुखाचें. ४२ ज्ञानाचें चांदणें. ४३ चकचकित. ४४ स्पष्ट. ४५ प्रसृत. ४६ सहज, सर्वथा. ४७ निष्काम. ४८ प्रकाशले. ४९ विस्मय. ५० उजाडलें. ५१ कृष्ण हाच सूर्य त्यानें. ५२ देवकीनें. ५३ शेवटीं. ५४ उपयोगीं पडला. ५५ सेवावा. ५६ समय. ५७ प्रार्थावा. ५८ आज्ञा.

तया [1]सदैवा । पडेचिना ॥ ३८ ॥ हें असो कथा सांगें वेगीं । मग अर्जुन ह्मणे [2]सलगी । देवा इयें [3]संतचिन्हें आंगीं । न [4]ठेकती माझ्या ॥ ३९ ॥ येऱ्हवीं या लक्षणांचिया [5]निजसारा । मी [6]अपाडें [7]कीरें अपुरा । परि तुमचेनि बोलें अवधारा । [8]थोरावें जरी ॥ १४० ॥ जी तुह्मीं चित्त [9]देयाल । तरी ब्रह्म मियां होइजेल । काय जाहालें [10]अभ्यासिजेल । सांगाल जें ॥ ४१ ॥ हांहो नेणों कवणाची [11]कांहाणी । आइकोनि [12]श्लाघिजत असों अंतःकरणीं । ऐसी जाहालेपणाची [13]शिरयाणी । कायसी देवा ॥ ४२ ॥ हें आंगें म्यां होइजो कां । [14]येतुलें गोसावी आपुलेपणें कीजो कां । तंव हांसोनि श्रीकृष्ण होकां । करूं ह्मणती ॥ ४३ ॥ देखा संतोष एक न जोडे । तंवचि सुखाचें [15]सैंघ [16]सांकडें । मग जोडलिया कवणेकडे । अपुरें असे ॥ ४४ ॥ तैसा सर्वेश्वर [17]बळियाँ सेवकें । ह्मणोनि ब्रह्महीं होय तो कौतुकें । परि कैसा [18]भारें [19]आंतला पिकें । दैवाचेनि ॥ ४५ ॥ जो जन्मसहस्रांचियासाठीं । इंद्रादिकांहीं [20]महाग भेटी । तो अधीन [21]केतुला [22]किरीटी । जे बोलही न साहे ॥ ४६ ॥ मग ऐका जें पांडवें । ह्मणितलें म्यां ब्रह्म होआवें । तें [23]अशेषही देवें । [24]अवधारिलें ॥ ४७ ॥ तेथ ऐसेंचि एक विचारिलें । जे या ब्रह्मत्वाचे डोहळे जाहाले । परि उदरा वैराग्य आहे आलें । बुद्धीचिया ॥ ४८ ॥ येऱ्हवीं दिवस तरी या [25]अपुरे । परि वैराग्यवसंताचेनि भरें । जे [26]सोहंभावमहुरें । [27]मोडोनि आला ॥ ४९ ॥ ह्मणोनि [28]प्राप्तिफळीं फळतां । ययासि वेळ न लगेल आतां । होय विरक्त ऐसा [29]अनंता । भरंवसा जाहाला ॥ १५० ॥ ह्मणे जें जें हा [30]अधिष्ठील । तें आरंभींच यया फळेल । ह्मणोनि सांगीतला न [31]वेंचेल । अभ्यास वायां ॥ ५१ ॥ ऐसें [32]विवरोनियां श्रीहरी । ह्मणितलें तिये [33]अवसरीं । अर्जुना हा अवधारीं [34]पंथराज ॥ ५२ ॥ तेथ [35]प्रवृत्तितरूच्या बुडीं । दिसती [36]निवृत्तिफळाचिया [37]कोडी । जिये मार्गींचा [38]कापडी । [39]महेश आझुनी ॥ ५३ ॥ पैं योगिवृंदें [40]वहिलीं । [41]आडवीं आकाशीं निघालीं । कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं । [42]धोरणें पडिला ॥ ५४ ॥ तिहीं आत्मबोधाचेनि [43]उजुकारें । धांव घेतली [44]एकसरें । कीं येर सकळ मार्ग [45]निदसुरे । सांडूनियां ॥ ५५ ॥ [46]पाठीं महर्षी येणें आले । साधकांचे सिद्ध जाहाले । [47]आत्मविद [48]थोरावले । येणेंचि पंथें ॥ ५६ ॥ हा

---

१ दैववानाला. २ लडिवाळपणानें. ३ संताचीं लक्षणें. ४ वसत नाहींत. ५ पूर्ण तात्पर्यास. ६ अयोग्य. ७ निश्चयें. ८ मोठेपणा पावेन. ९ घाल. १० शिकलें जाववेल. ११ गोष्ट. १२ स्तुति करीत राहूं. १३ मोठेपणा. १४ इतके. १५ फार. १६ संकट. १७ बळकट. १८ भरानें. १९ दडपलेला. २० दुर्मिळ. २१ केवढा. २२ अर्जुनाला. २३ सर्वस्वें. २४ ऐकिलें. २५ अपुरते. २६ मोहोरानें. २७ अतोनात भारानें. २८ आत्म प्राप्तिच्या फळानें. २९ श्रीकृष्णाला. ३० आचरील. ३१ व्यर्थ जाणार नाहीं. ३२ विचार करून. ३३ प्रसंगीं. ३४ राजमार्ग. ३५ संसारवृक्षाखालीं. ३६ मोक्षफळाच्या. ३७ राशी. ३८ यात्रेकरू. ३९ शंकर. ४० सत्वर. ४१ आडव्यातिडव्या मार्गानें. ४२ रहदारीचा रस्ता. ४३ सरळमार्गानें. ४४ एकसारखी. ४५ अडचणीचे. ४६ पूर्वी. ४७ तत्वज्ञानी. ४८ श्रेष्ठ झाले.

मार्ग जैं देखिजे । तैं ताहान भूक विसरिजे । रात्रिदिवस नेणिजे । वाटे इये ॥ ५७ ॥ चालतां पाउल जेथ पडे । तेथ अपवर्गाची खाणी उघडे । ओल्हांटलिया तरि जोडे । स्वर्गसुख ॥ ५८ ॥ निगिजे पूर्वीलिया मोहरा । कीं यइजे पश्चिमेचिया घैरा । निश्चळपणें धनुर्धरा । चालणें एथिचें ॥ ५९ ॥ येणें मार्गें जया ठाया जाइजे । तो गांव आपणचि होइजे । हें सांगों काय सहजें । जाणसी तूं ॥ १६० ॥ तेथें पार्थें म्हणितलें देवा । तरि तेंचि मग केव्हां । कां आर्तिसमुद्रौनि न काढावा । बुडतु जी मी ॥ ६१ ॥ तंव कृष्ण म्हणती ऐसें । हें उत्संखळ बोलणें कायसें । आम्ही सांगतसों आपैसें । वैरि पुशिलें तुवां ॥ ६२ ॥

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥**

तरी [14]विशेषें आतां बोलिजेल । वरि तें अनुभवें [15]उपेगा जाईल । म्हणोनि तैसें एक लागेल । [16]स्थान पाहावें ॥ ६३ ॥ जेथ [17]आराणुकेचेनि कोडें । बैसलिया उठों नावडे । वैराग्यासि [18]दुणीव चढे । देखिलिया जें ॥ ६४ ॥ जो संतीं वसविला ठावो । संतोषासि [19]सावावो । मना होय [20]उत्सावो । धैर्याचा ॥ ६५ ॥ अभ्यासचि आपण यातें करी । हृदयातें अनुभव [21]वरी । ऐसी [22]रम्यपणाची थोरी । अखंड जेथ ॥ ६६ ॥ जया [23]आड जातां पार्थां । [24]तपश्चर्या मनोरथा । [25]पाखंडियाही [26]आस्था । समूळ होय ॥ ६७ ॥ स्वभावें वाटे येतां । जरि [28]वरपडा जाहाला [29]अवचितां । तरि सकामही परि मोघौता । निघों विसरे ॥ ६८ ॥ ऐसेनि न [31]राहतयातें [31]राहावी । [32]भ्रमतयातें बैसवी । थापटूनि चेवैवी । [34]विरक्तीतें ॥ ६९ ॥ हें राज्य वैरं सांडिजे । मग निवांतीं एथेंचि असिजे । ऐसें शृंगारियांहि उपजे । देखत [39]खेवो ॥ १७० ॥ जे येणें मानें बरवंट । आणि तैसेंचि अतिचोखट । जेथ अधिष्ठान प्रगट । डोळां दिसे ॥ ७१ ॥ आणिकही एक पहावें । जें साधकीं वसतें होआवें । आणि जनाचेनि पायरवें । रुळेचिना ॥ ७२ ॥ जेथ अमृताचेनी पाडें । मुळाही सैकट

---

१ मोक्षाची. २ आडमार्गानें गेलें असतांही. ३ निघावें. ४ पूर्वेच्या. ५ मार्गानें. ६ पश्चिम मार्गेकरून. ७ ब्रह्मरंध्रीं, दहावें द्वार. ८ धीरेंकरून, हळुहळू. ९ उत्कंठेच्या सागरांतून. १० बुडत आहे. ११ उतावळीचें. १२ आपण होऊन. १३ पुनः. १४ विस्तारानें. १५ उपयोगीं पडेल. १६ एकांत जागा. १७ समाधान व्हावें या इच्छेनें. १८ दृढपणा. १९ सहाय. २० हर्ष. २१ स्वीकारी. २२ आनंदाची. २३ मध्यें, जवळ जातां. २४ तप करावेंसें वाटतें. २५ नास्तिकाला. २६ आशा. २७ प्राप्त. २८ एकाएकीं. २९ माघारा. ३० चंचळास. ३१ स्थिर वदतें. ३२ भटकत फिरणाऱ्यास. ३३ उठवी. ३४ वैराग्य. ३५ चांगलें. ३६ निःश्चल. ३७ विषयी जनांस. ३८ पाहातांच. ३९ भेट. ४० चांगलें. ४१ शुद्ध. ४२ ब्रह्मस्वरूप. ४३ वस्ती. ४४ वर्दळ. ४५ मळेना. ४६ तुळनेनें. ४७ मुद्दां.

गोडें । जोडती दाटें झाडें । सदा फळतीं ॥ ७३ ॥ पाउला पाउला उदकें । वर्षाकाळा-वीण अतिचोखें । निर्झरें कां विशेषें । सुलभें जेथें ॥ ७४ ॥ हा आतपही अळुमाळ । जाणिजे तरि शीतळ । पवन अति निश्चळ । मंद झुळके ॥ ७५ ॥ बहुतकरूनि निःशब्द । दाट न रिघे श्वापद । शुक हन षट्पद । तेउतें नाहीं ॥ ७६ ॥ पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें । कवणे एके वेळे बैसे । कोकिळही होकां ॥ ७७ ॥ निरंतर नाहीं । तरि आलीं गेलीं कांहीं । होतु कां मयूरेंही । आम्ही ना न म्हणों ॥ ७८ ॥ परि आवश्यक पांडवा । ऐसा ठाव जोडावा । तेथ निगूढ मठ होआवा । कां शिवालय ॥ ७९ ॥ दोहींमाजि आवडे तें । जें मानलें होय चित्तें । बहुतकरूनि एकांतें । बैसिजे गा ॥ १८० ॥ म्हणोनि तैसें तें जाणावें । मन राहतें पाहावें । राहेल तेथ रचावें । आसन ऐसें ॥ ८१ ॥ वरि चोखट मृगसेवडी । माजि धूतवस्त्राची घडी । तळवटीं अमोडी । कुशांकुर ॥ ८२ ॥ सकोमळ सरिसे । सुबद्ध राहती आपैसे । एकपाडें तैसे । वोजा घालीं ॥ ८३ ॥ परि सावियाचि उंच होइल । तरि आंग हन डोलेल । नीच तरी पावेल । भूमिदोष ॥ ८४ ॥ म्हणोनि तैसें न करावें । समभाव धरावें । हें बहु असो होआवें । आसन ऐसें ॥ ८५ ॥

तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।
उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥

मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण । करूनि सद्गुरुस्मरण । अनुभविजे ॥ ८६ ॥ जेथ स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे । जंव काठिण्य विरे । अहंभावाचें ॥ ८७ ॥ विषयांचा विसर पडे । इंद्रियांची कसमस मोडे । मनाची घडी घडे । हृदयामाजी ॥ ८८ ॥ ऐसें ऐक्य हें सहजें । फावे तंव राहिजे । मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ॥ ८९ ॥ आतां आंगातें आंग वरी । पवनातें पवन धरी । ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे ॥ १९० ॥ प्रवृत्ति माघौती मोहरे । समाधि ऐलाडी उतरे । आघवें अभ्यासूं

---

१ सांपडतात. २ गीच, गच्च. ३ फळांनीं युक्त असणारीं. ४ पावसाळ्यावांचून. ५ निर्मळ. ६ झरे. ७ ऊन. ८ थोडा. ९ वारा. १० वाहतो. ११ गलबलारहित. १२ जनावरें. १३ राघु. १४ भ्रमर. १५ तेथें. १६ पाण्याच्या आधारानें. १७ चक्रवाकपक्षी. १८ असोत. १९ मोर. २० गुप्त स्थान २१ अथवा. २२ महादेवाचें देऊळ. २३ मन स्थिर होईल असें स्थळ. २४ घालावें. २५ सुंदर. २६ मृगचर्म, कृष्णाजिन. २७ मध्यें. २८ धुतलेल्या वस्त्राची. २९ खालीं. ३० साग्र. ३१ दर्भ. ३२ नरम. ३३ सारखे. ३४ न उळमळणारे. ३५ सहज. ३६ एकसारिखे. ३७ चांगलें व्यवस्थित. ३८ कदाचित्. ३९ सखल. ४० गारठा, वाळवी इत्यादि. ४१ सारखे उंचीचे. ४२ स्मरणानें. ४३ प्रीतीनें. ४४ आंतबाहेर. ४५ सात्त्विक अष्टभाव योगशास्त्रांत सांगितले आहेत ते. ४६ ताठा. ४७ चलबिचल. ४८ प्राप्त होई. ४९ आंग सांभाळतें. ५० उत्कर्ष. ५१ मागें फिरे. ५२ अलिकडे.

सरे । बैसत [2]खेवो ॥ ९१ ॥ मुद्रेची प्रौढी ऐसी । तेंचि सांगिजेल आतां परि-येसीं । तरि ऊरु या जंघनासी । जडोनि घाली ॥ ९२ ॥ चरणतळें देव्हडीं । आधारद्रुमाच्या बुडीं । सुघटितें गाढीं । संचरीं पां ॥ ९३ ॥ सव्य तो तळीं ठाविजे । तेणें सिवणीमध्य पीडिजे[14] । वरि बैसे तो सहजे । वामचरण ॥ ९४ ॥ गुद मेढ्रांआंतौतीं । चारी अंगुळें निर्गुतीं । तेथ सार्ध सार्ध प्रांतीं । सांडूनियां ॥ ९५ ॥ मांजि अंगुळ एक निगे[22] । तेथ टांचेचेनि उत्तरभागें । नेहटिजे[25] वरिभागें । पेललेनी[27] ॥ ९६ ॥ उच-लिलें कां नेणिजे । तैसें पृष्ठांत उचलिजे । गुल्फद्वय धरिजे । तेणेंचि मानें ॥ ९७ ॥ मग-शरीर संचु पार्था । अशेषैंही सर्वथा । पार्ष्णीचा माथा । स्वयंभ होय ॥ ९८ ॥ अर्जुना हें जाण । मूळबंधाचें लक्षण । वज्रासन गौण । नाम यासी ॥ ९९ ॥ ऐसी आधारीं मुद्रा पडे । आणि अधींचा मार्ग मोडे । तेथ अपान आंतुलेंकडे । वोहाटों[42] लागे ॥ २०० ॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**

**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥**

तंव करसंपुट आपैसें । वाम चरणीं बैसे । बाहुमूळीं दिसे । थोरींवें[44] आली ॥ १ ॥ मांजि उभारिलेनि दंडें[47] । शिरकमळ होय गाढें । नेत्रद्वारींचीं कवाडें । लागूं पाहती ॥ २ ॥ वरंचिलें पातीं न ढळती । तळींचीं तळीं पुंजाळती । तेथ अर्धोन्मीलित स्थिती । उपजे तया ॥ ३ ॥ दिठी[53] राहोनि आंतुलेकडे । बाहेर पाउल घाली [54]कोडें । ते ठायीं ठावो पडे । नासाग्रपीठीं ॥ ४ ॥ ऐसें आंतच्या आंताचि रचे । बाहेरि मागुतें नें[56] वचे । म्हणोनि राहणें अर्धिये दिठीचें । तेथेंचि होय ॥ ५ ॥ आतां दिशांची भेटी घ्यावी । कां रूपाची

---

१ बसल्याबरोबर. २ प्राप्ति. ३ चित्त स्थिर करण्याची योगशास्त्रांत सांगितलेली एका प्रकारची क्रिया याचें लक्षण हटयोगप्रदीपिका, घेरंडसंहिता इ० ग्रंथांत पहावें. ४ मांडी. ५ पोटरी. ६ वळवून. ७ युक्तीनें. ८ गुदस्थानाच्या तळीं. ९ सुस्थिर. १० बळकट. ११ शिरकवावीं. १२ उजवा. १३ वृषणावरून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा. १४ दडपिजे. १५ डावा पाय. १६ मळद्वार. १७ आंडामधील. १८ नुस्ती. १९ दीड दीड अंगुळ. २० जागा. २१ मध्यें. २२ राहते. २३ खोंटेच्या. २४ शेवटच्या भागानें. २५ नेट करावा, दाबावें. २६ लिंगस्थानाच्या वरच्या बाजूस. २७ समतोल राहून. २८ पाठीच्या शेवटला भाग. २९ दोन घोटे. ३० त्याचप्रमाणें. ३१ सारें. ३२ सर्वांग. ३३ खोंटेचा. ३४ स्थिर. ३५ या प्रयोगांत अपानवायूला बळानें ऊर्ध्वगति दिली जाते. ३६ साधारण. ३७ गुदद्वारीं. ३८ बांध, बंधन. ३९ खालचा. ४० गुदद्वारीं वाहणारा वायु. ४१ आंतल्या बाजूस. ४२ वाहतो. ४३ दोन्हीं तळहात. ४४ उंचपणा. ४५ कमर. ४६ सरळ तरतरीत पाठीचा कणा तांठ करून. ४७ काडीप्रमाणें. ४८ ताठ, दृढ. ४९ पापण्या. ५० वरचीं. ५१ पसरती. ५२ अर्धी मिटलेली व अर्धी उघडलेली. ५३ दृष्टि. ५४ कौतुकानें. ५५ नाकाच्या शेंड्यावर. ५६ जात नाहीं. ५७ अर्ध्या दृष्टीचें.

वाट पहावी । हे चोंड सरे आघवी । [2]आपसया ॥ ६ ॥ मग [3]कंठनाळ [4]आटे । हनुवटी [5]हडौती [6]दाटे । ते [7]गाढी होऊनि [8]नेहटे । [9]वक्षस्थळीं ॥ ७ ॥ माजि [10]घंटिका लोपे[11] । वरि बंध जो [12]आरोपे । तो [13]जाळंधर [14]म्हणिपे । पंडुकुमरा ॥ ८ ॥ [15]नाभी वरी [16]पोखे । उदर हें [17]थोके । [18]अंतरीं [19]फांके । [20]हृदयकोश ॥ ९ ॥ [21]स्वाधिष्ठानावरिचिलें [22]कांठी । नाभिस्थानत[23]ळवटीं । बंध पडे किरीटी । [24]वोढियाणा तो ॥ २१० ॥ ऐसी शरीराबाहेरलीकडे । अभ्यासाचि [25]पांखर पडे ॥

## प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
## मनः संयम्य मच्चितो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥

तंव आंत [26]ठाय मोडे । [27]मनोधर्माची ॥ ११ ॥ कल्पना निमे[28] । [29]प्रवृत्ती शमे । [30]आंग मन विरमे[31] । [32]सांवियाचि ॥ १२ ॥ क्षुधा काय जाहाली । निद्रा [33]केउती गेली । हे आठवणही हारपली । न दिसे वेगां ॥ १३ ॥ जो [34]मूळबंधें कोंडला । अपान [35]मागौता मुरडला । तो सवेंचि वरी [36]सांकडला । धरी [37]फुगू ॥ १४ ॥ [38]क्षोभलेपणें माजे । [39]उवाइला ठायीं गाजे । [40]मणिपूरेसीं झुंजे । राहोनियां ॥ १५ ॥ मग [41]थांवलिये [42]वाहटुळी । [43]सैंघ घेऊनि घर [44]उहुळी । [45]बाळपणींची [46]कुहीटुळी । बाहेर घाली ॥ १६ ॥ भीतरीं [47]वळी न धरे । कोठ्यामाजी संचरे । कफपित्ताचे [48]थारे । उरों नेदी ॥ १७ ॥ धातूचे समुद्र [49]उलंडी । मेदाचे पर्वत फोडी । आंतली मज्जा काढी । [50]अस्थिगत ॥ १८ ॥ [51]नाडीतें सोडवी । [52]गात्रांतें विघडवी । साधकातें [53]भेडसावी । परि [54]बिहावें ना ॥ १९ ॥ व्याधीतें दावी । सवेंचि हारवी । [55]आप पृथ्वी कालवी । एकवाट ॥ २२० ॥ तंव [56]येरीकडे धनुर्धरा । आसनाचा [57]उबारा । शक्ति करी [58]उजगरा । [59]कुंडलिनी तें ॥ २१ ॥ नागिणीचें पिलें । [60]कुंकुमें नाहलें । [61]वेळण घेऊनि आलें ।

---

१ इच्छा. २ सहज. ३ गळ्याची नळी. ४ संकोच पावे. ५ गळ्याखालच्या खळगीला लागे. ६ घट्ट बसे. ७ दृढ. ८ दाबतें. ९ छातीवर. १० कंठमणी. ११ ढापें. १२ पढे. १३ या नांवाचा बंध. १४ म्हणावा. १५ बेंबी. १६ वाढे. १७ सपाट होतें. १८ आंत. १९ पसरे. २० हृदयकमल. २१ लिंगाच्या वरील. २२ मार्गी. २३ बेंबिच्या खालीं. २४ उडियान बंध. २५ पसरलेली दशा. २६ ठिकाण. २७ मनाच्या चंचळपणाची. २८ खुंटे. २९ व्यवसाईकबुद्धि. ३० आपोआप. ३१ स्थिरावे. ३२ सहज. ३३ कोठें. ३४ आधारबंधांत आडविला. ३५ माघारा फिरला. ३६ संकुचित झाला. ३७ फुगोटा. ३८ न आवरतेपणें. ३९ प्रशस्त स्थळीं. ४० हें तृतीयचक्र नाभिस्थानीं आहे. ४१ शांत झालेली. ४२ वायुधुळीनें. ४३ सर्व. ४४ घर धांडोळी. ४५ पूर्वीची. ४६ कुचकी घाण, रोग. ४७ वेढा. ४८ सांठे. ४९ पालथे करी. ५० हाडांतील. ५१ वायुमार्गास. ५२ अवयवांला. ५३ भीति दाखवी. ५४ भिऊं नये. ५५ पाणी. ५६ दुसरीकडे. ५७ उष्णतेनें. ५८ जागे. ५९ कुंडलिनीला. ६० कुंकुवानें. ६१ वेटाळें.

[१]सेजे जैसें ॥ २२ ॥ तैसी ते [२]कुंडलिनी । [३]मोटकी [४]औटे वळणी । [५]अधोमुख सर्पिणी । [६]निदेली असे ॥ २३ ॥ [७]विद्युल्लतेची [८]विंडी । [९]वन्हिज्वाळांची घडी । [१०]पंधरेयांची [११]चोखडी । घोंटींव[१२] जैशी ॥ २४ ॥ तैसी [१३]सुबंध [१४]आटली । [१५]पुटीं होती [१६]दाटली । ते वज्रासनें [१७]चिमुटली । सावध होय ॥ २५ ॥ तेथ नक्षत्र जैसें उलंडलें । कीं सूर्याचें आसन मोडलें । तेजाचें बीज [१८]विरूढलें । अंकुरेंशीं ॥ २६ ॥ तैसी वेढियातें सोडिती । [१९]कैवतिकें आंग मोडिती । [२०]कंदावरी [२१]शक्ती । उठिली दिसे ॥ २७ ॥ सहजें बहुतां दिवसांची भूक । वरि [२२]चेवविली तें होय मिष । मग आवेशें पसरी मुख । [२३]ऊर्ध्व उजू ॥ २८ ॥ तेथ हृदयकोशौं[२४]तळवटीं । जो पवन भरे किरीटी । तया [२५]सगळयाची मिठी । देऊनि घाली ॥ २९ ॥ मुखींच्या [२६]ज्वाळीं । [२७]तळीं वरी कवळी । मांसाची [२८]वडवाळी । [२९]आरोगूं लागे ॥ २३० ॥ जे जे ठाय [३०]समांस । तेथ [३१]आहाच जोडे [३२]धौंउस । पाठी एकदोनी घांस । [३३]हियांही भरी ॥ ३१ ॥ मग तळवे तळहात शोधी । उर्ध्वींचें [३४]खंड भेदी । झाडा घे संधी । [३५]प्रत्यंगाच्या ॥ ३२ ॥ अधोभाग तरी न सांडी । परि नखींचेंही सत्व काढी । त्वचा धुवूनि जडी । [३६]पांजरेंशीं ॥ ३३ ॥ अस्थीचे नळे [३७]निरपे । शिरांचे [३८]हीर वोरपे । तंव बाहेरी [३९]विरूढी करपे । [४०]रोमबीजाची ॥ ३४ ॥ मग [४१]सप्तधातूंच्या सागरीं । ताहानेली घोंट भरी । आणि सवेंचि उन्हाळा करी । खडखडीत ॥ ३५ ॥ [४२]नासापुटौनि वारा । जो जातसे अंगुळें बारा । तो [४३]गांचिये धरूनि माघारा । आंत घाली ॥ ३६ ॥ तेथ [४४]अधवरौतें आकुंचे । [४५]ऊर्ध्वतळौतें खाचे । तया [४६]खेवांमाजि चक्राचे । [४७]पदर उरती ॥ ३७ ॥ येन्हवीं तरी [४८]दोन्ही तेव्हांचि मिळती । परी कुंडलिनी [४९]नावेक [५०]दुश्चित्त होती । ते तयांतें म्हणे परौती । तुम्हीचि काय एथें ॥ ३८ ॥ आइकें [५१]पार्थिव धातु आघवी । [५२]आरोगितां कांहीं नुरवी । आणि [५३]आपातें तंव ठेवी । पुसोनियां ॥ ३९ ॥ ऐसीं [५४]दोन्ही भूतें खाये । ते वेळीं संपूर्ण [५५]धाये । मग

---

१ निजला. २ ब्रह्मनाडी. ३ लहान. ४ साडेतीन वळशाची. ५ खालीं घातलेल्या मुखाची. ६ निजलेली. ७ विजेची. ८ वेटाळलेली. ९ अग्निज्वाळेची. १० सोन्याची. ११ चोख. १२ घोटून चकचकीत केलेली. १३ उत्तम बंधयुक्त. १४ पातळ केली. १५ पुट दिल्यानें. १६ जाड झाली. १७ पेंचांत सांपडली. १८ उगवलें. १९ कौतुकानें. २० नाभीवर. २१ वेल. २२ जागी केली. २३ वरती नीट. २४ हृदयकमळाखालीं. २५ सर्वालाच. २६ ज्वाळांनीं. २७ खालीं वर. २८ घास. २९ खाऊं लागे. ३० मांसयुक्त. ३१ सहज. ३२ घास. ३३ हृदयांत. ३४ भाग. ३५ दरएक अवयवाचा. ३६ हाडांच्या सांपळयास. ३७ साफ करी. ३८ जाळी. ३९ वाढ, वृद्धि. ४० केसांच्या मुळांची. ४१ रस, असृक्, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र हे शरीरांतील सात धातु. ४२ नाकपुडयांतून. ४३ गच्च धरून. ४४ खालचें वर ओढतें. ४५ वरचें खालीं खचतें. ४६ आलिंगनामध्यें. ४७ पडदे. ४८ इडा व पिंगला. ४९ क्षणभर. ५० व्यग्र, कोपायमान होती. ५१ पृथ्वीसंबंधीं. ५२ भक्षितां. ५३ उदकाला. ५४ पृथ्वी व आप. ५५ तृप्त होय.

सौम्य होऊनि राहे । [1]सुषुम्नेपाशीं ॥ २४० ॥ तेथ तृप्तीचेनि संतोषें । गरळ जें [2]वेमी मुखें । तेणें तियेचेनि [3]पीयूषें । प्राण [4]जिये ॥ ४१ ॥ तो [5]अग्नि आंतूनि निघे । परि सबाह्य निववूंचि लागे । ते वेळीं [6]कसु बांधिती आंगें । सांडिली [7]पुढती ॥ ४२ ॥ मार्ग मो[8]डती नाडीचे । [9]नवविधपण वायूचें । जाय म्हणऊनि शरीराचे । धर्म नाहीं ॥ ४३ ॥ [10]इडा [11]पिंगळा एकवटती । [12]गांठी तिन्ही सुटती । [13]साही पदर फुटती । चक्रांचे हे ॥ ४४ ॥ मग [14]शशी आणि [15]भानु । ऐसा कल्पिजे जो अनुमानु । तो वातीवरी पवनु । गिवसि[16]तां न दिसे ॥ ४५ ॥ बुद्धीची फुलि[17]का विरे । परि[18]मळ घ्राणीं उरे । तोही [19]शक्तीसवें संचरे । [20]मध्यमेमाजी ॥ ४६ ॥ तंव वरिलेकडोनि [21]ढाळें । [22]चंद्रामृताचें तळें । [23]कानवडोनि मिळे । [24]शक्तिमुखीं ॥ ४७ ॥ तेणें [25]नळिकें रस भरे । तो सर्वांगामाजि संचरे । जेथिंचा तेथ मुरे । [26]प्राणपवनें ॥ ४८ ॥ [27]तातलिये मुसें । मेण निघोनि जाय जैसें । मग कों[28]दली राहे रसें । वोतलेनी ॥ ४९ ॥ तैसें [29]पिंडाचेनि आकारें । ते [30]कळाचि कां अवतरे । वरि त्वचेचेनि [31]पदरें । पांघुरली असे ॥ २५० ॥ जैसी आभाळाची [32]बुंथी । करूनि राहे गभस्ती । मग [33]फिटलिया दीप्ती । धरून ये ॥ ५१ ॥ तैसा [34]ओहाचवरि कोरडा । त्वचेचा असे [35]पातोडा । तो झडोनि जाय कोंडा । जैसा होय ॥ ५२ ॥ मग [36]काश्मीरीचें स्वयंभ । कां रत्नबीजा निघाले कोंभ । अवयवकांतीची [37]भांब । तैसी दिसे ॥ ५३ ॥ ना तरी [38]संध्यारागिचे रंग । काढूनि वळिलें तें आंग । कीं [39]अंतरज्योतिचें लिंग । [40]निर्वाळिलें ॥ ५४ ॥ कुंकुमाचें भरींव । सिद्ध रसाचें वोतींव । [41]मज पाहतां [42]सावेव । शांतीचि ते ॥ ५५ ॥ तें आनंदचित्रींचें [43]लेप । ना तरी महासुखाचें रूप । कीं संतोषतरूचें रोप । [44]थावलें जैसें ॥ ५६ ॥ तो [45]कनकचंपकाचा कळा । कीं अमृताचा [46]पुतळा । नाना [47]सासिं-

---

१ या नावांची नाडी, हींतून वायु वाहूं लागला म्हणजे तो ब्रह्मरंध्रांत जातो नंतर साधकास मोक्षपद मिळतें. २ विषाची वांती करी. ३ अमृतानें. ४ वांचे. ५ विषरूप. ६ सामर्थ्य. ७ पूर्वी सांडलेला. ८ निर्मळ होतात. ९ प्राणाचे वृत्तिभेदानें. दहा प्रकार शरीरांत आहेत. त्यांत प्राण हा सोडून बाकी नऊ—अपान, समान, उदान, व्यान, नाग, कूर्म, कृकर, देवदत्त आणि धनंजय. १० डाव्या नाकपुडींतील नाडी. ११ उजव्या नाकपुडींतील नाडी. १२ ब्रह्म, रुद्र, विष्णु अशा तीन नांवाच्या तीन गाठी शरीरांत आहेत. १३ साहा. १४ चंद्र. १५ सूर्य. १६ शोधितां. १७ विकास. १८ सुगंध. १९ कुंडलिनीबरोबर. २० सुषुम्नेंत. २१ हळूच. २२ मस्तकांत चंद्र आहे त्यांतून अमृत गळत असतें त्याचें तळें. २३ एका अंगानें. २४ कुंडलिनीमध्यें. २५ त्या बाजूच्या नळीनें. २६ तो रस प्राणवायूनें जेथचा तेथेंच मुरतो. २७ तापलेले मुशींतून. २८ गच्च भरलेली. २९ शरीराच्या. ३० कांती. ३१ पडद्यानें. ३२ अभ्रांचा बुरखा. ३३ आभाळ गेल्यावर. ३४ उगाच. ३५ पापोद्रा. ३६ स्फटिकाचें. ३७ शोभा. ३८ संध्याकाळच्या आकाशरंगाचे. ३९ आंतल्या प्रकाशाचें. ४० स्वच्छ केलें. ४१ मला वाटतें. ४२ मूर्तिमंत. ४३ रंग. ४४ स्थिर झालें. ४५ सोनचाफ्याचा. ४६ मूर्ति. ४७ भरास आला.

जला मळा। कोंवळिकेचा ॥ ५७ ॥ हो कां जे शारदियेचेनि वोलें । चंद्रबिंब पाल्हेलें । कां तेजचि मूर्त बैसलें । आसनावरी ॥ ५८ ॥ तैसें शरीर होये। जे वेळीं कुंडलिनी चंद्र पिये। मग देहाकृति बिहे । कृतांत गा ॥ ५९ ॥ .वार्धक्य तरी बहुडे । तारुण्याची गांठी विघडे । लोपली उघडे। बाळदशा ॥ २६० ॥ वयसा तरी येतुलवेरी । येऱ्हवीं बाळाचा बळार्थ करी । धैर्याची थोरी । निरुपम ॥ ६१ ॥ कनकद्रुमाच्या पालवीं । रत्नकळिका नित्य नवी । नखें तैसीं बरवीं । नवीं निघती ॥ ६२ ॥ दांतही आन होती । परि आपाडें सानेजती । जैसीं दुबाहीं बैसे पांती । हिरेयांची ॥ ६३ ॥ माणिकुलियांचिया कणिया । सांवियाचि अणुप्रमाणिया । तैसिया सर्वांगीं उधवती आणिया । रोमांचिया ॥ ६४ ॥ करचरणतळें । जैसीं कां रातोत्पलें । पाखाळीव होतीं डोळे । काय सांगों ॥ ६५ ॥ निडाराचेनि कोंदाटें । मोतियें नावरती संपुटें । मग शिवणी जैसी उकलटे । शुक्तिपल्लवांची ॥ ६६ ॥ तैसी पातियांचिये कवळिये नसमाये । दिठी आकळोनि निघों पाहे । आधिलीचि परी होये । गगना कवळिती ॥ ६७ ॥ आइकें देह होय सोनियाचें । परि लाघव घे वायूचें । जे आप आणि पृथ्वीचे । अंश नाहीं ॥ ६८ ॥ मग समुद्रापैलिकडील देखे । स्वर्गींचा आलोच आइके । मनोगत ओळखे । मुंगियेचें ॥ ६९ ॥ पवनाचा वारिका वळंघे । चाले तरी उदकीं पाउल न लागे । येणें येणें प्रसंगें । येती बहुता सिद्धि ॥ २७० ॥ आइकें प्राणाचा हात धरूनी । गगनाची पाउठी करुनी । मध्यमेचेनि दाराहुनी । हृदया आली ॥ ७१ ॥ ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा । जया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ॥ ७२ ॥ जे शून्यलिंगाची पिंडी । जे परमात्मयाशिवाची करंडी । जे प्रणवाची उघडी । जन्मभूमी ॥ ७३ ॥ हें असो ते कुंडलिनीबाळी। हृदयाआंत आली। तंव अनाहताची बोली । चावळे ते ॥ ७४ ॥ शक्तीचिया आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें । तें तेणें आइकिलें । आळुमाळ ॥ ७५ ॥ घोषाचा कुंडीं । नादचित्रांचीं रुपडीं । प्रणवाचिया

---

१ नाजूकपणाचा. २ शरदृतूच्या. ३ शोभतें, पसरलें. ४ अमृत. ५ भय पावतो. ६ यम. ७ मागें फिरे. ८ वय. ९ येथवर. १० बळशब्दाचा अर्थ. ११ सुवर्णवृक्षाच्या. १२ दुसरे. १३ फार. १४ लहान होतात. १५ दोन्ही बाजूंनीं. १६ पंक्ति. १७ माणिकांच्या. १८ सहज. १९ उद्भवती. २० अग्रें. २१ लाल कमलें. २२ स्वच्छ. २३ निवडल्याप्रमाणें. २४ शिंपल्यांचा जोड. २५ सांधा. २६ सुटे. २७ शिंपा. २८ पापण्यांचें. २९ मिटणें. ३० होत नाहीं, संभवत नाहीं. ३१ दृष्टी. ३२ व्यापून. ३३ स्वाधीन. ३४ चपळता. ३५ पाणी. ३६ जमीन. ३७ दिसतें. ३८ नाद. ३९ घोड्यावर. ४० चढे. ४१ प्रमाणें. ४२ अमानुष शक्ती, सामर्थ्य. ४३ पायरी. ४४ सुषुम्नेचें. ४५ जिन्यावरून. ४६ जीवात्म्याची. ४७ जगद्बीज. ४८ बैठक. ४९ संपुट. ५० ओंकाराची. ५१ या नांवाचा एक प्रकारचा नाद शरीरांत नेहमीं सुरू असतो. ५२ बोलूं लागे. ५३ किंचित्. ५४ नाद ध्वनी. ५५ अनेक नाद. ५६ रूपें मूर्ति.

मोडी । रेखिली ऐसी ॥ ७६ ॥ हेंचि कल्पावें तरी जाणिजे । परि कोल्हिरें कैसें आणिजे । तरि नेणो काय गोजे । तियेठायीं ॥ ७७ ॥ विसरोनि गेलों अर्जुना । जंव नाद नाहीं [4]पवना । तंव वाचा आथी गगना । म्हणऊनि घुमे ॥ ७८ ॥ तया अनाहताचेनि मेघें । आकाश दुमदुमों लागे । तंव ब्रह्मस्थानीचें [5]बेगें । सहज [6]फिटे ॥ ७९ ॥ आइकें कमलगर्भाकारें । जें महदाकाश दुसरें । जेथ चैतन्यें आधातुरें । होऊनि असिजे ॥ २८० ॥ तया हृदयाच्या परिवरीं । कुंडलिनिया परमेश्वरी । तेजाची [11]शिशीरी । [12]विनियो-गिली ॥ ८१ ॥ बुद्धीचेनि शाकें । हौतबोनें निक्षें[14] । द्वैत तेथ न देखे । तैसें केलें ॥ ८२ ॥ निजकांती हारविली । मग प्राणचि केवळ जाहाली । ते वेळीं कैसी गमली । म्हणावी पां ॥ ८३ ॥ हो कां जे पवनाची पुतळी । पांघुरली होती सोनेसळी । ते फेडूनियां वेगळी । ठेविली तिया ॥ ८४ ॥ नातरी वायूचेनि आंगें झगटली । दीपाची दृष्टी निमे-टली । कां लखलखोनि हरपली । वीज गगनीं ॥ ८५ ॥ तैसी हृदयकमळ[18] वेऱ्हीं । दिसे जैसी सोनियाची सरी । ना तरी प्रकाशजळाची [19]झरी । वहात आली ॥ ८६ ॥ मग ते हृदयभूमी [20]पोकळे । [21]जिराली कां एके वेळे । तैसें शक्तीचें रूप मावळे । शक्तीचिमाजी ॥ ८७ ॥ तेऱ्हां तरी शक्तीचि म्हणिजे । येऱ्हवीं तो प्राण केवळ जाणिजे । आतां [22]नादबिंदु नेणिजे । कळाज्योती ॥ ८८ ॥ मनाचा हन मार । कां पवनाचा आधार । ध्यानाचा आदर । नाहीं परी ॥ ८९ ॥ हे कल्पना घे सांडी । ते नाहीं इये पैरवडी । हे महाभूतांची [24]फुडी । ओटणी [25]देखा ॥ २९० ॥ पिंडें पिंडाचा ग्रास । तो हा नाथसंके-तींचा दंश[26] । परि दाऊनि गेला उद्देशें[27] । श्रीमहाविष्णु ॥ ९१ ॥ तया ध्वनिताचें [29]कणें सोडुनी । यथार्थाची घडी झाडुनी । [30]उपलविली म्यां जाणुनी । [31]मोहीक श्रोते ॥ ९२ ॥

**युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।**
**शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥**

ऐकें शक्तीचें तेज जेऱ्हां लोपे । तेथ देहाचें रूप हारपे । मग तो डोळयामाजि लपे । जगाचिया ॥ ९३ ॥ येऱ्हवीं [32]आधिलाचि ऐसें । [33]सावयव तरी दिसे । परि वायूचें जैसें । वळिलें होय ॥ ९४ ॥ नातरी [34]कर्दळीचा गाभा । [35]बुंथी सांडोनि उभा । कां अवयवांचि

१ आकारानें. २ कल्पना करणारें. ३ वाजे. ४ वायुला. ५ आहे. ६ शब्द करी. ७ खिळी. ८ निघे. ९ अधांतरीं. १० घरीं. ११ न्याहारी. १२ व्यवस्था केली. १३ नैवेद्य. १४ चांगले. १५ पीतांबर. १६ लागली. १७ झांकली. १८ हृदयकमलापर्यंत. १९ झरा. २० पोकळीमध्यें. २१ लय पावे. २२ मध्यमा वाचा. २३ स्थितींत. २४ स्पष्ट. २५ निर्मळ दशा. २६ शिव संप्रदा-यांतील. २७ गुप्तगोष्ट. २८ हेतु. २९ कठीण अर्थ टाकून. ३० विस्तारिली. ३१ ग्रहण करण्या योग्य. ३२ आधींच्यासारखेंच. ३३ साकार. ३४ केळीचा. ३५ बाहेरील सोपटें.

नेभा । उदयला[2] तो ॥ ९५ ॥ तैसें होय शरीर । तैं तें म्हणिजे खेचर[3] । हें पद[4] होतां चमत्कार । पिंडजनीं[5] ॥ ९६ ॥ देखें साधक[6] निघोनि जाये । मागां पाउलांची वोळ राहे । तेथ ठायीं ठायीं होये । अणिमादिक[7] ॥ ९७ ॥ परि तेणें काय काज आपणपयां[8] । अवधारीं ऐसा धनंजया । लोप आथी[9] भूतत्रया[10] । देहींच्या देहीं ॥ ९८ ॥ पृथ्वीतें आप[11] विरवी । आपातें तेजें[12] जिरवी । तेजातें पवनें[13] हरवी । हृदयामाजी ॥ ९९ ॥ पाठीं आपण एकला उरे । परि शरीराचेनि अनुकारें[14] । मग तोही [15]निगे अंतरें । गगना[16] मिळे ॥ ३०० ॥ ते वेळीं कुंडलिनी हे भाष[17] जाये । मग मारुत ऐसें नाम होये । परि शक्तीपण तें आहे । जंव न मिळे [18]शिवीं ॥ १ ॥ मग जालंधर[19] सांडी । ककारांत[20] फोडी । गगनाचिये पौडी[21] । [22]पैठी होय ॥ २ ॥ ते ओंकाराचिये पाठी । पाय देत उठाउठी । पश्यंतीचिये[23] पाउटी[24] । मागां घाली ॥ ३ ॥ पुढें तन्मात्रा[25] अर्धवरी । आकाशाच्या अंतरीं । भरती गमे सागरीं । सरिता[26] जेवीं ॥ ४ ॥ मग ब्रह्मरंध्रीं[27] स्थिरावोनी । सोहंभावाच्या[28] बाह्या पसरूनी । परमात्मलिंगा[29] धावोनी । आंगा घडे ॥ ५ ॥ तंव महाभूतांची जवनिका[30] फिटे । मग दोहींसि होय झटें[31] । तेथ गगनासकट आटे । समरसीं[32] तिये ॥ ६ ॥ पैं मेघाचेनि मुखीं निवडला[33] । समुद्र कां वोघीं पडिला । तो मागुता जैसा आला । आपणपयां ॥ ७ ॥ तेवीं पिंडाचेनि[34] मिषें । पदीं[35] पद प्रवेशे । तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ॥ ८ ॥ आतां दुजें हन होतें । कीं एकचि हें आइतें । ऐसिये विवंचनेपुरतें । उरेचिना ॥ ९ ॥ गगनीं गगन लया जाये । ऐसें जें कांहीं आहे । तें अनुभवें जो होय । तो होऊनि[36] ठाके ॥ ३१० ॥ म्हणोनि तेथिंचीं मात । न चढेचि बोलाचा हात । जेणें संवादाचिया गांवाआंत । पैठी कीजे ॥ ११ ॥ अर्जुना येऱ्हवीं तरी । इया अभिप्रायाचा जे गर्व धरी । ते पाहें पां वैखरी[37] । दूरी ठेली ॥ १२ ॥ भ्रूलता[38] मागलीकडे । तेथ मकाराचेंचि[39] आंग न मांडे । सडेयां[40] प्राणा सांकडें[41] । गगना येतां ॥ १३ ॥ पाठीं तेथेंचि तो मेसळला[42] । तैं शब्दाचा [43]दिवो मावळला । मग तयाही वरी आटु[44] मविन्नला[45] । आकाशाचा ॥ १४ ॥ आतां महाशून्याचिया[46] डोहीं । जेथ

---

१ आकाशास. २ उत्पन्न झाला. ३ आकाशांत जाणारे. ४ सिद्धि. ५ लोकांत. ६ योगाभ्यास करणारा. ७ 'अणिमा महिमा लघिमा गरिमा प्राप्तिः प्राकाम्यं, ईशित्वं वशित्वं या आठ सिद्धि. ८ आपल्याला. ९ आहे. १० पृथ्वी, आप, तेज. ११ उदक. १२ अग्नि. १३ वायु. १४ आकारें. १५ निघोन. १६ आकाशाला. १७ बोलणें, नांव. १८ ब्रह्मांत. १९ या नावाचा बंध. २० सुषुम्नानाडी. २१ बराबर. २२ प्रविष्ट. २३ परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या चार वाचांतील दुसरीच्या. २४ पायरी. २५ सूक्ष्मभूतें. २६ नदी. २७ मस्तकाच्या पोकळींत. २८ परमात्माच मी अशी भावना. २९ परब्रह्माचें चिन्ह. ३० पडदा. ३१ ऐक्य. ३२ ब्रह्मानंदीं. ३३ दिघला. ३४ देहाच्या निमित्तानें. ३५ ब्रह्मपदीं. ३६ सिद्ध होतो. ३७ वाणी. ३८ भ्रुकुटीच्या. ३९ ओंकारांतील तिसरी मात्रा, तुर्यावस्था. ४० एकटयाला. ४१ संकट. ४२ मिसळला. ४३ दिवस. ४४ आटणी. ४५ झाला. ४६ ब्रह्माच्या.

गगनासीचि ठावो नाहीं । तेथ तागा लागेल काई । बोलाचा इया ॥ १५ ॥ म्हणूनि आखरामाजि सांपडे । कीं कानावरी जोडे । हें तैसें नव्हे फुडें । निश्चयेंसी गा ॥ १६ ॥ जें कांहीं देवें[1] अनुभविलें फावे । तें आपणचि हें ठाकावें । होऊनियां ॥ १७ ॥ पुढती जाणणें तें नाहींचि । म्हणोनि असो किती हेंचि । बोलावें आतां वायांचि । धनुर्धरा ॥ १८ ॥ ऐसें शब्दजात मोघौतें सरे । तेथ संकल्पाचें आयुष्य पुरे । वाराही जेथ न शिरे । विचाराचा ॥ १९ ॥ जें उन्मनियेचें लावण्य । जें तुर्येचें तारुण्य । अनादि जें अगण्य । परमतत्त्व ॥ ३२० ॥ जें विश्वाचें मूळ । जें योगद्रुमाचें फळ । जें आनंदाचें केवळ । चैतन्य गा ॥ २१ ॥ जें आकाराचा प्रांत । जो मोक्षाचा एकांत । जेथ आदि आणि अंत । [21]विरोनि गेले ॥ २२ ॥ जें महाभूतांचें बीज । जें महातेजाचें तेज । एवं पार्था जें निज । स्वरूप माझें ॥ २३ ॥ ते हे चतुर्भुज कोंभेली । जयाची शोभा रूपासि आली । देखोनि नास्तिकीं नोकिलीं । भक्तवृंदें ॥ २४ ॥ तें अनिर्वाच्य महासुख । पैं आपणचि जाहले जे पुरुष । जयांचे कां निकर्ष । प्राप्तिवरी ॥ २५ ॥ आम्ही साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरा जिहीं केलें । ते आमुचेनि पाडें आले । निर्वाळलेया ॥ २६ ॥ परब्रह्माचेनि रसें । देहाकृतीचियेनि मुसें । वोतीव जाहाले तैसे । दिसती आंगें ॥ २७ ॥ जरि हे प्रतीति हन अंतरीं फांके । तरी विश्वचि हें अवघें झांके । तंव अर्जुन म्हणे निकें । साचचि जी हें ॥ २८ ॥ कां जे आपण आतां देव । हा बोलिले जो उपाव । तो प्राप्तीचा ठाव । म्हणोनि घडे ॥ २९ ॥ इये अभ्यासीं जे दृढ होती । ते ऐसेनि ब्रह्मस्था येती । हें सांगतियाचि रीती । कळलें मज ॥ ३३० ॥ देवा गोठी हे ऐकतां । बोध उपजतसे चित्ता । मा अनुभवें तल्लीनता । नोहेल कां ॥ ३१ ॥ म्हणऊनि एथ कांहीं । अनारिसें नाहीं । परि मीवभरी चित्त देईं । बोला एका ॥ ३२ ॥ आतां कृष्णा तुवां सांगितला योग । तो मना तरी आला थांग । परि न शके करूं पांग । योग्यतेचा ॥ ३३ ॥ सहजें आंगिकें जेतुलें आहे । तेतुलियाचि जरि सिद्धि जाये । तरि हाचि मार्ग सुखोपायें । अभ्यासीन ॥ ३४ ॥ ना तरी देव जैसें सांगतील । तैसें

---

१ ठिकाण. २ थांग. ३ अक्षरांत. ४ सत्य. ५ नशिबानें. ६ भास होतें. ७ राहावें. ८ नंतर. ९ व्यर्थ. १० सर्व बोलणें. ११ मागें. १२ समाधि. १३ सौंदर्य. १४ समाधिअवस्था. १५ ज्याला आदि नाहीं असें. १६ मोजण्यास अशक्य. १७ ब्रह्मस्वरूप. १८ योगरूप वृक्षाचें. १९ जीव. २० शेवट. २१ लय पावले. २२ मूळकारण. २३ एतावता. २४ बहराला आली. २५ कलली. २६ बोलण्यास अशक्य. २७ निश्चय. २८ प्राप्तीपर्यंत. २९ बरोबरीनें. ३० निर्मळपणास. ३१ अनुभव. ३२ सत्यच. ३३ ठिकाण. ३४ खात्रीनें. ३५ सांगितल्याप्रमाणें. ३६ गोष्ट. ३७ तर मग. ३८ तद्रूपपणा. ३९ कशी होणार नाहीं. ४० खोटें, मिथ्या. ४१ क्षणभर. ४२ बोभाटा. ४३ हीनपणा. ४४ स्वतःचें साध्य. ४५ जेवढें. ४६ तेवढ्यानेंच.

आपणपें जरी न [1] ठेकेल । तरी योग्यतेवीण होईल । तेंचि पुसों [2] ॥ ३५ ॥ जीवींचिये ऐसी धारण [3] । म्हणोनि पुसावया जाहालें कारण । मग म्हणे तरी आपण । चित्त देईजो [4] ॥ ३६ ॥ हां होजी अवधारिलें । जें हें साधन तुह्मी निरूपिलें । तें आवडतयाहि [5] अभ्यासिलें । फावों [6] शंके ॥ ३७ ॥ कीं योग्यतेवीण नाहीं । ऐसें हन आहे कांहीं । तेथ श्रीकृष्ण म्हणती काई । धनुर्धरा ॥ ३८ ॥ हें कांज [7] कीर [8] निर्वाण । परि आणिकही जें कांहीं साधारण । तेंही अधिकाराचे वोडवेविण [10] । काय सिद्धी जाय ॥ ३९ ॥ पैं योग्यता [11] जे म्हणिजे ते प्राप्तीचि [12] अधीन [13] जाणिजे । कां जे योग्य होऊनि कांजे । तें आरंभिलें फळे [14] ॥ ३४० ॥ तरी तैसी एथ कांहीं । सावियांचि [15] केणी नाहीं । आणि योग्यतेची काई । खाणी असे ॥ ४१ ॥ नीविक्र [16] विरक्त । जाहला देहधर्मी [17] नियत [18] । तरि तोचि नव्हे व्यवस्थित । अधिकारिया ॥ ४२ ॥ येतुलालिये [19] आयणीमाजि [20] येवढें । योग्यपण तुतेंही जोडे । ऐसें प्रसंगें सांकडें [21] । फेडिलें तयाचें ॥ ४३ ॥ मग म्हणे पार्था । ते हे ऐसी व्यवस्था । अनियतासि [22] सर्वथा । योग्यता नाहीं ॥ ४४ ॥

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥

जो रसनेंद्रियाचा [23] अंकिला [24] । कां निद्रेसि [25] जीवें विकला । तो नाहीं एथ म्हणितला [26] । अधिकारिया ॥ ४५ ॥ अथवा आग्रहाचिये [27] बांदोडी [28] । क्षुधा तृषा कोंडी । आहारातें तोडी । मारूनियां ॥ ४६ ॥ निद्रेचिया वाटा नवचे । ऐसा [29] दृढिवचेनि अव्हेरणें नाचे । तें शरीरचि नव्हे तयाचें । मग योग कवणाचा ॥ ४७ ॥ म्हणोनि अतिशयें विषय सेवावा [30] । ऐसा बोध नोहावा [31] । कां सर्वथा निरोधावा [32] । हेंही नको ॥ ४८ ॥

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

आहार तरी सेविजे । परि युक्तीचेनि [33] मापें मविजे [34] । क्रियाजात [35] आचरिजे । तयाचि स्थिती [36] ॥ ४९ ॥ मोपितला [37] बाल बोलिजे । मितलिया [38] पाउलीं चालिजे । निद्रेही मान

१ प्राप्त न होईल. २ विचारूं. ३ इच्छा. ४ द्यावें. ५ भलत्यालाही. ६ प्राप्त होईल काय? ७ कार्य. ८ निश्चयें. ९ कठीण. १० योग्यतेवांचून. ११ अधिकार. १२ प्राप्तीच्या. १३ स्वाधीन. १४ तत्काळ मिळणारा. १५ पदार्थ. १६ क्षणभर. १७ विषयेच्छा इ०. १८ नेमाचा. १९ एवढालें. २० इच्छेंत, युक्तींत. २१ संशय. २२ जो नेमानें वागत नाहीं त्याला. २३ जिव्हेचा. २४ अंकित झाला. २५ सर्वथैव. २६ मानला. २७ बंधन. २८ हट्टाच्या. २९ नादानें. ३० भोगावा. ३१ न व्हावा. ३२ बंद करावा. ३३ प्रमार्गें. ३४ मोजावा. ३५ सर्व कर्में. ३६ बेतानें. मोजका. ३७ परिमित.

कीजे । अवसरें एकें ॥ ३५० ॥ जागणें जरी जाहालें । तरी व्हावें तें मितलें । येतलेनि धातुसाम्य संचलें । असेल सुख ॥ ५१ ॥ ऐसें युक्तीचेनि हातें । जैं इंद्रियां वोपिजे आर्तें । तैं संतोषासी वाढते । मनाचि करी ॥ ५२ ॥

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।**
**निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥**

बाहेर युक्तीची मुद्रा पडे । तंव आंत आंत सुख वाढे । तेथें सहजेंचि योग घडे । नाभ्यासितां ॥ ५३ ॥ जैसें भाग्याचिये भडसें । उद्यमाचेनि मिषें । मग समृद्धिजात आपैसें । घर रिघे ॥ ५४ ॥ तैसा युक्तिमंत कौतुकें । अभ्यासाचिया मोहरां ठाके । आणि आत्मसिद्धीचि पिके । अनुभव तयाचा ॥ ५५ ॥ म्हणोनि युक्ति हे पांडवा । घडे जया सदैवा । तो अपवर्गाचिये राणिवां । अळंकारिजे ॥ ५६ ॥

**यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।**
**योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥**

युक्ति योगाचें आंग पावे । ऐसें प्रयाग जेथ होय बरवें । तेथ क्षेत्रसंन्यासें स्थिरावे । मानस जयाचें ॥ ५७ ॥ तयातें योगयुक्त तूं म्हण । हेंही प्रसंगें जाण । तें दीपाचें उपलक्षण । निर्वातींचिया ॥ ५८ ॥ आतां तुझें मनोगत जाणोनी । कांहीं एक आम्ही म्हणोनी । तें निकें चित्त देऊनी । परिसावें गा ॥ ५९ ॥ तूं प्राप्तीची चाड वाहसी । परि अभ्यासीं दक्ष न होसी । तें सांग पां काय बिहसी । दुवाडपणें ॥ ३६० ॥ तरि पार्था हें झणें । सायास घेशी हो मनें । वायां बागुल इयें दुर्जनें । इंद्रियें करिती ॥ ६१ ॥ पाहें पां आयुष्यातें अढळ करी । जें सरतें जीवित वारी । तया औषधातें वैरी । काय जिव्हा न म्हणे ॥ ६२ ॥ ऐसें हितासि जें जें निकें । तें सदांचि या इंद्रियां दुःखें । येऱ्हवीं सोपें योगासारिखें । कांहीं आहे ॥ ६३ ॥

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥**

---

१ थोडकें. २ शरीरगत रक्तादि सात धातूंचें सारखेंपण. ३ देणें. ४ पोटगी. ५ वृद्धि. ६ चर्या. ७ पूरानें. ८ उद्योगाच्या निमित्तानें. ९ सर्व संपत्ति. १० आपोआप. ११ नेमानें वागणारा. १२ अभिमुख, समोर. १३ दैववानाला. १४ मोक्षाच्या. १५ राज्यास. १६ शोभिवतो, योग्य होतो. १७ ज्या स्थळीं नियम केला तें स्थळ शरीर असेपर्यंत न सोडणें. १८ उपमा. १९ वारा नसलेल्या ठिकाणच्या, निवाऱ्यांतल्या. २० सांगतों तें, २१ चांगलें. २२ इच्छा धरतोस २३ सावध. २४ भितोस. २५ दुर्घट म्हणून. २६ कदाचित्. २७ धास्ती. २८ भय दाखविणारा. २९ स्थिर. ३० संपणाऱ्या जीविताला मागें आणतें. ३१ वाईट लागतें.

सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥

ह्मणोनि आसनाचिया गाढिका । जो आह्मीं अभ्यास सांगितला निका । तेणें होईल तरी हो कां । निरोधु[2] ययां ॥ ६४ ॥ येऱ्हवीं तरी येणें योगें । जें इंद्रियां विंदाण[3] लागे । तैं चित्त भेटों रिगे । आपणपेयां[4] ॥ ६५ ॥ परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियातें आपण देखे । देखत[5] खेंवो वोळखे । ह्मणे तत्त्व[6] हें मी ॥ ६६ ॥ तिये वोळखीचि सरिसें[7] । सुखाचिया साम्राज्यीं बैसे । मग आपणपां समरसें[8] । विरोनि[9] जाय ॥ ६७ ॥ जयापरतें आणिक नाहीं । जयातें इंद्रियें नेणती कंहीं[10] । तें आपणचि आपुलया ठायीं । होऊनि ठाके ॥ ६८ ॥

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥

मग मेरूपासूनि[11] थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें । दाटिजो[12] पां परी भारें । चित्त न दाटे[13] ॥ ६९ ॥ कां शस्त्रें वरी तोडिलिया । देह अग्नीमाजि पडलिया । चित्त महासुखीं पहुडलिया[14] । चेवो[15] नेये ॥ ३७० ॥ ऐसें आपणपां[16] रिगोनि ठाये । मग देहाची वास[17] न पाहे । आणिकचि सुख होऊनि जाये । ह्मणूनि विसरे ॥ ७१ ॥

तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।
स निश्चयेन योक्तव्यो योगो निर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

जया सुखाचिया गोडी । मन आर्तीची[18] सेचि[19] सोडी । संसाराचें[20] तोडी । गुंतलें जें ॥ ७२ ॥ जें योगाची बरव[21] । संतोषाची राणिव[22] । ज्ञानाची जाणिव[23] । जयालागीं ॥ ७३ ॥ तें अभ्यासिलेनि योगें । सावयव[24] देखावें लागे । देखिलें तरी आंगें[25] । होइजेल गा ॥ ७४ ॥

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।
मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥

तरि तोचि योग बापा । एक परि आहे सोपा । जरी पुत्रशोक[26] संकल्पा । दाखवीजे

१ दृढपणानें. २ अटक. ३ निग्रह. ४ आपल्या स्वतःलाच. ५ पाहतांच, तत्क्षणीं. ६ स्वरूप. ७ बरोबर. ८ ब्रह्मानंदानें. ९ नाश पावतें. १० कधीं. ११ मेरूपेक्षां. १२ दडपला जावो. १३ विकार पावत नाहीं. १४ निजलें असतां. १५ जागें होत नाहीं. १६ आत्मस्वरूपांत. १७ वाट. १८ इच्छेची. १९ आठवणच. २० संसाराचें गुंताडें. २१ शोभा. २२ राज्य. २३ ज्ञातेपणा. २४ मूर्तिमंत. २५ आपणच, स्वतःच. २६ संकल्पाला पुत्रशोक होईल तर, ह्मणजे संकल्पाचे पुत्र जे कामक्रोधादिक ते नाहींसे झाले तर.

७५ ॥ हा विषयांतें निमालिया आइके । इंद्रियें नेमाचिया धारणीं देखे । तरी [४]हियें । ग्रौंलूनि मुके । जीविल्वासीं ॥ ७६ ॥ ऐसें वैराग्य हें करी । तरी संकल्पाचि सरे वारी । सुखें धृतीचिया धवळारीं । बुद्धि नांदे ॥ ७७ ॥

**शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥**
**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥**

बुद्धि धैर्या होय वैसौटा । तरी मनातें अनुभवाचिया वाटा । हळु हळु आणूनि करी प्रतिष्ठा । आत्मभुवनीं ॥ ७८ ॥ याही एके परी । प्राप्ति आहे विचारीं । हें न [११]ठके तरी सोपारी । आणिक ऐकें ॥ ७९ ॥ आतां नियमचि हा एकला । [१४]जीवें करावा आपुला । जैसा कृतनिश्चयाचिया बोला । बाहेरा नोहे ॥ १८० ॥ जरी येतुलेनि [१६] चित्त स्थिरावे । तरी कांजा आलें स्वभावें । नाहीं तरी घालावें । मोकळूनी ॥ ८१ ॥ मग मोकलिलें जेथ जाईल । तेथूनि नियमूचि घेऊनि येईल । ऐसेनि स्थैर्यचि होईल । सांवियाचि कीं ॥ ८२ ॥

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥**

पाठीं केलुलेनि एके वेळे । तया [२२]स्थैर्याचेनि मेळें । आत्मस्वरूपा जवळें । येईल सहजें ॥ ८३ ॥ तयातें देखोनि आंगा घडेल । तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल । आणि ऐक्य तेजें उघडेल । त्रैलोक्य हें ॥ ८४ ॥ आकाशीं दिसे दुसरें । तें अभ्र जें विरे । तें गगनचि कां भरे । विश्व जैसें ॥ ८५ ॥ तैसें चित्त लया जाये । आणि चैतन्यचि आघवें होये । ऐसी प्राप्ति सुखोपायें । आहे येणें ॥ ८६ ॥

**युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥**

या सोपैया योगस्थिती । उकल देखिला गा बहुतीं । संकल्पाचिया संपत्ती । रुसो-

---

१ संकल्प. २ लय पावले असतां. ३ स्थितींत. ४ हृदय. ५ फुटून. ६ यात्रा, येरझारा. ७ धैर्याच्या. ८ महालांत. ९ आश्रय. १० स्थीरता. ११ हें घडत नसल्यास. १२ सुलभ असें. १३ मनापासून. १४ केलेल्या निश्चयाच्या. १५ फिरणार नाहीं. १६ एवढ्यानें. १७ कामीं पडेल. १८ सोडून. १९ मोकळें सोडलेलें. २० तत्काळ. २१ कांहीं वेळानें. २२ योगानें. २३ स्वतः. २४ आत्मज्ञानांत. २५ भेदबुद्धि. २६ सर्वत्र ऐक्याचा प्रकाश होईल. २७ ढग. २८ ब्रह्मरूप. २९ सगळें. ३० सुलभ. ३१ अनुभव.

नियां ॥ ८७ ॥ ते सुखाचेनि [1]सांगातें । आलें परब्रह्म [2]आंतौतें । तेथ [3]लैवण जैसें जळातें । सांडूं नेणें ॥ ८८ ॥ तैसें होय तिये मेळीं । मग [4]सामरस्याचिया [5]राउळीं । महासुखाची [6]दिवाळी । [7]जगांसि दिसे ॥ ८९ ॥ ऐसें आपले [8]पायवरी । चालिजे आपुले पाठीवरी । हें पार्थां [9]नागवे तरी । [10]आंन ऐकें ॥ ३९० ॥

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥
यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।
तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

तरी मी तंव सकळ देहीं । असें एथ [11]विचार नाहीं । आणि तैसेंचि माझ्याठायीं । सकळ असे ॥ ९१ ॥ हें ऐसेंचि [12]संचलें । परस्परें मिसळलें । बुद्धी [13]घेपे एतुलें । होआवें गा ॥९२॥ येऱ्हवीं तरी अर्जुना । जो [14]ऐकवटलिया भावना । सर्वभूतीं अभिन्ना । मातें भजे ॥९३॥ भूतांचेनि अनेकपणें । अनेक नोहे अंतःकरणें । केवळ एकत्वचि माझें जाण । सर्वत्र जो ॥ ९४ ॥ मग तो एक हा [15]मियां । बोलतां दिसतसे वायां । येऱ्हवीं न बोलिजे तरि धनंजया । तो मीचि आहें ॥ ९५ ॥ दीपा आणि प्रकाशा । [16]ऐकंवकीचा पाँड जैसा । तो माझ्याठायीं तैसा । मी तयामाजी ॥ ९६ ॥ जैसा उदकाचेनि [17]आयुष्यें रस । कां गगनाचेनि मानें [18][19]अवकाश । तैसा माझेनि रूपें [20]रूपस । पुरुष तो गा ॥ ९७ ॥

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥

जेणें [21]ऐक्याचिये दिठी । सर्वत्र मातेंचि किरीटी । देखिला जैसा [22]पटीं । तंतु एक ॥ ९८ ॥ कां [23]स्वरूपें तरी बहुतें आहाती । परि तैसीं [24]सोनीं बहुवें न होती ऐसी [25]ऐक्याचक्राची स्थिती । केली जेणें ॥ ९९ ॥ नातरी वृक्षांचीं पानें जेतुलीं । तेतुलीं रोपें नाहीं लाविलीं । ऐसी अद्वैतदिवसें [26]पाहिली । रात्री जया ॥ ४०० ॥ तो [27]पंचात्मकीं सांपडे । तरी मग सांग पां कैसेनि [28]अडे । तो [29]प्रतीतीचेनि पाडें । मजसीं [30]तुंके ॥ १ ॥ माझें व्यापक-

---

१ सहित. २ आंत. ३ मीठ. ४ ब्रह्मानंदाच्या मंदिरांत. ५ उत्साह. ६ जगतास. ७ पायांनीं. ८ मागलेकडे, उलटें. ९ प्राप्त होत नाहीं, घडत नाहीं. १० दुसरें. ११ संशय. १२ भरलेलें. १३ बुद्धीनें घेतलें जाईल एवढें. १४ समभावानें. १५ मी. १६ एका आकाराचा. १७ योग्यता. १८ असतेपणानें, आहे तोंपर्यंत. १९ पोकळी. २० रूपवान्. २१ ऐक्यदृष्टीनें. २२ वस्त्रांत. २३ दिसण्यांत, अलंकार. २४ सुवर्णें. २५ ऐक्यतेची. २६ उजेडली. २७ पंचभूतात्मक शरीरांत. २८ प्रतिबंध पावे. २९ अनुभवाच्या बरोबरीनें. ३० तोलला जातो.

पण आघवें । गेवसलें तयाचेनि अनुभवें । तरी न ह्मणतां स्वभावें । [2]व्यापक जाहाला ॥ २ ॥ आतां शरीरीं तरी आहे । परि शरीराचा तो नोहे । ऐसें बोल वरी होये । तें करूं ये ॥ ३ ॥

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥

ह्मणोनि असों ते [3]विशेषें । अथवा [3]आपणपेंयासारिखें । जो चराचर देखें । अखंडित ॥ ४ ॥ सुखदुःखादि वर्मे । कां [4]शुभाशुभें कर्मे । दोनी ऐसी मनोधर्मे । नेणेचि जो ॥ ५ ॥ हे [5]समविषम भाव । आणिकही विचित्र जें सर्व । तें मानी जैसे अवयव । आपुले होती ॥ ६ ॥ हें एकैक काय सांगावें । जया त्रैलोक्यचि आघवें । मी ऐसें [6]स्वभावें । [7]बोधा आलें ॥ ७ ॥ तयाहि देह एक [8]कीर [9]आथी । [10]लौकिकीं सुखदुःखी तयातें ह्मणती । परि आह्मांतें ऐसी प्रतीती । परब्रह्मचि हा ॥ ८ ॥ ह्मणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होइजे । ऐसें साम्यचि एक [11]उपासिजे । पांडवा गा ॥ ९ ॥ हें तूतें बहुतीं प्रसंगीं । आह्मी ह्मणों याचिलागीं । जे [12]साम्यापरौती जगीं । प्राप्ति नाहीं ॥ ४१० ॥

अर्जुन उवाच—योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।
एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥
चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

तंव अर्जुन ह्मणे देवा । तुह्मी सांगा कीर आमुचा [13]कौणवा । परि न [14]पुरें जी स्वभावा । मनाचिया ॥ ११ ॥ हें मन कैसें केवढें । ऐसें पाहों ह्मणो तरी न सांपडे । येऱ्हवीं [15]रोहाटा वया थोडें । त्रैलोक्य यया ॥ १२ ॥ ह्मणोनि ऐसें कैसें घडेल । जें [16]मर्कट समाधी येइल । कां राहा ह्मणितलिया राहेल । [17]महावात ॥ १३ ॥ जें बुद्धीतें [18]सळी । निश्चयातें टाळी । धैर्येंसीं [19]हातफळी । मिळऊनि जाय ॥ १४ ॥ जें विवेकातें भुलवी । संतोषासी [20]चाड लावी । बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा ॥ १५ ॥ जें निरोधलें घे [21]उवातो । जया [22]संयमचि

१ सांपडलें. २ सर्व ठिकाणीं असणारा. ३ आपणच, मीच अशा भावनेनें अथवा आपल्या सारखे. ४ चांगली वाईट. ५ सुखदुःख. ६ सहज. ७ अनुभवास. ८ निश्चयें. ९ आहे. १० लोकांत. ११ अभ्यास करावा. १२ समदृष्टीपलीकडे. १३ दयेनें. १४ पुरें पडणार नाहीं. १५ फिरण्यास. १६ माकड. १७ मोठा वारा. १८ छळी. १९ हां हां ह्मणतां. २० इच्छा. २१ प्रसर. २२ निग्रह.

होय सावावो । तें मन आपुला स्वभावो । सांडील काई ॥ १६ ॥ ह्मणोनि मन एक निश्चळ[2] राहेल । मग आह्मांसि साम्य होईल । हें विशेषेंही न घडेल । यांचिलागी ॥ १७ ॥

श्रीभगवानुवाच–असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

तंव श्रीकृष्ण ह्मणती साचाचि । बोलत आहासि तें तैसेंचि । यया मनाचा कीर्रे चपळचि । स्वभावो गा ॥ १८ ॥ परि वैराग्याचेनि आधारें । जरि लाविलें अभ्यासाचिये मोहरें । तरि केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल ॥ १९ ॥ कां जें यया मनाचें एक निकें । जे देखिले गोडीचिया ठाया[11] सोके । ह्मणोनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत[12] जाइजे ॥ ४२० ॥

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।
वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥

येऱ्हवीं विरक्ति[3] जयांसि नाहीं । जे अभ्यासीं न रिघती कहीं । तयां नोंकळे हें आह्मीही । नेमनूं कायी ॥ २१ ॥ परि यमनियमाचिया वाटा न वंचिजे । कहीं वैराग्याची[15] से न करिजे । केवळ विषयजळीं ठाकिजे । बुडी देउनी ॥ २२ ॥ यया जालिया मानसा कहीं । युक्तीची कांवि लागली नाहीं । तरी निश्चळ होईल काई । कैसेनि[20] सांगे ॥ २३ ॥ ह्मणोनि मनाचा निग्रह होये । ऐसा उपाय जो आहे । तो आरंभीं[22] मग नोहे । कैसा पाहों ॥ २४ ॥ तरी योगसाधन जितुकें । तें अवघेंचि काय लटिकें । परि आपणयां[23] अभ्यासें न टके[24] । हेंचि ह्मणे ॥ २५ ॥ आंगीं योगाचें होय बळ । तरि मन केतुलें[25] चपळ । काय महदादि[26] हें सकळ । आपु[27] नोहे ॥ २६ ॥ तेथ अर्जुन ह्मणे निकें । देवो बोलती तें न चुके । साचचि योगबळेंसी[28] ने तुके[29] । मनोबळ ॥ २७ ॥ तरि तोचि योग कैसा केवि जाणों । आह्मी येतुले[30] दिवस याची मोतुही[31] नेणों । ह्मणोनि मनातें जी ह्मणों । अनोवर[32] ॥ २८ ॥ हा आतां आघवेया[33] जन्मा । तुह्मेनि प्रसादें[34] पुरुषोत्तमा । योगपरिचय[35] आह्मा । जाहाला आजी ॥ २९ ॥

१ सहाय. २ स्थिर. ३ या करतां. ४ खरें. ५ निश्चयें. ६ साह्यानें, मदतीनें. ७ रस्त्याला. ८ कांहीं अवकाशानें. ९ चांगलें. १० ठिकाणास. ११ चटक लागून राहते. १२ कौतुकानें. १३ वैराग्य. १४ प्राप्त होत नाहीं. १५ मानीत नाहीं काय? १६ न जावें. १७ आठवण. १८ जन्मापासून. १९ संवय. २० कसे. २१ प्रतिबंध. २२ आरंभ कर. २३ आपणाला. २४ होत नाहीं, करवत नाहीं. २५ किती. २६ मूळमाया आदि. २७ प्राप्त. २८ योगसामर्थ्याशीं. २९ बरोबरी पावत नाहीं. ३० इतके. ३१ गोष्टही. ३२ अजिंक्य. ३३ सगळ्या जन्मांत. ३४ कृपेनें. ३५ माहिती.

अर्जुन उवाच—अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।
अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥
कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥
एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

परि आणीक एक गोसांवियां । मज संशय असे सांविया । तो तूंवांचूनि फेडावया । समर्थ नाहीं ॥ ४३० ॥ ह्मणोनि सांगें श्रीगोविंदा । कवण एक मोक्षपदा । आंबेत होता श्रद्धा । उपायेंविण ॥ ३१ ॥ इंद्रियग्रामौनि निगाला । आस्थेचिये वाटा लागला । आत्मसिद्धीचिया पुढिला । नगरा यावया ॥ ३२ ॥ तंव आत्मसिद्धि न ठकेचि । आणि मागुतें न येववेचि । ऐसा अस्तु गेला माझारींचि । आयुष्यभानु ॥ ३३ ॥ जैसें अकाळीं आभाळ । अळुमाळ सपातळ । विपायें आलें केवळ । वसे ना वर्षे ॥ ३४ ॥ तैसी दोन्ही दुरावलीं । जे प्राप्ती तंव अलग ठेली । आणि अप्राप्तिही सांडवली । श्रद्धा तया ॥ ३५ ॥ ऐसा दोहीं अंतरला कांजी । जो श्रद्धेच्या समाजीं । बुडला तया होजी । कवण गति ॥ ३६ ॥

श्रीभगवानुवाच—पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।
न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

तंव श्रीकृष्ण ह्मणती पार्था । जया मोक्षसुखीं आस्था । तया मोक्षावांचूनि अन्यथा । गती आहे गा ॥ ३७ ॥ परि एतुलें हेंचि एक घडे । जें माझारीं विसावावें पडे । तेंही परि ऐसेनि सुरवाडें । [27]जो देवां नाहीं ॥ ३८ ॥ येऱ्हवीं अभ्यासाचा उचलता । पाउलीं जरी चालता । तरि दिवसाआधीं ठाकिता । [31]सोहंसिद्धीतें ॥ ३९ ॥ परि तेतुला वेग नव्हेचि । ह्मणऊनि विसावा तरि निकाचि । पाठीं मोक्ष तंव तैसाचि । ठेविला असे ॥ ४४० ॥

---

१ हे स्वामी. २ साहजिक. ३ तुझ्याशिवाय. ४ खटपट करीत होता. ५ विश्वासानें. ६ गांवाहून. ७ मार्गाला. ८ प्राप्त झाली नाहीं. ९ माघारें. १० मावळला. ११ मध्येंच. १२ सूर्य. १३ किंचित्. १४ पडद्यासारखें. १५ कदाचित्. १६ राहत नाहीं व वृष्टीही करीत नाहीं. १७ नाहींशी झाली. १८ दूर राहिली. १९ हरवली. २० मुकला. २१ समुदायांत. २२ आशा. २३ दुर्गती. २४ येवढें. २५ मध्यें. २६ विश्रांति घ्यावी लागे. २७ सुखानें. २८ विसावा. २९ दिवस असतांनाच. ३० पोचता. ३१ ब्रह्म प्राप्तीला. ३२ तेवढा. ३३ खरा.

**प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ॥**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥**

ऐकें कवतिक[1] हें कैसें । जे शतमखा[2] लोक सायासें । ते तो पावे अनायासें । कैवल्य[3]-कामा ॥ ४१ ॥ मग तेथिंचे जे अमोघ[4] । अलौकिक[5] भोग । भोगितांही सांग । कांटाळे मन ॥ ४२ ॥ हा अंतराय[6] अवचितां[7] । कां वोडवला[8] श्रीभगवंता । दिविभोग[9] भोगितां । अनुतापी[10] नित्य ॥ ४३ ॥ पाठीं[11] जन्में संसारीं । परि सकळ धर्माचिया मोहरीं[12] । लांबी[13] उगवे आगरीं । विभवश्रियेचा[14] ॥ ४४ ॥ जयातें नीतिपंथें चालिजे । सत्यपूत बोलिजे । देखावें तें देखिजे । शास्त्रदृष्टी ॥ ४५ ॥ वेद तो जागेश्वरु[15] । जया व्यवसाय[16] निजाचारु[17] । सारासार विचारु । मंत्री[18] जया[19] ॥ ४६ ॥ जयाच्या कुळीं उचितां । जाली ईश्वराची पतिव्रता । जयातें गृहदेवता । आदि ऋद्धि[20] ॥ ४७ ॥ ऐसी निजपुण्याची जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी[21] । तिये जन्मे तो सुरवाडी[22] । योगच्युत[23] ॥ ४८ ॥

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥**
**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥**

अथवा ज्ञानाग्निहोत्री[24] । जे परब्रह्मश्रोत्री[25] । महासुखक्षेत्रीं । मूळिवंत[26] ॥ ४९ ॥ जे सिद्धांताचिया[27] सिंहासनीं । राज्य करिती त्रिभुवनीं । जे कूजती[28] कोकिल वनीं । संतोषाच्या ॥ ५० ॥ जे विवेकद्रुमाचे[29] मुळीं । बैसले आहाति नित्य फळीं । तयां योगियांचिया कुळीं । जन्म पावे ॥ ५१ ॥ मोटकी[30] देहाकृती उमटे । आणि निजज्ञानाची[31] पाहांट[32] फुटे । सूर्यापुढें प्रगटे । प्रकाश जैसा ॥ ५२ ॥ तैसी दशेची[33] वाट न पाहतां । वयसेचिया[34] गांवा न येतां । बाळपणींच सर्वज्ञता । वरी[35] तयातें ॥ ५३ ॥ तिये सिद्धप्रज्ञेचेनि[36] लाभें । मनचि सारस्वतें[37] दुभे । मग सकळ शास्त्रें स्वयंभें[38] । निघती मुखें ॥ ५४ ॥

१ नवल. २ इंद्राला. ३ मोक्ष इच्छिणारा. ४ निष्फल न होणारे. ५ अप्रतिम. ६ विघ्न. ७ एकाएकीं. ८ प्राप्त झाला. ९ स्वर्गांचे भोग. १० पश्चात्ताप करी. ११ नंतर. १२ घरीं. १३ शेत कापल्यावर पडलेल्या भातगोट्यांचें उगवणारें शेत, किंवा कापलेल्या बुडख्यांतून पुनः उगवतें तें. १४ ऐश्वर्याचा. १५ आराध्यदैवत, धनी. १६ व्यवहार. १७ आपला आचार. १८ प्रधान. १९ योग्य. २० संपत्ति. २१ उदीम, व्यापार. २२ सुखांत. २३ योगभ्रष्ट. २४ ज्ञानरूप अग्नीमध्यें हवन करणारे. २५ वैदिक. २६ मूळचे रहिवासी. २७ आत्मप्राप्तीच्या. २८ शब्द करितात. २९ विचारवृक्षाच्या. ३० लहानशी. ३१ आत्मज्ञान. ३२ उजाडे. ३३ प्रौढ अवस्थेची. ३४ वयाच्या. ३५ प्राप्त होते. ३६ सिद्धबुद्धीच्या योगानें. ३७ सर्व विद्या. ३८ आपोआप, न शिकतां.

ऐसें जें जन्म । जयालागीं देव स[1]काम । स्वर्गीं ठेले जप होम । करिती सदां ॥ ५५ ॥ अमरीं [2]भाट होइजे । मग मृत्युलोकातें [3]वानिजे । ऐसें जन्म पार्था गा जें । तें तो पावे ॥ ५६ ॥

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥**

आणि मागील जे सद्बुद्धि । जेथ जीवि[4]त्वा जाहाली होती [5]अवधि । मग तेचि पुढती [6]निरवधि । नवी [7]लाहे ॥ ५७ ॥ तेथ [8]सदैवा आणि [9]पायाळा । वरि [10]दिव्यांजन होय डोळा । मग देखे जैसीं [11]अवलीळा । पाताळधनें ॥ ५८ ॥ तैसे [12]दुर्भेद जे [13]अभिप्राय । कां [14]गुरुगम्य हन ठाय । तेथ [15]संसरेंवीण जाय । बुद्धि तयाची ॥ ५९ ॥ बळियें इंद्रियें येती मना । मन [16]एकवटे पवना । पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ॥ ४६० ॥ ऐसें नेणों काय [17]अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें । समाधि घर पुसे । मानसाचें ॥ ६१ ॥ जाणिजे योग पीठीचें [18]भैरव[19] । काय हा आरंभ [20]भेरेचा गौरव । कीं वैराग्यसिद्धीचा अनुभव । रूपा आला ॥ ६२ ॥ हा संसार [21]उमाणितें माप । कां [22]अष्टांगसामग्रीचें द्वीप । जैसें [23]परिमळेंचि धरिजे रूप । चंदनाचें ॥ ६३ ॥ तैसा संतोषाचा काय घडिला । कीं सिद्धि[24]भांडारींहुनि काढिला । [25]दिसे तेणें मानें [26]रूढला । साधकदशे ॥ ६४ ॥

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥**

जे वर्षशतांचिया [27]कोडी । जन्मसहस्रांचिया [28]आडी । [29]लंघितां पातला [30]थडी । आत्मसिद्धीची ॥ ६५ ॥ म्हणोनि [31]साधनजात आघवें । [32]अनुसरे तया [33]स्वभावें । मग आयतिये बैसे [34]राणिवे । विवेकाचिये ॥ ६६ ॥ पाठीं वि[35]चारितया वेगां । तो विवेकही [36]ठाके मागां । मग [37]अविचारणीय तें आंगा । घडोनि जाय ॥ ६७ ॥ तेथ मनाचें मेहुडें[38] विरे । पवनाचें पवनपण सरे । [39]आपणपां आपण मुरे । आकाशहीं ॥ ६८ ॥ [40]प्रणवाचा माथा बुडे ।

---

१ हेतु धरणारे. २ स्तुतिपाठक. ३ वर्णावें. ४ आयुष्याला. ५ शेवट. ६ शेवटपर्यंत. ७ प्राप्त होते. ८ दैववान्. ९ पायाळू मनुष्य. १० काजळ, जेणेंकरून साधारण मनुष्यास न दिसणारें दिसतें. ११ सहज. १२ अगम्य. १३ उद्देश. १४ गुरूपासूनच प्राप्त होणारें. १५ कष्टावांचून, अचूक. १६ ऐक्य पावे. १७ आपोआप. १८ मुख्य स्थानावरचा. १९ अधिदेवता. २० मोठेपणा. २१ मोजणारें. २२ योगसाहित्याचें बेट. २३ सुगंधानें. २४ खजिन्यांतून. २५ साधक असून सिद्धासारखा दिसतो. २६ वाढला, उत्पन्न झाला. २७ कोटि. २८ आड. २९ चालतां. ३० किनारा. ३१ सर्व साधनें. ३२ मिळतात. ३३ सहज. ३४ राज्यावर. ३५ विचार करण्याचा. ३६ राहे. ३७ विचार करण्यापूर्वींच. ३८ मेघ. ३९ आपल्याच ठिकाणीं. ४० ओंकाराचा.

येतुलेनि अनिर्वाच्य[1] सुख जोडे । ह्मणोनि आधींचि बोल बहुडे[2] । तयालागीं ॥ ६९ ॥ ऐसी ब्रह्मींची स्थिती । जे सकळा गतींसीं गती । तया अमूर्तीची मूर्ती । होऊनि ठाके ॥ ४७० ॥ तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं । विक्षेपाचीं[3] पाणिवळें[4] झाडिलीं । ह्मणोनि उपजत खेंवो[5] बुडाली । लग्नघटिका ॥ ७१ ॥ आणि तद्रूपतेसि[6] सुलग्न[7] । लागोनि ठेलें अभिन्न । जैसें लोपलें अभ्रें गगन । होऊनि ठाके ॥ ७२ ॥ तैसें विश्व जेथ होय । मागौतें जेथ लया जाये । तें विद्यमानाचि देहें । जाहला तो गा ॥ ७३ ॥

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाऽधिको योगी तस्माद्योगी भवाऽर्जुन ॥ ४६ ॥**

जया लाभाचिया आशा । करूनि धैर्यबाहूंचा भरंवसा । घालीत षट्कर्मांचा[11] धीरसा[12] । कर्मनिष्ठ ॥ ७४ ॥ कां जिये एकवस्तुलागीं । बांणोनि[13] ज्ञानाची वज्रांगी[14] । झुंजत प्रपंचेसीं समरंगीं[15] । ज्ञानियो गा ॥ ७५ ॥ अथवा निर्लिंगें[16] निसरडा । तपोदुर्गाचा आंडकडा[17] । झोंबती तपिये चोंडा । जयाचिया ॥ ७६ ॥ जें भजतियां भज्य[19] । याज्ञिकांचें याज्य[20] । एवं जें पूज्य । सकळां सदां ॥ ७७ ॥ तेंचि तो आपण । स्वयें जाहाला निर्वाण[21] । जें साधकांचें कारण । सिद्ध तत्त्व ॥ ७८ ॥ ह्मणोनि कर्मनिष्ठां वंद्य । तो ज्ञानियासि वेद्य[22] । तापसांचा आद्य[23] । तपोनाथ ॥ ७९ ॥ पैं जीवपरमात्मसंगमा । जयाचें येणें जाहालें मनोधर्मा । तो शरीरीचि परि महिमा[24] । ऐसी पावे ॥ ४८० ॥ ह्मणोनि याकारणें । तूतें मी सदा ह्मणें । योगी होईं अंतःकरणें । पंडुकुमरा ॥ ८१ ॥

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्तमो मतः ॥ ४७ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीता सूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अभ्यासयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

---

१ बोलण्यास अशक्य. २ मागें फिरे. ३ विघ्न. ४ समुदाय, पाण्यांतील सर्व मळ. ५ तावडतोब. ६ ज्ञान होण्यास. ७ चांगली वेळ. ८ एकच, दुसरें नाहीं. ९ पुन्हा. १० याच, इहींच्या. ११ यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह हीं षट्कर्में. १२ प्रवाह. १३ ठसून. १४ दृढ कवच. १५ युद्धभूमींत. १६ निराश्रय. १७ तटबंदीचा अर्धा तुटलेला कडा. १८ इच्छेनें. १९ ज्याकरितां भजन करावयाचें तें. २० ज्याकरितां यजन करावयाचें तें. २१ तद्रूप. २२ जाणण्यास योग्य. २३ पहिला. २४ योग्यता.

मगा योगी जो ह्मणिजे । तो देवाचा देव जाणिजे । आणि सुख सर्वस्व माझें । चैतन्य तो ॥ ८२ ॥ तेथ [1]भजता भजन भजावें । हें भक्तिसाधन जें आघवें । तो मीचि जाहलों अनुभवें । अखंडित ॥ ८३ ॥ मग [3]तैया आह्मा प्रीतीचें । स्वरूप बोलीं [4]निर्वचे । ऐसें नव्हे गा तों साचें । सुभद्रापती ॥ ८४ ॥ तया एकवटलिया प्रेमा । जरी [5]पाडें पाहिजे उपमा । तरी मी देह तो [6]आत्मा । हेंचि होय ॥ ८५ ॥ ऐसें [7]भक्तचकोरचंद्रें । बोलिलें गुणसमुद्रें । त्रिभुवनैकनरेंद्रें । संजय ह्मणे ॥ ८६ ॥ तेथ आदीपासूनि पार्था । ऐकिजे ऐसीचि आस्था । दुणावली हें यदुनाथा । [8]भावों सरलें ॥ ८७ ॥ कीं [9]सावियाचि मनीं संतोषला । जे बोला आरिसा जोडला । तेणें [10]हरिखें आतां [11]उपैलवला । निरूपील ॥ ८८ ॥ तो प्रसंग आहे पुढा । जेथ [12]शांत दिसेल उघडा । तो [13]पालविजेल [14]मुंडा । [15]प्रमेयबीजाचा ॥ ८९ ॥ जे सात्विकाचेनि [16]वडपें । गेलें आध्यात्मिक [17]खरपें । सहजें निर्डारले वाफे । [18]चतुरचित्ताचे ॥ ४९० ॥ वरी अवधानाचा [19]वाफसा । लाधला सोनयाऐसा । ह्मणोनि पेरावया [20]धिंवसा । श्रीनिवृत्तीसीं ॥ ९१ ॥ ज्ञानदेव ह्मणे मी चाडें । सद्गुरूनीं केलें [22]कोडें । माथां हात ठेविला तें [23]फुडें । बीजेंचि [24]वोइलें ॥ ९२ ॥ ह्मणऊनि येणें मुखें जें जें निगे । तें संतांच्या हृदयीं साचेंचि लागे । हें असो सांगों श्रीरंगें । बोलिलें जें ॥ ९३ ॥ परि तें मनाच्या कानीं ऐकावें । बोल बुद्धीच्या डोळां देखावें । हे [26]सांटोवाटीं घ्यावे । चित्ता-चिया ॥ ९४ ॥ [27]अवधानाचेनि हातें । [28]नेयावें हृदया [29]आंतौतें । हे [30]रिझवील [31]आयणीतें । सज्जनाचिये ॥ ९५ ॥ हे स्वहितातें [32]नीचविती । परिणामातें जीवविती । सुखाची वाहती । लाखोली जिवा ॥ ९६ ॥ आतां अर्जुनेंसीं श्रीमुकुंदें । [33]नागर बोलिजेल विनोदें । तें वोवियेचेनि प्रबंधें । सांगेन मी ॥ ४९७ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

श्लोक ४७, ओव्या ४९७.

---

१ जीव. २ भजन करणारा, भजन करणें व भजन करण्याचा देव ही त्रिपुटी. ३ त्याला. ४ सांगतां येत नाहीं. ५ बरोबरीनें. ६ जीव. ७ कृष्णानें. ८ समजलें. ९ सहज सर्वथा. १० संतोषानें. ११ उकलला. १२ शांतिरस. १३ पेरील, विस्तारील. १४ तांदूळ इत्यादिक भरून गोलाकार केलेला पेंढ्याचा गट्ठा. १५ सार, सिद्धांत. १६ शोभा. १७ गुंताडें. १८ परिपक्व. १९ शहाण्याच्या चित्ताचे. २० पिकण्याजोगा काल. २१ धैर्य. २२ नवल. २३ स्पष्ट. २४ पेरण्याकरितां निराळें ठेविलेलें धान्य. २५ पेरिलें. २६ अदलाबदली=चित्त देऊन त्याच्या मोबदला बोल घ्यावे. २७ लक्ष्य. २८ न्यावें. २९ आंत. ३० रमवील. ३१ मनातें. ३२ निववितीं. ३३ सर्वोत्कृष्ट.

## अध्याय ७ वा.

श्रीभगवानुवाच—मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥
ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

आइका मग तो श्रीअनंत । पार्थातें असे ह्मणत । पैं[1] गा तूं योगयुक्त[2] । जालासि आतां ॥ १ ॥ मज समग्रातें[3] जाणसी ऐसें । आपलिया तळहातिचें रत्न जैसें । तुज ज्ञान सांगेन तैसें । विज्ञानेंसीं[4] ॥ २ ॥ एथ विज्ञानें कांय करावें । ऐसें घेसी[5] जरी मनोभावें[6] । तरी पैं आधीं जाणावें । तेंचि लागे ॥ ३ ॥ मग ज्ञानाचिये वेळे । झांकती जाणिवेचे[7] डोळे । जैसी तीरीं नाव[8] न ढळे । टेंकली सांती[9] ॥ ४ ॥ तैसी जाणीव जेथ नें रिगे[10] । विचार मागुतापाउलीं[11] निघे । तर्क आयणी[12] नेघे । आंगीं जयाच्या ॥ ५ ॥ अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंच हें विज्ञान । तेथ सत्यबुद्धि[13] तें अज्ञान । हेंही जाण ॥ ६ ॥ आतां अज्ञान अवघें हारपे । विज्ञान निःशेष करपे । आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाइजे ॥ ७ ॥ जेणें सांगतयाचें[14] बोलणें खुंटे । ऐकतयाचें व्यसन[15] तुटे । हें जाणणें सानें मोटें[16] । उरों नेदी ॥ ८ ॥ ऐसें वर्म[17] जें गूढ[18] । तें किजेल वाक्यारूढ[19] । जेणें थोडेनि[20] पुरे कोड[21] । बहुत मनींचें ॥ ९ ॥

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥

पैं गा मनुष्यांचिया सहस्रशा[22] । माजि विपाइलेचिया[23] येथें[24] धिंवसा[25] । तैसे या धिंवसे-[26]करां बहुवसां[27] । माजि विरळा[28] जाणे ॥ १० ॥ जैसा भरलेया त्रिभुवना । आंत एक एक चांग[29] अर्जुना । निवडूनि कीजे सेना । लक्षवरी[30] ॥ ११ ॥ कीं तयांहीपाठीं[31] । जे वेळीं लोह[32] मांसातें[33] घांटी[34] । ते वेळीं विजयश्रीयेच्या[35] पाटीं[36] । एकाचि बैसे ॥ १२ ॥ तैसे आस्थेच्या

१ निश्चयें. २ योगी. ३ सर्वत्र व्याप्त. ४ व्यवहारज्ञान. ५ असें ह्मणशील. ६ मनात. ७ ज्ञातृत्वाचे. ८ नौका. ९ असतां. १० शिरत नाहीं. ११ मागल्या पायीं, आला तसाच मागें. १२ तत्त्वनिर्णयाची इच्छा. १३ खरें वाटणें. १४ सांगणाऱ्याचे. १५ हौस. १६ लहान मोठें. १७ तात्पर्य. १८ गुप्त. १९ बोलण्यांत, वाक्यांत आणीन. २० थोडक्यानेंच. २१ आवड. २२ हजारों माणसांत. २३ एखाद्याला. २४ योगाभ्यास करण्याविषयीं. २५ धैर्य, छंद. २६ धैर्यवंतास. २७ पुष्कळांत. २८ क्वचित्. २९ चांगला शूर. ३० लाखभर. ३१ त्यानंतर. ३२ शस्त्र. ३३ शरीरगत मांसाला. ३४ कापी. ३५ जयलक्ष्मीच्या. ३६ पदीं.

टीं । रिघताति कोटिवरी । परी प्राप्तीच्या पैलतीरीं । विपाइला निगे ॥ १३ ॥ म्हण-
सामान्य गा नोहे । हे सांगतां वडिल गोठि गा आहे । परी तें बोलों येईल पाहें ।
प्रस्तुत ऐकें ॥ १४ ॥

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

तो अवधारीं गा धनंजया । हे महदादिक माझी माया । जैसी प्रतिबिंबे छाया । निजां-
ग ॥ १५ ॥ आणि इयेतें प्रकृति ह्मणिजे । जे अष्टधा भिन्न जाणिजे । लोकत्रय
जे । इयेस्तंव ॥ १६ ॥ हे अष्टधा भिन्न कैसी । ऐसा ध्वनि धरिसी जरी मानसीं । तरी
गा आतां परियेसीं । विवंचना ॥ १७ ॥ आप तेज गगन । मही मारुत मन । बुद्धि
कार हे भिन्न । आठ भाग ॥ १८ ॥

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥

ा आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था । तिये नाम व्यवस्था ।
ऐसी ॥ १९ ॥ जे जडातें जीववी । चेतनेतें चेतवी । मना करवीं मानवी । शोक
॥ २० ॥ पैं बुद्धीच्या अंगीं जाणणें । तें जिये जवळिकेचें करणें । जिया अहंका-
विंदाणें । जगाचि धरिजे ॥ २१ ॥

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।
अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥

सूक्ष्म प्रकृति कोडें । जैं स्थूळाचिया आंगा घडे । तैं भूतसृष्टीची पडे । टांकसाळ
२ ॥ चतुर्विध ठसा । उमटों लागे आपैसा । मोलें तरीं सरिसा । परि थरचि आनान
३ ॥ होती चौऱ्यासीं लक्ष थरा । येरा मिती नेणिजे भांडारा । भरे आदिशून्याचा
ारा । नाणियांसी ॥ २४ ॥ ऐसें एकतुकें पांचभौतिक । पडती बहुवस टांकें । मग

१ कोटयावधि. २ एखादाच. ३ मोठी. ४ ऐक. ५ महत्तत्वआदि. ६ पडछाया पडते. ७ माया. ८ आठ प्रकारें. ९ उत्पन्न होतें. १० इचेपासून. ११ संशय. १२ विचार. १३ उदक. १४ उजेड. १५ आकाश. १६ पृथ्वी. १७ वायु. १८ समान स्थिति. १९ आत्मस्वरूप. २० अचेतनाला. २१ चेतना उत्पन्न करिते. २२ सन्निधपणाचें. २३ कौशल्यानें. २४ आवडीनें. २५ महाभूतांच्या. २६ प्राण्यांच्या उत्पत्तीची. २७ चार प्रकारचा. २८ आपोआप. २९ किंमतीला, वास्तविक. ३० सारखा. ३१ जाति. ३२ वेगळाल्या. ३३ प्रकार, योनी. ३४ गणती. ३५ मायेची कोठडी. ३६ नाण्यांनीं. ३७ एकसारखें. ३८ पंचमहाभूतांची. ३९ पुष्कळ. ४० ठसे.

तिये समृद्धीचे [1]लेख । [2]प्रकृतीचि धरी ॥ २५ ॥ जें [3]आंखूनि नाणें विस्तारी । [4]पाठीं तयाची [5]आटणी करी । माजी कर्माकर्मांचिया व्यवहारीं । [6]प्रवर्तु दावी ॥ २६ ॥ हें [7]रूपक परी असो । सांगों उघड जैसें [8]ये [9]परियेसों । तरी नामरूपाचा [10]अतिसो । प्रकृतीच [11]कीजे ॥ २७ ॥ आणि प्रकृति तंव माझ्या ठायीं । बिंबे येथ [12]आन नाहीं । म्हणोनि आदि मध्य [13]अवसान पाहीं । जगासि मी ॥ २८ ॥

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

हें [14]रोहिणीचें जळ । तयाचें पाहातां येइजे मूळ । तें [15]रश्मि नव्हती केवळ । होय तें [16]भानु ॥ २९ ॥ तयाचिपरी [17]किरीटी । इया प्रकृती जालिये सृष्टी । जैं [18]उपसंहरूनि कीजेल [19]ठी । तैं मीचि आहें ॥ ३० ॥ ऐसें [20]होयें दिसे न दिसे । हें [21]मजचिमाजी असे । मियां विश्व धरिजे जैसें । [22]सूत्रें मणि ॥ ३१ ॥ सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले । तैसें म्यां जग धरिलें । [23]सबाह्याभ्यंतरीं ॥ ३२ ॥

**रसोऽहमप्सु कौंतेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः ।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥**
**पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

म्हणोनि उदकीं [24]रस । कां [25]पवनीं जो स्पर्श । शशिसूर्यीं जो प्रकाश । तो मीचि जाण ॥ ३३ ॥ तैसाचि [26]नैसर्गिक शुद्ध । मी पृथ्वीच्या ठायीं [27]गंध । [28]गगनीं मी शब्द । वेदीं [29]प्रणव ॥ ३४ ॥ नराच्या ठायीं [30]नरत्व । जें [31]अहंभाविये [32]सत्त्व । तें [33]पौरुष मी हें [34]तत्त्व । बोलिजत असे ॥ ३५ ॥ अग्नि ऐसें [35]आहाच । [36]तेजीं नामाचें आहे [37]कवच । तें [38]परतें केलिया साच । [39]निजतेज तें मी ॥ ३६ ॥ आणि [40]नानाविध [41]योनि । जन्मोनि [42]भूतें त्रिभु-

१ जमाखर्च. २ माया. ३ मोजून, आकारून. ४ मग. ५ व्यवस्था, गाळणी. ६ प्रवृत्ति. ७ उदाहरण. ८ यईल. ९ समजण्याजोगें. १० अतिशय. ११ करते. १२ दुसरें. १३ शेवट. १४ मृगजळ. १५ किरण. १६ सूर्य. १७ अर्जुना. १८ नाश करून. १९ शेवट. २० उत्पन्न होतें, दिसतें व नाहींसें होतें. २१ माझ्यामध्यें. २२ दोऱ्यानें. २३ बाहेर आंत. २४ गोडी. २५ वायूंत. २६ स्वाभाविक. २७ सुवास. २८ आकाशांत. २९ ओंकार. ३० मनुष्यपणा. ३१ अहंकाराचें. ३२ बळ. ३३ पराक्रम. ३४ खरें. ३५ उगीच. ३६ अग्नींत. ३७ आवरण. ३८ दूर केलें असतां. ३९ खरें तेज. ४० अनेक. ४१ जाति. ४२ प्राणिमात्र.

वनीं । वर्तत आहाति जीवेनीं । आपुलाल्या ॥ ३७ ॥ एकें पवनेंचि पीति । एकें तृणास्तव जीती । एकें अन्नाधारें राहाती । जळें एकें ॥ ३८ ॥ ऐसें भूतप्रति आनान । जें प्रकृतिवशें दिसे जीवन । तें आघवाठायीं अभिन्न । मीचि एक ॥ ३९ ॥

बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।
बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥
बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।
धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥

पैं आदिचेनि अवसरें । विरूढे गगनाचेनि अंकुरें । जें अंतीं गिळी अक्षरें । प्रणवपाठींचीं ॥ ४० ॥ [12]जंव हा विश्वाकार असे । तंव जें विश्वाचिसारिखें दिसे । मग महाप्रळयदशे । कैसेनि नव्हे ॥ ४१ ॥ ऐसें अनादि जें सहज । तें मी गा विश्वबीज । हें हातातळीं तुज । देइजत असे ॥ ४२ ॥ मग उघड करूनि पांडवा । जैं हें आणिसी सांख्याचिया गांवा । तैं ययाचा उपेग बरवा । देखसील ॥ ४३ ॥ परी हे अप्रासंगिक आलाप । आतां असतु बोलों संक्षेप । जाण [23]तपियांच्या ठायीं तप । तें रूप माझें ॥ ४४ ॥ बळियामाजि बळ । तें मी जाण अढळ । बुद्धिमंतीं केवळ । बुद्धि ते मी ॥ ४५ ॥ भूतांच्या ठायीं काम । तो मी ह्मणे आत्माराम । जेणें अर्थास्तव धर्म । थोर होय ॥ ४६ ॥ येऱ्हवीं विकाराचेनि पैसें[27] । करी कीरें[28] इंद्रियांच्याचि ऐसें । परी धर्मासि वेखासें । जावों नेदी ॥ ४७ ॥ जो अप्रवृत्तीचा आडांटा । सांडूनि विधीचिया निघे वाटा । तेवींचि नियमाचा दिवटा । सवें चाले ॥ ४८ ॥ काम ऐशिया वोजा प्रवर्ते । ह्मणोनि धर्मासि होय पुरतें । मोक्षतीर्थींचें मुक्तें । संसार भोगी ॥ ४९ ॥ जो श्रुतिगौरवाच्या मांडवीं । कामसृष्टीच्या वेल वाढवी । जंव कर्मफळेंसि पालवी । अपवर्गीं ठेके ॥ ५० ॥ ऐसा नियत कां कंदर्प ।

---

१ उपजीविकेंत. २ वाराच पितात. ३ गवतानें उपजीविका करतात. ४ प्रत्येक प्राण्याला. ५ निरनिराळें. ६ अन्न. ७ सर्व ठिकाणीं. ८ एकच. ९ पहिल्यापासून. १० उत्पन्न होई. ११ अ, उ, म्-ओंकार. १२ जोंपर्यंत. १३ नाशाचे वेळीं. १४ कसें नसे. १५ उत्पत्तिनाशरहित. १६ जगाचें कारण. १७ हातावर. १८ ब्रह्म विचाराच्या. १९ उपयोग. २० प्रसंगास योग्य नव्हे. २१ बोल. २२ असोंदे. २३ तपस्व्यांच्या. २४ हेतु. २५ स्वस्वरूपांत रममाण होणारा. २६ पुरुषार्थासाठीं. २७ मार्गानें. २८ निश्चयें. २९ इंद्रियांच्या इच्छेप्रमाणें. ३० विरुद्ध. ३१ स्वधर्मत्यागाचा. ३२ आडवाट. ३३ कर्तव्यकर्मांच्या. ३४ मशाल. ३५ रीति. ३६ पूर्ण. ३७ मुक्तीसाठीं. ३८ वेदमहत्वाच्या. ३९ अभिलाष. ४० मोक्षामध्यें. ४१ कीसंगाची इच्छा.

जो भूतां यां बीजरूप । तो मी ह्मणे बाप । योगियांचा ॥ ५१ ॥ हें एकेक किती सांगावें । आतां वस्तुजातचि आघवें । मजपासूनि जाणावें । विस्तारलें असे ॥ ५२ ॥

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**

**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥**

जे सात्त्विक हन भाव[4] । कां रजतमादि सर्व । ते मजरूपसंभव[5] । वोळखें तूं ॥ ५३ ॥ ते हे झाले तरी माझ्याठायीं । परी तयांमाजी मी नाहीं । जैसी स्वप्नींच्या डोहीं । जागृती न बुडे ॥ ५४ ॥ जैसी रसाचीच[6] सुघट[7] । बीजकणिका घनवट[8] । परी तियेचेनि[10] होय काष्ठ । अंकुरद्वारें ॥ ५५ ॥ मग तया काष्ठाच्या ठायीं । सांग पां बीजपण असे काई । तैसा मी विकारीं नाहीं । जरी विकारला दिसें ॥ ५६ ॥ पैं गगनीं उपजे आभाळ । परी तेथ गगन नाहीं केवळ । अथवा आभाळीं होय सलिल[11] । तेथ अभ्र नाहीं ॥ ५७ ॥ मग त्या उदकाचेनि आवेशें[12] । प्रगटलें तेज जें लखलखीत दिसे । तिये विजूमाजि[13] असे । सलिल कायि ॥ ५८ ॥ सांगें अग्निस्तव धूम[14] होये । तिये धूमीं काय अग्नि आहे । तैसा विकार हा मी नोहें । जरी विकारला असें ॥ ५९ ॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**

**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥**

परि उदकीं जाली बोबुळी[15] । ते उदकातें जैसी झांकोळी[16] । कां वायांचि आभाळीं । आकाश लोपे ॥ ६० ॥ हां गा स्वप्न लटिकें म्हणों ये । परी निद्रावशें बाणलें होये । तंव आठव काय देत आहे । आपणयेयां ॥ ६१ ॥ हें असो डोळियांचें । डोळांचि पडळ रचे । तेणें देखणेंपण डोळियांचें । न गिळिजे कायि ॥ ६२ ॥ तैसी हे माझीच बिंबली । त्रिगुणात्मक साउली । कां मजचि आड वोडवली[21] । जवनिका[22] जैसी ॥ ६३ ॥ म्हणोनि भूतें मातें नेणती । माझींच परी मी नव्हती[23] । जैसीं जळींचीं जळीं न विरती[24] । मुक्ताफळें[25] ॥ ६४ ॥ पैं पृथ्वीयेचा[26] घट कीजे । सवेंचि पृथ्वीसि मिळे जरी मेळविजे । येऱ्हवीं तोचि अग्निसंगें[27] सिजे । तरी वेगळा होय ॥ ६५ ॥ तसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव । परि मायायोगें जीव[28] । दशे आले ॥ ६६ ॥ म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहंममताभ्रांती[29] । विषयांध जाल ॥ ६७ ॥

---

१ कारणभूत. २ सर्व पदार्थ. ३ विस्तार पावलें. ४ वृत्ति. ५ माझ्या रूपापासून उत्पन्न झालेले. ६ केवळ रसाचीच. ७ चांगली घडलेली. ८ बीं. ९ घट्ट. १० तिजपासून. ११ पाणी. १२ आविर्भावानें. १३ विजेंत. १४ धूर. १५ शेवाल. १६ आच्छादी. १७ ज्ञानेमुळें. १८ अनुभविक दिसतें. १९ पडदा. २० द्रष्टृत्व. २१ प्राप्त झाली. २२ पडदा. २३ होत नाहींत. २४ विरघळत नाहींत. २५ मोत्यें. २६ मातीचा. २७ भट्टींत घालून भाजला असतां. २८ जीवपणाला. २९ मी व माझें या भ्रांतीनें.

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४ ॥**

आतां महदादि[1] हे माझी माया । उतरोनियां[2] धनंजया । मी होइजे हें आया[3] । कैसेनि वे ॥ ६८ ॥ जिये ब्रह्माचळाचा[4] आधाडा[5] । पहिल्या संकल्पजळाचा उभाडा । सर्वेचि महाभूतांचा बुडबुडा । सांना आला ॥ ६९ ॥ जे सृष्टिविस्ताराचेनि वोघें । चढत काळकळनेचेनि[8] वेगें । प्रवृत्तिनिवृत्तीचीं[9] तुंगें[10] । तटें[11] सांडी ॥ ७० ॥ जे गुणघनाचेनि[12] वृष्टिभरें । भरली मोहाचेनि[13] महापूरें । घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं[14] ॥ ७१ ॥ जे द्वेषाच्या भोंवतीं[16] दाटत । मत्सराचे वळसे[17] पडत । माजि प्रमादादि[18] तळपत[19] । महामीन[20] ॥ ७२ ॥ जेथ प्रपंचाचीं वळणें[21] । कर्माकर्माचीं वोभाणें[22] । वरी तरती[23] वोसाणें[24] । सुखदुःखांचीं ॥ ७३ ॥ रतीचिया[25] बेटा । आदळती कामाचिया लाटा । जेथ जीवफेन[26] संघाटा । सैंघ[27] दिसे ॥ ७४ ॥ अहंकाराचिया चळिया[28] । वरि मदत्रयाचिया[29] उकळिया । जेथ विषयोर्मीच्या[30] आकळिया[31] । उल्लाळ[32] घेती ॥ ७५ ॥ उदयास्ताचे[33] लोंढे । पाडीत जन्ममरणाचे[34] चोंढे । जेथ पांचभौतिक[35] बुडबुडे । होती जाती ॥ ७६ ॥ संमोह[36] विभ्रम मासे । गिळिताति धैर्याचीं आमिषें[37] । तेथ देव्हडे[38] भोंवत वळसे[39] । अज्ञानाचे ॥ ७७ ॥ भ्रांतीचेनि खडुळें[40] । रेवलें[41] आस्थेचें अवगाळें[42] । रजोगुणाचेनि खळाळें[43] । स्वर्ग गाजे ॥ ७८ ॥ तमाचे धारसे[44] बांड[45] । सत्वाचें स्थिरपण जाड[46] । किंबहुना हे दुवाड[46] । मायानदी ॥ ७९ ॥ पैं पुनरावृत्तीचेनि उभडें[47] । झळंबती[48] सत्यलोकींचे हुडे[49] । घायें गडबडती धोंडे । ब्रह्मगोळकाचे ॥ ८० ॥ तया पाणियाचेनि वेहिलेपणें[50] । अझुनी न धरती वोभाणें[51] । ऐसा मायापूर हा कवणें । तरिजेल गा ॥ ८१ ॥ येथ एक नवलावो[53] । जो जो कीजे तरणोपावो[54] । तो तो अपावो[55] । होय तें ऐक ॥ ८२ ॥ एक स्वयंबुद्धीच्या[56] बाहीं । रिगाले तयांची शुद्धीचि

---

१ महत्तत्व आदि. २ पार पडून. ३ समजुतीस. ४ ब्रह्म हाच कोणी एक पर्वत त्याचा. ५ मध्यभाग. ६ झरा. ७ लहानसा. ८ कालगतीच्या. ९ कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांचीं. १० उंच. ११ तीरें, डगरी. १२ सत्वादिगुण हेच कोणी मेघ त्यांच्या. १३ भ्रांतीच्या. १४ इंद्रियनिग्रह. १५ विधियुक्त कर्में. १६ भोंवरा, वळसा. १७ वळणें. १८ असावधपणा आदि. १९ चमकतात. २० मोठे मासे. २१ धरण. २२ पूर. २३ तरंगतात. २४ पुरांतील लांकडें केर कचरा इत्यादि. २५ विषयसुखाचा. २६ जीव हेच फेस त्यांचा समुदाय. २७ पुष्कळ. २८ लाटा, चंचलतेनें. २९ विद्या, धन, सामर्थ्य हे तीन मद. ३० विषयतरंगांच्या. ३१ लाटा. ३२ उड्या. ३३ पूर. ३४ डोह. ३५ शरीरें. ३६ अत्यंत मोह. ३७ मांसें. ३८ वांकडे, मोठे. ३९ भोंवरे. ४० गढूळ पाणी. ४१ घसरलें, संपलें. ४२ दलदल. ४३ खळखळ वाजणारे ओढे. ४४ प्रवाह, धारा. ४५ मोठे. ४६ कठिण. ४७ उत्कर्षानें. ४८ आकळिती. ४९ बुरूज. ५० घाईनें. ५१ त्वरेनें. ५२ प्रवाह. ५३ आश्चर्य. ५४ तरण्याचा उपाय. ५५ हानि. ५६ आत्मबुद्धीच्या अभिमानानें. ५७ बहुबळानें. ५८ ठिकाण.

नाहीं । एक जाणिवेचे डोहीं । गर्वेंचि गिळिले ॥ ८३ ॥ एकीं [2]वेदत्रयाच्या सांगडी । घेतल्या [3]अहंभावाच्या धोंडी । ते [4]मदमीनाच्या तोंडीं । सगळेचि गेले ॥ ८४ ॥ एकीं [5]वयसेचें [6]आड बांधले । मग [7]मन्मथाचिये कासे लागले । ते [8]विषयमगरीं सांडिले । चघळूनियां ॥ ८५ ॥ आतां वार्धक्याच्या तरंगा । माजि [9]मतिभ्रंशाच्या [10]जरंगीं । तेणें [11]कवळिजैताति पैंगा । चहूंकडे ॥ ८६ ॥ आणि शोकाचा कडा उपडत । क्रोधाच्या [12]आवर्तीं दाटत । [13]आपदागिधीं [14]चुंबिजती । [15]उधवलो ठायीं ॥ ८७ ॥ मग दुःखाचेनि [16]बैरबटें [17]बोबले । पाठीं मरणाचे [18]रेवें [19]रेवले । ऐसे कामाचे कासे लागले । ते गेले वायां ॥ ८८ ॥ एकीं [20]यजनक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटीं । ते स्वर्गसुखाच्या कपाटीं । [21]चिरकोनि ठेले ॥ ८९ ॥ एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला [22]कर्मबाह्यांचा भरंवसा । परी ते पडिले [23]वेळसां । [24]विधिनिषेधांच्या ॥ ९० ॥ जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा [25]तांगा नलगे । वरि कांहीं तरोंये योगें । तरी [26]विपाय तो ॥ ९१ ॥ ऐसें तरी जीवाचिये [27]आंगवणें । इये मायानदीचें तरणें । हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पां ॥ ९२ ॥ जरी [28]अपथ्यशीळा व्याधी । [29]नोकळे साधूंसि दुर्जनाची बुद्धी । कीं [30]रागी सांडी सिद्धी । [31]आली सोती ॥ ९३ ॥ जरी चोरा सभा [32]दाटे । अथवा [33]मीनां गळा घोंटे । ना तरी [34]भेडां उलटे । [35]विवसी जरी ॥ ९४ ॥ [36]पाडस [37]वागुरें [38]करांडी । कां मुंगी मेरु वोलांडी । तरी मायेची [39]पैलथडी । देखती जीव ॥ ९५ ॥ म्हणऊन गा पंडुसुता । जैसी [40]सकामां न जिणवेचि [41]वनितां । तेवीं मायामय हे [42]सरितां । न तरवे जीवां ॥ ९६ ॥ येथ एकचि [43]लीलां तरले । जे सर्वभावें मज भजले । तयां [44]ऐलीचें थडी सरलें । मायाजळ ॥ ९७ ॥ जयां सद्गुरु [45]तारू फुडें । जे अनुभवाचे कासे [46]गाढ । जयां [47]आत्मनिवेदन [48]तरांडें । [49]आकळलें ॥ ९८ ॥ जे अहंभावाचें वाझें सांडुनी । विकल्पाचिया झुळका चुकाउनि । [50]अनुरागाचा निरुता होउनी । [51]पाणिढाळ ॥ ९९ ॥ जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडसा [52]तारा । मग निवृत्तीचिया पैल तीरा । [53]सेपावले जे ॥ १०० ॥ ते [54]उपरतीच्या [55]वांवीं [56]सेलत । [57]सोहंभावा-

१ ज्ञानाच्या. २ ऋक्, यजु, साम. ३ मीपणाच्या. ४ गर्वरूप माशाच्या. ५ वयाचें. ६ बळ. ७ मदनाच्या. ८ विषयरूप सुसरींनें. ९ बुद्धिभ्रंशाच्या. १० जाळें. ११ कोंडाळिले जातात. १२ भोंवऱ्यांत. १३ आपत्तिरूप गिधाडांनीं. १४ टोंचले जातात. १५ निघाले जागीं. १६ चिखलांत. १७ मावळले. १८ वाळूंत. १९ रुतले. २० यज्ञादिकांची. २१ अडकून. २२ कर्मांचा. २३ प्रवाहामध्यें. २४ कर्तव्याकर्तव्याच्या. २५ लाग, दोर. २६ अपाय. २७ स्वाधीन होणें. २८ पथ्य न करणारास. २९ समजत नाहीं. ३० विषयासक्त. ३१ आली असतां. ३२ भय पावे. ३३ मत्स्याला. ३४ भितरा. ३५ पिशाच. ३६ हरणाचें पोर. ३७ जाळें. ३८ कुरतुडी, तोडी. ३९ परतीर. ४० विषयी पुरुषास. ४१ स्त्री. ४२ नदी. ४३ सहज. ४४ अलीकडच्याच कांठीं. ४५ जाहाज. ४६ बळकट. ४७ देह ईश्वरास समर्पण करणें. ४८ तारूं. ४९ सांपडलें. ५० अहंभावाचा. ५१ वायबतार. ५२ सांगड. ५३ पावले. ५४ वैराग्याच्या. ५५ हातांनीं. ५६ तरंगतात. ५७ मीच ईश्वर असा भावाच्या.

चेनि थावें पेलैत । मग निघाले अनकाळित । निवृत्तितटीं ॥ १ ॥ येणें उपायें मज भजले ॥ ते हे माझी माया तरले । वरि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥ २ ॥

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ।
माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥

चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

जे बहुतां एकां अवांतर । अहंकाराचा भूतसंचार । आहाला ह्मणोनि विसर । आत्मबोधाचा ॥ ३ ॥ ते वेळीं नियमाचें वस्त्र नाठवे । पुढील अधोगतीची लाज नेणवे । आणि करितात जें न करवें । वेद ह्मणे ॥ ४ ॥ पाहें पां शरीराचिया गांवा । जयालागीं आले पांडवा । तो कार्यार्थ आघवा । सांडूनियां ॥ ५ ॥ इंद्रियग्रामींचे राजबिदीं । अहंममतेचिया अल्पवादीं । विकारांतरांची मांदी । मेळवूनियां ॥ ६ ॥ दुःखशोकाच्या घाईं । मारिलियाची सेचि[४] नाहीं । हें सांगावया कारण काई । जे मासिले मायां ॥ ७ ॥ ह्मणोनि ते मातें चुकले । एक चतुर्विध मज भजले । जिहीं आत्महित केलें । वाढतें या ॥ ८ ॥ तो पहिला आर्त ह्मणिजे । दुसरा जिज्ञासु बोलिजे । तिजा अर्थार्थी जाणिजे । ज्ञानिया चौथा ॥ ९ ॥

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥

तेथ आर्त तो आर्तीचेनि वेथाजें । जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे । [२१]तिजेनि तेणें इच्छिजे । अर्थसिद्धि ॥ ११० ॥ मग चौथियाच्या ठायीं । कांहींचि करणें नाहीं । ह्मणोनि भक्त एक पाहीं । ज्ञानिया[२२] जो ॥ ११ ॥ जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें । फिटलें भेदाचें कडवसें[२३] । मग मीचि जाहाला समरसें[२४] । आणि भक्तही तावंचि ॥ १२ ॥ परी आणिकांचिये [२५]दिठी नैमिख[२६] । जैसा स्फटिकचि भासे उदक । तैसा ज्ञानी नव्हे कौतुक । सांगतां तो ॥ १३ ॥ जैसा वारा कां गगनीं [२७]थिरे । मग वारेपण वेगळें नुरे । [२८]तेवि भक्त हे पैजें[२९] न सरे । जरी ऐक्या आला ॥ १४ ॥ जरी पवन हालवूनि पाहिजे ।

---

१ बळें. २ पोहत. ३ अनायासें. ४ मुक्तीच्या जवळ. ५ विरळा, क्वचित्. ६ पुष्कळ. ७ आडमार्गें, अन्य. ८ आत्मज्ञानाचा. ९ सर्व. १० इंद्रियसमूहाच्या. ११ राजमार्गांत. १२ बडबडीनें. १३ समुदाय. १४ आठवण. १५ चार प्रकारचे. १६ रोगी. १७ ज्ञानप्राप्ति इच्छिणारा. १८ धनादिकांची इच्छा करणारा. १९ ज्ञानी, जाणता. २० निमित्तें. २१ तिसऱ्यानें. २२ ज्ञानी. २३ अंधार. २४ ऐक्यानें. २५ लोकदृष्टीनें. २६ क्षणभर. २७ शांत होतो. २८ स्वामभावें. २९ प्रतिज्ञा. ३० वारा.

. येऱ्हवीं गगन तों सहजें । असे जैसें ॥ १५ ॥ तैसें शरीरी हने
तरी गगनावेळा देखिजे । परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाला ॥ १६ ॥ आणि ज्ञाना-
कर्में । तो भक्त ऐसा गमे । परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाला ॥ १६ ॥ आणि ज्ञाना-
चेनि उजिवडलेपणें । मी आत्मा ऐसें तो जाणे । म्हणऊनि मीही तैसेंचि म्हणें । उचंबळ-
लासांता ॥ १७ ॥ हां गा जीवापैलीकडिली खुणे । जो पावोनि वीवरों जाणे । तो देहा-
चेनि वेगळेपणें । काय वेगळा होय ॥ १८ ॥

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥**

म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोही भक्त झोंबे । परी मीचि
करी वालभें । ऐसा ज्ञानिया एक ॥ १९ ॥ पाहें पां दुभतेयाचिया आशा । जग धेनूसि
करीतसे फांसा । परि दोरेंवीण कैसा । वत्साचा बळी ॥ १२० ॥ कां जे तनमनप्राणें ।
तें आणिक कांहींचि नेणें । देखे तसांतें म्हणे । हे माय माझी ॥ २१ ॥ तें येणमानें अन-
न्यगती । म्हणऊनि धेनूही तैसीचि प्रीती । तयालागीं लक्ष्मीपती । बोलिले साचें ॥ २२ ॥
हें असो मग म्हणितलें । जे कां तुज सांगीतलें । तेही भक्त भले । पैढियंते आम्हां
॥ २३ ॥ परि जाणोनियां मातें । जे पाहों विसरले मांघुतें । जैसें सागरा येऊनि सरिते ।
मुरडावें ठेलें ॥ २४ ॥ तैसी अंतःकरणकुहरीं जन्मली । जयाची प्रतीतिगंगा मज मीनली ।
तो मी हे काय बोली । फार करूं ॥ २५ ॥ येऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे । तो चैतन्यचि
केवळ माझें । हें न म्हणावें परि काय कीजे । न बोलणें बोलों ॥ २६ ॥

**बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

जे तो विषयाची मोटी झाडी । माजि कामक्रोधांचीं सांकडीं । चुकावूनि
आला पाडीं । सद्वासनेचिया ॥ २७ ॥ मग साधुसंगें सुभटा । उजूं सत्कर्मा-
चिया वाटा । अप्रवृत्तीचा अंव्हांटा । डावलूनी ॥ २८ ॥ आणि जन्मशतांच्या वोह-
तवणा । तेविं आस्थेचिया नेलेचि वोहणा । तेथ फळहेतुचा उगाणा । कवण
चाळी ॥ २९ ॥ ऐसा शरीरसंयोगाचिये रातीं । माजि धांवतां सडियां आयती ।

---

१ समुचयार्थक अव्यय. २ वाटतो. ३ स्वानुभवानें. ४ उदयानें. ५ हर्षयुक्त झाला असतां.
६ व्यवहार करण्यास जाणतो. ७ हवा तो. ८ प्रीति. ९ दावें. १० वासराचा बळकट फांस.
११ पाहतांच. १२ याप्रकारें. १३ अन्य आधाररहित. १४ गाईलाही. १५ खरें. १६ आवडते.
१७ माघारें. १८ नदीला. १९ माघारें उलटणें राहिलें. २० गुहेंत. २१ अनुभव हीच गंगा.
२२ मिळाली. २३ जीव. २४ हें सांगूं नये पण उपाय नाहीं. २५ संकटें, अडचणी. २६ पहाडीं.
२७ वीरश्रेष्ठा अर्जुना. २८ नीट. २९ आडमार्ग. ३० डावेकडे टाकून. ३१ वाटसरू, प्रवासी.
३२ धारण करीत नाहीं. ३३ मार्ग. ३४ गणना. ३५ रात्रीमध्यें. ३६ एकटा.

तंव कर्मक्षयाची [1]पाहाती । पाहांट जाली ॥ १३० ॥ तैसीच गुरुकृपा [2]उखा उजळली । ज्ञानाची [3]वोतपली पडली । तेथ साम्याची [4]ऋद्धि उघडली । तयाचिये दृष्टी ॥ ३१ ॥ ते वेळीं जयाकडे [5]वास पाहे । [6]तेउता मीचि तया एक आहें । अथवा निवांत जरी राहे । तऱ्हीं मीचि तया ॥ ३२ ॥ हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं । जैसें [7]सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥ ३३ ॥ तैसा तो मजभीतरी । मी तया आंत बाहेरी । हें सांगिजेल [8]बोलवरी । तैसें नव्हे ॥ ३४ ॥ ह्मणोनि असो हें इयापरी । तो देखे ज्ञानाची [9]वाखारी । तेणें [10]संसरलेनि करीं । आप विश्व ॥ ३५ ॥ हें [11]समस्तही श्रीवासुदेव । ऐसा प्रतीति[12]रसाचा वोतला भाव । ह्मणोनि भक्तांमाजी [13]रावे । आणि ज्ञानिया तोचि ॥ ३६ ॥ जयाचिये [14]प्रतीतीच्या वाखारां । [15]पवाड होय चराचरा । तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभ [16]आथी ॥ ३७ ॥ येर बहुत जोडती किरीटी । जयांची भजनें भोगासाठीं । जे [17]आशातिमिरें दृष्टी । मंद जाले ॥ ३८ ॥

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।**

**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥**

आणि फळाचिया [18]हांवें । हृदयीं [19]कामा जाला रिगावा । कीं तयाचिये [20]घसणी दिवा । ज्ञानाचा गेला ॥३९॥ ऐसे [21]उभयतां [22]आंधारीं पडले । ह्मणोनि [23]पासींचि मातें चुकले । मग सर्वभावें [24]अनुसरले । देवतांतरा ॥ १४० ॥ आधींच प्रकृतीचे [25]पाइक । वरि भोगालागीं तंव [26]रंक । मग तेणें [27]लोलुपत्वें कौतुक । कैसेनि भजती ॥ ४१ ॥ [28]कवणी तिया नियमबुद्धि । कैसिया हन [29]उपचारसमृद्धि । कां अर्पण [30]यथाविधि । विहित[31] करणें ॥ ४२ ॥

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**

**तस्य तस्याऽचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥**

पै[32] जो [33]जिये देवतांतरीं । भजावयाची [34]चाड करी । तयाची ते चाड [35]पुरी । पुरविता मी ॥ ४३ ॥ देवोदेवीं मीचि पाहीं । हाही [36]निश्चयो त्यासि नाहीं । भाव ते ते ठायीं । वेगळाला धरी ॥ ४४ ॥

---

१ उजेडाची. २ उषःकाळ. ३ कोवळें ऊन. ४ ऐश्वर्य. ५ वाट, मार्ग. ६ तेवढा. ७ आंत बाहेर. ८ वाचेनें, शब्दानें. ९ वखार, दुकान. १० व्यवहारांत. ११ सगळे. १२ स्वानुभवाचा. १३ श्रेष्ठ. १४ अनुभव. १५ विस्तार, महत्त्व. १६ आहे. १७ इच्छारूप अंधकारानें. १८ इच्छेनें. १९ इच्छा. २० घर्षणानें. २१ दोन प्रकारचे भक्त. २२ अज्ञान. २३ जवळ असून. २४ आराधूं लागले. २५ दास. २६ दीन. २७ लंपटपणानें. २८ कोणत्या. २९ उपायसंपत्ति. ३० सांगितल्याप्रमाणें. ३१ योग्य. ३२ पण. ३३ ज्या. ३४ इच्छा. ३५ पूर्ण. ३६ ज्ञान समज.

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥ २२ ॥**

मग तिया श्रद्धायुक्त । तेथिंचें आराधन जें उचित । तें सिद्धिवरी समस्त । वर्तों लागे ॥ ४५ ॥ ऐसें जेणें जें भाविजे । तें फळ तेणें पाविजे । परी तेंही सकळ निपजे । मज-चिस्तव ॥ ४६ ॥

**अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**
**देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥**

परी ते भक्त मातें नेणती । जे कल्पनेबाहेरी न निघती । म्हणोनि कल्पित फळा पावती । अंतवंत ॥ ४७ ॥ किंबहुना ऐसें भजन । तें संसाराचेंचि साधन । येर फळभोग तो स्वप्न । नांवभरी दिसे ॥ ४८ ॥ हें असो परौतें । मग हो कां आवडतें । परि यजी जो देवतातें । तो देवत्वासीचि ये ॥ ४९ ॥ येर तनुमनप्राणीं । जे अनुसरले माझेयाचि वाहणीं । ते देहाच्या निर्वाणीं । मीचि होती ॥ १५० ॥

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥**

परी तैसें न करिती प्राणिये । वांयां आपुल्या हितीं वाणिये । जे पोहताति पाणिये । तळहातिचेनी ॥ ५१ ॥ नाना अमृताच्या सागरीं बुडिजे । मग तोंडा कां पंकमिठी पाडिजे । आणि मनीं तरी आठविजे । थिल्लरोदकातें ॥ ५२ ॥ हें ऐसें कासया करावें । जें अमृतींही रिगोनि मरावें । तें सुखें अमृत होऊनि कां नसावें । अमृतामाजी ॥ ५३ ॥ तैसा फळहेतूचा पांजरा । सांडूनियां धनुर्धरा । कां प्रतीतिपाखीं चिदंबरा । गोसांवियां नोहावें ॥ ५४ ॥ जेथ उंचावलेनि पवाडें । सुखाचा पैसार जोडे । आपुलेनि सुरवाडें । उडों ये ऐसा ॥ ५५ ॥ तया उपमा माप कां सुवावें । मज अव्यक्ता व्यक्त कां मानावें । सिद्ध असतां कां निमावें । साधनवरी ॥ ५६ ॥ परि हा बोल आघवा । जरी विचारिजेतसे पांडवा । तरी विशेषें या जीवा । न चोजवे गा ॥ ५७ ॥

---

१ त्या. २ पूजन. ३ सिद्धि होईपर्यंत. ४ करूं लागतो. ५ इच्छावें. ६ मजपासून. ७ इच्छि-लेल्या. ८ नाश पावणारें. ९ खोटा. १० क्षणभर. ११ एकीकडे. १२ मग पाहिजे तें होवो. १३ पूजनादि करी. १४ मार्गी. १५ शेवटीं. १६ कल्याणाविषयीं. १७ तोटा करतात. १८ अथवा. १९ घट्ट मिठी. २० डबक्यांतील पाण्यास. २१ कां. २२ न राहावें. २३ पिंजरा. २४ अनुभवरूप-पंखानें. २५ चिदाकाशास. २६ धनी. २७ महत्त्वानें. २८ विस्तार. २९ सुखानें, इच्छेनुरूप. ३० चालवें. ३१ स्पष्ट नसणाराला. ३२ हाल काढावे. ३३ सिद्धीपर्यंत. ३४ विचार करितां. ३५ समजत नाहीं.

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥**

कां जे [1]योगमायापडळें । हे जाले आहाती आंधळे । म्हणोनि प्रकाशाचेनि [2]वेहेवळें । न देखती मातें ॥ ५८ ॥ येऱ्हवीं मी नसें ऐसें । काय [3]वस्तुजात असे । पाहें पां [4]लवण [5]जळरसें । रहित आहे ॥ ५९ ॥ [6]पवन [7]कवणातें न शिवेचि । आकाश [7]कें न [8]समायेचि । हें असो एक मीचि । विश्वीं आहें ॥ १६० ॥

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥**

येथें भूतें [9]जियें आहाति [10]जेतुलीं । तियें मीचि होऊनि [11]ठेलीं । आणि [12]वर्तत आहाति जेतुलीं । तींही मीचि ॥ ६१ ॥ कां [13]भविष्यमाणें जियें हीं । मजवेगळीं नाहीं । हा [14]बोलचि येऱ्हवीं कांहीं । होय ना जाय ॥ ६२ ॥ दोराचिया सापासी । [15]डोंबा [16]बहिरी ऐसी । संख्या न करवे कोण्हासी । तेवीं भूतांसि [17]मिथ्यत्वें ॥ ६३ ॥ ऐसा मी पंडुसुता । [18]अनुस्यूत सदां असतां । या [19]संसार जो भूतां । तो [20]आनें बोलें ॥ ६४ ॥ तरि तोचि आतां थोडीसी । [21]गोठी सांगिजेल परियेसीं । जेथ [22]अहंकारतनूंसी । [23]वालभ पडिलें ॥ ६५ ॥

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥ २७ ॥**

तेथ इच्छा हे [24]कुमरी जाली । मग ते [25]कामाचिया तारुण्या आली । तेथ द्वेषेंसी मांडिली । [26]वऱ्हाडिक ॥ ६६ ॥ तया [27]दोघांस्तव जन्मला । ऐसा द्वंद्वमोह जाला । मग तो [28]आजियानें वाढविला । अहंकारें ॥ ६७ ॥ तो [29]धृतीसि सदां [30]प्रतिकूळ । नियमाही [31]नागवे [32]स्थूळ । [33]आशारसें दोंदिल । जाला सांतें ॥ ६८ ॥ असंतुष्टीचिया [34]मदिरा । मत्त होवोनि धनुर्धरा । विषयाचे [35]वोवरां । विकृतीसीं असे ॥ ६९ ॥ तेणें [36]भावशुद्धीचिया वाटे । [37]विखुरले विक-

---

१ आदिमायेच्या पडद्यानें. २ दिवसाच्या बळानें. ३ सगळे पदार्थ. ४ मीठ. ५ पाणी. ६ वायु. ७ कोठें. ८ सामावत नाहीं. ९ जीं. १० जितकीं. ११ राहिलीं. १२ हल्लीं. १३ पुढें होणारीं. १४ हें बोलायाचेंच. १५ काळा. १६ कवडा. १७ खोटेपणानें. १८ अखंड. १९ म्हणून. २० दुसरे. २१ गोष्ट. २२ अभिमान व शरीर यांस. २३ प्रीति, सख्य. २४ मुलगी. २५ विषयसुख. २६ वऱ्हाड, लग्नसोहळा. २७ दोघांपासून. २८ आजानें. २९ धैर्यास. ३० विरोधी. ३१ न सांपडे. ३२ दांडगा. ३३ आशारूप दुग्धानें पुष्ट झाला असता. ३४ मद्यानें. ३५ कोठडीमध्यें. ३६ स्वभाव-शुद्धीनें. ३७ पसरले.

ल्पाचे कांटे । मग चिंरिले अव्हांटे । अप्रवृत्तीचे ॥ १७० ॥ तेणें भूतें भांबावलीं । म्हणोनि संसाराचिया आडवामाजि पडिलीं । मग महादुःखाच्या घेतलीं । वोझे वरी ॥ ७१ ॥

**येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**
**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥ २८ ॥**

ऐसे विकल्पाचे वांयाणें । कांटे देखोनि तिखणे । जे मतिभ्रमाचें पांसावणें । घेतीचिना ॥ ७२ ॥ उजू एकनिष्ठेच्या पाउलीं । रगडूनि विकल्पाचिया भालीं । महापातकांची सांडिली । अटवी जिहीं ॥ ७३ ॥ मग पुण्याचे धांवा घेतले । आणि माझी जवळीक पावले । किंबहुना ते चुकले । वाटवधेयां ॥ ७४ ॥

**जरामरणमोक्षाय मामाश्रित यतंति ये ।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाऽखिलम ॥ २९ ॥**

येऱ्हवीं तरी पार्था । जन्ममरणाची निमे कथा । ऐसिया प्रयत्नानें आस्था । विजे जयाची ॥ ७५ ॥ तया तो प्रयत्नचि एके वेळे । मग समग्र परब्रह्में फळे । जया पिकलेया रस गळे । पूर्णतेचा ॥ ७६ ॥ ते वेळीं कृतकृत्यता जग भरे । तेथ अध्यात्माचें नवलपण पुरे । कर्माचें काम सरे । विरमे मन ॥ ७७ ॥ ऐसा अध्यात्मलाभ तया । होय गा धनंजया । भांडवल जया । उद्यमीं मी ॥ ७८ ॥ तयातें साम्याचिये वाढी । ऐक्याची सांरे कुळवाडी । तेथ भेदाचिया दुर्बळवाडी । नेणिजे तया ॥ ७९ ॥

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

जिहीं सांधिभूता मातें । प्रतीतीचेनि हातें । धरूनि अधिदैवातें । शिवतलें गा ॥ १८० ॥ जया जाणिवेचेनि वेगें । मी अधियज्ञ दृष्टी रिगें । ते तनूचेनि वियोगें । विऱ्हेय नव्हती

१ काढले, फोडले. २ आडमार्ग. ३ कुमार्गाचे. ४ भ्रमलीं. ५ अरण्यांत. ६ स्वाधीन केला ७ दांडे. ८ व्यर्थ. ९ तीक्ष्ण. १० जवळ होणें. ११ नीट. १२ भाल्यानें. १३ अरण्य. १४ मदतीनें. १५ सान्निध्य. १६ वाटमाऱ्यांला. १७ संपे. १८ आशा. १९ उत्पन्न करी. २० सफलतेनें. २१ आत्मज्ञानाचें. २२ नवेपणा. २३ शांत होतें. २४ व्यापारांत. २५ ऐक्यता. २६ व्याज. २७ सिद्ध होते. २८ संपत्ति. २९ दैन्य. ३० साकाराला. ३१ अनुभव. ३२ शरीर. ३३ दुःखी.

॥ ८१ ॥ येऱ्हवीं आयुष्याचें सूत्र विघडतां । भूतांची उमटे खडाडता[1] । काय न मरत-याहि चित्ता । ऐंगात[2] नोहे ॥ ८२ ॥ परि नेणों कैसें पैं गा । जे जडोनि गेले माझिया आंगा । तें प्रयाणींचिया लगबगा[3] । न सांडितीच मातें ॥ ८३ ॥ येऱ्हवीं तरी जाण । ऐसे जे निपुण । तेचि अंतःकरण । युक्त योगी ॥ ८४ ॥ तंव इये शब्दकुपिके[4]तळीं । नोडेचि[5] अवधानाची[6] अंजुळी । जे नावेक अर्जुन तये वेळीं । मागांचि होता ॥ ८५ ॥ जेथ तद्ब्रह्मवाक्यफळें[7] । जियें नानार्थरसें रसाळें । बहकतें[8] आहाति परिमळें । भाव[9]-चेनि ॥ ८६ ॥ सहज कृपामंदानिळें[10] । श्रीकृष्णद्रुमाचीं[11] वचनफळें । अर्जुन श्रवणाचिये[12] खोळे । अवचिति[13] पडिलीं ॥ ८७ ॥ तिये प्रमेयाचीं[14] हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबकळिलीं । मग तैसींच कां घोळिलीं । परमानंदें ॥ ८८ ॥ तेणें बरवेपणें निर्मळें । अर्जुना उमेन्धांचे[15] डोहळे । घेतालि गळाळे[16] । विस्मयामृताचे ॥ ८९ ॥ तिया सुखसंपत्ती जोडलिया । मग स्वर्गा वांये[17] वांकुलिया[18] । हृदयाच्या जीवीं गुतकुलिया[19] । होत आहाती ॥ १९० ॥ ऐसें वरचिलीचि[20] बरवा । सुख जावों लागलें फांवा[21] । तंव रसस्वादा[22]-चिया हांवा[23] । लाहो केला ॥ ९१ ॥ झडकरी अनुमानाचेनि करतळें । घेऊनि तियें वाक्य-फळें । प्रतीतिमुखीं एके वेळें । घालूं पाहे ॥ ९२ ॥ तंव विचाराचिया रसना न रेटती[25] । परि हेतुच्या दशनीं[26] न फुटती । ऐसें जाणोनि सुभद्रापती । चुंबीचिना[27] ॥ ९३ ॥ मग चमत्कारला ह्मणे । इयें जळींची मों[28] तारांगणें[30] । कैसा झकविलों[31] असलागपणें[32] । अक्षरां-चेनि ॥ ९४ ॥ इयें पदें नव्हती कुडिया[33] । गगनाचिया घडिया । येथ आमुची मती बुडालिया । थाव[34] न निघे ॥ ९५ ॥ वांचूनि जाणावयाचीं[35] कें गोठी । ऐसें जीवीं[36] कल्पूनी किरीटी । तिया पुनरपि केली दृष्टी । यादवेंद्रा ॥ ९६ ॥ मग विनविलें सुभटें । हां हो जी यें एकवाटे[37] । सातही पदें अनुच्छिष्टें । नवलें आहाती ॥ ९७ ॥ येऱ्हवीं अवधाना-चेनि वहिलेपणें[39] । नाना प्रमेयांचे उगाणे । काय श्रवणाचेनि आंगवणें[41] । बोलों लाहाती[42] ॥ ९८ ॥ परि तैसें हें नोहेचि देवा । देखिला अक्षरांचा मेळावा[43] । आणि विस्मयाचिया जीवा । विस्मयो जाला ॥ ९९ ॥ कानाचेनि गवाक्षद्वारें[44] । बोलाचें रश्मी[45] अभ्यंतरें ।

---

१ क्षोभ. २ प्रळय. ३ धांदल. ४ शब्दरूप शिशी. ५ प्राप्त होत नाहीं. ६ सावधपणाची. ७ आत्मज्ञानरूप फळें. ८ पसरलेली. ९ श्रद्धा. १० मंद सुगंध बारीक वारा. ११ वृक्ष. १२ ओटींत, कानीं. १३ अकस्मात्. १४ सारवस्तुचीं. १५ ज्ञानाचे. १६ घोट. १७ दाखवीं. १८ वेडावणें. १९ गुदगुल्या. २० बाहेरच. २१ प्रसर. २२ गोडी. २३ इच्छा. २४ प्रारंभ. २५ जीभ. २६ दडपत नाहींत. २७ दांतांनीं. २८ ओंठास लावीना. २९ कीं हो, आश्चर्यार्थक अव्यय. ३० चांदण्या, नक्षत्रें. ३१ फसलों. ३२ सुगमपणें. ३३ खऱ्या. ३४ ठिकाण. ३५ कोठें, दुरापास्त. ३६ मनांत. ३७ एकत्र. ३८ ब्रह्म, अध्यात्म इत्यादि सात शब्द. ३९ निराळेपणें. ४० अनुभव. ४१ बळ. ४२ सांपडतात. ४३ जमाव. ४४ झरोक्यांतून. ४५ किरण.

पाहेना तंव चमत्कारें । अवधान ठाकलें ॥ २०० ॥ तेविंची मर्यादी चाड मज आहे । ते सांगतांही वेळ न साहे । ह्मणूनि निरूपण लवलाहें । कीजो देवा ॥ १ ॥ असो मागील पेंडताळा घेउनी । पुढां अभिप्राय दृष्टी सुनी । तेविंचि माजि शिरऊनि । आर्ती आपुली ॥ २ ॥ कैसी पुसती पाहे पां जाणिव । भिडेची तरी लंघों नेदी शिवं । येऱ्हवीं श्रीकृष्ण हृदयासि खेंवं । देवों सरला ॥ ३ ॥ अहो श्रीगुरूतें जें पुसावें । तें येणेंमानें सावध व्हावें । हें एकचि जाणें आघवें । सव्यसाची ॥ ४ ॥ आतां तयाचें तें प्रश्न करणें । वरी सर्वज्ञ श्रीहरीचें बोलणें । हें संजयो आवडलेपणें । सांगेल कैसें ॥ ५ ॥ तिये अवधान द्यावें गोठी । बोलिजेल नीट मऱ्हाठी । जैसी कानाचें आधीं दृष्टी । उपयोगा जाये ॥ ६ ॥ बुद्धिचिया जिभा । बोलाचा न चाखतां गाभा । अक्षरांचिया भांबी । इंद्रियें जिती ॥ ७ ॥ पाहा पां मालतीचे कळे । घ्राणासि कीर वाटले परिमळें । परि वर्णचिया बरवा काइ डोळे । सुखिये नव्हती ॥ ८ ॥ तैसे देशियेचिया हेवावा । इंद्रियें करिती राणिवा । मग प्रमेयांचिया गांवां । लेसों जाइजे ॥ ९ ॥ ऐसेनि नागरपणें । बोलें निमे तें बोलणें । ऐका ज्ञानदेव ह्मणे । निवृत्तीचा ॥ २१० ॥

इति श्रीज्ञानेश्वरविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

श्लोक ३०, ओंव्या २१०.

---

## अध्याय ८ वा.

अर्जुन उवाच–किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।
अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥

मग अर्जुनें ह्मणितलें । हां हो जी अवधारिलें । जें म्यां पुसिलें । तें निरूपिजे ॥ १ ॥ सांगा कवण तें ब्रह्म । कायसया नाम कर्म । अथवा अध्यात्म । काय ह्मणिपे ॥ २ ॥ अधिभूत तें कैसें । एथ अधिदैवत तें कवण असे । हें उघड मी परियेसें । ऐसें बोला ॥ ३ ॥

---

१ उजाडेना. २ प्रत्यंतर. ३ हेतु. ४ शिरवून, घालून. ५ आवड. ६ सीमा. ७ आलिंगन. ८ याप्रमाणें. ९ प्रेमानें. १० सार. ११ भ्रांती, शोभा. १२ मोगरीचे. १३ नासिकेला. १४ निश्चय. १५ सुगंध. १६ बाहेरच्या. १७ सुरेखपणानें. १८ मराठी भाषेच्या. १९ शोभेनें. २० राज्य. २१ सिद्धांताच्या. २२ चांगलेपणें, सिद्धांनीं. २३ चांगुलपणानें. २४ बोल बंद करणारें. २५ समजलें. २६ कोणाला. २७ समजेल.

**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।**

**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

देवा अधियज्ञ तो काई । कवण पां इये देहीं । हें अनुमानासि कांहीं । [1]दिठी न भरे ॥ ४ ॥ आणि [2]नियता अंतःकरणीं । तूं [3]जाणिजसी [4]देहप्रयाणीं । तें कैसेनि हें शार्ङ्गपाणी । [5]परिसेवा मातें ॥ ५ ॥ देखा [6]धवळारीं चिंतामणीचा । जरी [7]पहुडला होय दैवाचा । तरी [8]वोसणतांही बोल तयाचा । [9]सोपें न वचे ॥ ६ ॥ तैसें अर्जुनाचिया बोलासवें । आलें तेंचि म्हणितलें देवें । परियेसें गा बरवें । जें पुसिलें तुवां ॥ ७ ॥ किरीटी कामधेनूचा [10]पांडा । वरी कल्पतरूचा आहे [11]मांडवा । म्हणोनि मनोरथसिद्धीचिया चाडा । तो नवल नोहे ॥ ८ ॥ श्रीकृष्ण कोपोनि ज्यासि मारी । तो पावे परब्रह्मसाक्षात्कारी । [12]मा कृपेनें उपदेश करी । तो कैसापरी न पवेल ॥ ९ ॥ जैं कृष्णचि होइजे आपण । तैं कृष्ण होय आपुलें अंतःकरण । तेधवां संकल्पाचें आंगण । [13]वोळगती सिद्धी ॥ १० ॥ परि ऐसें जें प्रेम । तें अर्जुनींचि [14]आथि निःसीम । म्हणऊनि तयाचे [15]काम । सदां सफळ ॥ ११ ॥ याकारणें श्रीअनंतें । तें मनोगत तयाचें पुसतें । होईल जाणूनि आइतें । [16]वोगरूनि ठेविलें ॥ १२ ॥ जें [17]आपत्य थानीं निगे । तयाची भूक तें मातेसीचि लागे । येऱ्हवीं तें शब्दें काय सांगे । मग स्तन्य दे येरी ॥ १३ ॥ म्हणवोनि कृपाळुवा गुरूचियाठायीं । हें नवल नोहे कांहीं । परि तें असो आइका काई । जें देव बोलते जाहले ॥ १४ ॥

**श्रीभगवानुवाच-अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**

**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥**

मग म्हणीतलें सर्वेश्वरें । जें आकारीं इयें [18]खोंकरें । [19]कोंदलें असत न खिरे[20] । कवणे काळीं ॥ १५ ॥ येऱ्हवीं [21]सेंपुरपण तयाचें पाहावें । तरि शून्यचि नव्हे स्वभावें । वरि गगनाचेनि [22]पालवें । गाळूनि घेतलें ॥ १६ ॥ जें [23]ऐसेंही परि [24]विरुळें । इये विज्ञानाचिये खोळे । हासवलेंही न गळे । तें परब्रह्म ॥ १७ ॥ आणि आकाराचेनि [25]जालेपणें । जन्म-धर्मातें नेणें । [26]आकारलोपीं [27]निमणें । नाहीं कहीं ॥ १८ ॥ ऐसिया आपलियाचि सहज-स्थिती । जया ब्रह्माची नित्यता [28]असती । तया नाम [29]सुभद्रापती । अध्यात्म गा ॥ १९ ॥ मग गगनीं जेविं निर्मळें । नेणों कैंचीं एक वेळें । उठती [30]घनपटळें । नानावर्णें ॥ २० ॥

---

१ डोळ्यांत भरत नाहीं. २ नियमित. ३ समजशील. ४ अंतकाळीं. ५ सांगा. ६ मंदिरांत. ७ निजला. ८ बरळतां. ९ व्यर्थ. १० खोंड. ११ मंडप. १२ मग. १३ आलिंगिती, राबतात. १४ आहे. १५ इच्छा. १६ वाढून. १७ जें बालक स्तनपान करीत असतें. १८ मोडकें. १९ दाट भरलेलें. २० गळे. २१ भरपूरपण. २२ पदरानें. २३ अशा रीतीनें. २४ थोडें. २५ जन्मलेपणें. २६ दृश्य वस्तूच्या नाशानंतर. २७ लीन होणें, मरणें. २८ असणारी. २९ अर्जुना. ३० गडद ढगांचें पटल.

तैसे [1]अमूर्ती तिये [2]विशुद्धें। [3]महदादि भूतभेदें। ब्रह्मांडाचे [4]बांधे। होंचि लागती ॥ २१ ॥ तैं [5]निर्विकल्पाचिये [6]वरडी। फुटे आदिसंकल्पाची [7]विरूढी। आणि ते सर्वेंचि [8]मोडोनि ये [9]ढोंढी। ब्रह्मगोळकांच्या ॥ २२ ॥ तया एकैकाचें [10]भीतरीं पाहिजे। तंव बीजाचाचि [11]भरिला देखिजे। माजि होतियां जातियां नेणिजे। [12]लेखे जीवां ॥ २३ ॥ मग तया ब्रह्मगोळकांचे अंशांश। [13]प्रसवती आदिसंकल्प [14]असमास। हें असो ऐसी बहुवस। सृष्टी वाढे ॥ २४ ॥ परि दुजेनेवीण [15]एकला। परब्रह्मचि [16]संचला। अनेकत्वाचा आला। पूर जैसा ॥ २५ ॥ तैसें सम[17]विषमत्व नेणों कैचें। वायांचि चराचर रचे। पाहातां [18]प्रसवतिया योनीचे। लक्ष दिसती ॥ २६ ॥ [19]येरी जीवभावाचिये पैलविये। कांहीं मर्यादा करूं नये। पाहिजे कवण हें आघवें विये। तंव मूळ तें [20]शून्य ॥ २७ ॥ म्हणूनि कर्ता मुद्दल न दिसे। आणि [22]सेखीं कारणही कांहीं नसे। माजि कार्यचि [23]आपैसें। वाढोंचि लागे ॥ २८ ॥ ऐसा [24]करितेनवीण [25]गोचर। अव्यक्तीं हा आकार। निपजे जो व्यापार। तया नाम कर्म ॥ २९ ॥

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।
अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥

आतां अधिभूत जें म्हणिपे। तेंही सांगों संक्षेपें। तरि होय आणि हारपे। अभ्र जैसें ॥ ३० ॥ तैसें असतेपण [26]आहाच। नाहीं होइज हें साच। जयातें रूपा आणिती [27]पांच पांच। मिळोनियां ॥ ३१ ॥ भूतांतें [28]अधिकरूनि असे। आणि भूतसंयोगें तरि दिसे। जें वियोगवेळ भ्रंशे[29]। नामरूपादिक ॥ ३२ ॥ तयातें अधिभूत म्हणिजे। मग अधिदैवत पुरुष जाणिजे। जेणें प्रकृतीचें भोगिजे। [30]उपार्जिलें ॥ ३३ ॥ जो [31]चेतनेचा चक्षु। जो इंद्रिय[32]देशींचा [33]अध्यक्षु। जो [34]देहास्तमानीं वृक्षु। सं[35]कल्पविहंगमाचा ॥ ३४ ॥ जो परमात्माचि [36]परि दुसरा। [37]जे अ[38]हंकारनिद्रा [39]निदसुरा। म्हणोनि स्वप्नाचिया [40]वोरबारा। संतोषे शिणे ॥ ३५ ॥ जीव येणें नांवें। जयातें [41]ओळखिजे स्वभावें। तें अधिदैवत जाणावें। [42]पंचायतनींचें ॥ ३६ ॥ आतां इयेचि शरीरग्रामीं। जो शरीरभावातें [43]उपशमी।

१ निराकार. २ निर्मळ. ३ प्रकृति अहंकारादिकांच्या. ४ आकार. ५ कल्पनातीत शुद्ध ब्रह्माच्या. ६ माळजमिनींत. ७ अंकुर, वाढ. ८ दाट भरून. ९ आकार. १० आंत पाहावें तों. ११ भरणा. १२ गणना. १३ उत्पन्न होतात. १४ असंख्यात. १५ दुसऱ्याशिवाय. १६ भरला. १७ चांगलेंवाईट. १८ उत्पन्न होणाऱ्या. १९ इतर. २० अंकुर. २१ कांहीं नाहीं. २२ शेवटीं. २३ आपोआप. २४ करणारावांचून. २५ दिसणारा. २६ लटकें. २७ पंचमहाभूतें. २८ आश्रय करून. २९ नाशपावे. ३० उत्पन्न केलेलें. ३१ बुद्धीचा द्रष्टा. ३२ इंद्रियसमूहाचा. ३३ मुख्य. ३४ शरीराच्या अंतीं. ३५ मनोरथरूप पक्ष्याचा. ३६ परंतु. ३७ कारण. ३८ मीपणा हीच झोंप. ३९ निजलेला. ४० खटपट. ४१ बोलिजे, म्हणावें. ४२ ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, व अधिदैव. ४३ लयातें पाववी.

तो अधियज्ञ एथ गा मी । पंडुकुमरा ॥ ३७ ॥ येर अधिदैवाधिभूत । तेंहि मीचि कीर समस्त । परि पंधरें[1] किडाळा[2] मिळत । तें काय सांकें[3] नोहे ॥ ३८ ॥ तरि तें पंधरेपण न मैळे । आणि किडाळाचियाही अंशा न मिळे । परि जंव असे तयाचेनि मेळें । तंव सांकेंचि म्हणिजे ॥ ३९ ॥ तैसें अधिभूतादि आघवें । हें अविद्येचेनि पालवें[4] । झांकलें तंव मानावें । वेगळें ऐसें ॥ ४० ॥ तेचि अविद्येची जवनिक[5] फिटे[6] । आणि भेदभावाची अंवधी[7] तुटे । मग म्हणों एक होऊनि जरी आटे । तरि दोनी काय होती ॥ ४१ ॥ पैं केशांचा गुंडाळा । वरि ठेविली स्फटिकशिळा । ते जंव पाहिजे डोळां । तंव भेदली[8] गमनी ॥ ४२ ॥ पाठीं केश परौते[9] नेले । आणि भेदलेपण काय नेणों जाहलें । तरि टंक देऊनि सांदिलें । शिळेतें काइ ॥ ४३ ॥ नां[10] तें अखंडचि अंग्वती[11] । परि संगें भिन्न गमली होती । ते सारिलिया मागौती । जैसी कां तैसी ॥ ४४ ॥ तेवींचि अहंभाव जाये । तरि ऐक्य तें आधींचि आहे । हेंचि साम्य जेथ होये । तो अधियज्ञ मी ॥ ४५ ॥ पैं गा आम्हीं तुज । सकळ यज्ञ कर्मज[12] । सांगितले जें काज । मनीं धरूनि ॥ ४६ ॥ तो हा सकळ जीवांचा विसावा । नैष्कर्म्य[13]-सुखाचा ठेवा । परि उघड करूनि पांडवा । दाविजत असे ॥ ४७ ॥ पहिलें वैराग्य इंधन[14] परिपूर्तीं[15] । इंद्रियानळीं प्रदीप्तीं । विषयद्रव्यांचिया[16] आहुती । देऊनियां ॥ ४८ ॥ मग वज्रासन[17] तेचि उर्वी[18] । शोधूनि आधारमुद्रा[19] बरवी । वेदिका[20] रचे मांडवीं । शरीराच्या ॥ ४९ ॥ तेथ संयमाग्नीचीं[21] कुंडें । इंद्रियद्रव्याचेनि पवाडें[22] । यजिजती उदंडें । युक्तिघोषें[23] ॥ ५० ॥ मन मौनप्राणसंयम[24] । हाचि हवनसंपदेचा[25] संभ्रम[26] । येणें संतोषविजे निर्धूम[27] । ज्ञानानळ[28] ॥ ५१ ॥ ऐसेनि हें सकळ ज्ञानीं समर्पे[29] । मग ज्ञान तें ज्ञेयीं[30] हारपे । पाठीं ज्ञेयचि स्वरूपें । निखिल उरे ॥ ५२ ॥ तया नांव गा अधियज्ञ । ऐसें बोलिला जंव सर्वज्ञ[31] । तंव अर्जुन अतिप्राज्ञ[32] । तया पातलें तें ॥ ५३ ॥ हें जाणोनि म्हणितलें देवें । पार्था परिसत आहासि बरवें । या कृष्णाचिया बोलासवें । येरु[33] सुखाचा जाहला ॥ ५४ ॥ देखा बाळकाचिया धणी[34] धाइजे । कां शिष्याचेनि जाहालेपणें[35] होइजे । हें

---

१ सोनें. २ हिणकटाला. ३ डाकलग. ४ पदरानें. ५ पडदा. ६ निघे. ७ अंतर. ८ फुटलीशी दिसते. ९ एके बाजूस. १० नाहीं तरी. ११ स्वाभाविक. १२ कर्मापासून झालेले. १३ अहेतुक कर्माचरणसुखाचा. १४ वैराग्य हेच जळण. १५ भरपूर. १६ शब्दस्पर्शादिकांच्या. १७ आसनाचें नांव. १८ पृथ्वी. १९ योनिमुद्रा. २० ओटा. २१ इंद्रियनिग्रहरूप अग्नीचीं. २२ विस्तार, प्रसिद्ध. २३ योगमंत्रानें. २४ निग्रह. २५ जाळण्याचे पदार्थ. २६ समारंभ. २७ धुराविरहित. २८ ज्ञानाग्नि. २९ अर्पण करावें. ३० जाणावयाचें जें त्यामध्यें. ३१ श्रीकृष्ण. ३२ महाबुद्धिमान्. ३३ तो अर्जुन. ३४ तृप्तीनें तृप्त व्हावें. ३५ पक्वदशेनें.

सद्गुरूचि एकलेनि[1] जाणिजे । कां[2] प्रसवतिया[3] ॥ ५५ ॥ ह्मणोनि सात्विकभावांची मांदी[4] । कृष्णा आंगीं अर्जुना आधीं । न समातसे[5] परी बुद्धी । सांवरूनि देवें ॥ ५६ ॥ मग पिकलिया सुखाचा परिमळ[6] । कीं निवालिया अमृताचा कल्लोळ[7] । तैसा कोंवळा आणि रसाळ । बोल बोलिला ॥ ५७ ॥ ह्मणे परिसणेयांच्या राया[8] । आइकें बापा धनंजया । हेसी जळों सरलिया माया । तेथ जाळितें तेंही जळे ॥ ५८ ॥

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥**

जें आतांचि सांगीतलें होतें । अगा अधियज्ञ ह्मणितला जयातें । जे आधींचि[9] तया मातें । जाणोनि अंतीं ॥ ५९ ॥ तें देह झोळें[10] ऐसें मानुनी । ठेले आपणपें[11] आपण होउनी । जैसा मठ[12] गगना भरूनी । गगनींचि असे ॥ ६० ॥ ये प्रतीतीचिया[13] माजघरीं । तया निश्चयाची[14] ओवरी । आली ह्मणोनि बाहेरी । नव्हेचि[15] से ॥ ६१ ॥ ऐसें सबाह्य[16] ऐक्य दाटलें[17] । मीचि होऊनि असतां रचिलें । बाहेरि भूतांचीं पांचही खेवळें[18] । नेणतांचि पडिलीं ॥ ६२ ॥ आतां उभयां[19] उभेपण नाहीं जयाचें । मग[20] पडिलिया गहन[21] कवण तयाचें । ह्मणोनि प्रतीतीचिये पोटींचें । पाणी न हाले ॥ ६३ ॥ ते ऐक्याची आहे वोतिली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली । जैसी समरससमुद्रीं[22] धुतली । हेळेचि[23] ना ॥ ६४ ॥ पै अथावीं[24] घट बुडाला । तो आंत बाहेरी उदकें भरला । पाठीं दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे ॥ ६५ ॥ नातरी सर्पें कवच सांडिलें[25] । कां उबारेनें[26] वस्त्र फेडिलें । तरी सांग पां काय मोडलें । अवेवांमाजी[27] ॥ ६६ ॥ तैसा आकार हा ओहाच[28] असे । वांचूनि वस्तू ते सांचलीचि असे । तेचि बोधें[29] जालिया विसुंकुसे[30] । कैसेनि आतां ॥ ६७ ॥ ह्मणोनि यापरी मातें । अंतकाळीं जाणतसाते[31] । जे मोकलिती[32] देहातें । ते मीचि होती ॥ ६८ ॥ येऱ्हवीं तरी साधारण । उरीं[33] आदळलिया मरण । जो आठव धरी अंतःकरण । तेंचि होइजे ॥ ६९ ॥ जैसा कवण एक काकुळती[34] । पळतां पवनगती[35] । दुपावलीं[36] अवचितीं । कुहामाजि[37] पडियेला ॥ ७० ॥ आतां तया पडणयाआरौतें[38] । पडण

---

१ एकटा. २ अथवा. ३ मातेनें. ४ समुदाय. ५ मावत नाहीं. ६ सुगंध. ७ लाटा. ८ श्रोत्यांत श्रेष्ठ, श्रुतज्ञ. ९ अगोदर. १० मिथ्या. ११ स्वतः, आपण. १२ देऊळ, घर इत्यादि. १३ अनुभवाच्या. १४ कोठडी. १५ स्मरण. १६ आंतबाहेर. १७ भरलें. १८ कवचें. १९ उभे असलेल्यांस. २० तर. २१ कठीण. २२ पूर्णानंद. २३ मळेचिना, धुळींत मिळेना. २४ खोल. २५ कांत टाकिली. २६ उष्णतेमुळें. २७ अवयवामध्यें. २८ वरचेवर नाशे. २९ बुद्धीनें जाणलें असतां. ३० गोंधळे, कासावीस होणें. ३१ जाणत असतां. ३२ सोडिती. ३३ उरावर येऊन आदळलें असतां. ३४ दीनतेनें. ३५ वाऱ्याप्रमाणें. ३६ दोन पावलांत. ३७ कुव्यांत. ३८ पडण्याच्या अगोदर.

चुकवाक्या पैलें । नाहीं ह्मणोनि तेथें । पडावेंचि पडे ॥ ७१ ॥ तेंवि मृत्यूचेनि अवसरें एकें । जें येऊनि जीवासमोर ठाके । तें होणें मग न चुके । भेलत्यापरी ॥ ७२ ॥ आणि जागतां जंव असिजे । तंव जेणें ध्यानें भावना भाविजे । डोळां लागतखेंवो देखिजे । तेंचि स्वमीं ॥ ७३ ॥

**यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥**

तेंवि जितेनि अवसरें । जें आवडोनि जीवीं उरे । तेंचि मरणाचिये[८] मेरे । फार होय लागे ॥ ७४ ॥ आणि मरणीं जया जें आठवे । तो तेंचि गतीतें पावे ।

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्ध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७ ॥**

ह्मणोनि सदां स्मरावें । मीतेंचि तुवां ॥ ७५ ॥ डोळां जें देखावें । कां कानीं हन ऐकावें । मनीं जें भावावें । बोलावें वाचे ॥ ७६ ॥ तें आंत बाहेरि आघवें । मीचि करूनि घालावें । मग सर्वी काळीं स्वभावें । मीचि आहें ॥ ७७ ॥ अर्जुना[१५] ऐसें जाहालिया । मग न[१६] मरिजे देह गेलिया । मां संग्रामु केलिया । भय काय तुज ॥ ७८ ॥ तूं मन बुद्धि सांचेंसी । जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी । तरी मातेंचि मा पावसी । हे माझी भाक ॥ ७९ ॥ हेंचि[२०] कांयिसया वरी होये । ऐसा जरी संदेह वर्तत आहे । तरी अभ्यासूनि आधीं पाहें । मग नव्हे तरी कोपें ॥ ८० ॥

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥**

येणेंचि अभ्यासेंसीं योगू । चित्तासि करीं पां चांगू । अगा उपायबळें पंगू[२१] । पर्वत[२२] डाकी ॥ ८१ ॥ तेवीं सदभ्यास[२३] निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहरें[२४] । लावीं मग शरीर । राहो अथवा जावो ॥ ८२ ॥ जें नाना गतीतें पाववितें । तें चित्त वरीलें[२५] आत्मयातें । मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे ॥ ८३ ॥ पैं सरितेचेनि[२६] ओघें । सिंधुजळा मीनले[२७] घोघें । ते काय वर्तत आहे मागें । ह्मणोनि पाहों येती ॥ ८४ ॥ ना[२८] तें

---

१ दुसरें. २ लागे. ३ कोणच्याही तऱ्हेनें. ४ इच्छा. ५ लागतांच. ६ जिवंत असतेसमयीं. ७ हृदयांत राहतें. ८ वेळीं. ९ बुद्धिंगत. १० मरतेवेळीं. ११ स्थितीला. १२ मलाच. १३ अथवा. १४ चिंतावे. १५ याप्रमाणें. १६ मरत नाहीं. १७ मग. १८ युद्ध. १९ निश्चयानें. २० कशानें. २१ लंगडा. २२ पर्वत चढे. २३ चांगला अभ्यास. २४ मार्गे. २५ अंगीकारील. २६ नदी. २७ घोंघों ह्मणत. २८ तर तें.

समुद्रचि होऊनि ठेले । तेविं चित्ताचें चैतन्य जाहालें । जेथें[2] यातायात निमालें । घनानंद[3] जें ॥ ८५ ॥

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**

**सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥**

जयाचें आकारावीण असणें । जया जन्म ना निर्मणें[4] । जें आघवेंचि[5] आघवेपणें । देखत असे ॥ ८६ ॥ जें गगनाहूनि[6] जुनें । जें परमाणूहूनि[7] सानें । जयाचेनि संन्निधानें[8] । विश्व चळे ॥ ८७ ॥ जें सर्वांतें यया [9]विये । विश्व सर्व जेणें [10]जिये । हेतु[11] जया बिहे[12] । अचिंत्य जें ॥ ८८ ॥ देखें [13]वोळंबा ईर्गेळ[14] न [15]चरे । [16]तेजीं तिमिरें[17] न शिरे । जें देहाचें आंधारें । चर्मचक्षूसीं[18] ॥ ८९ ॥ सुसेडा[19] सूर्यकणांच्या राशी । जो नित्य उवो ज्ञानियांसी । अस्तमानाचें जयासी । आडनांव नाहीं ॥ ९० ॥

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**

**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥**

तया अव्यंगवाणेया[20] ब्रह्मातें । प्रयाणकाळे[21] प्राप्ते । जो स्थिरावलेनि चित्तें । आणोनि[22] स्मरे ॥ ९१ ॥ बाहेर पद्मास[23] न रचुनी । उत्तराभिमुख बैसोनी । जीवीं सुख सूनि[24] । कर्मयोगाचें ॥ ९२ ॥ आंतु [25]मिनलेनि मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें । आपेंआप [26]संभ्रमें । मिळावया ॥ ९३ ॥ आकळलेनि[27] योगें । मध्यमा[28] मध्यमार्गें । अग्निस्थानौनि[29] निगे । ब्रह्म[30]-रंध्रा ॥ ९४ ॥ तेथ अचेत[31] चित्ताचा सांगात । आहाचवाणा[32] दिसे मांडत । जेथ प्राण गगना आंत । संचरे कां ॥ ९५ ॥ परि मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरला । योगबळें आवरला[33] । सज्ज होउनी ॥ ९६ ॥ तो जडाजडातें[34] विरवितु[35] । भ्रूलता[36]-माजी संचरतु । जैसा घंटानाद लयस्तु[37] । घंटेसींच होय ॥ ९७ ॥ कां झांकलिये घटींचा दिवा । नेणिजे काय जाहाला केव्हां । या रीती जो पांडवा । देह ठेवी ॥ ९८ ॥ तो केवळ परब्रह्म । जया परम पुरुष ऐसें नाम । तें माझें निजधाम । होऊनि ठाके ॥ ९९ ॥

---

१ ज्ञानकला. २ जेथें. ३ अत्यानंद. ४ मरणें. ५ सर्वच. ६ आकाशापेक्षां. ७ सूक्ष्म कणाहून सूक्ष्म. ८ जवळ राहण्यानें. ९ उत्पन्न होतें. १० जगतें. ११ न्यायशास्त्राचें अनुमान. १२ भितो. १३ वोळंबा=वाळवी. १४ विस्तव. १५ खात. १६ उजेडांत. १७ अंधकार. १८ अज्ञानदृष्टया. १९ निर्मळ. २० परिपूर्ण. २१ मरणसमय. २२ अनुभव घेऊन. २३ योगांतील पद्म या नांवाचें आसन. २४ घालून. २५ एकवटलेल्या. २६ त्वरेनें. २७ संपादन केलेल्या. २८ सुषुम्ना. २९ आधारपद्मापासून. ३० ताळू. ३१ जड चित्ताच्या संगतीं. ३२ खोटा. ३३ व्यापला. ३४ चेतन अचेतनातें. ३५ लीन करितो. ३६ भ्रुकुटीमध्यें. ३७ गुप्त.

**यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ।**
**यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥**

सकळां जाणणेया जे लोणी । तिये जाणिवेची जे खाणी । तयां ज्ञानियांचिये आयणी । जयातें अक्षर ह्मणिपे ॥ १०० ॥ चंडवातेंही न मोडे । तें गगनचि कीं फुडें । वांचूनि जरी होईल मेहुडें । तरी उरेल कैचें ॥ १ ॥ तेंवि जाणणेया जें आकळलें । तें जाणिवलेपणेंचि उमाणलें । मग नेणवेचि तया ह्मणितलें । अक्षर सहजें ॥ २ ॥ ह्मणोनि वेदविद नर । ह्मणती जयातें अक्षर । जे प्रकृतीसीं पर । परमात्मरूप ॥ ३ ॥ आणि विषयांचें विष उलेंडूनि । जे सर्वेंद्रियां प्रायश्चित देऊनि । आहाति देहाचिया बैसोनि । झाडातळीं ॥ ४ ॥ ते यापरी विरक्त । जयाची निरंतर वाट पाहात । निष्कामासि अभिप्रेत । सर्वदा जें ॥ ५ ॥ जयाचिया आवडी । न गणिती ब्रह्मचर्याचीं सांकडीं । निष्ठुर होऊन बापुडीं । इंद्रियें करिती ॥ ६ ॥ ऐसें जें पद । दुर्लभ आणि अगाध । जयाचिये थडिये वेद । चुंबुकळिले ठले ॥ ७ ॥ तें ते पुरुष होती । जे यापरी लया जाती । तरी पार्था हेचि स्थिती । एक वेळ सांगों ॥ ८ ॥ तेथ अर्जुनें ह्मणितलें स्वामी । हेंचि ह्मणावेया होतों पां मी । तंव सहजें कृपा केली तुह्मी । तरी बोलिजो कां ॥ ९ ॥ परि बोलावें तें मति सोहोपें । तेथें ह्मणितलें त्रिभुवनदीपें । तुज काय नेणों संक्षेपें । सांगेन ऐक ॥ ११० ॥ तरी मना बाहेरिलीकडे । येयाची सोंविया संवे मोडे । हें हृदयाचिया डोहीं बुडे । तैसें कीजे ॥ ११ ॥

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥**

परि हें तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें । सर्वद्वारीं कवाडें । कोंडासती ॥ १२ ॥ तरी सहजें मन कोंडलें । हृदयींचि असेल उगलें । जैसें करचरणीं मोडलें । परिवरें न संडी ॥ १३ ॥ तैसें चित्त राहिल्या पांडवा । प्राणांचा प्रणवचि करावा । मग अनुवृत्तिपंथें आणावा । मूर्ध्निवरी ॥ १४ ॥ तेथ आकाशीं मिळे न मिळे । तैसा धरावा धारणाबळें । जंव मात्रात्रय मावळे । अर्धबिंबीं ॥ १५ ॥ तंववरी तो समीरु । निरांळीं कीजे स्थिरु । मग लग्नीं जेवि ओंकारु । बिंबींचि विलसे ॥ १६ ॥

---

१ ज्ञानाला. २ अवधी. ३ निर्णयीं. ४ अविनाश. ५ मोठ्या वाऱ्यानें. ६ खरें. ७ मेघ. ८ समजलें. ९ अटकळींत आलें. १० वेदार्थ जाणणारा. ११ मायातीत. १२ ओलांडून. १३ आहेत. १४ इष्ट. १५ संकटें. १६ दीन. १७ ठिकाण. १८ तीरीं. १९ लीन झाले. २० दुर्लभ पद. २१ ह्मणणार. २२ सुगम. २३ श्रीकृष्णानें. २४ सहज. २५ संवय. २६ इंद्रियनिग्रहाचीं. २७ खिळतात. २८ निर्विकल्प. २९ कुटुंब. ३० क्रमाक्रमानें. ३१ ब्रह्मरंध्रापर्यंत. ३२ धारणा. शक्तीनें. ३३ अकार, उकार, मकार. ३४ अर्धमात्रेंतच. ३५ वायु. ३६ आकाशीं. ३७ ऐक्यावस्थेंत.

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥**

तैसें ओम् हें स्मरों[1] सरे । आणि तेथेंचि प्राण पुरे[2] । मग प्रणवातीत[3] उरे । पूर्णघन[4] जें ॥ १७ ॥ म्हणोनि प्रणवैकनाम[5] । हें एकाक्षर ब्रह्म । जो माझें स्वरूप परम । स्मरत[6]-साता ॥ १८ ॥ यापरि त्यजी देहातें । तो त्रिशुद्धी[7] पावे मातें । जया पावणयापरौतें । आणीक पावणें नाहीं ॥ १९ ॥ तेथ अर्जुना जरी विपायें[8] । तुझ्या जीवीं हन ऐसें जाये । ना हें स्मरण मग होये । कायसयावरी अंतीं ॥ १२० ॥ इंद्रियां अनघड[9] पडिलिया । जीवितीचें[10] सुख बुडालिया । आंत बाहेरि उघडलिया[11] । मृत्युचिन्हें ॥ २१ ॥ ते वेळीं बैसावेंचि कवणें । मग कवण निरोधी करणें[12] । तेथ कौण्याचेनि[13] अंतःकरणें । प्रणव स्मरावा ॥ २२ ॥ तरि गा ऐशिया हो ध्वनी[14] । झणें[15] यारा देशी गा मनीं । पैं नित्य सेविला मी निदानीं[16] । सेवक होय ॥ २३ ॥

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥**
**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥**

जें विषयांसि तिळांजुळी[17] देउनी । प्रवृत्तीवरी निर्गेंड[18] वाउनी । मातें हृदयीं सूनी[19] । भोगिताती ॥ २४ ॥ परि भोगितया नीराणुका[20] । भेटणें नाहीं क्षुधादिकां । तेथ चक्षुरादि रंकां । कवण पाड ॥ २५ ॥ ऐसे निरंतर एकवटले[21] । जे अंतःकरणीं मजशीं लिगटले[22] । मीचि होऊनि आतले[23] । उपासिती ॥ २६ ॥ तयां देहावसान[24] जैं पावे । तैं तिहीं मातें स्मरावें । मग म्यां जरी न पावावें । तरि उपास्ति[25] ते कायसी ॥ २७ ॥ पैं रंक एक ओड-लेपणें[26] । काकुळती धांव गा धांव म्हणे । तरि तयाचिये ग्लानी[27] धांवणें । काय न घडे मज ॥ २८ ॥ आणि भक्तांही तेचि दशा । तरी भक्तीचा सोसें[28] कायसा । म्हणऊनि हा ध्वनी[29] ऐसा । न वाखाणावा ॥ २९ ॥ तिहीं जे वेळीं मी स्मरावा[30] । ते वेळीं स्मरिला कीं पावावा । तो ओभारही[31] जीवा । साहवेचि ना ॥ १३० ॥ तें ऋणवैपण[32] देखोनि आंगीं ।

---

१ स्मरण्याचें रहातें. २ पूर्ण होतो. ३ ओंकाराहून श्रेष्ठ. ४ ब्रह्मानंदस्वरूप. ५ प्रणव हेंच एक नांव ज्याचें. ६ स्मरत असतां. ७ निश्चयानें. ८ कदाचित्. ९ अवघड. १० जीवंतपणा. ११ उघड झालें असतां. १२ इंद्रियें. १३ कोणत्या. १४ संशयास. १५ कदाचित्. १६ शेवटीं. १७ सर्वथा सोडून. १८ शपथ वाहून. १९ शिरवून, ठेवून. २० असमाधान. २१ ऐक्यास पावले. २२ तल्लीन झाले. २३ व्यापले. २४ मरणाची वेळ. २५ उपासना, भक्ती. २६ निरुपाय होऊन. २७ दुःखी. २८ हांव. २९ अभिप्राय. ३० आठवावा. ३१ ओझें. ३२ कर्जाचें ओझें.

मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं । भक्तांचिया [२]तनुत्यागीं । परि[३]चर्या करीं ॥ ३१ ॥ देह[४]वैकल्याचा वारा । झणें लागेल या सकुमारा । म्हणोनि आत्मबोधाचे पांजिरों । [५]सुयें तयातें ॥ ३२ ॥ वरि आपुलिया स्मरणाची [६]उंवाइली । हीर्व ऐसी करीं साउली । [९]ऐसेनि नित्य बुद्धि संचली । मी आणीं तयातें ॥ ३३ ॥ म्हणोनि देहांतीचें [१०]सांकडें । मोझिया [१२]केहींचि न पडे । मी आपुलियातें आपुलीकडे । सुखेंचि आणीं ॥ ३४ ॥ वरचील देहाची [१३]गांवैसणी फेडुनी । [१४]ओहाच अहंकाराचे रज झाडुनी । शुद्धवासना निवडुनी । आपणापां मेळवीं ॥ ३५ ॥ आणि भक्तां तरी देहीं । विशेष [१५]ऐक्यवंकीचा ठाव नाहीं । म्हणऊनि [१६]ओव्हेर करितां कांहीं । वियोग ऐसा न वाटे ॥ ३६ ॥ ना तरी देहांतींचि मियां यावें । मग आपणपें यातें न्यावें । हेंही नाहीं जें स्वभावें । जे आधींचि मज [१७]मिनले ॥ ३७ ॥ [१८]येरी शरीराचिया [१९]सलिलीं । असतेपण हेंचि [२०]सांउली । वांचूनि चं[२१]द्रिका ते ठेली । चंद्रींचि आहे ॥ ३८ ॥ ऐसे जे नित्य[२२]युक्त । तयांसि सुलभ मी सतत । म्हणऊनि देहांतीं निश्चित । मीचि होती ॥ ३९ ॥ मग क्लेशतरूची [२३]वाडी । जे [२४]तापत्रयाग्नीची [२५]सेगडी । जे [२६]मृत्युकाकासि [२७]कुरोंडी । सांडिली आहे ॥ १४० ॥ जें दैन्याचें दुभतें । जें महाभयातें वाढवितें । जें सकळदुःखाचें पुरतें । भांडवल ॥ ४१ ॥ जें दुर्मतीचें मूळ । जें कुकर्माचें फळ । जें [२८]व्यामोहाचें केवळ । स्वरूपचि ॥ ४२ ॥ जें संसाराचें बैसणें । जें विकाराचें [२९]उद्यानें । जें सकळ रोगांचें [३०]भोणें । वाढिलें आहे ॥ ४३ ॥ जें काळाचा [३१]खिंच उशिटा । जें आशेचा [३२]आंगवेठा । जन्ममरणाचा [३३]वोलिवटा । स्वभावें जें ॥ ४४ ॥ जें भुलीचें भरिव । जें विकल्पाचें वोतिव । किंबहुना पेंव । विंचुवांचें ॥ ४५ ॥ जें व्याघ्राचें क्षेत्र[३४] । जें [३५]पण्यांगनांचें मित्र । जें [३६]विषयविज्ञानयंत्र । सुपूजित ॥ ४६ ॥ जें [३७]लांवेचा कळवळा । निवालिया विषोदकाचा [३८]गळाळा । जें [३९]विश्वासु आंगवळा । [४०]संवचोरांचा ॥ ४७ ॥ जें कोढियाचें खेंव[४२] । जें काळसर्पाचें [४३]मार्दव । [४४]गोरियेचें स्वभाव । गायन जें ॥ ४८ ॥ जें वैरियाचा [४५]पाहुणेर । जें दुर्जनाचा आदर । हें असो जें सागर । अनर्थाचा ॥ ४९ ॥ जें स्वप्नीं देखिलें स्वप्न । जें मृगजळें [४६]सांसिनलें वन । जें [४७]धूम्ररजांचें गगन । ओतलें आहे ॥ १५० ॥ ऐसें जें हें शरीर । तें ते न पवतीचि पुढती नर । जे होऊनि ठेले अपार । स्वरूप माझें ॥ ५१ ॥

---

१ उतराई. २ शरीरपतनाचे वेळीं. ३ सेवा. ४ देहदुःखाचा. ५ कवच. ६ घालीं. ७ स्पष्ट. ८ गार, सौम्य. ९ अशा तऱ्हेनें. १० संकट. ११ माझ्या भक्तांस. १२ कधींच. १३ झांकण. १४ वरचेवर. १५ तादात्म्याचा. १६ तिरस्कार. १७ मिळाले. १८ एरवीं. १९ पाण्यांत. २० प्रतिबिंब. २१ चांदणें. २२ सदा माझा निदिध्यासयुक्त. २३ बाग. २४ आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हे तीन ताप. २५ शेगडी. २६ मृत्युरूप कावळा. २७ ओवाळणी. २८ भ्रांतीचें. २९ बाग. ३० जेवण, वोर्णे. ३१ खिचडी. ३२ शरीर. ३३ वहाती वाट. ३४ जागा. ३५ वेश्या. ३६ विषयांच्या माहितीचें. ३७ मलीण. ३८ घोट. ३९ भरंवसा. ४० अनुकूल झाला. ४१ स्नेहभावानें वागणाऱ्या चोराचा. ४२ आलिंगन. ४३ मऊपणा. ४४ पारध्याचें. ४५ पाहुणचार. ४६ भरलें. ४७ धुराचें.

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥

येऱ्हवीं ब्रह्मपणाचिये मेडसे । न चुकतीचि पुनरावृत्तीचे वेळसे । परि निवटलियाचें जैसें । पोट न दुखे ॥ ५२ ॥ ना तरीं चेइलिया नंतरें । न बुडिजे स्वप्नींचेनि महापूरें । तेंवि मातें पावले ते संसारें । लिंपतीचि ना ॥ ५३ ॥ येरवीं जगदाकाराचें सिरें । जें चिरस्थाईयांचे धुरें । ब्रह्मभुवन गा चवरें । लोकाचळाचें ॥ ५४ ॥ जिये गांवींचा पैहार दिवोवरी । एका अमरेंद्राचें आयुष्य ने धरी । विळोनि पांती उठी एकसरी । चवदा इंद्रांची ॥ ५५ ॥

सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।
रात्रिं युगसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥

जैं चौकडियां सहस्र जाये । तैं ठायेठावो विळचि होये । आणि तैसेंचि सहस्रेंवरिये पाहें । रात्री जेथ ॥ ५६ ॥ येवढें अहोरात्र जेथिचें । तेणें न लोटती जे भाग्याचे । देखती ते स्वर्गींचे । चिरंजीव ॥ ५७ ॥ येरां सुरगणांची नेवाई । विशेष सांगावी तेथ काई । मुद्दल इंद्राचीचि दशा पाहीं । जे दिहेंचे चौदा ॥ ५८ ॥ परि ब्रह्मयाचियाहि आठा प्रहरांतें । आपुलिया डोळां देखते । जे आहाति गा तयांतें । अहोरात्रविद म्हणिजे ॥ ५९ ॥

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे ।
रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥

भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

तये ब्रह्मभुवनीं दिवसें पाहे । ते वेळीं गणना कोंहीं न समाये । ऐसें अव्यक्ताचें होये । व्यक्त विश्व ॥ १६० ॥ पुढती दिहाची चौपाहारी फिटे । आणि हा आकारसमुद्र आटे । पाठीं तैसाचि मग पाहांटे । भरोंलागे ॥ ६१ ॥ शारदीयेचिये प्रवेशीं । अभ्रें जिरती

---

१ महत्व. २ भोंवरे. ३ मेलेल्याचें. ४ लिप्त होत नाहींत. ५ कारण, निमित्त. ६ बहुतकाळ राहणारांचें. ७ मुख्य. ८ शेवट. ९ त्रैलोक्यरूप पर्वताचें. १० प्रहर. ११ इंद्राचें. १२ पुरत नाहीं. १३ एका दिवसांत. १४ पंक्ति, समुदाय. १५ एकदम. १६ चार युगें. १७ वास्तविक. १८ पुरा दिवस ब्रह्मदेवाचाच होतो. १९ तशाच हजार चौकडीपर्यंत. २० दिवस रात्र मिळून. २१ मरती. २२ बहुत काल असणारे. २३ नवल. २४ एका दिवसाचे. २५ कालज्ञानवेत्ते, ज्योतिषी. २६ कोठेंही. २७ निराकाराचें. २८ स्पष्ट, साकार. २९ दिवसाचे. ३० चार प्रहर. ३१ दृश्यमान जग. ३२ नाश होतो. ३३ शरत्काळाचे.

आकाशीं । मग ग्रीष्मांतीं[1] जैशीं । निगती पुढती[2] ॥ ६२ ॥ तैसी ब्रह्मदिनाचिये आदी[3] । हे भूतसृष्टीची[4] मांदी[5] । मिळे जंव सहस्रावधी[6] । निमित्त पुरे ॥ ६३ ॥ पाठीं रात्रीचा अवसर[7] होये । आणि विश्व अव्यक्तीं[8] लया जाये । तोही युगसहस्र मोटका पाहे । आणि तैसेंचि रचे ॥ ६४ ॥ हें सांगावया काय उपपत्ती[10] । जे जगाचा प्रळयो आणि संभूती[11] । इये ब्रह्म-भुवनींचिया होती । अहोरात्रामाजी ॥ ६५ ॥ कैसें [12]थोरियेचें मान पाहें पां । तो सृष्टि-बीजाचा सांटोपा[13] । परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग[14] जाहाला ॥ ६६ ॥ येऱ्हवीं त्रैलोक्य हें धनुर्धरा । तिये गांवींचा गा पसारा । तो हा दिनोदयीं एकसरां[16] । मांडत असे ॥ ६७ ॥ पाठीं रात्रींचा समो[19] पावे । आणि अपैसांचि[20] सांटवे । म्हणिये जयिचें तेथ स्वभावें । साम्यासि[22] ये ॥ ६८ ॥ जैसें वृक्षपण बीजासि आलें । कीं मेघ हें गगन जाहालें । तैसें अनेकत्व[23] जेथ सामावलें । तें साम्य म्हणिपे ॥ ६९ ॥

परस्तस्मात्तु भावोऽन्यो व्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।
यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥

तेथ समविषम[24] न दिसे कांहीं । म्हणोनि भूतें भाष[25] नाहीं । जेवि दुधचि जाहालिया दहीं । नामरूप जाय ॥ १७० ॥ तेवि आकारलोपासरिसें[26] । जगाचें जगपण [27]अंसे । परि जेथें जाहालें तें जैसें । तैसेंचि असे ॥ ७१ ॥ तें तया नांव सहज अव्यक्त । आणि आकारा ये तेंचि व्यक्त । हें एकास्तव[28] एक सूचित । येऱ्हवीं दोनी नाहीं ॥ ७२ ॥ जैसें आटलिया रुपें । आटलेपण ते [29]खोटी म्हणिपे । पुढती तो घनाकार[30] हारपे । जे वेळीं अळंकार होती ॥ ७३ ॥ हीं दोन्ही जैशीं होणीं । एकीं साक्षिभूत सुवर्णीं । तैसी व्यक्ता[31]-व्यक्ताची कडसणी[32] । वस्तूच्याठायीं[33] ॥ ७४ ॥ तें तरी व्यक्त ना अव्यक्त । नित्य ना नाशवंत । या दोहीं भावां[34] अतीत । अनादिसिद्ध ॥ ७५ ॥ जें हें विश्वचि होऊनि असे । परि विश्वपण[35] नासिलेनि न नासे । अक्षरें पुसिल्या न पुसे । अर्थ जैसा ॥ ७६ ॥ पाहें पां तरंग तरी होत जात । परि तेथ उदक तें अखंड असत । तेवीं भूताभावीं[36] न नाशत । अविनाश जें ॥ ७७ ॥ ना तरी आटतिये अळंकारीं । नाटतें[37] कनक[38] असे जयापरी । तेवीं मरतिये जीवाकारीं । अमर जें आहे ॥ ७८ ॥

---

१ ग्रीष्मऋतूच्या शेवटीं. २ पुनः. ३ पूर्वी. ४ प्राण्यांची उत्पत्ति. ५ समुदाय. ६ सहस्र वर्षांचा अवधि. ७ समय. ८ निराकारीं. ९ लहान. १० युक्ति. ११ उत्पत्ति. १२ महत्व, थोरपणा. १३ कोठार, सांटवण. १४ माप भरल्यावर मग जो आणखी त्यावर ढीग करतात तो. १५ दिवस उगवतांच. १६ एकदम. १७ उगवतो, उत्पन्न होतो. १८ आपोआप. १९ समय. २० केव्हां. २१ म्हणून. २२ समान अवस्थेस येतें. २३ नानातऱ्हा. २४ कमीअधिक. २५ बोल. २६ आकृतिनाशाबरोबर. २७ नाहींसें होतें. २८ एकासाठीं. २९ लगड. ३० घट्टपणा. ३१ साकारनिराकाराची. ३२ विचार. ३३ ब्रह्माच्याठायीं. ३४ स्थिति. ३५ आकार. ३६ भुतें नाहींशीं झालीं असतां. ३७ न आटणारें. ३८ सुवर्ण.

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥**

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**
**यस्यांऽतथानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥**

जयातें अव्यक्त ह्मणों ये कोडें । ह्मणतां स्तुति हे ऐसें नावडे[2] । जें मन बुद्धी न सांपडे । ह्मणऊनियां ॥ ७९ ॥ आणि आकारा आलिया जयाचें । निराकारपण नै वचे । आकारलोपें न विसंचे । नित्यता गा ॥ १८० ॥ ह्मणोनि अक्षर जें ह्मणिजे । तेवींचि ह्मणतां बोधही उपजे । जया परौतों पैसें न देखिजे । या नाम परमगती ॥ ८१ ॥ परि आघवा इहीं देहपुरीं । आहे निजेलियाचे परी । जे व्यापार करवी ना करी । ह्मण-ऊनियां ॥ ८२ ॥ येऱ्हवीं जे शारीरचेष्टा । त्यामाजी एकिही न ठके[11] गा सुभटा[12] । दाही इंद्रियांचिया वाटा । वोहतचि आहाती ॥ ८३ ॥ उकलूनि[14] विषयांचा पेठौ[15] । होत मनाचा कोहटा[16] । तो सुखदुःखांचा राजवाटा । भितराही पावे ॥ ८४ ॥ परि रावो[19] पहुडलिया सुखें । जैसा देशींचा व्यापार न ठके । प्रजा आपुलालेनि अभिलाखें[20] । करितीच असती ॥ ८५ ॥ तैसें बुद्धीचें हन जाणणें । कां मनाचें घेणें देणें । इंद्रियांचें करणें । स्फुरण[21] वायूचें ॥ ८६ ॥ हे देहक्रिया आघवी । न करितां होय बरवी । जैसा न चेलवितेनि[22] रवी । लोक चाले ॥ ८७ ॥ अर्जुना तया परी । सुतला[23] ऐसा आहे शरीरीं । ह्मणोनि पुरुष गा अवधारीं । ह्मणिपे जयातें ॥ ८८ ॥ आणि प्रकृती[24] पतिव्रते । पडिला एकपत्नीव्रत । येणेंही कारणें जयातें । पुरुष ह्मणींये ॥ ८९ ॥ पैं वेदांचें बहुवसपण । देखेचिना जयाचें आंगण । हें गगनाचें पांघुरण । होय देखा ॥ १९० ॥ ऐसें जाणूनि योगीश्वर । जयातें ह्मणती परात्पर जें अनन्यगतीचें घर । गिंवसीत ये ॥ ९१ ॥ जे तनू वाचा चित्तें । नाइकती दुजिये गोष्टीतें । तयां एकनिष्ठेचें पिकतें । सुक्षेत्र जें ॥ ९२ ॥ हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तम । ऐसा सांचा जयाचा मनोधर्म । तया आस्तिकाचा आश्रम । पांडवा गा ॥ ९३ ॥ जें निर्वाणींचें गौरव[31] । जें निर्गुणाची जाणिव[32] । जें सुखाची राणिव[33] । निरीशासी ॥ ९४ ॥ जें संतोषियां वाढिलें ताट । जें अर्चैंतां[35] अनाथाचें मायपोट । भक्तीसी उजू[36] वाट । जया

---

१ कौतुकानें. २ न वाटे. ३ जात नाहीं. ४ बिघडे. ५ पेक्षां, पलीकडे. ६ विस्तार, ठिकाण. ७ ब्रह्मप्राप्ति. ८ सगळा. ९ शरीरांत. १० देहव्यापार. ११ राहे. १२ अर्जुना. १३ चालतातच. १४ उघडून. १५ बाजार. १६ चव्हाठा. १७ राजमार्ग, कारभार. १८ आंत. १९ राजा. २० इच्छेनें. २१ चलन. २२ चालवितां. २३ निजला. २४ माया. २५ आणिमाय. २६ एकनिष्ठतेनें. २७ शोधित. २८ कायावाचामनेंकरून. २९ उत्तम शेत. ३० थोर. ३१ महत्व. ३२ ज्ञान. ३३ राज्य. ३४ निःस्पृहांसी. ३५ चिंतारहित. ३६ सरळ.

गांवा ॥ ९५ ॥ हें एकैक सांगोनि वायां । काय फार करूं धनंजया । पैं गेलिया अवघा ठाया । तो ठावोचि होइजे ॥ ९६ ॥ दिवाचिया सुळुका । जैसें दिवचि पडे दृष्टोळखा । कां सामोर जालिया अर्का । तेंमचि प्रकाश होये ॥ ९७ ॥ तैसा संसार अवघा गांवा । जेलांसांता पांडवा । होऊनि ठाके आघवा । मोक्षाचाचि ॥ ९८ ॥ तरि अग्निमाजी आलें । जैसें इंधन अग्नि जाहालें । पाठीं न निवडेचि कांहीं केलें । काष्ठपण ॥ ९९ ॥ ना तरी साखरेचा मावळता । बुद्धिमंतपणेंही करितां । परि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी ॥ २०० ॥ लोहाचें कनक जाहालें । हें एकें परिसेंचि केलें । आतां भौणिक कैचें तें गेलें । लोहत्व आणी ॥ १ ॥ म्हणोनि तूप होऊनि मागौतें । जेवीं दूधपणा न येचि निरुतें । तेवि पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥ २ ॥ तें माझें परम । सौचोकारें निजधाम । हें अंतर्वेद तुज वर्म । दाविजत असे ॥ ३ ॥

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।
प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥

तेवींचि आणिकेंही एकें प्रकारें । हें जाणतां आहे [1]सोपारें । तरि देह सांडितेनि अवसरें । जेथें मिळती योगी ॥ ४ ॥ अथवा अवचटें ऐसें घडे । जे अनवसरें देह सांडे । तरि मागौतें येणें घडे । देहासीचि ॥ ५ ॥ म्हणोनि कोळशुद्धी जरी देह ठेविती । तरि ठेवीत [21]खेंवी ब्रह्मचि होती । एरवीं अकाळीं तरी येती । संसारा पुढती ॥ ६ ॥ तैसें सायुज्य आणि पुनरावृत्ती । या दोन्ही अवसरा आहती । तोचि अवसर तुजप्रती । प्रसंगें सांगों ॥ ७ ॥ तरि एकें गा सुभटा । पातलिया मरणाच्या तोंडिवटा । पांचे आपुलिया वाटा । निघती अंतीं ॥ ८ ॥ ऐसा वरि वैरिपडिला प्रयाणकाळीं । बुद्धीतें भ्रम न गिळी [28] । स्मृति नव्हे आंधळी । न मरे मन ॥ ९ ॥ हा चेतनावर्ग आघवा । मरणीं दिसे टवटवा । परि अनुभविलिया ब्रह्मभावा । गंवसणी होऊनी ॥ २१० ॥ ऐसा सावध हा [33]समाभावो । आणि निर्वाणवेंहीं निर्वाहो । हें तरीच घडे सौवावो । अग्नीचा औथी ॥ ११ ॥ पाहा पां वारेनें कां उदकें । जैं दिवियाचें दिवेपण झांके । तें असतीच काय देखे । [35]दिठी आपुली ॥ १२ ॥ तैसें देहांतींचेनि विषमवातें । देह अांत

---

१ अधिष्ठान, आश्रय. २ थंडीच्या. ३ सूर्य. ४ अंधार. ५ गेला असतां. ६ जळण. ७ निवडतां येत नाहीं. ८ मागून. ९ होत नाहीं. १० दुसरा. ११ निश्चयें. १२ पुनः संसार, जन्म. १३ सोपेपणानें. १४ अंतरंग, गुह्य. १५ सुलभ. १६ देहत्यागकाळीं. १७ अकस्मात. १८ अकाळीं. १९ जन्मास. २० शास्त्रोक्त शुद्धकाळीं. २१ तत्क्षणीं. २२ पुनः. २३ ब्रह्मासीं ऐक्य. २४ पुनर्जन्म. २५ समय आहेत. २६ धांदल. २७ पंचमहाभूतें. २८ प्राप्त झालेल्या. २९ भ्रांती. ३० प्राणसमुदाय. ३१ टवटवीत. ३२ ब्रह्मभावास संरक्षक. ३३ ऐक्यभाव. ३४ मोक्षपर्यंत. ३५ सहाय. ३६ आहे. ३७ दृष्टि. ३८ वायुप्रकोपानें.

बाहेरि श्लेष्मआतें । तैं विझोनि जाय उजितें । अग्निचें तेज्हां ॥ १३ ॥ ते वेळीं प्राणासि प्राण नाहीं । तेथ बुद्धि असोनि करील काई । म्हणोनि अग्निवीण देहीं । चेतना न थारे ॥ १४ ॥ अगा देहींचा अग्नि जरी गेला । तरी देह नव्हे चिखल वोला । वायां आयुष्यवेळ आपुला । आंधारें गिंवसी ॥ १५ ॥ आणि मागील स्मरण आघवें । तें तेणें अवसरें सांभाळावें । मग देह त्यजूनि मिळावें । स्वरूपीं कीं ॥ १६ ॥ तंव तया देह-श्लेष्माचे चिखलीं । चेतनाचि बुडोनि गेली । तेथ मागिली पुढिलीहि ठेली । आठवण ॥ १७ ॥ म्हणोनि आधीं अभ्यास जो केला । तो मरण न येतां निमोनि गेला । जैसें ठेवणें न दिसतां मालवला । दीप हातींचा ॥ १८ ॥ आतां असो हें सकळ । जाण पां ज्ञानासि अग्निमूळ । तया अग्नीचें प्रयाणीं बळ । संपूर्ण आथी ॥ १९ ॥

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।
तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥

आंत अग्निज्योतीचा प्रकाश । बाहेरी शुक्लपक्ष आणि दिवस । आणि सा मांसांमाजि मास । उत्तरायण ॥ २२० ॥ ऐसिया समयोगाची निरुती । लाहोनि जे देह ठेविती । ते ब्रह्मचि होती । ब्रह्मविद ॥ २१ ॥ अवधारीं गा धनुर्धरा । येथवरि सामर्थ्य यया अवसरा । तेवींचि हा उजू मार्ग स्वपुरा । यावया पैं ॥ २२ ॥ एथ अग्नी हें पहिलें पायतरें । ज्योति-र्मय हें दुसरें । दिवस जाणें तिसरें । चौथें शुक्लपक्ष ॥ २३ ॥ आणि सौमास उत्तरायण । तें वरचील गा सोपान । येणें सायुज्यसिद्धिसदन । पावती योगी ॥ २४ ॥ हा उत्तम काळ जाणिजे । यातें अर्चिरादि मार्ग म्हणिजे । आतां अकाळ तोही सहजें । सांगेन आइक ॥ २५ ॥

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।
तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

तरि प्रयाणाचिया अवसरें । वातश्लेष्मां सुभरें । तेणें अंतःकरणीं आंधारें । कोंदलें ठाके ॥ २६ ॥ सर्वेंद्रियां लांकुड पडे । स्मृति भ्रमामाजि बुडे । मन होय वेडें । कोंडे प्राण ॥ २७ ॥ अग्नीचें अग्निपण जाये । मग तो धूमचि अवघा होये । तेणें चेतना गिंवासिली ठाये । शरीरींची ॥ २८ ॥ जैसें चंद्राआड आभाळ । सैंवट दाटे सजळ । मग

---

१ कफ होतो. २ उजेड. ३ जीवकला. ४ शोधी. ५ नाहींशी झाली. ६ नाश पावला. ७ उत्त-रायणांतील सहा महिन्यांपैकीं कोणतातरी एक. ८ सारखा योग. ९ वेळा. १० साधून. ११ तत्त्ववेत्ते, ज्ञानी. १२ समयाला. १३ सरळ. १४ स्वरूपाला. १५ पायरी. १६ तेजःपुंज. १७ शिडी. १८ ब्रह्मांत लीन होणें, ब्रह्मथी मुक्ति. १९ ऊर्ध्व जाण्याचा मार्ग. २० अयोग्य काळ. २१ कफवातादि दोषांच्या. २२ भरानें. २३ काष्ठवत् पडतात. २४ ज्ञान. २५ आच्छादिलेली राहाते. २६ भरगच्च. २७ पाण्यानें युक्त.

अंधर[1] ना उजाळ[2]। ऐसें झांबळें[3] होय ॥ २९ ॥ कां मेरे ना सावध । ऐसें जीवितासि पडे स्तब्ध । आयुष्य मरणाची मर्याद । वेळ ठाकी ॥ २३० ॥ ऐसी मनबुद्धि करणीं[4]। सभोंवतीं धूमकुळाची[5] कोंडणी । तेथ जन्में[6] जोडलिये वाहणी[7] । युगाचि बुडे ॥ ३१ ॥ हांगा हातींचें जे वेळीं जाये । ते वेळीं आणिका लाभाची गोठी कें[8] आहे । म्हणऊनि प्रयाणीं[9] तंव होय । येतुली दशा ॥ ३२ ॥ ऐसी देहाआंत स्थिती । बाहेरि कृष्णपक्ष वरि रातीं[10] । आणि सामासही वोडवती[11] । दक्षिणायन ॥ ३३ ॥ इये पुनरावृत्तीचीं घेराणीं[12] । आघवीं एकवटती जयाचिया प्रयाणीं । तो स्वरूपसिद्धीची कोंहाणी[13] । केसेनि आइके ॥ ३४ ॥ ऐसा जयाचा देह पडे । तया योगी[14] म्हणोनि चंद्रवरी[15] जाणे घडे । मग तेथूनि माघुता वेहुडे[16] । संसारा ये ॥ ३५ ॥ आह्मीं अकाळ जो पांडवा । म्हणितला तो हा जाणावा । आणि हाचि धूम्रमार्ग गांवा । पुनरावृत्तीचिया[17] ॥ ३६ ॥ येर तो अर्चिरादि मार्ग । तो वसता[18] आणि असलग[19] । सांविया[20] स्वस्त चांग । निवृत्तीवरी[21] ॥ ३७ ॥

शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।
एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽवर्तते पुनः ॥ २६ ॥

ऐसिया अनादिया[22] दोनी वाटा । एकी उजू[23] एकी अव्हांटा[24] । म्हणवूनि बुद्धिपूर्वक सुभटा । दाविलिया तुज ॥ ३८ ॥ कां जे मार्गामार्ग देखावे । साच लटिकें वोळखावें । हिताहित जाणावें । हिताचिलागीं ॥ ३९ ॥ पाहें पां नाव[25] देखतां बरवी । कोणी आड घाली काय अथावीं[26] । कां सुपंथ जाणोनि अडवीं[27] । रिगवत असे ॥ २४० ॥ जो विष अमृत वोळखे । तो अमृत काय सांडूं शके । तेविं जो उजू वाट देखे । तो अव्हांटा नवचे ॥ ४१ ॥ म्हणोनि पुढें । पारखावें[28] खरें कुडें[29] । पारखिलें तरी न पडे । अनवसरें[30] कांहीं ॥ ४२ ॥ एऱ्हवीं देहांतीं थोर विषम । या मार्गाचें आहे संभ्रम[31] । जन्में[32] अभ्यासिलियाचें हन काम । जाईल वांयां ॥ ४३ ॥ जरि अर्चिरादि मार्ग चुकलिया । अवचटें[33] धूम्रपंथें पडिलिया । तरी संसारपांथीं जुंतलियां[34] । भंवतचि[35] असावें ॥ ४४ ॥ हे सायास देखोनि मोठे । आतां केसेनि पां एक-वेळ फिटे । म्हणोनि योगमार्ग गोमटे । शोधिले दोन्ही ॥ ४५ ॥ तंव एकें ब्रह्मत्वा[36] जाइजे । आणि एकें पुनरावृत्ती[37] येइजे । परि दैवगत्या जो लाहिजे । देहांतीं जेणें ॥ ४६ ॥

१ अंधार. २ प्रकाश, उजेड. ३ झुंजुक. ४ इंद्रियें. ५ अति धुराची. ६ जन्मानें जोडलेल्याचा नाश होतो. ७ क्रमानें. ८ कोठें. ९ मरणसमयीं. १० रात्र. ११ प्राप्त होतात. १२ ठिकाणें. १३ गोष्ट. १४ योगी होता म्हणून. १५ चंद्रलोकापर्यंत. १६ फिरे. १७ जन्ममरणफेऱ्यांच्या. १८ वस्ती असलेला. १९ सोपा. २० सर्वथा. २१ मोक्षापर्यंत. २२ प्राचीन. २३ सरळ. २४ आड-वाट. २५ नौका. २६ तळ न लागणाऱ्या खोल पाण्यांत. २७ आडमार्गांत. २८ ओळखावें. २९ खोटें. ३० संकटांत. ३१ भय. ३२ जन्मभर. ३३ एकाएकीं. ३४ जुंपलेल्यांनीं. ३५ फिरत. ३६ मोक्ष. ३७ संसार.

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥**

ते वेळीं म्हणितलें हें नव्हे । वायां अवचटें काय पावे । देह त्यजूनि वस्तु होआवें । मार्गेंच कीं ॥ ४७ ॥ तरि आतां देह असो अथवा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों । कां जें दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनी ॥ ४८ ॥ मज तरंगपण असे कीं नसे । ऐसें हें उदकाप्रति कहीं भासे । तें भलतेव्हां जैसें । तैसें उदकचि कीं ॥ ४९ ॥ तरंगाकारें न जन्मेचि । ना तरंग लोपें निमेचि । तेवि देहीं जे देहेंचि । वस्तु जाहाले ॥ २५० ॥ आतां शरीराचें तयांचिया ठाईं । आडनांवही उरलें नाहीं । तरि कोणें काळें काई । निमे तें पाहें पां ॥ ५१ ॥ मग मार्गातें कासया शोधावें । कोणें कोठूनि कें जावें । जरी देशकाळादि आघवें । आपणचि असे ॥ ५२ ॥ आणि हां गा घट जे वेळीं फुटे । ते वेळीं तेथिचें आकाश लागे नीट वाटे । वाटा लागलें तरि गगना भेटे । येरवीं चुके ॥ ५३ ॥ पाहें पां ऐसें हन आहे । कीं तो आकारुचि जाये । येर गगन तें गगनींचि आहे । घटत्वाही आधीं ॥ ५४ ॥ ऐसिया बोधाचेनि सुरवाडें । मार्गामार्गाचें सांकडें । तया सोहंसिद्धां न पडे । योगियांसी ॥ ५५ ॥ याकारणें पंडुसुता । तुवां होआवें योगयुक्ता । तेतुलेनि सर्वकाळीं साम्यता । आपैसया होईल ॥ ५६ ॥ मग भलतेथ भलतेव्हां । देह असो अथवा जावा । परि अबंधा नित्य ब्रह्मभावा । विघड नाहीं ॥ ५७ ॥ तो कल्पादि जन्मा नागवे । कल्पांतीं मरणें नाव्हवे । माजि स्वर्गसंसाराचेनि लाघवें । झेंकेना ॥ ५८ ॥ येणें बोधें जो योगी होये । तयासीचि या बोधाचें नीटपण आहे । कां जे भोगातें पेलूनि पायें । निजरूपा ये ॥ ५९ ॥ पैं गा इंद्रादिकां देवां । जयां सर्वस्वें स्वर्गीं गाजती राणिवा । तें सांडणें मानूनि पांडवा । वोवली जो ॥ २६० ॥

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥२८॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
अक्षरब्रह्मयोगो नाम अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

जरी वेदाध्ययनाचें जालें । अथवा यज्ञाचें शेत पिकलें । कीं तप दानाचें जोडलें । सर्वस्व हन जें ॥ ६१ ॥ तया आघवां पुण्यांचा मेळा । भार ओंतोनि जया ये फळा । तें

---

१ एकाएकीं. २ ब्रह्मरूप. ३ खोटें. ४ केव्हांही. ५ नाहींसे होई. ६ कोठें. ७ शरीर. ८ सोईनें. ९ संकट. १० ब्रह्म आपण असा अनुभव झालेल्यांस. ११ आपोआप. १२ बंधरहित. १३ न सांपडे. १४ न बुडे. १५ फसत नाहीं. १६ कां कीं. १७ लोटून. १८ इंद्रादिक देव. १९ भुतीची गर्जना. २० त्याज्य. २१ दूर लोटी. २२ ओंतून.

परब्रह्म निर्मळ । सोंठि सरे ॥ ६२ ॥ जें नित्यानंदाचेनि मानें । उपमेचा [3]कांटाळां न दिसे सानें । पाहा पां वेदयज्ञादिसाधनें । जया सुखा ॥ ६३ ॥ जें विटे ना सरे । भोगी-तयाचेनि पवाडें पुरे । पुढती महासुखाचें सोयरें । भावंडचि ॥ ६४ ॥ ऐसें वृष्टीचेनि सुखपणें । जयासी अदृष्टाचें बैसणें । जें शतमखाही आंगवणें । नोहेचि एका ॥ ६५ ॥ तयातें योगीश्वर अलौकिकें । [10]दिठीचेनि हीततुकें । अनुमानती कौतुकें । तंव [12]हेळेवार आवडे ॥ ६६ ॥ मग तया सुखाची किरीटी । करूनियां गा [13]पाउटी । परब्रह्माचिये पाठीं । आरूढती ॥ ६७ ॥ ऐसें [15]चराचरैकभाग्य । जें [16]ब्रह्मेशां आराधने योग्य । योगियांचें भाग्य । भोगधन जें ॥ ६८ ॥ जो सकळकळांची कळा । जो परमानंद [17]पुतळा । जो जिवाचा जिव्हाळा । विश्वाचिया ॥ ६९ ॥ जो सर्वज्ञतेचा [18]वोल्हावा । जो यादवकुळींचा कुळदिवा । तो श्रीकृष्णजी पांडवा । प्रती बोलिला ॥ २७० ॥ ऐसा कुरुक्षेत्रीं वृत्तांत । संजयो रायासि असे सांगत । तेचि परियेसा पुढारी मात । ज्ञानदेव म्हणे ॥ २७१ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

श्लोक २८, ओव्या २७१.

---

## अध्याय ९ वा.

तरि [19]अवधान येकलें दीजे । मग सर्वसुखासि [20]पात्र होइजे । हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आइका ॥ १ ॥ परी [21]प्रौढी न बोलें हो जी । तुम्हा सर्वज्ञांच्या समाजीं । [22]देयावें अवधान हे माझी । विनवणी [23]सलगीची ॥ २ ॥ कां जे [24]लळेयाचे लळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती । जरी माहेरें श्रीमंतें होती । तुम्हांऐसीं ॥ ३ ॥ तुमचे या [25]दिठिवेयांचिये वोलें । [26]सासिन्नले प्रसन्नतेचे मळे । ते साउली देखोनि लोळें । [27]श्रांत जी मी ॥ ४ ॥ प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणोनि आपुलिया स्वेच्छा वोलावा [28]लाहों । तेथही जरी सलगी करूं [29]बिहों । तरी [30]निवों कें पां ॥ ५ ॥ ना तरी बाळक बोबडां बोलीं । वांकुडा [31]विचुंका पाउलीं । ते [32]चोजें करूनि माउली । [33]रिझे जेवीं ॥ ६ ॥ तेवि तुम्हा संतांचा

---

१ निर्मळ ब्रह्माचे प्राप्तीपुढें कांहीं नाहीं. २ बरोबरी. ३ ताजव्यांत, उपमेच्या बरोबरीनें. ४ लहान. ५ ज्या सुखासाठीं. ६ इच्छेनें. ७ अदृश्यच. ८ इंद्रालाही. ९ स्वाधीन. १० ज्ञान. ११ अटकळीनें. १२ सूक्ष्म वाटे. १३ पायरी. १४ चढतात. १५ स्थावरजंगमाचें मुख्य भाग्य. १६ ब्रह्मदेव व शंकर यांला. १७ मूर्ति. १८ जिव्हाळा. १९ लंक्ष. २० योग्य. २१ आढ्यतेनें. २२ द्यावें. २३ लडिवाळपणाची. २४ आवड. २५ कृपादृष्टीच्या. २६ भरास आले. २७ श्रमलेला. २८ मिळो. २९ भीति पावूं. ३० कोठें शांतता होईल. ३१ वांकडीतिकडी. ३२ कौतुक. ३३ आनंद पावते.

डियासो । कैसेनि तरी आह्मावरि हो । या बहुवा ओळुकिया जी आहों । सलगी करित ॥ ७ ॥ वांचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ [5]भवादृश श्रोते । काय [4]धंड्याकरित ॥ ७ ॥ वांचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ [5]भवादृश श्रोते । काय [4]धंड्यावरी सोरस्वतें । पढों सिकिजे ॥ ८ ॥ अवधारा आवडे तेसणां धुंधुरु । परि महातेजीं न [6]मिरवे काय करूं । अमृताचिया ताटीं [8]वोगरुं । ऐसी रससोय कैंची ॥ ९ ॥ हां हो हिमकरासी [11]विंजणें । कीं नादापुढें आइकवणें । लेणियासि लेणें । हें [12]कैंहीं आथी ॥ १० ॥ सांगा परिमळें काय [13]तुरंबावें । सागरें कवणेठायीं नाहावें । हें गगनाचि [14]आंडे आघवें । ऐसा [15]पैवाडु कैंचा ॥ ११ ॥ तैसें तुमचें अवधान [16]धाय । आणि तुम्ही ह्मणा हें होये । ऐसें वक्तृत्व कवणा आहे । जेणें [17]रिझों तुम्ही ॥ १२ ॥ तरि विश्वप्र[18]गटितिया गभस्ती । काय [19]हातिवेन न कीजे आरती । कां [20]चुळोदकें [21]अपांपती । अर्घ्य नेदिजे ॥ १३ ॥ प्रभू तुम्ही [22]महेशाचिया मूर्ती । आणि मीं दुबळा [23]अर्चितसें भक्ती । ह्मणोनि बोल अन्हीं [24]आंगोवती । तन्ही स्वीकाराल कीं ॥ १४ ॥ बाळक बापाचिये ताटीं रिगे । आणि बापातेंच जेवऊं लागे । कीं तो संतोषलेनि वेगें । मुखाचि [25]वोढवी ॥ १५ ॥ तैसा मी जरी तुह्माप्रती । चावटी करितसें बाळमती । तरी तुम्ही संतोषिजे ऐसी जाती । प्रेमाची असे ॥ १६ ॥ आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुह्मी संत घेतलें असा [26]बोहें । ह्मणोनि केलिये सलगीचा नोहे । [27]ओभार तुह्मा ॥ १७ ॥ अहो तान्हयाचें लागतां झटें । तेणें अधिकचि पान्हा फुटे । रोषें प्रेम [28]दुणवटे । [29]पढियंतयाचेनि ॥ १८ ॥ ह्मणऊनि मज लेंकुरुवाचेनि बोलें । तुमचें कृपाळूपण [30]निदैलें । तें [31]चेइलें ऐसें जी जाणवलें । यालागीं बोलिलों मी ॥ १९ ॥ येऱ्हवीं चांदिणें पिकविजत आहे [32]चेपणीं । कीं [33]वारिया घापत आहे वाहणी । हां हो गगनासि गंवसणी । घालिजे केंवि ॥ २० ॥ आइका पाणि [34]वोथिंजावें न लगे । नवनीतीं [35]मथुला न रिगे । तेंवि लाजिलें व्याख्यान निगे । देखोनि जयातें ॥ २१ ॥ हें असो [36]शब्दब्रह्म जिये बाजे । शब्द मावळलेया निश्शंत निजे । तो गीतार्थ मऱ्हाटीया बोलिजे । हा [37]पांड काई ॥ २२ ॥ परि ऐसियाही मज [38]धिंवसा । तो पुढतियाचि येकि आशा । जे [40]धिटिवां करूनि [41]भवादृशां । [42]पढियंतें होआवें ॥ २३ ॥ तरि

---

१ प्रीति. २ आवडीनें. ३ तुह्मांसारिखे. ४ धडे पाठ करून. ५ सरस्वतीपुत्रानें ६ तेवढा. ७ काजवा. ८ वाढूं. ९ पाकनिष्पत्ति. १० चंद्राला. ११ पंख्यानें वारा घालणें. १२ कोठें आहे. १३ हुंगावें. १४ अडके, सांठवे. १५ मोठा विस्तार. १६ तृप्त होय. १७ खुष व्हाल. १८ सर्व जग प्रकाशमय करणाऱ्या सूर्याला. १९ काडवातीनें. २० चूळभर पाण्यानें. २१ समुद्राला. २२ ईश्वराच्या. २३ पुजा करतों. २४ एक वनस्पती (निर्गुंडी). २५ पुढें करी. २६ बहुत मोहानें. २७ भार, जड. २८ दुणावतें. २९ अत्यंत प्रियाचें. ३० निजलेलें. ३१ जागृत जाहलें. ३२ आडींत. ३३ वाऱ्याला. ३४ झांकण. ३५ पातळ करावें. ३६ रवि. ३७ वेद. ३८ योग्यता. ३९ धैर्य. ४० धीटपण. ४१ तुह्मासारखे. ४२ आवडतें.

आतां चंद्रापासोनि निवविते । जें अमृताहूनि जिवविते । तेणें अवधानें कीजे वाढवें । मनोरथी माझिया ॥ २४ ॥ कां जैं दिठिवा तुमचा वरुषे । तैं सकळार्थ सिद्धिमती पिके । येऱ्हवीं कोंभेला उन्मेष सुके । जरी उदास तुम्ही ॥ २५ ॥ सहजें तरी अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होय चारा । तरी दोंदें पेलती अक्षरां । प्रमेयांचीं ॥ २६ ॥ अर्थ बोलाची वाट पाहे । तेथ अभिप्रावोचि अभिप्रायातें विये । भावाचा फुलौरा होत जाये । मतिवरी ॥ २७ ॥ म्हणूनि संवादाचा सुवावो ढळे । तऱ्ही हृदयाकाशा सारस्वत वोळे । आणि श्रोता दुश्चित तरि वितुळे । मांडला रस ॥ २८ ॥ अहो चंद्रकांत द्रवता कीर होये । परि ते हातवटी चंद्रीं कीं आहे । म्हणऊनि वक्ता तो वक्ता नोहे । श्रोतेनिविण ॥ २९ ॥ परि आतां आमुतें गोड करावें । ऐसें तांदुळीं कासया विनवावें । साइखडियानें काइ प्रार्थावें । सूत्रधारातें ॥ ३० ॥ तो काय बाहुलियांचिया काजा नाचवी । कीं आपुलिये जाणिवेची कळा वाढवी । म्हणऊनि आम्हा या ठेवींठेवी । काय काज ॥ ३१ ॥ तंव श्रीगुरु म्हणती काइ जाहलें । हें समस्त ही आम्हा पावलें । आतां सांगें जें निरोपिलें । श्रीकृष्णदेवें ॥ ३२ ॥ येथ संतोषोनि निवृत्तिदासें । जी जी म्हणऊनि उल्हासें । अवधारा श्रीकृष्ण ऐसें । बोलते जाहले ॥ ३३ ॥

श्रीभगवानुवाच–इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।
ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥

ना तरि अर्जुना हें बीज । पुढती सांगिजेल तुज । जें हें अंतःकरणींचें गुज । जिवाचिये ॥ ३४ ॥ येणें मानें जीवाचें हियें फोडावें । मग गुज कां पां मज सांगावें । ऐसें कांहीं स्वभावें । कल्पिशी जरी ॥ ३५ ॥ तरी परियेसीं गा प्रज्ञा । तूं आस्थेचीच संज्ञा । बोलिलिये गोष्टीची अवज्ञा । नेणसी करूं ॥ ३६ ॥ म्हणोनि गूढपण आपुलें मोडो । वरि न बोलणेंही बोलावें घडो । परि आमुचिये जीवींचें पडो । तुझ्या जिवीं ॥ ३७ ॥ अगा थानीं कीर दूध गूढ । परि थानासीचि नव्हे कीं गोड । म्हणोनि सेरो कां सेवितयाची चाड । जरी अनन्य मिळे ॥ ३८ ॥ मुडांहूनि बीज काढिलें । मग निर्वाळिलिये भूमी पेरिलें । तरि तें सांडिविखुरी गेलें । म्हणों ये काय ॥ ३९ ॥ यालागीं सुमन आणि शुद्धमती । जो अनिंदक अनन्यगती । पैं गा गौप्यही परि तयाप्रती । चावळिजे सुखें ॥ ४० ॥ तरि प्रस्तुत आतां गुणीं इहीं । तूं वांचून आणिक नाहीं । म्हणोनि गूज

---

१ कृपादृष्टि. २ ज्ञान. ३ पुष्ट होती. ४ सिद्धांतांचीं. ५ उत्पन्न करतो. ६ पुष्पमाला. ७ अनुकूल वारा. ८ वक्तृत्व. ९ बाहुलीनें. १० ज्ञानाची. ११ खटपट. १२ रहस्य. १३ हृदय. १४ पंडित, ज्ञाता. १५ नांव. १६ अमर्यादा. १७ पूर्ण होवो. १८ इच्छा. १९ अन्य आश्रय न करणारा. २० मुडच्यांतून. २१ साफ केलेल्या. २२ सांडून विखरून टाकलें. २३ प्रशस्त अंतःकरणाचा. २४ सांगावें.

तरी तुझ्याठायीं । लपऊं नये ॥ ४१ ॥ आतां किती नावानावा गुज । म्हणतां कानडें वाटेल तुज । तरि सांगेन ज्ञान सहज । विज्ञानेसीं ॥ ४२ ॥ परि तेंचि ऐसेनि निवाडें । जैसें भेसळलें खरें कुडें । मग काढिजे फोडोवाडें । पारखूनियां ॥ ४३ ॥ कां चांचूचेनि सांडसें । खांडिजे पय पाणी राजहंसें । तुज ज्ञान विज्ञान तैसें । वांटूनि देऊं ॥ ४४ ॥ मग वारयाचिया धारसा । पाडिनला कोंडा कां तुरेंचि जैसा । आणि कणाचा आपैसा । रासिवा जोडे ॥ ४५ ॥ तैसें जें जाणीतलेया सोंठीं । संसार संसाराचिये गांठी । लाऊनि बैसवी पाठीं । मोक्षश्रियेच्या ॥ ४६ ॥

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥

जें जाणणेया सुविद्येच्या गांवीं । गुरुत्वाची आचार्यपदवी । जें सकळगुह्याचा गोसांवी । (पवित्रां रावो) ॥ ४७ ॥ आणि धर्माचें निजधाम । तेंविन्चि उत्तमाचें उत्तम । पैं जया येतां नाहीं काम । जन्मांतराचें ॥ ४८ ॥ मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे । प्रत्यक्ष फांवों लागे तैसें । आपैसेयाचि ॥ ४९ ॥ तेवींचि गा सुखाच्या पांउटीं । चढतां येइजे जयाच्या भेटी । मग भेटल्या कीर मिठी । भोगणें याहि पडे ॥ ५० ॥ परि भोगाचिये ऐलीकडिलिये मेरे । चित्त उभें ठेलें सुखीभारें । ऐसें सुलभ आणि सोपारें । वरि परब्रह्म ॥ ५१ ॥ पैं गा आणिकही एक यातें । जें हाता आलिया तरी न वेंचे । आणि अनुभवितां कांहीं न वेचे । वरि विटेहि ना ॥ ५२ ॥ येथ जरी तूं तार्किका । ऐसी हन घेसी शंका । ना येवढी वस्तु हे लोकां । उरली केवि पां ॥ ५३ ॥ जे ऐकोत्तरेयाचिया वाढी । जळतिये आगीं घालिती उडी । ते अनायासें स्वगोडी । सांडिती केविं ॥ ५४ ॥ तरि पवित्र आणि रम्य । तेंवेंचि सुखोपाय सुगम । आणि सुसुख परम धर्म्य । वरि आपण जोडे ॥ ५५ ॥ ऐसा अवघाचि हा सुरवाड आहे । तरीं जनाहातीं केविं उरों लाहे । हा शंकेचा ठाव कीर होये । परि न धरावी तुवां ॥ ५६ ॥

---

१ वारंवार. २ वांकडें. ३ संसारज्ञानासहित. ४ खोटें. ५ स्पष्ट करून. ६ चोंचीचे. ७ निर-निराळें करावें. ८ दूध. ९ प्रवाहांत. १० ढीग. ११ बरोबर. १२ नाश. १३ महत्वाची. १४ स्वामी. १५ (पवित्रांमध्यें श्रेष्ठ.). १६ ठिकाण. १७ थोडें. १८ उदयास येत. १९ मूळचेंच. २० प्राप्त होय. २१ आपोआप. २२ पायरीवर. २३ भेटल्यावर. २४ भोगायचें त्याला. २५ सीमेवर. २६ सुखार्थ. २७ सुखानें मिळणारें. २८ अनायासें घेण्याजोगें. २९ जात नाहीं. ३० तर्कशास्त्राप्रमाणें. ३१ शेंकडा १ रुपया व्याज. ३२ आपखुषीनें. ३३ अतिसुखकारक. ३४ उत्कृष्ट धर्मयुक्त. ३५ अनुकूळ.

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

पाहें पां दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदरा आड । परि तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्धचि सेवी ॥ ५७ ॥ कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं । परि पराग सेविजे भ्रमरीं । येरीं चिखलचि उरे ॥ ५८ ॥ ना तरी निदैवाच्या परिवरीं । लोह्यां ईतलिया आहाति सहस्रवरी । परि तेथ बसोनि उपवास करी । कां दरिद्रें जियें ॥ ५९ ॥ तैसा हृदयामध्यें मी राम । असतां सर्वसुखाचा आराम । कीं भ्रांतासी काम । विषयांवरी ॥ ६० ॥ बहु मृगजळ देखोनि डोळां । थुंकिजे अमृताचा गिळितां गळाळा । तोडिला परिस बांधिला गळां । शुक्तिकालाभें ॥ ६१ ॥ तैसी अहंममतेचिये लेवडसवडी । मातें न पवतीचि बापुडीं । म्हणोनि जन्ममरणाचिये दुथडी । डहुळितें ठेलीं ॥ ६२ ॥ एऱ्हवीं मी तरी कैसा । मुखाप्रति भानु कां जैसा । कहीं नसे न दिसे ऐसा । वाणीचा नोहें ॥ ६३ ॥

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाऽहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥

माझेया विस्तारलेपणाचेनि नांवें । हें जगचि नोहे आघवें । जैसें दूध मुरालें स्वभावें । तरि तेंचि दहीं ॥ ६४ ॥ कां बीजचि जाहलें तरु । अथवा भांगारचि अळंकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हें जग ॥ ६५ ॥ हें अव्यक्तपणें थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिजलें । तैसें अमूर्तमूर्ति मियां विस्तारलें । त्रैलोक्य जाणे ॥ ६६ ॥ महदादि देहांतें । इयें अशेषेंही[22] भूतें । पैं माझ्याठायीं[23] बिंबितें । जैसे जळीं फेण ॥ ६७ ॥ परि तया फेनाआंत पाहातां । जेवीं जळ न दिसे पंडुसुता । ना तरी स्वप्नींची अनेकता । चेइलेया[24] नोहिजे ॥ ६८ ॥ तैसीं भूतें इयें माझ्याठायीं । बिंबती तयांमाजि मी नाहीं । इया उपपत्ती[25] तुज पाहीं । सांगीतलिया मागां[26] ॥ ६९ ॥ म्हणऊनि बोलिलिया[27] बोलाचा अतिसो । न किजे यालागीं हें असो । परि मज आंत पैसो[29] । दिठी[30] तुझी ॥ ७० ॥

न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

आमुच्या प्रकृतीपैलीकडील भावो । जरी कल्पनेवीण लागसी पाहों । तरि मजमाजि

१ सोडून. २ रक्त. ३ बेडकांना. ४ मकरंद. ५ घरीं. ६ मोहोरा स्वर्ण इत्यादि पुरलेल्या. ७ विश्रांतीचें स्थान. ८ इच्छा. ९ घोट. १० शिंपी मिळवण्यासाठीं. ११ लगबगीनें. १२ दोन्ही तीरीं. १३ घुसळत. १४ न्यूनतेचा. १५ म्हणजे. १६ थिजलें. १७ सुवर्ण. १८ अस्पष्टपणानें. १९ पातळ झालें. २० अमूर्तमूर्ति=निर्गुण असून साकार झालेला जो मी त्यानें. २१ महत्तत्त्वापासून देहापर्यंत. २२ सगळीं. २३ प्रतिबिंब पावलेलीं. २४ जागे झाल्यावर. २५ उपपादन. २६ मागल्या अध्यायांत. २७ बोललेल्या. २८ पाल्हाळ. २९ राहो, प्रवेशो. ३० दृष्टि. ३१ स्वरूप, सत्ता.

भूतें हेंही [1]वायां । जें मी सर्व म्हणऊनी ॥ ७१ ॥ येऱ्हवीं संकल्पाचिये सांजवेळे । [2]नावेक तिमिरेजती बुद्धीचे डोळे । म्हणोनि अखंडितचि परि [3]झांवळे । [4]भूतभिन्न ऐसें देखे ॥ ७२ ॥ तेचि संकल्पाची [5]सांज जें लोपे । तें अखंडितचि आहे स्वरूपें । जैसें शंका [6]जातखेंवो लोपे । सापपण माळेचें ॥ ७३ ॥ येऱ्हवीं तरी भूमी आंतूनि स्वयंभ । काय [7]घडेया गाडगेयांचे निघती कोंभ । परि ते [8]कुलालमतीचे गर्भ । उमटले कीं ॥ ७४ ॥ ना तरि सागरींच्या पाणीं । काय तरंगाचिया आहाती खाणी । ते [9]अवांतर करणी । वारयाची नव्हे ॥ ७५ ॥ पाहें पां कापसाच्या पोटीं । काय कापडाची होती पेटी । तो [10]वेढीतयांचिया दिठी । कापड जाहला ॥ ७६ ॥ जरी सोनें लेणें होऊनि घडे । तरि तयाचें सोनेपण न मोडे । येर अलंकार हे [11]वेरचिलीकडे । लेतयाचेनि भावें ॥ ७७ ॥ सांगें [12]पडिसादाचीं प्रत्युत्तरें । कां [13]औरिसा जें [14]आविष्कारे । तें आपलें कीं [15]सोचोकारें । तयेंचि होतें ॥ ७८ ॥ तैसी इये निर्मळ माझ्या स्वरूपीं । जो [16]भूतभावना आरोपी । तयासि तयाच्या संकल्पीं । भूताभास असे ॥ ७९ ॥ तेचि [17]कल्पिती प्रकृती [18]पुरे । तरि भूताभास आधींच [19]सरे । मग स्वरूप उरे एकसरें । [20]निखळ माझें ॥ ८० ॥ हें असो आंगीं भरलिया [21]भोंवंडी । जैशा भोंवत दिसती [22]भरडीदरडी । तैशीं आपलिया कल्पना [23]अखंडीं । गमती भूतें ॥ ८१ ॥ तेचि कल्पना सांडूनि पाहीं । तरि मी भूतीं भूतें माझ्याठायीं । स्वप्नींही परि नाहीं । कल्पावयाजोगें ॥ ८२ ॥ आतां मीच येक भूतांतें [24]धर्ता । अथवा भूतांमाजि मी [25]असता । या [26]संकल्पसन्निपाता । आंतुलिया बोलिया ॥ ८३ ॥ म्हणोनि परियेसीं गा प्रियोत्तमा । यापरि मी विश्वेंसीं विश्वात्मा । जो इया लटकिया भूतग्रामा । [27]भाव्य सदां ॥ ८४ ॥ [28]रश्मीचेनि आधारें जैसें । नव्हतेंचि मृगजळ आभासे । माझ्याठायीं [29]भूतजात तैसें । आणि मातेंही [30]भावी ॥ ८५ ॥ मी येपरीचा [31]भूतभावनु । परि सर्व भूतांसि [32]अभिन्नु । जैसी प्रभा आणि भानु । एकचि तें ॥ ८६ ॥ हा आमुचा ऐश्वर्ययोग । तुवां देखिला कीं चांग । आतां सांगें कांहीं एथ [33]लाग । भूतभेदाचा असे ॥ ८७ ॥ यालागीं मजपासूनि भूतें । आनें नव्हती हें [34]निरुतें । आणि भूतांवेगळिया मातें । [35]कांहींच न मनी हो ॥ ८८ ॥

---

१ मिथ्या. २ कांहीं वेळ. ३ भ्रमांत पडे. ४ भूतांहून भिन्न. ५ आवरण. ६ जातांक्षणीं. ७ हांडीं, मडकीं. ८ कुंभाराच्या बुद्धीचे. ९ वेगळी. १० वापरणाराच्या मतीनें. ११ वरवर. १२ प्रतिध्वनीचीं. १३ आरशांत. १४ प्रगट करी. १५ खरेपणानें. १६ भूताची कल्पना. १७ कल्पना करणारी. १८ नाश. १९ नाहींसा होतो. २० शुद्ध, निवळ. २१ भोंवळ, घेरी. २२ भोंवतालचें गिरिकंदर. २३ अशीं. २४ धारण करणारा. २५ असणारा. २६ संकल्पाच्या सन्निपातें वायूच्या लहरींतील. २७ भावना करण्याजोगा. २८ किरणांच्या. २९ प्राणिमात्र. ३० कल्पी. ३१ व्यापक विष्णु. ३२ एकरूप. ३३ संबंध. ३४ खरें. ३५ कधींही मानीत नाहीं.

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥**

पैं गगन जेवढें जैसें । पवनहि गगनीं तेवढाचि असे । सहजें हालविलिया वेगळा दिसे । एऱ्हवीं गगन तेंचि तो ॥ ८९ ॥ तैसें भूतजात माझ्याठायीं । कल्पिजे तरी आभासे कांहीं । निर्विकल्पीं तरी नाहीं । तेथ मीचि मी आघवें ॥ ९० ॥ म्हणऊनि नाहीं आणि असे । हें कल्पनेचेनि सौरसें । जे कल्पनालोपें भ्रंशे । आणि कल्पनेसवें होय ॥ ९१ ॥ तेंचि कल्पितें मुदल जाये । तैं असे नाहीं हें कें आहे । म्हणउनि पुढती तूं पाहें । हा ऐश्वर्ययोग ॥ ९२ ॥ ऐसि या प्रतीति बोधसागरीं । तूं आपणयातें कल्लोळ एक करीं । मग जंव पाहासी चराचरीं । तंव तूंचि आहासि ॥ ९३ ॥ या जाणणेयाच्या चेवो । तुज आला ना म्हणती देवो । तरी आतां द्वैत स्वप्न वावो । जालें कीं ना ॥ ९४ ॥ तरी पुढती जरी विपायें । बुद्धीसि कल्पनेची झोंप ये । तरि अभेदबोध जाये । जैं स्वप्नीं पडिजे ॥ ९५ ॥ म्हणोनि ये निद्रेची वाट मोडे । निखिळ उद्बोधाचेंचि आपणपें घडे । ऐसें वर्म जें आहे फुडें । तें दावों आतां ॥ ९६ ॥ तरी धनुर्धरा धैर्या । निकें अवधान देईं या धनंजया । पैं सर्व भूतांतें माया । करी हरी गा ॥ ९७ ॥

**सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥**

जिये नांव गा प्रकृती । जे द्विविध सांगितली तुजप्रती । एकी अष्टधा भेदव्यक्ती । दुजी जीवरूपा ॥ ९८ ॥ हा प्रकृतीविखो आघवा । तुवां मागां परिसिलासे पांडवा । म्हणोनि असो कांइ सांगावा । पुढतपुढती ॥ ९९ ॥ तरी ये माझिये प्रकृती । महाकल्पाच्या अंतीं । सर्व भूतें अव्यक्तीं । ऐक्यासि येती ॥ १०० ॥ ग्रीष्माच्या अतिरसीं । सबीजें तृणें जैसीं । मागुतीं भूमीसीं । सुलीनें होतीं ॥ १ ॥ कां वार्षियें डंबें फिटे । जेव्हां शारदीयेचा अनुघडु फुटे । तेव्हां घनजात आटे । गगनींचें गगनीं ॥ २ ॥ नातरी आकाशाचे खोंपे । वायु निवांतचि लोपे । कां तरंगाकार हारपे । जळीं जेवीं ॥ ३ ॥ अथवा जागिनलिये वेळे । स्वप्न मनींचें मनीं मावळे । तैसें प्राकृत प्रकृती मिळे । कल्प-

१ वायु. २ प्राणिमात्र. ३ न कल्पितां. ४ संबंधानें. ५ कल्पिणारें. ६ कोठें. ७ अनुभवानें. ८ आपल्याला. ९ तरंग. १० जागृति. ११ अर्थे. १२ कदाचित्. १३ जागेपणाचें. १४ वर्म. १५ हे धैर्यवंता. १६ उत्पन्न करितें. १७ हरण करतें. १८ दोनप्रकारची. १९ आठ प्रकारच्या रूपानें. २० मायेचा विषय. २१ कशाला. २२ वारंवार. २३ महाप्रळयाच्या शेवटीं. २४ अस्पष्ट जी प्रकृति तींत. २५ उष्णकाळीं. २६ बीजासहित. २७ गुप्त होतात. २८ वर्षाकाळींचें. २९ अवडंबर. ३० शरदृतूचा. ३१ गुप्तपण प्रकटे. ३२ पोटांत. ३३ जागृतींत. ३४ प्रकृतीपासून झालेले.

क्षयीं ॥ ५ ॥ मग कल्पादीं पुढती । मींचि सृजीं ऐसी वदंती । तरी इयेविषयीं निरुती । उपपत्ती आइक ॥ ६ ॥

**प्रकृतिं स्वामधिष्ठाय विसृजामि पुनः पुनः ।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

तरी हेचि प्रकृती किरीटी । मी स्वकीया सहजें अधिष्ठीं । तेथ तंतूसमवायपटीं । जेविं विणावणी दिसे ॥ ६ ॥ मग तिये विणावणीचेनि आधारें । लाहाना चौकडिया पटत्व भरे । तैसी पंचात्मकें आकारें । प्रकृतीचि होय ॥ ७ ॥ जैसें विरजणियाचेनि संगें । दूधचि आटेजों लागे । तैसी प्रकृती आंगा रिगे । सृष्टीपणाचिया ॥ ८ ॥ बीज जळाची जवळीक लाहे । आणि तेंचि शाखोपशाखीं होये । तैसें मज करणें आहे । भूतांचें हें ॥ ९ ॥ अगा नगर हें रायें केलें । या म्हणणया साचपण कीर आलें । परि निरुतें पाहातां काय सिणले । रायाचे हात ॥ ११० ॥ आणि मी प्रकृती अधिष्ठीं तें कैसें । जैसा स्वप्नीं जो असे । मग तोचि प्रवेशे । जागृतावस्थे ॥ ११ ॥ तरि स्वप्नौनि जागृती येतां । काय पाय दुखती पंडुसुता । कीं स्वप्नामाजि असतां । प्रवास होय ॥ १२ ॥ या आघवियाचा अभिप्रावो कायी । जे हें भूतसृष्टीचें कांहीं । मज एकही करणें नाहीं । ऐसाचि अर्थ ॥ १३ ॥ जैसी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारे आपुलालिया काजा । तैसा प्रकृती संग माझा । येर करणें तें इयेचें ॥ १४ ॥ पाहें पां पूर्णचंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटी । तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे ॥ १५ ॥ जड परि जवळिका । लोह चळे तरि चळो कां । तरि कवण शीण भ्रामका । सन्निधानाचा ॥ १६ ॥ किंबहुना यापरी । मी निजप्रकृती अंगिकारीं । आणि भूतसृष्टी एकसरी । प्रसवोंचि लागे ॥ १७ ॥ जो हा भूतग्राम आघवा । असे प्रकृतीअधीन पांडवा । जैसी बीजाचिया वेलपालवा । समर्थ भूमी ॥ १८ ॥ ना तरी बाळादिकां वयसा । गोसावी देहसंग जैसा । अथवा घनावळी आकाशा । वर्षिये जेवीं ॥ १९ ॥ कां स्वप्नासि कारण निद्रा । तैसी प्रकृती हे नरेंद्रा । या अशेषाहि भूतसमुद्रा । गोसांविणी गा ॥ १२० ॥ स्थावरा आणि जंगमा । स्थूळा अथवा सूक्ष्मा । हे असो भूतग्रामा । प्रकृतीचि मूळ ॥ २१ ॥ म्हणोनि भूतें हन सृजावीं ।

---

१ बोलवा. २ खरी. ३ उपपादन, युक्ति. ४ आश्रय करतों. ५ तंतूंचा समुदाय-संबंध. ६ विण कर. ७ पंचमहाभूतात्मक. ८ विरजू लागतें. ९ ते पाणीच बीजसान्निध्यानें शाखांत जातें. १० खरें. ११ स्वप्नांतून. १२ सगळ्याचा. १३ कारण. १४ आश्रय दिलेली. १५ श्रम. १६ लोखंड. १७ लोहचुंबकाला. १८ जवळ रहण्याचा. १९ एकदम. २० प्राणिसमुदाय. २१ वेली पल्लवाला. २२ वयास. २३ आत्म्यास. २४ आकाशांत मेघ उत्पन्न होण्यास वर्षाकाळ कारण. २५ आई. २६ उत्पन्न करावीं.

कां सृजिलीं प्रतिपाळावीं । ईयें करणीं न येती आघवीं । आमुचिया आंगा ॥ २२ ॥ जळीं चंद्रकेचिया पसरती वेली । ते वाढी चंद्रें नाहीं केली । तेविं माते पावोनि ठेली । दुरी कर्में ॥ २३ ॥

**न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥**

आणि सुटलिया सिंधुजळाचा लोट । न शके धरूं सैंधवाचा थाट । तेविं सकळ कर्मा मीच शेवट । तीं काय बांधती मातें ॥ २४ ॥ धूम्ररजांची पिंजरी । वाजतिया वायूतें जरी होकारी । कां सूर्यबिंबामाझारीं । आंधारें शिरे ॥ २५ ॥ हें असो पर्वताचिये हृदयींचें । जेविं पर्जन्यधारास्तव न खोंचे । तेविं कर्मजात प्रकृतीचें । न लगे मज ॥ २६ ॥ येऱ्हवीं इये प्रकृतीविकारीं । एक मीचि असें अवधारीं । परि उदासीनाचिया परी । करीं ना करवीं ॥ २७ ॥ जैसा दीप ठेविला पैं घरीं । कवणातें नियमी ना निवारी । आणि कवण कवणिये व्यापारीं । राहाटे तेंहि नेणे ॥ २८ ॥ तो जैसा कां साक्षिभूतु । गृहींच्या व्यापारप्रवृत्तिहेतु । तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असें ॥ २९ ॥ हा एकचि अभिप्रावो पुढतपुढती । काय सांगों बहुतां उपपत्ती । येथ एकेहेळा सुभद्रापती । येतुलें जाण पां ॥ २३० ॥

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥**

जे लोकचेष्टा समस्ता । जैसा निमित्तमात्र कां सविता । तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता । हेतु मी जाणें ॥ ३१ ॥ कां जे मियां अधिष्ठिलिया प्रकृती । होती चराचराचिया संभूती । म्हणोनि मी हेतु हे उपपत्ती । घडे येथा ॥ ३२ ॥ आतां येणें उजियेडें निरुतें । न्याहाळीं पां ऐश्वर्ययोगातें । जे माझ्याठायीं भूतें । परी भूतीं मीं नसें ॥ ३३ ॥ अथवा भूतें माझ्याठायीं । आणि भूतांमाजि मी नाहीं । या खुणा तूं कहीं । चुकों नको ॥ ३४ ॥ हें सर्वस्व आमुचें गूढ । परि दाविलें तुज उघड । आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ॥ ३५ ॥ हा वर्म जंव नये हाता । तंव माझें साचोकारपण पार्था । न संपडे गा सर्वथा । जेविं तुषीं कण ॥ ३६ ॥ येऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें । आवडे कीर कळलें ऐसें । परि

१ ह्या कृति. २ उत्पत्ति. ३ मिठाचा. ४ धुराच्या कणांचा पिंजरा. ५ धांववील, खोळंबवील ६ न वेधे. ७ घरांत. ८ व्यवहार करतो. ९ द्रष्टा. १० गृहकृत्यांची प्रवृत्ति होण्यास कारण. ११ उदासीन. १२ पुनः पुनः. १३ एकवेळ. १४ लोकांच्या व्यापारास. १५ सूर्य. १६ जगाच्या उत्पत्तीविषयीं. १७ आश्रय केला. १८ उत्पत्ति. १९ युक्ति. २० जगाला. २१ ज्ञानानें. २२ खरें. २३ इंद्रियांचें दार लावून. २४ मर्म. २५ खरेपण. २६ कोंड्यांत. २७ विस्तारें, मार्गें. २८ वाटे.

मृगजळाचेनि वोलांशें । काय भूमी तिमे[२] ॥ ३७ ॥ जें जाळ जळीं पांगिलें । तेथ चंद्रबिंब दिसे आतुडलें । परि थडिये काढूनि झाडिलें । तेव्हां बिंब कें सांगें ॥ ३८ ॥ तैसे बोलवरी वाचाबळें । वायांचि झकविजती प्रतीतीचे डोळे । मग साचोकारें बांधा-वेळे । आथि ना होइजे ॥ ३९ ॥

**अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

किंबहुना भेवा बिहाया । आणि साचें चाड आथि जरीं भियां । तरि तूं गा उपपत्तीं इया । जतन कीजे ॥ १४० ॥ येऱ्हवीं दिठी वेधली कावळें । तैं चांदिणियातें ह्मणे पिवळें । तेवि माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखती दोष ॥ ४१ ॥ ना तरी ज्वरें विटाळलें मुख । तें दुधातें ह्मणे कडूविख । तेवि अमानुषा मानुष । मानिती मातें ॥ ४२ ॥ ह्मणऊनि पुढत-पुढती धनंजया । झणें विसंबसी या अभिप्राया । जे थिर्या स्थूळदृष्टी वायां । जाइजेल गा ॥ ४३ ॥ यें स्थूळदृष्टी देखती मातें । तेंचि ( न देखणें ) जाण निरुतें । जैसें स्वप्नींचेनि अमृतें । अमर नोहिजे ॥ ४४ ॥ एऱ्हवीं स्थूळदृष्टी मूढ । मातें जाणती कीर दृढ । परि तें जाणणेंचि जाणणेया आड । रिगोनि ठाके ॥ ४५ ॥ जैसा नक्षत्रांचिया आभासा । साठीं घात केला तया हंसा । माजि रत्नबुद्धीचिया आशा । रिगोनियां ॥ ४६ ॥ सांगें गंगा या बुद्धी मृगजळ । टाकोनि आलियाचें कवण फळ । काय सुरतरु ह्मणोनि बाबुळ । सेविली कीरी ॥ ४७ ॥ हा निळेयाचाचि दुसरा । या बुद्धी हात घातला विखारा । कां रत्नें ह्मणोनि गारा । वेंची जेवि ॥ ४८ ॥ अथवा निधान हें प्रगटलें । ह्मणोनि खैदिरांगार खोळे भरिले । कां सांउली नेणतां घातलें । कुहा सिंहें ॥ ४९ ॥ तेवि मी ह्मणोनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची । तिहीं चंद्रासाठीं जेवि जळींची । प्रभा धरिली ॥ १५० ॥ तैसा कृतनिश्चय वायां गेला । जैसा कोण्ही एक कांजी प्याला । मग परिणाम पांहों लागला । अमृताचा ॥ ५१ ॥ तैसें स्थूळाकारीं नाशिवंतें । भरंवसा बांधोनि चित्तें । पाहती मज अविनाशातें । तरी कैंचा दिसे ॥ ५२ ॥ अगा काइ पश्चिमसमुद्राचिया तटा । निगिजेत आहे पूर्वीलियां वाटा । कां कोंडा कांडितां सुभटा । कण जोडे ॥ ५३ ॥

---

१ ओल्यानें. २ भिजे. ३ जाळें. ४ पसरलें. ५ सांपडलें. ६ तीरावर. ७ कोठें. ८ शब्दांनीं. ९ फसविले जाती. १० खरें. ११ आहे व होत नाहीं. १२ संसारास भिण्याला. १३ इच्छा. १४ ह्या युक्ति. १५ कावीळ रोगानें. १६ कडवट झाले. १७ मनुष्य नसून. १८ या स्थूल दृष्टीनें ( कृष्ण मनुष्य आहे असें मानून ) फुकट जाशील. १९ ( अज्ञान ). २० प्रतिबिंब. २१ झाला. २२ हत्तीनें. २३ नीळ मण्यांचा दुसरा हार. २४ सर्पाला. २५ ठेवा. २६ खैराचे निखारे. २७ पदरांत. २८ प्रतिबिंब. २९ आडामध्यें. ३० पेज. ३१ पूर्वदिशेच्या मार्गानें. ३२ धान्य.

तैसें विकारलें हें स्थूळ । जाणितलेया मी जाणवतसें केवळ । काइ फेण पीतां जळ । सेविलें होय ॥ ५४ ॥ ह्मणोनि मोहिलेनि मनोधर्में । हेंचि मी मानूनि संभ्रमें । मग येथिचीं जियें[3] जन्मकर्में । तियें मजचि ह्मणती ॥ ५५ ॥ येतुलेनि अनामा नाम । मज अक्रियासि कर्म । विदेहासि देहधर्म । आरोपिती ॥ ५६ ॥ मज आकारशून्या आकार । निरुपाधिका उपचार । मज विधिवर्जितां व्यवहार । आचारादिक ॥ ५७ ॥ मज वर्णहीना वर्ण । गुणातीतासि गुण । मज अचरणा चरण । अपाणिया पाणी ॥ ५८ ॥ मज अमेया मान । सर्वगतासी स्थान । जैसें सेजेमाजी वन । निदेलों देखे ॥ ५९ ॥ तैसें अश्रवणा श्रोत्र । मज अचक्षूसी नेत्र । अगोत्रा गोत्र । अरूपा रूप ॥ १६० ॥ मज अव्यक्तासि व्यक्ती । अनार्तासि आर्ती । स्वयंतृप्ता तृप्ती । भाविती गा ॥ ६१ ॥ मज अनावरणा प्रावरण । भूषणातीतासि भूषण । मज सकळकारणा कारण । देखती ते ॥ ६२ ॥ मज सहजातें करिती । स्वयंभातें प्रतिष्ठिती । निरंतरातें आव्हानिती । विसर्जिती गा ॥ ६३ ॥ मी सर्वदा स्वतःसिद्ध । तो कीं बाळ तरुण वृद्ध । मज एकरूपा संबंध । जाणती ऐसे ॥ ६४ ॥ मज अद्वैतासि दुजें । मज अकर्तयासि काजें । मी अभोक्ता कीं भुंजे । ऐसें ह्मणती ॥ ६५ ॥ मज अकुळाचें कुळ वानिती । मज नित्याचे निधनें शिणती । मज सर्वांतरातें कल्पिती । अरि मित्र गा ॥ ६६ ॥ मी स्वानंदाभिराम । तया मज अनेकसुखाचा काम । आघवाचि मी असें सम । कीं ह्मणती एकदेशी ॥ ६७ ॥ मी आत्मा एक चराचरीं । ह्मणती एकाचा कैपक्ष करीं । आणि कोपोनि एकातें मारीं । हेंचि रूढविती ॥ ६८ ॥ किंबहुना ऐसे समस्त । जे हे मानुषधर्म प्राकृत । तयाचि नांव मी ऐसें विपरीत । ज्ञान तयांचें ॥ ६९ ॥ जंव आकार एक पुढां देखती । तंव हा देव येणें भावें भजती । मग तोचि विघडलिया टाकिती । नाहीं ह्मणोनि ॥ १७० ॥ मातें येणें येणें प्रकारें । जाणती मनुष्य ऐसोनि आकारें । ह्मणऊनि ज्ञानचि तें आंधारें । ज्ञानासि करी ॥ ७१ ॥

मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।
राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥

यालागीं जन्मले ते मोघ । जैसें वोळियेवीण मेघ । कां मृगजळाचे तरंग । दुरूनीचि

---

१ विस्तारलें. २ भ्रांतीनें. ३ जितकीं. ४ नामरूपशून्याला. ५ उत्पन्न होणें, वाढणें, लयपावणें इत्यादि. ६ कर्तव्याकर्तव्यरहिताला. ७ जातिरहितास. ८ गुणरहिताला. ९. हस्तरहिताला. १० हात. ११ परिमाणातीताला. १२ निजलेला. १३ कान नसतां. १४ दुःखमुक्तास. १५ आच्छादन, पांघरूण. १६ स्वतःसिद्धाला. १७ आवाहन करतात. १८ विसर्जन करतात, पोंचवितात. १९ भोगी. २० मरणानें. २१ शत्रुमित्र. २२ निजानंदांत निमग्न. २३ पाठराखणा, कैवारी. २४ प्रसिद्धीस आणिती. २५ मनुष्याचे धर्म. २६ काळोख, अज्ञान. २७ सारांश. २८ व्यर्थ. २९ पर्जन्यकाळ टाकून.

पाहावें ॥ ७२ ॥ अथवा कोल्हेरीचे[1] असिवार[2] । ना तरी भोजवरीचे[3] अळंकार । कीं गंधर्वनगरीचे आवार[4] । आभासती कां ॥ ७३ ॥ सांबरी[5] वाढिन्नल्या सरळा । वरी फळ नाहीं आंत पोकळा । कां स्तन जाले गळां । शेळिये जैसे ॥ ७४ ॥ तैसें मूर्खाचें तया झियालें[6] । आणि धिग कर्म तयांचें निफजलें । जैसें सांवरी फळ आलें । [7]घेपे ना दीपे ॥ ७५ ॥ मग जें कांहीं तें पढिन्नले । तें मर्कटें नारेळ तोडिलें । कां आंधळयाहातीं पडिलें । मोतीं जैसें ॥ ७६ ॥ किंबहुना तयाचीं शास्त्रें । जैसीं कुमारीहातीं दीधलीं शस्त्रें । कां अशौच्या[8] मंत्रें । बीजें कथिलीं ॥ ७७ ॥ तैसें ज्ञानजात तयां । आणि जें कांहीं आचरलें गा धनंजया । तें आघवेंचि गेलें वायां । जे चित्तहीन[9] ॥ ७८ ॥ पैं तमोगुणाची राक्षसी । जे सुबुद्धीतें ग्रासी[10] । विवेकाचा ठावचि पुसी । निशाचरी[11] जे ॥ ७९ ॥ तिये प्रकृती वेरपडे[12] जाले । म्हणऊनि चिंतेचेनि कपाटें[13] गेले । वरि तामसीयेचि पडिले । मुखामाजी ॥ १८० ॥ जेथ आशेचिये लाळे । आंत हिंसा जीभ लोळे । तेवींचि असंतोषाचे पोंकळे[14] । अखंड चघळी ॥ ८१ ॥ जे अनर्थाचे कानवेरी[15] । ओठाकुवें[16] चाटीत निघे बाहेरी । जे प्रमादपर्वतींची[17] दरी । सदाचि मातली[18] ॥ ८२ ॥ जेथ द्वेषाचिया दाढा । खसखसां ज्ञानाचा करिती रगडा । [19]जे त्वगस्थि[20] गवसणी मूढां । स्थूळबुद्धी[21] ॥ ८३ ॥ ऐसे आसुरिये[22] प्रकृतीचे तोंडीं । जे जाले गा भूतोंडीं[23] । ते बुडोनि गेले कुंडीं । व्यामोहाच्या[24] ॥ ८४ ॥ एवं तमाचिये पडिले गर्तें[25] । न पविजतीचि विचाराचेनि हातें । हें असो[26] ते गेले जेथें । ते शुद्धीचि नाहीं ॥ ८५ ॥ म्हणोनि असोतु इयें वांयाणी[27] । कायसी मूर्खाचीं बोलणीं[28] । वायां वाढवितां वाणी । खेपेल हन ॥ ८६ ॥ ऐसें बोलिलें देवें । तेथ जी जी म्हणितलें पांडवें । आइकें जेथ वाचा विसंवे[29] । ते साधुकथा ॥ ८७ ॥

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥

तरी जयाचें [30]चोखटें मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी[31] । जया निजेल्यातें उपासी[32] । वैराग्य गा ॥ ८८ ॥ जयाचिया आस्थेचिया सद्भावा । आंत धर्म करी राणिवा[33] । जयाचें मन ओलावा । विवेकासी ॥ ८९ ॥ जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता

---

१ मातीच्या चित्रांचे. २ स्वार. ३ कपटविद्येचे. ४ गांवकुसूं. ५ शेर. ६ वांचणें. ७ घेणें व देणें कांहीं नाहीं. ८ अशुद्ध, अशुचिर्भूतास. ९ चित्त स्वाधीन नसणारे. १० गिळी, नाशकरी. ११ जखीण. १२ ग्रस्त. १३ विक्षिप्त, चिंताद्वारें. १४ मांसगोळे. १५ कानापर्यंत. १६ ओंठप्रांत. १७ प्रमाद (भूल) रूप पर्वताची गुहा. १८ माजली. १९ कारण. २० चर्म व हाडें. २१ वरवर पहाणारे. २२ राक्षसी. २३ भूतबळी. २४ भ्रांतीच्या. २५ खळग्यांत. २६ ही निष्फळ कथा राहूं दे. २७ व्यर्थ. २८ वर्णन. २९ विश्रांति पावे. ३० निर्मळ. ३१ मरेपर्यंत एकाच ठिकाणीं राहण्याचा निश्चय केलेला. ३२ सेवा करी. ३३ राज्य.

जेऊनि घाले। जे शांतीसि झाले। पैलव नवे ॥ १९० ॥ जे परिणाम। निघाले कोंभ। जे धैर्यमंडपाचे स्तंभ। जे आनंदसमुद्रीं कुंभ। बुडकुळोनि भरिले ॥ ९१ ॥ जयां भक्तीची येतुली प्रौढी। जे कैवल्यातें परतें सर म्हणती। जयांचिये लीळेम। जि नीती। र्जियाली दिसे ॥ ९२ ॥ जे आघवांचि करणीं। लेइले शांतीची लेणीं। जयांचें चित्त गंवसणी। व्यापका मज ॥ ९३ ॥ ऐसे जे महानुभाव। दैविये प्रकृतीचें दैव। जे जाणोनियां सर्व। स्वरूप माझें ॥ ९४ ॥ मग वाढतेनि प्रेमें। मातें भजती जे महात्मे। परि दुजेपणें मनोधर्में। शिवतलें नाहीं ॥ ९५ ॥ ऐसे मीच होऊनि पांडवा। करिती माझी सेवा। परि नवलाव तो सांगावा। असे आइक ॥ ९६ ॥

सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।
नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥

तरी कीर्तनाचेनि नटनावें। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे। जे नामचि नाहीं पापाचें। ऐसें केलें ॥ ९७ ॥ यमदमा अवकळा आणिली। तीर्थें ठायावरूनि उठविलीं। यमलोकींची खुंटिली। राहाटी आघवी ॥ ९८ ॥ यम म्हणे काय यमावें। दम म्हणे कवणातें दमावें। तीर्थें म्हणती काय खावें। दोष औषधासि नाहीं ॥ ९९ ॥ ऐसें माझेनि नामघोषें। नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें। अवघें जगचि महासुखें। दुमदुमित भरलें ॥ २०० ॥ ते पाहांटेवीण पाहावित। अमृतेंवीण जीववित। योगेंवीण दाविते। कैवल्य डोळां ॥ १ ॥ परि राया रंका पाड धरूं। नेणती सानेयां थोरां कडसणी करूं। एकसरें आनंदाचें आवारु। होत जगा ॥ २ ॥ कहीं एकाधेनि वैकुंठा जावें। तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें। ऐसें नामघोषगौरवें। धवळलें विश्व ॥ ३ ॥ तेजें सूर्य तैसे सोज्वळ। परि तो ही अस्तवे हें किडाळ। चंद्र संपूर्ण एक्यारे वेळ। हे सदा पुरते ॥ ४ ॥ मेघ उदार परी वोसरे। म्हणऊनि उपमेसि न पुरे। हे निःशंकपणें सपांखरे। पंचानन ॥ ५ ॥ जयांचे वाचेपुढां भोजें। अखंड नाम नाचत असे माझें। जें जन्मसहस्रीं वोळंगिजे। एकवेळ यावया ॥ ६ ॥ तो मी वैकुंठीं नसें। वेळ एक भानुबिंबींही न दिसें। वरी योगियांचींही मानसें। उमरडोनि जाय ॥ ७ ॥ परी तयांपाशीं पांडवा।

१ तृप्त झाले. २ पालवी. ३ बुडवून. ४ शक्ति. ५ मोक्षाला. ६ सजीव. ७ इंद्रियांचेठायीं. ८ खोळ. ९ भाग्यवान्, ज्ञानी. १० भाग्य. ११ ज्यांच्या मनोधर्मानें द्वैताला स्पर्श सुद्धां केला नाहीं. १२ आश्चर्य. १३ सांगावयाचा आहे. १४ कीर्तनानें. १५ व्यापार. १६ नियमानें, निग्रह करावा. १७ उजेडवितो. १८ योग्यता. १९ लहान थोरांस. २० विचार. २१ मंदिर. २२ नामाच्या महात्म्यानें. २३ पापरहित केलें. २४ लखलखीत. २५ हीनपणा. २६ सरतो. २७ सरूप. २८ शिव. २९ आवडीनें. ३० आश्रयिजे. ३१ सूर्यमंडळांत. ३२ उल्लंघोनि.

मी हारपला चिवसावा । जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥ ८ ॥ कैसे माझ्या गुणीं धाले । देशकाळातें विसरले । कीर्तनसुखें सुखावले । आपणपांचि ॥ ९ ॥ कृष्ण विष्णु हरी गोविंद । या नामाचे निखिळ [3]प्रबंध । माजी [4]आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ २१० ॥ हें बहु असो यापरी । कीर्तितें मातें अवधारीं । एक विचरति चराचरीं । पांडुकुमरा ॥ ११ ॥ मग आणिक ते अर्जुना । साविया बहुवा जतना । पंचप्राण मना । पाडाव घेउनी ॥ १२ ॥ बाहेरी यमनियमांची कांटी लाविली । आंत वज्रासनाची [11]पौळी पन्नासिली । वरी प्राणायामाचीं मांडिलीं । वाहातीं यंत्रें ॥ १३ ॥ तेथ [12]उल्हाटशक्तीचेनि उजिवडें । मन पवनाचेनि सुरवाडें । सतरावियेचें पाणियाडें । बळाविलें ॥ १४ ॥ तेव्हां प्रत्याहारें ख्याती केली । विकारांची संपली [16]बोहली । इंद्रियें बांधोनि आणिलीं । हृदयाआंत ॥ १५ ॥ तंव धारणावारू दाटिले । महाभूतांतें एकवटिलें । मग चतुरंग सैन्य निवटिलें । संकल्पाचें ॥ १६ ॥ तयावरी [20]जैतरे जैत । म्हणोनि ध्यानाचे निशाण वाजत । दिसे तन्मयाचें झळकत । एकछत्र ॥ १७ ॥ [22]पाटीं समाधिश्रियेच्या अशेखा । आत्मानुभवराज्यसुखा । पट्टाभिषेक देखा । [23]समरसें जाहाला ॥ १८ ॥ ऐसें हें गहनें । अर्जुना माझें भजन । आतां ऐकें सांगेन । जे करिती एक ॥ १९ ॥ तरी दोन्ही पौलव- वेरी । जैसा एक तंतू [26]अंबरीं । तैसा मीवांचूनि चराचरीं । जाणती ना ॥ २२० ॥ आदि ब्रह्मा करूनी । शेवटीं मशक धरूनी । माजी समस्त हें जाणोनी । स्वरूप माझें ॥ २१ ॥ मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखिलीये वस्तु उजू [28]लुटती । मीचि म्हणोनि ॥ २२ ॥ आपुलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे । एकसरें [29]व्यक्तिमात्राचेनि नांवें । [30]नमूंचि आवडे ॥ २३ ॥ जैसें उंचीहूनि उदक पडिलें । तें तलवटवरी येऊं लागलें । तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वभावचि तयांचा ॥ २४ ॥ कां फळलिया तरूची शाखा । सहजें भूमीसी उतरे देखा । तैसें जीवमात्रा अशेखा । [32]खालावती ते ॥ २५ ॥ अखंड अगर्वता होऊनि असती । तयांची [33]विनय हेचि संपत्ती । जे जयजयमंत्रें अर्पिती । माझ्याठायीं ॥ २६ ॥ नमितां मानापमान गळाले । म्हणोनि अवचितां मीचि जाहाले । ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥ २७ ॥ अर्जुना हे गुरुवी भक्ती । सांगीतली तुजप्रती । आतां ज्ञानयज्ञें यजिती । ते भक्त आइकें ॥ २८ ॥ परि

---

१ शोधून काढावा. २ तृप्त झाले. ३ ग्रंथ, कविता. ४ आत्मानात्मविचार. ५ गुणानुवाद गात. ६ हिंडतात. ७ सर्वथा. ८ वाटाड्या. ९ कुंपण. १० मूळबंधाची. ११ आवार शृंगारिलें. १२ कुंडलिनीच्या. १३ प्रकाशानें. १४ अनुकूलतेनें. १५ बुद्धीचें. १६ तर्लें. १७ इंद्रियांच्या अंतर्मुखतेनें. १८ बोलणें. १९ धारणापरिपक्वदशा हेच घोडे. २० जयरे जय. २१ नगारा, भेरी. २२ अधिकार, गादी. २३ ऐक्यतेनें. २४ कठीण. २५ पदरापर्यंत. २६ वस्त्रांत. २७ मोठें. २८ मानतात. २९ सर्व वस्तूंच्या. ३० नमन करणें. ३१ सर्व प्राणी. ३२ नम्र होती. ३३ नम्रता. ३४ अकस्मात्. ३५ श्रेष्ठ, मोठी.

भजन करिती हातवटी । तूं जाणत आहासि किरीटी । जे मेगां इया गोष्टी । केलिया आह्मीं ॥ २९ ॥ तंव आथि जी अर्जुन ह्मणे । हें देविकियाप्रसादाचें करणें । तरि काय अमृताचें आरोगणें । पुरे ह्मणवेल ॥ २३० ॥ या बोला श्रीअनंतें । लागट देखिलें तयातें । कीं सुखावलेनि चित्तें । डोलत असे ॥ ३१ ॥ ह्मणे भलें केलें पार्था । येऱ्हवीं हा अनवसर सर्वथा । परि बोलवीतसे आस्था । तुझी मातें ॥ ३२ ॥ तंव अर्जुन ह्मणे हे काथी । चकोरेंवीण चांदिणेंचि नाहीं । जगचि निवविजे हा तयाच्या ठायीं । स्वभावो कीं जी ॥ ३३ ॥ येरें चकोरें तिये आपुलिये चाडे । चांचू करिती चंद्राकडे । तेवीं आह्मी विनवितें थोकडें । देवो कृपासिंधु ॥ ३४ ॥ जी मेघ आपुलिये प्रौढी । जगाची आर्ती दवडी । वांचूनि चातकाची ताहान केवढी । तो वर्षाव पाहुनी ॥ ३५ ॥ परि चुळा एकाचिया चाडे । जेवि गंगेतेंचि ठाकणें पडे । तेवीं आर्त बहु कां थोडे । तरि कां सांगावें देवें ॥ ३६ ॥ तेथें देवें ह्मणितलें राहें । जो संतोष आह्मा जाहला आहे । तयावरी स्तुती साहे । ऐसें उरलें नाहीं ॥ ३७ ॥ पैं परिसैतु आहासि निकियापरी । तेंचि वक्तृत्वा वेऱ्हाडी करी । ऐसें पुरस्करोनि श्रीहरी । आदरिलें ॥ ३८ ॥

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते ।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥**

तरि ज्ञानयज्ञ तो एवंरूप । जेथ आदि संकल्प हा यूप । महाभूतें मंडप । भेद तो पशू ॥ ३९ ॥ मग पांचांचे जे विशेष गुण । अथवा इंद्रियें आणि प्राण । हेचि यज्ञोपचारभरण । अज्ञान घृत ॥ २४० ॥ तेथ मनबुद्धीचिया कुंडा । आंत ज्ञानाग्नि धडफुडा । साम्य तेचि सुहाडा । वेदिका जाणें ॥ ४१ ॥ सविवेकमतीपाटव । तेचि मंत्र विद्यागौरव । शांति स्रुक्स्रुव । जीव यज्वा ॥ ४२ ॥ तो प्रतीतीचेनि पात्रें । विवेकमहामंत्रें । ज्ञानाग्निहोत्रें । भेद नाशी ॥ ४३ ॥ तेथ अज्ञान सरोनि जाये । आणि यजिता यजन हें ठाये । आत्मसमरसीं न्हाये । अवभृथीं जेव्हां ॥ ४४ ॥ तेव्हां भूतें विषय करणें । हें वेगळालें कांहीं न ह्मणे । आघवें एकचि ऐसें जाणें । आत्मबुद्धि ॥ ४५ ॥ जैसा चेइला तो

१ पूर्वीं. २ परमेश्वरीकृपेचें. ३ सेवन, प्राशन. ४ लगट करणारा. ५ अप्रसंग. ६ बोलवतो. ७ आनंदित करावें. ८ गरजेसाठीं. ९ चोंच. १० अल्प. ११ थोरपणानें. १२ पीडा. १३ इच्छेनें. १४ गांठणें. १५ दुःखी. १६ ऐकत आहेस. १७ उत्तम श्रवणाने. १८ साहाय्य, मदत. १९ आधीं बोलून. २० याप्रमाणें. २१ यज्ञस्तंभ. २२ जीवेश्वर यांची भिन्नता. २३ यज्ञाचें साहित्य. २४ मन व बुद्धि या दोन कुंडीं. २५ खरा, प्रदीप्त. २६ बळकट. २७ ओटा. २८ विवेकयुक्त बुद्धीची कुशलता. २९ विद्यागौरव स्रुक् व शांति स्रुवा. ३० हवनपात्रें. ३१ यज्ञ करणारा. ३२ अनुभवाच्या. ३३ आत्मानंदरसांत. ३४ यज्ञाच्या शेवटचें स्नान. ३५ शब्द, स्पर्श आदिक. ३६ इंद्रियें. ३७ जागृत झालेला.

अर्जुना । म्हणे स्वामीची हे विचित्र सेना । मीचि जाहलों होतों ना । निद्रावशें ॥ ४६ ॥ आतां सेना ते सेना नव्हे । हें मीच एक आघवें । ऐसें एकत्वें मानवे । विश्व तया ॥ ४७ ॥ मग तो जीव हे भाष सरे । आब्रह्म परमात्मबोधें भरे । ऐसें भजती ज्ञानाध्वरें । एकत्वें येणें ॥ ४८ ॥ अथवा अनादि हें अनेक । जें आनासारिखें एका एक । आणि नामरूपादिक । तेंही विषम ॥ ४९ ॥ म्हणोनि विश्व भिन्न भिन्न । परि न भेदे तयांचें ज्ञान । जैसे अवयव तरी आन आन । परि एकेचि देहींचे ॥ २५० ॥ कां शाखा सानिया थोरा । परि आहाति एकाचि तरुवरा । बहु रश्मि परि दिनकरा । एकाचे जेवि ॥ ५१ ॥ तेवि नानाविधा व्यक्ती । आनानें नामें आनानी वृत्ती । ऐसें जाणती भेदलां भूतीं । अभेदा मातें ॥ ५२ ॥ येणें वेगळालेपणें पांडवा । करिती ज्ञानयज्ञ बरवा । जे न भेदती जाणिवा । जाणते म्हणउनी ॥ ५३ ॥ ना तरी जेधवां जियेठायीं । देखती कां जें जें कांहीं । तें मीवांचूनि नाहीं । ऐसाचि बोध ॥ ५४ ॥ पाहें पां बुडबुडा जेउता जाये । तेउतें जळ तया एक आहे । मग विरे अथवा राहे । तऱ्ही जळाचिमाजी ॥ ५५ ॥ कां पवनें परमाणु उचलले । ते पृथ्वीपणावेगळे नाहीं मेले । आणि माघौते जरी पडले । तरी पृथ्वीचि वरुते ॥ ५६ ॥ तैसें भलतेथ भलतेणें भावें । भलतेंही हो अथवा नोहावें । परि तें मी ऐसें आघवें । होऊनि ठेलें ॥ ५७ ॥ अगा हे जेव्हडी माझी व्याप्ती । तेव्हडीचि तयांची प्रतीती । तैसे बहुधाकारीं वर्तती । मीचि होउनी ॥ ५८ ॥ हें भानुबिंब आवडे तया । संमुख जैसें धनंजया । तैसे ते विश्वा इया । समोर सदां ॥ ५९ ॥ अगा तयांचिया ज्ञाना । पाठी पोट नाहीं अर्जुना । वायु जैसा गगना । सर्वांगीं असे ॥ २६० ॥ तैसा मी जेतुला आघवा । तेंचि तुके तयांचिया सद्भावा । तरी न करितां पांडवा । भजन जाहलें ॥ ६१ ॥ येऱ्हवीं तरी सकळ मीचि आहें । तरि कवणी कें[24] उपासिला नोहें । एथ एकें जाणणेवीण[25] ठाये । अप्राप्तीसि ॥ ६२ ॥ परि तें असो येणें[26] उचितें । ज्ञानयज्ञें याजितसांते[27] । उपासिती मातें । ते सांगीतलें ॥ ६३ ॥ अखंड सकळ हें सकळां मुखीं । सहज अर्पत असे मज एकीं । कीं नेणणें यासाठीं मूर्खीं । न पविजेचि मातें ॥ ६४ ॥

---

१ जग. २ बोलणें. ३ नाहींसी होते. ४ ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत. ५ ज्ञानयज्ञानें. ६ एकाला एक निराळें. ७ लहान. ८ किरण. ९ अनेक. १० भिन्न भूतांमध्यें. ११ ज्ञानाला. १२ जिकडे. १३ वाऱ्यानें. १४ बारीक कण. १५ कोठें गेले तरी पृथ्वीपण गेलें नाहीं. १६ पुनः. १७ पाहिजे तेथें पाहिजे त्या भावनेनें. १८ न व्हावें. १९ अनुभव. २० पाहिजे त्यास. २१ समोर. २२ जेवढा संपूर्ण. २३ तोल, प्रमाण. २४ कोठें. २५ पूर्णज्ञानाविणें. २६ या योग्य प्रकारें. २७ यजन करीत असतां.

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाऽहमहमौषधम् ।**
**मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥**

तोचि [१]जाणिवेचा जरी उदय होये । तरी मुदल वेद मीचि आहें । आणि तो [२]विधानातें जया विये । तो [३]क्रतुही मीचि ॥ ६५ ॥ मग तया कर्मापासूनि बरवा । जो सांगोपांग आघवा । यज्ञ प्रगटे पांडवा । तोही मी गा ॥ ६६ ॥ [४]स्वाहा मी [५]स्वधा । [६]सोमादि औषधी [७]विविधा । [८]आज्य मी समिधा । मंत्र मी हवि ॥ ६७ ॥ [९]होता मी हवन कीजे । तेथ अग्नी तो स्वरूप माझें । आणि [१०]हुतं वस्तु जें जें । तेंही मीचि ॥ ६८ ॥

**पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च ॥ १७ ॥**

पैं जयाचेनि अंगसंगें । इये प्रकृतीस्तव अष्टांगें । जन्म पाविजत असे जगें । तो पिता मी गा ॥ ६९ ॥ अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । तेवि मी चराचरीं । माता ही होय ॥ २७० ॥ आणि जाहालें जग जेथ राहे । जेणें जीवित वाढत आहे । तें मीवांचूनि नोहे । [११]आन निरुतें ॥ ७१ ॥ इयें प्रकृतिपुरुषें दोन्हीं । उपजलीं जयाचिया [१२]अमनमनीं । तो पितामह त्रिभुवनीं । विश्वाचा मी ॥ ७२ ॥ आणि आघवेया जाणणेयाचिया वाटा । जया गांवा येती गा सुभटा । [१३]वेदांचिया [१४]चोहटां । [१५]वेद्य जें म्हणिजे ॥ ७३ ॥ जेथ नानामतां [१६]बुझावणी आली । एकमेका शास्त्रांची [१७]अनोळखी फिटली । चुकलीं ज्ञानें जेथ मिळों आलीं । जे पवित्र म्हणिजे ॥ ७४ ॥ पैं ब्रह्मबीजा जाहाला [१८]अंकुर । [१९]घोषध्वनीनादाकार । तयाचें गा [२०]भुवन जो ओंकार । तोही मी गा ॥ ७५ ॥ जया ओंकाराचिये [२१]कुशीं । अक्षरें होतीं [२२]अउमकारेंसीं । जियें उपजत वेदेंसीं । [२३]उठलीं तीन्हीं ॥ ७६ ॥ म्हणोनि ऋग्यजुःसाम । हे तीन्ही म्हणे मी आत्माराम । एवं मीचि [२४]कुळक्रम । [२५]शब्दब्रह्माचा ॥ ७७ ॥

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥**

हे चराचर आघवें । जिये प्रकृतीआंत सांठवे । ते शिणली जेथ [२६]विसंबे । ते परम गती मी ॥ ७८ ॥ आणि जयाचेनि प्रकृती जिये[२७] । जेणें [२८]अधिष्ठिली विश्व विये । जो

१ ज्ञान. २ विधि अनुष्ठानातें. ३ यज्ञ. ४ देवांस हवि देण्याचा मंत्र. ५ पितरांस, हवि देण्याचा मंत्र. ६ सोमवल्ली. ७ नानाप्रकारच्या. ८ तूप. ९ ऋत्विज. १० होमद्रव्य. ११ अन्य खरें. १२ मनसंकल्पांत. १३ चारी वेद. १४ एकत्र मिळण्याचें ठिकाण. १५ जाणण्या योग्य. १६ समजूत. १७ भिन्नपणा. १८ रूप. १९ चारी वाचा. २० मंदिर. २१ पोटीं. २२ अकार, उकार, मकारांसह. २३ उत्पन्न झालीं. २४ वंशपरंपरा. २५ वेदाचा. २६ विश्रांति पावे. २७ जगते. २८ आश्रय केली.

येऊनि प्रकृती इये । गुणातें भोगी ॥ ७९ ॥ तो विश्वश्रियेचा[1] भर्ता । मीचि गा एथ पंडुसुता । मी गोसावी[2] समस्ता । त्रैलोक्याचा ॥ १८० ॥ आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें तिळभरी[3] उगें नसावें । पावकें[4] दाहावें[5] । वर्षावें जळें ॥ ८१ ॥ पर्वतीं बैसका[6] न संडावी । समुद्रीं रेखा[7] नोलांडावी । पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ॥ ८२ ॥ म्यां बोलविल्या[8] वेद बोले । म्यां चालविल्या सूर्य चाले । म्यां हालविल्या प्राण हाले । जो जगातें चाळिता ॥ ८३ ॥ मियांचि नियमिलासांता । काळ[9] ग्रासितसे भूतां । इयें[10] ह्मणियामनें[11] पांडुसुता । सकळें जयाचीं ॥ ८४ ॥ जो ऐसा समर्थ । तो मी जगाचा नाथ । आणि गगनाऐसा साक्षिभूत । तोही मीचि ॥ ८५ ॥ इहीं नामरूपीं आघवा । जो भरला असे पांडवा । आणि नामरूपांचाही वोल्हावा[12] । आपणचि जो ॥ ८६ ॥ जैसे जळाचे कल्लोळ[13] । आणि कल्लोळीं आथी[14] जळ । ऐसेनि वसवीतसे सकळ । तो निवास[15] मी ॥ ८७ ॥ जो मज होय अनन्यशरण । त्याचें निवारीं मी जन्ममरण । यालागीं शरणागता शरण[16] । मीचि एक ॥ ८८ ॥ मीचि एक अनेकपणें । वेगळालेनि प्रकृतिगुणें । जीतें[17] जगाचेनि प्राणें । वर्तत असे ॥ ८९ ॥ जैसा समुद्र थिल्लर[18] न ह्मणतां । भलतेथ बिंबे सविता । तैसा ब्रह्मादि सर्वां भूतां । सुहृद तो मी ॥ १९० ॥ मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासि वोल्हावा । सृष्टिक्षयप्रभवा[19] । मूळ तें मी ॥ ९१ ॥ बीज शाखांतें प्रसवे । मग तें रूंखपण[20] बीजीं समावे । तैसें संकल्पें होय आघवें । पाठीं संकल्पीं मिळे ॥ ९२ ॥ ऐसें जगाचें बीज संकल्प । अव्यक्त[21] वासनारूप । तया कल्पांतीं जेथ निक्षेप[22] । होय तें मी ॥ ९३ ॥ इयें नामरूपें लोटती[23] । वर्णव्यक्ती[24] आटती । जातीचे भेद फिटती । जैं आकार नाहीं ॥ ९४ ॥ तैं संकल्पवासना-संस्कार[25] । मागौतें[26] रचावया आकार । जेथ राहोनि असती अमर । तें निधान[27] मी ॥ ९५ ॥

**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।**
**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥**

मी सूर्याचेनि वेषें । तपें[28] तैं हें शोषे । पाठीं इंद्र होऊनि वर्षें[29] । तैं पुढती भरे ॥ ९६ ॥ अग्नि काष्ठें खाये । तें काष्ठचि अग्नि होये । तेसें मरतें मारितें पाहें । स्वरूप माझें ॥ ९७ ॥ यालागीं मृत्यूच्या भागीं जें जें । तें तेंही पैं रूप माझें । आणि न मरतें तंव सहजें । मीचि आहें ॥ ९८ ॥ आतां बहु बोलोनि सांगावें । तें एकेहेळां[30] घे पां आघवें[31] । तरी

१ विश्वलक्ष्मीचा पति. २ धनी. ३ क्षणभर. ४ अग्नीनें. ५ जाळावें. ६ बैठक. ७ मर्यादा. ८ आज्ञा दिली असतां. ९ मृत्यु. १० हीं. ११ चाकर. १२ जिव्हाळा. १३ तरंग. १४ आहे. १५ वसतिस्थान. १६ आश्रयस्थान. १७ जिवंत. १८ डबकें. १९ उत्पत्ति, स्थिति व नाश यांला. २० वृक्षपणा. २१ न दिसणारे. २२ ठेवणें. २३ लय पावती. २४ नामरूपादि. २५ संस्काररूप वासनाशक्ती. २६ नंतर. २७ ठिकाण. २८ तापतों. २९ पाऊस पडतो. ३० एकदम. ३१ सर्व.

सेतासतही जाणावें । मीचि पैं गा ॥ ९९ ॥ ह्मणोनि अर्जुना मी नसें । ऐसा कवण ठाव असे । परि प्राणियांचें दैव कैसें । जे न देखती मातें ॥ ३०० ॥ तरंग पाणियेंवीण सुकती । रश्मि वातीवीण न देखती । तैसे मीचि ते मी नोहती । विस्मो देखें ॥ १ ॥ हें आंत बाहेर मियां कोंदलें । जग निखिल माझेंचि वोतिलें । कीं कैसें कर्म तयां आड आलें । जे मीचि नाहीं ह्मणती ॥ २ ॥ परि अमृत कुहां पडिजे । कां आपणपयातें काढिजे काढिजे । ऐसें अर्थी काय कीजे । अप्राप्तासी ॥ ३ ॥ ग्रासा एका अन्नासाठीं । अंध धांवताहे किरीटी । आडळला चिंतामणि पायें लोटी । आंधळेपणें ॥ ४ ॥ तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये । तैं ऐसी हे दशा आहे । ह्मणोनि कीजे तें केलें नोहे । ज्ञानेंविण ॥ ५ ॥ आंधळेया गरुडाचे पांख आहाती । ते कवणा उपेगा जाती । तैसे सत्कर्माचे उपखे ठाती । ज्ञानेंविण ॥ ६ ॥

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥**

देख पां गा किरीटी । आश्रमधर्माचिया राहाटी । विधिमार्गा कसवटी । जे आपणचि होती ॥ ७ ॥ यजन करितां कौतुकें । तिन्ही वेदांचा माथा तुके । क्रिया फळेंसि उभी ठाके । पुढां जयां ॥ ८ ॥ ऐसे दीक्षित जे सोमपें । जे आपणचि यज्ञाचें स्वरूप । तिहीं तया पुण्याचेनि नांवें पाप । जोडिलें देखें ॥ ९ ॥ जे श्रुतित्रयातें जाणोनि । शतवरी यज्ञ करूनि । यजिलिया मातें चुकोनि । स्वर्गा वरिती ॥ ३१० ॥ जैसें कल्पतरुतळवटीं । बैसोनि झोळिये देतसे गांठी । मग निदैवें निघे किरीटी । दैन्यचि करूं ॥ ११ ॥ तैसे शतक्रतु यजिले मातें । कीं इप्सिताति स्वर्गसुखातें । आतां पुण्य कीं हें निरुतें । पाप नोहे ॥ १२ ॥ ह्मणोनि मजवीण पाविजे स्वर्ग । तो अज्ञानाचा पुण्यमार्ग । ज्ञानिये तयातें उपसर्ग । हानि ह्मणती ॥ १३ ॥ येऱ्हवीं तरी नरकींचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख । वांचूनि नित्यानंद गा निर्दोष । तें स्वरूप माझें ॥ १४ ॥ मज येतां पैं सुभटा । या द्विविधा गा आव्हांटा । स्वर्ग नरक या वाटा । चोरांचिया ॥ १५ ॥ स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे । मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य ॥ १६ ॥ आणि मज्जचिमाजी असतां । जेणें मी दुऱ्हावें पांडुसुता ।

---

१ आहे व नाहीं. २ आटतात. ३ किरण. ४ मी नाहींत. ५ आश्चर्य. ६ भरलें. ७ कूपांत. ८ असें समजणाऱ्यास. ९ पंख. १० श्रम व्यर्थ. ११ रीतीप्रमाणें. १२ कसाची शिळा. १३ डोले. १४ यज्ञांतील सोमपान करणारे. १५ ऋग्, यजु व साम. १६ शंभरपर्यंत. १७ हतभाग्य. १८ भिक्षा मागायाला. १९ शंभर यज्ञांनीं. २० इच्छितात. २१ खरें. २२ उपद्रवरूप नाश. २३ यावेगळें. २४ आडवाटा. २५ पापमिश्रित पुण्य. २६ माझ्यामध्यें. २७ अंतरतो.

तें पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न तुटे काई ॥ १७ ॥ परि हें असो आतां प्रस्तुत । ऐकें यापरि ते दीक्षित । यजूनि मातें याचित । स्वर्गभोगा ॥ १८ ॥ मग मी न पविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे । तेणें लाधलेनि सौरसें । स्वर्गा येती ॥ १९ ॥ जेथ अमरत्व हें सिंहासन । ऐरावतासारिखें वाहन । राजधानी भुवन । अमरावती ॥ ३२० ॥ जेथ महासिद्धींचीं भांडारें । अमृताचीं कोठारें । जिये गांवीं खिल्लारें । कामधेनूंचीं ॥ २१ ॥ जेथ वोळंगे देव पाइका । सैंघ चिंतामणीचिया भूमिका । विनोदवनवाटिका । सुरतरूंचिया ॥ २२ ॥ गंधर्व गात गाणीं । जेथ रंभेऐसिया नाचणी । उर्वशीमुख्य विलासिनी । अंतौरियां ॥ २३ ॥ मदन वोळगे सेजारें । जेथ चंद्र सिंपे [12]सांबरें । पवनाऐसे [13]म्हणियारे । धांवणे जेथ ॥ २४ ॥ पैं बृहस्पती मुख्य आपण । ऐसे स्वस्तिश्रियेचे ब्राह्मण । भाटिवेचे सुरगण । बहुवस जेथें ॥ २५ ॥ लोकपाळ [15]रांगेचे । राउत [16]जिये पदवीचे । [17]उच्चैःश्रवा खांचे । [18]खोलणिये ॥ २६ ॥ हें असो बहु ऐसें । भोग इंद्रसुखासरिसे । ते भोगिजती जंव असे । पुण्यलेश ॥ २७ ॥

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥**

मग तया पुण्याची पाउटी सरे । सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे । आणि येऊं लागती माघारे । मृत्युलोका ॥ २८ ॥ जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचे । मग द्वारही चेपूं नये तियेचें । तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगों ॥ २९ ॥ एवं तिहीं मातें चुकले । जिहीं पुण्यें स्वर्ग कामिले । तयां अमरपण तें वांयां जालें । अंतीं मृत्युलोक ॥ ३३० ॥ मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्ठेचिया दाथरीं । उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मोनि मरती ॥ ३१ ॥ अगा स्वप्नीं निधान फावे । परि चेइलियां हारपें आघवें । तैसें स्वर्गसुख जाणावें । वेदज्ञांचें ॥ ३२ ॥ अर्जुना वेदविद जऱ्ही जाहला । तरि मातें नेणतां वायां गेला । कण सांडूनि [33]उपणिला । कोंडा जैसा ॥ ३३ ॥ म्हणऊनि मज एकेंविण । हें त्रयीधर्म अकारण । आतां मातें जाणोनि कांहीं नेण । तूं सुखिया होसी ॥ ३४ ॥

---

१ म्हणतात. २ प्राप्त झालेल्या पुण्यानें. ३ हौसीनें. ४ कळप. ५ प्राप्त होते. ६ चाकर. ७ सर्वत्र. ८ उपवनें, बगीचे. ९ नृत्य करणाऱ्या. १० स्त्रिया. ११ पलंगावर. १२ पाण्याचा वर्षाव. १३ चाकर. १४ पराक्रमाचे स्तुतीपाठक. १५ माळकेतले. १६ ज्या ठिकाणचे. १७ इंद्राचा घोडा. १८ पुढें चालतेवेळेस दमे. १९ सारखे. २० पायरी संपे. २१ तेज. २२ द्रव्य. २३ दरवाजा. २४ सर्वदा असण्यासला. २५ इच्छिले. २६ व्यर्थ. २७ उदररूप गुहेंत. २८ उकाड्यांत. २९ ठेवा प्राप्त होतो. ३० जागे झाल्यावर. ३१ कर्मठाचे. ३२ वेदार्थज्ञानी. ३३ पाखडला, वाऱ्यावर धरला. ३४ वेदोक्तधर्म.

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥**

वैं सर्वभावेंसीं उखितें । जे [2]वोपिले मज चित्तें । जैसा गर्भगोळ उद्यमातें । कोण्याही नेणे ॥ ३५ ॥ तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं । मेंजाचि नाम पाहीं । जिणेया ठेविलें ॥ ३६ ॥ ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसाते मातें । जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ॥ ३७ ॥ ते ऐंकवटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहणीं । तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजाचि पडली ॥ ३८ ॥ मग तिहीं जें जें करावें । तें मजाचि पडिलें आघवें । जैसी अजातपक्षाचेनि जीवें । पक्षिणी [11]जिये ॥ ३९ ॥ आपुली ताहान भूक नेणे । तान्हया निकें तें माउलीसचि करणें । तैसे अनुसरले मज प्राणें । तयांचें सर्व मी करीं ॥ ३४० ॥ तयां माझिया सायुज्याची चाड । तरि तेंचि पुरवीं कोड । कां सेवा ह्मणती तरी आड । प्रेम सुयें ॥ ४१ ॥ ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो पुढां पुढां लागें तयां देवो । आणि दिधलियाचा [15]निर्वाहो । तोही मीचि करीं ॥ ४२ ॥ हा [16]योगक्षेम आघवा । तयांचा मजाचि पडिला पांडवा । जयांचियां सर्व भावा । आश्रय मी ॥ ४३ ॥

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥**

आतां आणीकही संप्रदायें । परि मातें नेणती सर्मवायें । जे अग्निइंद्रसूर्यसोमाये । ह्मणऊनि यजिती ॥ ४४ ॥ तेंही कीर मातेंचि होये । कां जें हें आघवें मीचि आहें । परि ते भेंजती उंजरी नव्हे । विषम पडे ॥ ४५ ॥ पाहें पां शाखा पल्लव रुखाचे । हे काय नव्हती एकाचि बीजाचे । परि पाणी घेणें मुळाचें । तें मुळींचि घेपे ॥ ४६ ॥ कां दाहाही इंद्रियें आहाती । इयें जरी एकाचि देहींचीं होती । आणि इहीं सेविले विषय जाती । एकाचि ठाया ॥ ४७ ॥ तरि करोनि रससोय बरवी । कानीं केवि भरावी । फुलें आणोनि तुरंबीवीं । डोळां केवि ॥ ४८ ॥ तेथ रस तो मुखेंचि सेवावा । परिमळु तो घ्राणेंचि घ्यावा । तैसा मी तो यजावा । मीचि ह्मणोनि ॥ ४९ ॥ येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि गा अनेंआन । ह्मणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ॥ ३५० ॥

---

१ उर्के. २ विकले. ३ गर्भातला प्राणी. ४ चांगलें. ५ माझ्याकरतां जीव ठेवला आहे. ६ चिंतित असतां. ७ ऐक्यतेस येऊन. ८ मार्गांमत. ९ चिंता. १० पंख न फुटलेल्या पक्ष्याच्या. ११ वांचे. १२ इच्छा. १३ जवळ. १४ घालितों. १५ व्यवस्था. १६ योग=अप्राप्ताची प्राप्ति, क्षेम=प्राप्ताचें संरक्षण. १७ पंथ, परंपरा. १८ समष्टिरूपानें. १९ कारण. २० भजन. २१ सरळ. २२ वांकडा. २३ वृक्षाचे. २४ घातलें जातें. २५ स्वयंपाक. २६ हुंगावीं. २७ वास. २८ पूजावा. २९ कांहींतरी.

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानंति तत्त्वेनातश्च्यवंति ते ॥ २४ ॥**

येऱ्हवीं पाहें पां पांडुसुता । या यज्ञोपहारां समस्तां । मीवांचूनि भोक्ता । कवण आहे ॥ ५१ ॥ मी सकळां यज्ञाची आदि । आणि यजना यया मीचि अवधि । कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि । देवा भजले ॥ ५२ ॥ गंगेचें उदक गंगे जैसें । अर्पिजे देवपितरोद्देशें । माझें मज देती तैसें । परि आनानिभावीं ॥ ५३ ॥ ह्मणऊनि ते पार्था । मातें न पवतीचि सर्वथा । मग मनीं वाहिली जे आस्था । तेथ आले ॥ ५४ ॥

**यांति देवव्रता देवान्पितॄन्यांति पितृव्रताः ।**
**भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥**

मनें वाचाकरणीं । जयांचिया भजनीं देवांचिया वाहणी । ते शरीर जातिये क्षणीं । देवचि जाले ॥ ५५ ॥ अथवा पितरांचीं व्रतें । वाहाति जयांचीं चित्तें । जीवित सरलिया तयांतें । पितृत्व वरी ॥ ५६ ॥ कां क्षुद्र देवतादिभूतें । तियेंचि जयांचीं परमदैवतें । जिहीं अभिचारिकीं तयांतें । उपासिलें ॥ ५७ ॥ तयां देहाची जवनिका फिटली । आणि भूतत्वाची प्राप्ति जाहाली । एवं संकल्पवशें फळलीं । कर्मे तयां ॥ ५८ ॥ मग मींचि डोळां देखिला । जिहीं कानीं मींचि ऐकिला । मींचि मनीं भाविला । वानिला वाचा ॥ ५९ ॥ सर्वांगीं सर्वांठायीं । मींचि नमस्कारिला जिहीं । दानपुण्यादिकें जे कांहीं । तें माझियाचि मोहरां ॥ ३६० ॥ जिहीं मातेंचि अध्ययन केलें । जे आंतबाहेरि मियांचि धाले । जयांचें जीवित्व जोडलें । मजचिलागीं ॥ ६१ ॥ जे अहंकार वाहत आंगीं । आह्मी हरीचे भूषावयालागीं । जे लोभिये एकाचि जगीं । माझेनि लोभें ॥ ६२ ॥ जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भुली सभ्रम । नेणती लोक ॥ ६३ ॥ जयांचीं जाणती मजचि शास्त्रें । मी जोडे जयांचेनि मंत्रें । ऐसे जे चेष्टामात्रें । भजले मज ॥ ६४ ॥ ते मरणाऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे । मग मरणीं आणिकीकडे । जातील केविं ॥ ६५ ॥ ह्मणोनि मद्याजी जे जाहाले । ते माझिया सायुज्या आले । जिहीं उपचारमिषें दिधलें । आपणपें मज ॥ ६६ ॥ अर्जुना माझें ठायीं । आपणपेंवीण सोरसें नाहीं । मी उपचारें कवणाही । नाकळें गा ॥ ६७ ॥ एथ जाणीव करी तोचि नेणे । आथिलेपण मिरवी तेंचि उणें । आह्मी जाहालों ऐसें जो ह्मणे । तो कांहींचि नव्हे ॥ ६८ ॥ अथवा

---

१ यज्ञांतील उपहार. २ परिणाम, शेवट. ३ वेगळ्या भावानें. ४ धरिली. ५ इंद्रियांनीं. ६ मार्गे, कारणें. ७ धरिती. ८ जारणमारण कर्मानें. ९ पडदा. १० वर्णिला. ११ मार्गाकडे. १२ तृप्त झालें. १३ भूषणासाठीं. १४ स्पष्ट. १५ दुसरीकडे. १६ माझें यजन करणारे. १७ ऐक्यास. १८ आराधन, सेवाहेतूनें. १९ गोडी. २० ज्ञानी ह्मणवितो. २१ संपन्नपणा, योग्यता. २२ कृतकृत्य.

नारे किरीटी । कां तपें हन जे हुटहुटी । ते तृणा एकासाठीं । न सरे एथ ॥ ६९ ॥
पां जाणिवेचेनि बळें । कोण्ही वेदांपासूनि असे आगळें । कीं शेषाहूनि तोंडाळें ।
कें आथी ॥ ३७० ॥ तोही आंथरुणातळवटीं दडे । येऊं नेति नेति म्हणोनि
। एथ सनकादिक वेडे । पिसे जाहाले ॥ ७१ ॥ करितां तापसांची कडसणी ।
ण जवळां ठेविजे शूळपाणी । तोहि अभिमान सांडूनि पायवणी । माथां वाहे ॥ ७२ ॥
तरी आथिलेपणें सरशी । कवणी आहे लक्ष्मियेऐसी । [१२]श्रियेसारिखिया दासी । घरीं
येते ॥ ७३ ॥ तियें खेळतां करिती घरकुलीं । तयां नामें अमरपुरें जरि ठेविलीं । तरि
होती काय बाहुलीं । इंद्रादिक तयांचीं ॥ ७४ ॥ तिया नावडोनि जेव्हां मोडती ।
मां महेंद्राचे रंक होती । तिया जिया झाडाकडे पाहाती । ते कल्पवृक्ष ॥ ७५ ॥
सिया जियेचिया जवळिका । सामर्थ्य घरींचिया पाइका । ते लक्ष्मी मुख्यनायका । न
चि एथ ॥ ७६ ॥ मग सर्वस्वें करूनि सेवा । अभिमान सांडूनि पांडवा । तें पाय
वायाचिया देवा । पात्र जाहली ॥ ७७ ॥ म्हणोनि थोरपण पऱ्हां सांडिजे । एथ व्युत्पत्ती
राघवी विसरिजे । जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ॥ ७८ ॥ अगा सहस्रकिर-
णाचिये [१९]दिठी । पुढां चंद्रही लोपे किरीटी । तेथ खद्योत कां हुटहुटी । आपुलेनि तेजें[२१]
॥ ७९ ॥ तैसें लक्ष्मियेचें थोरपण न सरे । जेथें शंभूचेंही तप न पुरे । तेथ येर प्राकृत
हुरें । केवि जाणों लाहे ॥ ३८० ॥ यालागीं शरीरसांडोवी कीजे । सकळगुणांचें लोण
तरिजे । संपत्तिमद सांडिजे । कुरवंडी करुनी ॥ ८१ ॥

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

मग निःसीमभावउल्हासें । मज अर्पावयाचेनि मिसें । फळ एक आवडे तैसें । भल-
तयाचें हो ॥ ८२ ॥ भक्त माझियाकडे दावी । आणि मीं दोन्ही हात वोडवीं । मग देंठ
न फेडितां सेवीं । आदरेंसीं ॥ ८३ ॥ पैं गा भक्तीचेनि नांवें । फूल एक मज द्यावें ।
तें [२६]लेखें तरि म्यां तुरंबावें । परि मुखींचि घालीं ॥ ८४ ॥ हें असो कायसीं फुलें । पानचि
एक भावडतें जाहालें । तें साजुकही न हो सुकलें । भलतैसें ॥ ८५ ॥ परि सर्वभावें
भरलें देखें । आणि भुकेला अमृतें तोखे । तैसें पत्रचि परी तेणें[२९] सुखें । आरोगूं लागें

---

१ तळावेळ, तळमळ. २ वेदाहून. ३ बोलके. ४ आहे. ५ वेद. ६ हें नव्हे, तें नव्हे. ७ मागें ८ विचार. ९ महादेवाचा. १० विष्णुपदोदक, भागीरथी. ११ संपन्नपणानें तुळण्याजोगें. १२ सिद्धि. १३ त्या सिद्धि. १४ देवांचीं नगरें. १५ सेवक. १६ पलीकडे. १७ ज्ञातेपणाचा अभिमान. १८ सूर्याच्या. १९ दृष्टीनें. २० काजवा. २१ प्रकाशें. २२ देहाचें निंबलोण. २३ हवें तें. २४ पुढें करीं. २५ तोडतां. २६ समज. २७ हुंगावें. २८ (द्रौपदीचें) शाकपत्र. २९ अमृततुल्य. ३० खाऊं लागतों.

॥ ८६ ॥ अथवा ऐसेंही एक घडे । जे पालाही परी न [1]जोडे । तरि उदकाचें तंव [2]सांकडें । नव्हेल कीं ॥ ८७ ॥ तें भलतेथ [3]निमोलें । न जोडितां आहे जोडलें । तेंचि सर्वस्व करूनि अर्पिलें । जेणें मज ॥ ८८ ॥ तेणें [4]वैकुंठापासोनि [5]विशाळें । मजलागीं केलीं [5]राउळें । कौस्तुभाहोनि निर्मळें [6] । [7]लेणीं दिधलीं ॥ ८९ ॥ दुधाचीं [8]सेजारें । क्षीराब्धीऐसीं मनोहरें मजलागीं अपारें । [9]सृजिलीं तेणें ॥ ३९० ॥ [10]कर्पूर चंदन अगरु । ऐसेया सुगंधाचा महामेरु । मेंडहातिवा [11]लाविला दिनकरु [12] । दीपमाळे ॥ ९१ ॥ गरुडासारिखीं वाहनें । मज सुरतरूचीं [13]उद्यानें । कामधेनूंचीं गोधनें । अर्पिलीं तेणें ॥ ९२ ॥ मज अमृताहूनि सुरसें । बोनीं [14] [15]वोगरिलीं बहुवसें । ऐसा भक्तांचेनि उदकलेशें । [16]परितोषें गा ॥ ९३ ॥ हें सांगावें काय किरीटी । तुवांचि देखिलें आपुलिया दिठी [17] । मी सुदामयाचिया सोडीं गांठी । [18]पेंडहयांसाठीं ॥ ९४ ॥ पैं भक्ती एकी मी जाणें । तेथ [19]सानें थोर न ह्मणें । आह्मी भावाचे पाहुणे । भलतेया ॥ ९५ ॥ येर पत्र पुष्प फळ । हें भजावया मिस केवळ । [20]वांचूनि आमुचियालागीं निष्कळ । भक्तितत्त्व ॥ ९६ ॥ ह्मणोनि अर्जुना अवधारीं । तूं बुद्धी एकी [21]सोपारी करीं । तरी सहजें आपुलिया मनोमंदिरीं । न विसंबें [22] मातें ॥ ९७ ॥

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

जे जे कांहीं व्यापार करिसी । कां भोग हन भोगिसी । अथवा यज्ञीं याजिसी । [23]नानाविधी ॥ ९८ ॥ ना तरी [24]पात्रविशेषें दानें । कां सेवकां देसी [25]जीवनें । तपादि हन साधनें । व्रतें करिसी ॥ ९९ ॥ तें क्रियाजात आघवें । जैसें निपजेल [26]स्वभावें । तें भावना करोनि करावें । माझिया मोहरां ॥ ४०० ॥ परि सर्वथा आपुले जीवीं । केलियाचि [27]से [28] कांहींचि नुरवीं । ऐसीं धुवोनि कर्में द्यावीं । माझिया हातीं ॥ १ ॥

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥**

मग अग्निकुंडीं बीजें घातलीं । तियें अंकुरदशे जेवि मुकलीं । तेवि न फळतीचि मज अर्पिलीं । [29]शुभाशुभें ॥ २ ॥ अगा कर्में जैं उरावें । तैं तिहीं सुखदुःखीं फळावें । आणि तैंयातें भोगावया यावें । देहा एका ॥ ३ ॥ तें [31]उगाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरण

१ मिळे. २ संकट. ३ किंमतीवांचून. ४ वैकुंठाहून. ५ देवळें. ६ उत्तम. ७ अलंकार. ८ शय्या स्थानें. ९ निर्माण केलीं. १० कापूर. ११ कडवाती. १२ सूर्य. १३ बागा. १४ पक्वान्नें. १५ वाढिलीं. १६ संतुष्ट होतो. १७ दृष्टीनें. १८ पोह्यांसाठीं १९ लहान. २० अनन्य भक्तीवांचून बाकी सर्व आम्हाला व्यर्थ. २१ स्वाधीन कर. २२ विसरूं नको. २३ अनेक तऱ्हेनें. २४ योग्यतेनुरूप. २५ वतनें, पगार. २६ सहजरीतीनें. २७ संमुख. २८ आठवण. २९ पुण्यपाप. ३० कर्मातें. ३१ हवालीं केलें.

जन्म । जन्मासवें श्रम । वरिचिलही गेले ॥ ४ ॥ म्हणऊनि अर्जुना यापरि । पाहें बा वेळ। नव्हेल भारी । हे संन्यासयुक्ति सोपारी । दिधली तुज ॥ ५ ॥ या देहाचिये बांदोडी न पडिजे । सुखदुःखाचिया सागरीं न बुडिजे । सुखें सुखरूपा घडिजे । माझियाचि आंगा ॥ ६ ॥

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाऽप्यहम् ॥ २९ ॥

तो मी पुससी कैसा । तरि जो सर्वभूतीं सदा सरिसा । जेथ आप पर ऐसा । भाग नाहीं ॥ ७ ॥ जेथ ऐसिया मातें जाणोनि । अहंकाराचा कुरुठा मोडोनि । जे जिवें कर्मे करूनि । मातें भजले ॥ ८ ॥ ते वर्तत दिसती देहीं । परि ते देहीं ना माझ्याठायीं । आणि मी तयांच्या हृदयीं । समग्र असें ॥ ९ ॥ सविस्तर वटत्व जैसें । बीजकणिकेमाजि असे । आणि बीजकण वसे । वटीं जेवीं ॥ ४१० ॥ तेवि आह्मा तया परस्परें । बाहेर नामाचीचि अंतरें । वांचूनि आंतुवट वस्तुविचारें । मी तेचि ते ॥ ११ ॥ आतां आयाचें जैसें लेणें । आंगावरी आहाचवाणें । तैसें देहधरणें । उदास तयांचें ॥ १२ ॥ परिमळे निघालिया पवनापाठीं । मागें वोस फूल राहे देठीं । तैसें आयुष्याचिये मुठी । केवळ देह ॥ १३ ॥ येर अवष्टंभ जो आघवा । तो आरूढोनि मद्भावा । मजचि आंत पांडवा । पैठी जाहाला ॥ १४ ॥

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥

ऐसें भजतेनि प्रेमभावें । जयां शरीरही पाठीं न पवे । तेणें भलतया व्हावें । जातीचिया ॥ १५ ॥ आणि आचार पाहातां सुभटा । तो दुष्कृताचा कीर सेलेवांटा । परि जीवित वेचिलें चोहटा । भक्तीचिया कीं ॥ १६ ॥ अगा अंतीचिया मती । साचपण पुढिले गती । म्हणोनि जीवित जेणें भक्ती । दिधलें शेखीं ॥ १७ ॥ तो आधीं जरी दुराचारी । तरी सर्वोत्तमचि अवधारीं । जैसा बुडाला महापूरीं । न मरत निघाला ॥ १८ ॥ तयाचें जीवित ऐलथडिये आलें । म्हणोनि बुडालेंपण आवघें वायां गेलें । तेवि नुरेचि पाप केलें । शेवटलिये भक्ती ॥ १९ ॥ यालागीं दुष्कृती जऱ्ही जाहाला । तरि अनुतापतीर्थीं न्हाला । न्हाऊनि मजआंत आला । सर्वभावें ॥ ४२० ॥ तरि आतां पवित्र तयाचें कुळ । अभि-

१ वेळ मिळणार नाहीं. २ बंधनांत. ३ सारखा. ४ घरटा. ५ वडाचें झाड. ६ अंतरंग. ७ मागून आणलेलें, केव्हां तरी जाणारें. ८ वरवरच, व्यर्थ. ९ सुगंध. १० वाऱ्याबराबर. ११ अहंकार, प्रपंच. १२ प्रविष्ट झाला. १३ पुनः प्राप्त होत नाहीं. १४ पापाचा. १५ उत्तम वांटा. १६ मार्गे. १७ आलीकडच्या कांठीं. १८ ज्ञानभक्तीनें शेवट. १९ पश्चात्तापरूप तीर्थांत. २० कुलीनपणा.

ज्ञास्य तेंचि निर्मळ । जन्मलेयाचें फळ । तयासीच जोडलें ॥ २१ ॥ तो सकळही पढि-नला । तपें तोचि तपिनला । अष्टांग अभ्यासिला । योग[1] तेणें ॥ २२ ॥ हें असो बहुत पार्था । तो उतरला[2] कर्मं सर्वथा । जयाची अखंड गा आस्था । मजचिलागीं ॥ २३ ॥ अवघिया मनोबुद्धीचिया राहटी[3] । भरोनि एकनिष्ठेची पेटी । मजमाजि किरीटी । निक्षे-पिली[4] जेणें ॥ २४ ॥

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।**
**कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥**

तो आतां अवसरें[5] मजसारिखा होइल । ऐसा हन भाव तुज जाइल । हां गा अमृता आंत राहिला । तया मरण कैंचें ॥ २५ ॥ पैं सूर्य जो वेळु नुदैजे[6] । तयां वेळा कीं रात्रि ह्मणिजे । तेविं माझिये भक्तीविण जें कीजे । तें महापापा नोहे ॥ २६ ॥ ह्मणोनि तयाचिया चित्ता । माझी जवळिक पांडुसुता । तेव्हांचि तो तत्वता । स्वरूप माझें ॥ २७ ॥ जैसा दीपें दीप लाविजे । तेथ आदील[7] कोण हें नोळखिजे । तैसा सर्वस्वें जो मज भजे । तो मीचि होऊनि ठाके ॥ २८ ॥ मग माझी नित्य शांती । तया दशा[8] तेचि कांती । किंबहुना जिती । माझेनि जीवें ॥ २९ ॥ एथ पार्था पुढतपुढती[10] । तेंचि तें सांगों किती । जरी मियां[11] चाड तरी भक्ती । न विसंबिजे गा ॥ ४३० ॥ अगा कुळाचिया खोलपणा नलगों[12] । अभिजात्य[13] ह्मणी श्लाघा[14] । व्युत्पत्तीचा वाउगा । सोसें[15] कां वाहावा ॥ ३१ ॥ कां रूपवयसा[16] माजा । आथिलेपणें कां गाजा । एक भाव नाहीं माझा । तरी पेल्हाळ तें ॥ ३२ ॥ कणेंवीण सोपटें । कणसें लागलीं घनदाटें । काय करावें गोमटें । वोस नगर ॥ ३३ ॥ ना तरी सरोवर आटलें । रानीं दुःखियां दुःखी भेटलें । कां वांझ फुली फुललें । झाड जैसें ॥ ३४ ॥ तैसें सकळ तें वैभव । अथवा कुळ जाति गौरव । जैसें शरीर आहे सांवेव । परि जीवचि नाहीं ॥ ३५ ॥ तैसें माझिये भक्तीविण । जळो तें जियालेपण । अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ॥ ३६ ॥ पैं हिवराची[22] दाट साऊली । सज्जनीं जैसी वोळिली[23] । तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं । अभक्तातें ॥ ३७ ॥ निंब निंबोळियीं मोडोनि आला । तरि तो काउळियांसीचि सुकाळ जाहाला । तैसा भक्तिहीन वाढिनला । दोषां-चिलागीं ॥ ३८ ॥ कां षड्रसें खापरीं वाढिलें । वाढूनि चोहटां ठेविलें । तें सुणियांचे उपेगा आलें । जियापरी ॥ ३९ ॥ तैसें भक्तिहीनाचें जिणें । जो स्वप्नींहि परि सुकृत[27] नेणे ।

---

१ योगमार्ग. २ पार झाला. ३ वृत्तीनें. ४ ठेविली. ५ अवकाशानें. ६ उदय पावत नाहीं. ७ पहिला. ८ त्याला. ९ जगणें. १० वारंवार. ११ माझी. १२ लागणें नको. १३ कुलीनत्व. १४ स्तुति. १५ हांव. १६ तारुण्यानें. १७ संपन्नत्वानें, योग्यतेनें. १८ व्यर्थ. १९ दाण्यांशिवाय. २० अवयवयुक्त. २१ जगणें. २२ एक निंद्य वृक्ष. २३ निषिद्ध केली. २४ फळांनीं. २५ पक्वान्नें. २६ कुत्र्याचे. २७ पुण्य.

तेणें संसारदुःखासि भोंगें। बोगारिलें ॥ ४४० ॥ ह्मणोनि कुळ उत्तम नोहावें। जाती अंत्यजहीं व्हावें। वरि देहाचेनि नावें। पशूचेंही लाभो ॥ ४१ ॥ पाहें पां सावजें हातिरुं धरिलें। तेणें तया काकुळती मातें स्मरिलें। कीं तयाचें पशुत्व वावो जाहालें। पावलिया मातें ॥ ४२ ॥

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ ३२ ॥**

अगा नांवें घेतां वोखटीं। जे आघवेया अधमाचिये शेवटीं। तिये पापयोनीही किरीटी। जन्मले जे ॥ ४३ ॥ ते पापयोनि मूढ। मूर्ख जैसे कां दगड। परि माझ्याठायीं दृढ। सर्वभावें ॥ ४४ ॥ जयांचिये वाचे माझे आलाप। दृष्टी भोगी माझेंचि रूप। जयांचें मन संकल्प। माझाचि वाहे ॥ ४५ ॥ माझिया कीर्तीविण। जयांचे रितें नाहीं श्रवण। जयां सर्वांगीं भूषण। माझी सेवा ॥ ४६ ॥ जयांचें ज्ञान विषो नेणे। जाणीव मज एकातेंचि जाणे। जयां ऐसें लाभे तरी जिणें। येऱ्हवीं मरण ॥ ४७ ॥ ऐसा आघवाचि परी पांडवा। जिहीं आपुलिया सर्वभावा। जियावयालागीं वोलावा। मीचि केला ॥ ४८ ॥ ते पापयोनीही होतु कां। ते श्रुताधीतही न होतु कां। [12]परि मजसीं तुकितां तुका। तुटी नाहीं ॥ ४९ ॥ पाहें पां भक्तीचेनि [13]आंथिलेपणें। दैत्यीं देवां आणिलें उणें। माझें नृसिंहत्व लेणें। जयाचिये [14]महिमे ॥ ४५० ॥ तो प्रल्हाद गा [15]मजसाठीं। घेतां बहुतें सदा किरीटी। कां जें मियां द्यावें तें गोष्टी। तयाचिया जोडे ॥ ५१ ॥ येऱ्हवीं दैत्यकुळ [16]सांचोकारें। परि इंद्रही [17]सरि न लाहे उपरें। ह्मणोनि भक्ति गा एथ [19]सरे। जाति अप्रमाण ॥ ५२ ॥ राजाज्ञेचीं अक्षरें आहाती। तियें [20]चामा एका जया पडती। तया चामासाठीं जोडती। सकळ वस्तु ॥ ५३ ॥ वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे। एथ राजाज्ञाचि समर्थ आहे ॥ तेंचि चाम एक जें लाहे। तेणें [21]विकती आघवीं ॥ ५४ ॥ तैसें उत्तमत्व तेंचि तरे। तेंचि सर्वज्ञता सरे। जें मनोबुद्धि भरे। माझेनि प्रेमें ॥ ५५ ॥ ह्मणोनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा [22]अकारण। एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक ॥ ५६ ॥ तेंचि भलतेणें भावें। मन मज आंतु येतें होआवें। आलें तरी आघवें। [23]मागील [24]वावो ॥ ५७ ॥ जैसे तंवचि वहाळ वोहळ। जंव न पवती गंगाजळ। मग होऊनि ठाकती केवळ

---

१ ताट वाढलें. २ महार आदि. ३ नक्रानें. ४ हत्ती. ५ व्यर्थ. ६ वाईट. ७ गोष्टी, नामोच्चार. ८ पांच विषय. ९ सर्वप्रकारें. १० असेनात कां. ११ शास्त्र पढलेले. १२ माझी आणि त्यांची तुलना केली तर कांहीं कमती नाहीं. १३ महत्वानें. १४ मोठेपणासाठीं. १५ माझ्याबद्दल. १६ खरेपणानें. १७ बरोबरी. १८ अधिकपणानें. १९ पुढारी होय. २० कातड्याच्या तुकड्यावर. २१ विकत मिळती. २२ निर्फळ. २३ नीचवर्णादिक. २४ व्यर्थ. २५ लहान ओढे.

गंगारूप ॥५८॥ कां खैर चंदन काष्ठें हे । विवंचना[1] तंवचि घटे । जंव न घापती[2] एकवटे । अग्निमाजि ॥ ५९ ॥ तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया । जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥ ४६० ॥ मग जाति व्यक्ती पडे बिंदुलें[3] । जेव्हां भावें होती मज मीनले[4] । जैसे लवणकण घातले । सागरामाजी ॥ ६१ ॥ तंववरी नदनदींचीं नांवें । तंवचि पूर्वपश्चिमेचे यावे[5] । जंव न येती आघवे । समुद्रामाजि ॥ ६२ ॥ हेंचि कवणे एके मिसें[6] । चित माझेठायीं प्रवेशे । येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे ॥ ६३ ॥ अगा वरी फोडावयाचि[7] लागीं । लोहो मिळो कां परिसाचे आंगीं । कां जे मिळतिये प्रसंगीं[8] । सोनेंचि होईल ॥ ६४ ॥ पाहें पां वल्लभाचेनि[9] व्याजें । तिया व्रजांगनाचि[10] निजें[11] । मज मिनलिया काय माझें । स्वरूप नव्हती ॥ ६५ ॥ ना तरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें । कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं[12] ॥ ६६ ॥ अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां । कीं ममत्वें वसुदेवा- । दिकां सकळां ॥ ६७ ॥ नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा । इयां भक्ती[13] मी धनुर्धरा । प्राप्य जैसा ॥ ६८ ॥ तैसाचि गोपिकांसि कामें । तयां कंसा भयसंभ्रमें । येरां घातका मनोधर्में । शिशुपालादिकां ॥ ६९ ॥ अगा मी एकलाणीचें खागें । मज येवों ये भलतेनि मार्गें । भक्ति कां विषय[14] विरागें । अथवा वैरें ॥ ४७० ॥ म्हणोनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझ्या ठायीं । उपायांची नाहीं । वाणी[15] एथ ॥ ७१ ॥ आणि भलतिया जाति जन्मावें । मग भजिजे कां विरोधावें । परि भक्ता कां वैरिया व्हावें । माझियाचि ॥ ७२ ॥ अगा कवणें एके बोलें । माझेपण जऱ्ही जाहालें । तरी मी होणें आलें । हाता निरुतें[19] ॥ ७३ ॥ यालागीं पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ॥ ७४ ॥

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥**

मग वर्णांमाजि छत्रचामर[20] । स्वर्ग जयाचें अग्रहार[21] । मंत्रविद्येसि माहेर । ब्राह्मण जे ॥ ७५ ॥ जे पृथ्वीतळींचे देव । जे तपोवतार[22] सावयव[23] । सकळतीर्थांसि दैव । उदयलें जे ॥ ७६ ॥ जेथ अखंड वसिजे यागीं । जे वेदांची वज्रांगी[24] । जयांचिये दिठीचिया उत्संगीं[25] । मंगळ वाढे ॥ ७७ ॥ जयांचिये आस्थेचेनि[26] वोलें । सत्कर्म पाल्हाळीं गेलें ।

१ विचार. २ घातले जात नाहींत. ३ शून्य. ४ ऐक्य झाले. ५ आगमन. ६ निमित्तानें. ७ परिसाला फोडण्याकरितां. ८ स्पर्शमात्रानें. ९ प्रीतीचे. १० गोपस्त्रियांचे. ११ अंतःकरणानें. १२ शिशुपालादिकांनीं. १३ भक्तीस्तव. १४ विषयबुद्धीनें. १५ निर्वाणीचें स्थान. १६ विरक्ततेनें. १७ उणीव. १८ माझ्याच. १९ खरें. २० श्रेष्ठ. २१ इनाम गांव. २२ तपश्चर्येचे अवतार. २३ मूर्तिमान्. २४ वळकट कवच. २५ मांडीवर. २६ ओलाव्यानें. २७ विस्तारलें.

संकल्पें सत्य जियालें । जयांचेनी ॥ ७८ ॥ जयांचेनि गा बोलें । अग्नीसि आयुष्य जाहालें । म्हणोनि समुद्रें पाणी आपुलें । दिधलें यांचिप्रीती ॥ ७९ ॥ मियां लक्ष्मी डौवलोनि केली परौती । फेडोनि कौस्तुभ घेतला हातीं । मग वोडविली वक्षस्थळाची वोखती । चरणरजां ॥ ४८० ॥ आझूनि पाउलाची मुद्रा । मी हृदयीं वाहें गा सुभद्रा । जे आपुलिया दैवसमुद्रा । जतनेलागीं ॥ ८१ ॥ जयांचा कोप सुभटा । काळाग्निरुद्राचा वैसौटा । जयांचे प्रसादीं फुकटा । जोडती सिद्धी ॥ ८२ ॥ ऐसे पुण्यपूज्य जे ब्राह्मण । आणि माझ्या ठायीं अतिनिपुण । आतां मातें पावती ते हे कवण । समर्थावें ॥ ८३ ॥ पाहें पां चंदनाचेनि अंगानिळें । शिवतिले निंब होते जे जवळें । तिहीं निर्जिवीं देवांचीं निडळें । बैसणीं केलीं ॥ ८४ ॥ मग तो चंदन तेथें न पवे । ऐसें मनीं कैसेनि धरावें । अथवा पातला हें समर्थावें । तेव्हां कायि साच ॥ ८५ ॥ तेथ निववील ऐसिया आशा । [1]हरें चंद्रमा अर्धा ऐसा । वाहिजत असे शिरसा । निरंतर ॥ ८६ ॥ तेथ निववितां आणि सगळा । परिमळें चंद्राहून आगळा । तो चंदन केविं अवलीळा । सर्वांगीं न बैसे ॥ ८७ ॥ कां रथ्योदकें जियेचिये कासे । लागलिया समुद्र जालीं अनायासें । तिये गंगेसि काय अनारिसें । गत्यंतर असे ॥ ८८ ॥ म्हणोनि राजर्षी कां ब्राह्मण । जयां गति मति मीचि शरण । तयां त्रिशुद्धी मीचि निर्वाण । स्थितीही मीचि ॥ ८९ ॥ यालागीं शतजर्जर नावे । रिगोनि केविं निश्चित होआवें । कैसेनि उघडिया असावें । शस्त्रवर्षीं ॥ ४९० ॥ आंगावरी पडतां पाषाण । न सुवावें केविं वोडॅण । रोगें दाटला आणि उदासपण । वोखदेंसी ॥ ९१ ॥ जेथ चहूंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केविं पांडवा । तेविं लोका येऊनि सोपद्रवा । केविं न भजिजे मातें ॥ ९२ ॥ अगा मातें न भजावयालागीं । कवण बळ पां आपुलिया आंगीं । काइ घरीं कीं भोगीं । निश्चिती केली ॥ ९३ ॥ ना तरी विद्या कीं वयसा । ययां प्राणियांसि हा ऐसा । मज न भजतां भरंवसा । सुखाचा कोण ॥ ९४ ॥ तरी भोग्यजात जेतुलें । तें एका देहाचिया निकियां लागलें । आणि एथ देह तंव असे पडिलें । काळाचिये तोंडीं ॥ ९५ ॥ बाप दुःखाचें केणें सुटलें । जेथ मरणाचें भरें लोटलें । तिये मृत्युलोकींचे शेवटिलें । हाटवेळे येणें जाहालें ॥ ९६ ॥ आतां सुखेंसि जीविता । कैंची ग्राहिकी किजेल पांडुसुता । काय

१ जीवित्व. २ यांप्रीत्यर्थ. ३ ढकलून. ४ काढून. ५ खळगी. ६ ठसा. ७ स्थान. ८ प्रतिपादावें. ९ अंगवायूच्या योगानें. १० स्पर्शले. ११ मस्तकें. १२ बसण्याची स्थानें. १३ पावला. १४ महादेवानें. १५ अर्धा. १६ मस्तकावर. १७ सहज. १८ रस्त्यावरील उदकें. १९ निराळें. २० शेवटीं. २१ शतावधी भोंकांच्या फुटक्या नावेंत. २२ शस्त्रवृष्टींत. २३ न घालावें. २४ ढाल. २५ सर्व उपभोग्य वस्तु. २६ बरेपणास. २७ माल. २८ समूह. २९ मनुष्यजन्मानें शेवटचें जन्म. ३० बाजाराच्या समयीं. ३१ आतां जीविताला सुख होईल असा कोणता सवदा करावा. ३२ गिराइकी.

राखोंडी फुंकितां । दीप लागे ॥ ९७ ॥ अगा विषाचे कांदे वांटुनी । जो रस घेइजे पिळुनी । तया नांम अमृत ठेउनी । जैसें अमर होणें ॥ ९८ ॥ तेंवि विषयांचें जें सुख । तें केवळ परमदुःख । परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥ ९९ ॥ कां शीस खांडूनि आपुलें । पायींच्या खतीं बांधिलें । तैसें मृत्युलोकींचें भलें । आहे आघवें ॥ ५०० ॥ म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं । कैंची सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळांच्या ॥ १ ॥ जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदय होय अस्तालागीं । दुःख लेऊनि सुखाची आंगी । सळित जगातें ॥ २ ॥ जेथ मंगळाचिया अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पडे पारी । मृत्यु उदराचिया परिवरीं । गर्भ गिंवसी ॥ ३ ॥ जें नाहीं तें तयातें चिंतवी । तंव तेंचि नेइजे गंधर्वीं । गेलियाची कवणे गांवीं । शुद्धी न लगे ॥ ४ ॥ अगा गिंवसितां आघविया वाटीं । परतलें पाउलचि नाहीं किरीटी । सैंघ निमालियांचिया गोष्टी । तिये पुराणें जेथिंचीं ॥ ५ ॥ जेथींचिये अनित्यतेची थोरी । करितया ब्रह्मयाचें आयुष्यवेरी । कैसें नाहीं होणें अवधारीं । निपटूनियां ॥ ६ ॥ ऐसी लोकींची जिये नांदणुक । तेथ जन्मले आथि जे लोक । तयांचिये निश्चितीचें कौतुक । दिसत असे ॥ ७ ॥ पैं दृष्टादृष्टाचिये जोडी । लागीं भांडवल न सुटे कवडी । जेथ सर्वस्वें हानि तेथ कोडी । वेंचिती गा ॥ ८ ॥ जो बहुवे विषयविलासें गुंफे । तो म्हणती उवाई पडिला सापें । जो अभिलाषभारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती ॥ ९ ॥ जयाचें आयुष्य धाकुटें होय । बळ प्रज्ञा जिरोनि जाय । तयाचे नमस्कारिती पाय । वडिल म्हणुनी ॥ ५१० ॥ जंव जंव बाळ बळिया वाढे । तंव तंव भोजें नाचती कोडें । आयुष्य निमालें आंतुलियेकडे । तें ग्लानीचि नाहीं ॥ ११ ॥ जन्मलिया दिवसदिवसें । होंलागे काळाचियाचि ऐसें । कीं वाढती करिती उल्हासें । उभविती गुढिया ॥ १२ ॥ अगा मर हा बोल न साहती । आणि मेलिया तरी रडती । परि असतें जात न गणिती । गहिंसपणें ॥ १३ ॥ दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा । कीं तो मासिया वेंटाळी जिभा । तैसें प्राणियें कवणे लोभा । वाढविती तृष्णा ॥ १४ ॥ अहा कटकटा हें वोखटें । इये मृत्युलोकींचें उफराटें । एथ अर्जुना जरि अवचटें । जन्मलासी तूं ॥ १५ ॥ तरि झड-

---

१ टाकीत नाहीं. २ तोडून. ३ क्षतांवर. ४ गोष्ट. ५ कानांनीं. ६ दुःख सुखाची आंगी=आंगरखा घेऊन जगाला छळतें ( बाहेरून सुख असें वाटतें पण सर्व दुःखच आहे.) ७ छळित. ८ आच्छादन. ९ घरीं. १० शोधी. ११ बहुत. १२ कर्ता जो ब्रह्मा त्याचें. १३ आयुष्य सरेपर्यंत. १४ सर्वथैव. १५ कोटयावधि द्रव्य. १६ अडके, गुंते. १७ सुखामध्यें. १८ प्रस्तुत. १९ उणें होतें. २० बुद्धि. २१ संतोषानें. २२ कमी झालें. २३ आंतून. २४ दुःख. २५ काळाच्याच स्वाधीन. २६ वाढदिवस. २७ जात असतें तें जुमानीत नाहींत. २८ मूर्खपणें. २९ धरतो. ३० हायहाय. ३१ वाईट.

ह्मणोनि बांधिला तिथ । इये भक्तिविये वाटे लाग । जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥ ११६ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं । सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ॥ १७ ॥ माझेनि अनुसंधानें देख । संकल्प जाळणें निःशेष । मद्याजी चोख । याचि नांव ॥ १८ ॥ ऐसा मियां आथिला होसी । तेथ माझियाचि स्वरूपा पावसी । हें अंतःकरणींचें तुजपासीं । बोलिजत असे ॥ १९ ॥ अगा अवघियां चोरियाँ आपुलें । जें सर्वस्व आह्मी असे ठेविलें । तें पावोनि सुख संचलें । होऊनि ठासी ॥ १२० ॥ ऐसें सांवळेनि परब्रह्में । तेणें भक्तकामकल्पद्रुमें । बोलिलें श्रीआत्मारामें । संजयो ह्मणे ॥ २१ ॥ अहो ऐकिजत असे कीं अवधारा । तंव इया बोला निवांत ह्मातारा । जैसा म्हैसा नुवी कां पुरा । तैसा उगाचि असे ॥ २२ ॥ तेथ संजयें माथा तुकिला । अहो अमृताचा पाउस वर्षला । कीं हा एथ असतुचि गेला । सेजियाँ गांवा ॥ २३ ॥ तर्‍ही दातार हा आमुचा । ह्मणोनि हें बोलतां मैळेल वाचा । काय कीजे ययाचा । स्वभावचि ऐसा ॥ २४ ॥ परि बाप भाग्य माझें । जे वृत्तांत सांगावयाचेनि व्याजें । कैसा रक्षिलों मुनिराजें । श्रीव्यासदेवें ॥ २५ ॥ येतुलें हें वाँड सायसें । जंव बोलत असे दृढमानसें । तंव न धरवेचि आपुलिया ऐसें । सात्त्विकें केलें ॥ २६ ॥ चित्त चाकाटलें आंकुवेत । वाचा पांगुळली जेथिंची तेथ । आपादकंचुकित । रोमांच आले ॥ २७ ॥ अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनंदजळें । आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे ॥ २८ ॥ पैं आघवाचि रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळी । लेइला मोतियांची कडियाळीं । आवडे तैसा ॥ २९ ॥ ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ आटणी हों पाहे जीवदशे । तेथ निरोपिलें

---

१ बायला, वेगळा. २ जिच्या योगानें. ३ अनुलक्षानें. ४ माझें यजन करणारा. ५ निर्मळ. ६ माझ्या योगानें संपन्न. ७ चोरून ठेवलेलें. ८ राहासी. ९ भक्तांच्या इच्छा पुरविणाऱ्या कृष्णानें. १० स्वस्वरूपीं रममाण होणाऱ्या श्रीकृष्णानें. ११ टोणगा. १२ नदीच्या पुरांतून. १३ शेजारच्या गांवीं. १४ धनी. १५ दूषित होईल. १६ मिमित्तानें. १७ मोठें. १८ दृढनिश्चयांत. १९ आपणाला. २० गढून गेलें. २१ संकोच, आटणी. २२ नखशिखांत आंगरख्यासारखे. २३ अर्धे उघडे. २४ घामाचे बारीक कण. २५ माळा. २६ आकुंचन, हानि.

ध्यासें । तें नेदीचि हों ॥ ५३० ॥ आणिक श्रीकृष्णाचें बोलणें । घोंकरी[2] आलें श्रवणें । कीं देहस्मृतीचा तेणें । वापसा[3] केला ॥ ३१ ॥ तेव्हां नेत्रींचें जळ विसर्जी[4] । सर्वांगींचा स्वेद परिमार्जी[5] । तेवींचि अवधारा ह्मणे होजी । धृतराष्ट्रातें ॥ ३२ ॥ आतां श्रीकृष्णवाक्यबीजनिवाड । आणि संजय सात्विकाचा बिवड[6] । ह्मणोनि श्रोतया होईल सुरवाड[7] । प्रमेयपिकाचा[8] ॥ ३३ ॥ अहो अळुमाळ[9] अवधान देयावें । येतुलेनि आनंदाचे राशीवरी बैसावें । बाप श्रवणेंद्रियां दैवें । घातली माळ ॥ ३४ ॥ ह्मणोनि विभूतींचा[10] जो ठावो । अर्जुना दावील सिद्धांचा रावो । तो ऐका ह्मणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ॥ ५३५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

श्लोक ३४, ओंव्या ५३५.

---

## अध्याय १० वा.

नमो विशद[11]बोधविदग्धा । विद्या[12]रविंदप्रबोधा । पराप्रमेयप्रमदा । विलासिया[13] ॥ १ ॥ नमो संसारतमसूर्या । अपरिमितपरमवीर्या । तरुणतर[14]तूर्या । लालनलीला ॥ २ ॥ नमो जगदखिलपालना । मंगळमणिनिधाना । सज्जनवनचंदना । आराध्यलिंगा ॥ ३ ॥ नमो चतुरचित्तचकोरचंद्रा । आत्मानुभवनरेंद्रा । श्रुतिसारसमुद्रा । मन्मथमन्मथा[15] ॥ ४ ॥ नमो सुभावभजना । भवेभकुंभ[16]भंजना । विश्वोद्भव[17]भुवना । श्रीगुरुराया ॥ ५ ॥ तुमचा अनुग्रहो गणेश । जैं आपुला दे सौरसें[18] । तैं सारस्वतीं[19] प्रवेश । बाळकाही आथि ॥ ६ ॥ जी दैविकी[20] उदार वाचा । जैं उद्देश दे नाभिकाराचा[21] । तैं नवरससुधाब्धीचा । थाव[22] लाभे ॥ ७ ॥ जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी[23] । जरी मुकियातें अंगीकारी । तो वाचस्पतीसीं करी । प्रबंधहोडा[24] ॥ ८ ॥ हें असो दिठी[25] जयावरी झळके । कीं हा पद्मकर माथां पैठे[26] । तो जीवचि परि तुके[27] । महेशेंसीं ॥ ९ ॥ एवढें जिये महिमेचें करणें । ते वाचाबळें वानूं मी कवणें । कां सूर्याचिया आंगा उटणें[28] । लागत असे ॥ १० ॥ कोउता[29] कल्प-

---

१ होऊं देईना. २ झट्कर. ३ वाफ आलेली भूमि. ४ पुसी, टाकी. ५ पुसी. ६ खत. ७ आनुकूल्य. ८ सिद्धांताचा. ९ किंचित्. १० ईश्वरमूर्तीचीं स्थलें. ११ स्पष्ट बोध करण्याविषयीं कुशल. १२ विद्या हेंच कमळ त्याला विकासविणारा. १३ प्रकृति कीशीं विलास करणारा. १४ अत्यंत तरुण तुर्येचें लालन हीच ज्याची लीला. १५ मदनाचें मंथन करणारा. १६ संसारगजाचें गंडस्थळ फोडणारा. १७ जगदुत्पत्तिस्थान. १८ प्रसाद. १९ सर्व विद्यांत. २० गुरूची. २१ अभयाच्या. २२ थांग. २३ सरस्वती. २४ ग्रंथ करण्याची प्रतिज्ञा. २५ दृष्टी. २६ स्थीर होणें. २७ साम्य पावे. २८ लेप, रंग. २९ कोठून.

तरुवरी फुलौरा[1]। कायसेनि पाहुणेर क्षीरसागरा। कवणे वासीं कापुरा। सुवास देवों ॥ ११ ॥ चंदनातें कायसेनि चर्चावें[2]। अमृतातें केउतें रांधावें। गगनावरी उभवावें[3]। घडे केविं ॥ १२ ॥ तैसें श्रीगुरूचें महिमान। आकळितें कें[4] असे साधन। हें जाणोनियां नमन। निवांत केलें ॥ १३ ॥ जरी प्रज्ञेचेनि भाग्यिलेपणें[5]। श्रीगुरु सामर्थ्यरूप करूं म्हणे। तरि तें मोतियां भिंग[6] देणें। तैसें होईल ॥ १४ ॥ कां सांडेपंधरया[7] रजतवणी[8]। तैसीं स्तुतीचीं बोलणीं। उगियाचि माथा ठेविजे चरणीं। हेंचि भलें ॥ १५ ॥ मग म्हणितलें जी स्वामी। भलेनि ममत्वें देखिला तुम्ही। म्हणोनि कृष्णार्जुनसंगमीं। प्रयागवट[9] जाहालों ॥ १६ ॥ मागां दूध दे म्हणितलियासाठीं। आघविया क्षीराब्धीची करूनि वाटी। उपमन्यूपुढें धूर्जटी[10]। ठेविली जैसी ॥ १७ ॥ ना तरी वैकुंठपीठनायकें। रुसला ध्रुव कवतिकें। बुझाविला[11] देऊनि भातुकें[12]। ध्रुवपदाचें ॥ १८ ॥ तैसी जे ब्रह्मविद्यारावो[13]। सकळशास्त्रांचा विसंवैता[13] ठावो। ते भगवद्गीता वोंविये गावों। ऐसें केलें ॥ १९ ॥ जे बोलणियाचे रानीं हिंडतां। नायकीजे फळलिया अक्षराची वार्ता। परि ते वाचाचि केली कल्पलता। विवेकाची ॥ २० ॥ होती देहबुद्धी एकसरी। ते आनंदभांडारा केली वोवरी। मन गीतार्थक्षीरसागरीं। जळशयन जालें ॥ २१ ॥ ऐसें एकेक देवाचें करणें। तें अपार बोलों केविं मी जाणें। तऱ्ही अनुवादलों[14] धीटपणें। तें उपसाहिजो[15] जी ॥ २२ ॥ आतां आपुलेनि कृपाप्रसादें। मियां भगवद्गीता वोवीप्रबंधें। पूर्वखंड[16] विनोदें। वाखाणिलें ॥ २३ ॥ प्रथमीं अर्जुनाचा विषाद। दुजीं बोलिला योग विशद[17]। परि सांख्यबुद्धीसि भेद। दाऊनियां ॥ २४ ॥ तिजीं केवळ कर्म प्रतिष्ठिलें। तेंचि चतुर्थीं ज्ञानेसीं प्रगटिलें। पंचमीं गव्हरिलें[18]। योगतत्त्व ॥ २५ ॥ तेंचि षष्ठामाजि प्रगट। आसनालागोनि स्पष्ट। जीवात्मभाव एकवट। होती जेणें ॥ २६ ॥ तैसी जे योगस्थिती। आणि योगभ्रष्टां जे गती। ते आघवीचि उपपत्ती[19]। सांगीतली षष्ठीं ॥ २७ ॥ तयावरी सप्तमीं। प्रकृतिपरिहार उपक्रमीं[20]। भजती जे पुरुषोत्तमीं। ते बोलिले चौऱ्ही[21] ॥ २८ ॥ पाठीं सप्त प्रश्नसिद्धी। बोलोनि प्रयाणसमयशुद्धी। एवं सकळवाक्यावधि। अष्टमाध्यायीं ॥ २९ ॥ मग शब्द[22]ब्रह्मीं असंख्याकें। जेतुला कांहीं अभिप्राय पिके। तेतुला महाभारतें एकें। लक्षें[23] जोडे ॥ ३० ॥ तिये आघवाचि जें महाभारतीं। तें लाभे कृष्णार्जुनवचनोक्तीं। आणि जो अभिप्रावो गीते सातेंशतीं। तो एकलाचि नवमीं ॥ ३१ ॥ म्हणोनि नवमींचिया

---

१ फुलांचा भर. २ लेप करावा. ३ उंच करावें. ४ कोठें. ५ भाग्यत्वानें. ६ अभ्रकाचें पुट देणें. ७ उत्तम सोन्याला. ८ रुप्याचें पाणी, मुलामा. ९ कृष्णार्जुनसंवाद हाच प्रयाग तो प्राप्त झालों. १० शंकरानें. ११ समजाविला. १२ खाऊ. १३ विश्रांतिस्थान. १४ बोललों. १५ क्षमा करावी. १६ पूर्वार्ध. १७ स्पष्ट. १८ गौरविलें. १९ प्रतिपादन. २० आरंभीं. २१ चारी. २२ वेदान्तांत. २३ लक्षानें.

अभिप्राया । सहसा मुद्रा लावावया । बिहाला वेद मग मी वायां । गर्व कां करूं ॥ ३२ ॥ अहो मुळा साखरे मौलयाचे । बांधे तरि एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आन आन जैसे ॥ ३३ ॥ एक जाणोनियां बोलती । एक ठायेंठाय जाणविती । एक जाणों जातां हारपती । जाणते गुणेसीं ॥ ३४ ॥ हे ऐसे अध्याय गीतेचे । परि अनिर्वाच्यपण नवमाचें । तो अनुवादलों हें तुमचें । सामर्थ्य प्रभू ॥ ३५ ॥ अहो एकाचि शाटी तपिन्नली । एकीं सृष्टीवरि सृष्टि केली । एकीं पाषाणीं वाऊनि उतरलीं । समुद्रीं कटकें ॥ ३६ ॥ एकीं आकाशीं सूर्यातें धरिलें । एकीं चुळींचि सागरातें भरिलें । तैसें मज मुकयाकरवीं बोलविलें । अनिर्वाच्या तुह्मी ॥ ३७ ॥ परि हें असो एथ ऐसें । श्रीराम रावण झुंझिनले कैसें । श्रीराम रावण जैसे । मीनले समरीं ॥ ३८ ॥ तैसें नवमीं कृष्णाचें बोलणें । तें नव मीचियाचि ऐसें मी ह्मणें । या निवाडा तत्त्वज्ञ जाणे । जया गीतार्थ हातीं ॥ ३९ ॥ एवं नवही अध्याय पहिले । मियां मतीसारिखे वाखाणिले । आतां उत्तरखंड उपाइलें । ग्रंथाचें ऐका ॥ ४० ॥ जेथ विभूतीप्रतिविभूती । प्रस्तुत अर्जुना सांगिजती । ते विदग्धा रसवृत्ती । ह्मणिपैल कथा ॥ ४१ ॥ देशियेचेनि नागरपणें । शांत शृंगारातें जिणें । तरि वोंविया होती लेणें । साहित्यासी ॥ ४२ ॥ मूळग्रंथींचिया संस्कृता । वरि मऱ्हाटी नीट पाहातां । अभिप्राय मानलिया चित्ता । कवण भूमी हें न चोजवे ॥ ४३ ॥ जैसें आंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें । तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ४४ ॥ तैसी देशी आणि संस्कृतवाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ॥ ४५ ॥ उठावलिया भावारूप । करितां रसवृत्तीचें लागे वेडप । चातुर्य ह्मणे पैडप । जोडलें आह्मां ॥ ४६ ॥ तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि रसां आणिलें तारुण्य । मग रचिलें अगण्य । गीतातत्त्व ॥ ४७ ॥ जो चराचरपरमगुरु । चतुरचित्तचमत्कारु । तो ऐका यादवेश्वरु । बोलता जाहला ॥ ४८ ॥ ज्ञानदेव निवृत्तीचा ह्मणे । ऐसें बोलिलें श्रीहरी तेणें । अर्जुना आघवियाचि मौतु अंतःकरणें । धडौतो आहासी ॥ ४९ ॥

श्रीभगवानुवाच—भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।
यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥

आह्मी मागील जें निरूपण केलें । तें तुह्मीं अवधानचि पाहिलें । तंव टांचें नव्हे भलें ।

---

१ स्पष्ट सांगण्यास. २ झाला. ३ ढेपींचें. ४ भिन्नभिन्न. ५ ठिकाणोठिकाणीं. ६ वज्र. ७ वानरसमूह. ८ वाणीला अगम्य ब्रह्म. ९ मी नवा. १० यथामति. ११ आरंभिलें. १२ सुंदर. १३ जिंके. १४ निवडत नाहीं. १५ आवडीनें. १६ आश्रय. १७ प्रतिष्ठा. १८ पोशिला. १९ धड, ग्रहणास पात्र. २० परीक्षा. २१ अपुरें.

अभिप्राया । सहसा मुद्रा लावावया । बिहाला वेद मग मी वायां । गर्व कां करूं ॥ ३२ ॥ अहो मुळा साखरे मालयाचे । बांधे तरि एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आन आन जैसे ॥ ३३ ॥ एक जाणोनियां बोलती । एक ठायेंठाय जाणविती । एक जाणों जातां हारपती । जाणते गुणेसीं ॥ ३४ ॥ हे ऐसे अध्याय गीतेचे । परि अनिर्वाच्यपण नवमाचें । तो अनुवादलों हें तुमचें । सामर्थ्य प्रभू ॥ ३५ ॥ अहो एकाचि शाटी तपिन्नली । एकीं सृष्टीवरि सृष्टि केली । एकीं पाषाणीं वाऊनि उतरलीं । समुद्रीं कँटकें ॥ ३६ ॥ एकीं आकाशीं सूर्यातें धारिलें । एकीं चुळींचि सागरातें भरिलें । तैसें मज मुकयाकरवीं बोलविलें । अनिर्वाच्या तुह्मी ॥ ३७ ॥ परि हें असो एथ ऐसें । श्रीराम रावण झुंझिनले कैसें । श्रीराम रावण जैसे । मीनले समरीं ॥ ३८ ॥ तैसें नवमीं कृष्णाचें बोलणें । तें नव मीचियाचि ऐसें मी ह्मणे । या निवाडा तत्त्वज्ञ जाणे । जया गीतार्थ हातीं ॥ ३९ ॥ एवं नवही अध्याय पहिले । मियां मतीसारिखे वाखाणिले । आतां उत्तरखंड उपाइलें । ग्रंथाचें ऐका ॥ ४० ॥ जेथ विभूतीप्रतिविभूती । प्रस्तुत अर्जुना सांगिजती । ते विदग्धा रसवृत्ती । ह्मणिपैल कथा ॥ ४१ ॥ देशियेचेनि नागरपणें । शांत शृंगारातें जिणें । तरि वोंविया होती लेणें । साहित्यासी ॥ ४२ ॥ मूळग्रंथींचिया संस्कृता । वरि मऱ्हाटी नीट पाहातां । अभिप्राय मानलिया चित्ता । कवण भूमी हें न चोजवे ॥ ४३ ॥ जैसें आंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें । तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ४४ ॥ तैसी देशी आणि संस्कृतवाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ॥ ४५ ॥ उदयलिया भावारूप । करितां रसवृत्तीचें लागे वेंडप । चातुर्य ह्मणे पैंडप । जोडलें आह्मां ॥ ४६ ॥ तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि रसां आणिलें तारुण्य । मग रचिलें अगण्य । गीतातत्त्व ॥ ४७ ॥ जो चराचरपरमगुरु । चतुरचित्तचमत्कारु । तो ऐका यादवेश्वरु । बोलता जाहाला ॥ ४८ ॥ ज्ञानदेव निवृत्तीचा ह्मणे । ऐसें बोलिलें श्रीहरी तेणें । अर्जुना आघवियाचि मीतू अंतःकरणें । धडौतो आहासी ॥ ४९ ॥

**श्रीभगवानुवाच–भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥**

आह्मी मागील जें निरूपण केलें । तें तुझें अवधानचि पाहिलें । तंव टांचें नव्हे भलें ।

१ स्पष्ट सामंजस्य. २ झाला. ३ ढेपींचें. ४ भिन्नभिन्न. ५ ठिकाणोठिकाणीं. ६ वज्र. ७ वानरसमूह. ८ वाणीला अगम्य ब्रह्म. ९ मी नवा. १० यथामति. ११ आरंभिलें. १२ सुंदर. १३ जिंके. १४ निवडत नाहीं. १५ आवडीनें. १६ आश्रय. १७ प्रतिष्ठा. १८ मोठीला. १९ धड, म्हणास पात्र. २० परीक्षा. २१ अपुरें.

पुरतें आहे ॥ ५० ॥ घटीं थोडेंसें उदक घालिजे । तेणें न गळे तरी वरिना भरिजे । ऐसा परिसौनि पाहिलासि तंव परिसविजे । ऐसेंचि होतसे ॥ ५१ ॥ अबचित यावरी सर्व सांडिजे । मग चोख तरी तोचि भांडारी कीजे । तैसा किरीटी तूं आतां माझें । निज-धाम कीं ॥ ५२ ॥ ऐसें अर्जुना येउतें सर्वेश्वरें । पाहोनि बोलिलें अत्यादरें । गिरी देखोनि [1]सुभरे । मेघ जैसा ॥ ५३ ॥ तैसा कृपाळुवांचा रावो । ह्मणे आइकें गा महा-बाहो । सांगितलाचि अभि[3]प्रावो । सांगेन पुढती ॥ ५४ ॥ पैं प्रतिवर्षीं [4]क्षेत्र पेरिजे । [5]पिकाची जरी वाढी देखिजे । यालागीं [6]नुबगिजे । [7]वाहो करितां ॥ ५५ ॥ [8]पुढतपुढती पुटें देतां । जोडे [9]वानियेची अधिकता । ह्मणोनि सोनें पांडुसुता । [10]शोधूंचि आवडे ॥ ५६ ॥ तैसें एथ पार्था । तुज [11]ओभार नाहीं सर्वथा । आह्मीं आपुलियाचि स्वार्था । बोलों पुढती ॥ ५७ ॥ जैसें बाळका लेवविजे [12]लेणें । [13]तैयाप्रमाणें बाळ काइ जाणे । परि ते सुखाचे सोहळे भोगणें । माउलिये दिठी ॥ ५८ ॥ तैसें तुझें हित आघवें । जंव जंव कां तुज [14]फावे । तंव तंव आमुचें सुख दुणावे । ऐसें आहे ॥ ५९ ॥ आतां अर्जुना असो हे [15]विकोडी । मज उघड तुझी आवडी । ह्मणोनि तृप्तीची [16]सवडी । बोलतां न पडे ॥ ६० ॥ आह्मा येतुलि[17]यांचि कारणें । तेंचि तें तुजशीं बोलणें । परि असो हें अंतःकरणें । अव-धान देईं ॥ ६१ ॥ तरी एकें एकें गा [18]सुवर्म । वाक्य माझें परम । जें अक्षरें लेऊनि पर-ब्रह्म । तुज [19]खेवांसि आलें ॥ ६२ ॥ परि किरीटी तूं मातें । नेणसी ना [20]निरुतें । तरि तो गा जो मी एथें । तें विश्वचि हें ॥ ६३ ॥

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥**

एथ वेद मुके जाहाले । मन [21]पवन पांगुळले । रातीविण मावळले । रविशशी ॥ ६४ ॥ अगा उदरींचा गर्भ जैसा । न देखे आपुलिये मायेची [22]वयसा । मी [23]आघवेया देवां तैसा । नेणवे कांहीं ॥ ६५ ॥ आणि जळचरां उदधीचें मान । [24]मशका नोलांडवेचि गगन । तैवि महर्षींचें ज्ञान । न देखेचि मातें ॥ ६६ ॥ मी कवण पां [25]केतुला । कवणाचा कै जाहाला । या [26]निर्णती करितां बोला । कल्प गेले ॥ ६७ ॥ कां जे महर्षी आणि या देवां । येरां [27]भूतजातां सर्वां । मीचि आदि ह्मणोनि पांडवा । अवघड जाणतां ॥ ६८ ॥ उत-रलें उदक पर्वत [28]वळघे । जरी झाड वाढत मुळीं लागे । तरी [29]मियां जालेनि जगें ।

१ नकळत. २ भरून येतो. ३ गुह्य. ४ शेत. ५ वृद्धि. ६ न कंटाळावें. ७ लाभवड. ८ वरचेवर. ९ रंगाची. १० शुद्ध करणें. ११ भार. १२ अलंकार. १३ त्याप्रमाणें. १४ समजे. १५ चातुर्याचें भाषण. १६ शेवट. १७ प्रवळ्याकरितांच. १८ रहस्य, अत्यंत मार्मिक. १९ आलिं-गनास. २० खरें. २१ वारा. २२ वय. २३ सर्व. २४ माशीला. २५ केवढा. २६ निश्चय. २७ सगळे प्राणी. २८ आश्रय करी. २९ माझ्यापासून झालेल्या जगानें.

जाणिजे मातें ॥ ६९ ॥ कां गौभेवनें वट गिंवसवे । जरी तरंगीं सागर सांठवे । कां परमाणुमाजी सामावे । भूगोळ हा ॥ ७० ॥ तरि मियां जाल्यिा जीवां । महर्षी अथवा देवां । मातें जाणावया होआवा । अवकाश गा ॥ ७१ ॥ ऐसाही जरी वि-पैायें । सांडूनि पुढील पाये । सर्वेंद्रियांसि हांये । पाठिमोरा जो जो ॥ ७२ ॥ प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडूनि मागलीकडे । महाभूतांचिया चढे । मायथावरी ॥ ७३ ॥

**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥**

तेथ राहोनि ठायठिकें । स्वप्रकाशें चोखें । अजत्व माझें देखे । आपुलिया डोळां ॥ ७४ ॥ मी आदिसीं पर । सकळ लोकमहेश्वर । ऐसिया मातें जो नर । यापरी जाणे ॥ ७५ ॥ तो पाषाणामाजि परिस । जैसा रसाआंत सिद्धरस । तैसा मनुष्याआंत तो अंश । माझाचि जाण ॥ ७६ ॥ तें चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ । येर माणुसपण तें भांब । लौकिक भाग ॥ ७७ ॥ अगा अवचितां कां पुरा । माजि सांपडला हिरा । वरि पडिलिया नीरा । नीगवे कांहीं ॥ ७८ ॥ तैसा मनुष्यलोकाआंत । तो जरी जाहाला प्राकृत । तऱ्ही प्रकृतिदोषाची मात । नेणेचि कीं ॥ ७९ ॥ तो आपभयेंचि सांडिजे पापीं । जैसा जळत चंदन सर्पी । तेवि मातें जाणे तो संकल्पीं । वर्जूनि घापे ॥ ८० ॥ तेंचि आमुतें कैसें जाणिजे । ऐसें कल्पी जरी चित्त तुझें । तरी मी ऐसा हे माझे । भाव ऐकें ॥ ८१ ॥ जे वेगळालिया भूतीं । सारिखे होऊनि प्रकृती । विखुरले आहेति त्रिजगतीं । आघवियें ॥ ८२ ॥

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवो भावो भयं चाऽभयमेव च ॥ ४ ॥**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥**

तेथ प्रथम जाण बुद्धी । मग ज्ञान जें निरवधी । असंमोह सहनसिद्धी । क्षमा सत्य ॥ ८३ ॥ मग शम दम दोन्ही । सुखदुःख वर्तत जनीं । अर्जुना भवाभाव मानीं । भावाचि-

१ बीजांतील अंकुर. २ झांकवे. ३ कदाचित्. ४ बाह्यप्रवृत्ति. ५ जितेंद्रिय. ६ मागें फिरे. ७ ठिकाणचे ठिकाणीं स्थिर. ८ उत्तम, निर्मळ. ९ सर्वश्रेष्ठ. १० अमृत. ११ भ्रम. १२ न आटोपे. १३ साधारण. १४ स्वभयानें. १५ कल्पना टाकतात. १६ घातला जातो. १७ तर मी असा आहें कीं. १८ धर्म. १९ पसरले. २० निःसीम. २१ मोह नसणें. २२ सहनशीलता. २३ मनोनिग्रह. २४ इंद्रियनिग्रह. २५ जन्म व नाश.

माजी ॥ ८४ ॥ पैं[1] भय आणि निर्भयता । अहिंसा आणि समता[2] । तुष्टि[3] तप पांडुसुता । ओळख तूं ॥ ८५ ॥ अगा दान यश अपकीर्ती । हे जे भाव सर्वत्र दिसती । ते मजचिपासूनि होती । भूतांचियाठायीं ॥ ८६ ॥ जैसीं भूतें आहाती सिनानीं[4] । तैसेचि हेही वेगळाले मानीं । एक उपजती[5] माझ्या ज्ञानीं । एक नेणती मातें ॥ ८७ ॥ प्रकाश आणि कडवसें[6] । हें सूर्याचिस्तव[7] जैसें । प्रकाश उदयीं दिसे । तम अस्तुसीं[8] ॥ ८८ ॥ आणि माझें जाणणें नेणणें । तें तंव भूतांचिया भावांचें करणें । म्हणोनि भूतीं भावाचिया होणें । विषम[9] पडे ॥ ८९ ॥ यापरी माझिया भावीं । हे जीवसृष्टि आहे आघवी । गुंतली असे जाणावी । पांडुकुमरा ॥ ९० ॥ आतां इये जे सृष्टीचे पालक । जयां आधीन वर्तती लोक । ते अकरा भाव आणिक । सांगेन तुज ॥ ९१ ॥

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥**

तरी आघवाचि[11] गुणीं वृद्ध । जे महर्षीमाजि प्रबुद्ध[12] । कश्यपादि प्रसिद्ध । सप्त ऋषी गा ॥ ९२ ॥ आणीकही सांगिजतील । जे कां चौदा आंतुल[13] मुख्य[14] । स्वयंभूमुख्य[15] वडिल । चारी मनु ॥ ९३ ॥ ऐसे हे अकरा । माझ्या मनीं[16] जाहाले धनुर्धरा । सृष्टीचिया व्यापारा । लागोनियां ॥ ९४ ॥ जैं लोकांची व्यवस्था न पडे । जैं या त्रिभुवनाचें कांहीं न माडे । तैं महाभूतांचें वेळवाडें[17] । अचुंबित[18] असे ॥ ९५ ॥ तैंचि हे जाहाले । मग इहीं लोक केले । तेथ अध्यक्ष[19] रचूनि ठेविले । इहीं जन ॥ ९६ ॥ म्हणोनि अकराही हे राजा । मग येर जग यांचिया प्रजा । एवं विश्वविस्तार हा माझा । ऐसेंचि जाण ॥ ९७ ॥ पाहें पां आरंभीं बीज एकलें । मग तेंचि विरूढलिया[20] बुड जाहालें । बुडीं कोंभ निघाले । खांदियांचे ॥ ९८ ॥ खांदियांपासूनि अनेका । फुटलिया नाना शाखा । शाखांस्तव देखा । पल्लव पानें ॥ ९९ ॥ पल्लवीं फूल फळ । एवं वृक्षत्व जाहालें सकळ । तें निर्धारितां[21] केवळ । बीजचि आघवें ॥ १०० ॥ तैसें[22] मी एकाचि पहिलें । मग मी[22] तेंचि मनातें व्यालें । तेथ सप्तऋषी आणि जाहाले । चारी मनु ॥ १ ॥ इहीं लोकपाळ केले । लोकपाळीं विविध लोक सृजिले[23] । लोकांपासूनि निपजलें । प्रजाजात ॥ २ ॥ ऐसेनि हें विश्व येथें । मीचि विस्तारिलोंसें निरुतें । परि भावाचेनि[24] हातें । मानें[25] जया ॥ ३ ॥

---

१ परंतु. २ ऐक्यबुद्धि. ३ संतोष. ४ निरनिराळीं. ५ उत्पन्न होतात. ६ अंधार. ७ सूर्यापासूनच. ८ अस्तमानीं. ९ आस्तिक बुद्धी. १० कठीण. ११ सर्व. १२ ज्ञाते. १३ मध्यें. १४ श्रेष्ठ. १५ या नांवाचा मनु. १६ मनापासून. १७ समुदाय. १८ अस्पष्ट. १९ श्रेष्ठ. २० अंकुर आल्यावर. २१ निश्चयितां. २२ तसें मी, हें पहिलें, त्या मीपासून मन, ब्रह्मदेव, त्यापासून सप्तऋषि इत्यादि. २३ उत्पन्न केले. २४ भावाच्या योगानें. २५ मानतें.

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।**
**सोऽविकंपेन योगेन युज्यते नाऽत्र संशयः ॥ ७ ॥**

यालागीं सुभद्रापती । हे भाव इया माझिया विभूती । आणि यांचिया व्याप्ती । व्यापिलें जग ॥ ४ ॥ ह्मणोनि गा यापरी । ब्रह्मादिपिपीलिकावरी[1] । मीवांचूनि दुसरी । गोष्टीच नाहीं ॥ ५ ॥ ऐसें जाणे जो साचें । तया चेयिरें[2] जाहालें ज्ञानाचें । ह्मणोनि उत्तमाधमभेदाचें । स्वप्न न देखे ॥ ६ ॥ मी माझिया विभूती । विभूतीं अधिष्ठिलिया व्यक्ती । हें आघवें योगप्रतीती[3] । एकचि मानी ॥ ७ ॥ ह्मणोनि निःशंकें येणें महायोगें । मज मीनलें[4] मनाचेनि आंगें[5] । एथ संशय करणें न लगे । तो त्रिशुद्धी[6] जाहाला ॥ ८ ॥ का जे ऐसें किरीटी । मातें भजे जो अभेदाँ[7] दिठी । तयाचिये भजनाचे नाटीं[8] । मीचि लाभें ॥ ९ ॥ ह्मणऊनि अभेदें जो भक्तियोग । तेथ शंका नाहीं नये खंग[9] । करितां ठेलीं[10] तरी चांग । तें सांगीतलें षष्ठीं[11] ॥ ११० ॥ तोचि अभेद कैसा । हें जाणावया मानसा । सादर जालां तरी परियेसा । बोलिजेल ॥ ११ ॥

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥**

तरि मीचि एक सर्वां । या जगा जन्म[12] पांडवा । आणि मजचिपासूनि आघवा । निर्वाह यांचा ॥ १२ ॥ कल्लोळमाळा[13] अनेगा । जन्म जळींचि पैंगा । आणि तया जळचि आश्रय तरंगा । जीवनहीं जळ ॥ १३ ॥ ऐसें आघवांचि ठायीं । तयां जळाचि जेवि पाहीं । तैसा मीवांचूनि नाहीं । विश्वीं इये ॥ १४ ॥ ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेथें । परि सोंचोकारें[14] उदितें । प्रेमभावें ॥ १५ ॥ देश काळ वर्तमान । आघवें मजसीं करूनि अभिन्न । जैसा वायू होऊनि गगन । गगनींचि विचरे ॥ १६ ॥ ऐसेनि जे निजज्ञानी[15] । खेळत सुखें त्रिभुवनीं । जगद्रूपा मनीं । सांठऊनि मातें ॥ १७ ॥ जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत । हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ॥ १८ ॥

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ।**
**कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥**

चित्तें मीचि जाहाले । मियेंचि प्राणें धाले । मग जीवों मरों विसरले । बोधाचिया

---

१ मुंगीपर्यंत. २ जागृति. ३ योगबलानें. ४ मिळाले. ५ मनाच्या योगानें. ६ सिद्ध झाला. ७ अभेद बुद्धीनें. ८ ठिकाणीं. ९ प्रतिबंध. १० अपरा राहिला. ११ अ० ६ व्यांत. १२ उत्पादक. १३ लाटा. १४ खऱ्या उत्कंठेनें. १५ आत्मज्ञानी.

भुली ॥ १९ ॥ मग तया बोधाचेनि माजें । नाचती संवाद सुखांची भोजें[2] । आतां एकमेकां घेपे दीजे । बोधचि वरी ॥ १२० ॥ जैसीं जवळिकेचीं सरोवरें । उचंबळलियां कालवती परस्परें । मग तरंगासी धवळारें[3] । तरंगचि होती ॥ २१ ॥ तैसी येरयेरांचिये मिळणी । पडत आनंदकल्लोळांची वेणी । तेथें बोधबोधांचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ॥ २२ ॥ जैसें सूर्यें सूर्यातें वोंवाळिलें । कीं चंद्रें चंद्रम्या क्षेमें[4] दीधलें । ना तरीं सरिसेनि पांडें[5] मिनले । दोनी वोघ ॥ २३ ॥ तैसें प्रयाग होत सामरस्याचें[6] । वरी वोसाण[7] तरत सात्विकाचें । ते संवादचतुष्पथींचे[8] । गणेश जाहाले ॥ २४ ॥ तेव्हां तया महासुखाचेनि भरें । धांवोनि देहाचिये गांवांबाहेरें । मियां धाले तेणें उद्गारें । लागती गाजों ॥ २५ ॥ पैं[9] गुरुशिष्याचिया एकांतीं । जे अक्षरा एकाचि वदंती[10] । ते मेघाचियापरी त्रिजगती । गर्जती सैंघें[11] ॥ २६ ॥ जैसी कमलकळिका जालेपणें । हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे । दे राया रंका पारणें । आमोदाचें[12] ॥ २७ ॥ तैसेंचि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथूं विसरत । मग तया विसरामाजि विरतें[13] । आंगें जीवें ॥ २८ ॥ ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें[14] । नाहीं रात्री दिवो[15] जाणणें । केलें माझें सुख अव्यंगवाणें[16] । आपणपेयां जिहीं ॥ २९ ॥

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १० ॥**

तयां मग जें आह्मी कांहीं । द्यावें अर्जुना पाहीं । ते ठांयिचीच[17] तिहीं । घेतली सेलें[18] ॥ १३० ॥ कां जे ते जिया वाटा । निगाले गा सुभटा । ते[19] सोय पाहोनि अव्हांटा । स्वर्गापवर्ग ॥ ३१ ॥ ह्मणोनि तिहीं जें प्रेम धरिलें । तेंचि आमुचें देणें उपाइलें[20] । परि आह्मी देयावें तेहीं केलें । तिहीं ह्मणियें ॥ ३२ ॥ आतां यावरी येतुलें घडे । जे तेंचि सुख आगळें[21] वाढे । आणि काळाची दृष्टी न पडे । हें आह्मां करणें ॥ ३३ ॥ लळेयाचिया बाळका किरीटी । गवसणी करूनि स्नेहाचिया दिठी । जैसी खेळतां पाठोपाठीं । माउली धांवे ॥ ३४ ॥ तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनयाचा[22] करूनि ठेवी । तैसी उपास्तीची[23] पदवी[24] । पोषित मी जायें ॥ ३५ ॥ जिये पदवीचेनि पोषकें । ते मातें पावती यथासुखें[25] । हे पाळिती[26] मज विशेखें । आवडे करूं ॥ ३६ ॥ पैं गा भक्तासि माझें कोडें[27] ।

---

१ माजवणारें. २ संतोष. ३ चुनेगची घरें. ४ आलिंगन. ५ योग्यतेनें. ६ एकत्वाचें. ७ पुरांतील लांकडें, केरकचरा. ८ चव्हाट्यावरचे. ९ गुरु शिष्यास एकच अक्षर गुप्तपणें सांगतात. हे मेघासारखी गर्जना करितात. १० वचन. ११ पुष्कळ. १२ सुगंधाचे. १३ रममाण होतो. १४ आधिक्यानें. १५ दिवस. १६ पूर्ण. १७ त्या ठिकाणचीच. १८ उत्तम वाट. १९ तो मार्ग पाहिला असतां स्वर्ग व मोक्ष आडवाटाशा वाटतील. २० उत्पन्न झालें. २१ अधिक. २२ गोजिरवाणा, उत्तम. २३ उपासनेची. २४ मार्ग. २५ थोडच्या श्रमानें. २६ राखण. २७ कौतुक.

मज तया अनन्यगतीची चाड । कां जे प्रेमळाचें सांकड । आमुचिया घरीं ॥ ३७ ॥ पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले[2] । दोन्ही मार्ग तयांचिये वाहणी[3] केले । आह्मी आंगही शेखीं वेचिलें । लक्ष्मियेसि[4] ॥ ३८ ॥ परि आपणपेंवीण[5] जें एक । तें तैसेंचि सुख साजुक । सप्रेमालागिं देख । ठेविलें जतन ॥ ३९ ॥ हा ठायवरी किरीटी । आह्मीं प्रेमळ घेवों आपण यासाठीं । या बोलीं बोलाविया गोष्टी । तैसिया नव्हती गा ॥ १४० ॥

**तेषामेवाऽनुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।**

**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥**

ह्मणोनि मज आत्मयाचा भाव । जिहीं जियाविया[7] केला ठाव । एक मीवांचूनि वाव[8] । येर मानिलें ॥ ४१ ॥ तयां तत्वज्ञान चोखटा । दिवी पोतासाची[9] सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें ॥ ४२ ॥ अज्ञानाचिये राती- । माजि तमाची मिळणी[10] दाटती । ते नाशूनि घालीं परौती[11] । तयां करीं नित्योदय ॥ ४३ ॥ ऐसें प्रेमळाचेनि प्रियोत्तमें । बोलिलें जेथ पुरुषोत्तमें । तेथ अर्जुन मनोधर्में । निवालों[12] ह्मणतसे ॥ ४४ ॥ हांहो जी अवधारा । भला केर[13] फेडिला संसारा । जाहलों जननीजठरजोहरा-[14] । वेगळा प्रभू ॥ ४५ ॥ जी जन्मलेपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें । जीवित हाता चढलें । ओवडे[15] ऐसें ॥ ४६ ॥ आजि आयुष्या उंजवण[16] जाहाली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्यकृपा लाधली । [17]दैविकेनि मुखें ॥ ४७ ॥ आतां येणें वचनतेजाकारें । फिटलें आंतील बाहेरील आंधारें । ह्मणोनि देखतसें साचोकारें[18] । स्वरूप तुझें ॥ ४८ ॥

अर्जुन उवाच–**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**

**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥**

तरि होसी गा तूं परब्रह्म । जें या महाभूतां विसंवतें[19] धाम । पवित्र तूं परम । जगन्नाथा ॥ ४९ ॥ तूं परमदैवत [20]तिहीं देवां । तूं पुरुष जी पंचविसावा । दिव्य तूं प्रकृति-[21]भावा । पैलीकडील ॥ १५० ॥ अनादिसिद्ध तूं स्वामी । जो नोकळिजसी[22] जन्मधर्मीं । तो तूं हें आह्मी । जाणितलें आतां ॥ ५१ ॥ तूं या कालयंत्रासि[23] सूत्री । तूं जीवकळेची अधिष्ठात्री[24] । तूं ब्रह्मकटाहधात्री[25] । हें कळलें फुडें[26] ॥ ५२ ॥

---

१ दुष्काळ. २ उत्पन्न झाले. ३ ओघीं. ४ लक्ष्मीसह. ५ आत्मत्वावांचून. ६ यास्तव. ७ जिंकण्यास. ८ व्यर्थ. ९ कापुराची, कापसाची. १० समुदाय. ११ पलीकडे. १२ शांत झालों. १३ संसाररूप केर. १४ जन्मापासून मुक्त. १५ हवेंतसें. १६ साफल्य. १७ श्रीकृष्णमुखें. १८ यथार्थ. १९ विश्रांतिस्थान. २० ब्रह्मा, विष्णु, महेश यांस. २१ मायेच्या. २२ आकर्षला जात नाहींस. २३ कालरूप यंत्राचा चालक. २४ मुख्य देवता. २५ ब्रह्मांडास आश्रयभूत. २६ स्पष्ट.

**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥**

पैं आणीकही एकेपरी । इये प्रतीतीची येतसे थोरी । जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगीतलें तूतें ॥ ५३ ॥ परि तया सांगितलियाचें साचपण । हें आतां माझें देखतसे अंतःकरण । जे कृपा केली आपण । ह्मणोनि देवा ॥ ५४ ॥ येर्‍हवीं नारद अखंड जवळां ये । तोही ऐसेंचि वचनीं गाये । परि अर्थ न बुजोनि [1]ठाये । गीतसुखचि ऐकों ॥ ५५ ॥ जी आंधळेयाच्या गांवीं । आपणपें प्रगटले रवी । तरि तिहीं [2]वोतपलीचि घ्यावी । वांचूनि प्रकाश कैंचा ॥ ५६ ॥ परि देवर्षी अध्यात्म गातां । [3]आहाच रागांगेंसी जे मधुरता । तेचि [4]फावे येर चित्ता । नलगेचि कांहीं ॥ ५७ ॥ पैं असिता देवलाचेनि मुखें । मी [5]एवंविधा तूतें आइकें । परि तैं बुद्धी विषयविखें । [6]घारिली होती ॥ ५८ ॥ विषयविषाचा [7]पडिपाडु । गोड परमार्थ लागे कडू । कडु विषय तो गोडु । जीवासि जाहाला ॥ ५९ ॥ आणि हें आणिकांचें काय सांगावें । [8]राउळा आपणाचि येऊनि व्यासदेवें । तुझें स्वरूप आघवें । सर्वदां सांगिजे ॥ १६० ॥ परि तो आंधारीं चिंतामणी देखिला । जेविं नव्हे या बुद्धी उपेक्षिला । पाठीं दिनोदयीं वोळखिला । होय ह्मणोनि ॥ ६१ ॥ तैसीं व्यासादिकांचीं बोलणीं । तिया मजपाशीं चिद्रत्नाचिया खाणी । परि उपेक्षिल्या जात होतिया [9]तरणी । [9]तुजवीण कृष्णा ॥ ६२ ॥

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**
**न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥**

ते आतां [10]वाक्यसूर्यकर तुझे फांकले । आणि ऋषींनीं मार्ग होते जे कथिले । तयां आघवयांचेंचि फिटलें । अनोळखपण ॥ ६३ ॥ जी ज्ञानाचें बीज तंव तयांचे बोल । माजि हृदयभूमिके पडिले [11]संखोल । वरि इये कृपेची जाहाली वोल । ह्मणोनि [12]संवादफळ ॥ ६४ ॥ अहो नारदादिकां सतां । त्यांचिया उक्तिरूप [13]सरितां । मी महोदधी जाहालों अनंता । संवादसुखाचा ॥ ६५ ॥ प्रभु आघवेनि येणें जन्में । [14]जियें पुण्यें केलीं मियां उत्तमें । तयांचीं न [15]टेकतीचि अंगीं कामें । सद्गुरु तुवां ॥ ६६ ॥ येर्‍हवीं वडिलवडिलांचेनि मुखें । मी सदां तुतें कानीं आइकें । परि कृपा न कीजेचि तुवां एकें । तंव नेणवेचि कांहीं ॥ ६७ ॥ ह्मणोनि भाग्य जैं सानुकूळ । जालिया केले उद्यम सदां सफळ । तैसें

---

१ राहे. २ कोंवळें ऊन. ३ वरवरच. ४ आवडे. ५ याप्रकारचा. ६ व्यापिली. ७ थोरी. ८ घरीं. ९ तूं जो प्रकाशक सूर्य त्या तुजवांचून. १० वाक्य हाच सूर्य त्याचे कर ह्मणजे किरण. ११ गूढ. १२ संवाद फळ आलें. १३ नदी. १४ जीं जीं. १५ रहात नाहींत.

श्रुताधीत[1] सकळ । गुरुकृपा[2] साच ॥ ६८ ॥ जी बनकर[3] झाडें सिंपी जीवें सोटी[4] । पाडूनि जन्में काढी आटी[5] । परि फळेंसीं तेंचि भेटी । जैं वसंत पावे ॥ ६९ ॥ अहो विषमा[6] जैं वोहट पडे । तैं मधुर तें मधुर आवडे[7] । पैं रसायन तैं गोडें । जैं आरोग्य देहीं ॥ १७० ॥ कां इंद्रियें वाचा प्राण । यां जालियांचें तैंचि सार्थकपण । जैं चैतन्य येऊनि आपण । संचरे माजी ॥ ७१ ॥ तैसें शब्दजात[9] आलोडिलें[10] । अथवा योगादिक जें अभ्यासिलें । तें तैंचि ह्मणोंये आपुलें । जैं सानुकूळ श्रीगुरु ॥ ७२ ॥ ऐसिये जालिये प्रतीतीचेनि माजें । अर्जुन निश्चयाचीं नाचतुसे भोजें[11] । तेवींचि ह्मणे देवा तुझें । वाक्य मज मानलें ॥ ७३ ॥ तरि साचचि हें कैवल्यपती[12] । मज त्रिशुद्धि आली प्रतीती । जे तूं देवां दानवांचिये मती[12] । जोगा[13] नव्हसी ॥ ७४ ॥ तुझें वाक्य व्यक्ती[14] न येतां देवा । जो आपुलिया जाणे जाणिवा[15] । तो कहींचि नोहे हें सद्भावें[16] । भरंवसेनि आलें ॥ ७५ ॥

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥**

एथ आपुलें वाडपण[17] जैसें । आपणचि जाणिजे आकाशें । कां मी येतुली[18] घनवट ऐसें । पृथ्वीचि जाणे ॥ ७६ ॥ तैसा आपुलिये सर्वशक्ती । तुज तूंचि जाणसी लक्ष्मीपती । येर वेदादिक मती । मिरवती वायां ॥ ७७ ॥ हां गा मनातें मागां सांडावें । पवनातें वावीं[19] मवावें । आदिशून्य[20] उतरोनि जावें । केउतें बाहीं[21] ॥ ७८ ॥ तैसें हें तुझें जाणणें आहे । ह्मणोनि कोणाही ठावकें नोहे । आतां तुझें ज्ञान होय । तुजचि जोगें ॥ ७९ ॥ जी आपणयातें तूंचि जाणसी । आणिकांतें सांगावयाही समर्थ होसी । तरि आतां एकवेळ घाम पुसीं । आर्तीचिये[22] निडळींचा[23] ॥ १८० ॥ हें आइकिलें कीं भूतभावना[24] । भवगजपंचानना[25] । सकळदेवदेवतार्चना । जगन्नायका ॥ ८१ ॥ जरी थोरी तुझी पाहत आहों । तरी पासीं[26] उभे ठाकावयाही योग्य नोहों । या शोच्यैता[27] जरी विनवूं बिहों[28] । तरी आन उपाय नाहीं ॥ ८२ ॥ भरले समुद्र सरिता चहूंकडे । तरि तें बापियांसि[29] कोरडें । कां जें

---

१ ऐकिलेलें व अध्ययन केलेलें. २ गुरुकृपेनें. ३ बनकर=माळी जीवें साटी=आपल्या जीवास धोक्यांत घालून सुद्धां झाडांशीं जन्मानें आटी काढी=मेहनत करतो. ४ छाटतो. ५ श्रम. ६ विषमज्वर. ७ लागे आणि रसायन कडू असतांही ज्यापेक्षां तें आरोग्य करितें त्यापेक्षां तेंही गोड मानितो. ८ तेव्हां ९ वेदशास्त्रादि. १० अभ्यासिलें. ११ संतोषानें. १२ मुक्तिदाता श्रीकृष्ण. १३ मतीनें जाणण्याजोगा. १४ अनुभवास. १५ ज्ञानानें. १६ अनुभवास. १७ मोठेपणा. १८ इतकी निबिड भरलेली. १९ वांवेनें मोजावें. २० माया. २१ बाहूनीं. २२ आवडीचे. २३ कपाळाचा. २४ जग उत्पन्न करणारा. २५ संसाररूप हत्तीचा पंचानन ह्मणजे सिंह. २६ जवळ. २७ या संकटानें. २८ भिऊं. २९ चातकास.

मेघौनि[1] थेंबुटा पडे । तैं पाणि कीं तया ॥ ८३ ॥ तैसें श्रीगुरु सर्वत्र आथि[2] । परि कृष्णा आह्मां तूंचि गती । हें असो मजप्रती । विभूति सांगें ॥ ८४ ॥

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥**

जी तुझिया विभूती आघविया । परि व्यापिती शक्ति दिव्या जिया । तिया आपुलिया दावाविया । आपण मज ॥ ८५ ॥ जिहीं विभूती ययां समस्तां । लोकांतें व्यापूनि आहासी[3] अनंता । तिया प्रधाना[4] नामांकिता । प्रगटा करीं ॥ ८६ ॥

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।**
**केषु केषु च भावेषु चिंत्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥**

जी कैसें मियां तुतें जाणावें । काय जाणोनि सदां चिंतावें । जरी तूंचि ह्मणों आघवें । तरि चिंतनचि न घडे ॥ ८७ ॥ ह्मणोनि मागां भाव जैसे । आपुले सांगीतले तुवां उद्देशें[5] । आतां विस्तारोनि तैसें । एकवेळ बोलें ॥ ८८ ॥ जया जया भावाचिया ठायीं । तुतें चिंतितां मज सायास नाहीं । तो विवळ करूनि देईं । योग आपुला ॥ ८९ ॥

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।**
**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥**

आणि पुसलिया जिया विभूती । त्याही बोलाविया भूपती । एथ ह्मणसी जरी पुढती । काय सांगों ॥ १९० ॥ तरी हा भाव मना । झणें जाय हो जनार्दना । पैं प्राकृताही अमृतपाना । नाँ न ह्मणवे जेविं ॥ ९१ ॥ जें काळकूटाचें सहोदर[11] । हें मृत्युभेणें प्याले अमर । तरि देहींचे[12] पुरंदर[13] । चौदा जाती ॥ ९२ ॥ ऐसा कवण एक क्षीराब्धीचा रस । जयां वायांचि अमृतपणाचा आभास । तयाचाही मिठांश । जे पुरे ह्मणों नेदी ॥ ९३ ॥ तया पौवळ्याहि येतुलेवरी । गोडियेची आथि थोरी । मग हें तंव अवधारीं । परमामृत साचें ॥ ९४ ॥ जें मंदराचळ न ढाळितां । क्षीरसागर न डहुळतां[15] । अनादि स्वभावता । आइतें आहे ॥ ९५ ॥ जें सवेना द्रवे नव्हे बद्ध । जेथ नेणिजती रस गंध । जें भलतयाही सिद्ध । आठवलेंचि फावे ॥ ९६ ॥ जयाची गोठीचि ऐकेंतखेवो[17] । आघवा संसार होय वावो । बळियें नित्यता लागे येवों । आपणपेयां ॥ ९७ ॥ जन्ममृत्यूची भाख । हार

१ मेघांतून थेंब. २ आहे. ३ आहेस. ४ मुख्य. ५ पूर्वी. ६ पदार्थ, विभूति. ७ संक्षेपानें. ८ स्पष्ट. ९ कदाचित्. १० लहानास, साधारण जें अमृतपान तेंही पुरे असें वाटत नाहीं. ११ बंधु. १२ दिवसाचे. १३ इंद्र. १४ तुच्छालाही, नाशवंतालाही. १५ न घुसळतां. १६ प्राप्त होतें. १७ ऐकतांक्षणीं. १८ मिथ्या. १९ बळकट. २० वार्ता.

पोनि जाय निःशेख । आंत बाहेरि महासुख । वाढोंचि लागे ॥ ९८ ॥ मग दैवगत्या जरी सेविजे । तरि तें आपणचि होऊनि ठाकिजे । तें तुज देतां चित्त माझें । पुरे ह्मणों न शके ॥ ९९ ॥ तंव तुझें नामचि आह्मां आवडे । वरि भेटी होय आणि जवळिक[1] जोडे । पाठीं गोठी सांगसी सुरवाडें[2] । आनंदाचेनी ॥ २०० ॥ आतां हें सुख कायिसयासारिखें । कांहीं निर्वचेनां[3] मज परितोखें[4] । तरी येतुलें जाणें जे येणें मुखें । पुनरुक्तही[5] हो ॥ १ ॥ हां गा सूर्य काय शिळा । अग्नि ह्मणों येत आहे वोंविळा । कां नित्य वाहतया गंगाजळा । पारसेपण असे ॥ २ ॥ तुवां स्वमुखें जें बोलिलें । हें आह्मी नादासि[6] रूप देखिलें । आजि चंदनतरूचीं फुलें । तुरंबीत[7] आहों मां ॥ ३ ॥ तया पार्थाचिया बोला । सर्वांगें श्रीकृष्ण डोलला । ह्मणे भक्तिज्ञानासि जाहाला । आगर[8] हा ॥ ४ ॥ ऐसा पतिकराचिया[9] तोषाभांत । प्रेमाचा ओघ उचंबळत । सायासें सांवरूनि अनंत । काय बोले ॥ ५ ॥

श्रीभगवानुवाच—हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

मी पितांमहाचा[10] पिता । हें आठवितांही नाठवे चित्ता । कीं ह्मणतसे या पांडुसुता । भलें केलें ॥ ६ ॥ अर्जुनातें बा ह्मणे एथ कांहीं । आह्मा विस्मो[11] करावया कारण नाहीं । आंगें तो लेंकरूं काई । नव्हेचि नंदाचें[12] ॥ ७ ॥ परि प्रस्तुत ऐसें असो । हें करवी आवडीचा अतिसो[13] । मग ह्मणे आइकें सांगतसों । धनुर्धरा ॥ ८ ॥ तरि तुवां पुसलिया विभूती । तयांचें अपारपण सुभद्रापती । जे माझियाचि परी माझिये मती । आकळती ना ॥ ९ ॥ आंगींचिया रोमा किती । जयाचिया तयासि न गणवती । तैसिया माझिया विभूती । असंख्य मज ॥ २१० ॥ येरवीं तरी मी कैसा केवढा । ह्मणोनि आपणपयांही नव्हेचि फुडा[14] । यालागीं प्रधाना[15] जिया नामीं रूढा[16] । तिया विभूती आइकें ॥ ११ ॥ जिया जाणितलिया सांठीं[17] । आघविया जाणवतील किरीटी । जैसें बीज आलिया मुठी । तरूचि आला होय ॥ १२ ॥ कां उद्यान[18] हाता चढिनलें । तरि अपैसीं सांपडलीं फळें फुलें । तेवि देखिलिया जिया देखवलें । विश्व सकळ ॥ १३ ॥ येऱ्हवीं साचचि गा धनुर्धरा । नाहीं शेवट माझिया विस्तारा । पैं गगना[19] ऐशिया अपारा । मनमाजि असणें ॥ १४ ॥

---

१ सहवास. २ आनंदानें. ३ बोलवेना. ४ संतोषानें. ५ पुनः बोललेलें होईल. ६ ध्वनीला. ७ हुंगीत. ८ मळा, स्थान. ९ अनुभवाच्या. १० ब्रह्मदेवाचा. ११ आश्चर्य. १२ नंदाचें शिशुत्व पत्करणाराला अर्जुनाचें महत्व आश्चर्यकारक नव्हे. १३ आधिक्य. १४ प्रकट. १५ मुख्य. १६ प्रसिद्ध. १७ असतां. १८ बाग. १९ एवढें गगनही माझ्यांत सांठवतें.

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।**
**अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥ २० ॥**

आइकें [1]कुटिलालकमस्तका । [2]धनुर्वेदत्र्यंबका । मी आत्मा असें एकैकां । भूतमात्राच्या ठायीं ॥ १९ ॥ आंतुलीकडे मीचि यांचे अंतःकरणीं । भूतां बाहेरी माझीचि गंवसणी । आदि मी [4]निर्वाणीं । मध्यही मीचि ॥ १६ ॥ जैसें मेघांयां तळींवरी । एक आकाशचि आंत बाहेरी । आणि आकाशींचि जाले अवधारीं । असणेंहीं आकाशीं ॥ १७ ॥ पाठीं लया जे वेळीं जाती । ते वेळीं आकाशचि होऊनि ठाती । तेविं आदि स्थिति अंतगती । भूतांसि मी ॥ १८ ॥ ऐसें बहुवस आणि व्यापकपण । माझें विभूतीयोगें जाण । तरी जीवचि करूनि श्रवण । आइकोनि आइक ॥ १९ ॥ याहीवर त्या विभूति । सांगणें ठेलें सुभद्रापती । सांगेन ह्मणितलें तुजप्रती । त्या प्रधाना आइकें ॥ २२० ॥

**आदित्यनामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।**
**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥**

हें बोलोनि तो कृपावंत । ह्मणे विष्णु मी आदित्यांत । रवी मी रश्मिवंत । सुप्रभांमाजी ॥ २१ ॥ मरुद्गणांच्या वर्गीं । मरीचि ह्मणे मी शार्ङ्गी । चंद्र मी गगनरंगीं । तारांमाजी ॥ २२ ॥

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।**
**इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥**

वेदां आंत सामवेदु । तो मी ह्मणे गोविंदु । देवांमाजि जगद्वंधु । महेंद्र तो मीं ॥ २३ ॥ इंद्रियांमाजि अकरावें । मन तें मी हें जाणावें । भूतांमाजि स्वभावें । चेतना ते मी ॥ २४ ॥

**रुद्राणां शंकरश्चाऽस्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।**
**वसूनां पावकश्चाऽस्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥**

अशेषांही रुद्रांमाझारीं । शंकर जो मदनारी । तो मी येथ न धरीं । भ्रांति कांहीं ॥ २५ ॥ यक्षरक्षोगणांआंत । शंभूचा सखा जो धनवंत । तो कुबेर मी हें अनंत । ह्मणता जाहाला ॥ २६ ॥ मग आठांही वसूंमाझारीं । पावक तो मी अवधारीं । शिखराथिलियां सर्वांपरी । मेरु तो मी ॥ २७ ॥

---

१ काळे कुरळे केश मस्तकीं धारण करणाऱ्या. २ धनुर्विद्येविषयीं शिवरूप. ३ आच्छादन. ४ अंतीं. ५ खालींवर. ६ राहतात. ७ उत्पत्ति, स्थिति व नाश. ८ कान. ९ मुख्य. १० देवांत. ११ किरणवान्. १२ प्रकाशवान् पदार्थांत. १३ शार्ङ्गनांवाचें धनुष्य धारण करणारा श्रीकृष्ण. १४ इंद्र. १५ जीवकला. १६ शिखरें आहेत अशा पर्वतांत.

**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।**
**सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥**

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥**

जो स्वर्गसिंहासना सावावो[1] । सर्वज्ञते आदिचा ठावो । तो पुरोहितांमाजि रावो । बृहस्पती मी ॥ २८ ॥ त्रिभुवनींचिया सेनापती । आंत स्कंध[2] तो मी महामती । जो हरवीर्यें अग्निसंगती । कृत्तिकांतें[3] जाहाला ॥ २९ ॥ सकळिकां सरोवरांसी । माजि समुद्र तो मी जळराशी । महर्षीआंत तपोराशी । भृगु तो मी ॥ २३० ॥ अशेषांही वाचा । माजी नटनाच[4] सत्याचा । तें अक्षर एक मी वैकुंठींचा । वेल्हाळ[5] ह्मणे ॥ ३१ ॥ समस्तांहीं यज्ञांच्यापैकीं । जपयज्ञ तो मी ये लोकीं । जो कर्मत्यागें प्रणवादिकीं[6] । निपजविजे ॥ ३२ ॥ नामजपयज्ञ तो परम । बाधूं न शके स्नानादि कर्म । नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थीं ॥ ३३ ॥ स्थावरां गिरीआंत[7] । पुण्यपूज्य जो हिमवंत[8] । तो मी ह्मणे कांत । लक्ष्मियेचा ॥ ३४ ॥

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।**
**गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥**

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।**
**ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥**

कल्पद्रुम हेन[9] पारिजात । गुणें चंदनही वाड[10] विख्यात । तरि ययां वृक्षजातां आंत । अश्वत्थ तो मी ॥ ३५ ॥ देवऋषीआंत पांडवा । नारद तो मी जाणावा । चित्ररथ मी गंधर्वां । सकळिकांमाजी ॥ ३६ ॥ ययां अशेषांही सिद्धां । माजि कपिलाचार्य मी प्रबुद्धां[11] । तुरंगजातां[12] प्रसिद्धां । आंत उच्चैःश्रवा[13] मी ॥ ३७ ॥ राज्यभूषणां गजांआंत । अर्जुना मी गा ऐरावत । पयोराशि[14] सुरमथित । वियाला तो मी ॥ ३८ ॥ ययां नरांमाजि राजा । तो विभूतिविशेष माझा । जयातें सकळ लोक प्रजा । होऊनि सेविती ॥ ३९ ॥

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।**
**प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥**

---

१ सहाय, साचिव. २ कार्तिकस्वामी. ३ कृत्तिकांच्या उदरीं. ४ नटासारखें नृत्य. ५ विलासी. ६ ओंकारादिकांनीं. ७ पर्वतांमध्यें. ८ हिमालय. ९ आणि. १० मोठा. ११ ज्ञानवंता. १२ सर्व घोड्यांत. १३ इंद्राचा घोडा. १४ समुद्र.

अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।
पितॄणामर्यमा चाऽस्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥

पैं आघवेया हतियेरां । आंत वज्र तें मी धनुर्धरा । जें शतमखोत्तीर्णकरा[1] । आरूढोनि असे ॥ २४० ॥ धेनूंमध्यें कामधेनु । ते मी ह्मणे विष्वक्सेनु[2] । जन्मवितया आंत मदनु । तो मी जाणें ॥ ४१ ॥ सर्पकुळाआंत अधिष्ठाता । वासुकी मी कुंतीसुता । नागांमाजि समस्तां । अनंत तो मी ॥ ४२ ॥ अगा यादसांआंत[3] । जो पश्चिमप्रमदेचा[4] कांत । तो वरुण मी हें अनंत । सांगत असे ॥ ४३ ॥ आणि पितृगणां समस्तां । माजि अर्यमा जो पितृदेवता । तो मी हें तत्त्वता । बोलत आहे ॥ ४४ ॥ जगाचीं शुभाशुभें लिहिती । प्राणियांच्या मानसाचा झाडा घेती । मग केलियानुरूप होती । भोगनियम जे ॥ ४५ ॥ तयां नियमितयांमाजि[5] यम । जो कर्मसाक्षी धर्म । तो मी ह्मणे आत्माराम । रमापती ॥ ४६ ॥

प्रह्लादश्चाऽस्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।
मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥

अगा दैत्यांचिया कुळीं । प्रल्हाद तो मी न्यहाळीं । ह्मणोनि दैत्यभावादिमेळीं[6] । लिंपेचिना[7] ॥ ४७ ॥ पैं कळितयांमाजि[8] महाकाळ । तो मी ह्मणे गोपाळ । श्वापदांमाजि शार्दूळ[9] । तो मी जाण ॥ ४८ ॥ पक्षिजातीमाझारीं । गरुड तो मी अवधारीं । यालागीं जो पाठीवरी । वाहों शके मातें ॥ ४९ ॥

पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।
झषाणां मकरश्चाऽस्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥

पृथ्वीचिया पैसारा[10] । माजि घडी न लगतां धनुर्धरा । एकेचि उड्डाणें सातांही सागरां । प्रदक्षिणा कीजे ॥ २५० ॥ तयां वेहिलियां[11] गतिमंतां । आंत पवन[12] तो मी पांडुसुता । शस्त्रधरां समस्तां । माजि श्रीराम तो मी ॥ ५१ ॥ जेणें सांकडलिया[13] धर्माचे कैवारें । आपणपयां धनुष्य करूनि दुसरें । विजयलक्ष्मीये एक मोहरें[14] । केलें त्रेतीं ॥ ५२ ॥ पाठीं उभें टाकूनि सुवेळीं । प्रतापलंकेश्वराच्या सिसाळीं[15] । गगनीं उदो ह्मणतया हस्तवळी । दिधली भूतां ॥ ५३ ॥ जेणें देवांचा मान गिंवसिला[16] । धर्मासि जीर्णोद्धार केला । सूर्यवंशीं उदेला । सूर्य जो कां ॥ ५४ ॥ तो हातियेरपरजितयाआंत[17] । राम-

---

१ शंभर यज्ञ करून उत्तीर्ण झालेल्या इंद्राच्या हातास. २ श्रीकृष्ण. ३ जलचरांत. ४ पश्चिम दिशेचा. ५ शासन करणारांत. ६ दैत्यस्वभावानें. ७ लिप्त होत नाहीं. ८ हरण करणारांत. ९ वाघ. १० विस्तारा. ११ सर्व वेगवानांत. १२ वारा. १३ संकटांत पडलेल्या धर्माच्या पक्षानें. १४ मागें, लक्षानें. १५ मस्तकपंक्तीचा बळी दिला. १६ राखला. १७ शस्त्र धारण करणारांत.

चंद्र मी रमाकांत । मकर मी पुच्छवंत । जळचरांमाजी ॥ ५५ ॥ पैं समस्तांही वोघां- । मध्यें जे भगीरथें आणितां गंगा । जन्हूनें गिळिली मग जंघा । फाडूनि दिधली ॥ ५६ ॥ ते त्रिभुवनैकसरिता । जान्हवी मी पांडुसुता । जळप्रवाहां समस्तां । माझारी जाणें ॥ ५७ ॥ ऐसेनि वेगळालां सृष्टिपैकीं । विभूती नाम ठेवितां एकेकीं । सगळेन जन्मसहस्रें अवलोकीं । अर्ध्या नव्हती ॥ ५८ ॥

> सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाऽहमर्जुन ।
> अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥
> अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।
> अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥

जैसीं अवघींचि नक्षत्रें वेंचावीं । ऐसी चाड[1] उपजेल जैं जीवीं । तैं गगनाची बांधावी । लोथ[2] जेवीं ॥ ५९ ॥ कां पृथ्वीये परमाणूचा उगाणा[3] घ्यावा । तरि भूगोलचि काखे सुवावा । तैसा विस्तार माझा पाहावा । तरि जाणावें मातें ॥ २६० ॥ जैसें शाखांसी फूल फळ । एकीहेळा वेटाळूं ह्मणिजे सकळ । तरी उपडूनियां मूळ । जेविं हातीं[4] घेपे ॥ ६१ ॥ तेवीं माझे विभूतिविशेष । जरी जाणों पाहिजेती अशेष । तरी स्वरूप एक निर्दोष । जाणिजे माझें ॥ ६२ ॥ येऱ्हवीं वेगळालिया विभूती । कायिएक परिससी किती । ह्मणोनि एकीहेळां महामती । सर्व मी जाण ॥ ६३ ॥ मी आघवियेचि सृष्टी । आदि मध्यांतीं किरीटी । वोतप्रोत[11] पटीं । तंतु जेविं ॥ ६४ ॥ ऐसिया व्यापका मातें जैं जाणावें । तैं विभूतिभेदें काय करावें । परि हे तुझी योग्यता नव्हे । ह्मणोनि असो ॥ ६५ ॥ कां जे तुवां पुसिलिया विभूती । ह्मणोनि तिया आईक सुभद्रापती । तरि विद्यांमाजि प्रस्तुती । अध्यात्मविद्या[12] ते मी ॥ ६६ ॥ अगा बोलतयांचिया ठायीं । वाद तो मी पाहीं । जो सकळशास्त्रसंमतें कहीं । सरेचिना ॥ ६७ ॥ जो निर्वचूं[13] जातां वाढे । आईकतयां उत्प्रेक्षे[14] सळ चढे । जयावरी बोलतियांची गोडें । बोलणीं होती ॥ ६८ ॥ ऐसा प्रतिपादनामाजि वाद । तो मी ह्मणे गोविंद । अक्षरांमाजि विशद । अकार तो मी ॥ ६९ ॥ पैं गा समासांमाझारीं । द्वंद्व तो मी अवधारीं । मशकालागोनि[15] ब्रह्मावेरीं । ग्रासिता तो मी ॥ २७० ॥ मेरुमंदरादिकीं सर्वीं । सहित पृथ्वीतें विरवी[16] । जो एकार्णवातेंही[17] जिरवी । जेथिंचा तेथें ॥ ७१ ॥ जो प्रळयतेजा देत मिठी । सगळिया पवनातें

---

१ पोटरी. २ त्रैलोक्यांतील मुख्य नदी. ३ सगळया. ४ इच्छा. ५ मोट. ६ झाडा. ७ घालावा. ८ एकवेळेस. ९ ध्यावें. १० कालत्रयीं. ११ उभा अडवा व्याप्त. १२ वेदांत. १३ निश्चय करतां. १४ तर्कास बळ. १५ माशीपासून तों ब्रह्मदेवापर्यंत. १६ विरघळवी, नाशी. १७ प्रलयीं समुद्रमय झालेल्या जगास.

गिळी किरीटी । आकाश जयाचिया पोटीं । सामावलें ॥ ७२ ॥ ऐसा अपार जो काळ । तो मी ह्मणे लक्ष्मीलीळ । मग पुढती सृष्टीचा मेळ । सृजिता तो मी ॥ ७३ ॥

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥**

आणि सृजिलिया भूतांतें मीचि धरीं । सकळां जीवनही मीचि अवधारीं । शेखीं सर्वांतें या संहारीं । तेव्हां मृत्युही मीचि ॥ ७४ ॥ आतां स्त्रीगणाच्या पैकीं । माझिया विभूती सात आणिकी । तिया ऐक कवतिकीं । सांगिजतील ॥ ७५ ॥ तरी नित्य जे नवी कीर्ती । अर्जुना ते माझी मूर्ती । आणि औदार्येंसीं जे संपत्ती । तेही मीचि जाणें ॥ ७६ ॥ आणि ते गा मी वाचा । जे सुखासनीं न्यायाच्या । आरूढोनि विवेकाच्या । मार्गीं चाले ॥ ७७ ॥ देखिलेनि पदार्थें । जे आठवूनि दे मातें । ते स्मृतिही एथें । त्रिशुद्धि मी ॥ ७८ ॥ पैं स्वहिता अनपायिनी । मेधा ते गा मी इये जनीं । धृती मी त्रिभुवनीं । क्षमा ते मी ॥ ७९ ॥ एवं नारींमाझारीं । या सातही शक्ति मी अवधारीं । ऐसें संसारगजकेसरी । ह्मणता जाहला ॥ २८० ॥

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥**

वेदराशीचिया सामा । आंत बृहत्साम जें प्रियोत्तम । तें मी ह्मणे रमा- । प्राणेश्वर ॥ ८१ ॥ गायत्रीछंद जें ह्मणिजे । तें सकळां छंदांमाजि माझें । स्वरूप हें जाणिजे । निभ्रांत तुवां ॥ ८२ ॥ मासांआंत मार्गशिर । तो मी ह्मणे शार्ङ्गधर । ऋतूंमाजि कुसुमाकर । वसंत तो मी ॥ ८३ ॥

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्वं सत्ववतामहम् ॥ ३६ ॥**
**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥**

छळितयां विंदाणा- । माजि [11]जूं तें मी विचक्षणा । ह्मणोनि चोहटां चोरी परि कवणा । निवारूं नये ॥ ८४ ॥ अगा अशेषांही तेजसां । आंत तेज तें मी भरंवसा ।

---

१ लक्ष्मीशीं लीला करणारा श्रीकृष्ण. २ उत्पन्नकर्ता. ३ स्मरणशक्ति. ४ अपाय न करणारी. ५ बुद्धि, धारणाशक्ति. ६ धैर्य. ७ संसाररूप हत्तीला सिंह=कृष्ण. ८ सर्व वेदांमधील. ९ पुष्पांची खाण. १० प्रकारांत. ११ फांसा. १२ चवाठ्यास.

विजयो मी कार्योद्देशीं । सकळांमाजीं ॥ ८५ ॥ जेणें चोखाळत दिसे न्याय । तो व्यवसायांत व्यवसाय । माझें स्वरूप हें राय । सुरांचा ह्मणे ॥ ८६ ॥ सत्वाथिलियांभांत । सत्व मी ह्मणे अनंत । यादवांमाजि श्रीमंत । तोचि तो मी ॥ ८७ ॥ जो देवकी वसुदेवास्तव जाहला । कुमारीसाठीं गोकुळीं गेला । तो मी प्राणासकट पियाला । पूतनेतें ॥ ८८ ॥ नुघडतां बाळपणाची फुली । जेणें मिया अदानवी सृष्टि केली । करीं गिरि धरूनि उमाणिली । महेंद्रमहिमा ॥ ८९ ॥ कालिंदीचें हृदयशल्य फेडिलें । जेणें मियां जळत गोकुळ राखिलें । वासरुवांसाठीं लाविलें । विरंचीसि पिसें ॥ २९० ॥ प्रथमदशेचिये पहांटे- । माजि कंसाऐशीं अचाटें । महाथेंडीं अवचटें । लीळेचि नासिलीं ॥ ९१ ॥ हें काय किती एक सांगावें । तुवांही देखिलें ऐकिलें असे आघवें । तरि यादवांमाजि जाणावें । हेंचि स्वरूप माझें ॥ ९२ ॥ आणि सोमवंशीं तुह्मां पांडवां- । माजि अर्जुन तो मी जाणावा । ह्मणोनि एकमेकांचिया प्रेमभावा । विघड न पडे ॥ ९३ ॥ संन्यासी तुवां होऊनि जनीं । चोरूनि नेली माझी भगिनी । तऱ्हीं विकल्प नुपजे मनीं । मी तूं दोन्ही स्वरूप एक ॥ ९४ ॥ मुनीआंत व्यासदेव । तो मी ह्मणे यादवराव । कवीश्वरांमाजि धैर्या ठाव । उशनाचार्य तो मी ॥ ९५ ॥

**दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।**
**मौनं चैवाऽस्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥**

अगा दमितयांमाझारीं । अनिवार दंड तो मी अवधारीं । जो मुंगियेलागोनि ब्रह्मावेरीं । नियमित पावे ॥ ९६ ॥ पैं सारासार निर्धारितयां । धर्मज्ञानाचा पक्ष धरितयां । सकळशास्त्रांमाजि ययां । नीतिशास्त्र तें मी ॥ ९७ ॥ आघवेयाचि गुढां- । माजि मौन तें सुहाडा । ह्मणोनि न बोलतयां पुढां । स्रष्टाही नेणें होय ॥ ९८ ॥ अगा ज्ञानियांचिया ठायीं । ज्ञान तें मी पाहीं । आतां असो हें ययां कांहीं । पार न देखों ॥ ९९ ॥

**यच्चाऽपि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥**
**नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥**

पैं पर्जन्याचिया धारा । वरी लेखे करवेल धनुर्धरा । कां पृथ्वीचिया तृणांकुरां ।

१ निर्मळ. २ उद्योग, व्यापार. ३ सत्वधीरांत. ४ मुद्रा. ५ दैत्यरहित. ६ मोजली. ७ यमुनेचें. कालियसर्प. ९ ब्रह्मदेवास. १० बाल्यदशा. ११ सहज. १२ भेद. १३ शुक्राचार्य. १४ ब्रह्मदेवपर्यंत. १५ शासन करीत. १६ सुहृदा अर्जुना. १७ ब्रह्मदेव. १८ अज्ञानी. १९ गणना.

होईल ठी ॥ ३०० ॥ पैं महोदधीचिया तरंगा । व्यवस्था धरूं नये जेविं गा । तेविं माझिया विशेषलिंगां । नाहीं मिती ॥ १ ॥ ऐशियाही सातपांच या प्रधाना । विभूती सांगीतलिया तुज अर्जुना । तो हा उद्देश जो गा मना । आहाच गमला ॥ २ ॥ येरां विभूतिविस्तारांसि कांहीं । एथ सर्वथा लेख नाहीं । म्हणोनि परिससी तूं काई । आम्ही सांगों किती ॥ ३ ॥ यालागिं ऐकीहेळां तुज । दाऊं आतां वर्म निज । सर्वभूतांकुरें बीज । विरूढत असे तें मी ॥ ४ ॥ म्हणोनि सानें थोर न म्हणावें । उंच नीच भाव सांडावे । एक मीचि ऐसें मानावें । वस्तुजातातें ॥ ५ ॥ तरी यावरी साधारण । आईक पां आणीकही खूण । तरि अर्जुना तें तूं जाण । विभूती माझी ॥ ६ ॥

**यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**
**तत्तदेवाऽवगच्छ त्वं मम तेजोंशसंभवम् ॥ ४१ ॥**

जेथ जेथ संपत्ति आणि दया । दोन्ही वसती आलिया ठाया । ते ते जाण धनंजया । अंश माझे ॥ ७ ॥

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवाऽर्जुन ।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
विभूतिविस्तारयोगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

अथवा एकलें एक बिंब गगनीं । परि प्रभा फांके त्रिभुवनीं । तेविं मज एकाची सकळ जनीं । आज्ञा पाळिजे ॥ ८ ॥ तयातें एकलें ह्मणों ह्मण । तो निर्धन या भाषा नेण । काय कामधेनूसवें सर्व साहान । चालत असे ॥ ९ ॥ तियेतें जें जेधवां जो मागे । तें ते ऐकसरेंचि प्रसवों लागे । तेविं विश्वविभेव तया आंगें । होऊनि असती ॥ ३१० ॥ तयातें वोळखावया हेंचि संज्ञा । जे जगें नमस्कारिजे आज्ञा । ऐसें आथि ते जाण प्राज्ञा । अवतार माझे ॥ ११ ॥ आणि सामान्य विशेष । हें जाणणें एथ महादोष । कां जे मीच्चि एक अशेष । विश्व आहें ह्मणोनि ॥ १२ ॥ तरी आतां साधारण आणि चांग । ऐसा कैसेनि पां कल्पावा विभाग । वायां आपुलिये मती वंगे । भेदाचा लावावा ॥ १३ ॥ येन्हवीं तूप कासया घुसळावें । अमृत कां रांधूनि अर्धें करावें । हां गा वायूसि काय पां डावें उजवें । आंग आहे ॥ १४ ॥ पैं सूर्यबिंबासि पोट पाठी । पहातां नासेल आपुली

१ ठोवट. २ विभूतींस. ३ पंचाहत्तर. ४ बरवर. ५ एकवार. ६ लहान. ७ कदाचित्. ८ सामुग्री. ९ कामधेनु. १० एकदम. ११ सर्व ऐश्वर्यें त्याच्या अंगीं उत्पन्न होतात. १२ खूण. १३ कलंक.

[1]दिठी । तेविं माझ्या स्वरूपीं [2]गोठी । सामान्यविशेषाची नाहीं ॥ १५ ॥ आणि सिं[3]नाना इहीं विभूतीं । मज अपारातें [4]मविसील किती । ह्मणोनि किंबहुना सुभद्रापती । असो हें जाणणें ॥ १६ ॥ आतां पैं माझेनि एकें अंशें । हें जग व्यापिलें असे । यालागीं भेद सांडूनि सरिसें । साम्यें भज ॥ १७ ॥ ऐसें वि[5]बुधवनवसंतें । तेणें विरक्तांचेनि एकांतें । बोलिलें जेथ श्रीमंतें । श्रीकृष्णदेवें ॥ १८ ॥ तेथ अर्जुन ह्मणे स्वामी । येतुलें हें [6]रंभस्य बोलिलें तुह्मी । जे भेद एक आणि आह्मी । सांडावा एकीं ॥ १९ ॥ हां हो सूर्य ह्मणे काय जगातें । आंधारें दवडा कां परौतें । तेविं धैंसाळ ह्मणों देवातें । तरी अधिक हा बोल ॥ ३२० ॥ तुझें नामाचि एक कोण्ही वेळे । जयांचिये मुखासि कां काना मिळे । तयांचिया हृदयातें सांडूनि पळे । भेद जी साच ॥ २१ ॥ तो तूं परब्रह्मचि असकें । मज दैवें दिधलासि हस्तोदकें । तरीं आतां भेद कायसा कें । देखावा कवणें ॥ २२ ॥ जी चंद्रबिंबाचा गाभारा । [9]रिगालियावरी ही उबारा । परि [10]रांणेपणें शार्ङ्गधरा । बोला हें तुह्मी ॥ २३ ॥ तेथ [11]सांवियाची परितोषोनि देवें । अर्जुनातें आलिंगिलें जीवें । मग ह्मणे तुवां न कोपावें । आमुचिया बोला ॥ २४ ॥ आह्मीं तुज भेदाचिया [12]वांहणी । सांगीतली जे विभूतींची कहाणी । ते अभेदें काय अंतःकरणीं । मानली कीं न मने ॥ २५ ॥ हेंचि पाहावयालागीं । [13]नावेक बोलिलों [14]बाहेरिसवाडिया भंगीं । तंव विभूती तुज चांगी । आलिया बोधा ॥ २६ ॥ तेथ अर्जुन ह्मणे देवें । हें आपुलें आपण जाणावें । परि देखतसें विश्व आघवें । तुवां भरलें ॥ २७ ॥ पैं राया तो पांडुसुत । ऐसिये प्रतीतीसि जाहाला वरितें[15] । संजयाचिया बोला निवांत । धृतराष्ट्र आहे ॥ २८ ॥ कीं संजय दुखवलेनि अंतःकरणें । ह्मणतसे नवल नव्हे दैवा दवडणें । हा जीवीं धडसा आहे मी ह्मणे । तंव आंतही आंधळा ॥ २९ ॥ परि असो हें तो अर्जुन । स्वहिताचा वाढवीतसे मान । कीं याहीवरी तया आन । [16]धिंवसा [17]उपनला ॥ ३३० ॥ ह्मणे हेचि हृदया-आंतुली प्रतीती । बाहेरि [18]अवतरो कां डोळयांप्रती । इये ओर्तीचिया पाउलीं मती । उठती जाहाली ॥ ३१ ॥ मियां इहींच दोंही डोळां । झोंबावें विश्वरूपा सकळा । येवढी हांव तो दैवीं[20] आगळा । ह्मणऊनि करी ॥ ३२ ॥ आजि [21]तो कल्पतरूची शाखा । ह्मणोनि [21]वांझोळें न लगती देखा । जें जें येईल तयाचिया मुखा । तें तें साचचि करी-

---

१ दृष्टि. २ विचार, गोष्ट. ३ वेगळाल्या. ४ मोजशील. ५ ज्ञानी हेंच कोणी वन त्यास वसंतरूप अशा श्रीकृष्णानें. ६ चापल्य. ७ अविचार. ८ सर्व. ९ प्रवेश केल्यावर. १० राजेपणें. ११ तत्काळ. १२ मार्गी, प्रवाहीं. १३ क्षणभर. १४ बाह्यदृष्टीच्या रीतीनें. १५ योग्य. १६ उत्कंठा. १७ उत्पन्न झाला. १८ प्रगट होवो. १९ इच्छेच्या. २० मोठ्या दैवाचा. २१ तो अर्जुन कल्पवृक्षाची शाखा=श्रीकृष्णाच्या आश्रयानें असणारा ह्मणून त्याला वांझोळें=वांझ फुलें येत नाहींत ( त्याचे बोल व्यर्थ जात नाहींत. )

तसे येरु ॥ ३३ ॥ जो मऱ्हाटाचिया बोला । विषाही सकट आपणचि जाहाला । तो सद्गुरु असे ओडला । किरीटीसीं ॥ ३४ ॥ ह्मणोनि विश्वरूप पुसावयालागीं । पार्थ रिगेता होईल कवणें भंगीं । तें सांगेन पुढलिये प्रसंगीं । ज्ञानदेव ह्मणे निवृत्तीचा ॥ ३३५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां दशमोऽध्यायः ॥ १० ॥

श्लोक ४२, ओंव्या ३३५.

---

# अध्याय ११ वा.

आतां यावरी एकादशी । कथा आहे दोहीं रसीं । जेथ पार्था विश्वरूपेंसीं । होईल भेटी ॥ १ ॥ जेथ शांताचिया घरा । अद्भुत आला आहे पाहुणेरा । आणि येरांहीं रसां पांतिकरां । जाहाला मान ॥ २ ॥ अहो वधूवरांचिये मिळणीं । जैसीं वराडियांही लुगडीं लेणीं । तैसे देशियेच्या सुखासनीं । मिरवले रस ॥ ३ ॥ परि शांताद्भुत बरवें । जें डोळ्यांच्या अंजळीं घ्यावें । जैसे हरिहर प्रेमभावें । आले खेंवा ॥ ४ ॥ ना तरी अंवसेच्या दिवसीं । भेटलीं बिंबें दोनी सरसीं । तेविं एकवळा रसीं । केला एथ ॥ ५ ॥ मिनले गंगेयमुनेचे ओघ । तेसें रसां जाहालें प्रयाग । ह्मणोनि सुस्नात होत जग । आघवें एथ ॥ ६ ॥ मध्यें गीता सरस्वती गुप्त । आणि दोनी रस ते ओघ मूर्त । यालागिं त्रिवेणी हे उचित । फावली बापा ॥ ७ ॥ एथ श्रवणाचेनि द्वारें । तीर्थीं रिघतां सोपारें । ज्ञानदेव ह्मणे दातारें । माझेनि केलें ॥ ८ ॥ तीरें संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाटी शब्द सोपानें । रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥ ९ ॥ ह्मणोनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें । प्रयागमाधव विश्वरूप पहावें । येतुलेनि संसारासि द्यावें । तिळोदक ॥ १० ॥ हें असो ऐसे सावयव । एथ सौरसिनले आथि रसभाव । जेथ श्रवणसुखाची राणीव । जोडली जगा ॥ ११ ॥ जेथ शांताद्भुत रोकडे । आणि येरां रसां पडेपें जोडे । हें अल्पचि परि उघडें । कैवल्य जेथ ॥ १२ ॥ तो हा अकरावा अध्याव । जो देवाच्या आपणपें विसवंतीं ठाव । परि अर्जुन सदैवांचा राव । जे एथही पातला ॥ १३ ॥ एथ अर्जुनचि काय ह्मणों पातला । आजि ओंवडतयाही सुकाळ जाहाला । जे गीतार्थ आला । मऱ्हाठिये ॥ १४ ॥

---

१ श्रीकृष्ण. २ आरंभ करील. ३ रीतीनें. ४ अध्यायीं. ५ शांत व अद्भुत दोनी रसांत. ६ मेजवानीस, पाहुणचारास. ७ पंक्तीस आलेल्यांस. ८ लग्नसमारंभांत. ९ अलंकार. १० मराठी भाषेच्या. ११ पालखींत. १२ शोभले. १३ ओंजळींत. १४ आलिंगनास. १५ सूर्य चंद्र. १६ एकोपा. १७ मिळाले. १८ पवित्र. १९ कर्णेंद्रियद्वारा. २० निवृत्तिनाथानें, दात्यानें. २१ अगम्य. २२ घाट. २३ फांटा. २४ मूर्तिमंत. २५ भरास आले. २६ राज्य. २७ आश्रय. २८ मोक्षसुख. २९ मूळ जागा. ३० भाग्यवानांचा. ३१ भलत्या कोणासही.

याचिलागीं माझें । विनविलें आइकीजे । तरि अवधान दीजे । सज्जनीं तुह्मी ॥ १५ ॥ तेवींचि तुह्मां संतांचिये सभे । ऐसी सलगी कीर करूं [1]नलभे । परि मानावें जी तुह्मी लोभें । अपत्या मज ॥ १६ ॥ अहो [2]पुंसा आपणचि पढविजे । मग पढे तरी माया [3]तुकिजे । कां करविलेनि [4]चोजें न रिझे । बाळका माय ॥ १७ ॥ तेविं मी जें जें बोलें । तें प्रभु तुमचेंचि शिकविलें । ह्मणोनि [5]अवधारिजो आपुलें । आपण देवा ॥ १८ ॥ हें [6]सारस्वताचें गोड । तुह्मींचि लाविलें जी झाड । तरी आतां [7]अवधानामृतें [8]वाड । सिंपोनि कीजे ॥ १९ ॥ मग हें रसभाव फुलीं फुलेल । [9]नानार्थ फळभारें फळा येइल । तुमचेनि [10]धर्में होइल । [11]सुरवाड जगा ॥ २० ॥ या बोला संत [12]रिझले । ह्मणती तोषलों गा भलें केलें । आतां सांगें जें बोलिलें । अर्जुनें तेथें ॥ २१ ॥ तंव निवृत्तिदास ह्मणे । जी कृष्णार्जुनाचें बोलणें । मी प्राकृत काय सांगों जाणें । परि सांगवा तुह्मी ॥ २२ ॥ अहो रानींचिया [13]पालेखाइरा । [14]नेर्वाणें करविलें लंकेश्वरा । एकला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा । न [15]जिणेचि काई ॥ २३ ॥ ह्मणोनि समर्थ जें जें करी । तें [16]नेहोनये चराचरीं । तुह्मी संत तयापरी । बोलवा मातें ॥ २४ ॥ आतां बोलिजतसे आइका । हा गीताभाव [17]निका । जो श्रीवैकुंठनायका । [18]मुखौनि निघाला ॥ २५ ॥ बापबाप ग्रंथ गीता । जो वेदीं [19]प्रतिपाद्य देवता । तो श्रीकृष्ण वक्ता । जिये ग्रंथीं ॥ २६ ॥ तेथिंचें गौरव कैसें [20]वानावें । जें श्रीशंभूचिये [21]मैती नागवे । त आतां नमस्कारिजे जिवें भावें । हेंचि भलें ॥ २७ ॥ मग आइका तो किरीटी । घालूनि विश्वरूपीं [22]दिठी । पहिली कैसी [23]गोठी । करिता जाहाला ॥ २८ ॥ हें सर्वही सर्वेश्वर । ऐसा [24]प्रतीतिगत जो [25]पतिकर । तो बाहिरि होआवा [26]गोचर । लोचनासी ॥ २९ ॥ हे जिवाआंतुली [27]चाड । परि देवासि सांगतां [28]सांकड । कां जें विश्वरूप [29]गूढ । कैसेनि पुसावें ॥ ३० ॥ ह्मणे मागा कवणी [30]कंहीं । जें [31]पढियंतेनें पुसिलें नाहीं । तें सहसा कैसें काई । सांगा ह्मणों ॥ ३१ ॥ मी जरी [32]सलगीचा चांग । तरि काय [33]आइसीहूनि [34]अंतरंग । परि तेहीं हा प्रसंग । [35]बिहाली पुसों ॥ ३२ ॥ माझी आवडे तैसी सेवा जाहाली । तरि काय होईल गरुडाचिया येतुली । परि तोहीं हे बोलीं । करीच्चिना ॥ ३३ ॥ मी काय सनकादिकांहूनि [36]जवळा । परि तयांही

---

१ योग्य नाहीं. २ राघूला. ३ डोलवावा. ४ कौतुकानें. ५ श्रवण करावें. ६ विद्येचें. ७ एकाग्र अंतःकरणरूप अमृतानें, (पाण्यानें.) ८ वाढिवणें. ९ अनेकविध अर्थ. १० योगें. ११ सुख. १२ प्रसन्न झाले. १३ पाला खाणाऱ्या वांदरांकरवीं. १४ पराभव. १५ जिंकणार नाहीं काय? १६ न होण्याजोगेंही घडून येतें. १७ खरा. १८ मुखांतून. १९ सांगण्यायोग्य. २० वर्णावें. २१ बुद्धीला आकळत नाहीं. २२ दृष्टि. २३ गोष्ट. २४ अनुभवीं असलेला. २५ अनुभव. २६ प्रत्यक्ष. २७ इच्छा. २८ संकट. २९ गुह्य. ३० कधीं. ३१ आवडत्यानें. ३२ "चांगल्या" स्नेहांतला. ३३ लक्ष्मीपेक्षां. ३४ जिवलग. ३५ भ्याली. ३६ जवळचा.

नागवेचि हा चाळा । मी आवडेन काय प्रेमळां[1] । गोकुळींचिया ऐसा ॥ ३४ ॥ तयांतेंही लेंकुरपणें झकविलें[2] । ऐकाचे[3] गर्भवासही साहिले । परि विश्वरूप हें राहाविलें । नवलांच कवणा ॥ ३५ ॥ हा ठायवरी[4] गुज[5] । याचियें अंतरांचे हें निज । केवि उराउरी[6] मज । पुसों ये पां ॥ ३६ ॥ आणि न पुसेंचि जरी ह्मणे । तरि विश्वरूप देखिलियाविणें । सुख नोहेचि परि जिणें । तेंही विपायें[8] ॥ ३७ ॥ ह्मणोनि आतां पुसों अळुमाळसें[9] । मग करूं देवा ठाके[10] तैसें । येणें प्रवर्तला सांध्वसें[11] । पार्थ बोलों ॥ ३८ ॥ परि तेंचि ऐसेनि भावें । जे एका दों उत्तरांसवें । दावीं विश्वरूप आघवें । झाडा देउनी ॥ ३९ ॥ अहो वासरूं देखिलयाचिसाठीं । धेनु खडबडोनि मोहें उठी । मग स्तनामुखाचिये भेटीं । काय पान्हा[12] धरे ॥ ४० ॥ पाहा पां तया पांडवाचेनि नांवें । जो कृष्ण रानींही प्रतिपाळूं[13] धांवे । तयातें अर्जुनें जव पुसावें । तंव सोंहील[14] काई ॥ ४१ ॥ तो सहजेंचि स्नेहाचें अवतरण[15] । आणि येरू स्नेहा घातलें आहे मांजवण[16] । ऐयिसे मिळणीं वेगळेपण । उरे हेंचि वेहु[17] ॥ ४२ ॥ ह्मणोनि अर्जुनाचिया बोलासरिसा । देव विश्वरूप होईल आपैसा[18] । तोचि पहिला प्रसंग ऐसा । ऐकिजे तरी ॥ ४३ ॥

अर्जुन उवाच–**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥**

मग पार्थ देवातें ह्मणे । जी तुह्मी मजकारणें । मज वाच्य केलें जें न बोलणें । कृपानिधे ॥ ४४ ॥ जें महाभूतें ब्रह्मीं आटती । जीव महदादिचे[19] ठाय फिटती । तैं जें देव होऊनि ठाकती[20] । तें विसवणें शेषींचें ॥ ४५ ॥ होतें हृदयाचिये परिवरीं[21] । ठेविलें कृपणाचिये परी । शब्दब्रह्मासिही[22] चोरी । जयाची केली ॥ ४६ ॥ तें तुह्मी आजि आपुलें । मजपुढां हियें[23] फोडिलें । जया[24] अध्यात्मा वोवाळिलें । ऐश्वर्य हरें ॥ ४७ ॥ तें वस्तु मज स्वामी । एकीहेळां[25] दिधली तुह्मी । हें बोलों तरी आह्मी । तुजपासोनि भिन्न कैंचें ॥ ४८ ॥ परि साचचि महामोहाचिये पुरीं । बुडालिया देखोनि सीसेंवरी[26] । तुवां आपणपें घालोनि श्रीहरी । मग काढिलें मातें ॥ ४९ ॥ एक तूंवांचूनि कहीं । विश्वीं दुजियाची भाष[27] नाहीं । कीं आमुचें कर्म पाहीं । जे आह्मी आथीं[28] ह्मणों ॥ ५० ॥ मी जगीं एक अर्जुन । ऐसा देहीं

---

१ भाविक गोपाळां. २ फसविलें. ३ अंबरीषार्थ. ४ हे एवढे, आजपर्यंत. ५ गुह्य. ६ झडकर. ७ सांचणें. ८ व्यर्थ, क्वचित. ९ थोडकेंसें. १० आवडेल तसें. ११ भयानें. १२ पान्हा चोरेल. १३ रक्षणास. १४ उपेक्षील काय. १५ मूर्ति. १६ कैफ. १७ चमत्कार. १८ आपोआप. १९ प्रकृति, अविद्या. २० राहातीं. २१ आवारांत. २२ वेदास. २३ हृदयींचें गुह्य. २४ ज्या आध्यात्मासाठीं शिवानें ऐश्वर्य सोडून स्मशानवास केला. २५ एका क्षणांत. २६ डोक्यापर्यंत. २७ नांव. २८ आहे ह्मणतों.

वाढे अभिमान । आणि कौरवांतें इया स्वजन । आपुले ह्मणें ॥ ५१ ॥ याहीवरी यांतें मी मारीन । ह्मणें तेणें पापें कें[1] रिगेन । ऐसें देखत होतों दुःस्वप्न । तों चेवविला[2] प्रभु ॥ ५२ ॥ देवा गंधर्वनगरींची[3] वस्ती । सोडूनि निघालों लक्ष्मीपती । होतों उदकाचिया आर्ती[4] । रोहिणी[5] पीत ॥ ५३ ॥ जी किरडूं तरी कापडाचें । परी लहरी येतहोतिया साचें । ऐसें वायां मरतयां जीवांचें । श्रेय[6] तुवां घेतलें ॥ ५४ ॥ आपुलें प्रतिबिंब[7] नेणतां । सिंह कुवां[8] घालील देखोनि आतां । ऐसा धरिजे तेविं अनंता । राखिलें मातें ॥ ५५ ॥ येऱ्हवीं माझा तरी येतुलेवरी[9] । एथ निश्चय होता अवधारीं । जे आतांचि सातांही सागरीं । एकत्र मिळिजे ॥ ५६ ॥ हें जगचि आघवें बुडावें । वरि आकाशही तुटोनि पडावें । परि झुंझणें न घडावें । गोत्रजेंसी मज ॥ ५७ ॥ ऐसिया अहंकाराचिये [10]वोढीं । मियां आग्रहजळीं दिधली होती बुडी । चांगचि तूं जवळां येऱ्हवीं काढी । कवण मातें ॥ ५८ ॥ नौथिलें आपणपां एक मानिलें । आणि नव्हतया[11] नाम गोत्र ठेविलें । थोर पिसें होतें लागलें । परि राखिलें तुह्मीं ॥ ५९ ॥ मागां जळत काढिलें [13]जोहरीं । तैं तें देहासीच भय अवधारीं । आतां हे जोहरें[14]वाहार दुसरी । चैतन्यासकट ॥ ६० ॥ दुराग्रहें हिरण्याक्षें । माझी बुद्धी वसुंधरा सूदली[15] काखे । मग मोहार्णव गवाक्षें[16] । रिघोनि ठेला ॥ ६१ ॥ तेथ तुझेनि गोसांवीपणें[17] । एकवेळ बुद्धीचिया ठाया येणें । हें दुसरें वराह होणें । पडिलें तुज ॥ ६२ ॥ ऐसें अपार तुझें केलें । एकी वाचा काय मी बोलें । परि [18]पांचही पालन मोकलिले[19] । मजप्रति ॥ ६३ ॥ तें कांहीं न वचेचि वायां । भलें यश फांवलें[20] देवराया । जे साद्यंत माया । निरसिली माझी ॥ ६४ ॥ अजी आनंदसरोवरींचीं कमळें । तैसे हे जे तुझे डोळे । आपुलिया प्रसादाचीं राउळें[21] । जयालागीं करिती ॥ ६५ ॥ हां हो तयांही आणि मोहाची भेटी । हे कायसी पोंबळी[22] गोठी । कैंचि[23] मृगजळाची वृष्टी । वडवानळेंसीं ॥ ६६ ॥ आणि मी तंव दातारा । ये कृपेचिये रिघोनि गाभारां । घेत आहें चारा । ब्रह्मरसाचा ॥ ६७ ॥ तेणें माझा जी मोह जाये । एथ [24]विस्मो कांहीं काय आहे । तरी उद्धरलों कीं तुझे पाये । शिवतले आहाती ॥ ६८ ॥

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाऽव्ययम् ॥ २ ॥**

पैं [25]कमलायतडोळसा । सूर्यकोटितेजसा । मियां तुजपासोनि महेशा । परिसिलें आजि

१ कोठें. २ जागा केला. ३ आकाशांतील ढगांवर कल्पित नगरींची. ४ इच्छेनें. ५ मृगजळ. ६ पुण्य. ७ छाया. ८ विहिरींत. ९ येथवर. १० ओढ्यांत. ११ लटकें. १२ नसणाऱ्याला. १३ लाक्षागृहांतून. १४ अग्नीपीडा. १५ घातली. १६ झरोक्यांतून. १७ सामर्थ्यानें. १८ पंचप्राण. १९ दिले. २० जोडलें. २१ विश्रांतिमंदिरें. २२ तुच्छ. २३ कोणीकडे. २४ नवल. २५ कमलपत्रवत् विस्तीर्ण आहेत नेत्र ज्याचे अशा.

॥ ६९ ॥ इयें भूतें जयापरी होती । अथवा लया हन जैसेनि जाती । तें मजपुढां प्रकृती । विवंचिली[1] देवें ॥ ७० ॥ आणि प्रकृती[2] कीर[3] उगाणा[4] दिधला । पर[5]पुरुषाच्याही ठाव दाविला । जयाचा महिमा पांघरोनि जाहला । धडौता[6] वेद ॥ ७१ ॥ जी शब्दराशि[7] वाढ जीये । कां धर्माऐशिया रत्नातें विये । ते एथिचे प्रभेचे पांये । वोळगे[8] म्हणोनि ॥ ७२ ॥ ऐसें अगाध माहात्म्य । जें सकळ मार्गैकगम्य[9] । जें स्वात्मानुभवरम्य । तें इयापरी दाविलें ॥ ७३ ॥ जैसा केरुं[10] फिटलिया आभाळीं । दिठी रिगे सूर्यमंडळीं । कां हातें सारूनि बोबुळी[11] । जळ देखिजे ॥ ७४ ॥ ना तरी उकलूनियां सापाचे वेढे । जैसें चंदना खेंव[12] देणें घडे । अथवा विवसी पळे मग चढे । निधान[13] हाता ॥ ७५ ॥ तैसी प्रकृती हे आड होती । ते देवेंचि सारोनि परौती । मग परतत्त्व मौजिये[14] मती । शेजार केलें ॥ ७६ ॥ म्हणोनि इयेविषयींचा मज देवा । भरंवसा कीर जाहाला जींवा । परि आणिक एक हेवा[15] । उपनला[16] असे ॥ ७७ ॥ तो भिडैं[17] जरी म्हणों राहो । तरी आना[18] कवणा पुसों जावों । काय तुजवांचोनि ठावो । जाणत आहों आह्मी ॥ ७८ ॥ जळचर जळाचा ओभार[19] धरी । बाळक स्तनपानीं उपरोध[20] करी । तरी तया जिणेयां[21] श्रीहरी । आन उपायो असे ॥ ७९ ॥ म्हणोनि भीडसांकड[22] न धरावें । जींवा आवडे तेंही तुजपुढां बोलावें । तंव राहें म्हणितलें देवें । चाड सांगें ॥ ८० ॥

एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।
द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥

मग बोलिला तो. किरीटी । म्हणे तुह्मीं केली जे गोठी । तिया प्रतीतीची[23] दिठी । निवाली माझी ॥ ८१ ॥ आतां जयाचेनि संकल्पें । हे लोकपरंपरा होय हारपे । जया ठायातें आपणपें[24] । मी ऐसें म्हणसी ॥ ८२ ॥ तें मुद्दल रूप तुझें । जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें । सुरकार्याचेनि व्याजें[25] । घेवोंघेवों येसी ॥ ८३ ॥ पैं जळशयनाचिया अवगणिया[26] । कां मत्स्यकूर्म इया मिरवणिया । खेळ सरलिया तूं गुणिया[27] । सांठविसी जेथ ॥ ८४ ॥ उपनिषदें जें गाती । योगिये हृदयीं रिगोनि पाहाती । जयातें सनकादिक आहाती । पोटाळुनियां[28] ॥ ८५ ॥ ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे । तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ॥ ८६ ॥ देवें फेडूनियां सांकड[29] । लोभें पुसिली

१ विचारपूर्वक सांगितली. २ मायेचा. ३ निःसंशय. ४ झाडा. ५ परमात्म्याचा. ६ धड वक्र-युक्त. ७ शब्दसमूह. ८ आश्रय करी. ९ सर्व मार्गांनीं एकत्र जाणण्यास योग्य. १० अभ्रादिकाची फलकट. ११ गोंडाळ, शेवाळ. १२ आलिंगन. १३ ठेवा. १४ मति तत्त्वनिष्ठ केली. १५ इच्छा. १६ उत्पन्न झाला. १७ मर्यादेनें. १८ दुसऱ्याला. १९ उपकार. २० भीड. २१ वांचण्याला. २२ संकोच. २३ अनुभव. २४ आपणाला. २५ निमित्तानें. २६ सोंगानें. २७ गारुड्या. २८ आलिंगून. २९ संकोच.

॥ ६९ ॥ इयें भूतें जयापरी होती । अथवा लया हन जैसेनि जाती । ते मजपुढां प्रकृती । विवंचिली[1] देवें ॥ ७० ॥ आणि प्रकृती[2] कीर[3] उगाणा दिधला । परपुरुषाचाही[5] ठाव दाविला । जयाचा महिमा पांघरोनि जाहला । धडौता[6] वेद ॥ ७१ ॥ जी शब्दराशि[7] वाढ जीये । कां धर्माऐशिया रत्नातें विये । ते एथिचे प्रभेचे पांयें । वोळंगे[8] ह्मणोनि ॥ ७२ ॥ ऐसें अगाध माहात्म्य । जें सकळ मार्गैकगम्य[9] । जें स्वात्मानुभवरम्य । तें इयापरी दाविलें ॥ ७३ ॥ जैसा केरुं[10] फिटलिया आभाळीं । दिठी रिगे सूर्यमंडळीं । कां हातें सारूनि बोंबुळी[11] । जळ देखिजे ॥ ७४ ॥ ना तरी उकलूनियां सापाचे वेढे । जैसें चंदना खेंव[12] देणें घडे । अथवा विवसी पळे मग चढे । निधान हाता ॥ ७५ ॥ तैसी प्रकृती हे आड होती । ते देवेंचि सारोनि परौती । मग परतत्व मोजिये[14] मती । शेजार केलें ॥ ७६ ॥ ह्मणोनि इयेविषयींचा मज देवा । भरंवसा कीर जाहाला जीवा । परि आणिक एक हेवा[15] । उपनला[16] असे ॥ ७७ ॥ तो भिडां[17] जरी ह्मणों राहे । तरी आना[18] कवणा पुसों जावों । काय तुजवांचोनि ठावो । जाणत आहों आह्मी ॥ ७८ ॥ जळचर जळाचा ओभार[19] धरी । बाळक स्तनपानीं उपरोध[20] करी । तरी तया जिणेयां[21] श्रीहरी । आन उपायो असे ॥ ७९ ॥ ह्मणोनि भीडसांकड[22] न धरावें । जीवा आवडे तेंही तुजपुढां बोलावें । तंव राहें ह्मणितलें देवें । चाड सांगें ॥ ८० ॥

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥**

मग बोलिला तो. किरीटी । ह्मणे तुह्मीं केली जे गोठी । तिया प्रतीतीची[23] दिठी । निवाली माझी ॥ ८१ ॥ आतां जयाचेनि संकल्पें । हे लोकपरंपरा होय हारपें । जया ठायातें आपणपें[24] । मी ऐसें ह्मणसी ॥ ८२ ॥ तें मुद्दल रूप तुझें । जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें । सुरकार्याचेनि व्याजें । घेवोंघेवों येसी ॥ ८३ ॥ पैं जळशयनाचिया अवगणिया[26] । कां मत्स्यकूर्म इया मिरवणिया । खेळ सरलिया तूं गुंणिया[27] । सांठविसी जेथ ॥ ८४ ॥ उपनिषदें जें गाती । योगिये हृदयीं रिगोनि पाहाती । जयातें सनकादिक आहाती । पोटाळूनियां ॥ ८५ ॥ ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे । तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ॥ ८६ ॥ देवें फेडूनियां सांकड । लोभें पुसिली

---

१ विचारपूर्वक सांगितली. २ मायेचा. ३ निःसंशय. ४ झाडा. ५ परमात्म्याचा. ६ धड वक्र-युक्त. ७ शब्दसमूह. ८ आश्रय करी. ९ सर्व मार्गांनीं एकच जाणण्यास योग्य. १० अभ्रादिकाची फलकट. ११ गोंडाळ, शेवाळ. १२ आलिंगन. १३ ठेवा. १४ मति तत्त्वनिष्ठ केली. १५ इच्छा. १६ उत्पन्न झाला. १७ मर्यादेनें. १८ दुसऱ्याला. १९ उपकार. २० भीड. २१ वांचण्याला. २२ संकोच. २३ अनुभव. २४ आपणाला. २५ निमित्तानें. २६ सोंगानें. २७ गारुड्या. २८ आलिंगून. २९ संकोच.

जरी चाड । तरि हेंचि एकी वाड[1] । आर्ति[2] जी मज ॥ ८७ ॥ तुझें विश्वरूप आघवें । माझिये दिठीसी गोचर[3] होआवें । ऐशी थोर आस जीवें । बांधोनि आहें ॥ ८८ ॥

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥**

परि आणीक एक एथ शार्ङ्गी[4] । तुज विश्वरूपातें देखावयालागीं । पैं योग्यता माझिया आंगीं । असे कीं नाहीं ॥ ८९ ॥ हें आपलें आपण मी नेणें । तें कां नेणसी जरी देव म्हणे । तरी रोगिया काय जाणे । निदान[5] रोगाचें ॥ ९० ॥ आणि जी आर्तीचेनि[6] पडिभरें । आर्त आपली ठाकी[7] पैं विसरे । जैसा तान्हेला म्हणे न पुरे । समुद्र मज ॥ ९१ ॥ ऐसा सचाडपणाचिये भुली । न सांभाळवे समस्या[8] आपुली । यालागीं योग्यता जेवि माउली । बाळकाची जाणे ॥ ९२ ॥ तयापरी श्रीजनार्दना । विचारिजो माझी संभावना[9] । मग विश्वरूपदर्शना । उपक्रम[10] कीजे ॥ ९३ ॥ तरि ऐसी ते कृपा करा । येऱ्हवीं नव्हे हें म्हणा अवधारा । वायां पंचमालापें[11] बधिरा । सुख केउतें[12] देणें ॥ ९४ ॥ येऱ्हवीं एकले बाँपियाचे[13] तृषे । मेघ जगापुरतें काय न वर्षे । परी जाहालीही वृष्टि उपेखे[14] । जऱ्हीं खडकीं होय ॥ ९५ ॥ चकोरा चंद्रामृत फांवलें[15] । येरां आण वाहूनि काय वारिलें । परि डोळयांवीण पाहिलें[16] । वायां जाय ॥ ९६ ॥ म्हणोनि विश्वरूप तूं सहसा । दाविसी कीर हा भरवसा । कां जे कँडाडा[17] आणि गेंहिसा[18] । माजि नित्य नवा तूं कीं ॥ ९७ ॥ तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र । पैं कैवल्य ऐसें पवित्र । वैरियांही दिधलें ॥ ९८ ॥ मोक्ष दुराराध्य[19] कीर होय । परि तोही आराधी तुझे पाय । म्हणोनि धाडिसी तेथ जाय । पाईका[20] जैसा ॥ ९९ ॥ तुवां सनकादिकांचेनि मानें । सायुज्यीं सौरस दिधला पूतने । जे विषाचेनि स्तनपानें । मारूं आली ॥ १०० ॥ हां गा राजसूय यागाचिया सभासदीं । देखतां त्रिभुवनाची मांदी । कैसा शतधा दुर्वाक्य शब्दीं । निस्तेजिलासी[21] ॥ १ ॥ ऐशिया अपराधिया शिशुपाळा । आपणपें ठावो दिधला गोपाळा । आणि उत्तानचरणाचिया[22] बाळा । काय ध्रुवपदीं[23] चाड ॥ २ ॥ तो वना आला याचि लागीं । जे बैसावें पितयाचिया वोसंगीं[24] । कीं तो चंद्रसूर्यादिकांपरिस जगीं । श्लाघ्य[25] केला ॥ ३ ॥ ऐसा वनवासियां[26] सकळां । देता एकचि तूं धसौंळा[27] । पुत्रा आळविता अजामिळा[28] । आपणपें देसी ॥ ४ ॥ जेणें उरीं हाणितलासि पांपरा[29] । तयाच्या चरण

---

१ मोठी. २ इच्छा. ३ प्रत्यक्ष दिसणें. ४ श्रीकृष्ण. ५ कारण. ६ आसक्तीनें. ७ योग्यता. ८ शंका. ९ योग्यता. १० प्रारंभ. ११ पंचमस्वरानें. १२ कसें. १३ चातकाचे. १४ व्यर्थ जाते. १५ प्राप्त झालें. १६ उजाडलें. १७ पढिकास, जाणत्यास. १८ नेणत्यास. १९ कष्टसाध्य. २० चाकर. २१ अपमानला गेलास. २२ उत्तानपादाच्या. २३ अढळपदीं. २४ मांडीवर. २५ स्तुत्य. २६ शरण आलेल्यास. २७ उदारा. २८ पुत्रमिषानें नारायणनामोच्चार घडलेल्या अजामिळाला. २९ लाथेनें.

वाहासी दातारा । अझुनी वैरियांचिया कलेवरा । विसंबसीना ॥ ५ ॥ ऐसा अपकारियां तुझा उपकार । तूं अपात्रींही परि उदार । दे दान ह्मणोनि दारवंठेकार । जाहालासि बळीचा ॥ ६ ॥ तूतें आराधीना आयकें । होती पुंसों बोलावीत कौतुकें । तिये वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाड केला ॥ ७ ॥ ऐसीं पाहूनि वायाणीं मिषें । आपणपें देवों लागसी वानिवसें । तो तूं कां अनारिसें । मजलागीं करिसी ॥ ८ ॥ हां गा दुभतयाचेनि पवाडें । जे जगाचें फेडी सांकडें । तिये कामधेनूचे पांडे । काय भुकेले ठातीं ॥ ९ ॥ ह्मणोनि मियां जें विनविलें कांहीं । तें देव न दाखविती हें कीर नाहीं । परि देखावयालागीं देई । पात्रता मज ॥ ११० ॥ तुझें विश्वरूप ओंकळे । ऐसें जरी जाणसी माझे डोळे । तरि आर्तीचे डोहळे । पुरवीं देवा ॥ ११ ॥ ऐसी यथेंठाव विनंती । जंव करूं सरला सुभद्रापती । तंव तया षड्गुणचक्रवर्ती । साहवेचिना ॥१२॥ तो कृपापीयूषसजळ । आणि येरु जवळां आला वर्षाकाळ । नाना श्रीकृष्ण कोकिळ । अर्जुन वसंत ॥ १३ ॥ ना तरी चंद्रबिंब वाटोळें । देखोनि क्षीरसागर उचंबळे । तैसा दुणेंही वरी प्रेमबळें । उल्लसित जाहाला ॥ १४ ॥ मग तिये प्रसन्नतेचेनि आटोपें । गाजोनि ह्मणितलें सक्रपें । पार्था देख देख अमुपें । स्वरूपें माझीं ॥ १५ ॥ एक विश्वरूप देखावें । ऐसा मनोरथ केला पांडवें । कीं विश्वरूपमय आघवें । करूनि घातलें ॥ १६ ॥ बाप उदार देव अपरिमित । याचक स्वेच्छा सर्वोदित । असे सहस्रवरी देत । सर्वस्व आपुलें ॥ १७ ॥ अहो शेषाचेहि डोळे चोरिले । वेद जयालागीं झकविले । लक्ष्मियेही राहाविलें । जिव्हार जें ॥ १८ ॥ तें आतां प्रगटूनी अनेकधा । करीत विश्वरूपदर्शनाचा धांदा । बाप भाग्या अगाधा । पार्थाचिया ॥ १९ ॥ जो जागता स्वप्नावस्थे जाये । तो जेवीं स्वप्नींचें आघवें होये । तेवीं अनंत ब्रह्मकटाह आहे । आपणचि जाहाला ॥ १२० ॥ ते सहसा मुद्रा सोडिली । आणि स्थूळदृष्टीची जवनीक फाडिली । किंबहुना उघडली । योगऋद्धी ॥ २१ ॥ परि हा हें देखेल कीं नाहीं ऐसी सेचि न करी कांहीं । एकसरां ह्मणतसे पाहीं । स्नेहातुर ॥ २२ ॥

श्रीभगवानुवाच—**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥**

अर्जुना तुवां एक दावा ह्मणितलें । आणि तेंचि दावूं तरि काय दाविलें । आतां देखें

---

१ शरीराला. २ सोडीत नाहींत. ३ द्वारपाळ. ४ राघूला. ५ सुख. ६ व्यर्थ. ७ वैकुंठरूप घर. ८ वेगळें. ९ अधिकपणानें. १० वासरें. ११ योग्यता. १२ जाणतां येईल. १३ इच्छेने. १४ यथायोग्य. १५ पुढें जाहाला. १६ ज्ञान, वैराग्य, यश, श्री, ऐश्वर्य, धर्म, यांचा राजा. १७ कृपामृतयुक्त. १८ अथवा. १९ पूर्णचंद्र. २० दुपटीपेक्षां अधिक. २१ मोठेपणानें. २२ गर्जोनि. २३ बहुत. २४ असंख्य. २५ गुप्त ठेविलें. २६ जिवाचें गुह्य. २७ धंदा. २८ ब्रह्मांड. २९ कृष्णरूप आकार. ३० स्थूलशरीराचा. ३१ आड येणारा पडदा. ३२ विचार. ३३ एकदम. ३४ प्रेमव्याप्त.

आघवें भरिलें । माझ्याचि रूपीं ॥ २३ ॥ एकें कृशें एकें स्थूळें । एकें [१]ऱ्हस्वें एकें विशाळें । [२]पृथुतरें सरळें । [३]अप्रांतें एकें ॥ २४ ॥ एकें [४]अनावरें प्रांजळें । [५]सव्यापारें एकें निश्चळें । उदासीनें स्नेहाळें । तीव्रें एकें ॥ २५ ॥ एकें [६]घूर्णितें सावधें । [७]असलगें एकें अगाधें । एकें उदारें अतिबद्धें । क्रुद्धें एकें ॥ २६ ॥ एकें शांतें सदामदें । स्तब्धें एकें सानंदें । गर्जितें [८]निःशब्दें । सौम्यें एकें ॥ २७ ॥ एकें साभिलाषें विरक्तें । [९]उन्निद्रितें एकें निद्रितें । परितुष्टें एकें [१०]आर्तें । प्रसन्नें एकें ॥ २८ ॥ एकें अशस्त्रें सशस्त्रें । एकें रौद्रें अति [११]मित्रें । भयानकें एकें विचित्रें । [१२]लयस्थें एकें ॥ २९ ॥ एकें [१३]जननलीलाविलासें । एकें पालनशीलें [१४]लालसें । एकें संहारकें [१५]सावेशें । साक्षिभूतें एकें ॥ १३० ॥ एवं नानाविधें परि बहुवसें । आणि दिव्य-तेजप्रकाशें । तेवींचि एकएका ऐसे । वर्णही नव्हे ॥ ३१ ॥ एकें [१६]तातलें [१७]सोंडेपंधरें । तैसीं [१८]कपिलवर्णें अपारें । एकें सर्वांगीं जैसें सिंदुरें । [१९]उंवरलें नभ ॥ ३२ ॥ एकें [२०]सांवियाचि [२१]चुळुकीं । जैसें ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं । एकें अरुणोदयासारिखीं । कुंकुमवर्णें ॥ ३३ ॥ एकें शुद्धस्फटिक[२२]सोज्वळें । एकें इंद्रनीळसुनीळें । एकें [२३]अंजनवर्णें सकाळें । रक्तवर्णें एकें ॥ ३४ ॥ एकें [२४]सत्कांचनसम पिंवळीं । एकें [२५]सजलजलदश्यामळीं । एकें [२६]चांपेगोरीं केवळीं । [२७]हरितें एकें ॥ ३५ ॥ एकें [२८]तप्तताम्रतांबडीं । एकें श्वेतचंद्र चोखडीं । ऐसीं नानावर्णें रूपडीं । देखें माझीं ॥ ३६ ॥ हे जैसे कां [२९]नानावर्ण । तैसें आकृतीही [३०]अनारिसेपण । [३१]लाजा [३२]कंदर्प रिघाला शरण । तैसीं सुंदरें एकें ॥ ३७ ॥ एकें अतिला-वण्यसाकारें । एकें [३३]स्निग्धवपु मनोहरें । शृंगारश्रियेचीं भांडारें । उघडिलीं जैसीं ॥ ३८ ॥ एकें [३४]पीनावयवमांसळें । एकें शुष्कें अतिविक्राळें । एकें [३५]दीर्घकंठें [३६]विताळें । विकटें एकें ॥ ३९ ॥ एवं नानाविधाकृती । इया पाहातां पार नाहीं सुभद्रापती । ययांच्या एकेकीं [३७]अंगप्रांतीं । देख पां जगा ॥ १४० ॥

पश्यादित्यान्वसून् रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥

जेथ [३८]उन्मीलन होत आहे दिठी । तेथ पसरती आदित्यांचिया सृष्टी । पुढती [३९]निमीलनीं मिठी । देत आहाती ॥ ४१ ॥ वदनींचिया वाफेसवें । होत ज्वाळामय आघवें । जेथ

१ ठेंगणीं. २ जाड. ३ अपार. ४ न आवरणारीं. ५ चंचळ. ६ असावध. ७ सोपीं. ८ शब्द-रहित. ९ जागृत. १० दुःखी. ११ सौम्य. १२ समाधिस्थ. १३ अवतार धरणारीं. १४ प्रीतियुक्त. १५ क्रोधयुक्त. १६ तापलेलें. १७ सोनें. १८ पिंगट. १९ माखलें. २० सहज. २१ सुंदर. २२ पांढरें. २३ काजळासारखीं. २४ दिव्य सुवर्णासारखें. २५ पाणी असलेल्या ढगाप्रमाणें. २६ चांफ्याच्या फुलाप्रमाणें. २७ हिरव्या रंगाचीं. २८ तापलेल्या तांब्यासारखीं लाल. २९ भिन्न-भिन्न. ३० वेगळाले. ३१ लाजेनें. ३२ मदन. ३३ तेजःपुंज शरीरें. ३४ पुष्ट शरीर मांसभरित. ३५ लांब कंठाचीं. ३६ मोठ्या टाळूचीं. ३७ अंगप्रदेशीं. ३८ उघडणें. ३९ मिटण्यांत.

पावकादिक पावे। समूह[1] वसूंचा ॥ ४२ ॥ आणि भ्रूलतांचे[2] शेवट। कोपें मिळों पाहती एकवाट। तेथ रुद्रगणाचे संघाट[3]। अवतरत[4] देखें ॥ ४३ ॥ पैं सौम्यतेचा वोलावा। मिती[5] नेणिजे अश्विनीदेवां। श्रोत्रीं[6] होती पांडवा। अनेक वायु ॥ ४४ ॥ यापरि एकेकाचिये लीळे। जन्मती सुरसिद्धांचीं कुळें। ऐसीं अपारें आणि विशाळें। रूपें इयें पाहीं ॥ ४५ ॥ जयातें सांगावया वेद बोबडे। पाहावया काळाचेंही आयुष्य थोकडें। धातयाही परि न सांपडे। ठाव जयाचा ॥ ४६ ॥ जयातें वेदत्रयी कधीं नायके। तियें इयें प्रत्यक्ष देख अनेकें। भोगीं आश्चर्याचीं कवतिकें। महासिद्धी ॥ ४७ ॥

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥**

इया मूर्तीचिया किरीटी। रोममुळीं देखे पां सृष्टी। सुरतरूतळवटीं। तृणांकुर जैसें ॥ ४८ ॥ वातायनाचेनि प्रभासें। उडत परमाणु दिसती जैसें। भ्रमत ब्रह्मकटाह तैसे। अवयवसंधीं ॥ ४९ ॥ एथ एकेकाचिया प्रांतदेशीं[10]। विश्व देख विस्तारेंसीं। आणि विश्वाही पैरौतें[11] मानसीं। जरी देखावें वर्ते ॥ १५० ॥ तरी इयेही विषयीं काहीं। एथ सर्वथा सांकडें नाहीं। सुखें आवडे तें माझिया देहीं। देखसी तूं ॥ ५१ ॥ ऐसें विश्वमूर्ती[12] तेणें। बोलिलें कारुण्यपूर्णें। तंव देखत आहे कीं नाहीं न म्हणे। निवांतचि येरु[13] ॥ ५२ ॥ एथ कां पां हा उगला[14]। म्हणोनि श्रीकृष्णें जंव पाहिला। तंव औत्सुक्याचें लेणें लेइला। तैसाचि आहे ॥ ५३ ॥

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥**

मग म्हणे उत्कंठे वोहट[15] न पडे। अझुनी सखाची सोय[16] न सांपडे। परि दाविलें तें फुडें[17]। नाकळेचि यया ॥ ५४ ॥ हें बोलोनि देव हांसिले। हांसोनि देखणिया[18] म्हणितलें। आम्ही विश्वरूप तरी दाविलें। परि देखसीच ना तूं ॥ ५५ ॥ यया बोला येरें विचक्षणें[19]। म्हणितलें हां जी कवणासि[20] तें उणें। तुम्ही बकाकरवीं[21] चांदिणें। चरऊं[22] पैहा[23] मा ॥ ५६ ॥ हांहो उटोनियां[24] आरिसा। आंधळिया दाऊं बैसा। बहिरिया पुढें हृषीकेशा। गोणीव[25] करा ॥ ५७ ॥ मकरंदकणाचा[26] चारा। जाणतां घालूनि दर्दुरा[27]। वायां धोंडा[28] शार्ङ्गधरा।

---

१ अष्टवसूंचा समुदाय. २ भिवयांचे. ३ समुदाय. ४ उपजत. ५ संख्या. ६ कानांत. ७ अल्प. ८ ब्रह्मदेवालाही. ९ खिडकीच्या उजेडानें. १० अवयवभागांत. ११ दुसरें. १२ विश्वरूपी श्रीकृष्णानें. १३ अर्जुन. १४ उगाच बसला. १५ आवड हेच अलंकार. १६ कमीपणा. १७ मार्ग. १८ स्पष्ट. १९ पाहाणाऱ्यास. २० बुद्धिवानानें. २१ हा दोष कोणाकडे. २२ बगळ्याच्या हातून २३ पाहतां ना? २४ स्वच्छ पुसून. २५ गायन. २६ पुष्पपरागांचा. २७ बेडुक. २८ घालवितां.

कोपा कवणा ॥ ५८ ॥ जें [1]अतींद्रिय म्हणोनि [2]व्यवस्थिलें । केवळ ज्ञानदृष्टीचिया भागा [3]फिटलें । तें तुह्मी चर्मचक्षुपुढें [4]सूदलें । मी कैसेनि देखें ॥ ५९ ॥ परि हें तुमचें उणें न बोलावें । मीचि [5]साहें तेंचि बरवें । एथ [6]आथि ह्मणितलें देवें । मानूं बापा ॥ १६० ॥ साच विश्वरूप जरि आह्मी दावावें । तरी आधीं देखावया सामर्थ्य कीं द्यावें । परि बोलत प्रेमभावें । [7]वेसाळ गेलों ॥ ६१ ॥ काय जाहालें न [8]वाहतां भुंई पेरिजे । तरी तो वेलु विलया जाइजे । तरीं आतां माझें निजरूप देखिजे । ते दृष्टी देवों तुज ॥ ६२ ॥ मग तिया दृष्टी पांडवा । आमुचा ऐश्वर्ययोग आघवा । देखोनियां अनुभवा । [9]माजिवडा करीं ॥ ६३ ॥ ऐसें तेणें [10]वेदांतवेद्यें । [11]सकळलोकैकआद्यें । बोलिलें [12]आराध्यें । जगाचेनि ॥ ६४ ॥

**संजय उवाच–एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥**

पैं कौरवकुळचक्रवर्ती । मज हाचि विस्मय पुढतपुढती । जे श्रियेहूनि त्रिजगतीं । सदैव असे कवणी ॥ ६५ ॥ ना तरी खुणेचें [13]वानावयालागीं । श्रुतीवांचूनि दावा पां जगीं । ना सेवकपण तरी आंगीं । शेषाच्याचि [14]आथि ॥ ६६ ॥ हां हो जयाचेनि [15]सोसें । शिणत आठही [16]पाहार योगी जैसे । [17]अनुसरले गरुडाऐसें । कवण आहे ॥ ६७ ॥ परि तें आघवेंचि एकीकडे ठेलें । [18]सांपें कृष्णसुखा [19]एकंदरें जाहालें । जिये दिवसींहूनि जन्मले । पांडव हे ॥ ६८ ॥ परि पांचांही आंत अर्जुना । श्रीकृष्ण सावियेंचि जाहाला अधीना । [21]कामुक कां जैसा [22]अंगना । [23]आपैता कीजे ॥ ६९ ॥ पढविलें पाखिरूं ऐसें न बोले । यापरी क्रीडामृगही तैसा न चले । कैसें दैव एथें [24]सुरवाडलें । तें [25]जाणों नये ॥ १७० ॥ आजि परब्रह्म हें सगळें । भोगावया सदैव याचेचि डोळे । कैसे वाचेचे हन लळे । पाळीत असे ॥ ७१ ॥ हा कोपे कीं निवांत साहे । हा रुसे तरी [26]बुझावित जाये । नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ॥ ७२ ॥ येऱ्हवीं विषय जिणोनि[27] जन्मले । जे शुकादिक [28]दादुले । ते विषयचि [29]वानितां जाहाले । [30]भाट ययाचे ॥ ७३ ॥ हा योगियांचें [31]समाधिधन । कीं होऊनि ठेलें पार्थाअधीन । यालागिं विस्मय माझें मन । करीतसे राया ॥ ७४ ॥ तेवींचि संजय ह्मणे कायसा । विस्मयो एथें [32]कौरवेशा । श्रीकृष्णें स्वीकारिजे तया ऐसा । भाग्योदय होय ॥ ७५ ॥

---

१ इंद्रियांस अगोचर. २ शास्त्रानें सांगितलें. ३ प्राप्त झालें. ४ ठेवलें. ५ उगा रहावें. ६ खरें आहे. ७ विस्मरण झालें. ८ न नांगरतां. ९ मध्यें, अनुभवांतर्गत. १० उपनिषदांनींच ज्याचें ज्ञान होतें अशा कृष्णानें. ११ मूळपुरुषानें. १२ पूज्य. १३ वर्णन करावयाकरितां. १४ आहे. १५ इच्छेनें. १६ प्रहर. १७ सेवा करणारे. १८ सांप्रत. १९ एकवट. २० सगळाच. २१ विषयीपुरुष. २२ स्त्रियेनें. २३ स्वाधीन. २४ अनुकूळ झालें. २५ जाणतां येत नाहीं. २६ समजावीत. २७ जिंकून. २८ समर्थ. २९ वर्णितां. ३० स्तुतिपाठक. ३१ समाधिरूप भाग्य. ३२ धृतराष्ट्रा.

ह्मणोनि तो देवांचा रावो। ह्मणे पार्थातें तुज दिव्य दृष्टि देवों। जया विश्वरूपाचा ठावो। देखसी तूं ॥ ७६ ॥ ऐसीं [1]श्रीमुखौनि अक्षरें। निघती ना जंव एकसरें। तंव अविद्येचें आंधारें। जावोंचि लागे ॥ ७७ ॥ तीं अक्षरें नव्हती देखा। ब्रह्मसाम्राज्य[2]दीपिका। अर्जुनालागीं [3]चित्कळिका। उजळलिया श्रीकृष्णें ॥ ७८ ॥ मग दिव्यचक्षुप्रकाश जाहाला। तया ज्ञानवृष्टी फांटा फुटला। ययापरी दाविता जाहाला। ऐश्वर्य आपुलें ॥ ७९ ॥ हे अवतार जे सकळ। ते जिये समुद्रींचे कां [4]कल्लोळ। विश्व हें मृगजळ। जया [5]रश्मीस्तव दिसे ॥ १८० ॥ जिये अनादिभूमिके [6]निटे। चराचर हें चित्र उमटे। [7]आपणपें [8]श्रीवैकुंठें। दाविलें तया ॥ ८१ ॥ मागां बाळपणीं येणें श्रीपती। जैं एकवेळ खादली होती माती। तैं कोपोनियां हातीं। [9]यशोदां धरिला ॥ ८२ ॥ मग [10]भेणें भेणें जैसें। मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें। चवदाही भुवनें सावकाशें। दाविलीं तिये ॥ ८३ ॥ ना तरी मधुवनीं [11]ध्रुवासि केलें। जैसें [12]कपोल शंखें [13]शिवतलें। आणि वेदांचियेही मती ठेलें। तें लागला बोलों ॥ ८४ ॥ तैसा [14]अनुग्रह पैं राया। श्रीहरी केला धनंजया। आतां कवणेकडे ही माया। ऐसी भाष नेणेचि तो ॥ ८५ ॥ एकसरें ऐश्वर्य-तेजें [15]पोहलें। तया चमत्काराचें [16]एकार्णव जाहालें। चित्त [17]समाजीं बुडोनि ठेलें। विस्मयाचिया ॥ ८६ ॥ जैसा [18]आब्रह्म पूर्णोदकीं। पोहे मार्कंडेय [19]एकाकी। तैसा विश्वरूपकौतुकीं। पार्थ लोळे ॥ ८७ ॥ ह्मणे केवढें गगन एथ होतें। तें कवणें नेलें पां [20]केउतें। तीं चराचरें महाभूतें। काय जाहालीं ॥ ८८ ॥ दिशांचे ठावही हारपले। [21]अधोर्ध्व काय नेणों जाहालें। [22]चेइलियां स्वप्न तैसे गेले। लोकाकार ॥ ८९ ॥ [23]नां ना सूर्यतेजप्रतापें। सचंद्र [24]तारांगण जैसें लोपे। तैसी गिळिली विश्वरूपें। प्रपंचरचना ॥ १९० ॥ तेव्हां मनासी मनपण न स्फुरे। बुद्धि आपणपें न सांवरे। इंद्रियांचे [25]रश्मी माघारे। हृदयवरी भरले ॥ ९१ ॥ तेथ [26]तटस्थ्या ताटस्थ्य पडिलें। [27]टकासी टक लागलें। जैसें मोहनास्त्र घातलें। [28]विचारजातां ॥ ९२ ॥ तैसा विस्मित पाहे [29]कोडें। तंव पुढां होतें चतुर्भुज रूपडें। तेंचि नानारूप चहूंकडे। मांडोनि ठेलें ॥ ९३ ॥ जैसे वर्षाकाळींचे [30]मेघौडे। कां महाप्रळयींचें तेज वाढे। तैसें आपणावीण कवणीकडे। नेदीचि उरों ॥ ९४ ॥ प्रथम स्वरूपसमाधान। पावोनि ठेला अर्जुन। सवेंचि उघडिले लोचन। तंव विश्वरूप देखे ॥ ९५ ॥ [31]इहींचि दोहीं डोळां। पाहावें विश्वरूपा सकळा। तो श्रीकृष्णें सोहळा। पुरविला ऐसा ॥ ९६ ॥

---

१ श्रीकृष्णाच्या मुखांतून. २ दिवटी, मशाल. ३ ज्ञानदीप. ४ तरंग. ५ किरणांच्या योगानें. ६ नीट, स्वच्छ. ७ मूळस्वरूपानें. ८ श्रीकृष्णानें. ९ यशोदेनें. १० भीत भीत. ११ स्तुति करूं इच्छिणाऱ्या ध्रुवाला. १२ गाल. १३ स्पर्शिलें. १४ उपदेश. १५ उजाडलें. १६ समुद्रमय. १७ समुदायांत. १८ ब्रह्मापर्यंत. १९ एकटा. २० कोणीकडे. २१ खालींवर २२ जागा झालेल्याला. २३ अथवा. २४ नक्षत्रसमूह. २५ वृत्ति. २६ स्तब्धतेला. २७ लक्ष. २८ बुद्धिवंतास. २९ आवडीनें. ३० मेघ. ३१ या ज्ञानदृष्टीनें.

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥

मग तेथ सैंघ[1] देखे वदनें । जैसीं रमानायकाचीं राजभुवनें । नाना प्रगटलीं निधानें[2] । लावण्यश्रियेचीं ॥ ९७ ॥ कीं आनंदाचीं वनें सासिन्नलीं[3] । जैसी सौंदर्या राणीव जोडली । तैसीं मनोहरें देखिलीं । हरीचीं वक्त्रें तेणें ॥ ९८ ॥ तयाहीमाजि एकेकें । सावियाचि[4] भयानकें । काळरात्रीचीं कटकें[5] । उठावलीं जैसीं ॥ ९९ ॥ कीं मृत्यूसीचि मुखें जाहालीं । हो कां जे भयाचीं दुर्गें पन्नासिलीं[6] । कीं महाकुंडें उघडलीं । प्रळयानळाचीं ॥ २०० ॥ तैसीं अद्भुतें भयासुरें । तेथ वदनें देखिलीं वीरें । आणिकें असाधारणें साळंकारें । सौम्यें बहुतें ॥ १ ॥ पैं ज्ञानदृष्टीचेनि अवलोकें[7] । परि वदनाचा शेवट न[8] टके । मग लोचन ते कवतिकें । लागला पाहों ॥ २ ॥ तंव नानावर्णें कमळवनें । विकासिलीं तैसे अर्जुनें । नेत्र देखिले पालिंगनें[9] । आदित्यांचीं ॥ ३ ॥ तेथेंचि कृष्णमेघाचिया दाटी । माजि कल्पांत विजूचिया फुंटी[10] । तैसिया वन्हिपिंगळा[11] दिठी । भ्रूभंगातळीं[12] ॥ ४ ॥ हें एकैक आश्चर्य पाहातां । तिये एकेचि रूपीं पांडुसुता । दर्शनाची अनेकता । प्रतिफळली[13] ॥ ५ ॥ मग ह्मणे चरण ते कवणेकडे । केउते मुकुट कें [14]दोर्दंडें । ऐसी वाढविताहे कोडें । चोंड[15] देखावयाची ॥ ६ ॥ तेथ भाग्यनिधि पार्था । कां विफलत्व होईल मनोरथा । काय पिनाकपाणीचिया[16] भाता । वांयकांडीं[17] आहाती ॥ ७ ॥ ना तरी चतुराननाचिये[18] वाचे । काय आहाती लटिकिया अक्षरांचे सांचे । ह्मणोनि सोद्यंतपण[19] अपाराचें । देखिलें तेणें ॥ ८ ॥ जयाची सोयँ[20] वेदां नीकळे[21] । तयाचे सकळावयव एकेचि वेळे । अर्जुनाचे दोन्ही डोळे । भोगिते जाहाले ॥ ९ ॥ चरणौनी[22] मुकुटवरी । देखत विश्वरूपाची थोरी जे नाना रत्न अळंकारीं । मिरवत असे ॥ २१० ॥ परब्रह्म आपुलेनि आंगें । ल्यावया जाहाला आपणचि अनेगें[23] । तियें [24]लेणीं मी सांगें । काइसयासारिखीं ॥ ११ ॥ जिये प्रभेचिये झळाळा[25] । उजाळू[26] चंद्रादित्यमंडळा । जे[27] महातेजाचा जिव्हाळा । जेणें विश्व प्रगटे ॥ १२ ॥ तो दिव्यतेजशृंगार । कोणाचिये मतीसी होय गोचर । देव आपणपेंचि लेइले ऐसें वीर । देखत असे ॥ १३ ॥ मग तेथेंचि ज्ञानाचिया डोळां । पहात करपल्लवां[28] जंव सरळा । तंव तोडित कल्पांतीचिया ज्वाळा । तैसीं शस्त्रें झळकत देखे ॥ १४ ॥ आपण आंग आपण अळंकार । आपण हात आपण हतियार । आपण जीव आपण शरीर । देखे

---

१ पुष्कळ. २ ठेवणें. ३ भरास आलीं. ४ सहज. ५ सैन्यें. ६ रचिलीं. ७ पहाण्यानें. ८ न लागे. ९ समुदाय. १० विकास. ११ पिंगट. १२ भिवयांखालीं. १३ अनुभवास आली. १४ बाहू. १५ इच्छा. १६ महादेवाच्या भात्यांत. १७ निष्फळ बाण. १८ ब्रह्मदेवाच्या. १९ आरंभ व अखेर. २० मार्ग. २१ न सांपडे. २२ चरणांपासून. २३ पुष्कळ, अनेक. २४ अलंकार. २५ प्रकाशानें. २६ प्रकाशवान. २७ प्रभा. २८ हस्ताग्रांस.

चराचर कोंदलें[1] देवें ॥ १५ ॥ जयाचिया किरणाचे निखरेपणें[2] । नक्षत्रांचे होत फुटाणे । तेजें खिरडला[3] वन्हि ह्मणे । समुद्रीं रिघों ॥ १६ ॥ मग काळकूटकल्लोळीं कवळिले । नानामहाविजूंचे डोंग[4] उमटले । तैसे अपार कर देखिले । उद्यतायुधीं[5] ॥ १७ ॥

**दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥**

कीं [6]भेणें तेथूनि काढिली दिठी । मग कंठमुगुट पाहातसे किरीटी । तंव सुरतरूंची सृष्टी । जयापासोनि कां जाहाली ॥ १८ ॥ जियें महासिद्धींचीं [7]मूळपीठें । शिणली [8]कमळा जेथ [9]वैवटे । तैसीं कुसुमें [10]अतिचोखटें । [11]तुरंबिलीं देखिलीं ॥ १९ ॥ मुगुटावरी [12]स्तबक । ठायीं ठायीं पूजाबंध अनेक । कंठीं [13]रुळताति अलौकिक । [14]मौळादंड ॥ २२० ॥ स्वर्गीं सूर्यतेज वेढिलें । जैसें [15]पंधरेनें मेरुतें मढिलें । तैसें [16]नितंबींवरी [17]गोंढिलें । पीतांबर झळके ॥ २१ ॥ श्रीमहादेव कापुरें [18]उटिला । कां कैलास [19]पारदें [20]डंवरिला । नाना [21]क्षीरोदकें पांघरविला । क्षीरार्णव जैसा ॥ २२ ॥ जैसी [22]चंद्रमयाची घडी [23]उपलविली । मग गगनाकरवीं [24]बुंथी घेवविली । तैसी चंदन [25]पिंजरी देखिली । सर्वांगीं तेणें ॥ २३ ॥ जेणें स्वप्रकाशा कांती चढे । ब्रह्मानंदाचा [26]निदाघ मोडे । जयाचेनि [27]सौरभ्यें जीवित जोडे । [28]वेर्देवतीये ॥ २४ ॥ जयाचे [29]निर्लेपें अनुलेप करी । जें [30]अनंगही सर्वांगीं धरी । तया सुगंधाची थोरी । कवण [31]वानी ॥ २५ ॥ ऐसीं एकेक शृंगारशोभा । पाहतां अर्जुन जातसे [32]क्षोभी । तेवींचि देव बैसला कीं उभा । कीं सन्मुख हें नेणवे ॥ २६ ॥ बाहेर दिठी उघडूनि पाहे । तंव आघवें मूर्तिमय देखत आहे । मग आतां न पाहें ह्मणोनि उगा राहे । तरी आंतही तैसेंचि ॥ २७ ॥ [33]अनावर मुखें समोर देखे । तया भेणें पाठीमोरा जंव ठाके । तंव तयाहीकडे श्रीमुखें । कर चरण तैसेचि ॥ २८ ॥ अहो पाहातां कीर [34]प्रतिभासे । एथ [35]नवलावो काय असे । परि न पाहातांही दिसे । [36]चोजें आइका ॥ २९ ॥ कैसें [37]अनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहाणें आणि न पाहणें । तयाही सकट नारायणें । व्यापूनि घेतलें ॥ २३० ॥ ह्मणोनि आश्चर्याच्या [38]पुरीं एकीं । पडिला [39]टायेटौंव [40]तंडीं ठाकी । तंव चम-

---

१ भरले. २ तीव्रपणानें. ३ मागें हटला. ४ अरण्य. ५ उचललेल्या आयुधांसहित. ६ भयानें. ७ आद्यस्थानें. ८ लक्ष्मी. ९ विश्रांति पावे. १० चांगलीं. ११ मस्तकावर ठेविलीं. १२ घोस. १३ शोभतात. १४ पुष्पमाला. १५ सोन्यानें. १६ कटिपश्चाद्भागावर. १७ नेसविलें. १८ उटी लावली. १९ पाऱ्यानें. २० लिंपला. २१ पांढऱ्या वस्त्रानें. २२ चांदिण्याची. २३ उकलिली. २४ खोळ, बुरखा. २५ उटी. २६ दाह. २७ सुगंधानें. २८ पृथ्वीस. २९ निर्मळ. ३० शरीररहित. ३१ वर्णन करी. ३२ उद्विग्न. ३३ आवरण्यास अशक्य. ३४ दिसे. ३५ आश्चर्य. ३६ नवल. ३७ कृपेचें. ३८ प्रवाहांत. ३९ तत्काळ. ४० तीरीं.

स्काराचिया आणिकीं । महार्णवीं पडे ॥ ३१ ॥ ऐसा अर्जुन असाधारणें[1] । आपुलिया दर्शनाचेनि विंदाणें[2] । कवळूनि[3] घेतला तेणें । अनंतरूपें ॥ ३२ ॥ तो[4] विश्वतोमुख स्वभावें । आणि तेंचि दावावयालागीं पांडवें । प्रार्थिला आतां आघवें । होऊनि ठेला ॥ ३३ ॥ आणि दीपें कां सूर्यें प्रगटे । अथवा निमुटलिया[5] देखावेंचि खुंटे । तैसी दिठी नव्हे जे [6]वैकुंठें । दिधली आहे ॥ ३४ ॥ म्हणोनि किरीटीसि दोहीं परी । तें देखणें [7]देखें आंधारीं । हें संजय हस्तिनापुरीं । सांगतसे राया ॥ ३५ ॥ म्हणे किंबहुना अवधारिलें । पार्थें विश्वरूप देखिलें । नाना आभरणीं भरलें । विश्वतोमुख ॥ ३६ ॥

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥**

तिये अंगप्रभेचा देवा । नवलावा काइसया[9] ऐसा सांगावा । कल्पांतीं एकचि मेळांबा[10] । द्वादशादित्यांचा होय ॥ ३७ ॥ तैसे ते दिव्यसूर्य सहस्रवरी । जरी उदयजती कां एकेचि अवसरीं । तर्‍ही तया तेजाचीं थोरी । उपमूं नये ॥ ३८ ॥ आघवयाचि विजूंचा मेळावा कीजे । आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे । तर्वीचि ईशकही[11] मेळविजे । महातेजांचा ॥ ३९ ॥ तर्‍हीं तिये अंगप्रभेचेनि[12] पाडें । हें तेज कांहीं कांहीं होईल थोडें । आणि तया ऐसें कीर चोखडें । त्रिशुद्धी नोहे ॥ २४० ॥ ऐसें माहात्म्य या श्रीहरीचें सहज । फांकतसे सर्वांगींचें तेज । तें मुनिकृपा[14] जी मज । दृश्य जाहालें ॥ ४१ ॥

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥**

आणि तिये विश्वरूपीं एकीकडे । जग आघवें आपुलेनि पैवाडें[15] । जैसे महोदधीमाजि[16] बुडबुडे । सिनाने[17] दिसती ॥ ४२ ॥ कां आकाशीं[18] गंधर्वनगर । भूतळीं पिपीलिका बांधे घर । ना ना मेरुवरी संपुर[19] । परमाणु जैसे ॥ ४३ ॥ विश्व आघवेंचि तयापरी । तिया देवें[20]चक्रवर्तीचिया शरीरीं । अर्जुन तिये अवसरीं । देखता जाहाला ॥ ४४ ॥

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ १४ ॥**

तेथ एक विश्व एक आपण । ऐसें अंळुमाळु[21] होतें जें दुजेपण । तेंही आटोनि गेलें

---

१ विशेषेंकरून. २ कौशल्यानें. ३ व्यापून. ४ सर्वव्यापी ईश्वर. ५ झांकली असतां. ६ कृष्णानें. ७ उजेडांत. ८ हे राजन्. ९ कशासारखा. १० जमाव. ११ दश संख्यारूप आवरणाभे. १२ शरीरकांति. १३ योग्यतेनें. १४ व्यासाच्या कृपेनें. १५ विस्तारानें. १६ महासागरांत. १७ निरनिराळे. १८ कल्पित नगर. १९ बारीक. २० कृष्णशरीरांत. २१ कांहींसें.

अंतःकरण । विरालें[1] सहसा ॥ ४५ ॥ आंतु आनंदा चेईरें[2] जाहालें । बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें । आपाद[3] पां गुंतलें । पुलकांचलें[4] ॥ ४६ ॥ वार्षिये प्रथमदशे । वोहळलया[5] शैलांचें[6] सर्वांग जैसें । विरूढे कोमलांकुरीं तैसे । रोमांच जाहाले ॥ ४७ ॥ शिवतला चंद्रकरीं । सोमकांत द्रांव धरी । तैसिया स्वेदकणिका शरीरीं । दाटलिया ॥ ४८ ॥ माजि सांपडलेनि अलिकुळें[9] । जळावरी कमळकळिका जेविं आंदोळे[10] । तेविं आंतुलिया सुखोर्मीचेनि[11] बळें । बाहेरि कांपे ॥ ४९ ॥ कर्पूरकर्दळीचीं[12] गर्भपुटें[13] । उकलतां कापुराचेनि कोंदाटें[14] । पुळिका[15] गळती तेविं थेंबुटे । [16]नेत्रौनि पडती ॥ २५० ॥ उदयलेनि सुधाकरें[17] । जैसा भरलाचि समुद्र भरे । तैसा वेळोवेळां ऊर्मिभरें[18] । उचंबळत असे ॥ ५१ ॥ ऐसा सात्विकांहीं आठां भावां । परस्परें वर्ततसे हेवा । तेथ ब्रह्मानंदाची जीवा । रीणीव[19] फावली ॥ ५२ ॥ तैसाचि तया सुखानुभवापाठीं । केला द्वैताचा सांभाळ दिठी । मग उंससोनि[20] किरीटी । वांस[21] पाहिली ॥ ५३ ॥ तेथ बैसला होता जियां[22] सवा । तियाचिकडे मस्तक खालाविला देवा । मग जोडूनि करसंपुट बरवा । बोलत असे ॥ ५४ ॥

अर्जुन उवाच—

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥**

ह्मणे जयजयाजी स्वामी । नवल कृपा केली तुह्मी । जें हें विश्वरूप कीं आह्मी । प्राकृत[23] देखों ॥ ५५ ॥ परि साचचि भलें केलें गोसाविया । मज [24]परितोष जाहाला सोंविया[25] । जी देखिलासि जो इया । सृष्टीसि तूं आश्रय ॥ ५६ ॥ देवा मंदराचेनि अंगलगें[26] । ठायीं ठायीं श्वापदांचीं [27]दांगें । तैसीं इयें तुझ्या देहीं अनेगें । देखतसें भुवनें ॥ ५७ ॥ अहो आकाशाचिये [29]खोळे । दिसती ग्रहगणांचीं कुळें[30] । कां महावृक्षीं आविसाळें[31] । पक्षिजातीचीं ॥ ५८ ॥ तयापरी श्रीहरी । तुझिया विश्वात्मकीं इये शरीरीं । स्वर्ग देखतसें अवधारीं । सुरगणेंसीं ॥ ५९ ॥ प्रभु महाभूतांचें पंचक । येथ देखत आहें अनेक । आणि भूतग्राम[32] एकेक । भूतसृष्टीचे ॥ २६० ॥ जी सत्यलोक तुजमाजि आहे । देखिला [33]चतुरानन हा नोहे । आणि येरीकडे जंव पाहें । तंव कैलासही दिसे ॥ ६१ ॥ श्रीमहादेव

---

१ लीन झाले. २ जागेपण. ३ पायापासून डोक्यापर्यंत. ४ रोमांचांनीं. ५ ओहळून गेल्यावर. ६ पर्वतांचें. ७ ओलावा. ८ घामाचे बिंदु. ९ भ्रमरसमुदायानें. १० हाले. ११ आनंदाची लहर. १२ कापुरकेळीचीं. १३ गाभ्याचे पडदे. १४ दाट भरणीनें. १५ अंश, शितोडे. १६ डोळ्यांवाटे. १७ चंद्रानें. १८ लाटांनीं. १९ राज्य प्राप्त झालें. २० स्वस्थपणानें. २१ वाट. २२ ज्या बाजूस, ज्यासह. २३ सामान्य. २४ संतोष. २५ सहज. २६ संबंधानें. २७ अरण्यें. २८ पुष्कळ. २९ डेऱ्यांत. ३० समुदाय. ३१ घरटीं. ३२ प्राणिसमुदाय. ३३ ब्रह्मदेव.

भैवानियेशीं। तुझ्या दिसतसे एके अंशीं। आणि तूंतेंही गा हृषीकेशी। तुजमाजि देखें ॥ ६२ ॥ पैं कश्यपादिकऋषिकुळें। इयें तुझिया स्वरूपीं सकळें। देखतसें पाताळें। पैंन्नगेंसीं ॥ ६३ ॥ किंबहुना त्रैलोक्यपती। तुझिया एकेकाचि अवयवाचिये भिंती। इयें चतुर्दशभुवनें चित्राकृती। अंकुरलीं जाणों ॥ ६४ ॥ आणि तेथिंचे जे जे लोक। ते चित्ररचना जी अनेक। ऐसें देखतसें अलौलिक। गांभीर्य तुझें ॥ ६५ ॥

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम्।**
**नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥ १६ ॥**

या दिव्यचक्षूचेनि पैसें। चहूंकडे जंव पाहत असें। तंव दोर्दंडिकां जैसें। आकाश कोंभैलें ॥ ६६ ॥ तैसे एकचि निरंतर। देवा देखत असें तुझे कर। करीत आघवेंचि व्यापार। एकेचि काळीं ॥ ६७ ॥ मग महाशून्याचेनि पैसारें। उघडलीं ब्रह्मकटाहाचीं भांडारें। तैसीं देखतसें अपारें। उदरें तुझीं ॥ ६८ ॥ जी सहस्रशीर्षयाचे दाखले। कोटी-वरी होताति एकीवेळे। कीं परब्रह्माचि वदनफळें। मोडोनि आलें ॥ ६९ ॥ तैसीं वक्त्रें जेउतीं तेउतीं। तुझीं देखतसें विश्वमूर्ती। आणि तयाचिपरी नेत्रपंक्ति। अनेका सैंघ ॥ २७० ॥ हें असो स्वर्गपाताळ। कीं भूमी दिशा अंतराळ। हे विवक्षा ठेली सकळ। मूर्तिमय देखतसें ॥ ७१ ॥ तुजवीण एकादियाकडे। परमाणूहि ऐतुला कोंडे। अवकाश पाहातसें परि न सांपडे। ऐसें व्यापिलें तुवां ॥ ७२ ॥ इयें नानापरी अपरिमितें। जेतुलीं सांठविलीं होतीं महाभूतें। तेतुलाही पैवाड तुवां अनंतें। कोंदैला देखतसें ॥ ७३ ॥ ऐसा कवणेठायाहूनि तूं आलासी। एथ बैसलासि कीं उभा आहेसी। आणि कवणिये मायेचिये पोटीं होतासी। तुझें ठाण केवढें ॥ ७४ ॥ तुझें रूप वय कैसें। तुज पैलीकडे काय असे। तूं कायिसयावरी आहासि ऐसें। पाहिलें मियां ॥ ७५ ॥ तंव देखिलें जी आघवेंचि। तरि आतां तुझा ठाव तूंचि। तूं कवणाचा नव्हेसि ऐसाचि। अनादि आयता ॥ ७६ ॥ तूं उभा ना बैठा। दिर्घडा ना खुंजटा। तुज तळीं वरी वैकुंठा। तूंचि आहासी ॥ ७७ ॥ तूं रूपें आपणयांचि ऐसा। देवा तुझी तूंचि वयसा। पाठी पोट परेशा। तुझें तूं गा ॥ ७८ ॥ किंबहुना आतां। तुझें तूंचि आघवें अनंता। हें पुढतपुढती पाहातां। देखिलें मियां ॥ ७९ ॥ परि या तुझिया रूपा आंत। जी उणीव एक असें देखत। जे आदि मध्य अंत। तीन्ही नाहीं ॥ २८० ॥

---

१ पार्वतीसह. २ एकेबाजूस. ३ सर्पांसह. ४ चितारलीं. ५ अगाधपण. ६ मार्गानें. ७ बाहु-दंडांत. ८ उपजलें, कोंदलें. ९ केवळ ब्रह्माचे. १० विस्तारानें. ११ भरभरादून. १२ जेवढीं, तेवढीं. १३ पुष्कळ. १४ आकाश. १५ बोलण्याची इच्छा. १६ एवढा. १७ पुष्कळ. १८ विस्तार. १९ व्यापिला. २० स्थान, आकृति. २१ जन्मरहित. २२ दीर्घ. २३ लघु.

येऱ्हवीं गिंवासिलें आघवाठायीं । परि सोयं न लाहेचि कहीं । म्हणोनि त्रिशुद्धी हे नाहीं । तिन्ही एथ ॥ ८१ ॥ एवं आदिमध्यांतरहिता । तूं विश्वेश्वरा अपरिमिता । देखिलासि जी तत्त्वता । विश्वरूपा ॥ ८२ ॥ तुज महामूर्तीचिया आंगीं । उमटलिया पृथक् मूर्ती अनेगी । लेइलासि वानेपरिची आंगीं । ऐसा आवडतु आहासी ॥ ८३ ॥ नाना पृथक् मूर्ती तिया द्रुमवल्ली । तुझिया स्वरूपमहाचळीं । दिव्यालंकार फुलीं फळीं । सासिन्नलियां ॥ ८४ ॥ हो कां जे महोदधी तूं देवा । जाहालासि तरंगमूर्तीहिलावा । कीं तूं एक वृक्ष बरवा । मूर्तिफळीं फळलासी ॥ ८५ ॥ जी भूतीं भूतळ मांडिलें । जैसें नक्षत्रीं गगन गुंढारलें । तैसें मूर्तिमय भरलें । देखतसें तुझें रूप ॥ ८६ ॥ जी एकेकीच्या अंगप्रांतीं । होय जाय हे त्रिजगती । एवढिया ही तुझ्या आंगीं मूर्ती । कीं रोमा जालिया ॥ ८७ ॥ ऐसा पैंवाड मांडूनि विश्वाचा । तूं कवण पां एथ कोणाचा । हें पाहिलें तंव आमुचा । सारथी तोचि तूं ॥ ८८ ॥ तरि मज पाहातां मुकुंदा । तूं ऐसाचि व्यापक सर्वदा । मग भक्तानुग्रहें तैंया मुग्धा । रूपातें धरिसी ॥ ८९ ॥ कैसें चहूं भुजांचें सांवळें । पाहातां वोल्हावती मन डोळे । खेंमें देऊं जाइजे तरि आंकळे । दोहींचि बाहीं ॥ २९० ॥ ऐसी मूर्ति कोडिसंवाणी कृपा । करूनि होसी ना विश्वरूपा । कीं आमुचियाचि दिठीसि लेपा । जे सामान्यत्वें देखती ॥ ९१ ॥ तरि आतां दिठीचा विटाळ गेला । तुवां सहजें दिव्यचक्षू केला । म्हणोनि यथारूपें देखवला । महिमा तुझा ॥ ९२ ॥ परि मकरतुंडामागिलेकडे । होतासि तोचि तूं एवढें । रूप जाहालासि हें फुडें । वोळखिलें मियां ॥ ९३ ॥

**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥**

नोहे तोचि हा शिरीं । मुकुट लेइलासि श्रीहरी । परि आतांचें तेज आणि थोरी । नवल कीं बहु हें ॥ ९४ ॥ तेंचि हें वरिलीयेचि हातीं । चक्र परिजितया आयतीं । सांवरितासि विश्वमूर्ती । ते न मोडे खुण ॥ ९५ ॥ येरीकडे तेंचि हे नोहे गदा । आणि तळिलिया दोनी भुजा निरायुधा । वागोरे सांवरावया गोविंदा । संसरिलियां ॥ ९६ ॥ आणि तेणेंचि वेगें सहसा । माझिया मनोरथासरिसा । जाहालासि विश्वरूपा विश्वेशा ।

---

१ शोभिलें. २ सर्व ठिकाणीं. ३ पत्ता लागत नाहीं. ४ अनेक प्रकारचे रंग. ५ वाटतो आहेस. ६ वृक्ष व वेली. ७ पर्वत. ८ भरास आल्या. ९ जमीन. १० आच्छादिलें, व्यापिलें. ११ अंगप्रदेशांत. १२ त्रैलोक्य. १३ केसांत झाल्या, त्या मूर्तीच रोम झाल्या. १४ विस्तार. १५ तें मुग्ध सगुण अशा. १६ शांत होती. १७ आलिंगन. १८ सांपडे. १९ लहान. २० मलिन दृष्टीला. २१ साधारणपणानें. २२ सांग. २३ मगराच्या तोंडाच्या आकाराचा रथाचा भाग, रथचिन्ह. २४ खरें. २५ घोड्याचे दोर. २६ सरसावल्या.

ह्मणोनि जाणें ॥ ९७ ॥ परि कायसें बा हे चोजें । विस्मय करावयाही[1] पैाड[2] नाहीं मज । चित्त होऊनि जातसे निर्बुजें[3] । आश्चर्यें येणें ॥ ९८ ॥ हें एथ आथी[4] कां येथ नाहीं । ऐसें आसोंही नये काहीं । नवल अंगप्रभेची नेवाई । कैसी कोंदली सैंघ ॥ ९९ ॥ एथ अग्नी-चीही दिठी करपत । सूर्य खद्योत तैसा हारपत । ऐसें तीव्रपण अद्भुत । तेजाचें यया ॥ ३०० ॥ हो कां महातेजाचिया महार्णवीं । बुडोनि गेली सृष्टि आघवी । कीं युगांतवि-जूंच्या पांलवीं । झांकलें गगन ॥ १ ॥ ना तरी संहारतेजाचिया ज्वाळा । तोडोनि मांच[9] बांधला अंतराळा । आतां दिव्यज्ञानाचिया डोळां । पाहवेना ॥ २ ॥ उज्वळ अधिका-धिक बहुवस । धडाडीत आहे अतिवेंहस[10] । पडत दिव्यचक्षूसही त्रास । न्याहाळितां ॥ ३ ॥ हो कां जे महाप्रळयींचा भडोड[11] । होता काळाग्निरुद्राचियाठायीं गूढ[12] । तो तृतीयनयनाचा मेढ[13] । फुटला[14] जैसा ॥ ४ ॥ तैसें पसरलेनि प्रकाशें । सैंघ पांचवेनिचेया[15] ज्वाळांचे वळसे[16] । पडतां ब्रह्मकटाह कोळिसे । होत आहाती ॥ ५ ॥ ऐसा अद्भुत तेजो-राशी । जन्मा नवल म्यां देखिलासि । नाहीं व्याप्ती आणि कांतीसी । पार जी तुझिये ॥ ६ ॥

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥**
**अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।**

देवा तूं अक्षर । औटांविये[17] मात्रेसि पर । श्रुती जयाचें घर । गिंवसीत[18] आहाती ॥ ७ ॥ जें आकाराचें आयतन[19] । जें विश्वनिक्षेपैकनिधान[20] । तें अव्यय तूं गहन । अविनाश जी ॥ ८ ॥ तूं धर्माचा वोलावा । अनादिसिद्ध तूं नित्य नवा । जाणें मी सततिसावा[21] । पुरुष विश्वेश तूं ॥ ९ ॥ तूं आदिमध्यांतरहित । स्वसामर्थ्यें तूं अनंत । विश्वबाहु अपरिमित । विश्वचरण तूं ॥ ३१० ॥ पैं चंद्र चंडांशु[22] डोळां । दावितासि कोपप्रसाद लीळा । एकां रुससी तमाचिया डोळां । एकां पाळितोसि कृपादृष्टि ॥ ११ ॥

**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥ १९ ॥**

जी एवंविधा[23] तूतें । मी देखतसें हें निरुतें[24] । पेटलें प्रळयाग्नीचें उजितें[25] । तैसें वक्त्र हें तुझें ॥ १२ ॥ वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उभंड[26] उठत । तैसी चाटीत

---

१ नवल. २ योग्यता. ३ थक्क, मोहित. ४ आहे. ५ चमत्कार. ६ बहुत. ७ काजवा. ८ पदरांनीं. ९ माचा, माळा. १० झळझळीत. ११ भडका. १२ गुप्त. १३ कलिका. १४ फुलला. १५ हे पंचाग्नि=प्रलयानल, विद्युदनल, वडवानल, शिवनेत्रानल, व द्वादशादित्यानल यांच्या. १६ वेढे. १७ साडेतीन मात्रांच्या पलीकडे. १८ शोधितात. १९ घर. २० ठेवण्याचा एक ठेवा. २१ छत्तीस तत्वांहून पर. २२ सूर्य. २३ याप्रमाणें. २४ खरें. २५ लखलखाट. २६ उमाळे.

ह्मणोनि जाणें ॥ ९७ ॥ परि कायसें बा हें चोज । विस्मय करावयाहि पैज[1] नाहीं मज । चित्त होऊनि जातसे निर्बुज[2] । आश्चर्यें येणें ॥ ९८ ॥ हें एथ आर्थी[3] कां येथ नाहीं । ऐसें आसोंहीं नये कांहीं । नवल अंगप्रभेची नेवाई । कैसी कोंदली सैंध ॥ ९९ ॥ एथ अग्नी-चीही दिठी करपत । सूर्य खद्योत तैसा हारपत । ऐसें तीव्रपण अद्भुत । तेजाचें यथा ॥ ३०० ॥ हो कां महातेजाचिया महार्णवीं । बुडोनि गेली सृष्टि आघवी । कीं युगांतवि-जूंच्या पालवीं । झांकलें गगन ॥ १ ॥ ना तरी संहारतेजाचिया ज्वाळा । तोडोनि मांच[9] बांधला अंतराळा । आतां दिव्यज्ञानाचिया डोळां । पाहवेना ॥ २ ॥ उज्वळ अधिका-धिक बहुवस । धडाडीत आहे अतिदीहस । पडत दिव्यचक्षूसही त्रास । न्याहाळितां ॥ ३ ॥ हो कां जे महाप्रळयींचा भडीड । होता काळाग्निरुद्राचियाठायीं गूढ[12] । तो तृती-यनयनाचा मेढ[13] । फुटला जैसा ॥ ४ ॥ तैसें पसरलेनि प्रकाशें । सैंघ पांचवेनिचेया ज्वाळांचे वेळिसे[16] । पडतां ब्रह्मकटाह कोळिसे । होत आहाती ॥ ५ ॥ ऐसा अद्भुत तेजो-राशी । जन्मा नवल म्यां देखिलासि । नाहीं व्याप्ती आणि कांतीसी । पार जी तुझिये ॥ ६ ॥

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥**
**अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।**

देवा तूं अक्षर । औटांविये[17] मात्रेसि पर । श्रुती जयाचें घर । गिंवसीत[18] आहाती ॥ ७ ॥ जें आकाराचें आयतन[19] । जें विश्वनिक्षेपैकनिधान । तें अव्यय तूं गहन । अविनाश जी ॥ ८ ॥ तूं धर्माचा वोलावा । अनादिसिद्ध तूं नित्य नवा । जाणें मी संततिसावा[21] । पुरुष विश्वेश तूं ॥ ९ ॥ तूं आदिमध्यांतरहित । स्वसामर्थ्यें तूं अनंत । विश्वबाहु अपरिमित । विश्वचरण तूं ॥ ३१० ॥ पैं चंद्र चंडांशु[22] डोळां । दावितासि कोपप्रसाद लीळा । एकां रुससी तमाचिया डोळां । एकां पाळितोसि कृपादृष्टि ॥ ११ ॥

**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥ १९ ॥**

जी एवंविधा[23] तूतें । मी देखतसें हें निरुतें[24] । पेटलें प्रळयाग्नीचें उंजितें[25] । तैसें वक्त्र हें तुझें ॥ १२ ॥ वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उभंड[26] उठत । तैसी चाटीत

१ नवल. २ योग्यता. ३ थक्क, मोहित. ४ आहे. ५ चमत्कार. ६ बहुत. ७ काजवा. ८ पद-रांनीं. ९ माचा, माळा. १० झळझळीत. ११ भडका. १२ गुप्त. १३ कलिका. १४ फुलला. १५ हे पंचाग्नि=प्रलयानल, विद्युदनल, वडवानल, शिवनेत्रानल, व द्वादशादित्यानल यांच्या. १६ वेढे. १७ साडेतीन मात्रांच्या पलीकडे. १८ शोधितात. १९ घर. २० ठेवण्याचा एक ठेवा. २१ छत्तीस तत्वांहून पर. २२ सूर्य. २३ याप्रमाणें. २४ खरें. २५ लखलखाट. २६ उमाळे.

दाढा दांतांत। जीभ लोळे ॥ १३ ॥ इये वदनींचिये उबा। आणि जी सर्वांगकांतीचिया प्रभा। विश्व तांतलें अति क्षोभा। जात आहे ॥ १४ ॥

**द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः।**

**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥**

कां जे द्यौलोंकै आणि पाताळ। पृथिवि आणि अंतराळ। अथवा दशादिशा समाकुळ। दिशाचक्र ॥ १५ ॥ हें आघवेंचि तुवां एकें। भरलें देखत आहें कौतुकें। परि गगनाही सकट भयानकें। आह्मविजे जीवें ॥ १६ ॥ ना तरी अद्भुतरसाचिया कल्लोळीं। जाहाली चवदाही भुवनासि कैडियाळी। तैसें आश्चर्यच मग मी आकळीं। काय एक ॥ १७ ॥ नावरे व्याप्ती हे असाधारण। न साहवे रूपाचें उग्रपण। सुख दूरी गेलें परी प्राण। विपायें धरी जग ॥ १८ ॥ देवा ऐसें देखोनि तूतें। नेणो कैसें आलें भयाचें भरितें। आतां दुःखकल्लोळीं झळंबतें। तीन्ही भुवनें ॥ १९ ॥ येऱ्हवीं तुज महात्मयाचें देखणें। तरि भयदुःखासि कां मेळवणें। परि हें सुख नव्हेचि जेणें गुणें। तें जाणवत आहे मज ॥ २२० ॥ जंव तुझें रूप नोहे [10]दिठें। तंव जगासि संसारिक गोमटें। आतां देखिलासि तरी विषयविटें। उपजला त्रास ॥२१॥ तेवींचि तुज देखिलियासाठीं। काय सहसा तुज देवों येईल मिठी। आणि नेदीं तरी शोकसंकटीं। राहों केवि ॥ २२ ॥ ह्मणोनि मागां सरों तंव संसार। अडवीत येतसे अनिवार। आणि पुढां तूं तंव अनावर। नयेसि घेवों ॥ २३ ॥ ऐसा मांझारिलिया सांकडां। बापुडया त्रैलोक्याचा होतसे हुरडा। ऐसा हा ध्वनी जी फुडा। चोजवला मज ॥ २४ ॥ जैसा आरंबळला आगीं। तो समुद्रा ये निवावयालागीं। तंव कल्लोळपाणियांचिया तरंगीं। आंगळा बिहे ॥ २५ ॥ तैसें या जगासि जाहालें। तूतें देखोनि तळमळित ठेलें ॥

**अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति।**

**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाःस्तुवंति त्वं स्तुतिभिःपुष्कलाभिः ॥**

यामाजि पैल भले। सुरांचे मेळावे ॥ २६ ॥ हे तुझेनि आंगिकें तेजें। जाळूनि सर्व कर्मांचीं बीजें। मिळत तुज आंत निजें। सद्भावेंसीं ॥ २७ ॥ आणि एक सांवियाचि भयभीरु। सर्वस्वें धरूनि तुझी मोहरे। तुज प्रार्थिताति करु। जोडोनिया ॥ २८ ॥ देवा

---

१ दबाव्यानें. २ पोळलें. ३ स्वर्ग. ४ अंतरिक्षलोक. ५ बुडविजे. ६ वेष्टण, माळ. ७ क्वचित्, कष्टानें. ८ बुडतात, विरघळतात. ९ भासत. १० दृष्टिगोचर. ११ संसारिक सुख. १२ जन्ममरण. १३ मधल्या कचाटींत. १४ माजणूक. १५ संशय. १६ स्पष्ट. १७ तापला. १८ पोळला. १९ लाटा, खळाळ. २० जास्ती भितो. २१ समुदाय. २२ सहजच. २३ भयभीत. २४ भाग. २५ हात.

अविद्यार्णवीं पडिलों । जी विषयवागुरें[1] ओतुडलों[2] । स्वर्गसंसाराचिया सांकडलों[3] । दोहीं भागीं ॥ २९ ॥ ऐसें आमुचें सोडवणें । तुजवांचोनि कीजेल कवणें । तुज शरण गा सर्वप्राणें । ह्मणत देवा ॥ ३३० ॥ आणि महर्षी अथवा सिद्ध । विद्याधरसमूह विविध । हे बोलत तुज स्वस्तिवाद[4] । करिती स्तवन ॥ ३१ ॥

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।**
**गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥**

हे रुद्रादित्यांचे मेळावे । वसु हन साध्य आघवे । अश्विनौ देव विश्वदेव विभवें[5] । वायुही हे जी ॥ ३२ ॥ अवधारा पितर हन गंधर्व । पैल यक्षरक्षोगण सर्व । जी महेंद्र[6] मुख्य देव । कां सिद्धादिक ॥ ३३ ॥ हे आघवेचि आपुलालिया लोकीं । उत्कंठित भव-लोकीं । हे महामूर्ती देविकीं[7] । पाहात आहती ॥ ३४ ॥ मग पाहत पाहत प्रतिक्षणीं । विस्मित होऊनि अंतःकरणीं । करित निजमुकुटीं वोवाळणी । प्रभुजी तुज ॥ ३५ ॥ ते जयजय घोष कलरवें[8] । स्वर्ग गाजविती आघवें । ठेवित ललाटावरी बरवे । करसंपुट[9] ॥ ३६ ॥ तिये विनयद्रुमाचिये अटवीं[10] । सुरवाडली[11] सात्त्विकांची माधवी[12] । ह्मणोनि करसंपुटपल्लवीं । तूं होतासि फळ ॥ ३७ ॥

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् ॥ २३ ॥**

जी लोचनां[13] भाग्य उदेलें । मना सुखाचें सुयाणें[14] पाहलें[15] । जे अगाध तुझें देखिलें । विश्वरूप इहीं ॥ ३८ ॥ हें लोकत्रयव्यापक रूपडें । पाहातां देवांही वचक पडे । याचें सन्मुखपण जोडे । भलतयाकडुनी ॥ ३९ ॥ ऐसें एकचि परि विचित्रें । आणि भयानक वक्त्रें । बहुलोचन हे सशस्त्रें । अनंतभुज[16] ॥ ३४० ॥ अनंत ऊरु बाहु चरण । बहूदर आणि नानावर्ण । कैसें प्रतिवदनीं मातलेपण[17] । आवेशाचें ॥ ४१ ॥ हो कां महाकल्पाचिया अंतीं । तवकलेनि यमें जेउतेतेउतीं[18] । प्रळयाग्नीचीं उजितीं[19] । ओतुखिलीं जैसीं ॥ ४२ ॥ ना तरी संहारत्रिपुरारीचीं यंत्रें । कीं प्रळयभैरवाचीं क्षेत्रें[20] । नाना युगांतशक्तीचीं पात्रें[21] । भूतखिचा[22] वाढविलीं[23] ॥ ४३ ॥ तैसीं जियेतियेकडे । तुझीं वक्त्रें जीं प्रचंडें । न समाती दरीमाजि सिंहाडें[24] । तैसे दशन दिसती रागिट ॥ ४४ ॥ जैसें काळरात्रीचेनि

१ विषयजाळ्यांत. २ सांपडलों. ३ पेचांत पडलों. ४ कल्याणकारक भाषण. ५ वैभवानें. ६ इंद्रादिक. ७ देवस्वरूप. ८ मंजुळ शब्दानें. ९ जोडलेले हात. १० अरण्य. ११ अनुकूळ झाली. १२ वसंतकाळ. १३ डोळे. १४ सुकाळ. १५ उजाडलें. १६ हात. १७ रागावलेला. १८ जेवढीं तेवढीं. १९ आगट्या पसरल्या. २० समुदाय. २१ भांडीं. २२ भूतांच्या नाशाला. २३ प्राप्त झालीं. २४ सिंह.

आधारें । उल्हासत निघती संहार[1]खेचरें । तैसिया वदनीं प्रळयरुधिरें । [2]कोटलिया दाढा ॥ ४५ ॥ हे असो काळें [3]अवंतिलें रण । कां सर्वसंहारें मातलें मरण । तैसें [4]अतिभिंगुळवाणेंपण । वदनीं तुझिये ॥ ४६ ॥ हे बापडी लोक सृष्टी । [5]मोटकीयेचि पाहिली दिठी । आणि दुःखकाळिंदीचिया तटीं । झाड होऊनि ठेली ॥ ४७ ॥ तुज महामृत्यूचिया सागरीं । आतां हे त्रैलोक्यजीविताची [6]तरी । शोक दुर्वा तलहरी । [7]आंदोळत असे ॥ ४८ ॥ एथ कोपोनि जरी वैकुंठें । ऐसें हन म्हणिपैल [8]अवचटें । जे तुज लोकांचें काइ वाटे । तूं ध्यानसुख हें भोगीं ॥ ४९ ॥ तरी जी लोकांचें कीर साधारण । वांयां [9]आड सूतसें [10]वोडंण । केविं सहसा म्हणें प्राण । माझेचि कांपती ॥ ३५० ॥ ज्या मज संहाररुद्र [11]बीसिपे । ज्या मजभेणें मृत्यु लपे । तो मी एथें [12]अहाळबाहाळि कांपें । ऐसें तुवां केलें ॥ ५१ ॥ परि नवल बापा हे महामारी । इया नाम विश्वरूप जरी । हें भ्यासुरपणें [13]हारी । भयासि आणी ॥ ५२ ॥

**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो ॥**

ठेलीं महाकाळेंसीं [14]हटतटें । तैसीं कितीएकें मुखें रागिटें । इहीं वाढोनियां धाकुटें । आकाश केलें ॥ ५३ ॥ गगनाचेनि [15]वाँडपणें [16]नाकळे । त्रिभुवनींचियाही वारिया [17]नें वेटाळे । ययाचेनि वाफा [18]आगी जळे । कैसें धडाडीत असे ॥ ५४ ॥ तेविंचि एकासारिखें एक नोहे । एथ वर्णावर्णांचा भेद आहे । हो कां जे प्रळयीं [19]सौवावो लाहे । वन्हीं ययांचा ॥ ५५ ॥ जयाचिये आंगींची दीप्ती येवढी । जे त्रैलोक्य कीजे राखोंडी । कीं तयाही तोंडें आणि तोंडीं । दांत दाढा ॥ ५६ ॥ कैसा वारया धनुर्वात चढला । समुद्र कीं महापूरीं पडिला । विषाग्नि [20]मारा प्रवर्तला । वडवानळासी ॥ ५७ ॥ हळाहळ अग्नि पियालें । नवल मरण मारा प्रवर्तलें । तैसें संहारतेजा या जाहालें । वदन देखा ॥ ५८ ॥ परि कोणें मानें विशाळ । जैसें तुटलिया अंतराळ । आकाशासि [21]कैव्हाळ । पडोनि ठेलें ॥ ५९ ॥ ना तरी काखे [22]सूनि [23]वसुंधरी । जैं हिरण्याक्ष रिगाला विवरीं । तैं उघडलें [24]हाटकेश्वरीं । जेविं पाताळ कुहर ॥ ३६० ॥ तैसा वक्त्रांचा विकाश । माजि जिव्हांचा

---

१ नाश करणारीं पिशाचें. २ लिप्त झाल्या, किटल्या. ३ आमंत्रिलें. ४ भयंकरपणा. ५ तूं अमळ वांकड्या दृष्टीनें पाहातां भयंकर कालिंदीतीरस्थ वृक्षांप्रमाणें करपून गेली. ६ नौका. ७ आदळत, डळमळत. ८ अकस्मात्. ९ आड घालितसें. १० ढाल. ११ भय पावे. १२ अत्यंत, बहुत. १३ पराभव करी. १४ बलात्कारानें. १५ मोठेपणानें. १६ आकळेना. १७ न वेष्टवे. १८ अग्नि पेटतो. १९ सहाय. २० मारण्याला. २१ वेढा, ग्रास. २२ घालून. २३ पृथ्वी. २४ पाताळांतील महादेवानें.

आनळाचि आवेश । विश्व न पुरे म्हणोनि घांस । न भरीचि कोडें ॥ ६१ ॥ आणि पाताळव्याळांचिया[1] फूत्कारीं । गरळज्वाळा लागती अंबरीं । तैसी पसरलिये वदनदरी । माजि हे जिव्हा ॥ ६२ ॥ काढूनि प्रळयविजूचीं जुंबाडें । जैसे पन्नासिले गगनाचे हुडे । तैसे ओंवाळुवांवरी आंकडे । धगधगीत दाढांचे ॥ ६३ ॥ आणि ललाटपटाचिये खोळे । जैसे भयातें भेडविताति डोळे । हो कां जे महामृत्यूचे उमाळे । कँडवसा राहिले ॥ ६४ ॥ ऐसें वाऊनि भयाचें भोजें । एथ काय निपजवूं पाहातोसि काज । तें नेणों परि मज । मरणभय आलें ॥ ६५ ॥ देवा विश्वरूप पाहावयाचे डोहळे । केले तियें पावलों प्रतिफळें । बापा देखिलासि आतां डोळे । निवावे तैसे निवाले ॥ ६६ ॥ अहो देह पार्थिव कीर जाये ।ययाची काकुळती कवणा आहे । परि आतां चैतन्य माझें विपायें । वांचेल कीं न वांचे ॥ ६७ ॥ येऱ्हवीं भयास्तव आंग कांपे । नीविक्र आगळें तरि मन तापे । अथवा बुद्धीही वोसिंपे[12] । अभिमान विसरिजे ॥ ६८ ॥ परि [13]येतुलियाहि वेगळा । जो केवळ आनंदैककळा । तया अंतरात्मयाही निश्चळा । आली शोरी ॥ ६९ ॥ बाप साक्षात्काराचा वेधु । कैसा देशधडी केला बोध । हा गुरुशिष्यसंबंध । विपायें नांदे ॥ ३७० ॥ देवा तुझ्या ये दर्शनीं । जें वैकल्य उपजलें आहे अंतःकरणीं । तें सांवरावयालागीं गंवसणी । धैर्याची करितसें ॥ ७१ ॥ तंव माझेनि नामें धैर्य हारपलें । कीं तयाहीवरी विश्वरूपदर्शन जाहालें । हें असो परि मज भलें ओंतुडविलें । उपदेशा इया ॥ ७२ ॥ जीव विसंवावयाचिया चाडा । सैंघ धांवाधांवी करितसे बापुडा । परि सोय ही कवणेकडा । नलभे एथ ॥ ७३ ॥ ऐसें विश्वरूपाचिया महामारीं । जीवित्व गेलें आहे चराचरीं । जी न बोलें तरि काय करीं । कैसेनि राहें ॥ ७४ ॥

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि ।**
**दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥**

पैं अखंड डोळ्यांपुढें । फुटलें जैसें महाभयाचें भांडें । तैसीं तुझीं मुखें [21]वितंडें । पसरलीं देखें ॥ ७५ ॥ असो दांतदाढांची दाटी । न झांकवे मा दोहीं वोठीं । सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाटकांटी[22] । लागलिया जैशा ॥ ७६ ॥ जैसें तक्षका विष भरलें । हो कां जे काळरात्री भूत संचरलें । कीं आग्नेयास्त्र पैरजिलें[23] । वैज्ञाग्नीं[24] जैसें ॥ ७७ ॥ तैसीं तुझीं वक्त्रें प्रचंडें । वरि आवेश बाहेरि [25]वोसंडे । आले मरणरसाचे लोंढे । आम्हांवरी ॥ ७८ ॥

१ पाताळांतले सर्प. २ समुदाय. ३ शृंगारिलें. ४ बुरूज. ५ ओंठाबाहेर. ६ प्रवाह. ७ कोनांत, आंधारांत. ८ महत्त्व. ९ पृथ्वीचा, मातीचा. १० कदाचित्. ११ क्षणभर. १२ नाश पावे. १३ याहून. १४ कांटा, कंप. १५ छंद. १६ देशपार. १७ विकलपणा, व्याकुलता. १८ मिळविलें. १९ विसावा घेण्याकरितां. २० पुष्कळ. २१ मोठीं. २२ कांटे. २३ प्रेरिलें. २४ विद्युत्. २५ उचंबळे.

संहारसमयींचा[1] चंडानिळ । आणि महाकल्पांत प्रळयानळ । या दोहीं जैं होय मेळ । तैं काय एक न जळे ॥ ७९ ॥ तैसीं संहारकें तुझीं मुखें । देखोनि धीर कां आह्मां पारुखे[2] । आतां भुललों मी दिशा न देखें । आपणपें नेणें ॥ ३८० ॥ [3]मोटकें विश्वरूप डोळां देखिलें । आणि सुखाचें अवर्षण पडिलें । आतां [4]आपाणि आपाणि आपलें । अस्ताव्यस्त हें ॥ ८१ ॥ ऐसें करिसी ह्मणोनि जरि जाणें । तरि हे गोष्टि सांगावी कां मी ह्मणें । आतां एकवेळ वांचवीं जी प्राणें । या स्वरूप प्रळयापासोनी ॥ ८२ ॥ जरि तूं गोसावी[5] आमुचा अनंता । तरि सुंई वोडणँ[6] माझिया जीविता । सांटवीं[7] पसारा हा मागुता । महामारीचा ॥ ८३ ॥ आइकें सकळ देवांचियें परदेवते । तुवां चैतन्यें गा विश्ववसतें । तें विसरलासि हें उपरतें[8] । संहारू आदरिलें ॥ ८४ ॥ ह्मणोनि वेगीं प्रसन्न होईं देवराया । संहरीं संहरीं आपुली माया । काढीं मातें महाभया- । पासोनियां ॥ ८५ ॥ हा ठायवरी[9] पुढतपुढती । तूतें ह्मणिजे बहुवा काकुळती । ऐसा मी विश्वमूर्ती । भेडका[10] जाहालों ॥ ८६ ॥ जैं अमरावतीये आला धाडा[11] । तैं म्यां एकलेनि केला उवेडा[12] । जो मी काळाचिया ही तोंडा । [13]वांसिपु न धरीं ॥ ८७ ॥ परि [14]तैंया आंतुल नव्हे हें देवा । एथ मृत्यूसही करूनि [15]चढावा । तुवां आमुचाचि घोट भरावा । या सकळविश्वेंसीं ॥ ८८ ॥ कैसा नव्हता प्रळयाचा वेळ । गोरवां[16]-तुंचि मिनलासि[17] काळ । बापुडा हा त्रिभुवनगोळ । अल्पायु जाहाला ॥ ८९ ॥ अहा भाग्या विपरीता । विघ्न उठिलें शांतिकरितां । कटकटा विश्व गेलें आतां । तूं लागलासि ग्रासूं ॥ ३९० ॥ हें नव्हे मां रोकडें । [18]सैंघ पसरूनियां तोंडें । कवळितासि चहूंकडे । सैन्यें इयें ॥ ९१ ॥

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥२६॥**

[19]नोहेति हे कौरव कुळींचे वीर । आंधळिया धृतराष्ट्राचे कुमर । हे गेले गेले सहपरिवार । तुझिया वदनीं ॥ ९२ ॥ आणि जे जे यांचेनि [20]सांवायें । आले देशोदेशींचे रायें । तयांचें सांगावया जावों न लाहे । ऐसें [21]सेरकटित आहासी ॥ ९३ ॥ [22]मैदमुखाचिया संघटा । घेत आहासि घटघटां । [23]औरणी हन थाटा । देतासि मिठी ॥ ९४ ॥ [24]जंत्रींवरिचील मार । [25]पैदातीचे [26]मोगर । मुखाआंत भार । हारपताति मा ॥ ९५ ॥ कृतांताचिया [27]जांवळी । जें एकचि विश्वातें गिळी । तियें कोटीवरी सगळीं । गिळितासि शस्त्रें ॥ ९६ ॥ [28]चतुरंगा

१ भयंकर वारा. २ नष्ट होतो. ३ थोडकेंच. ४ आटप आटप. ५ धनी. ६ घाल. ७ आड. ८ उलटें. ९ येथपर्यंत पुनः पुनः. १० भित्रा. ११ छापा. १२ पराभव. १३ भय. १४ त्यापैकीं. १५ चढाई. १६ मध्येंच. १७ प्राप्त झालास. १८ पुष्कळ. १९ हे नव्हे काय? २० साहाय्य. २१ मिळीत. २२ हत्तींचा समुदाय. २३ युद्ध. २४ तोफा, बंदुकी. २५ पायदळ. २६ मुद्गर. २७ भावंड. २८ हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांस.

परिवारा । संजोडियां[1] रहंवरा । दांत न लविसी मा परमेश्वरा । कैसा तुष्टलासि बरवा ॥ ९७ ॥ हां गा भीष्म ऐसा कवण । सत्यशौर्यनिपुण । तोंहि आणि ब्राह्मण द्रोण । ग्रासिलासि कटकटा[2] ॥ ९८ ॥ अहा सहस्रकराचा[3] कुमर । एथ गेला कर्ण वीर । आणि आमुचिया आघवयांचा कैर[4] । फेडिला देखें ॥ ९९ ॥ कटकटा धातया[5] । कैसें जाहालें अनुग्रहा[6] यया । मियां प्रार्थूनि जगा बापुडिया । आणिलें मरण ॥ ४०० ॥ मागां थोडिया बहुवा[7] उपपत्ती । येणें सांगीतलीया विभूती[8] । तैसा नसेचि मा पुढती । बैसलों पुसों ॥ १ ॥ ह्मणोनि भोग्य[9] तें चिशुद्धी न चुके । आणि बुद्धीही होणारासारिखी ठाके । माझ्या कपाळीं पिटावें लोकें । तें लोटलें[10] काह्या २ ॥ पूर्वी अमृतही हाता आलें । परि देव नसतींचि उगेले[11] । मग काळकूट उठविलें । शेवटीं जैसें ॥ ३ ॥ परि तें एकैबगीं[12] थोडें । केलिया पतिकारामाजिवडें[13] । आणि तिये अवसरींचें तें सांकडें[14] । निस्तरविलें शंभू ॥ ४ ॥ आतां हा जळता वारा कें वेटाळे[15] । कोणींही[16] विषा भरलें गगन गिळे । महाकाळेंसि[17] कें खेळें । आंगवत[18] असे ॥ ५ ॥ ऐसा अर्जुन दुःखें शिणत । शोचित[19] असे जिवाआंत । परी न देखे तो प्रस्तुत । अभिप्राय देवाचा ॥ ६ ॥ जे मी मारिता हे कौरव मरते । ऐसेनि वेटाळिला होता मोहें बहुतें । तो फेडावयालागीं अनंतें । हें दाखविलें निज ॥ ७ ॥ अरे कोण्हीतें कोण्हा न मारी । एथ मीचि हो सर्व संहारीं । हें विश्वरूपव्याजें हरी । प्रकटित असे ॥ ८ ॥ परि वायांचि व्याकुळता । तें न चोजवेचि[20] पंडुसुता । मग अहा[21] कंप नव्हता । वाढवित असे ॥ ९ ॥

**वक्राणि ते त्वरमाणा विशांति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।**
**केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥**

तेथ ह्मणे पाहा हो एके वेळे । सांसिकवचेंसि[22] दोन्ही दळें । वदनीं गेलीं आभाळें । गगनीं कां जैसीं ॥ ४१० ॥ कां महाकल्पाचिया शेवटीं । जैं कृतांत कोपला होय सृष्टी । तैं एकविसांहि[23] स्वर्गा मिठी । पाताळासकट दे ॥ ११ ॥ ना तरी उदासीनें[24] दैवें । संचे-[25]काचीं वैभवें[26] । जेथिचीं तेथ स्वभावें । विलया जाती ॥ १२ ॥ तैसीं सांसिनलीं[27] सैन्यें एकवटें । इये मुखीं जाहालीं प्रविष्टें । परि एकही [28]तोंडौनि न सुटे । कैसें कर्म देखा ॥ १३ ॥

---

१ घोडे जोडलेल्या रथास. २ हाय हाय. ३ सूर्याचा. ४ किरकिर. ५ हे ब्रह्मदेवा. ६ प्रसाद. ७ थोड्याबहुत युक्तीनें. ८ ईश्वरमूर्ती. ९ भोगावयाचें प्रारब्ध. १० चुकेल कशानें. ११ निरिच्छ. १२ एकप्रकारें, एकपक्षीं. १३ अनुभवानें पाहिलें असतां. १४ संकट. १५ अटोपेल. १६ कोण बरें. १७ महाकाळाशीं कोणाला खेळवेल. १८ सामर्थ्य. १९ शोक करीत. २० समजे. २१ उगाच. २२ तरवार कवचासकट. २३ एकवीस. २४ प्रतिकूल. २५ संग्रह करणाराचीं. २६ ऐश्वर्यें. २७ पसरलीं. २८ तोंडापासून.

अशोकाचे अंगवसे । चघळिले केरनि जैसे । लोक वक्रामाजि तैसे । वांया गेले ॥१४॥ परि सिसाळें मुकुटेंसीं । पडिलीं दाढांचे सांडसीं । पीठ होत कैसीं । दिसत आहाती ॥ १५ ॥ तियें रत्नें दांतांचिये सवडी । कूट लागलें जिभेच्या बुडीं । कांहीं कांहीं आगरडीं । दंष्ट्रांची माखलीं ॥ १६ ॥ हो कां जे विश्वरूपें काळें । ग्रासिलीं लोकांचीं शरीरें बळें । परि जीवित्व देहींचीं सिसाळें । अवश्य कीं राखिलीं ॥ १७ ॥ तैसीं शरीरामाजि चोखडीं । इयें उत्तमांगें होतीं फुडीं । ह्मणोनि महाकाळाचियाहि तोंडीं । परि उरलीं शेखीं ॥ १८ ॥ मग ह्मणे हें काई । जन्मलयां आनमोहरचि नाहीं । जग आपैसेंचि वदनडोहीं । संचरता हे मा ॥ १९ ॥ यथा आपेंआप आघविया सृष्टी । लागलिया आहाति वदनाचिया शेवटीं । आणि हा जेथिंचिया तेथ मिठी । देतसे उगला ॥ ४२० ॥ ब्रह्मादिक समस्त । उंचा मुखांमाजि धांवत । येर सामान्य हे भरत । ऐलीच वदनीं ॥ २१ ॥ आणीकही भूतजात । तें उपजलेंचि ठायीं ग्रासित । परि याचिया मुखा निभ्रांत । न सुटेचि कांहीं ॥ २२ ॥

**यथा नदीनां बहवोऽबुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवंति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्राण्यभिविज्वलंति ॥ २८ ॥**

जैसे महानदीचे वोघ । वहिले ठाकिती समुद्राचें आंग । तैसें आघवांचिकडूनि जग । प्रवेशत मुखीं ॥ २३ ॥ आयुष्यपंथें प्राणिगणीं । करोनि अहोरात्रांची सावाणी । वेगें वक्रमिळणीं । साधिजत आहाती ॥ २४ ॥

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ॥**
**तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥**

जळसया गिरिच्या गवाखा- । माजि घांपती पतंगाचिया झांका । तैसे सैमम लोक देखा । इये वदनीं पडती ॥ २५ ॥ परि जेतुलें येथ प्रवेशलें । तें तातलिया लोहें पाणिपां गिळिलें । वहिवेटींहि पुसिलें । नाम रूप तयाचें ॥ २६ ॥

**लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान् समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो ॥ ३० ॥**

आणि येतुलियाही आरोगण । करितां भुके नाहीं उणेपण । कैसें दीपन असाधारण ।

---

१ अग्रभाग, कोंबारे. २ डटारें. ३ मस्तकें. ४ चिमटयांत. ५ तुकडे. ६ टोकें, अग्रें. ७ दाढांचीं. ८ मस्तकें. ९ प्राण्याला. १० दुसरा मार्ग. ११ निरिच्छ. १२ प्राणिमात्र. १३ सत्वर. १४ प्राणिसमुदायांनीं. १५ पायऱ्या. १६ छिद्रांमध्यें. १७ पडतात. १८ डझघा. १९ सर्व. २० तापलेल्या लोखंडानें. २१ वहिवाटीस. २२ भोजन. २३ पाचनशक्ति, दीप्तपण.

उदयलें यथा ॥ २७ ॥ जैसा रोगिया ज्वरांतूनि उठिला । कां भणगा[1] दुकाळ पाहला । तैसा जिभांचा लळलळाट देखिला । [2]आवाळुवें चाटितां ॥ २८ ॥ तैसें आहाराचेनि नांवें कांहीं । तोंडापासूनि उरलेंचि नाहीं । कैसी सैंमसमित[3] नवाई । भुकेलेपणाची ॥ २९ ॥ काय सागराचा घोंट भरावा । कीं पर्वताचा घांस करावा । ब्रह्मकटाह घालावा । आघवाचि दाढे ॥ ४३० ॥ दिशा सगळियाचि गिळावियां । चांदिणिया चाटूनि घ्यावियां । ऐसें वर्तत आहे [4]सांविया । लोलुंप्य[5] बा तुझें ॥ ३१ ॥ जैसा भोगीं काम वाढे । कां इंधनें आगीसि [6]हंकाक चढे । तैसीं खातखातांचि तोंडें । [7]खाखातें ठेलीं ॥ ३२ ॥ कैसें एकचि केवढें पसरलें । त्रिभुवन जिव्हाग्रीं आहे टेंकलें । जैसें कां [8]कवीठ घातलें । वडवानळीं ॥ ३३ ॥ ऐसीं अपार वदनें । आतां येतुलीं कैंचीं त्रिभुवनें । कां आहार न मिळतां येणें मानें । वाढविलीं [9]सैंघ ॥ ३४ ॥ अगा हा लोक बापुडा । जाहला वदनज्वाळां वेंरपडा । जैसी वणवेयाचिया वेढां[10] । सांपडती मृगें ॥ ३५ ॥ आतां तैसें या विश्वा जाहालें । देव नव्हे हें कर्म आलें । कां जगजळचरां [11]पांगिलें । जाळें काळें ॥ ३६ ॥ आतां इये अंगप्रभेचिये [12]वागुरे । कोणीकडूनि निगिजैल चराचरें । हीं वक्त्रें नोहेति [13]जोहरें । वोडवलीं जगा ॥ ३७ ॥ आगी आपुलेनि दाहकपणें । कैसेनि पोळिजे तें नेणें । परि जया लागे तया प्राणें । सुटिका नाहीं ॥ ३८ ॥ ना तरी माझेनि तिखटपणें । कैसें [14]निवटे हें शस्त्र कायि जाणे । कां आपुलियां मारा नेणे । विष जैसें ॥ ३९ ॥ तैसी तुज कांहीं । आपुलिया उग्रपणाची [15]सेचि नाहीं । परि ऐलीकडिले मुखीं [16]खांइ । [17]सैरली जगाची ॥ ४४० ॥ अगा आत्मा तूं एक । सकळ विश्वव्यापक । तरि कां आम्हां [18]अंतक । तैसा [19]वोडवलासी ॥ ४१ ॥ तरि मियां सांडिली जीविताची चाड । आणि तुवांही न धरावी भीड । मनीं आहे तें उघड । बोल पां सुखें ॥ ४२ ॥ किती वाढविसी या उग्ररूपा । आंगींचें भगवंतपण आठवीं बापा । नाहीं तरि कृपा । मजपुरती पाहीं ॥ ४३ ॥

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोस्तु ते देववर प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं नहि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥**

तरि एक [20]वेळ वेदवेद्या । जी त्रिभुवनैकआद्या । विनवणी विश्ववंद्या । आइकें माझी ॥ ४४ ॥ ऐसें बोलोनि वीरें । चरण नमस्कारिले शिरें । मग ह्मणे तरी सर्वेश्वरें । अवधारिजो ॥ ४५ ॥ मियां होआवया समाधान । जी पुसिलें विश्वरूपध्यान । आणि एकोचि

---

१ भिकारी. २ ओष्ठाग्रें. ३ चमचमीत, खरोखर. ४ सर्वथा. ५ लंपटपण. ६ हलकल्लोळ. ७ खाईन खाईन करणारीं. ८ कंवठीचें फळ. ९ पुष्कळ, एकदम. १० प्रात. ११ पसरलें, लावलें. १२ जाळ्यांतून. १३ लाक्षाग्नीचीं घरें. १४ मरे. १५ स्मरण. १६ नाश, क्षय. १७ सरसावली. १८ मृत्यु. १९ प्राप्त झालास. २० एका.

काळें त्रिभुवन । गिळितचि उठिलासि ॥ ४६ ॥ तरि तूं कोण कां [1]येतुलीं । इयें [2]भ्यासुरें मुखें कां मेळविलीं । अवघियाचि करीं [3]पैरिजलीं । शस्त्रें [4]काह्या ॥ ४७ ॥ जी जंव तंव रागीटपणें । वाढोनि गगना आणितोसि उणें । कां डोळे करूनि [5]भिंगुळवाणे । भेडसावीत आहासी ॥ ४८ ॥ एथ कृतांतेंसीं देवा । कासया किजतसे [6]हेवा । हा आपुला तुवां सांगावा । अभिप्राय मज ॥ ४९ ॥ या बोला ह्मणे अनंत । मी कोण हें आहासी पुसत । आणि कायिसयालागीं असें वाढत । उग्रतेसीं ॥ ४५० ॥

श्रीभगवानुवाच—

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान् समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां नभविष्यंति सर्वे येऽवास्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥३२॥**

तरि मी काळ गा हें [7]फुडें । लोक संहारावयालागीं वाढें । [8]सैंघ पसरिलीं आहातीं तोंडें । आतां ग्रासीन हें आघवें ॥ ५१ ॥ एथ अर्जुन ह्मणें [9]कटकटा । [10]उबगिलों मागिल्या संकटा । ह्मणोनि [11]ओंळविला तंव [12]वोखटा । [13]उवाइला हा ॥ ५२ ॥ तेविंचि कठिण बोलें [14]ओसतुटी । अर्जुन होईल [15]हिंपुटी । ह्मणोनि सवेंचि ह्मणे किरीटी । परि [16]आन एक असे ॥ ५३ ॥ तरि आतांचि ये संहार [17]वोहरें । तुह्मी पांडव [18]ओसा बाहिरे । तेथ जातजातां धनुर्धरें । सांवरिले प्राण ॥ ५४ ॥ होता मरणमहामारीं गेला । तों मागुता सावध जाहाला । मग लागला बोला । चित्त देऊं ॥ ५५ ॥ ऐसें ह्मणिजत आहे देवें । अर्जुना माझें तुह्मीं हें जाणावें । येर आण मी आघवें । [19]सरलों मासूं ॥ ५६ ॥ वज्रानळीं प्रचंडीं । जैसी [20]घांपे लोणियाची कंडी । तैसें जग हें माझिया तोंडीं । तुवां देखिलें जें ॥ ५७ ॥ तरि तयामाझारीं कांहीं । भरवसेनि उणें नाहीं । इयें [21]वायांचि सैन्यें पाहीं । [22]वल्गिजत आहाती ॥ ५८ ॥ ऐशा चतुरंगाचिया [23]संपदा । करित महाकाळेंसीं [24]स्पर्धा । [25]वांटिवेचिया मदा । [26]वळंघले जे ॥ ५९ ॥ हे जे मिळोनियां मेळे । कुंथती [27]वीरवृत्तीचेनि बळें । जयावरी गजदळें । वाखाणिजताती ॥ ४६० ॥ ह्मणती सृष्टीवरी सृष्टी करूं । आण वाहूनि मृत्यूतें मारूं । आणि जगाचा भरूं । घोंट यया ॥ ६१ ॥ पृथ्वी सगळीचि गिळूं । आकाश वरिचावरी जाळूं । काय बाणवरी खिळूं । [28]वारियातें ॥ ६२ ॥ बोल [29]हेतियेराहूनि तिखट । दिसती अग्नीपरिस [30]दांसट । मारकपणें कालकूट । [31]महुर ह्मणत ॥ ६३ ॥ तरि हे गंधर्वनगरींचे [32]उमाळे । जाण पोकळीचे

---

१ एवढीं. २ भयंकर. ३ धारण केलीं. ४ कशाकारितां. ५ भयंकर. ६ मत्सर. ७ खरें. ८ बहुत. ९ हायहाय. १० कंटाळलों. ११ प्रार्थिला. १२ वाईट. १३ प्रगटला. १४ निराश. १५ खिन्न. १६ आणखी. १७ संकटांतून, बाधेंतून. १८ बाहेर आहां. १९ प्रवर्तलों. २० सांपडे. २१ व्यर्थ. २२ बडबडत. २३ सैन्य. २४ बरोबरी करण्याची इच्छा. २५ पराक्रमाच्या. २६ चढले. २७ शूरवृत्तीच्या. २८ वाऱ्याला. २९ शस्त्रापेक्षां. ३० दाहक. ३१ मधुर. ३२ लोट.

पेंडवळें। अगा चित्रींचे पुतळे। वीर हे देखें ॥ ६४ ॥ हांगा मृगजळाचा पूर आला। [2]दळ नव्हे कापडाचा साप केला। इया शृंगारूनियां [3]खोळा। मांडिलिया पैं ॥ ६५ ॥

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम्।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥**

येर चेष्टवितें जें बळ। तें मागांचि मियां ग्रासिलें सकळ। आतां [4]कोल्हेरिचे [5]वेताळ। तैसे निर्जीव हे आहाती ॥ ६६ ॥ हालविती दोरी तुटली। तरि तियें खांबावरील बाहुलीं। भलतेणें लोटिलीं। उलथोनि पडती ॥६७॥ तैसा सैन्याचा यया [6]बगा। मोडतां वेळ नलगे पैं गा। ह्मणोनि उठीं उठीं वेगां। शाहाणा होईं ॥ ६८ ॥ तुवां गोग्रहणाचेनि [7]अवसरें। घातलें मोहनास्त्र येकसरें। मग विराटाचेनि [8]महाभेडें उत्तरें। [9]आसडूनि नागविलें ॥ ६९ ॥ आतां हें त्याहूनि [10]निपटारें जाहालें। [11]निर्वटीं आयितें रण पडिलें। घेईं यश रिपु जिंतिले। एकलेनि अर्जुनें ॥ ४७० ॥ आणि कोरडें यशचि नोहे। समग्र राज्यही आलें आहे। तूं निमित्तमात्रचि होयें। सव्यसाची ॥ ७१ ॥

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान्।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेताऽसि रणे सपत्नान् ॥३४॥**

द्रोणाचा [12]पाड न करीं। भीष्माचें भय न धरीं। कैसेनि कर्णावरी। [13]पजूं हें न ह्मणें ॥ ७२ ॥ कोण उपाय जयद्रथा कीजे। हें न चिंतू चित्त तुझें। आणीकही आथि जे जे। [14]नावाणिगे वीर ॥ ७३ ॥ तेही एक एक आघवे। चित्रींचे सिंहाडे मानावे। जैसे वोलेनि हातें घ्यावे। पुसोनियां ॥ ७४ ॥ यावरी पांडवा। कायसा युद्धाचा मेळावा। हा [15]आभास गा आघवा। येर ग्रासिलें मियां ॥ ७५ ॥ जेव्हां तुवां देखिले। हे माझिया वदनीं पडिले। तेव्हांचि यांचें आयुष्य सरलें। आतां रितीं [16]सोपें ॥ ७६ ॥ ह्मणोनि [17]वहिलें उठीं। मियां मारिले तूं [18]निर्वटीं। न रिघें शोकसंकटीं। [19]नाथिलिया ॥ ७७ ॥ आपणचि [20]आंडखिळा कीजे। तो कौतुकें जैसा [21]विंधोनि पाडिजे। तैसें देखें गा तुझें। निमित्त आहे ॥ ७८ ॥ बापा विरुद्ध जें जाहालें। तें उपजतांचि वाघें नेलें। आतां राज्येंसीं संचलें। यश तूं भोगीं ॥ ७९ ॥ सावियाचि [22]उतत होते [23]दायाद। आणि बळिये जगीं दुर्मद। ते वधिले [24]विषेद। सायास न लगतां ॥ ४८० ॥ ऐसिया इया गोष्टी। विश्वाच्या [25]वाक्पटीं। लिहूनि घालीं किरीटी। विजयी होईं ॥ ८१ ॥

---

१ मेंडोळे. २ सैन्य. ३ बाहुल्या. ४ चित्रींचे. ५ पुतळे. ६ आकार. ७ वेळीं. ८ भित्र्या. ९ हिसकावून. १० हीन. ११ संहारीं. १२ परवा. १३ शस्त्र धारण करूं. १४ नामांकित, प्रख्यात. १५ मिथ्या भास. १६ सोपटें. १७ लवकर. १८ मार. १९ लटक्या. २० लगोऱ्या. २१ मोडून. २२ उन्मत्त. २३ भाऊबंध. २४ स्पष्ट, विष देणारे. २५ वाणीरूप पटावर.

संजय उवाच—

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥**

ऐसी आघवीचि हे कथा । तया अपूर्णमनोरथा । संजय सांगे कुरुनाथा । ज्ञानदेव ह्मणे ॥ ८२ ॥ मग सत्यलोकौनि गंगाजळ । सुटलिया वाजत खळाळ । तैसी वाचा विशाळ । बोलतां तया ॥ ८३ ॥ ना तरी महामेघांचे उमाळे । घडघडीत एके वेळे । कां घुमघुमिला मंदराचळें । क्षीराब्धि जैसा ॥ ८४ ॥ तैसें गंभीरें महानादें । हें वाक्य विश्वकंदें । बोलिलें अगाधें । अनंतरूपें ॥ ८५ ॥ तें अर्जुनें मोटकें[4] ऐकिलें । आणि सुख कीं भय दुणावलें । हें नेणों परि कांपिनलें । सर्वांग तयाचें ॥ ८६ ॥ सखोलपणें वळली मोट । आणि तैसेचि जोडले करसंपुट । आणि वेळोवेळां ललाट । चरणीं ठेवी ॥ ८७ ॥ तेवींचि कांहीं बोलों जाये । तंव गळा बुजलाचि ठाये । हें सुख कीं भय होये । हें विचारा तुह्मी ॥ ८८ ॥ परि तेव्हां देवाचेनि बोलें । अर्जुना हें ऐसें जाहालें । मियां पदावरूनि देखिलें । श्लोकाचिया ॥ ८९ ॥ मग तैसाचि भेणें भेणें । पुढती जोहारूनि चरण । मग ह्मणे जी आपण । ऐसें बोलिलेति ॥ ४९० ॥

अर्जुन उवाच—

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ॥ ३६ ॥**

ना तरी अर्जुना मी काळ । आणि ग्रसिजे तो माझा खेळ । हा बोल तुह्मा कीर अढळ । मानूं आह्मी ॥ ९१ ॥ परि तुवां जी काळें । आजि स्थितीचिये वेळे । ग्रासिजे हें नं मिळे । विचारासी ॥ ९२ ॥ कैसेनि आंगींचें तारुण्य काढावें । कैंचें नव्हे तें वार्धक्य आणावें । ह्मणोनि करूं ह्मणसी तें नव्हे । बहुत करुनी ॥ ९३ ॥ हां जी चौपाहरीं न भरतां । कोणेही वेळे श्रीअनंता । काय मध्यान्हीं सवितां । मावळत आहे ॥ ९४ ॥ पैं तुज अखंडिता काळा । तिन्हीं आहाती जी वेळा । त्या तिन्हीं परी सबळा । आपुलालिया समयीं ॥ ९५ ॥ जे वेळीं होंलागे उत्पत्ती । ते वेळीं स्थिती प्रळय हारपती । आणि स्थितिकाळीं न मिरवती । उत्पत्ति प्रळय ॥ ९६ ॥ पाठीं प्रळयाचिये वेळे । उत्पत्ति स्थिति मावळे । हें कौयसेनही न ढळे । अनादि ऐसें ॥ ९७ ॥ ह्मणोनि आजि तंव भरें भोगें । स्थिती वर्जित आहे जगें । एथ ग्रसिसी तूं हें नलगे । माझ्या जीवीं

१ खळाळल्याप्रमाणें वाजणारें. २ दणाणला. ३ श्रीकृष्ण. ४ अमळसें. ५ भरून आला. ६ नमस्कारून. ७ स्वास्थ्याचे, पालनाचे. ८ जुळत नाहीं. ९ दिवसाचे चार प्रहर. १० सूर्य. ११ बळयुक्त. १२ स्वास्थ्य, पालन. १३ कशानेंही.

॥ ९८ ॥ तंव संकेतें देव बोले । अगा या दोहीं सैन्याचें भरणें[2] पुरलें । तें प्रत्यक्षचि तुज दाविलें । येर यथा काळें जाण ॥ ९९ ॥ हा संकेत जंव अनंता । वेळ लागला बोलतां । तंव अर्जुनें लोक मागुता । देखिला यथास्थित[3] ॥ ५०० ॥ मग ह्मणतसे देवा । तूं सूत्री[4] विश्वलाघवा । जग आला मा आघवा । पूर्वस्थिती पुढती ॥ १ ॥ परि पडिलिया दुःख- सागरीं । तूं काढिसी कां जया परी । ते कीर्ति तुझी श्रीहरी । आठवित असें ॥ २ ॥ कीर्ति आठवितां वेळोवेळां । भोगीतसें महासुखाचा सोहळा । तेथ हर्षामृतकल्लोळा- वरि लोळत आहें ॥ ३ ॥ देवा जियालेपणें[5] जग । धरी तुझ्याठायीं अनुराग[6] । आणि दुष्टां तयां भंग । अधिकाधिक ॥ ४ ॥ पैं त्रिभुवनीचिया राक्षसां । महाभय तूं हृषीकेशा । ह्मणोनि पळताती दाही दिशा । पैलीकडे ॥ ५ ॥ एथ सुर नर सिद्ध किन्नर । किंबहुना चराचर । ते तुज देखोनि हर्षनिर्भर[7] । नमस्कारित असती ॥ ६ ॥

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।**
**अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥**

एथ गा कवणा कारणा । राक्षस हे नारायणा । न लगतीचि चरणा । पळते जाहाले ॥ ७ ॥ आणि हें काय तूतें पुसावें । येतुलें आह्मासिही जाणवे । तरी सूर्योदयीं राहावें । कैसेनि तमें[8] ॥ ८ ॥ जी तूं स्वप्रकाशाचा आगर[9] । आणि जाहाला आहासि गोचर[10] । ह्मणोनियां निशाचरां केर[11] फिटला सहजें ॥ ९ ॥ हें येतुले दिवस आह्मा । कांहीं नेण- वेचि श्रीरामा । आतां देखतसें महिमा । गंभीर तुझा ॥ ५१० ॥ जेथूनि नाना सृष्टीचिया [12]वोली । पसरती भूतग्रामाचिया वेली । तया महद्ब्रह्मातें[13] व्याली । दैविकी इच्छा ॥ ११ ॥ देव निःसीम सत्व सदोदित । देव निःसीमगुण अनंत । देव निःसीम साम्य सतत । नरेंद्र देवांचा ॥ १२ ॥ जी तूं त्रिजगतिये वोलावा । अक्षर तूं सदाशिवा । तूंचि सदसत् देवा । तयाही अतीत तें तूं ॥ १३ ॥

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ ३८ ॥**

तूं प्रकृति[14]पुरुषांचिया आदी । जी महत्तत्त्वा[15] तूंचि अवधी[16] । स्वयें तूं अनादी । पुरातन ॥ १४ ॥ तूं सकळविश्वजीवन । जीवांसि तूंचि निधान । भूतभविष्याचें ज्ञान । तुझ्याचि हातीं ॥ १५ ॥ जी श्रुतीचिया लोचना । स्वरूपसुख तूंचि अभिन्ना । त्रिभुवनाचिया आयतना[18] । आयतन तूं ॥ १६ ॥ ह्मणोनि जी परम । तूतें ह्मणिजे महाधाम । कल्पांतीं

---

१ संक्षेपानें, खुणेनें. २ आयुष्य. ३ पूर्ववत्. ४ सूत्रधार. ५ जिवंतपणें. ६ प्रीति. ७ हर्षयुक्त. ८ अंधकारानें. ९ स्थान. १० प्रत्यक्ष. ११ अडचण झाली. १२ ओली १३ मायेस. १४ शिवशक्ति. १५ गुणसाम्य मायेला. १६ शेवट. १७ आश्रयास. १८ आश्रयस्थान.

महद्ब्रह्म । तुजमाजि [1]रिगे ॥ १७ ॥ किंबहुना तुवां देवें । विश्व विस्तारिलें आहे माधवें । तरि अनंतरूपा वानावें । कवणें तूतें ॥ १८ ॥

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥**
**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोस्तु ते सर्वत एव सर्व ।**
**अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥**

जी काय एक तूं नव्हसी । कवणेठायीं नससी । हें असो जैसा आहासी । तैसिया नमों ॥ १९ ॥ वायु तूं श्रीअनंता । यम तूं नियमिता[2] । प्राणिगणीं वसता । अग्नि तो तूं ॥ ५२० ॥ वरुण तूं सोम । स्रष्टा तूं ब्रह्म । पितामहाचाही परम । आद्य जनक तूं ॥ २१ ॥ आणीकही जें जें कांहीं । रूप आथि[3] अथवा नाहीं । तया नमों तुज तैसयाही । श्रीजगन्नाथा ॥ २२ ॥ ऐसें सानुरागें[4] चित्तें । नमन केलें पांडुसुतें । मग पुढती ह्मणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २३ ॥ पाठीं तिये साद्यंतें । न्याहाळी श्रीमूर्तीतें । आणि पुढती ह्मणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २४ ॥ पाहत पाहतां प्रांतें । समाधान पावे चित्तें । आणि पुढती ह्मणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २५ ॥ इयें चराचरीं जी भूतें । सर्वत्र देखे तयातें । आणि पुनःपुना ह्मणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २६ ॥ ऐसीं रूपें तियें अद्भुतें । आश्चर्यें स्फुरतीं अनंतें । तंव तंव नमस्ते । नमस्तेचि ह्मणे ॥ २७ ॥ आणिक स्तुतीही नाठवे । आणि निवांतही नैसवे[5] । नेणें कैसा प्रेमभावें । गाजोंचि लागे ॥ २८ ॥ किंबहुना इयापरी । नमन केलें सहस्रवरी[6] । कीं पुढती ह्मणे श्रीहरी । तुज सन्मुखा नमों ॥ २९ ॥ देवासि पाठि पोट आथि कीं नाहीं । येणें उपयोग आह्मा काई । तरि तुज पाठिमोरेयाही । नमों स्वामि ॥ ५३० ॥ उभा माझिये पाठीसीं । ह्मणोनि पाठिमोरें ह्मणावें तुह्मासी । सन्मुख विमुख जगेंसीं । न घडे तुज ॥ ३१ ॥ आतां वेगळालिया अवयवां । नेणें रूप करूं देवा । ह्मणोनि नमों तुज सर्वा । सर्वात्मका ॥ ३२ ॥ जी अनंत बळसंभ्रमा[7] । तुज नमों अमितविक्रमा । सकळकाळीं समा[8] । सर्वदेवा ॥ ३३ ॥ आघविया आकाशीं जैसें । अवकाशचि होऊनि आकाश असे । तूं सर्वपणें तैसें । पातलासि सर्व ॥ ३४ ॥ किंबहुना केवळ । सर्व हें तूंचि निखिळ । परि क्षीरार्णवीं कल्लोळ । पैयाचे[9] जैसे ॥ ३५ ॥ ह्मणोनियां देवा । तूं वेगळा नव्हसी सर्वा । हें आलें मज सेंद्रावा[10] । आतां तूंचि सर्व ॥ ३६ ॥

---

१ लीन होतें. २ शासन कर्ता. ३ आहे. ४ प्रेमानें. ५ न राहवे. ६ सहस्र वेळा. ७ समारंभरूपा. ८ शुद्ध. ९ उदकाचे. १० प्रत्ययास.

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वाऽपि ॥ ४१ ॥**

परि ऐसिया तूतें स्वामी । कहींच नेणों जी आह्मी । ह्मणोनि सोयरे संबंधधर्मी[1] । राह-टलों[2] तुजसीं ॥ ३७ ॥ अहा थोर वाउंर[3] जाहालें । अमृतें संमार्जन[4] म्यां केलें । वारिकें[5] घेऊनि दिधलें । कामधेनूतें ॥ ३८ ॥ परिसाचा खडवाचि[6] जोडला । कीं फोडूनि आह्मी गाँडोरां[7] घातला । कल्पतरू तोडोनि केला । कूप[8] शेता ॥ ३९ ॥ चिंतामणीची खाणी लागली । तेणेंकरूनि वोढाळें[9] वोल्हांटिलीं[10] । तैसी तुझी जवळीक धाडिली । सांगातीपणें ॥ ५४० ॥ हें आजिचेंचि पाहें पां रोकडें । कवण झुंझ हें केवढें । एथ परब्रह्म तूं उघडें । सारथी केलासी ॥ ४१ ॥ यथां कौरवांचिया घरा । शिष्टाई धाडिलासि दातारा । ऐसा वणिजेसाठीं[11] जगेश्वरा । विकलासि आह्मी ॥ ४२ ॥ तूं योगियांचें समाधिसुख । कैसा जाणेंचिना मी मूर्ख । उपरोध[12] जी सन्मुख । तुजसीं करूं ॥ ४३ ॥

**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।**
**एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥**

तूं या विश्वाची अनादि आदी । बैससी जिये सभासदीं । तेथें सोयरीकीचिया संबंधीं । रेळीं[13] बोलों ॥ ४४ ॥ विर्पायें[14] राउळा[15] येवों । तरि तुझेनि अंगें मान पावों । न मानिसी तरी जावों । रुसोनि सलगी ॥ ४५ ॥ पायां लागोनि बुझावणी[16] । तुझ्याठायीं शार्ङ्गपाणी । पाहिजे ऐशी करणी । बहु केली आह्मीं ॥ ४६ ॥ स्वजनपणाचिया वाटा । तुजपुढें बैसे उपैराटा[17] । हा पाँड[18] काय वैकुंठा[19] । परि चुकलों आह्मी ॥ ४७ ॥ देवेंसि कोलैंकाठी[20] धरूं । आखाडां झोंबीलोंबी[21] करूं । सारी[22] खेळतां तैस्कारू[23] । निकरेंही भांडों ॥ ४८ ॥ चांग तें उरांउरी[24] मागों । सर्वज्ञासि कीं बुद्धी सांगों । तेवींचि ह्मणों काय लागों । तुझे आह्मी ॥ ४९ ॥ ऐसा अपराध हा आहे । जो त्रिभुवनीं न समाये । जी नेणतांचि कीं पाय । शिवतिले तुझे ॥ ५५० ॥ देव बोनेयाच्या[25] अवसरीं । लोभें कीर आठवण करी । परि माझा निर्सुंग[26] गर्व अवधारीं । जे फुगूनचि बैसें ॥ ५१ ॥ देवाचिया भोगौयतनीं[27] । खेळतां आशंकेना मनीं । जी रिगोनियां शयनीं । सरिसीं[28] पहुडें ॥ ५२ ॥ कृष्णा ह्मणोनि हौंका-रिजे[29] । यादवपणें तूतें लेखिजे । आपली आण घालिजे । जातां तुज ॥ ५३ ॥ मज एका-

१ सोयेरपणाच्या नात्यानें. २ वागलों. ३ वाईट. ४ सडासारवण. ५ कोंकरूं. ६ पर्वतच. ७ गडगा, पायाभरणीस. ८ कुंपण. ९ ओढाळ गुरें. १० हांकून लाविलीं. ११ वाणिज्यार्थे, उदिमासाठीं. १२ आग्रह, हट्ट. १३ विनोदानें. १४ कदाचित्. १५ घरीं. १६ समजूत. १७ पाठमोरा. १८ योग्यता. १९ श्रीकृष्णा. २० दांडपट्टा. २१ कुस्ती. २२ सोंगट्या. २३ तिरस्कार करूं. २४ बरो-बरीनें. २५ जेवणाच्या. २६ रिकामा. २७ विलासगृहांत. २८ शेजारीं निजें. २९ हाक मारावी.

सनीं बैसणें । कां तुझा बोल न मानणें । हें वोतंट्रीचोनि दाटपणें । बहुत घडलें ॥ ५४ ॥ ह्मणोनि काय काय आतां । निवेदिजेल अनंता । मी राशि आहें समस्तां । अपराधांची ॥ ५५ ॥ यालागीं पुढां अथवा पाठीं । जियें राहाटलों बहुवें वोखटीं । तियें मायेचिया परि पोटीं । सामावीं प्रभो ॥ ५६ ॥ जी कोण्ही एके वेळे । सरिता घेऊनि येती खडुळें । तियें सामाविजेति सिंधुजळें । आन उपाय नाहीं ॥ ५७ ॥ तैसीं प्रीति कां प्रमादें । देवेंसी मजविरुद्धें । बोलविलीं तियें मुकुंदें । उपसाहावीं जी ॥ ५८ ॥ आणि देवाचेनि क्षेमत्वें क्षमा । आधार जाली आहे या भूतग्रामा । ह्मणोनि जी पुरुषोत्तमा । विनवूं तें थोडें ॥ ५९ ॥ तरि आतां अप्रमेया । मज शरणागता आपुलिया । क्षमा कीजो जी यया । अपराधांसी ॥ ५६० ॥

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३ ॥**

जी जाणीतलें मियां साचें । महिमान आतां देवाचें । देवो होय चराचराचें । जन्मस्थान ॥ ६१ ॥ हरिहरादि समस्तां । देवा तूं परमदेवता । वेदातेंही पढविता । आद्य गुरु तूं ॥ ६२ ॥ गंभीर तूं श्रीरामा । नानाभूतैकसमा । सकळगुणी अप्रतिमा । अद्वितीया ॥ ६३ ॥ तुजसीं नाहीं सरिसें । हें प्रतिपादनचि कायसें । तुवां जालेनि अवकाशें । सामाविलें जग ॥ ६४ ॥ तया तुझेनि पैंडें दुजें । ऐसें बोलतांचि लाजिजे । तेथ अधिकचि कीजे । गोष्टी केवीं ॥ ६५ ॥ ह्मणोनि त्रिभुवनीं तूं एक । तुजसारिखा नाहीं आणिक । तुझा महिमा अलौलिक । नेणिजे वानूं ॥ ६६ ॥

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥**

ऐसें अर्जुनें ह्मणितलें । मग पुढती दंडवत घातलें । तेथें सात्त्विकाचें आलें । भरतें तया ॥ ६७ ॥ मग ह्मणतसे प्रसीद प्रसीद । वाचा होतसे सद्गद । काढीं जी अपराध- । समुद्रौनी ॥ ६८ ॥ तुज विश्वसुहृदातें कहीं । सोयरेपणें न मनुंचि पाहीं । तुज विश्वेश्वराचिया ठायीं । आश्चर्य केलें ॥ ६९ ॥ तूं वर्णनीय परी लोभें । मातें वर्णिसी पां सभे । तरि मियां वेंगिजे क्षोभें । अधिकाधिक ॥ ५७० ॥ आतां ऐसिया अपराधां । मर्यादा नाहीं मुकुंदा । ह्मणोनि रक्ष रक्ष प्रमादा- । पासोनियां ॥ ७१ ॥ जी हेंचि विनवावयालागीं ।

---

१ अत्यंत संघट्टणाचे. २ वाईट रीतीनें. ३ गढूळ उदकें. ४ क्षमारूपानें. ५ प्राण्यांचा समुदाय. ६ अतर्क्या, अनिर्वचनीया. ७ तुल्य. ८ आकाशें. ९ सांठवलें. १० बरोबरीनें. ११ अपूर्व. १२ कृपाकर. १३ समुद्रांतून. १४ मानीत. १५ वडबड करावी. १६ चुकी.

कैंची योग्यता माझिया आंगीं । परि अपत्य जैसें सलगी । बापेंसि बोले ॥ ७२ ॥ पुत्राचे अपराध । जरी जाहाले [2]अगाध । तरि पिता साहे निर्द्वंद्व । तैसें साहिजो जी ॥ ७३ ॥ सख्याचें उद्धत । सखा साहे निवांत । तैसें तुवां समस्त । साहिजो जी ॥ ७४ ॥ प्रियाचियाठायीं सन्मान । प्रिय न पाहे सर्वथा जाण । तेविं उच्छिष्ट काढिलें आपण । तें क्षमा कीजो जी ॥ ७५ ॥ ना तरी प्राणाचें सोयरें भेटे । मग जीवें भूतलीं जियें संकटें । तियें निवेदितां न वाटे । संकोच कांहीं ॥ ७६ ॥ कां उखितें आंगें जीवें । आपणपें दिधलें जिंया मनोभावें । तियां कांत मिनलियां न राहावें । हृदय जेविं ॥ ७७ ॥ तयापरी जी मियां । हें विनविलें तुमतें गोसांविया । आणीक कांहीं एक म्हणावया । कारण असे ॥ ७८ ॥

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥**

तरि देवेंसीं सलगी केली । जे विश्वरूपाची आळी घेतली । ते मायबापें पुरविली । स्नेहाळाचेनि ॥ ७९ ॥ सुरतरूचीं झाडें । आंगणीं लावावीं [9]कोडें । देयावें कामधेनूचें [10]पांडें । खेळावया ॥ ५८० ॥ मियां नक्षत्रीं डाव पाडावा । चंद्र [11]चेंडुवालागीं आणावा । हा छंद सिद्धी नेला आघवा । माउलियें तुवां ॥ ८१ ॥ जिया अमृतलेशालागीं सायास । त्याचा पाउस केला चारि मास । पृथ्वी वाहुन [12]चौसिचास । चिंतामणी पेरिले ॥ ८२ ॥ ऐसा कृतकृत्य केला स्वामी । बहु लळा पाळिला तुह्मी । दाविलें जें हरब्रह्मीं । नायकिजे कानीं ॥ ८३ ॥ [13]मौं देखावयाची [14]कउँती गोठी । जयाची उपनिषदां नाहीं भेटी । ते [15]जिव्हारींची गांठी । मजलागीं सोडिली ॥ ८४ ॥ जी कल्पादि [16]लागौनी । आजिची घडी धरुनी । माझीं जेतुलीं होउनी । गेलीं जन्में ॥ ८५ ॥ तया आघवियांचिआंत । [17]घरेंडोळी घेउनि असे पाहत । परि ही देखिली ऐकिली मात । [18]ओतुडेचि ना ॥ ८६ ॥ बुद्धीचें जाणणें । कहीं नवचेचि याचेनि आंगणें । हें [19]सोंदही अंतःकरणें । करवेचिना ॥ ८७ ॥ तेथ डोळयां [20]देखी होआवी । ही गोष्टीचि कायसया करावी । किंबहुना ऐसें पूर्वीं । [21]दृष्ट ना [22]श्रुत ॥ ८८ ॥ तें हें विश्वरूप आपुलें । तुह्मी मज डोळां दाविलें । तरि माझें मन झालें । [23]हृष्ट देवा ॥ ८९ ॥ परि आतां ऐशी चाड जीवीं । जे तुजसी गोठी करावी ।

---

१ लडिवाळपणानें. २ अतीशय. ३ दुजाभाव सोडून. ४ दांडगेपणा. ५ अनुभवलीं, झालीं. ६ जिया, जिणें ज्याला आपलें उखितें, सर्वस्व अर्पण केलें तो कांत, नवरा तिला प्राप्त झाला असतां तिच्यानें गुप्त गोष्ट ठेववत नाहीं. ७ नवरा. ८ छंद. ९ आवडीनें. १० वांसरूं. ११ चेंडू म्हणून. १२ वाफ्यावाफ्यानें. १३ तर मग. १४ काय गोष्ट. १५ अंतरंग. १६ प्रारंभापासून. १७ प्रत्येक घराचा झाडा. १८ सांपडेना. १९ शब्द. २० डोळ्यांनीं, पाहणें. २१ पाहिलें नाहीं, ऐकिलें नाहीं. २२ आलिंगन. २३ आनंदित.

जवळीक हे भोगावी । आलिंगावयासी ॥ ५९० ॥ तें इयेंचिरूपीं करूं ह्मणिजे । तरि कोणे एके मुखेंसीं चावळिजे । आणि कवणा खेंव देइजे । तुज लेख नाहीं ॥ ९१ ह्मणोनि वारियासवें धांवणें । नेठके गगना खेंव देणें । जळकेळी खेळणें । समुद्रीं केउतें ॥ ९२ ॥ यालागीं जी देवा । एथिचें भय उपजतसे जीवा । ह्मणोनि येतुलळा पाल्हावा । जे पुरें हें आतां ॥ ९३ ॥ पैं चराचर विनोदें पाहिजे । मग तेणें सुखें घरीं राहिजे । तैसें चतुर्भुज रूप तुझें । तो विसावा आह्मां ॥ ९४ ॥ आह्मी योगजात अभ्यासावें । तेणें याचि अनुभवा यावें । शास्त्रांतें आलोडावें । परि सिद्धांत तो हाचि ॥ ९५ ॥ आह्मीं यजनें किजती सकळें । परि तियें फळावीं येणेंचि फळें । तीर्थें होतु सकळें । याचिलागीं ॥ ९६ ॥ आणीकही कांहीं जें जें । दान पुण्य आह्मी कीजे । तया फळी फळ तुझें । चतुर्भुज रूप ॥ ९७ ॥ ऐसी तेथिंची जीवा आवडी । ह्मणोनि तेंचि देखावया लवडसवडी । वर्तत असे ते सांकडी । फेडिजे वेगीं ॥ ९८ ॥ अगा जीवींचें जाणतेया । सकळ विश्ववसवितेया । प्रसन्न होईं पूजितया । देवांचिया देवा ॥ ९९ ॥

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥**

कैसें नीलोत्पलातें रांवित । आकाशाही रंग लावित । तेजाची वोज दावित । इंद्रनीळा ॥ ६०० ॥ जैसा परिमळ जाहाला मरगजा । कां आनंदासि निघालिया भुजा । ज्याचे जानुवरी मकरध्वजा । जोडली बरव ॥ १ ॥ मस्तकीं मुकुटातें लेवविलें । कीं मुकुटा मुकुट मस्तक झालें । शृंगारा लेणें लाधलें । आंगोचेनि जया ॥ २ ॥ इंद्रधनुष्याचिये आंडणी । माजि मेघ गगनरंगणीं । तैसें आवरिलें शार्ङ्गपाणी । वैजयंतिया ॥ ३ ॥ आतां कवणी ते उदार गदा । असुरां देत कैवल्यपदा । कैसें चक्र हन गोविंदा । सौम्यतेजें मिरवे ॥ ४ ॥ किंबहुना स्वामी । तें देखावया उत्कंठीत पां मी । ह्मणोनि आतां तुह्मी । तैसया होआवें ॥ ५ ॥ हे विश्वरूपाचे सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे । आतां होताति आंधळे । कृष्णमूर्तिलागीं ॥ ६ ॥ तें साकार कृष्णरूपडें । वांचूनि पाहों नावडे । तें न देखतां थोडें । मानिताति हे ॥ ७ ॥ आह्मां भोगमोक्षाचियाठायीं । श्रीमूर्तिवांचूनि नाहीं । ह्मणोनि तैसाचि साकार होईं । हें उपसंहारीं आतां ॥ ८ ॥

---

१ बोलिजे. २ गणना. ३ नघडे. ४ जलक्रीडा. ५ पुरवावा. ६ यमनियमादि सर्व योग. ७ अध्ययन करावें, विचारावें. ८ लगबग. ९ अडचण. १० काढ. ११ वसविणाऱ्या. १२ रंगवित. १३ चांगुलपणा. १४ पाचेस, मरकत मण्यास. १५ मदनास. १६ शोभा. १७ जसा आकाशांत इंद्रधनुष्याचे आडणी, घडवंचीवर मेघ दिसतो तसें वैजयंतीनें कृष्णाला आवरिलें, वेष्टिलें होतें. १८ पहिले, अगोदरच्याप्रमाणें भुकेले. १९ आटोप.

**श्रीभगवानुवाच–मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**
**तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥**

या अर्जुनाचिया बोला । विश्वरूपा विस्मयो जाहाला । ह्मणे ऐसा नाहीं देखिला । धसाळ[1] कोणी ॥ ९ ॥ कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोषे[2] न घेसी । मा भेणें काय नेणों बोलसी । हेकेंड[3] ऐसा ॥ ६१० ॥ आह्मी साविया[4]चि जैं प्रसन्न होणें । तैं आंगचिवरी ह्मणे देणें । वांचोनि जीव असे वेचणें । कवणासि गा ॥ ११ ॥ तें हें तुझिये चाडे । आजि जीवाचेंचि दळवाडें[5] । कामऊनियां[6] येवढें । रचिलें ध्यान ॥ १२ ॥ ऐसी काय नेणों तुझिये आवडी । जाहाली प्रसन्नता आमुची वेडी । ह्मणोनि गौप्याची ही गुढी । उभविली जगीं ॥ १३ ॥ तें हें अपरांअपार । स्वरूप माझें परात्पर । एथूनि ते अवतार । कृष्णादिक ॥ १४ ॥ हें ज्ञानतेजाचें निखिळ । विश्वात्मक केवळ । अनंत हें अढळ । आद्य सकळां ॥ १५ ॥ हें तुजवांचोनि अर्जुना । पूर्वीं श्रुतं[10] दृष्टं[11] नाहीं आना । जें जोगें नव्हे साधना । ह्मणोनियां ॥ १६ ॥

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवं रूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥**

याची सोय[13] पातले । आणि वेदीं मौनचि घेतलें । यज्ञ[14] कीर मागौते आले । स्वर्गोनियां ॥ १७ ॥ साधकीं देखिला आयास । ह्मणोनि वोळिला[15] योगाभ्यास । आणि अध्ययनें सौरसें[16] नाहीं एथ ॥ १८ ॥ [17]सीगेचीं सत्कर्में । धाविन्नलीं सर्वसंभ्रमें[18] । तिहीं बहुतेकीं श्रमें । सत्यलोक ठोकिला[19] ॥ १९ ॥ तपीं ऐश्वर्य देखिलें । आणि उभयांचि[20] उग्रपण सांडिलें । एवं तपसाधना जें ठेलें । अपारांतरें[21] ॥ ६२० ॥ तें हें तुवां अनायासें । विश्वरूप देखिलें जैसें । इये मनुष्यलोकीं तैसें । न फाविजे[22] कवणा ॥ २१ ॥ आजि ध्यानसंपत्तिलागीं । तूं एकचि आथिला जगीं । हें परमभाग्य आंगीं । विरंचीही नाहीं ॥ २२ ॥

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥**

ह्मणोनि विश्वरूपलाभें श्लाघ[23] । एथिचें भय नेघ नेघ । हें वांचूनि अन्य चांग । न

---

१ अविचारी. २ समाधान. ३ अडाणी, एककल्ली. ४ सहजच. ५ स्वतःस. ६ समुदाय. ७ श्रमपूर्वक तयार करून. ८ ध्वज. ९ सर्वस्व. १० ऐकलेले. ११ पाहिलेले. १२ दुसऱ्याला. १३ मार्ग. १४ यज्ञानें स्वर्गापर्यंतच जाऊन परत यावें लागतें. १५ त्यागिला. १६ गोडी. १७ पूर्ण. १८ आपल्या मोठेपणानें. १९ प्राप्त करून घेतला. २० उभ्याउभ्याच. २१ तप या साधनाला अत्यंत दूर पडतें. २२ प्राप्त होत नाहीं. २३ स्तुतीस पात्र.

नीं कांहीं ॥ २३ ॥ हांगा समुद्र अमृताचा भरला । आणि अवसांत वेरपडा जाहाला । ग कोणीही आंथि वोसंडिला । बुडिजेल ह्मणोनि ॥ २४ ॥ ना तरी सोनयाचा डोंगर । सिणा न चले हा थोर । ऐसें ह्मणोनि अव्हेर । करणें घडे ॥ २५ ॥ दैवें चिंतामणी ाइजे । कीं हें ओझें ह्मणोनि सांडिजे । कामधेनू दवडिजे । न पोसवे ह्मणोनी ॥ २६ ॥ वंद्रमा आलिया घरा । ह्मणिजे निगें करितोसि उबारा । पैंडिसायि पाडितोसि दिन-करा । परता सर ॥ २७ ॥ तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज । कीं एथ तुज गजबज । होआवी कां ॥ २८ ॥ परि नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा ॥ २९ ॥ हें नव्हे जो मी साचें । एथ मन करूनियां काचें । प्रेम धरिसी आंगवणियेचें । चतुर्भुज जें ॥ ६३० ॥ तरि आझुनिवरी पार्था । सांडीं सांडीं हे आस्था । यियेविषयीं अनास्था । करिसी ह्मणें ॥ ३१ ॥ हें रूप जरि घोर । विकृती आणी थोर । तरि कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं ॥ ३२ ॥ कृपणचित्तवृत्ति जैसी । रोंवोनि घाली ठेवियापासीं । मग नुसधेन देहेंसीं । आपण असे ॥ ३३ ॥ कां अंजातपक्षिया जवळा । जीव ठेऊनि अविसाळा । पक्षिणी अंतराळा- । माजि जाय ॥ ३४ ॥ नाना गाय चरे डोंगरीं । परि चित्त बांधिलें वत्सें घरीं । तैसें प्रेम एथिचें करीं । स्थानपती ॥ ३५ ॥ येरें वरिचिलेनि चित्तें । बाह्य सख्य सुखापुरतें । भोगि जो कां श्रीमूर्तीतें । चतुर्भुज ॥ ३६ ॥ परि पुढतपुढती पांडवा । हा एक बोल न विसरावा । जे यिये रूपींहुनी सद्भावा । नेदींवें निघों ॥ ३७ ॥ हें कहीं नव्ह-तेंचि देखिलें । ह्मणोनि भय जें तुज उपजलें । तें सांडीं एथ संचलें । असों दे प्रेम ॥ ३८ ॥ आतां करूं तुज यासारिखें । ऐसें ह्मणितलें विश्वतोमुखें । तरि मागील रूप सुखें । न्याहाळीं पां तूं ॥ ३९ ॥

संजय उवाच—

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥**

ऐसें वाक्य बोलतखेवों । मागुता मनुष्य जाहला देवों । हें ना परि नवलावो । आव-डीचा तिये ॥ ६४० ॥ श्रीकृष्णचि कैवल्य उघडें । वरि सर्वस्व विश्वरूपायेवढें । हातीं दिधलें कीं नावडे । अर्जुनासी ॥ ४१ ॥ वस्तु घेऊनि वोळिजे । जैसें रत्नासि दूषण

१ अकस्मात्. २ प्राप्त झाला. ३ आहे. ४ त्यागिला. ५ एवढा. ६ उष्मा, तलखी. ७ पड-छाया पाडतोस. ८ आकृतीचें. ९ करूं नको. १० कंटाळा आणिलें. ११ द्रव्याच्या ठेव्याजवळ. १२ केवळ. १३ पक्ष फुटले नाहींत अशा पिल्लास. १४ घरटें. १५ पुनःपुन्हा. १६ देऊं नये. १७ श्रीकृष्णानें. १८ बोलतांक्षणींच. १९ आश्चर्य. २० परब्रह्म. २१ टाकावें.

ठेविजे । ना तरी कन्या पाहूनियां ह्मणिजे । मना नये हे ॥ ४२ ॥ तया विश्वरूपायेवढी दशा । करितां प्रीतिचा वाढ कैसा । शेलें दिधलीसे उपदेशा । किरीटीसि देवें ॥ ४३ ॥ मोडोनि भांगाराचा रवा । लेणें घडिलें आपलिया सैवा । मग नावडे जरी जीवा । तरी आटिजे पुढती ॥ ४४ ॥ तैसें शिष्याचिये प्रीती जाहालें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप जालें । तें मना नयेचि मग आणिलें । कृष्णपण मागुतें ॥ ४५ ॥ हा ठावेंवरी शिष्याचीं निकेसी । सौहाते गुरु आहाती कवणे देशीं । परी नेणिजे आवडी कैशी । संजय ह्मणे ॥ ४६ ॥ मग विश्व व्यापूनि भगवंतें । जें दिव्यतेज प्रकटलें होतें । तेंचि सामावलें मागुतें । कृष्णरूपीं तिये ॥ ४७ ॥ जैसें त्वंपद हें आघवें । तत्पदीं सामावे । अथवा द्रुमाकार सांठवे । बीजकणिके जेवि ॥ ४८ ॥ ना तरी स्वप्नसंभ्रम जैसा । गिळी चेइली जीवदशा । श्रीकृष्णें योग हा तैसा । संहारिला तो ॥ ४९ ॥ जैसी प्रभा हारपली बिंबीं । कीं जळदसंपत्ती नभीं । नाना भरतें सिंधुगर्भीं । रिगालें राया ॥ ६५० ॥ होकां जे कृष्णाकृतीचिये मोडी । होती विश्वरूपपटाची घडी । ते अर्जुनाचिये आवडी । उकलूनि दाविली ॥ ५१ ॥ तंव परिमाणु वा रंग । तेणें देखिले साविया चांग । तेथ मोहकीये नव्हेचि लाग । ह्मणोनि घडी केली पुढती ॥ ५२ ॥ तैसें वाढीचेनि बहुवसपणें । रूपें विश्व जितिलें जेणें । तें सौम्य कोडिसवाणें । साकार जाहालें ॥ ५३ ॥ किंबहुना अनंतें । धरिलें धाकुटपण मागुतें । परि आश्वासिलें पार्थातें । बिहालियासी ॥ ५४ ॥ जो स्वप्नीं स्वर्गा गेला । तो अवसांत जैसा चेइला । तैसा विस्मय जाहाला । किरीटीसी ॥ ५५ ॥ ना तरी गुरुकृपेसवें । वोसरलेया प्रपंचज्ञान आघवें । स्फुरे तत्त्व तेवि पांडवें । श्रीमूर्ति देखिली ॥ ५६ ॥ तया पांडवा ऐसें चित्तीं । आड विश्वरूपाची जवनिका होती । ते फिटोनि गेली परौती । हें भलें जाहालें ॥ ५७ ॥ काय काळातें जिणोनि आला । कीं महावात मागां सांडिला । आपुलिया बाहीं उतरला । सातही सिंधु ॥ ५८ ॥ ऐसा संतोष बहु चित्तें । घेइजत असे पंडुसुतें । विश्वरूपापाठीं कृष्णातें । देखोनियां ॥ ५९ ॥ मग सूर्याचिया अस्तमानीं । मागुती तारा उगवती गगनीं । तैसा देखों लागला अवनी । लोकांसहित ॥ ६६० ॥ पाहे तंव तेंचि कुरुक्षेत्र । तसेंचि देखे दोहीं भागीं गोत्र । वीर वर्षताति शस्त्रास्त्र । संघाटवरी ॥ ६१ ॥ तया बाणाचिया मांडवाआंत । तैसाचि रथ देखे निवांत । धुरे बैसला लक्ष्मीकांत । आपण तळीं ॥ ६२ ॥

---

१ उत्तम वांटा. २ सोन्याचा रज. ३ सार्टी. ४ येथपर्यंत. ५ किरकिर, जिकीर. ६ सहन करणारे. ७ जीवदशा. ८ ब्रह्मरूपीं. ९ वृक्ष. १० स्वप्नाचा विस्तार, घोटाळा. ११ जागृत झालेली. १२ मेघ. १३ शिरलें. १४ आकार. १५ परिमाण गुण पोत इ० कापडाचें. १६ गिराईक. १७ सुंदर. १८ भ्यालेल्यास. १९ अकस्मात्. २० लय पावल्यावर. २१ पडदा. २२ बाहूंनीं. २३ शस्त्रास्त्रांच्या समुदायानें.

अर्जुन उवाच—दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

एवं मागितलें जैसें तैसें । तेणें देखिलें वीरविलासें । मग ह्मणे जी जियालों ऐसें । जाहालें आतां ॥ ६३ ॥ बुद्धीतें सांडोनि ज्ञान । भेणें वेंळघलें रान । अहंकारेंसी मन । देशधडी जाहालें ॥ ६४ ॥ इंद्रियें प्रवृत्ती भुललीं । वाचा वाचकपणा चुकली । ऐसी आपांपरी होती जाली । शरीरग्रामीं ॥ ६५ ॥ तियें आघवींचि मागुतीं । जिवातें भेटलीं प्रकृतीं । आतां जिंताणें श्रीमूर्ती । जाहालें यियां ॥ ६६ ॥ ऐसें सुख जीवीं घेतलें । मग श्रीकृष्णातें ह्मणितलें । मियां तुमचें रूप देखिलें । मानुष हें ॥ ६७ ॥ हें रूप दाखवणें देवराया । कीं मज अपत्या चुकलिया । बुझावोनि तुवां माया । स्तनपान दिधलें ॥ ६८ ॥ जी विश्वरूपाचिया सागरीं । होतों तरंग मविंत वांवेवरी । तो इये निजमूर्तीच्या तीरीं । निगालों आतां ॥ ६९ ॥ आइकें द्वारकापुरखेंहाडा । मज सुकातिया जी झाडा । हे भेटी नव्हे बहुंडा । मेघाचा केला ॥ ६७० ॥ जी सोंवियाचि तृषा फुटला । तया मज अमृतसिंधु हा भेटला । आतां जिणेंयाचा फिटला । अभरंसा ॥ ७१ ॥ माझिया हृदयरंगणीं । होताहे हर्षलतांची लावणी । सुखेंसीं बुझावणी । जाहाली मज ॥ ७२ ॥

श्रीभगवानुवाच—सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥

यया पार्थाचिया बोलासवें । हें काय ह्मणितलें देवें । तुवां प्रेम ठेवूनि यावें । विश्वरूपीं कीं ॥ ७३ ॥ मग इये श्रीमूर्ती । भेटावें संडिया आयती । ते शिकवण सुभद्रापती । विसरला मा ॥ ७४ ॥ अगा आंधळिया अर्जुना । हाता आलिया मेरुही होय साना । ऐसा ओंथि मना । चुकीचा भावो ॥ ७५ ॥ तरि विश्वात्मक रूपडें । जें दाविलें आह्मी तुजपुढें । तें शंभूही परि न जोडे । तपें करितां ॥ ७६ ॥ आणि अष्टांगादिसंकटीं । योगी शिणताति किरीटी । परी अवसर नाहीं भेटी । जयाचिये ॥ ७७ ॥ तें विश्वरूप एकादे वेळ । केंसोनि देखों अंळुमाळ । ऐसें स्मरतां काळ । जातसे देवा ॥ ७८ ॥ आशेचिया अंजुळी । ठेऊनि हृदयाचिया निडळीं । ते चातक निरोंळीं । लागले जैसे ॥ ७९ ॥ तैसे उत्कंठानिर्भर । होऊनियां सुरवर । घोकीत आठही पाहर । भेटी जयाची ॥ ६८० ॥ परि विश्वरूपासारिखें । स्वप्नींही कोण्ही न देखे । तें प्रत्यक्ष तुवां सुखें । देखिलें हें ॥ ८१ ॥

---

१ वांचलों. २ वेंघलें, शिरलें. ३ दुर्दशा. ४ सांप्रत. ५ यांला श्रीमूर्तीच वांचविणारी झाली. ६ ओंवाळणी. ७ समजूत करून. ८ मोजीत. ९ मिश्र. १० फेरा, परावर्तन. ११ एकाएकींच. १२ आयुष्याचा. १३ संगरहित. १४ आहे. १५ किंचित्. १६ कपाळीं. १७ अंतराळीं. १८ आशाभरित.

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥**

पैं उपायासि वाटा । न वाहती एथ सुभटा । साहीसहित वोहटा । वाइला वेदीं ॥ ८२॥ मज विश्वरूपाचिया मोहरा । चालावया धनुर्धरा । तपांचियाही सर्वभारा । नव्हेचि लाग ॥ ८३ ॥ आणि दानादि कीर कानडें । मी यज्ञाही तैसा न सांपडें । जैसेनि कां सुरवाडें । देखिला तुवां ॥ ८४ ॥ तैसा मी एकीचि परी । आतुडें गा अवधारी । जरी भक्ती येऊनि वरी । चित्तातें गा ॥ ८५ ॥

**भक्तया त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥**

परि तेचि भक्ती ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी । धरावांचूनि अनारिसी । गतीचि नेणे ॥ ८६ ॥ कां सकळ जळ संपत्ति । घेऊनि समुद्रातें गिवसिती । गंगा जैसी अनन्यगती । मिनलीच मिळे ॥ ८७ ॥ तैसें सर्वभावसंभारें । न धरत प्रेम एकसरें । मजमाजि संचरे । मीचि होउनी ॥ ८८ ॥ आणि तेविंचि मी ऐसा । थेंडिये आणि माझारीं सरिसा । क्षीराब्धि कां जैसा क्षीराचाचि ॥ ८९ ॥ तैसें मजलागुनी मुंगीवरी । किंबहुना चराचरीं । भजनासि कां दुसरी । परीचि नाहीं ॥ ६९० ॥ तयाचि क्षणासवें । ऐवंविध मी जाणवें । जाणितला तरी स्वभावें । दृष्टही होय ॥ ९१ ॥ मग इंधनीं अग्नि उद्दीपे । आणि इंधन हे भाष हारपे । तें अग्नीचि होऊनि आरोपे । मूर्त जेवि ॥ ९२ ॥ कां उदय न कीचे तेजाकारें । तंव गगनचि होऊन असे आंधारें । मग उदेलिया एकसरें । प्रकाश होय ॥ ९३ ॥ तैसें माझिये साक्षात्कारीं । सरे अहंकाराची वारी । अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय ॥ ९४ ॥ मग मी तो हें आघवें । एक मीचि आथि स्वभावें । किंबहुना सामावे । समरसें तो ॥ ९५ ॥

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
विश्वरूपदर्शनयोगो नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

---

१ सहा शास्त्रांसहित-ओहोटीं धरिला. २ मार्गानें. ३ कठिण. ४ अनायासें. ५ सांपडें. ६ अंगिकारी. ७ मोकळी. ८ पृथ्वी. ९ अन्य. १० प्रेम न सांवरे. ११ शेवटीं आणि मध्यें सारखा. १२ याप्रकारें. १३ जळणांत, काष्ठांत. १४ वाढे. १५ राहे. १६ यात्रा. १७ ऐक्यानें.

जो मजचि एकालागीं । कर्में वाहतसे आंगीं । जया मजवांचोनि जगीं । गोमटें नाहीं ९६ ॥ दृष्टादृष्ट सकळ । जयाचें मीचि केवळ । जेणें जिणयाचें फळ । मजचि नाम विलें ॥ ९७ ॥ मग भूतं हे भाष विसरला । जे दिठी मीचि आहे सूदला । ह्मणोनि निर्वैर ाहाला । सर्वत्र भजे ॥ ९८ ॥ ऐसा जो भक्त होये । तयाचें त्रिधातुक हें जैं जाये । ते ोचि होऊनि ठाये । पांडवा गा ॥ ९९ ॥ ऐसें जगदुदरदोंदिलें । तेणें करुणारसरसाळें । जयो ह्मणे बोलिलें । श्रीकृष्णदेवें ॥ ७०० ॥ ययावरी तो पांडुकुमर । जाहाला आनंदसं-दा थोर । आणि कृष्णचरणचतुर । एक तो जगीं ॥ १ ॥ तेणें देवाचिया दोनही मूर्ती । न्क्रिया न्याहाळिलिया चित्तीं । तंव विश्वरूपाहूनि कृष्णाकृती । देखिला लाभ ॥ २ ॥ रि तयाचिये जाणिवे । मान न कीजेचि देवें । जे व्यापकाहूनि नव्हे । एकदेशी ॥ ३ ॥ हेंचि समर्थावया लागीं । एक दोन चांगी । उपपत्ती शार्ङ्गी । दाविता जाहाला ॥ ४ ॥ तिया ऐकोनि सुभद्राकांत । चित्तीं आहे ह्मणत । तरि होय बरवें दोहींभांत । तें पुढती पुसों ॥ ५ ॥ ऐसा आलोच करूनि जीवीं । आतां पुसती वोजें बरवी । आदरील ते परिसावी । पुढें कथा ॥ ६ ॥ प्रांजळ ओवीप्रबंधें । गोष्टी सांगिजेल विनोदें । तें परिसा आनंदें । ज्ञानदेवो ह्मणे ॥ ७ ॥ भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोवियाफुलें मोकळीं । अर्पिलीं अंघ्रियुगुलीं । विश्वरूपाच्या ॥ ७०८ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

श्लोक ५५, ओंव्या ७०८.

---

## अध्याय १२ वा.

जयजय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे । अनवरत आनंदे । वर्षतिये ॥ १ ॥ विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताटी । ते तुझिये कृपादृष्टी । निर्विष होय ॥ २ ॥ तरि कवणातें ताप पोळी । कैसेनि वो शोक जाळी । जरि प्रसादरसकल्लोळीं । पुरें येसि नू ॥ ३ ॥ योगसुखाचे सोहळे । सेवकां तुझेनि स्नेहाळें । सोहंसिद्धीचे लळे । पाळसी नू ॥ ४ ॥ आधारशक्तीचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं । हृदयाकाशपालखीं । परियें देसी निजे ॥ ५ ॥ प्रत्यक्‍ज्योतीचीं वोवाळणीं । करिसी मनपवनाचीं खेळणीं । आत्मसुखाचीं

---

१ करतो. २ इहपर. ३ भरला. ४ कफ-वात-पित्तात्मक शरीर. ५ चांगल्या. ६ कारण कीं व्यापक स्वरूपावरून एकदेशी जें स्वरूप, चतुर्भुज त्यावर आलेली ह्मणून मान्य नाहीं. ७ सिद्ध करण्यास. ८ अर्जुन. ९ विचार. १० इच्छित. ११ स्पष्ट. १२ दोहों पायांवर. १३ उदार, सद्गुरु-कृपादृष्टी. १४ निरंतर. १५ सर्प. १६ मूर्च्छा. १७ भाजी. १८ पूरानें. १९ योगाच्या मांडीवर, मूला-धारचक्राच्या मांडीवर. २० पाळणा. २१ झोंके. २२ निजगुजानें, गुह्य उपदेशानें. २३ प्रत्यगात्मा.

बाळलेणीं । लेंवविसी ॥ ६ ॥ सतरावियेचें[1] स्तन्य देसी । अनाहताचा हेंलर[2] गासी । समाधिबोधें निजविसी । बुझाउनी ॥ ७ ॥ ह्मणोनि साधकां तूं माउली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं । याकारणें मी साउली । नसंडीं तुझी ॥ ८ ॥ अहो सद्गुरुचिये कृपावृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी[3] । तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धाता[4] होय ॥ ९ ॥ ह्मणोनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते । आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं ॥ १० ॥ नवरसीं भरवीं सागर । करवीं उचितरत्नाचे आगर । भावार्थाचे गिरिवर । निफजवीं माये ॥ ११ ॥ साहित्यसोनियांचिया खाणी । उघडवीं देशियेचिया क्षोणी । विवेकवल्लीची लावणी । हों देईं सैंघ ॥ १२ ॥ संवादफळनिधानें । प्रमेयाचीं उद्यानें । लावीं ह्मणें गहनें । निरंतर ॥ १३ ॥ पाखांडाचे दरकुटे । मोडीं वाग्वाद अव्हांटे । कुतर्कांचीं दुष्टें । सावजें[10] फेडीं ॥ १४ ॥ श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करीं वो सरतें[11] । राणिवे[12] बैसवीं श्रोतयांतें । श्रवणाचिये ॥ १५ ॥ ये मऱ्हाठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळ करीं । घेणें देणें सुखचिवरी[13] । हों देईं या जगा ॥ १६ ॥ तूं आपुलेनि स्नेहपल्लवें[14] । मातें पांघुरविशील सदैवें । तरि आतांचि हें आघवें । निर्मीन माये ॥ १७ ॥ इये विनवणीयेसाठीं[15] । अवलोकिलें गुरुकृपावृष्टी । ह्मणे गीतार्थेसीं उठीं । न बोलें बहु ॥ १८ ॥ तेथ जी जी महाप्रसाद । ह्मणोनि साविया[16] जाहाला आनंद । आतां निरोपीन प्रबंध । अवधान दीजे ॥ १९ ॥

अर्जुन उवाच–**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

तरि सकळवीराधिराज । जो सोमवंशीं विजयध्वज । तो बोलता जाहाला आत्मज[17] । पांडुनृपाचा ॥ २० ॥ कृष्णातें ह्मणे अवधारिलें[18] । आपण विश्वरूप मज दाविलें । तें नवलें ह्मणोनि बिहालें[19] । चित्त माझें ॥ २१ ॥ आणि इये कृष्णमूर्तीची सवें[21] । यालागीं सोयें[22] धरिली जीवें । तंव नको ह्मणोनि देवें । वारिलें[23] मातें ॥ २२ ॥ तरि व्यक्त[24] आणि अव्यक्त[25] । हें तूंचि एक निभ्रांत । भक्तीं[26] पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ २३ ॥ या दोनी जी वाटा । तूतें पावावया वैकुंठा । व्यक्ताव्यक्त दारवंठीं । रिगिजे येथ ॥ २४ ॥ पैं जे वानी[27] ईयातुका[28] । तेचि वेगळिये वाला[29] येका । ह्मणोनि एकदेशीया व्यापका ।

---

१ सुषुम्ना. २ गाणें. ३ आश्रय देई. ४ ब्रह्मदेव. ५ अलंकारांचे. ६ देशभाषारूप जमिनींत. ७ पुष्कळ. ८ ठेव. ९ गुहा. १० पळवीं. ११ श्रेष्ठ. १२ राज्यावर. १३ केवळ सुखाचें. १४ कृपारूपपदरानें. १५ बरोबर. १६ तात्काळ. १७ मुलगा. १८ ऐकलें. १९ अद्भुत. २० भिऊन गेलें. २१ सवय, चटक. २२ आवड. २३ निवारण केलें. २४ साकार. २५ निराकार. २६ भक्तीनें. २७ उमरा. २८ कस. २९ शंभर भार वजनाचा, शंभर वालांस.

ऐसा पाड ॥ २५ ॥ अमृताचिया सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी । तेचि ते अमृतलहरी । चुळी घेतलिया ॥ २६ ॥ हे कीर माझ्या चित्तीं । प्रतीति आथि जी सतीं । परि पुसणें योगपती । तें याचिलागीं ॥ २७ ॥ जे देवा तुम्ही नावेक । अंगी-करिलें व्यापक । तें साचचि कीं कवतिक । हें जाणावया ॥ २८ ॥ तरि तुजलागिं कर्म । तूंचि जयाचें परम । भक्तीसि मनोधर्म । विकोनि घातला ॥ २९ ॥ इत्यादि सर्वी-परी । जे भक्त तूतें श्रीहरी । बांधोनियां जिव्हारीं । उपासिती ॥ ३० ॥ आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीयेसि जें कानडें । कायिसयाहि सांगडें । नव्हेचि जें वस्तु ॥ ३१ ॥ अक्षर जी अव्यक्त । निर्देष देशरहित । सोहंभावें उपासित । ज्ञानिये जें ॥ ३२ ॥ त्यां आणि जी भक्तां । येरयेरांमाजि अनंता । कवणे योग तत्त्वता । जाणितला सांग ॥ ३३ ॥ इया किरीटीचिया बोला । तो जगद्बंधु संतोषला । म्हणे हो प्रश्न भला । जाणसी करूं ॥ ३४ ॥

श्रीभगवानुवाच—**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**

**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

तरि अस्तगिरीच्चिया उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं । रश्मी जैसे किरीटी । संचरती ॥ ३५ ॥ कां वर्षाकाळीं सरितां । जैसी चढो लागे पांडुसुता । तैसी नीच नवी भजतां । श्रद्धा दिसे ॥ ३६ ॥ परी ठाकिलियाहि सागर । जैसा मागीलही याना अनिवार । तिये गंगेचिये ऐसा पडिभर । प्रेमभावा ॥ ३७ ॥ तैसें सर्वेंद्रियांसहित । मज माजि सूनि चित्त । जे रात्रि दिवस न म्हणत । उपासिती ॥ ३८ ॥ इयापरी जे भक्त आपणपें मज देत । तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥ ३९ ॥

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**

**सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**

आणि येर तेही पांडवा । जे आरूढोनि सोहंभावा । झोंबती निरवयवा । अक्षरासि ॥ ४० ॥ मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे । इंद्रियां कीर जोगें । काय होईल ॥ ४१ ॥ परि ध्यानाही कुंवाडें । म्हणोनि एके ठायीं न सांपडे । व्यक्तीसि माजि वडें । कवणेही नोहे ॥ ४२ ॥ जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळीं असणें । जें पावूनि

---

१ तुल्य योग्यता. २ अनुभव. ३ खरी. ४ क्षणभर. ५ विराट्रूप. ६ अंतःकरणीं. ७ अवघड. ८ सारखें, संगत, युक्त. ९ तो मी या भावनेनें. १० श्रीकृष्ण. ११ समीप. १२ किरण. १३ नदी. १४ नित्य. १५ प्राप्त झाला, मिळाली असतांही. १६ लोट. १७ अधिकपण. १८ घालून. १९ अप्र. २० नख स्पर्शत नाहीं. २१ गूढ. २२ मध्यें.

[१]चिंतवणें । [२]हिंपुटी जाहलें ॥ ४३ ॥ जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे । ऐसें म्हणोनि उपायें । उपजतीचिना ॥ ४४ ॥ जें चळे ना ढळे । सरे ना मैळे । तें आपुलेनिचि बळें । [३]आंगविलें जिहीं ॥ ४५ ॥

संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

पैं [४]वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं [५]कटकें । [६]अधपलीं [७]तवकें । इंद्रियें धरिलीं ॥ ४६ ॥ मग संयमाची [८]थांटी । [९]सूनि मुरडिलीं उपराटीं । इंद्रियें कोंडिलीं [१०]कपाटीं । हृदयाचिया ॥ ४७ ॥ अपानींचिया तोंडा । लावोनि आसनमुद्रा [११]सुहाडा । मूळबंधाचा [१२]हुडा । [१३]पन्नासिला ॥ ४८ ॥ आशेचे [१४]लोंग तोडिले । अधैर्याचे [१५]कडे झाडिले । निद्रेचें शोधिलें । काळवखें ॥ ४९ ॥ [१६]वज्राग्नीचिया ज्वाळीं । करूनि सप्तधातूंची होळी । व्याधींच्या [१७]सिसाळीं । [१८]पूंजिलीं यंत्रें ॥ ५० ॥ मग कुंडलिनियेचा [१९]टेंभा । आधारीं केला उभा । तया चोजवलें प्रभा । [२०]निर्मथावरी ॥ ५१ ॥ नवद्वारांचिया [२१]चौचकीं । [२२]बांणूनि संयतीची [२३]अडवंकी । उघडली खिडकी । [२४]ककारांतीची ॥ ५२ ॥ [२५]प्राणशक्तिचामुंडे । [२६]प्रहारूनि संकल्पाचे [२७]मेंडे । मनोमहिषाचेनि मुंडें । दिधली बळी ॥ ५३ ॥ [२८]चंद्रसूर्यां बुझावणी । करूनि [२९]अनाहताची [३०]सुंडावणी । [३१]सतरावियेचें पाणी । जिंकिलें वेगीं ॥ ५४ ॥ मग [३२]मध्यमा मध्यविवरें । तेणें कोरिवें दारें । [३३]ठाकिलें [३४]चवरें । ब्रह्मरंध्र ॥ ५५ ॥ वरी [३५]मकारांत सोपान । तें सांडोनियां गहन । काखे [३६]सूनियां गगन । भरले ब्रह्मीं ॥ ५६ ॥ ऐसे जे समबुद्धी । मिळावया सोहंसिद्धी । [३७]आंगवितांति [३८]निरवधी । [३९]योगदुर्गें ॥ ५७ ॥ आपुलिया [४०]साटोवाटीं । शून्य घेती उठाउठीं । तेही मातेंचि किरीटी । पावती गा ॥ ५८ ॥ वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे । ऐसें नाहीं [४१]आगळें । कष्टचि तया ॥ ५९ ॥

---

१ चिंतणें. २ कष्टी. ३ स्वाधीन केलें. ४ वैराग्यरूप प्रखर अग्नीनें. ५ सैन्यें. ६ होरपळलीं. ७ त्वेषानें. ८ फांस. ९ अग्नी. १० गुहेंत. ११ दृढ, चांगल्या. १२ बुरुज. १३ शृंगारिला. १४ संबंध. १५ खोल पर्वत भाग दूर केला. १६ मूळबंधोत्पन्न अग्नीनें. १७ शिरांची पंक्ति. १८ शरीरस्थ यंत्र देवता. १९ पलिता. २० मस्तकापर्यंत. २१ प्राणायाम करून. २२ कपाटांत घालून. २३ खीळ. २४ सुषुम्ना. २५ प्राणशक्तिरूप चामुंडा देवीला. २६ वधून. २७ मेंढा. २८ इडा पिंगला. २९ अनुहत ध्वनी. ३० ध्वनी, गजर. ३१ जीवनकलेचें. ३२ सुषुम्ना नाडीचे मध्य विवरानें. ३३ प्राप्त केलें. ३४ शेवटलें. ३५ तुर्यावस्था. ३६ काखेस मारून. ३७ स्वाधीन करतात. ३८ शेवटपर्यंत. ३९ योग हेच कोणी किल्ले. ४० मोबदल्यास. ४१ अधिक, जास्ती.

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥**

जिहीं सकळभूतांचिया [१]हितीं । [२]निरालंबीं अव्यक्तीं । पसरलिया आसक्ती । भक्ती-विणें ॥ ६० ॥ तयां महेंद्रादि पदें । करिताति [३]वाटवधें । आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ॥ ६१ ॥ कामक्रोधाचे [४]विलग । उठावती अनेग । आणि शून्येंसीं आंग । झुंझवावें कीं ॥ ६२ ॥ ताहानें ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी । अहोरात्र वोवीं । [६]मैमावा वारा ॥ ६३ ॥ [७]उंनिदियाचें पहुडणें । निरोधाचें वेल्हावणें । झाडांसि [९]साजणें । चावंळावें गा ॥ ६४ ॥ शीत वेढावें । उष्ण पांघुरावें । वृष्टीचिया असावें । घराआंत ॥ ६५ ॥ किंबहुना पांडवा । अग्निप्रवेश नित्य नवा । भ्रतारावीण करावा । तो हा योग ॥ ६६ ॥ एथ स्वामीचें काज । ना [११]बापिकें [१२]व्याज । परि मरणेंसीं झुंझ । नित्य नवें ॥ ६७ ॥ ऐसें मृत्यूहूनि [१३]तिखें । कां [१४]घोंटे कढत विख । डोंगर गिळतां मुख । न फाटे काई ॥ ६८ ॥ म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा । तयां दुःखाचाचि वांटा । भागा आला ॥ ६९ ॥ पाहें पां लोहाचे चणे । जैं [१५]बोचरियां पडती खाणें । तैं पोट भरणें कीं मरणें । शुद्धी नेणे ॥ ७० ॥ म्हणोनि समुद्र [१६]बाहीं । तरणें [१७]आंथिकेंही । कां गगना-माजि पाईं । [१८]खोलिजेत असे ॥ ७१ ॥ वळघलिया रणाची [१९]थाटी । आंगीं न लगतां काठी । सूर्याची [२०]पांउठी । कां होय गा ॥ ७२ ॥ यालागीं पांगुळा [२१]हेवा । नव्हे वायूसि पांडवा । तेविं देहवंतां जीवां । [२२]अव्यक्तीं गति ॥ ७३ ॥ ऐसाही जरी [२३]धिंवसा । बांधोनियां आकाशा । झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥ ७४ ॥ म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा । जे कां भक्तिपंथा । [२४]वोटंगले ॥ ७५ ॥

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥**

कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्मं अशेखें । जिये कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥ ७६ ॥ [२५]विधीतें पाळित । निषेधातें गाळित । मज देऊनि जाळित । कर्मफळें ॥ ७७ ॥ ययापरी पाहीं । अर्जुना माझेठाईं । [२६]संन्यसूनि [२७]नांहीं । करिती कर्में ॥ ७८ ॥ आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव । तयां मीवांचुनि धांव । [२८]आनौती नाहीं ॥ ७९ ॥ ऐसे जे

१ कल्याणाकरितां. २ आधाररहित अशा. ३ वाटमारेपणा. ४ उपद्रव. ५ हाताच्या बावांनीं. ६ मोजावा. ७ जागृतीचें. ८ पसरणें. ९ मित्रभावानें. १० बोलावें. ११ कुलधर्माचें. १२ निमित्त. १३ भयंकर. १४ गिळे. १५ बोथऱ्याला. १६ हातांनीं. १७ कोठेंही. १८ चालणें होतें. १९ समुदाय. २० पायरी. २१ पैज. २२ निर्गुणी. २३ धैर्य. २४ आश्रय करून राहिले. २५ कर्तव्यकर्मातें. २६ अर्पण करून. २७ नाहींशी. २८ अन्यत्र, दुसरी.

मत्पर । उपासिति निरंतर । ध्यानमिषें घर । माझें झाले ॥ ८० ॥ जेयांजिये आवडी । केली मजशीं कुळवाडी । भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥ ८१ ॥ ऐसे अनन्ययोगें । विकलें जिवें मनें आंगें । तयांचें कायि एक सांगें । जे सर्व मी करीं ॥ ८२ ॥

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा । तो मातेचा सोयरा । केतुला पां॥ ८३ ॥ तेवीं मी तयां । जैसे असती तैसियां । कळिकाळ नोकोनियां । घेतला पेटा ॥ ८४ ॥ येऱ्हवीं तरीं माझियां भक्तां । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ ८५ ॥ तैसे ते माझे । कळत्र हें जाणिजे । कायिलेसनिही न लाजे । तयाचेनि मी ॥ ८६ ॥ भव-जन्ममृत्यूचिया लाटीं । झळंबती इया सृष्टी । तें देखोनियां पोटीं । ऐसें जाहालें ॥ ८७ ॥ भव-सिंधूचेंनि माजे । कवणासि धाक नुपजे । तेथ जरी कीं माझें । बिहिती हन ॥ ८८ ॥ म्हणो-नि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा । करूनि त्यांचिया गांवा । धांवत आलों ॥ ८९ ॥ नामा-चेया सहस्रवरी । नावा इया अवधारीं । सजूनियां संसारीं । तारूं जाहलों ॥ ९० ॥ सडे जे देखिले । ते ध्यान कासे लाविले । परीग्रही घातले । तरियांवरी ॥ ९१ ॥ प्रेमाची पेटी । बांधली एकाचिया पोटीं । मग आणिले तटीं । सायुज्याचिया ॥ ९२ ॥ परि भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि आघवे । वैकुंठींचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥ म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता । तयांतें समुद्धर्ता । आथि मी सदा ॥ ९४ ॥ आणि जेव्हांचि कां भक्तीं । दिधली आपुली चित्तवृत्ती । तेव्हांचि मज सूति । त्यांचिये नाटीं ॥ ९५ ॥ याकारणें गा भक्तराया । हा मंत्र तुवां धनंजया । शिकिजे जे यया । मार्गा भजिजे ॥ ९६ ॥

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अतऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

अगा मानस हें एक । माझ्या स्वरूपीं सवृत्तिक । करूनि घालीं निष्टंकें । बुद्धि निश्च-येंसीं ॥ ९७ ॥ इयें दोनीसरिसीं । मजमाजि प्रेमेंसीं । रिगालीं तरि पावसी । मातें तूं गा ॥ ९८ ॥ जे मनबुद्धि इहीं । घर केलें माझ्याठायीं । तरि सांगें मग काई । मी तूं उरे ॥ ९९ ॥ म्हणोनि दीप पालवे । सवेंचि तेज मालवे । कां रविबिंबासवें । प्रकाश जाय

१ ज्यांनीं आवडीनें. २ उदीम. ३ कितीसा बरें. ४ पराभवून. ५ अधिकार. ६ कुटुंब. ७ लाटांनीं. ८ बुडतात. ९ पुढें सांगितलें आहे तसें. १० भीति. ११ अवतार. १२ नाव. १३ एकटे. १४ गृहस्थास. १५ नावेवर. १६ सांगड. १७ गजेंद्रादि. १८ दुःखांतून सोडविणारा. १९ आहे. २० संबंध. २१ सर्व ठिकाणीं. २२ वृत्तीसह. २३ सदोदित. २४ बरोबर. २५ लय होतांच.

त्लेया प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं । तैसा मनबुद्धिपासीं । अहं-
ह्मणोनि माझिया स्वरूपीं । मनबुद्धी इयें [2]निक्षेपीं । येतुलेनि सर्व-
होसी ॥ २ ॥ यया बोला कांहीं । [3]अनारिसें नाहीं । आपली आण पाहीं ।
३ ॥

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोसि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥**

चित्त । मनबुद्धिसहित । माझ्या हातीं [4]अचुंबित । न शकसी देवों ॥ ४ ॥
करीं । यया आठां [5]पाहरांमाझारीं । [6]मोटकें निमिषभरी । देत जाईं ॥ ५ ॥
निमिखें । देखेल माझें सुख । तेतुलें [8]अरोचक । विषयीं घेइल ॥ ६ ॥ जैसें
। आणि सरिता वोहटूं लागे । तैसें चित्त काढेल वेगें । [9]प्रपंचौनी ॥ ७ ॥
जैसें । शशिबिंब [10]दिसें । [10]दिसें हारपत [11]अंवसे । नाहींचि होय ॥ ८ ॥
तूनि निगतां । चित्त मजमाजि रिगतां । हळुहळू पांडुसुता । मीचि होसिल
अभ्यासयोग ह्मणिजे । तो हा एक जाणिजे । येणें कांहीं न निपजे । ऐसें
॥ पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गति [12]अंतराळें । व्याघ्र सर्प [13]प्रांजळें । केले
। विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं [14]वाग्ब्रह्म थोकडें ।
॥ १२ ॥ ह्मणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा [15]दुष्कर नाहीं । यालागीं
। अभ्यासें मिळें ॥ १३ ॥

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥**

सार्ही लागीं । [16]कैस नाहीं तुझिया आंगीं । तरि आहासी जया भागीं ।
॥ १४ ॥ इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं । अभिमान न सांडीं । स्वजा-
॥ कुळधर्म [17]चाळीं । विधिनिषेध पाळीं । मग सुखें तुज सैरळी । दिधली
॥ परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापार होये । तो मी करीत आहें । ऐसें
७ ॥ करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे । विश्व [19]चळतसें जेणें ।
॥ १८ ॥ उणयापुरेयाचें कांहीं । उरों नेदीं आपुलियाठायीं । [20]स्वजातीचि

---

केल्या. २ ठेव. ३ वेगळें. ४ एकदम. ५ प्रहरांमध्यें. ६ अल्प. ७ क्षण. ८ अरुचि.
. १० दिवसेंदिवस. ११ अमावास्येस. १२ अंतरिक्षांत. १३ आप्त. १४ वेद.
१६ बळ. १७ चालीव. १८ मोकळीक. १९ व्यापार करतें. २० सार्थक.

करूनि घेई । जीवित्व हें ॥ १९ ॥ माळियें [2]जेउतें नेलें । [3]तेउतें निवांतचि गेलें । तया पाणिया ऐसें केलें । होआवेंगा ॥ १२० ॥ म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती । इयें वोझीं [4]नेघे मती । अखंड चित्तवृत्ति । माझ्याठायीं ॥ २१ ॥ येऱ्हवीं तरी सुभटा । उजू कां [5]आव्हांटा । रथ काई खटपटा । करित असे ॥ २२ ॥ आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे । निवांतचि अर्पिजे । माझ्याठायीं ॥ २३ ॥ ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना । तूं सायुज्यसदना । माझिया येसी ॥ २४ ॥

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥**

ना तरी हेंही तुज । [8]नेदवे कर्म मज । तरि गा तूं [9]भज । पांडुकुमरा ॥ २५ ॥ बुद्धीचिये पाठीं पोटीं । कर्माआदि कां शेवटीं । मातें [10]बांधणें किरीटी । [11]दुवाड जरी ॥ २६ ॥ तरि हेंही असो । सांडीं माझा अतिसो । परि [12]संयतिसीं वसो । बुद्धि तुझी ॥ २७ ॥ आणि जेणें जेणें वेळे । घडती कर्मे सकळें । तयांचीं तिये फळें । त्यजित जाय ॥ २८ ॥ वृक्ष कां वेली । [13]लोटती फळें आलीं । तैसीं सांडीं निपजलीं । कर्मे सिद्धें ॥ २९ ॥ परि मातें मनीं धरावें । कां मज [14]उद्देशें करावें । हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्यीं ॥ १३० ॥ खडकीं जैसें वर्षलें । कां आगीमाजि पेरिलें । कर्म मानीं देखिलें । स्वप्न जैसें ॥ ३१ ॥ अगा [15]आत्मजेच्या विषीं । जीव जैसा निरभिलाषी । तैसा कर्मी अशेषीं । निष्काम होई ॥ ३२ ॥ वन्हीची ज्वाळा जैसी । वायां जाय आकाशीं । क्रिया जिरोंदे तैसी । शून्यमाजी ॥ ३३ ॥ अर्जुना हा फलत्याग । [16]आवडे कीर [17]असलग । परि योगामाजि योग । [18]धुरेचा हा ॥ ३४ ॥ येणे फलत्यागें सांडे । तें तें कर्म न [19]विरूढे । एकचि [20]वेळूं झाडें । वांझें जैसीं ॥ ३५ ॥ तैसें येणेंचि शरीरें । शरीरा येणें सरे । किंबहुना येरझारें । [21]चिरा पडे ॥ ३६ ॥ पैं अभ्यासाचिया [22]पाउटीं । टाकिजे ज्ञान किरीटी । ज्ञानें येइजे भेटी । ध्यानाचिये ॥ ३७ ॥ मग ध्यानासि [23]खेंवें । देती आघवेचि भाव । तेव्हां कर्मजात सर्व । दूरी टाके ॥ ३८ ॥ कर्म जेथ दुरावे । तेथ फलत्याग [24]संभवे । त्यागास्तव [25]आंगवे । शांति सगळी ॥ ३९ ॥ म्हणोनि यावया शांति । हाचि क्रम सुभद्रापती । अभ्यासचि [25]प्रस्तुतीं । करणें एथ ॥ १४० ॥

---

१ माळ्यानें. २ जिकडे. ३ तिकडे. ४ घेऊं नको. ५ आडवाट. ६ एकाग्रमनानें. ७ मरणसमयीं. ८ न देववे. ९ सेवन कर. १० मनांत दृढ धरणें. ११ कठिण. १२ इंद्रियनिग्रहांत. १३ त्यागितो. १४ हेतूनें. १५ कन्येविषयीं. १६ इच्छारहित. १७ निश्चयेंकरून सोपा वाटे. १८ श्रेष्ठ. १९ होतो. २० वेळूचीं झाडें. २१ समाप्ति होय. २२ पायरीवर. २३ आलिंगन. २४ मिळतें. २५ सांप्रत.

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥

अभ्यासाहूनि गहन[1] । पार्था मग ज्ञान । ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे ॥ ४१ ॥ मग कर्मफल[2]त्याग । तो [3]ध्यानापासोनि चांग । त्यागाहूनि भोग । शांतिसुखाचा ॥ ४२ ॥ ऐसिया[4] यया वाटा । ईहींचि पेणीं सुभटा । शांतीचा माजिवटा[5] । ठाकिला[6] जेणें ॥ ४३ ॥

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

तो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेंचि कहीं । आपपर नाहीं । चैतन्या जैसा ॥ ४४ ॥ उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे । हें कांहींच्चि नेणिजे । वसुधा[7] जेवीं ॥ ४५ ॥ कां रायाचें देह चाळूं । रंका परौतें[8] गाळूं । हें न ह्मणेचि कृपाळू । प्राण पैं गा ॥ ४६ ॥ गाईची तृषा हरूं । व्याघ्रा विष होऊनि मारूं । ऐसें नेणेचि कां करूं । तोय[9] जैसें ॥ ४७ ॥ तैसी आघवियांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री । कृपेसि धात्री । आपण जो ॥ ४८ ॥ आणि मी हे भांष[10] नेणे । माझें कांहींचि न ह्मणे । सुख दुःख जाणणें । नाहीं जया ॥ ४९ ॥ तेवींचि क्षमेलागीं । पृथ्वीसि[11] पैवाड[12] आंगीं । संतोषा उत्संगीं[13] । दिधलें घर ॥ १५० ॥

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

वर्षियेवीण[14] सागर । जैसा जळें निर्भर[15] । तैसा निरुपचार । संतोषी जो ॥ ५१ ॥ वाहूनि आपली आण । धरी जो अंःतकरण । निश्चया साचपण[16] । जयाचेनी ॥ ५२ ॥ जीव परमात्मा दोन्ही । बैसले एकासनीं । जयाच्चिया हृदयभुवनीं । विराजती ॥ ५३ ॥ ऐसा योगसमृद्धि । होऊनि जो निरवधि । अर्पी मनोबुद्धि । माझ्याठायीं ॥ ५४ ॥ आंत बाहिरि योग । [17]निर्वाळलेयाही चांग । तरि माझा अनुराग[18] । सप्रेम जया ॥ ५५ ॥ अर्जुना तो भक्त । तोचि योगी तोचि मुक्त । तो वल्लभा[19] मी कांत[20] । ऐसा पढिये[21] ॥ ५६ ॥ हें ना तो आवडे । मज जीवाचेनि पाडें[22] । हेंही एथ थोकडें[23] । रूप करणें

१ कठीण. २ कर्मांच्या फलाची इच्छा सोडणें. ३ ध्यानापेक्षां. ४ अशा मुक्कामानें. ५ मध्यें. ६ पावला. ७ पृथ्वी. ८ वेगळे. ९ पाणी. १० बोल. ११ पृथ्वीसारखी. १२ योग्यता. १३ मांडीवर. १४ पावसाळ्यावाचून. १५ पूर्ण भरलेला. १६ खरेपण. १७ निर्मळपणें सिद्ध झाल्यावरही. १८ प्रीति. १९ स्त्री. २० पति. २१ आवडता होतो. २२ समतेनें. २३ उणें.

॥ ५७ ॥ तरि पैढियंतयाची काहाणी । हे भुलीची[1] भारणी । इयें[2] तंव न बोलणीं । परि बोलवी श्रद्धा ॥ ५८ ॥ ह्मणोनि गा आह्मा । वेगा आली उपमा । येऱ्हवीं काय प्रेमा । अनुवाद असे ॥ ५९ ॥ आतां असो हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी । दुणा[4] थांव उठी । आवडी गा ॥ १६० ॥ तयाही वरी त्रिपायें[5] । प्रेमळ संवादिया[6] होये । तिये गोडीसि आहे । कांटाळें मग ॥ ६१ ॥ ह्मणोनि गा पांडुसुता । तूंचि प्रिय आणि तूंचि श्रोता । वरि प्रियाची वार्ता । प्रसंगें आली ॥ ६२ ॥ तरि आतां बोलों । भले या सुखा मीनैलों[7] । ऐसें ह्मणतखेंवी[8] डोलों- । लागला देवो ॥ ६३ ॥ मग ह्मणे जाण । तया भक्ताचें लक्षण । जया मी अंतःकरण । बैसों घालीं ॥ ६४ ॥

## यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
## हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥

तरि सिंधूचेनि मांजें[9] । जळचरां भय नुपजे । आणि जळजरीं नुभिजे । समुद्र जैसा ॥ ६५ ॥ तेविं उन्मत्तें जगें । जयासि [11]खंती न लगे । आणि जयाचेनि आंगें । न [13]शिणे लोक ॥ ६६ ॥ किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां । तैसा नुबगे[14] जीवां । जीवपणें[15] जो ॥ ६७ ॥ जगचि देह जाहाले । ह्मणोनि प्रियाप्रिय गेलें । हर्षामर्ष[16] ठेले । दुजेनविण ॥ ६८ ॥ ऐसा द्वंद्वनिर्मुक्त[17] । भयोद्वेगरहित । याहि वरि भक्त । माझ्याठायीं ॥ ६९ ॥ तरि तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो[18] । हें असो जिवीं जीवो । माझेनि तो ॥ १७० ॥ जो निजानंदें धाला[19] । परिणाम आयुष्या आला । पूर्णते जाहाला । वल्लभ जो ॥ ७१ ॥

## अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
## सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

तयाचियाठायीं पांडवा । अपेक्षे[20] नाहीं रिगावा । सुखासि चढावा । जयाचें असणें ॥ ७२ ॥ मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर । परि वेंचणें लागे शरीर । तिये गांवीं ॥ ७३ ॥ हिमवंतें[21] दोष खाये । परि जीविताची हानी होये । तैसें शुचित्व नोहे । सज्जनांचें ॥ ७४ ॥ शुचित्वें शुचि गंगा होये । आणि पाप तापही जाये । परि तेथें आहे । बुडणें एक ॥ ७५ ॥ खोलिये पार नेणिजे । तरि भक्तीं न बुडिजे । रोकडाचि लाहिजे । न

१ प्रियकर. २ भुरळ. ३ हें बोलून दाखवूं नये. ४ दुप्पट रंग वाढे. ५ क्वचित्. ६ उपमा. ७ प्राप्त झालों. ८ ह्मणतांक्षणीं. ९ क्षोभानें. १० न कंटाळे. ११ खेद. १२ योगानें. १३ त्रासे. १४ न कंटाळे. १५ आपण जीव आहे असें मानून. १६ आनंदक्रोध. १७ सुखदुःखादि द्वंद्वातीत. १८ प्रेमा. १९ तृप्त झाला. २० इच्छेस. २१ हिमालय.

मरतां मोक्ष ॥ ७६ ॥ संतांचेनि अंगलगें[1] । पापातें जिणणें गंगे । तेणें संतसंगें । शुचित्व कैसें[2] ॥ ७७ ॥ म्हणोनि असो जो ऐसा । शुचित्वें तीर्थां कुंवासा[3] । जेणें उल्लंघविले दिशा । मनोमळ ॥ ७८ ॥ आंत बाहिरि चोखाळ[4] । सूर्य तैसा निर्मळ । आणि तत्वार्थाचा पायाळ[5] । देखणा जो ॥ ७९ ॥ व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश । तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥ १८० ॥ संसारव्यथे फिटला । जो नैराश्यें निवटला[6] । व्याधा हातोनि सुटला । विहंगम[7] जैसा ॥ ८१ ॥ तैसा सतत जो सुखें । कोणीही टवंच[8] न देखे । नेणिजे गतायुषें[9] । लज्जा जेवीं ॥ ८२ ॥ आणि कर्मारंभालागीं । जया अहंकृती नाहीं आंगीं । जैसें निरिंधन[10] आगी । विझोनि जाय ॥ ८३ ॥ तैसा उपशमचि[11] भागा । जयासि आला पैंगा[12] । जो मोक्षाचिया आंगा । लिहिला असे ॥ ८४ ॥ अर्जुना हा ठांववरी । जो सोहंभाव सरोभरी[13] । तो द्वैताच्या पैलतीरीं । निगों सरला[14] ॥ ८५ ॥ कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोहीं[15] भागीं । वाटूनियां आंगीं[16] । सेवकै[17] बाणें ॥ ८६ ॥ येरां नाम मी ठेवी । मग भजती वोजें[18] बरवी । न भजतया दावी । योगिया जो ॥ ८७ ॥ तयाचें आम्हां व्यसन । आमुचें तो निजध्यान । किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ ८८ ॥ तयालागीं मज रूपा येणें । तयाचेनि मज एथें असणें । तया लोणें[21] कीजे जीवें प्राणें । ऐसा पढिये[22] ॥ ८९ ॥

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींचि न देखे । म्हणोनि भोगविशेखें । हरिखेना[23] जो ॥ १९० ॥ आपणचि विश्व जाहाला । तरि भेदभाव सहजचि गेला । म्हणोनि द्वेष ठेला[24] । जया पुरुषा ॥ ९१ ॥ पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे । हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ ९२ ॥ आणि जयापरौतें कांहीं नाहीं । तें आपणपेंचि आपुल्याठायीं । जाहाला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना ॥ ९३ ॥ वोखटें[25] कां गोमटें । हें कांहींचि तया नुमटे[26] । रात्रिदिवस न घटे । सूर्यासि जेवीं ॥ ९४ ॥ ऐसा बोधचि केवळ । जो होऊनि असे निष्कळ[27] । त्याही वरी भजनशीळ । माझ्याठायीं ॥ ९५ ॥ तरि तया ऐसें दुसरें । आम्हा पढियंतें सोयरें । नाहीं गा साचोकारें[28] । तुझी आण ॥ ९६ ॥

---

१ समागमें. २ काय सांगूं. ३ आश्रय. ४ शुद्ध. ५ तत्वरूप द्रव्याचा, पायाळू. ६ निरिच्छ होऊन शोभला. ७ पक्षी. ८ त्रास, टोचणी. ९ मरणोन्मुखानें. १० काष्ठांविरहित. ११ शांतीच. १२ एथपर्यंत. १३ आदर करी. १४ निघोन गेला. १५ देव आणि भक्त या दोनही भागांत. १६ आपल्याकडे. १७ सेवाधर्म प्रगट करी. १८ दुसऱ्या भक्तास. १९ रीत. २० नाद. २१ कुरवंडी. २२ आवडता. २३ संतोष पावत नाहीं. २४ नाहींसा झाला. २५ वाईट. २६ समजत नाहीं. २७ निर्मळ. २८ खरेपणानें.

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥**

पार्था जयाचियाठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं । रिपुमित्रां दोहीं । सरिसा पाडु ॥ १७ ॥ कां घरिंचियां उजियेड करावा । पारखियां आंधार पाडावा । हें नेणेचि गा पांडवा । दीप जैसा ॥ १८ ॥ जो खांडावया घाव घाली । कां लावणी जयानें केली । दोघां एकचि साउली । वृक्ष दे जैसा ॥ १९ ॥ ना तरी इक्षुदंडु । पाळितया गोडु । गाळितया कडु । नोहेचि जेवीं ॥ २०० ॥ अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भाव ऐसा । मानापमानीं सरिसा । होत जाय ॥ १ ॥ तिहीं ऋतूं समान । जैसें कां गगन । तैसा एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ २ ॥ दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता । तैसा सुखदुःख-प्राप्तां । मध्यस्थ जो ॥ ३ ॥ माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका । तैसा जो सकळिकां । भूतां सम ॥ ४ ॥ आघविया जगा एक । सेव्य जैसें उदक । तैसे जयातें तीन्ही लोक । कांक्षिती गा ॥ ५ ॥ जो सबाह्यसंग । सांडोनियां लाग । एकाकी असे आंग । आंगीं सूनीं ॥ ६ ॥

**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।**
**अनिकेतस्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

जो निंदेतें नेघे । स्तुती न श्लाघे । आकाशा न लगे । लेप जैसा ॥ ७ ॥ तसें निंदे आणि स्तुती । मान करूनि एके पंक्ती । विचरे प्राण वृत्ती । जनीं वनीं ॥ ८ ॥ साच लटिकें दोन्हीं । न बोले जाहला मौनी । जो भोगितां उन्मनी । आरायेना ॥ ९ ॥ जो यथालाभें संतोखे । अलाभें न पारुखे । पाउसेंवीण न सुके । समुद्र जैसा ॥ २१० ॥ आणि वायूसि एकेठायीं । बिढार जैसें नाहीं । तैसा न धरीच कहीं । आश्रय जो ॥ ११ ॥ आघवाचि आकाशस्थिति । जेवीं वायूसि नित्य वस्ती । तेवीं जगचि विश्रांति-स्थान जया ॥ १२ ॥ हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ १३ ॥ मग यावरीही पार्था । माझ्या भजनीं आस्था । तरि तयातें मी माथां । मुकुट करीं ॥ १४ ॥ उत्तमासि मस्तक । खालविजे हें काय कौतुक । परि मान करिती तीन्ही लोक । पायवणियां ॥ १५ ॥ तरि श्रद्धावस्तूसी आदरु । करितां जाणिजे प्रकारु । जरी होय श्रीगुरु । सदाशिव ॥ १६ ॥ परि हें असो आतां । महेशातें

---

१ सारखेंच मानतो. २ परक्याला. ३ तोडण्यासाठीं. ४ ऋतूंला. ५ वायूला. ६ संबंध. ७ घालून. ८ महत्व मानीत नाहीं. ९ उन्मनीअवस्थेस. १० विराम पावत नाहीं. ११ दैवयोगेंकरून मिळेल त्यानें. १२ रुष्ट होत नाहीं. १३ राहण्याचीजागा. १४ नम्र करिजे. १५ पायाच्या तीर्थास.

वानितां[1] । आत्मस्तुती होतां । संचार असे ॥ १७ ॥ ययालागीं हें नोहे । ह्मणितलें रमा-
नाहें[2] । अर्जुना मी वाहें । शिरीं तयातें ॥ १८ ॥ जे पुरुषार्थसिद्धी[3] चौथी । घेऊनि आपु-
लिया हातीं । रिगाला भक्तिपंथीं । जगा देत ॥ १९ ॥ कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची
सोडीबांधी[4] करी । कीं जळाचिये परी । तळवट[5] घे ॥ २२० ॥ ह्मणोनि गा नमस्कारूं ।
तयातें आह्मी माथां मुकुट करूं । तयाची टांच धरूं । हृदयीं आह्मी ॥ २१ ॥ तयाचिया
गुणांचीं लेणीं । लेववूं आपुलिये वाणीं । तयाची कीर्ती श्रवणीं । आह्मी लेऊं ॥ २२ ॥
तो पाहावा हें डोहळे । ह्मणोनि अचक्षुसी मज डोळे । हातींचेनि लीलाकमळें । पूजूं
तयातें ॥ २३ ॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेऊनी । आलिंगावयालागुनी । तयाचें
आंग ॥ २४ ॥ तयासंगाचेनि सुरवाडें[6] । मज विदेहा देह धरणें घडे । किंबहुना आवडे ।
निरुपम ॥ २५ ॥ तेणेंसीं आह्मा मैत्र । एथ कायसें विचित्र । परि तयाचें चरित्र ।
ऐकती जे ॥ २६ ॥ तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें[7] । जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती
॥ २७ ॥ जो हा अर्जुना साद्यंत । सांगीतला प्रस्तुत । भक्तियोग समस्त । योगरूप
॥ २८ ॥ जे मी प्रीति करीं । कां मनीं शिरसा धरीं । येवढी थोरी । जया स्थितिये[8] ॥ २९ ॥

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
भक्तियोगो नामद्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य[9] । करिती प्रतीतिगम्य[10] । आइकोनि जे ॥ २३० ॥
तैसीचि श्रद्धेचेनि आदरें । जयाचेठायीं विस्तरे । जीवीं जयां थारे । जे अनुष्ठिती
॥ ३१ ॥ परि निरूपिली जैसी । तैसीच स्थिती मानसीं । मग सुक्षेत्रीं[11] जैसी । पेरणी
जाहाली ॥ ३२ ॥ परि मातें परम करूनि । इये अर्थीं प्रेम धरूनि । हें सर्वस्व मानूनि ।
घेती जे पैं ॥ ३३ ॥ पार्था गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी । उत्कंठा तयांलागीं ।
अखंड मज ॥ ३४ ॥ ते तीर्थ ते क्षेत्र । जगीं तेचि पवित्र । भक्ति कथेसि मैत्र । जयां
पुरुषां ॥ ३५ ॥ आह्मी जयांचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन । तेवांचूनि आन ।
गोमटें न मनूं ॥ ३६ ॥ तयांचें आह्मा व्यसनें[12] । ते आमुचे निधिनिधान । किंबहुना
समाधान । ते मिळती तैं ॥ ३७ ॥ पैं प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती[13] पांडुसुता । ते
मानूं परमदेवता । आपुली आह्मी ॥ ३८ ॥ ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें ।

---

१ वर्णितां. २ रमानाथानें. ३ मोक्ष. ४ बंधन हातानें सोडतो. ५ नम्रता धरी. ६ अनुकूलतेनें. ७ खरें. ८ ज्या स्थितीनें. ९ धर्मास अनुकूल. १० अनुभवास येण्याजोगें. ११ चांगल्या शेतांत. १२ नाद. १३ एकमेकांस सांगतात.

बोलिलें मुकुंदें । संजयो ह्मणे ॥ ३९ ॥ राया जो निर्मळु । निष्कलंक लोककृपाळु । शरणा-गतां स्नेहाळु । शरण्य जो ॥ २४० ॥ पैं सुरसहायशीळ । लोकलालनलीळ । प्रणतप्रति-पाळ । खेळ जयाचा ॥ ४१ ॥ जो धर्मकीर्ति धवळ । अगाधदातृत्वें सरळ । अतुळबळें प्रबळ । बळिबंधन ॥ ४२ ॥ जो भक्तजनवत्सल । प्रेमळजनप्रांजल । सत्यसेतु सकळ । कलानिधि ॥ ४३ ॥ तो श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा । सांगे येरू दैवांचा । आइकत असे ॥ ४४ ॥ आतां यथावरी । निरूपिती परी । संजय ह्मणे अवधारीं । धृतरा-ष्ट्रातें ॥ ४५ ॥ तेचि रसाळ कथा । मऱ्हाटिया प्रतिपथा । आणिजेल आतां । अवधा-रिजो ॥ ४६ ॥ ज्ञानदेव ह्मणे तुह्मी । संत वोळगावेति आह्मी । हें पढविलें स्वामी निवृत्तिदेवें ॥ २४७ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

श्लोक २०, ओंव्या २४७.

---

# अध्याय १३ वा.

जयांचें केलिया स्मरण । होय सकळ विद्यांचें अधिकरण । तेचि वंदूं चरण । श्रीगु-रूचे ॥ १ ॥ जयांचेनि आठवें । शब्दसृष्टी आंगवे । सारस्वत आघवें । जिव्हेसि ये ॥ २ ॥ वक्तृत्व गोडपणें । अमृतातें पैजा जिणे । रस होती वोळगणे । अक्षरांसी ॥ ३ ॥ भावाचें अवतरण । अवतरविती खुण । हाता चढे संपूर्ण । तत्त्वबोध ॥ ४ ॥ श्रीगुरूचे पाय । जैं हृदय गिंवसूनि ठाय । तैं येवढें भाग्य होय । उन्मेषांसी ॥ ५ ॥ ते नमस्का-रूनि आतां । जो पितामहाचा पिता । लक्ष्मीयेचा भर्ता । ऐसें ह्मणे ॥ ६ ॥

श्रीभगवानुवाच—**इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**

**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञइति तद्विदः ॥ १ ॥**

तरि पार्था परिसिजे । देह हें क्षेत्र ह्मणिजे । हें जाणे तो बोलिजे । क्षेत्रज्ञ एथें ॥ ७ ॥

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।**

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥**

तरि क्षेत्रज्ञ जो एथें । तो मीचि जाण निरुतें । जो सर्वक्षेत्रातें । संगोपोनि असे ॥ ८ ॥ क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें । ज्ञान ऐसें तयातें । मानूं आह्मी ॥ ९ ॥

---

१ शरण जाण्यास योग्य. २ देवांना साह्य करणारा. ३ शरणागतरक्षक. ४ दुसऱ्या मार्गास. ५ शरण जावें. ६ आश्रयस्थान. ७ कविताशक्ति. ८ प्राप्त होते. ९ सर्व विद्या. १० शिळे. ११ आश्रयभूत. १२ गर्भित अर्थाचें. १३ आगमन. १४ धरून. १५ विचाराला. १६ ब्रह्मदेवाचा पिता, श्रीकृष्ण. १७ शेत. १८ जीव. १९ खरें. २० पोसून.

**तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥**

तरि क्षेत्र येणें नांवें । हें शरीर जेणें भावें । ह्मणितलें तें आघवें । सांगों आतां ॥ १० ॥ हें क्षेत्र कां ह्मणिजे । कैसें कें[1] हें उपजे । कवण कवणी वाढविजे । विकारीं एथ ॥ ११ ॥ हें औट[2] हात मोटकें[3] । कीं केवढें पां केतुकें[4] । बरड[5] कीं पिकें । कोणाचें हें ॥ १२ ॥ इत्यादि सर्व । जे जे याचे भाव । ते बोलिजती सावेव । अवधान देईं ॥ १३ ॥ पैं याचि स्थळाकारणें । श्रुति सदां बोबाणें[7] । तर्क[8] येणेंचि ठिकाणें । तोंडाळ केला ॥ १४ ॥ चाळितां हेचि बोली । दर्शनें[9] शेवटा आलीं । तेवींचि नाहीं बुझविलीं । अझुनी द्वंद्वें ॥१५॥ शास्त्रांचिये सोयरिके । विचंबळिजे[10] येणेंचि एकें । याचेनि[11] एकवंकें[12] । जगा वाद ॥ १६ ॥ तोंडेंसि तोंडा न पडे । बोला बोलेंसि न घडे । इया युक्ति बडबडे[14] । चोय[13] जाहाली ॥ १७ ॥ नेणों कोणाचें हें स्थळ । परि कैसें अभिलाषाचें बळ । जें घरोघरीं कपाळ । पिटवित असे ॥ १८ ॥ नास्तिका ग्रावया[15] तोंड । वेदांचें गाढें[13] बंड । तें देखोनि पाषांड । आनाचि बोंजे[16] ॥१९॥ ह्मणे तुह्मी निर्मूळ । लटिकें वाग्जाळ[15] । ना ह्मणसी तरी पोर्फळ । घातलें आहे ॥ २० ॥ पाषांडाचिये कडे । नागवीं[17] लुंचिती[18] मुंडें । नियोजिलीं वितंडें[19] । तळासि येती ॥ २१ ॥ मृत्युबळाचेनि माजें । हें जाईल वीर्णं[20] काजें । तें देखोनियां ऐयाजें[21] । निघाले योगी ॥ २२ ॥ मृत्यूसि आधाधिले[22] । तिहीं निरंजन[23] सेविलें । यमनियमाचे केले । मेळावे[24] पुरे ॥ २३ ॥ येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें ईशानें[25] । गुंति[26] जाणोनि श्मशानें । वास केला ॥ २४ ॥ ऐसिया पैजा महेशा । पांघुरणें दाही दिशा । लांचकर[27] ह्मणोनि कोळसा । काम[28] केला ॥ २५ ॥ पैं सत्यलोकनाथा[29] । वदनें आलीं बळार्था । तऱ्हीं तो सर्वथा । जाणेंचि ना ॥ २६ ॥

**ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥**

एकं[30] ह्मणती हें स्थळ । जीवाचेंचि समूळ । मग प्राण हें कुळ । तयाचें एथ ॥ २७ ॥ जया प्राणाचे घरीं । अंगें राबती भाउ[31] चारी । आणि मना ऐसा[32] आवरी[33] । कुळवाडी कर

१ अभिप्रायानें. २ कोठें. ३ साडेतीन हात. ४ अल्प. ५ नापीक जमीन. ६ सांग. ७ बडबडे. ८ न्यायशास्त्र. ९ सहा शास्त्रें. १० चालतात. ११ या एका स्थळामुळें. १२ रक्षण. १३ मोठें. १४ बडबडे. १५ शब्दपांडित्य. १६ प्रतिज्ञा, सुपारी. १७ दिगंबरवादी. १८ हजामत, डोक्यांचे केस उपटतात. १९ विरुद्ध. २० निरर्थक. २१ निमित्तानें. २२ भ्याले. २३ एकांत. २४ समुदाय. २५ शिवानें. २६ बंधन, उपाधि. २७ लांचखाऊ. २८ मदन. २९ ब्रह्मदेवाला. ३० कर्मवादी. ३१ अपान, व्यान, समान, उदान. ३२ कर, हात मनासारखा सर्व उद्यम करतो. ३३ आवरतो.

॥ २८ ॥ तयातें इंद्रियबैलांची पेटी[१] । न म्हणे अवसीं पाहाटीं । विशयक्षेत्रीं आटी[२] । कांढी[३] भली ॥ २९ ॥ मग विधीचीं[४] वाफ चुकवी । आणि अन्याय बीज वाफवी[५] । कुकर्माचा करवी । राब जरी ॥ ३० ॥ तरि तयाचिसारिखें । असंभाव्य[६] पाप पिके । मग जन्मकोटी दुःखें । भोगी जीव ॥ ३१ ॥ ना तरी विधीचिये वाफे । सत्क्रिया बीज आरोपे । तरि जन्मकोटिमापें । सुखाचि मविजे[८] ॥ ३२ ॥ तंव आणिक[९] म्हणती हें नव्हे । हें जिवाचेंचि न म्हणावें । आमुतें पुसा आघवें । क्षेत्राचें या ॥ ३३ ॥ अहो जीव एथ उखितां[१०] । वस्तीकर वाटे जातां । आणि प्राण हा बैलौता[११] । म्हणोनि जागे ॥ ३४ ॥ अनादि जे प्रकृति । सांख्य जियेतें गाती । क्षेत्र हे वृत्ति[१२] । तियेचीं जाणा ॥ ३५ ॥ आणि तियेतेंचि आचवा । आथी घरमेळावा । म्हणोनि ते वाहिवा[१३] । घरीं वाहे ॥ ३६ ॥ वाहिठ्यांचिये[१४] रहाटीं । जे मुदल तिघे[१५] इये सृष्टी । ते तियेचिये[१६] पोटीं । जाहाले गुण ॥ ३७ ॥ रजोगुण पेरी । तेतुलें सत्व सोकरी[१७] । मग वेळे तम करी । संवैगणी ॥ ३८ ॥ रचूनि मेहत्त्वाचें[१८] खळें । मळी एके[१९] कोळुगेनि[२०] पोळें । ते अव्यक्ताची मिळे । सांजे[२१] भली ॥ ३९ ॥ तंव ऐकीं[२२] मतिमतीं । या बोलाचिया खंती[२३] । म्हणितलें यया झेंपी[२४] । अर्वाचीनों[२५] ॥ ४० ॥ हां हो परतत्त्वाआंत । कें[२६] प्रकृतीची मात । हा क्षेत्रवृत्तांत । उगेचि आइका ॥ ४१ ॥ शून्यसेज[२७] साळिये । सुलीनतेचिये तुळिये[२८] । निद्रा केली होती बळिये । संकल्पें[२९] येणें ॥ ४२ ॥ तो अवसांत[३०] चेइला । उद्यमी सदैव भला । म्हणोनि ठेवा जोडला । इच्छावशें ॥ ४३ ॥ निरालंबींची[३१] वाडी[३२] । होती त्रिभुवनायेवढी । हे तयाचिये जोडी[३३] । रूपा आली ॥ ४४ ॥ मग महाभूतांचें ऐकवाट[३४] । सैरा[३५] वेंटाळूनि भाट[३६] । भूतग्रामाचें आघाट[३७] । चिरिलें चारी[३८] ॥ ४५ ॥ यावरी आदी । पांचैवेंटयाची[३९] बांधी । बांधली प्रभेदीं[४०] । पांचभौतिकीं ॥ ४६ ॥ कर्माकर्मांचे गुंडे[४१] । बांध घातलें दोहींकडे नपुंसकें बरडें । रानें केलीं ॥ ४७ ॥ सेथ येरझारे लागीं । जन्ममृत्यूची सुरंगी[४२] । सुहाविली[४३] निर्लोगी[४४] । संकल्पें येणें ॥ ४८ ॥ मग अहंकारासि ऐकलाधी[४५] । करूनि जीवितावधी । वहाविलें[४६] बुद्धी । चराचर ॥ ४९ ॥ यापरी

---

१ जोडी. २ मेहनत. ३ राबे. ४ कर्तव्यकर्माची. ५ पेरी, वाफेंत घाली. ६ न होणारें. ७ उत्पन्न होई. ८ मोजी. ९ सांख्य. १० उपरा, उदासीन. ११ बलुतेदार. १२ वतन. १३ कारभार, वहिवाट. १४ लागवडीच्या. १५ सत्व, रज व तम. १६ प्रकृतीच्या. १७ राखी. १८ कणीसतोडणी. १९ मायेचें. २० काळनामक बैलाकडून. २१ रास. २२ मायावादी. २३ तिरस्कारानें. २४ ज्ञान. २५ आलीकडील. २६ कोणीकडे. २७ मायेच्या शय्यामंदिरांत अभ्यासाच्या चौथ्या भूमिकेचे तुळिये=गादीवर. २८ वासनेनें. २९ अकस्मात्. ३० जागा झाला. ३१ परब्रह्मींची. ३२ बाग. ३३ लाभास. ३४ ऐक्य. ३५ यथेच्छ. ३६ पडित जमीन. ३७ भाग. ३८ चतुर्विध सृष्टि. ३९ पांच विषयांची. ४० वेगळाले. ४१ दगड. ४२ सुरुंगाची वाट. ४३ सुशोभित केली. ४४ निराश्रित. ४५ एकमत. ४६ लागवडीस लाविलें.

निराळीं[1] । वाढे संकल्पाची डाळी[2] । ह्मणोनि तो मुळीं । प्रपंचा यया ॥ ५० ॥ ययापरि मतमुक्त[3]कीं । तेथ पडिर्घायिले[4] ओणिकीं[5] । ह्मणती हांहो विवेकी । कैसे तुह्मी ॥ ५१ ॥ परतत्त्वाचिया[6] गांवीं । संकल्पसेज[7][8] देखावी । तरि कां पां न मनावी । प्रकृती तयाचि ॥ ५२ ॥ परि असो हें नव्हे । तुह्मी या न लगावें । आतांचि हें आघवें । सांगिजैल ॥ ५३ ॥ तरि आकाशीं कवणें । केलीं मेघाचीं भरणें । अंतरिक्षतारागणें । धरीं कवण ॥ ५४ ॥ गगनाचा चांदवा । कोणें ओढिला केधवां । पवन हिंडत असावा । हें कवणाचें मत[9] ॥ ५५ ॥ रोमा कवण पेरी । सिंधू कवण भरी । पर्जन्याचिया करीं । धारा कवण ॥ ५६ ॥ तैसें क्षेत्र हें स्वभावें । वृत्ती[10] कवणाची नव्हे । हें वोहे[11] तया फावे । येरां तुटे ॥ ५७ ॥ तंव ओणिकें[12] एकें । क्षोभें ह्मणितलें निकें । तरि भोगिजे एकें । काळें कावें हें ॥ ५८ ॥ तरि ययाचा मोर[13] । देखताति अनिवार । तरि स्वमतीं भर । अभिमानियां ॥ ५९ ॥ हें जाणें मृत्यू रागिटा । सिंहाडयाचा[14] दरकुटा[15] । परि काय कीजे वांजटा[16] । पुरिजत[17] असे ॥ ६० ॥ महाकल्पापरौतो । कव[18] घालूनि अवचितीं । सत्यलोकभद्रजाती । आंगविजे[19] ॥ ६१ ॥ लोकपाळ नित्य नवे । दिग्गजांचे मेळावे । स्वर्गींचिये आंडवे[20] । रिगोनि मोडी ॥ ६२ ॥ येर ययाचेनि अंगवातें । जन्ममृत्यूचिये गर्ते[21] । निर्जीवें होऊनि भ्रमतें । जीवमृगें ॥ ६३ ॥ न्याहाळीं पां केव्हडा । पसरलासे चवडा[22] । करूनियां मौजि[23]वडा । आकारगज ॥ ६४ ॥ ह्मणोनि काळाची सत्ता । हाचि बोल निरुता[24] । ऐसे वाद पांडुसुता । क्षेत्रलागीं ॥ ६५ ॥ हे बहु उखिविखी[25] । ऋषीं केली नैमिषीं । पुराणें इयेविषीं । मतपत्रिका[26] ॥ ६६ ॥ अनुष्टुभादि छंदें । प्रबंधीं जियें विविधें । तें ग्रंथावलंबन[27] मदें[28] । करिती अझुनी ॥ ६७ ॥ वेदींचें बृहत्सामसूत्र । जें देखणेपणें पवित्र । परि तयाही हें क्षेत्र । नेणवेचि ॥ ६८ ॥ आणीक आणिकींही बहुतीं । महाकवीं हेतुमंतीं । यालागीं मती । वेचिलिया ॥ ६९ ॥ परि ऐसें हें एवढें । कीं अमुकेयाचेंचि फुडें[29] । हें कोण्हाही वरपडे[30] । होयचिना ॥ ७० ॥ आतां यावरी जैसें । क्षेत्र हें असे । तुज सांगों तैसें । सावधान गा ॥ ७१ ॥

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
**इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥**

---

१ आकाशांत. २ डाहाळी. ३ निराधार मतवाले. ४ खंडण केले. ५ स्वभाववादी. ६ परब्रह्माच्या. ७ शेजार. ८ संकल्पालाच. ९ मतानें. १० वतन. ११ करील. १२ कालवादी. १३ नाश. १४ सिंहाचा. १५ गुहा. १६ वृथा. १७ पोषित. १८ मिठी. १९ स्वाधीन करून घेतो, लागतो. २० अरण्य. २१ खळग्यांत. २२ पंजा. २३ मध्यें. २४ खरा. २५ वादविवाद, भवति न भवति. २६ अभिप्रायपत्रें. २७ ग्रंथाश्रय. २८ गर्वानें. २९ स्पष्ट. ३० प्राप्त.

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥**

तरि महाभूतपंचक । आणि अहंकार एक । बुद्धि अव्यक्त दशक । इंद्रियांचा ॥ ७२ ॥ मन आणीकही एक । विषयांचा दशक । द्वेष सुख दुःख । संघात इच्छा ॥ ७३ ॥ आणि चेतना धृति । एवं क्षेत्रव्यक्ती । सांगीतली तुजप्रती । आघवीचि ॥ ७४ ॥ आतां महाभूतें कवणें । कवण विषय कैसीं करणें । हें वेगळालेपणें । एकैक सांगों ॥ ७५ ॥ तरी पृथ्वी आप तेज । वायु व्योम इयें तुज । सांगीतलीं बुझ । महाभूतें ॥ ७६ ॥ आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असे । ना तरी अंवसे । चंद्र गूढ ॥ ७७ ॥ नाना अप्रौढबाळकीं[1] । तारुण्य राहे थोकीं[2] । कां न फुलतां कळिकीं । आमोद जैसा ॥ ७८ ॥ किंबहुना काष्ठीं । वन्हि जेविं किरीटी । तेविं प्रकृतीचिया पोटीं । गोप्य जो असे ॥ ७९ ॥ जैसा ज्वर धातुगत । अपथ्याचें मिष पाहत । मग जालिया आंत । बाहेरि व्यापी ॥ ८० ॥ तैसी पांचांही गांठी पडे । जैं देहाकार उघडे । तैं नाचवी चहूंकडे । तो अहंकार गा ॥ ८१ ॥ नवल अहंकाराची गोठी । [4]विशेषें न लगे अज्ञानापाठीं । सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ॥ ८२ ॥ आतां बुद्धि जे म्हणिजे । ते ऐशिया चिन्हीं जाणिजे । बोलिलें यदुराजें । आइकें सांगों ॥ ८३ ॥ तरि कंदर्पाचेनि बळें । इंद्रियवृत्तीचेनि [6]मेळें । विभांडूनि येती पाळे । विषयांचे ॥ ८४॥ तो सुखदुःखाचा नागोवा । जेथ उगाणों लागे जीवा । तेथ दोहींसी बरवा । पाडु जे धरी ॥ ८५ ॥ हें सुख हें दुःख । हें पुण्य हे दोष । हें मैळ हें चोख । ऐसें निवडिजे ॥ ८६॥ जियें अधमोत्तम सूझे । जियें साने थोर बुझे । जियें दिठी पारखिजे । विषो जीवें ॥ ८७॥ जे तेजतत्त्वांची ओरी । जे सत्वगुणाची वृद्धी । जे आत्मया जीवाची संधी । वसवीत असे ॥ ८८ ॥ अर्जुना ते गा जाण । बुद्धि तूं संपूर्ण । आतां आईक वोळखण । अव्यक्ताचें ॥ ८९ ॥ पैं सांख्याचिया सिद्धांतीं । प्रकृती जे महामती । तेचि एथें प्रस्तुतीं । अव्यक्त गा ॥ ९० ॥ आणि सांख्ययोगमतें । प्रकृती परिसौविली तुतें । ऐसी दोहीं परी जेथें । [18]विवंचिली ॥ ९१ ॥ तेथ दुजी जे जीवदशा । तिये नांव वीरेशा । अव्यक्त एथ ऐसा । पैर्याय हा ॥ ९२ ॥ तरि पाहालया रजनी । तारा लोपती गगनीं । कां हारपे अस्तमानीं । भूतक्रिया ॥ ९३ ॥ ना तरी देह गेलिया पाठीं । देहादिक किरीटी । उपाधि लपे पोटीं । कृतकर्माच्या ॥ ९४ ॥ कां बीजमुद्रेआंतु । [23]थोके तरू समस्तु । कां वस्त्रपण तंतु-

१ लहान बाळकाच्या ठायीं. २ गुप्त. ३ अहंकार. ४ अधिक. ५ कामाचे. ६ समागमें. ७ मोडून. ८ टोळ्या, समुदाय. ९ लूट. १० अनुभवूं लागे, हिशोब देणें. ११ समजे. १२ कळे. १३ ज्या दृष्टीनें. १४ ज्ञानेंद्रियांची. १५ मूळ. १६ वाढतीदशा. १७ कथिली. १८ विस्तारानें सांगितली. १९ भेद. २० रात्र उजाडल्यावर. २१ प्राणिमात्रांचे व्यापार. २२ बीजाच्या आकारांत. २३ थांबून राहे.

हशे राहे ॥ ९५ ॥ तैसें सांडूनियां स्थूळधर्म । महाभूतें भूतग्रामें[1] । लया जाती सू-
होऊनि जेथ ॥ ९६ ॥ अर्जुना तया नांवें । अव्यक्त हें जाणावें । आतां आईक आघवे
इंद्रियभेद ॥ ९७ ॥ तरि श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन[2] । इयें जाण ज्ञान[3] । करणें
पांचै ॥ ९८ ॥ इयेतत्त्वमेळापंक्तीं । सुखदुःखाची उखिविखी[4] । बुद्धि करिते मुखीं[5] । पांचें
इहीं ॥ ९९ ॥ मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार[6] । पायू[7] हे प्रकार । पांच
आणिक ॥ १०० ॥ कर्मेंद्रियें ह्मणिपती । तियें[8] इयें जाणिती । आइकें कैवल्यपती ।
सांगतसें ॥१॥ पैं प्राणाची अंतौरी । क्रियाशक्ति जे शरीरीं । तियेचि [10] रिगिनिगी द्वारीं ।
पांचें इहीं ॥ २ ॥ एवं दाहाहीं करणें[11] । सांगितलीं देव ह्मणे । परिस आतां फुडेपणें[12] । मन
तें ऐसें ॥ ३ ॥ जें इंद्रियां आणि बुद्धी । माझारिलिये संधीं । रजोगुणाच्या खांदीं ।
[13]खेळत असे ॥ ४ ॥ नीळिमा अंबरीं । कां मृगतृष्णा लहरी[14] । तैसा वायांचि[15] फरारी[16] ।
वांवो[17] जाहला ॥ ५ ॥ आणि शुक्रशोणिताचा[18] सांधा । मिळतां पांचांचा बांधा[19] । वायु-
तत्त्व दशधा[20] । एकचि जहालें ॥ ६ ॥ मग तिहीं दाहींभागीं । देहधर्माच्या [21] खैवंगीं ।
अधिष्ठिलें आंगीं । आपुलाल्या ॥ ७ ॥ तेथ चांचल्य निखळ । एकलें ठेलें निर्ढोळ[22] ।
ह्मणोनि रजाचें बळ । धरिलें तेणें ॥ ८ ॥ तें बुद्धिसी बाहेरी । अहंकाराच्या उरावरी ।
ऐसे ठायीं माझारीं । बळियावलें ॥ ९ ॥ वायां मन हें नांव । येऱ्हवीं कल्पनाचि सावेव ।
जयांचेनि संगें जीव । दशा वस्तु ॥ ११० ॥ जें प्रकृती मूळ । कामा जयाचें बळ । जें
अखंड सुये[23] सळ । अहंकारासी ॥ ११ ॥ जें इच्छेतें वाढवी । आशेतें चढवी । जें पाठी
पुरवी । भयासि गा ॥ १२ ॥ द्वैत जेथ उठी । अविद्या जेणें लोठी[24] । जें इंद्रियांतें लोटी
विषयांमाजी ॥१३॥ संकल्पें सृष्टी घडी । सवेंचि विकल्पुनि मोडी । मनोरथाच्यां उतरडी[25]
उतरी रची ॥ १४ ॥ जें भुलीचें कुहर[26] । वायुतत्त्वाचें अंतर । बुद्धीचें द्वार झांकविलें
जेणें ॥ १५ ॥ तें गा किरीटी मन । या बोला नाहीं आन । आतां विषयाभिधान-[27] । भेद
आईकें ॥ १६ ॥ तरी स्पर्श आणि शब्द । रूप रस गंध । हा विषय पंचविध । ज्ञानेंद्रि-
यांचा ॥ १७ ॥ इहीं पांचै द्वारीं । ज्ञानासि धांव बाहेरी । जैसा कां हिरविया चारी ।
भांबावे पशु ॥ १८ ॥ मग स्वर वर्ण[28] विसर्ग । अथवा स्वीकार[29] त्याग । चंक्रमण[30] उत्सर्ग[31] ।
विण्मूत्राचा ॥ १९ ॥ हे कर्मेंद्रियांचे पांच । विषय गा साच । जे बांधोनियां मोंच[32] ।
क्रिया धांवे ॥ १२० ॥ ऐसे हे दाही । विषय गा इये देहीं । आतां इच्छा तेही । सांगिजेल

---

१ जीव समूह. २ जीभ. ३ ज्ञानेंद्रियें. ४ विचार. ५ मुख्य. ६ उपस्थ. ७ गुद. ८ श्रवणादि. ९ वायको. १० गमनागमन. ११ इंद्रियें. १२ निश्चयानें. १३ खेळत असे. १४ किरण. १५ व्यर्थ. १६ भास. १७ निर्फळ. १८ स्त्रीपुंबीजांचा. १९ ऐक्य. २० दहा प्रकारानें. २१ बलानें. २२ केवळ. २३ बळ घाली. २४ दांडगी. २५ एकावर एक रचलेलीं भांडीं. २६ कोठार. २७ विषय असे ज्याचें नांव त्याचे भेद आईक. २८ वर्णोच्चार. २९ घेणें. ३० चालणें. ३१ त्याग. ३२ मार्ग.

॥ २१ ॥ तरि भूतलें आठवे । कां बोलें न झांकवे । ऐसियावरी चेतवे । जे गा वृत्ती ॥ २२ ॥ इंद्रियविषयांचिया भेटी । सरसीच जे गा उठी । कामाची बोहटी । धरूनियां ॥ २३ ॥ जियेचेनि उठिलेपणें । मना सैंघ धांवणें । न रिघावें तेथ करणें । तोंडें सुती ॥ २४ ॥ जिये वृत्तीचिया आवडी । बुद्धी होय वेडी । विषयां जियां गोडी । तें गा इच्छा ॥ २५ ॥ आणि इच्छिलिया सांगडें । इंद्रियां आमिष न जोडे । ऐसा जो डाव पडे । तोचि द्वेष ॥ २६ ॥ आतां यावरी सुख । तें एवंविध देख । जेणें एकेंचि अशेष । विसरे जीव ॥ २७ ॥ मना वाचे काये । जे आपुली आण वाये । देहस्मृतीची बांधे । मोडित ये जें ॥ २८ ॥ जयाचेनि जालेपणें । पांगुळा होइजे प्राणें । सात्त्विकासी दुणें । वरीही लाभ ॥ २९ ॥ कां आघवियाचि इंद्रियवृत्ती । हृदयाचिया एकांतीं । थापटूनि सुषुप्ति । आणी जें गा ॥ १३० ॥ किंबहुना सोयें । जीवें आत्मयाची लाहे । तेथ जें होय । तया नाम सुख ॥ ३१ ॥ आणि ऐसी हे अवस्था । न जोडतां पार्था । जे कीजे तेंचि सर्वथा । दुःख जाण ॥ ३२ ॥ तें मनोरथसंगें न होये । येरवीं सिद्धि गेलेंचि आहे । हे दोनीचि उपाये । सुखदुःखासी ॥ ३३ ॥ आतां असंगा साक्षिभूता । देहीं चैतन्याची जे सत्ता । तिये नाम पांडुसुता । चेतना येथ ॥ ३४ ॥ जे नखौनि केशवरी । उभी जागे शरीरीं । जे तिहीं अवस्थांतरीं । पालटेना ॥ ३५ ॥ मनबुद्ध्यादि आघवीं जियेचेनि टवटवी । प्रकृतिवनमाधवी । सदांचि जे ॥ ३६ ॥ जडाजडीं अंशीं । राहाटे जे सरिसी । ते चेतना गा तुजसीं । लटिकें नाहीं ॥ ३७ ॥ पैं रावो परिवार नेणे । आज्ञाचि परचक्र जिणे । कां चंद्राचेनि पूर्णपणें । सिंधु भरती ॥ ३८ ॥ नाना भ्रामकाचें सन्निधान । लोहो करी सचेतन । कां सूर्यसंग जन । चेष्टवी गा ॥ ३९ ॥ अगा मुखमेळेंविण । पिलियाचें पोषण । करी निरीक्षण । कूर्मी जेवीं ॥ १४० ॥ पार्था तयापरी । आत्मसंगती इये शरीरीं । सजीवत्वाचा करी । उपयोग जडा ॥४१॥ मग तियेतें चेतना । म्हणिपे पैं अर्जुना । आतां धृतीविवंचना । भेद आइकें ॥ ४२ ॥ तरि तत्त्वां परस्परें । उघड जाती स्वभाववैरें । नोहे पृथ्वीतें नीरें । न नाशिजे ॥४३॥ नीरातें आटी तेज । तेजा वायूसि झुंज । आणि गगन तें सहज । वायूसि भक्षी ॥ ४४ ॥ तवींचि कोणेही वेळे । आपण कायसयाही न मिळे । आंत रिघोनि वेगळें । आकाश हें ॥ ४५ ॥ ऐसीं हीं पांचही भूतें ।

---

१ मागलें. २ हत. ३ जिकडे तिकडे, पुष्कळ. ४ इंद्रियें. ५ तोंडें घालितात. ६ बरोबर. ७ विषयभोग. ८ संपूर्ण. ९ शपथ वाही. १० रक्षण. ११ लंगडा. १२ दुप्पट. १३ निद्रा. १४ मार्ग. १५ जीवाला. १६ मनोरथसंग आणि मनोरथत्याग हे दोन उपाय. १७ नखांपासून केसांपर्यंत. १८ जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तिहींत. १९ मायारूप वनाला वसंत. २० संचार करी. २१ राजा. २२ लवाजमा, खटला. २३ जिंकी. २४ अथवा. २५ लोहचुंबकाचें. २६ चंचल. २७ स्तनांस तोंड लावल्यावांचून. २८ अवलोकन. २९ धैर्याच्या विचाराचे. ३० संहारी. ३१ उदकाला शोषी.

न साहती एकमेकातें । कीं तियेंही ऐक्यातें । देहा येती ॥ ४६ ॥ वृंद्राची उखिविखी । सोडूनि वसती एकीं । एक एकातें पोखी । निजगुणें गा ॥ ४७ ॥ ऐसें न मिळे तयां साजणें । चळे धैर्यें जेणें । तिये नाम मी ह्मणे । धृती पैं गा ॥ ४८ ॥ आणि जीवेंसीं पांडवा । या छत्तिसांचा मेळावा । तो हा एथ जाणावा । संघात पैं गा ॥ ४९ ॥ एवं छत्तीसही भेद । सांगीतले तुज विशद । यया येतुलेयातें प्रसिद्ध । क्षेत्र ह्मणिजे ॥ १५० ॥ रथांगांचा मेळावा । जेवि रथ ह्मणिजे पांडवा । कां अधोर्ध्व अवेवां । नाम देह ॥ ५१ ॥ करीतुरंगसमाजें । सेना नाम निपजे । कां वाक्यें ह्मणिपती पुंजे । अक्षरांचे ॥ ५२ ॥ कां जळधाराचा मेळा । वाच्य होय आभाळा । नाना लोकां सकळां । नाम जग ॥ ५३ ॥ कां स्नेहसूत्रवन्ही । मेळ एकिये स्थानीं । धरिजे तो जनीं । दीप होय ॥ ५४ ॥ तैसीं छत्तीसही इयें तत्त्वें । मिळती जेणें एकत्वें । तेणें समूहपरत्वें क्षेत्र ह्मणिजे ॥ ५५ ॥ आणि वाहतेनि भौतिकें । पाप पुण्य एथ पिके । ह्मणोनि आह्मी कौतुकें । क्षेत्र ह्मणों ॥ ५६ ॥ आणि एकाचेनि मतें । देह ह्मणती ययातें । परि असो हें अनंतें । नामें यया ॥ ५७ ॥ पैं परतत्त्वा अरौतें । स्थावराआंतौतें । जें कांहीं होतें जातें । तें क्षेत्रचि हें ॥ ५८ ॥ परि सुर नर उरंगीं । घडत आहे योनिविभागीं । तें गुणकर्मसंगीं । पडिलें सातें ॥ ५९ ॥ हेचि गुणविवंचना । पुढां ह्मणिपेल अर्जुना । प्रस्तुत तुज ज्ञाना । रूप दावूं ॥ १६० ॥ क्षेत्र तंव सविस्तर । सांगितलें सविकार । ह्मणोनि आतां उदार । ज्ञान आइकें ॥ ६१ ॥ जया ज्ञानालागीं । गगन गिळिताति योगी । स्वर्गाची ओडवंगी । उमरडोनी ॥ ६२ ॥ न धरिती ऋद्धीची भीड । न करिती सिद्धीची चाड । योगा ऐसें दुवाड । हेळसिती ॥ ६३ ॥ तपोदुर्गे वोलांडित । क्रतुकोटि वोवांडित । उलथूनि सांडित । कर्मवल्ली ॥ ६४ ॥ नानाभजनमार्गीं । धांवत उघडिया आंगीं । एक रिघताति सुरंगीं । सुषुम्नेचिये ॥ ६५ ॥ ऐसी जिये ज्ञानीं । मुनीश्वरांची उतान्ही । वेदतरूच्या पानोवानीं । हिंडताती ॥ ६६ ॥ देईल गुरुसेवा । इया बुद्धी पांडवा । जन्मशतांचा सांडोवा । टाकित जे ॥ ६७ ॥ जया ज्ञानाची रिगवणी । अविद्ये उणें आणी । जीवा आत्मया बुझावणी । मांडूनि दे ॥ ६८ ॥ जें इंद्रियांचीं द्वारें आडी । प्रवृत्तीचे पाय मोडी । जें दैन्यचि फेडी । मानसाचें ॥ ६९ ॥ द्वैताचा दुकाळ पाहे । साम्याचें सुयाण होये । जया ज्ञानाची सोये । ऐसें करी ॥ १७० ॥ मदाचा ठावोचि पुसी । जें महामोहातें ग्रासी । नेदी आपपर ऐसी । भाष उरों

१ वादविवाद. २ मैत्री. ३ समुदाय. ४ आभ्रास. ५ तेल, वात व अग्नि. ६ सव्यापार. ७ शरीरें. ८ अपार. ९ जडाच्या. १० सर्प. ११ पडलें असतां. १२ चतुर्दशाध्यायांत. १३ उत्तम. १४ आड-मार्ग. १५ ओलांडून. १६ आचरतात. १७ तपाचे किल्ले. १८ ओवाळीत. १९ कर्मकांड. २० गुप्तमार्गी. २१ इच्छा. २२ वेद हाच एक तरू त्याच्या पानोपानीं. २३ ओवाळणी, त्याज्य पदार्थ. २४ शिरकावाबरोबर. २५ समजूत. २६ अडसर घाली, बंद करी. २७ द्वैताचा अभाव होतो. २८ सुकाळ. २९ आरंभ.

॥ ७१ ॥ जें संसारातें उन्मूळी । संकल्पपंक प्रक्षाळी । अनावरातें वेंटाळी । ज्ञेयातें जें ॥ ७२ ॥ जयाचेनि जालेपणें । पांगुळ होइजे प्राणें । जयाचेनि विंदाणें । जग हें चेष्टे ॥ ७३ ॥ जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे । जीव दोंदावरी लोळे । आनंदाचिये ॥ ७४ ॥ ऐसें जें ज्ञान । पवित्रैकनिधान । जेथ विटाळलें मन । चोख कीजे ॥ ७५ ॥ आत्मया जीवबुद्धी । जे लागली होती क्षयव्याधी । ते जयाचिया सन्निधी । निरुजा कीजे ॥ ७६ ॥ तें अनिरूप्य कीं निरूपिजे । ऐकतां बुद्धी आणिजे । वांचूनि डोळां देखिजे । ऐसें नाहीं ॥ ७७ ॥ मग तेंचि इये शरीरीं । जैं आपुला प्रभावो करी । तैं इंद्रियांचिया व्यापारीं । डोळांहि दिसे ॥ ७८ ॥ पैं वसंताचें रिगवणें । झाडांचेनि सांजेपणें । जाणिजे तेविं करणें । सांगती ज्ञान ॥ ७९ ॥ अगा वृक्षासि पाताळीं । जळ सांपडे मुळीं । तें शाखांचिये बाहाळीं । वरिही दिसे ॥ १८० ॥ कां भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव । नाना आचार गौरव । सुकुलीनाचें ॥ ८१ ॥ अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेह जैसा ये व्यक्ती । कां दर्शनाचिये प्रशस्ती । पुण्यपुरुष ॥ ८२ ॥ ना तरी केळीं कापूर जाहाला । जेविं परिमळें जाणों आला । कां भिंगारीं दीप ठेविला । बाहेरि फांके ॥ ८३ ॥ तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जियें देहीं उमटती चिन्हें । तियें सांगों आतां अवधानें । चांगें आइक ॥ ८४ ॥

**अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥**

तरी कवणेही विषयींचें । साम्य होणें न रुचे । संभावितपणाचें । वोझें जया ॥ ८५ ॥ आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां । योग्यतेचें येतां । आंगा रूप ॥ ८६ ॥ तैं गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधिला मृग जैसा । कां बाहीं तरतां वेळसा । दाटला जेवीं ॥ ८७ ॥ पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे । गरिमेतें आंगाकडे । येवोंचि नेदी ॥ ८८ ॥ पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी । हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ॥ ८९ ॥ तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा देईल भेटी । मरणेंसीं साटी । नमस्कारितां ॥ १९० ॥ वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजि दडे । महिमे भेणें ॥ ९१ ॥ चातुर्य लपवी । महत्त्व हारवी । पिसेपण

१ उपटी. २ परब्रह्मातें. ३ कळसूत्रानें, कौशल्यानें. ४ प्रकाशानें. ५ शुद्ध. ६ निरोगी. ७ सामर्थ्य. ८ शिरणें. ९ टवटवीतपणानें. १० इंद्रियें. ११ खालीं. १२ शेंड्यावर. १३ मृदुपणा. १४ कोमळपण. १५ सुकुलीनाचें गौरव आचार सांगतें. १६ समारंभाचा विस्तार. १७ प्रशस्तपणानें. १८ तावदानीं. १९ आहे तेच. २० घाबरों लागे. २१ आडविला. २२ भोंवऱ्यांत. २३ सांपडला. २४ मोठेपणातें. २५ आठवणच न व्हावी. २६ बरोबर. २७ बृहस्पतीबरोबर. २८ अज्ञानांत. २९ महत्वाच्या भयानें.

मिरवी । आवडोनी ॥ ९२ ॥ लौकिकाचा उद्वेग । शास्त्रांवरी उबग[2] । उगेपणीं चांग । आथी भर ॥९३॥ जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं सोयचि न धरावी । ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ॥ ९४ ॥ तळवटपण बाणे । आंगीं हिणावो खेवणें । तें तेंचि करणें । बहुत-करुनी ॥ ९५ ॥ हाँ जीवंत ना नोहे । लोक कल्पी येणें भावें । तैसें जिणें होआवें । ऐसी आशा ॥ ९६ ॥ चैल चालत कीं नोहे । कीं वारेनि जात आहे । जना ऐसा भ्रम जाये । तैसें होइजे ॥ ९७ ॥ माझें असतेपण लोपो । नामरूप हारपो । मज झणें वोसिपो । भूतजात ॥ ९८ ॥ ऐसी जयाचीं नेवासियें । जो नित्य एकांता जात जाये । नामेंचि जो जिये । विजनाचेनी ॥ ९९ ॥ वायू आणि तया पडे । गगनेसीं बोलों आवडे । जीवें प्राणें झाडें पढियंतीं जया ॥ २०० ॥ किंबहुना ऐसऐसीं । चिन्हें जया देखसी । जाण तया ज्ञानेसीं । शेजे[12] जाहाली ॥ १ ॥ पैं अमानित्व पुरुषीं । तें जाणावें इहीं[14] मिषीं । आतां अदंभाचिया वोळखीसी । सौरसें[15] देवों ॥ २ ॥ तरि अदंभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें । जीव जावो परि नुमसे । ठेविला ठावो ॥ ३ ॥ तयापरी किरीटी । पडिलाही प्राणसंकटीं । परि सुकृत ना प्रकटी । आंगें बोलें ॥ ४ ॥ खडाणे आला पान्हा । पळवी जेवीं अर्जुना । कां लपवी पण्यांगना । वडिलपण ॥ ५ ॥ आढ्य आतुडे अडवी । मग आढ्यता जेविं हारवी । ना तरी कुळवधू लपवी । अवयवांतें ॥ ६ ॥ ना ना कृषीवळ आपुलें । पांघुरवी पेरिलें । तैसें झांकी निपजलें । दानपुण्य ॥ ७ ॥ वरिवरी देह न पूजी । लोकांतें न रंजी[24] । स्वधर्म वाग्ध्वजीं । बांधों नेणें ॥ ८ ॥ परोपकार न बोले । न मिरवी अभ्यासिलें । न शके विकूं जोडलें । स्फीतीसाठीं ॥ ९ ॥ शरीरभोगाकडे । पाहातां कृपण आवडे । येऱ्हवीं धर्मविषयीं थोडें । बहु न म्हणे ॥ २१० ॥ घरीं दिसे सांकडें । देहींची आयती रोड । परि दानीं जया होड । सुरतरूसीं ॥ ११ ॥ किंबहुना स्वधर्मी थोर । अवसरीं उदार । आत्मचर्चे चतुर । येऱ्हवीं वेडा ॥ १२ ॥ केळीचें दळवाडें । हळु पोकळ आवडे । परि फळोनि गोडें । रसाळ जैसें ॥ १३ ॥ कां मेघाचें आंग झीलें । दिसे वारेनि जैसें जाईल । परि वर्षती नवल । घणवट ते ॥ १४ ॥ तैसा जो पूर्णपणीं । पाहातां धाती आयणी । येऱ्हवीं तरी वाणी । तोचि ठाय ॥ १५ ॥ हें असो या चिन्हाचा ।

---

१ भीति. २ उपेक्षा. ३ अपमान. ४ आतांनी. ५ नीचपणा. ६ हीनपण हें भूषण. ७ हा जीवंत आहे किंवा नाहीं. ८ चालत आहे किंवा नाहीं. ९ भिवो. १० नवसाचीं दैवतें. ११ प्रिय. १२ शेजार. १३ गर्व नसणें. १४ चिन्हें. १५ अभिप्राय. १६ उघडा न करी. १७ पुण्य-कृत्यें. १८ आपल्या मुखानें. १९ लाथरी गाय. २० वेश्या. २१ धनवान अरण्यांत सांपडला असतां. २२ शेतकरी. २३ आच्छादी. २४ खुशामत न करी. २५ बोलण्यांत. २६ कीर्तीसाठीं, प्रतिष्ठेसाठीं. २७ वाटे. २८ संकट. २९ सामुग्री. ३० पैज. ३१ प्रसंगीं. ३२ समुदाय. ३३ बळ-कट. ३४ हलकें. ३५ गारा. ३६ समृद्धि. ३७ कंगालपणा.

नर्टनाच ठायीं जयाच्या । जाण ज्ञान तयाच्या । हातां चढलें ॥ १६ ॥ पैं गा अदंभपण ॥
म्हणितलें तें हें जाण । आतां आईक खुण । अहिंसेची ॥ १७ ॥ तरि अहिंसा बहुतीं
परी । बोलिली असे अवधारीं । आपुलालिया मतांतरीं । निरूपिली ॥ १८ ॥ परि ते
ऐसी देखा । जैशा खांडूनियां शाखा । मग तयाचिया बुडुखा । कुंप कीजे ॥ १९ ॥
कां बाहु तोडोनि पचविजे । मग भुकेची पीडा राखिजे । ना ना देऊळ मोडूनि कीजे ।
पौळि देवा ॥ २२० ॥ तैसी हिंसाचि करूनि अहिंसा । निपजाविजे हा ऐसा । पैं पूर्व-
मीमांसा । निर्णय केला ॥ २१ ॥ जे अवृष्टीचेनि उपद्रवें । गांदलें विश्व आघवें । म्हणोनि
पर्जन्येष्टी करावे । नाना याग ॥ २२ ॥ तंव तिये इष्टीचिया बुडीं । पशुहिंसा तंव
रोकडी । मग अहिंसेची थडी । कैंची दिसे ॥ २३ ॥ पेरिजे नुसधी हिंसा । तेथ उगवेल
काय अहिंसा । परि नवल बापा धिंवसा । या याज्ञिकांचा ॥ २४ ॥ आणि आयुर्वेद
आघवा । तो याच मोहरीं पांडवा । जो जीवाकारणें करावा । जीवघात ॥ २५ ॥ नाना-
रोगें ओहाळलीं[12] । लोळती भूतें देखिलीं । ते हिंसा निवारावया केली । चिकित्सों[13] पैं
॥ २६ ॥ तंव ते चिकित्सेपहिलें । एकाचे कंद खाणविले । आणि एका उपडविलें ।
समूळीं सपत्रीं ॥ २७ ॥ एकें ओंड[14] मोडविलीं । जंगमाची[15] खोल[16] काढविली ... । एकें
गर्भिणी उकडाविलीं । पुटामाजीं ॥ २८ ॥ अजातशत्रू[17] तरुवरां । सर्वांगीं देववि ... ... शिरा ।
ऐसे जीव घेऊनि धनुर्धरा । कोरडे[18] केले ॥ २९ ॥ आणि जंगमाही हात ... । लाऊनि
काढिलें पित्त । मग राखिले शिणत । आणिक जीव ॥ २३० ॥ अहो वसती ... ... ळारें ।
मोडूनि केलीं वेव्हारें[20] । नागऊनि वेव्हारें । गंवादीं[21] घातली ॥ ३१ ॥ मस्तक पा... ... रविलें ।
तंव तळवटीं उघडें पडिलें । घर मोडोनि केले । मांडव पुढें ॥ ३२ ॥ नानापांघुरणें । ...८९ ॥ ... आळूनि
जैसें तापणें । कां जालें आंगधुणें । कुंजराचें[22] ॥ ३३ ॥ ना तरी बैल विकूनि गो... ॥ तैं ... टा ।
पुसें[23] लावोनि बांधिजे गोंटा[24] । इया करणी कीं चेष्टा । काइ हंसों ॥ ३४ ॥ एकीं धर्माचि
बोहणी[25] । गाळूं आदरिलें पाणी । तंव गाळितया ओहाळणी[26] । जीव मेले ॥ ३५ ॥ एक न
पचवितीचि कण । एथ हिंसेचे भेण । तेथ कदर्थले[27] प्राण । तेचि हिंसा ॥ ३६ ॥ एवं
हिंसाचि अहिंसा । कर्मकांडीं हा ऐसा । सिद्धांत सुमनसा[28] । वोळखें तूं ॥ ३७ ॥ पहिलें
अहिंसेचें नांव । आम्हीं केलें जंव । तंव स्फूर्ती[29] बांधली हांव । इये मती ॥ ३८ ॥ तरि

---

१ उत्कर्ष. २ तोडून. ३ मुळाला. ४ शिजवावें. ५ आवार. ६ कर्मकांडामध्यें. ७ गांजलें. ८ केवळ. ९ धैर्य. १० वैद्यक. ११ मार्गींचा. १२ पोळलीं. १३ वैद्य शास्त्र. १४ तोडून साफ केली. १५ वृक्षाची. १६ साल. १७ ज्याचे कोणाजवळही वैर नाहीं अशा. १८ वाळविलें. १९ चुनेगची घरें. २० व्यापारीं. २१ अन्नक्षत्र. २२ हत्तीचें. २३ राघु. २४ पिंजरा. २५ धर्मसंप्रदायानें. २६ त्रासानें. २७ दुखावलें. २८ प्रसन्नमनाच्या ( अर्जुना. ) २९ बुद्धीनें इच्छा धरिली.

इयेलें गाळावें । ह्मणोनि पडिलें बोलावें । तेवींचि तुवांही जाणावें । ऐसा भाव
। बहुतकरूनि किरीटी । ह्मचि विषय इये गोठी । येऱ्हवीं कां अव्हांटीं । धांविजेल
४० ॥ आणि स्वमताचिया निर्धारा । लागोनियां धनुर्धरा । प्राप्ता मतांतरा ।
कीजे ॥ ४१ ॥ ऐसी हे अवधारीं । निरूपिती परी । आतां यथावरी । मुख्य जें
४२ ॥ तें स्वमत बोलिजेल । अहिंसेरूप किजेल । जिया उठलिया आंतुल । ज्ञान
४३ ॥ परि तें अधिष्ठिलेनि आंगें । जाणिजे आचरतेनि बेगें । जैसी कसवटी
वानियातें ॥ ४४ ॥ तैसें ज्ञानामनाचिये भेटी । सरिसेंचि अहिंसेचें बिंब उठी ।
ऐसें किरीटी । परिस आतां ॥ ४५ ॥ तरि तरंग नोलांडित । लहरी पायें न
। सांचलु न मोडत । पाणियाचा ॥ ४६ ॥ वेगें आणि लेसा । दिठी घालूनि
। जळीं बक जैसा । पाउल सुये ॥ ४७ ॥ कां कमळावरी भ्रमर । पाय ठेविती
। कुंचंबेल केसर । इयां शंका ॥ ४८ ॥ तैसे परमाणु पां गुंतले । जाणूनि जीव
। तेथ कारुण्यामाजि पाउलें । लपवूनि चाले ॥ ४९ ॥ ते वाट कृपेची करित ।
ाचि स्नेहभरित । जीवातळीं आंथरित । आपुला जीव ॥ २५० ॥ ऐसिया जतना ।
जाया अर्जुना । हें अनिर्वाच्य परिमाणा । पुरिजेना ॥ ५१ ॥ पैं मोहाचेनि सांगडें ।
पिलीं धरी तोंडें । तेथ दांतांचे आगरडे । लागती जैसे ॥ ५२ ॥ कां स्नेहाळ माये ।
ाची वांस पाहे । तिये दिठी आहे । हळुवार जें ॥ ५३ ॥ नाना कमळदळें । डोल-
ी ढोळढाळें । तो जेणें पाडें बुबुळें । वारा घेपे ॥ ५४ ॥ तैसेनि मार्दवें पाय । भूमी-
ीत जाय । लागती तेथ होय । जीवां सुख ॥ ५५ ॥ ऐसिया लघिमा चालतां ।
कीटक पांडुसुता । देखे तरि माघुता । हळूचि निघे ॥ ५६ ॥ ह्मणे पाय धडफडील ।
स्वामीची निद्रा मोडेल । रंचलेपणा पडेल । झोंती इन ॥ ५७ ॥ इया काकुळती ।
ी घे माघुती । कोणेही व्यक्ती । न वचे वरी ॥ ५८ ॥ जीवाचेनि नांवें । तृणातेंही
डवे । मग न लंखितां जावें । हे कें गोठी ॥ ५९ ॥ मुंगिये मेरु नोलांडावें । मशका
न तरवे । तैसें भेटलियां न करवे । अतिक्रम ॥ २६० ॥ ऐसी जयाची चाली । कृपा
फळा आली । देखसी जियाली । दया वाचे ॥ ६१ ॥ स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार ।
मोहाचें माहेर । माधुर्या जाहले अंकुर । दशन तैसें ॥ ६२ ॥ पुढां स्नेह पाझरे । माघां
ती अक्षरें । शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥ ६३ ॥ तंव बोलणेंचि नाहीं । बोलों

---

आडमार्गी. २ निवड. ३ अहिंसा वर्णन करूं. ४ बाणला असतां. ५ कृतीनें, मार्गानें.
त्याचे प्रकार; हीन, मध्यम इत्यादि. ७ न ओलांडून. ८ संचय. ९ हळू. १० आमिषार्थ. ११ ठेवी.
चुरडेल. १३ या भीतीनें. १४ अतिशय बारीक. १५ माटी, मांजरी. १६ अग्रें. १७ वाट.
ममता. १९ पानोपानीं. २० ठेवीत. २१ हळू. २२ आपटेल. २३ निद्रासुखास. २४ विक्षेप.
मार्ग. २६ अमर्यादा. २७ मूर्तिमंत. २८ बोलणें. २९ दांत.

ह्मणे जरी कांहीं । तरि बोल कोणाही । खुपेल[1] कां ॥ ६४ ॥ बोलतां अधिकही निघे । तरि कोणाचिया वर्मीं न लगे । आणि कोणासि न रिघे[2] । शंका मनीं ॥ ६५ ॥ मांडिली गोठी हन मोडेल । वासिपेल[3] कोणी उडेल । आइकोनि वोवांडिल[4] । कोण्ही[5] जरी ॥ ६६ ॥ तरि दुवाळी[6] कोणा नोहावी । भंवई कवणाची नुचलावी । ऐसा भाव जीवीं । ह्मणोनियां ॥ ६७ ॥ मग प्रार्थिला विपायें । जरि लोभें बोलों जाये । तरि परिसिल्या होये । मायबाप ॥ ६८ ॥ कां नादब्रह्मचि मुसें आलें[7] । कीं गंगापय असळलें[8] । पतिव्रते आलें । वार्धक्य जैसें ॥ ६९ ॥ तैसें साच आणि मवाळ[9] । मितले[10] आणि रसाळ । शब्द जैसें कल्लोळ । अमृताचे ॥ २७० ॥ विरोधवादबळु[11] । प्राणितापढाळु[12] । उपहास छळु । वर्मस्पर्श ॥ ७१ ॥ आटुवेग[13] विंदाण[14] । आशा शंका प्रतारण[15] । हे संन्यसिले[16] अवगुण । जया वाचा ॥ ७२ ॥ आणि तयाचिपरी किरीटी । थाउ[17] जयाचिया दिठी । सांडिलीया भ्रुकुटी । मोकळिया ॥ ७३ ॥ कां जें भूतीं वस्तु[18] आहे । तिये रूपें शके विपायें । ह्मणोनि वासें[19] न पाहे । बहुतकरूनि ॥ ७४ ॥ ऐसाही कोणे एके वेळे । भितरले कृपेचेनि बळें । उघडोनि डोळे । दृष्टी घाली ॥ ७५ ॥ तरि चंद्रबिंबौनि[20] धारा । निघतां नव्हती गोचरा[21] । परि एकसरें चकोरां । निघती दोंदें ॥ ७६ ॥ तैसें प्राणियां होये । जरी तो कहीं वास पाहे । तया अवलोकनाची सोये । कूर्मींही[22] नेणे ॥ ७७ ॥ किंबहुना ऐसी । दिठी जयाची भूतांसी । करही देखसी । तैसेचि ते ॥ ७८ ॥ तरि होऊनियां कृतार्थ । राहिले सिद्धांचे मनोरथ । तैसे जयाचे हात । निर्व्यापार ॥ ७९ ॥ अक्षम[23] आणि संन्यासिलें । कां निरिंधन[24] आणि विझालें । मुकेनि घेतलें । मौन जैसें ॥ २८० ॥ तयापरी कांहीं । जयां करां करणें नाहीं । जे अकर्तयाच्याठायीं[25] । बसों येती ॥ ८१ ॥ आसुडेल[26] वारा । नख लागेल अंबरा । इया बुद्धी करां । चळों[27] नेदी ॥ ८२ ॥ तेथ आंगावरिलीं उडवावीं । कां डोळां रिगतें[28] झाडावीं । पशुपक्ष्यां दावावी । त्रासमुद्रा[29] ॥ ८३ ॥ इया केउतिया[30] गोठी । नावडे दंडकाठी । मग शस्त्राचें किरीटी । बोलणें कें ॥ ८४ ॥ लीलाकमळें खेळणें । कां पुष्पमाळा झेलणें । न करी ह्मणे गोफणें[31] । ऐसें होइल ॥ ८५ ॥ हालवतील रोमावळी । यालागीं आंग न कुरवाळी । नखांची गुंडाळी । बोटांवरी ॥ ८६ ॥ तंव करणेयाचाचि अभाव । परि ऐसाही[32] पडे डाव । तरि हातां हाचि सरावे[33] । जे

---

१ खोंचेल. २ भीति पावेल. ३ उपेक्षील. ४ शंका, क्लेशबुद्धि. ५ कदाचित्. ६ ऐकणाराला. ७ मूर्तिमान् झालें. ८ उसळलें. ९ मृदु, मधुर. १० परिमित. ११ विरुद्धवादाचें बळ. १२ प्राण्यास कासावीस करणें. १३ कठीण, अर्थदूषित, कोरडें लाघव. १४ कपट. १५ ठकबाजी. १६ टाकले. १७ प्रांजळतां. १८ ब्रह्म. १९ वाट. २० चंद्रापासून. २१ स्पष्ट दिसत नाहीं. २२ कासवी. २३ अशक्त. २४ काष्ठरहित. २५ अकर्तृत्वाच्या. २६ ओढला जाईल. २७ हालूं देत नाहीं. २८ शिरणारीं. २९ भीतिकारक चिन्ह. ३० कोणीकडे. ३१ गोफण. ३२ प्रसंग पडे. ३३ अभ्यास.

जोडिजती ॥ ८७ ॥ कां नाभिकारा उचलिजे । [2]हात पडिलियां देइजे । ना तरि आर्तातें स्पर्शिजे । [3]अळुमाळु ॥ ८८ ॥ हेंही [4]उपरोधें करणें । तरी आर्तभय हरणें । नेणती चंद्रकिरणें । जिव्हाळा तो ॥ ८९ ॥ पावोनि तो स्पर्शु । मळयानिळ [5]खरपुसु । येणें मानें पशु । कुरवाळणें ॥ २९० ॥ जे सदांचि ते मोकळे । जैशीं चंदनांगें शीतळें । न फळतांही निर्फळें । होतीचि ना ॥ ९१ ॥ आतां असो हें [6]वाग्जाळ । जाणें तें करतळ । सज्जनांचें शीळ । स्वभाव जैसे ॥ ९२ ॥ आतां मन तयाचें । सांगों ह्मणों साचें । तरी सांगीतले कोणाचे । [7]विलास हे ॥ ९३ ॥ काई शाखा नव्हे तरु । जळेंवीण असे सागरु । तेज आणि तेजाकारु । आन काई ॥ ९४ ॥ अवयव आणि शरीर । हे [8]वेगळाले काय कीर । कीं रस आणि नीर । सिनानीं आथी ॥ ९५ ॥ ह्मणोनि हे जे सर्व । सांगीतले बाह्यभाव । तें मनचि सावयव । ऐसें जाण ॥ ९६ ॥ जें भुईं बीज खोंविलें । तेंचि वरी [9]रुख जाहालें । तैसें इंद्रियद्वारां फांकलें । तें [10]अंतरेंचि कीं ॥ ९७ ॥ पैं मानसींचि जरी । अहिंसेची [11]अवसरी । तरि कैंची बाहेरी । [12]वोसंडेल ॥ ९८ ॥ आवडे ते वृत्ती किरीटी । आधीं [13]मनोंनीचि उठी । मग ते वाचे दिठी । करांसि ये ॥ ९९ ॥ वांचूनि मनींचि नाहीं । तें वाचेसि उमटेल काई । बीजेंवीण भुईं । अंकुर असे ॥ ३०० ॥ ह्मणोनि मनपण जैं मोडे । तैं इंद्रिय आधींचि [14]उबडें । सूत्रधारेंवीण [15]सोइखडें । [16]वावो जैसें ॥ १ ॥ उगमींचि वाळूनि जाये । तें वोघीं कैचें वाहे । जीवो गेलिया आहे । चेष्टा देहीं ॥ २ ॥ तैसें हें पांडवा । मूळ इंद्रिय भावा । हेंचि राहटे आघवा । द्वारीं इहीं ॥ ३ ॥ परि जियेवेळीं जैसें । जें होऊनि आंत असे । बाहेरि ये तैसें । व्यापाररूपें ॥ ४ ॥ यालागीं [17]सोंचोकारें । मनीं अहिंसा [18]थांवे थोरें । जैसी पिकली [19]द्रुती आदरें । [20]बोभांत निघे ॥ ५ ॥ ह्मणोनि [21]इंद्रियें तेंचि संपदा । वेचितां हीं [21]उदावादा । अहिंसेचा धंदा । करितें आहाती ॥ ६ ॥ समुद्रीं हाटे भरितें । तैं समुद्रचि भरी [22]तऱ्यांतें । तैसें स्वसंपत्ती चित्तें । इंद्रियां केलें ॥ ७ ॥ हें बहु असो [23]पंडितें । धरूनि बाळाचा हात । वोळी लिहीं [24]सुव्यक्त । आपणचि ॥ ८ ॥ तैसें दयाळुत्व आपुलें । मनें हातापायां आणिलें । मग तेथ उपजविलें । अहिंसेतें ॥ ९ ॥ याकारणें किरीटी । इंद्रियांचिया गोठी । मनाचियेचि [25]राहाटी । रूप केलें ॥ ३१० ॥ ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यास [26]दंडांचा । जाहाला ठायीं जयाचा । देखशील ॥ ११ ॥ तो जाण [27]वेल्हाळ । ज्ञानाचें

---

१ अभयवचन. २ पडलेल्यास हात देतो. ३ हळूच. ४ संकटानें. ५ तीव्र, कठीण. ६ पाल्हाळ. ७ लक्षणें. ८ निरनिराळें. ९ वृक्ष. १० मनच. ११ प्रतिबंध. १२ टाकली जाईल. १३ मनांतून. १४ पालथें, पराङ्मुख. १५ कळसूत्री बाहुली. १६ व्यर्थ. १७ खरेपणानें. १८ स्थिरावे. १९ सुवास. २० बोभाट करीत, पसरत. २१ इंद्रियांस तीच संपदा, अहिंसारूप संपत्ति, मनानें दिली असतां तीं इंद्रियेंही अहिंसेचाच उदावादा, व्यापार करतात. २२ खाड्यांतें. २३ पंतोजी. २४ अगदीं स्पष्ट. २५ व्यापारांचें. २६ हिंसेचा. २७ विस्तृत.

वेळाउळ । हें असो निखिळ[2] । ज्ञानचि तो ॥ १२ ॥ जें अहिंसा कानें ऐकिजे । ग्रंथाधारें निरूपिजे । ते पाहावी ऐसें जैं उपजे । तैं तोचि पाहावा ॥ १३ ॥ ऐसें ह्मणितलें देवें । तें बोलें एकें सांगावें । परि फांकलें[3] हें उपसाहावें । तुह्मी मज ॥ १४ ॥ ह्मणाल हिरवे चारीं गुरूं । विसरे मागील मोहर[4] धरूं । कां वारिलगें[5] पाखिरूं । गगनीं भरे ॥ १५ ॥ तैसिया प्रेमाचिया स्फूर्ती । फावलिया रसवृत्ती । वाहविला मती । आकळेना ॥ १६ ॥ तरि तैसें नोहे अवधारा । कारण असे विस्तारा । येऱ्हवीं पद[6] तरी अक्षरां । तिहींचेंचि ॥ १७ ॥ अहिंसा ह्मणतां थोडी । परि तैंचि हे होय उघडी । जैं [7]लोटिजती कोडी । मतांचिया ॥ १८ ॥ येऱ्हवीं प्राप्तें[8] मतांतरें । थातंबूनि[9] आंगभरें । बोलिजेल तें नेसरे[11] । तुह्मा- पासीं ॥ १९ ॥ रत्नपारखियाचिया गांवीं । जाईल गंडकी[12] तरि सोडावी । कोश्मीरीं[13] न करावी । तिये- मिरवणगण[14] तेथें ॥ ३२० ॥ काइसा वास कापुरा । मंद जेथ अवधारा । पिठाचा विकरा । सोते[15] ॥ २१ ॥ ह्मणोनि इये सभे । बोलकेपणाचेनि क्षोभें । लाग[16] सर न लभे । बोला प्रभू ॥ २२ ॥ सामान्या आणि विशेषा । सकळै कीजेल देखा । तरि का नांचेया[17] मुखा- । कडे न्याल ना तुह्मी ॥ २३ ॥ शंकेचेनि गदळें । जैं शुद्ध [18]प्रमेय मैळे । तैं मागुतिया पाउलीं पळे । [19]अवधान येतें ॥ २४ ॥ कां करूनि बाबळियेची[20] [21]कुंथी । जळें जियें ठाती[22] । तयांची वास पाहाती । हंस काई ॥ २५ ॥ कां अभ्रा पैलीकडे । जैं येत चांदिणें कोडें । तैं चकोरें [23]चांचुवडें । उचलीतना ॥ २६ ॥ तैसें तुह्मी वास न पाहाल । ग्रंथ नेघां[24] वरि कोपाल । जरी [25]अविसंवाद नोहेल । निरूपण ॥ २७ ॥ न बुझाविता[26] मतें । निफजे [27]आक्षेपाचें लागतें । तें व्याख्यान जी तुमतें । जोडूनि नेदी ॥ २८ ॥ आणि माझें तंव आघवें । ग्रंथन[28] येणेंचि भावें । जे तुह्मी संतीं होआवें । सन्मुख सदां ॥ २९ ॥ येऱ्हवीं तरी साचोकारें । तुह्मी गीतार्थाचे सोयरे । जाणोनि गीता एकसरें । धरिली मियां ॥ ३३० ॥ जे सर्वस्व आपुलें द्याल । मग [29]इयेतें सोडवूनि न्याल । ह्मणोनि ग्रंथ नव्हे वोल[30] । साचचि हे ॥ ३१ ॥ कां सर्वस्वाचा लोभ धरा । वोलीचा अव्हेर करा । तरि गीते मज अवधारा । एकचि गती ॥ ३२ ॥ किंबहुना मज । तुमचिया कृपा[31] काज । तिये लागीं व्याज[32] । ग्रंथाचें केलें ॥ ३३ ॥ तरि तुह्मा रसिकांजोगें । व्याख्यान शोधावें लागे । ह्मणूनि जी मतांगें[33] । बोलों गेलों

---

१ घर. २ सर्व. ३ विस्तारलें. ४ मार्ग. ५ वाऱ्याच्या वेगानें. ६ 'अहिंसा' हें पद. ७ खंडण केल्या जातात. ८ प्राप्त झालेलीं अन्य मतें. ९ निरसून. १० जशींच्यातशींच. ११ चालणार नाहीं. १२ कसवटीचा दगड. १३ काश्मिरी दगडानें. १४ स्तुति. १५ त्याबरोबर. १६ संबंध लागूं शकत नाहीं. १७ न्यायांच्या पुढें. १८ मुख्यार्थ. १९ लक्ष. २० शेवाळाचें, गोंडळाचें. २१ पांघरूण. २२ राहातीं. २३ चोंचा. २४ घेणार नाहीं आणि मग रागावाल. २५ विरोधरहित. २६ समजूत करतां. २७ संशयाचें. २८ प्रतिपादन. २९ गीतेला. ३० तारण. ३१ कृपेशींच कार्य. ३२ निमित्त. ३३ अन्यमतें, दृष्टांत.

॥ ३४ ॥ तंव कथेसि पसरु जाहाला । श्लोकार्थ दूरि गेला । कीजो क्षमा यया बोला । अपत्या मज ॥ ३५ ॥ आणि घांसाआंतिल हेरळ । फेडितां लागे वेळ । तें दूषण नव्हे खेडळ । सांडावा कीं ॥ ३६ ॥ कां संवचोरां चुकवितां । दिवस लागलिया माता । कोपावें कीं जीवितां । जितांणें कीजे ॥ ३७ ॥ परि यावरील हें नव्हे । तुह्मी उपसाहिलें तेंचि बरवें । आतां अवधारिजो देवें । बोलिलें ऐसें ॥ ३८ ॥ ह्मणे उन्मेषसुलोचना । सावध होईं अर्जुना । करूं तुज ज्ञाना । वोळखी आतां ॥ ३९ ॥ तरि ज्ञान गा तें एथें । वोळख तूं निरुतें । आक्रोशेंवीण जेथें । क्षमा असे ॥ ३४० ॥ अगाधसरोवरीं । कमळिणी जियापरी । कां सदैवांचिया घरीं । संपत्ति जैसी ॥ ४१ ॥ पार्था तेणेंपाडें । क्षमा जयातें वाढे । तेही लक्षे तें फुडें । लक्षण सांगों ॥ ४२ ॥ तरि पढियंतें लेणें । आंगीं भावें जेणें । धरिजे तेविं साहणें । सर्वचि जया ॥ ४३ ॥ त्रिविधें मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे । वरि पडिलिया नव्हे । वांकडा जो ॥ ४४ ॥ अपेक्षित पावे । तें जेणें तोषें मानावें । अनपेक्षिताही करवे । मान तोचि ॥ ४५ ॥ जो मानापमानातें साये । सुखदुःख जेथ सामाये । निंदास्तुती नोहे । दुखंड जो ॥ ४६ ॥ उन्हाळेनि जो न तापे । हिमवंतीं न कांपे । कायसेनिही न वासिपे । पातलेया ॥ ४७ ॥ स्वशिखरांचा भारु । नेणे जैसा मेरु । कीं धरा यज्ञसूकरु । वोझें न ह्मणे ॥ ४८ ॥ ना ना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे क्षिती । तैसा नाना द्वंद्वप्राप्ती । घांमेजेना ॥ ४९ ॥ घेऊनि जळाचे लोट । आलिया नदीनदांचे संघाट । करी वाड पोट । समुद्र जेवीं ॥ ३५० ॥ तैसें जयाचिया ठायीं । न साहणें कांहींचि नाहीं । आणि साहतसें ऐसेंही । स्मरण नुरे ॥ ५१ ॥ शरीरा जें पातलें । तें करूनि घाली आपुलें । तेथ साहतेनि नवलें । घेपिजेना ॥ ५२ ॥ हे अनाक्रोश क्षमा । जेथ आथी प्रियोत्तमा । जाण तेणें महिमा । ज्ञानासि गा ॥ ५३ ॥ तो पुरुष पांडवा । ज्ञानाचा वोलावा । आतां परिस आर्जवा । रूप करूं ॥ ५४ ॥ तरि आर्जव तें ऐसें । प्राणाचें सौजन्य जैसें । आवडतयाही दोषें । एकचि पैं गा ॥ ५५ ॥ कां तोंड पाहुनि प्रकाशु । न करी जेविं चंडांशु । जगा एक अवकाशु । आकाश जैसें ॥ ५६ ॥ तैसें जयाचें मन । माणुसाप्रति आन आन । नोहे आणि वर्तन । ऐसें पैं तें ॥ ५७ ॥ जे

---

१ खडा, माती. २ कचरा. ३ मातेनें. ४ वांचण्यास. ५ कुरवंडी. ६ ज्ञानोन्मनयना. ७ दुःखरहित. ८ त्याप्रमाणें. ९ क्षमा. १० लक्षांत येईल. ११ स्पष्ट. १२ आवडते अलंकार. १३ ज्या भावनेनें. १४ आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक. १५ समुदाय. १६ प्राप्त झाले असतां. १७ इष्टवस्तु. १८ अनिष्टास. १९ सामावलें जातें. २० दुभंगलेला. २१ हिंवाळ्यानें. २२ भीत नाहीं. २३ वराहावतार. २४ सुखदुःखादि द्वंद्वें आलीं असतां. २५ श्रमी होत नाहीं. २६ समुदाय. २७ मोठें. २८ सहन केल्याच्या. २९ गुंडाळला जात नाहीं. ३० दुःखरहित शांति. ३१ जिव्हाळा. ३२ सरळपणाला. ३३ पाहिजे त्या. ३४ उद्देशें. ३५ सूर्य.

जगचि [1]सैनोळख । जगेंसीं जुनाट सोयरिक । आप पर हे [2]भाख । जाणणें नाहीं ॥ ५८ ॥ वारि-भलतेणेंसीं मेळ । पाणिया ऐसा [3]ढाळ । कवणेविखीं [4]आडळ । नेघे चित्त ॥ ५९ ॥ वारियाची धांव । तैसे सरळ भाव । शंका आणि हांव । नाहीं जया ॥ ३६० ॥ मायेपुढें बाळका । रिगतां नाहीं शंका । तैसें मन देतां लोकां । [5]नालोची जो ॥ ६१ ॥ [6]फांकालिया इंदीवरा[7] । परिवर नाहीं धनुर्धरा । तैसा [8]कोनकोंपरा । नेणेचि जो ॥ ६२ ॥ [9]चोखाळपण रत्नाचें । रत्नावरी किरणाचें । तैसें पुढें मन जयाचें । करणें पाठीं ॥ ६३ ॥ [10]आलोचूं जो नेणें । अनुभवचि [11]जोगावणें । धरी मोकळीं अंतःकरणें । नोहे जया ॥ ६४ ॥ दिठी नोहे [12]मिणधी । बोलणें नाहीं [13]संदिग्धीं । कवणेसीं हीनबुद्धी । राहाटों नेणे ॥ ६५ ॥ दाहाही इंद्रियें प्रांजळें । निःप्रपंचें निर्मळें । [14]पांचही पालव मोकळे । आठही पाहार ॥ ६६ ॥ आमृताची धार । तैसें उजू अंतर । किंबहुना जो माहेर । या चिन्हाचें ॥ ६७ ॥ तो पुरुष सुभटा । आर्जवाचा [15]आंगवटा । जाण तथेंचि घरटा । ज्ञानें केला ॥६८॥ आतां ययावरी । गुरुभक्तीची परी । सांगोंगा अवधारीं । चतुरनाथा ॥६९॥ आघवीयाचि दैवां । जन्मभूमी हे सेवा । जे ब्रह्म करी जीवा । [16]शोच्यातेंही ॥३७०॥ ते [17]आचार्योपास्ती । सांगिजेल तुजप्रती । [18]बैसोंदे एक पांती । अवधानाची ॥७१॥ तरि सकळ जळसमृद्धी । घेऊनि गंगा निघाली [19]उदधी । कीं श्रुती हे [20]महापदीं । [21]पैठी जाहाली ॥ ७२ ॥ ना ना वेंटाळूनि जीवितें । गुणागुण [22]उखितें । प्राणनाथासि उचितें । दिधलें प्रिया ॥ ७३ ॥ तैसें सबाह्य आपुलें । जेणें गुरुकुळीं वोपिलें । आपणपें केलें । भक्तीचें घर ॥ ७४ ॥ गुरुगृह जिये देशीं । तो देशचि वसे मानसीं । विरहिणी कां जैसी । वल्लभातें ॥ ७५ ॥ तियेकडोनि येतसें वारा । देखोनि धांवे सामोरा । [23]आंड पडे ह्मणे घरा । [24]बीजें कीजो ॥ ७६ ॥ साचा प्रेमाचिया भुली । तिये दिशेसीचि आवडे बोली । जीव [25]थानपती करूनि घाली । गुरुगृहीं जो ॥ ७७ ॥ परि गुरुआज्ञा धरिलें । देह गांवीं असे एकलें । वांसरुवां लाविलें । दावें जैसें ॥ ७८ ॥ ह्मणे कैं हें [26]बिरडें फिटेल । कैं तो स्वामी भेटेल । युगाहूनि [27]वडिल । [28]निमिष मानी ॥ ७९ ॥ ऐसे या गुरुग्रामीचें आलें । कां स्वयें गुरुनींचि धाडिलें । तरि गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥ ३८० ॥ कां सुकतया अंकुरा । वरि पडलिया [29]पीयूषधारा । ना ना अल्पोदकींचा सागरा । आला मासा ॥ ८१ ॥ ना

---

१ ओळखीचे. २ बोलणें. ३ वर्तणुक, रीत. ४ प्रतिबंध. ५ न विचारी. ६ फुललेल्या. ७ कमळा. ८ गुतपण, मुकुलितभाव. ९ चकचकाट. १० बोलावयास. ११ पालन करणें. १२ ओशाळी, सकपट. १३ संशयित, विषयांत. १४ पंचप्राण. १५ मूर्तिमान्. १६ शोकग्रस्तातें. १७ गुरुभक्ति. १८ सर्व अवधानें एक पातीं एकत्र होवोत. १९ समुद्रास. २० ब्रह्मपदीं. २१ प्रविष्ट. २२ अवघें, उक्तें. २३ आडवा नमस्कार घाली. २४ आगमन करावें. २५ स्थानपति. २६ वेडें. २७ मोठें. २८ क्षण. २९ अमृताचा पाऊस.

ि [1]रंकें निधान देखिलें । कां आंधळिया डोळे उघडले । [2]भणंगाचिया आंगां आलें । इपद ॥ ८२ ॥ तैसा गुरुकुळींचेनि नांवें । महासुखें अति थोरावे । जे [3]कोडें हन टाळवे । [3]आकाश कां ॥ ८३ ॥ पैं गुरुकुळीं ऐसी । आवडी जया देखसी । जाण ज्ञान यापासीं । [5]पाइकी करी ॥ ८४ ॥ आणि [6]अभ्यंतरिलियेकडे । प्रे[7]माचेनि पवाडे । श्रीगु-च्चें रूपडें । [8]उपासी ध्यानीं ॥ ८५ ॥ हृदयशुद्धीचिया आवारीं । आराध्य तो निश्चळ र करी । मग सर्व भावेंसीं परिवारीं । आपण होय ॥ ८६ ॥ कां चैतन्[10]यींचिये पोवळीं । ाजि आनंदाचिया राउळीं । श्रीगुरुलिंगा [12]ढाळी । ध्यानामृत ॥ ८७ ॥ उदयिजतां [13]ोधीर्का । बुद्धीची [14]डाळ सात्विका । भरोनियां त्र्यं[15]बका । लाखोली वाहे ॥ ८८ ॥ काळ-ुद्धी त्रि[16]काळीं । जीवदशा धूप जाळीं । ज्ञानदीपें वोंवाळी । निरंतर ॥ ८९ ॥ सा[17]मर-याची [18]रससोय । अखंड अर्पित जाय । आपण [19]भराडा होय । गुरु तो [20]लिंग ॥ ३९० ॥ ा तरी जिवाचिये सेजे । गुरु कांत करूनि भुंजे । ऐसी प्रेमाचेनि [21]भोजें । बुद्धि वाहे । ९१ ॥ कोणेएके अवसरीं । [22]अनुराग भरे अंतरीं । कीं तया नाम करी । क्षीराब्धी ॥ ९२ ॥ थ [23]ध्येयध्यान बहुसुख । तेंचि शे[24]षतुळिका निर्दोख । वरि [25]जळशयन देख । भावी गुरु ॥ ९३ ॥ ग [26]वोळंगती पाय । ते लक्ष्मी आपण होय । गरुड होऊनि उभा राहे । आपणचि । ९४ ॥ नाभीं आपण जन्मे । ऐसें गुरुमूर्ति प्रेमें । अनुभवी मनोधर्मे । ध्यानसुख ॥ ९५ ॥ ्काधियेवेळे । गुरु माय करी भावबळें । मग स्तन्यसुखें लोळे अंकावरी ॥ ९६ ॥ ना तरी गा किरीटी । चैतन्यतरुतळवटीं । गुरु धेनु आपण पोटीं । वत्स होय ॥ ९७ ॥ गुरु-कृपास्नेहसलिलीं । आपण होय मासोळी । कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥ ९८ ॥ गुरुकृपा-मृताचें [27]वडप । आपण सेवावृत्तीचें होय रोप । ऐसेसे संकल्प । मनचि विये ॥ ९९ ॥ [28]चक्षुपक्षेंवीण । पिलूं होय आपण । कैसें पैं अपारपण । आवडीचें ॥ ४०० ॥ गुरूतें पक्षिणी करी । चारा घे चां[29]चूवरी । गुरु [30]तारू धरी । आपण कास ॥ १ ॥ ऐसे प्रेमाचेनि [31]थावें । ध्यानचि ध्यानातें प्रसवे । पूर्णसिंधू हेलावे । फुटती जैसे ॥ २ ॥ किंबहुना यापरी । श्रीगुरुमूर्ती अंतरीं । भोगी आतां अवधारीं । बाह्यसेवा ॥ ३ ॥ तरि जीवीं ऐसे [32]आवांकें । ह्मणे दास्य करीन निकें । जैसेनि गुरु कौतुकें । माग ह्मणती ॥ ४ ॥ तैसिया साचा [33]उपास्ती । गोसांवी प्रसन्न होती । तेथ मी विनंती । ऐसी करीन ॥ ५ ॥

१ दरिद्री. २ भिकाऱ्याचा. ३ आवडीनें सहज आकाशही वेंगाटून धरील इतका थोर होतो. ४ आलिंगावें. ५ चाकरी. ६ अंतःकरणांत. ७ मोठ्या प्रेमानें. ८ भजे, सेवी. ९ मुख्य. १० ज्ञानाच्या. ११ आवारांत. १२ अभिषेकीं. १३ ज्ञानसूर्य. १४ परडी. १५ शिवगुरूला. १६ ज्याला तिन्ही काळीं काळशुद्धि आहे. १७ ऐक्याची. १८ पाकसिद्धि. १९ पूजारी, भक्त. २० प्रतिमा. २१ संतोषानें. २२ प्रीति. २३ गुरुध्यान. २४ शेषनागाची गादी. २५ विष्णु. २६ पायांची सेवा करणारी. २७ वृष्टि. २८ पंखांवांचून. २९ चोंचीनें. ३० तारक. ३१ स्थिरतेनें, बळानें. ३२ अवसान धरी. ३३ भक्तीनें.

ह्मणेन तुमचा देवा । परिवार जो आघवा । येतुले रूपें होआवा । मीचि एक ॥ ६ ॥ आणि [1]उपकरतीं आपुलीं । [2]उपकरणें आथि जेतुलीं । माझीं रूपें तेतुलीं । होआवीं स्वामी ॥ ७ ॥ ऐसा मागेन वरु । तेथ हो ह्मणती श्रीगुरु । मग तो परिवारु । मीचि होईन ॥ ८ ॥ उपकरणजात सकळिक । तें मीचि होईन एकैक । तेव्हां उपास्तीचें कौतुक । देखिजेल ॥ ९ ॥ गुरु बहुतांची माये । परि [3]येकोलती होऊनि ठाये । तैसें करूनि [4]आण वाये । कृपे तिये ॥४१०॥ तया [5]अनुरागा [6]वेध लावीं । एकपत्नीव्रत घेववीं । क्षेत्र संन्यास करवीं । लोभाकरवीं ॥ ११ ॥ [7]चतुर्दिक्षु वारा । न लाहे निघोन बाहिरा । तैसा गुरुकृपे [8]पांजिरा । मीचि होईन ॥ १२ ॥ आपुलिया गुणांचीं [9]लेणीं । करीन गुरुसेवे स्वामिणी । हें असो होईन गंवसणी । गुरुभक्तीसी ॥ १३ ॥ गुरुस्नेहाचिये वृष्टी । मी पृथ्वी होईन तळवटीं । ऐसिया मनोरथांचिया सृष्टी । अनंता रची ॥ १४ ॥ ह्मणे श्रीगरूचें भुवन । आपण मी होईन । आणि दास होउनि करीन । दास्य तेथिचें ॥ १५ ॥ निर्गमागमीं दातारें । जे वोलांडिजती [10]उंबरे । ते मी होईन आणि द्वारें । द्वारपाळ ॥ १६ ॥ [11]पांउवा मी होईन । तियां मीचि लेववीन । छत्र मी आणि करीन । [12]वारीपण ॥ १७ ॥ मी तळ उपर जाणविता । [13]चवरधर हात देता । स्वामीपुढें [14]खोलता । होईन मी ॥ १८ ॥ मीचि होईन [15]सोगळा । करू सुईन [16]गुरुळा । सांडिती तो [17]नेपाळा । [18]पडिघा मीचि ॥ १९ ॥ [19]हडपे मी वोळगेन । मीचि [20]उगाळु घेइन । [21]उळिगे मी करीन । आंघोळीचें ॥ ४२० ॥ होईन गुरुचें आसन । अळंकार परिधान । चंदनादि होईन । उपचार ते ॥ २१ ॥ मीचि होईन [22]सुआरु । [23]वोगरीन उपहारु । आपणपें श्रीगुरु । वोवाळीन ॥ २२ ॥ जेवेळीं देवो [24]आरोगिती । तेव्हां [25]पातीकर मीचि प्रांती । मीचि होईन पुढती । देईन वीडा ॥ २३ ॥ ताट मी काढीन । सेज मी झाडीन । [26]चरणसंवाहन । मीचि करीन ॥ २४ ॥ सिंहासन होईन आपण । वरि गुरु करिती आरोहण । होईन पुरेपण । [27]वोळगेचें ॥ २५ ॥ श्रीगुरूचें मन । जया देईल अवधान । तो मी पुढां होईन । चमत्कार ॥ २६ ॥ तया श्रवणाचे आंगणीं । होईन शब्दांचिया [28]अक्षौहिणी । स्पर्श होईन घसणी । आंगाचिया ॥ २७ ॥ श्रीगुरूचे डोळे । अवलोकनें स्नेहाळें । पाहाती तियें सकळें । होईन रूपें ॥ २८ ॥ तिये रसने जो रुचेल । तो तो रस म्यां होइजेल । गंधरूपें कीजेल । घ्राणसेवा ॥ २९ ॥ एवं बाह्यमनोगत ।

---

१ उपयोगी पडणारीं. २ उपयोगासाठीं लागणारीं साधनें, सामुग्री. ३ एकट्याची. ४ शपथ वाहे. ५ प्रेम. ६ छंद. ७ चहूं दिशांकडून. ८ पिंजरा. ९ अलंकार. १० जाण्यायेण्याचे वेळीं. ११ पादुका. १२ छत्र धरणें. १३ चवरी धरणारा. १४ दिवट्या. १५ झारी धरणार. १६ गुळणी, पींक १७ चूळ. १८ तस्त, पिकदानी. १९ पानदान. २० पिक, चावलेला विडा. २१ कार्य. २२ आचारी. २३ वाढीन. २४ भोजन करिती. २५ पंक्तीस. २६ पाय दाबणें. २७ सेवेचें. २८ असंख्य समुदाय.

श्रीगुरुसेवा समस्त । वेटाळीन[1] वस्तुजात । होऊनियां ॥ ४३० ॥ जंव देह हें असेल । तंव वोळंगी[2] ऐसी कीजेल । मग देहांतीं नवल । बुद्धि आहे ॥ ३१ ॥ इये शरीरींची माती । मेळवीन तिये[3] क्षिती । जेथ श्रीचरण उभे ठाती[4] । श्रीगुरूंचे ॥ ३२ ॥ माझा स्वामी कवतिकें । स्पर्शत जियें उदकें[5] । तेथ लया नेईन निकें । आपीं आप ॥ ३३ ॥ श्रीगुरु वोवाळिजती । कां भुवनीं जे उजळिजती । तयां दीपांचिया दीप्तीं । ठेवीन तेज ॥ ३४ ॥ चवरी हन विंजणा । तेथ लय करीन प्राणा । मग आंगाचा वोळंगणा[6] । होईन मी ॥ ३५ ॥ जिये जिये आवकाशीं । श्रीगुरू असती परिवारेंसीं । आकाश लया आकाशीं । नेईन तिये ॥ ३६ ॥ परि जीत मेला न संडीं । निमेष लोकां न धाडीं । ऐसेनि गणावया कोडी[7] । कल्पांचिया ॥ ३७ ॥ येतुलेवरी धिंवसा[8] । जयाचिया मानसा । आणि करूनिही तैसा । अपार जो ॥ ३८ ॥ रात्र दिवस नेणे । थोडें बहु न ह्मणे । ह्मणियाचेनि[9] दाटपणें[10] । सांजा होय ॥ ३९ ॥ तो व्यापार येणेंनांवें । गगनाहूनि थोरावे । एकला करी आघवें । एकेचि काळीं ॥ ४४० ॥ हृदयवृत्ती पुढां । आंगचि घे दैवडा[11] । काज करी होडा[12] । मानसेंसीं ॥ ४१ ॥ एखादिया वेळां । श्रीगुरूचिया खेळा । लोणें[13] करी सकळां । जीविताचें ॥ ४२ ॥ जो गुरुदास्यें कृश । जो गुरुप्रेमें सपोष[14] । जो गुरुआज्ञे निवास[15] । आपणचि ॥ ४३ ॥ जो गुरुकुळें सुकुळीन । जो गुरुबंधुसौजन्यें सुजन । जो गुरुसेवाव्यसनें सव्यसन । निरंतर ॥ ४४ ॥ गुरुसंप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम । गुरुपरिचर्या[16] नित्यकर्म । जयाचेंगा ॥ ४५ ॥ गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता । जो गुरुसेवेपरता । मार्ग नेणे ॥ ४६ ॥ श्रीगुरूचें द्वार । तें जयाचें सर्वस्व सार । गुरुसेवकां सहोदर । प्रेमें भजे ॥ ४७ ॥ जयाचें वक्त्र । वाहे गुरुनामाचे मंत्र । गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ॥ ४८ ॥ शिवतलें गुरुचरणीं । भलतैसें हो पाणी । तया तीर्थयात्रे आणी । तीर्थें त्रैलोक्यींचीं ॥ ४९ ॥ श्रीगुरूचें उंशिटें[17] । लाहे जैं अवचटें । तैं तेणें लाभें विटे । समाधीसी ॥ ४५० ॥ कैवल्य सुखासाठीं । परमाणु[18] घे किरीटी । उधळती पायांपाठीं । चालतां जे ॥ ५१ ॥ हें असो सांगावें किती । नाहीं पार गुरुभक्ती । परी मा उत्क्रांतमती[19] । कारण हें ॥ ५२ ॥ जया इये भक्तीची चाड । जया इये विषयींचें कोडें[20] । जो हे सेवेवांचून गोड । न मनी कांहीं ॥ ५३ ॥ तो तत्त्वज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेंचि आवो[21] । हें असो[22] तो देवो । ज्ञान[22]-भक्त ॥ ५४ ॥ हें जाण पां साचोकारें[23] । तेथ ज्ञान उघडोनि द्वारें । नांदत

१ आटोपीन. २ सेवा. ३ पृथ्वीला. ४ राहती. ५ उदक. ६ सेवा. ७ अशाच कल्पकोटि गणाव्या, कल्पकोटीपर्यंत असेंच करीन. ८ धैर्य. ९ आज्ञा केलेल्या कार्याच्या. १० टवटवीत. ११ धांव. १२ पैजेनें. १३ ओवाळणी. १४ पुष्ट. १५ ठिकाण. १६ सेवा. १७ उष्टें (अन्नादि.) १८ गुरुपदरज. १९ व्यापकबुद्धि. २० आवड. २१ डौल. २२ फार काय! तो देव आणि ज्ञान हीं त्याचे भक्त असा तो होतो. २३ खरेपणानें.

असे गा पुरे । इया रीती ॥ ५५ ॥ जिये गुरुसेवेविखीं[1] । माझा जीव अभिलाखी । म्हणोनि सोयचुकी[2] । बोली केली ॥ ५६ ॥ येऱ्हवीं असतां हातीं खुळा[3] । भजनावधानीं आंधळा । परिचर्येलागीं[4] पांगुळा । पासूनि[5] मंद ॥ ५७ ॥ गुरुवर्णनीं मुका । आळशी पोशिजे फुका । परि मनीं आथी निका । सानुराग[6] ॥ ५८ ॥ तेणें पैं कारणें । हें स्थूळ पोसणें । पडलें मज म्हणे । ज्ञानदेवो ॥ ५९ ॥ परि तो बोल उपसाहावा । आणि वोळगे[8] अवसर देयावा । आतां म्हणेन जी बरवा । ग्रंथार्थचि ॥ ४६० ॥ परिसा परिसा श्रीकृष्णु । जो भूतभारसहिष्णु[9] । तो बोलतसे विष्णु । पार्थ ऐके ॥ ६१ ॥ म्हणे शुचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे । आंग मन जैसें । कापुराचें ॥ ६२ ॥ कां रत्नाचें दळवाडें[10] । जैसें सबाह्य चोखडें । आंत बाहेरि एके पाडें । सूर्य जैसा ॥ ६३ ॥ बाहेरि कर्में क्षाळला[11] । भीतरी ज्ञानें उजळला । इहीं दोहीं परी आला । पाखाळा[12] एका ॥ ६४ ॥ मृत्तिका आणि जळें । बाह्य येणें[13] मेळें । निर्मळ होय [14]बोलें । वेदाचेनी ॥ ६५ ॥ भलतेथ[15] बुद्धि बळी । रजें[16] आरिसा उजळी । सौंदणीं फेडी थिगळी । वस्त्रांचिया ॥ ६६ ॥ किंबहुना यियापरी । बाह्य चोख अवधारीं । आणि ज्ञानदीप अंतरीं । म्हणोनि शुद्ध ॥ ६७ ॥ येऱ्हवीं तरी पांडुसुता । अंतर शुद्ध नसतां । बाहेरि कर्म तो सर्वथा । विटंबु गा ॥ ६८ ॥ मृत जैसा शृंगारिला । गाढव तीर्थीं न्हाणिला । कडु-दुधिया माखिला । गुळें जैसा ॥ ६९ ॥ वोस-गृहीं तोरण बांधिलें । कां उपवासी अन्नें लिपिलें । कुंकुमसेंदुर केलें । कांतहीनेनें ॥ ४७० ॥ कलश ढिमाचे[18] पोकळ । जळो वरील ते झळाळ[19] । काय करूं चित्रींवें[20] फळ । आंत शेण ॥ ७१ ॥ तैसें कर्मी वरिचिलेकडां । न सरे थोर मोलें कुडा[21] । नव्हे मदिरेचा घडा । पवित्र [22]गंगे ॥ ७२ ॥ म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें । मग बाह्य लाभे स्वभावें[23] । वरि ज्ञान कर्म संभवे । ऐसें कें जोडे ॥ ७३ ॥ यालागीं बाह्यभाग । कर्में धुतला चांग । ज्ञानें फिटला वंग[24] । अंतरींचा ॥ ७४ ॥ तेथ अंतरबाह्य गेलें । निर्मळत्व एक जाहालें । किंबहुना उरलें । शुचित्वचि ॥ ७५ ॥ म्हणोनि सद्भाव जीवगत । बाहेरि दिसती फांकत । स्फटिकगृहींचे डोलत । दीप जैसे ॥ ७६ ॥ विकल्प जेणें उपजे । नाथिली[25] विकृती निपजे । अप्रवृत्तीचीं[26] बीजें । अंकुर घेती ॥ ७७ ॥ तें आइके अथवा भेटे । परि मनीं कांहींचि नुमटे । मेघरंगें न [27]कांटे । व्योम जैसें ॥ ७८ ॥ येऱ्हवीं इंद्रियांचेनि मेळें । विषयांवरी तरी न लोळे । परि विकाराचेनि विटाळें । लिंपिजेना ॥ ७९ ॥ भेटलेया वाटेवरी । [28]चोखी आणि माहारी ।

---

१ विषयीं. २ मार्ग सोडून. ३ थोंटा. ४ सेवेकरितां. ५ जवळ असून. ६ प्रीतिमान्. ७ वर्णन. ८ सेवेला. ९ सहनकर्ता. १० घनवटपण, समुदाय. ११ धुतला गेला. १२ स्वच्छतेस. १३ याचे योगें. १४ आज्ञेनें. १५ पाहिजे तेथें बुद्धिच बलवती आहे. १६ मळ. १७ परटाच्या पात्रांतील धुण्याचें पाणी घेऊन डाग दूर करी. १८ मुलाम्याचे. १९ चकचकाट. २० चित्रींचें. २१ वाईट. २२ गंगेनें. २३ सहज. २४ कलंक, डाग. २५ लटकी. २६ कुमार्गाचीं. २७ किटे. २८ उत्तम वर्ण.

तेथ नातळे तियापरी । राहाटों जाणे ॥ ४८० ॥ कां पतिपुत्रांतें आलिंगी । एकचि ते तरुणांगी । तेथ पुत्रभावाच्या आंगीं । न रिगे काम ॥ ८१ ॥ तैसें हृदय चोख । संकल्प-विकल्पीं [1]सैनोळख । कृत्याकृत्य विशेख । फुडें जाणे ॥ ८२ ॥ पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळ न शिजे । तैसी विकल्पजातीं न लिंपिजे । मनोवृत्ती ॥ ८३ ॥ तया नांव शुचित्वपण । पार्था गा संपूर्ण । हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥ ८४ ॥ आणि स्थिरता साचें । घर रिगाली जयाचें । तो पुरुष ज्ञानाचें । आयुष्य गा ॥ ८५ ॥ देह तरी वरिचिलीकडे । आपुलिया परि हिंडे । परि बैसका न मोडे । मानसींची ॥ ८६ ॥ वत्सावरूनि धेनूचें । स्नेह राना न वचे । नव्हती भोग सतियेचे । प्रेमभोग ॥ ८७ ॥ कां लोभिया दूर जाये । परि जीव ठेवा ठाये । तैसा देह चालतां न होये । चळचित्ता ॥ ८८ ॥ जातया अभ्रासवें । जैसें आकाश न धांवे । भ्रमणचक्रीं न भंवे । ध्रुव जैसा ॥ ८९ ॥ पांथिकाचिया येरझारा । सवें पंथ न चले धनुर्धरा । कां नाहीं जेवीं तरुवरां । येणें जाणें ॥ ४९० ॥ तैसा चळणवळणात्मकीं । असोनि ये पांचभौतिकीं । भूतोर्मीं एकीं । चळिजेना ॥ ९१ ॥ वाहुटोळीचेनि बळें । पृथ्वी जैसी न ढळे । तैसा उपद्रव उमाळें । न लोटे जो ॥ ९२ ॥ दैन्यदुःखीं न तपे । भयशोकीं न कंपे । देहमृत्यु न वासिपे । पातलेनी ॥ ९३ ॥ आर्ति आशा पडिभरें । वय व्याधीं गजरें । उजू असतां पाठिमोरें । नव्हे चित्त ॥ ९४ ॥ निंदा निस्तेज दंडी । काम लोभ वरपडी । परी रोम नव्हे वांकुडी । मानसाची ॥ ९५ ॥ आकाश हें वोसरो । पृथ्वी वरि विरो । परि नेणे मोहरो । चित्तवृत्ती ॥ ९६ ॥ हाती हाला फुलीं । पांसावणा जेविं न घाली । तैसा न लोटे दुर्वाक्यशेलीं । शेलिला सांता ॥ ९७ ॥ क्षीरार्णवाचिया कल्लोळीं । कंप नाहीं मंदराचळीं । आकाश न जळे जाळीं । वणवियाच्या ॥ ९८ ॥ तैशा आल्या गेल्या ऊर्मी । नव्हे गजबज मनोधर्मी । किंबहुना धैर्य क्षमी । कल्पांतींहीं ॥ ९९ ॥ पैं स्थैर्य ऐसी भाष । बोलिजे जे सविशेष । ते हे दशा गा देख । देखणेया ॥ ५०० ॥ हें स्थैर्य निधडें । जेथ आंगें जीवें जोडे । तें ज्ञानाचें उघडें । निधान साचें ॥ १ ॥ आणि ईसाळु जैसा घरा । कां दंदिया हतियेरा । न विसंबे भांडारा । लुब्धक जैसा ॥ २ ॥ कां एकलौतिया बाळका । वरि पडोनि ठाके अंबिका । मधुविषीं मधुमक्षिका । लोभिणी जैसी ॥ ३ ॥ अर्जुना जो

---

१ न शिवे. २ परिचित. ३ स्पष्ट. ४ पाण्यानें. ५ वाळू, खडा. ६ आत्मरूपीं पडलेली बैठक. ७ ठेवलेल्या द्रव्याजवळ राहतो. ८ फिरणाऱ्या नक्षत्राबरोबर जसा ध्रुव फिरत नाहीं. ९ प्रवाशाच्या. १० रस्ता. ११ भूतमात्राच्या विकारानें. १२ लोटानें. १३ भीत नाहीं. १४ भरानें. १५ हल-कल्लोळानें. १६ अपमान. १७ मिठी पडली असतां. १८ लय पावो. १९ मागें फिरो. २० हत्ती हलक्या फुलानें हणतां जसा मागें हटत नाहीं. २१ वर्मी बोलण्यानें. २२ छळिला, मारला असतां. २३ धैर्य क्षमायुक्त. २४ बळकट. २५ लोभी. २६ योद्धा. २७ एकुलताएक. २८ आई.

त्यापरी । अंतःकरण जतन करी । नेदी उभें ठाकों द्वारीं । इंद्रियांच्या ॥ ४ ॥ ह्मणे काम बागुल ऐकेल । हे आशा सियारी देखेल । तरी जीवा टेंकेल । ह्मणोनि बिहे ॥ ५ ॥ बाहेरी धीट जैसी । दांडगा पति कळासी । करी टेहेणी तैसी । प्रवृत्तीसीं ॥ ६ ॥ सचेतनीं वाणेपणें । देहासकट आटणें । संयमावरी करणें । बुझूनि घाली ॥ ७ ॥ मनाचिया माहा-द्वारीं । प्रत्याहाराचिया ठाणांतरीं । शमदम शरीरीं । जागवी उभे ॥ ८ ॥ आधारीं नाभीं कंठीं । बंधत्रयाची धरैटी । चंद्रसूर्यसंपुटीं । सुये चित्त ॥ ९ ॥ समाधीचे शेजेपासीं । बांधोनि घाली ध्यानासी । चित्तचैतन्य समरसीं । अंतरतें ॥ ५१० ॥ अगा अंतःकर-णनिग्रहो जो । तो हा हें जाणिजो । हा आथी तेथ विजयो । ज्ञानाचा पैं ॥ ११ ॥ जयाची आज्ञा आपण । शिरीं वाहे अंतःकरण । मनुष्याकारें जाण । ज्ञानचि तो ॥ १२ ॥

**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी । पुरवणी मानसीं कीं । जिती आथी ॥ १३ ॥ वमिलिया अन्ना । लाळ न घोंटी जेवि रसना । आंग न सुये आलिंगना । प्रेताचिया ॥ १४ ॥ विष खाणें नागवे । जळत घरीं न रिघवे । व्याघ्रविवरा न वचवे । वस्ती जेवीं ॥ १५ ॥ धडाडीत लोहरसीं । उडी न घालवे जैसी । न करवे उशी । आजगराची ॥ १६ ॥ अर्जुना तेणें पाडें । जयासी विषयवार्ता नावडे । नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहींच जावों ॥ १७ ॥ जयाचे मनीं आलस्य । देहीं अतिकार्श्य । शमदमीं सौरस्य । जयासि गा ॥ १८ ॥ तपोव्रतांचा मेळावा । जयाचेठायीं पांडवा । युगांत जया गांवा- । आंत येतां ॥ १९ ॥ बहु योगाभ्यासीं हांव । विजनाकडे धांव । न साहे जो नांव । संघाताचें ॥ ५२० ॥ नाराचांचीं आंथुरणें । पूयपंकीं लोळणें । तैसें लेखी भोगणें । ऐहिकींचें ॥ २१ ॥ आणि स्वर्गातें मानसें । ऐकोनि मानी ऐसें । कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें कां ॥ २२ ॥ तें हें विषयवैराग्य । आत्मलाभाचें भाग्य । येणें ब्रह्मानंदा योग्य । होती जीव ॥ २३ ॥ ऐसा उभयभोगीं त्रास । देखसी जेथ बहुवस । जाण तेथें रहिवास । ज्ञानाचा तूं ॥ २४ ॥ आणि सैंघाडाचियेपरी । इष्टापूर्तें करी । परी केलेपण शरीरीं । वसों नेदी ॥ २५ ॥

---

१ डाकीण. २ व्यभिचारिणी. ३ दांडगा नवरा. ४ रक्षण, अटकाव. ५ आत्मस्वरूपीं तोटा झाला तरी होवो अशा बुद्धीनें. ६ इंद्रियें. ७ विषयांपासून उपरम पावलेल्या बुद्धीच्या. ८ पाहा-ऱ्याच्या जागेंत. ९ मूळाधारचक्रीं. १० मणिपूरचक्रीं. ११ विशुद्धचक्रीं. १२ वज्र, उड्डियाण, जालंधर. १३ गस्त. १४ इडापिंगलांच्या संगमस्थानीं. १५ घाली. १६ आंत रत होतें. १७ आहे. १८ न रुचे. १९ वाघाच्या गुहेंत. २० कृशता. २१ अरण्याकडे. २२ समुदाय. २३ बाणांचीं. २४ कुजलेलें. २५ मांस. २६ आशाखोरासारखा. २७ यज्ञ व तलाव, बाग आदि.

वर्णाश्रमपोषकें । कर्मैं नित्यनैमित्तिकें । यामाजि कांहीं [1]नैठकें । आचरतां ॥ २६ ॥ परि हें मियां केलें । कीं हें माझेनि सिद्धी गेलें । ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजी ॥ २७ ॥ जैसें अवचितपणें । वायूसी सर्वत्र विचरणें । कीं निरभिमान उदैजणें । सूर्याचें जैसें ॥ २८ ॥ कां श्रुति स्वभावता बोले । गंगा काजेंविण चाले । तैसें [2]अवष्टंभहीन भलें । वर्तणें ज्याचें ॥ २९ ॥ ऋतुकाळीं तरी फळती । परि फळालों हें नेणती । तयां वृक्षांचिये ऐसी वृत्ती । कर्मीं सदां ॥ ५३० ॥ एवं मनीं कर्मीं बोलीं । जेथ अहंकारा [3]उखी जाहाली । [4]एकावळीची काढिली । दोरी जैसी ॥ ३१ ॥ संबंधेंवीण जैसीं । अभ्रें असती आकाशीं । देहीं कर्मैं तैसीं । जयासि गा ॥ ३२ ॥ मद्यपाआंगींचें वस्त्र । कां [5]लेपाहातीचें शस्त्र । बैलावरी शास्त्र । बांधलें आहे ॥ ३३ ॥ तयापाडें देहीं । जया मी आहें हे सोचि नाहीं । निरहंकारता पाहीं । तया नांव ॥ ३४ ॥ हें संपूर्ण जेथें दिसे । तेथेंचि ज्ञान असे । इयेविषीं अनारिसें । बोलों नये ॥ ३५॥ जन्म मृत्यु जरा दुःखें । व्याधिवार्धक्यकल्[6]मुषें । तियें आंगा न येतां देखे । दुरूनि जो ॥ ३६ ॥ साधक [7]विवसियां । कां [8]उपसर्ग योगिया । पावे [10]ऊणे-यापुरेया । [9]वोथंबा जेवीं ॥ ३७ ॥ वैर जन्मांतरींचें । सर्पा मनौनि नवचे । तवि अतीता जन्मांचें । [10]उंणें जो वाहे ॥ ३८ ॥ डोळां [11]हरळ न विरे । घाईं [12]कोतें न जिरे । तैसें काळींचें न विसरे । जन्मदुःख ॥ ३९ ॥ ह्मणे [13]पूयगर्ते रिघाला । अहा [14]मूत्ररंध्रें निघाला । [15]केटारें मियां चाटिला । [16]कुचस्वेद ॥ ५४० ॥ ऐसऐसिया परीं । जन्माचा कांटाळा धरी । ह्मणे आतां तें मी न करीं । जेणें ऐसें होय ॥ ४१ ॥ [17]हारीं [18]उमचावया । जुंवारी जैसा ये डाया । कीं वैरा बापाचेया । पुत्र [19]जंचे ॥ ४२ ॥ मारिलियाचेनि रागें । पाठीचा जेवीं सूड मागे । तेणें [20]आंक्षेपें लागे । जन्मापाठीं ॥ ४३ ॥ परि जन्मती ते लाज । न सांडी जयाचें [21]निजें । संभाविता [22]निस्तेजें । न जिरे जेवीं ॥ ४४ ॥ आणि मृत्यु पुढां आहे । तोचि कल्पांतीं कां पाहे । परि आजीच होये । सावध जो ॥ ४५ ॥ माजि [23]अथाव ह्मणतां । थडियेचि पांडुसुता । पोहणार आइता । [24]कांसेसि जेवीं ॥ ४६ ॥ कां न पवतां रणाचा ठावो । सांभाळिजे जैसा आवो । [25]वोडण [26]सुईजे घावो । न लागतांचि ॥ ४७ ॥ पाहेचा [27]पेणें पाटवधा । तंव आजीचि होइजे सावधा । जीव न वचतां औषधा । धांविजे जेवीं ॥ ४८ ॥ येरवीं ऐसें घडे । जो जळत घरीं सांपडे । तो मग न [28]पवाडे । [29]कुहा खणों ॥ ४९ ॥ [30]चोंढिये [31]पाथर गेला । तैसेनि जो

१ टाकित नाहीं. २ अहंकारावांचून. ३ नाश, उठवणीस येणें. ४ एकेरी हाराची. ५ चित्राचें हातचें. ६ पाप. ७ विवशीला. ८ उपद्रव. ९ आश्रय. १० दूषण. ११ रेती. १२ शल्य. १३ पुवाचा खाडा. १४ मूत्रमार्गें. १५ हाहा देवा. १६ स्तनावरचा घाम. १७ हरल्यावर. १८ फेडण्यासाठीं. १९ जपे. २० हट्टानें. २१ मन. २२ अपकीर्ति. २३ खोल. २४ कंबरेस. २५ ढाल. २६ घालतो. २७ उद्यांचा मुक्काम. २८ पवतें. २९ विहीर. ३० डोहीं. ३१ दगड.

बुडाला । तो बोंबेंही सकट निमाला । कोण सांगे ॥ ५५० ॥ ह्मणोनि समर्थेसीं वैर । जया पडिलें हाडखाइर । तो जैसा आठही पाहर । [२]पैरजूनि असे ॥ ५१ ॥ ना तरी [३]कैवळली नोवरी । कां संन्यासी जयापरी । तैसा न मरतां जो करी । [४]मृत्युसूचना ॥ ५२ ॥ पैं गा जो ययापरी । जन्मेचि जन्म निवारी । मरणें मृत्यु मारी । आपण उरे ॥ ५३ ॥ तया घरीं ज्ञानाचें । सांकडें नाहीं साचें । जया जन्ममृत्यूचें । निमालें शल्य ॥ ५४ ॥ आणि तयाचिपरी जरा । न टेकतां शरीरा । तारुण्याचिया भरा । माजि देखे ॥ ५५ ॥ ह्मणे आजिच्या अवसरीं । पुष्टि आहे शरीरीं । ते होईल [५]कोंचरी । वाळली जैसी ॥ ५६ ॥ निदैवाचे व्यवसाय । तैसे ठाकती हातपाय । अमंत्रीराजाची [६]परी आहे । बळा यया ॥ ५७ ॥ फुलांचिया भोगा- । लागीं प्रेम [७]टांगा । तें [८]करभाचा गुडघा । तैसें होईल ॥ ५८ ॥ वोढाळाच्या खुरीं । आषाढवातें [९]बुरी । ते दशा मा या शिरीं । पावेल गा ॥ ५९ ॥ [१०]पद्म- दळेसी [११]ईसाळें । भांडताति हे डोळे । ते होती पडवळें । पिकलीं जैसीं ॥ ५६० ॥ भव- ईचीं [१२]पडळें । [१३]वोमथती [१४]शिर्णसाळें । उर [१५]कुहिजेल जळें । [१६]आंसुवांचेनी ॥ ६१ ॥ जैसें बाभुळीचें खोड । [१७]गिरबडूनि जाती सरड । तैसें [१८]पिचडी तोंड । [१९]सरकटिजेल ॥ ६२ ॥ रांधवणी चुलीपुढें । [२०]पन्हवे [२१]उद्भतातिर [२२]खांतवडे । तैसींचि यें नाकाडें । [२३]बिडबिडती ॥ ६३ ॥ तांबूलें वोंठ [२४]रोऊं । हांसतां दांत दाऊं । [२५]सैनागर मिरऊं । बोल जेणें ॥ ६४ ॥ तयाचिया तोंडा । येईल जळं[२६]बेंठाचा लोंढा । इया [२७]उमळती दाढा । [२८]दांतांसीही ॥ ६५ ॥ [२९]कुळवाडी रिणें दाटली । कीं [३०]वांकडियां ढोरें बैसलीं । तैसी नुठी कांहीं केली । जीभची हे ॥ ६६ ॥ कुसळें कोरडीं । वारेनें जाती बरडीं । तैसी आपदा तोंडीं । दाढियेसी ॥ ६७ ॥ आषा- ढींचेनि जळें । जैसीं झिरपती शैलाचीं मौळें[३१] । तैसे [३२]खोंडीहूनि लाळे । पडती पुर ॥ ६८ ॥ वाचेसि [३३]अपवाड । कानीं [३४]अनुघड । पिंड [३५]गरुवा माकड । होईल हा ॥ ६९ ॥ तृणाचें बुझवणें । आंदोळे [३६]वारेनुगुणें । तैसें येईल कांपणें । सर्वांगासी ॥ ५७० ॥ पायां पडती [३७]वेंगडी । हात वळती [३८]मुरकुंडी । बरवेपणा [३९]बोंगडी । नाचविजेल ॥ ७१ ॥ मळमू- त्रद्वारें । होऊनि ठाती [४०]खोंकरें । [४१]नवसियें होती [४२]इतरें । माझिया [४३]निधनीं ॥ ७२ ॥ देखोनि थुंकील जग । मृत्यूचा पडेल [४४]पांग । सोइरियां [४५]उबग । येईल माझा ॥ ७३ ॥ स्त्रिया

---

१ हाडास भेदणारे. २ शस्त्र धारण करून, सज्ज. ३ सती जाणारी. ४ विचार. ५ वाळविलेली भाजी. ६ प्रमाणें. ७ मस्तक. ८ उंटाचा. ९ खांडुक. १० कमळ. ११ स्पर्धेनें. १२ पडदे. १३ लोंबतात. १४ जुन्या सालीप्रमाणें. १५ कुजेल. १६ आश्रूंच्या. १७ खरवडती. १८ थुंकयानें. १९ भरेल. २० घर. २१ वाहतात. २२ ढकिर्डे. २३ बरबटती. २४ रंगवूं. २५ चांगले. २६ लाळेचा, खांकराचा. २७ उखळती. २८ दांतांसुद्धां. २९ शेतकी. ३० झडींत. ३१ शिखरें. ३२ तोंडांतून. ३३ अनिवार. ३४ अस्पष्ट. ३५ हा पिंड=देह गरुवा=मोठ्या माकडाप्रमाणें दिसेल. ३६ वाऱ्याच्या योगानें. ३७ पायांत पाय गुंतणें. ३८ भ्रमानें. ३९ चेष्टा. ४० फुटकीं भांडीं. ४१ नवस केलेलीं दैवतें. ४२ परक्यासारखीं. ४३ मरणसमयीं. ४४ दीनदशा. ४५ कंटाळा.

ह्मणती विवसी । बाळें जाती मूर्छेसी । किंबहुना चिळसी । पात्र होइन ॥ ७४ ॥ उंभळीचा उजगरा । सेजारिया सोइलिया[2] घरा । शिणवील ह्मणती ह्मातारा । बहुतांतें हा ॥ ७५ ॥ ऐसी वार्धक्याची सूचणी । आपणियां तरुणपणीं । देखे मग मनीं । विटे जो गा ॥ ७६ ॥ ह्मणे पांहे हें येईल । आणि आतांचें भोगितां जाईल । मग काय उरेल । हितालागीं ॥ ७७ ॥ ह्मणोनि नाइकणें पावे । तंव आइकोनि घाली आघवें । पंगु न होतां जावें । तेथुनियां ॥ ७८ ॥ दृष्टी जंव आहे । तंव पाहावें तेतुलें पाहे । मूकत्वा आधीं वाचा वाहे । सुभाषित ॥ ७९ ॥ हात होती खुळे । हें पुढील[6] मोटके कळे । तंव करूनि घाली सकळें । दानादिकें ॥ ५८० ॥ ऐसी दशा येईल पुढें । तैं मन होईल वेडें । तंव चिंतूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान ॥ ८१ ॥ जैं चोर पांहे झोंबती । तंव आजीचि हेसिजे संपत्ती । कां झांकोझांकि वाती । न वचतां कीजे ॥ ८२ ॥ तैसें वार्धक्य यावें । मग जें वायां जावें । तें आतांचि आघवें । वैसतें करी ॥ ८३ ॥ आतां [12] मोडूनि ठेलीं दुर्गें । कां [13] वेंळित धरिलें [14] खेंगें । तेथ उपेक्षूनि जो निघे । तो नागवला कीं ॥ ८४ ॥ तैसें वृद्धाप्य होय । आलेपण वायां जाय । जे तो [15] शंतवृद्ध आहे । नेणों कैंचा ॥ ८५ ॥ झाडिलींचि [16] कोळें झाडी । तया न फळे जेविं बोंडी । जाहाला अग्नी तरी राखोंडी । जाळील काई ॥ ८६ ॥ ह्मणोनि वार्धक्याचेनि आठवें । वार्धक्या जो नागवे । तयाच्याठायीं जाणावें । ज्ञान आहे ॥ ८७ ॥ तैसेंचि नाना रोग । पढियोंती ना जंव पुढां आंग । तंव आरोग्याचे उपेगें । करूनि घाली ॥ ८८ ॥ सापाच्या तोंडीं । पडिली जे उंडी । ते लाऊनि सांडी । प्रबुद्ध जैसा ॥ ८९ ॥ तैसा वियोग जेणें दुःखें । विपत्ति शोक पोखे । तें स्नेह सांडूनि सुखें । उदास होय ॥ ५९० ॥ आणि [21] जेणेंजेणें कडें । दोष सूंतील तोंडें । तयां [23] कर्मरंध्रीं [24] गुंडे । नियमाचे दाटी ॥ ९१ ॥ ऐसऐसिया [25] आइती । जयाची परी असती । तोचि तो ज्ञानसंपत्ती । गोसांवी गा ॥ ९२ ॥ आतां आणीकही एक । लक्षण अलौकिक । सांगेन आइक । धनंजया ॥ ९३ ॥

**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टाऽनिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

तरि जो या देहावरी । उदास ऐसिया परी । उखितां[26] जैसा बिढारीं[27] । बैसला आहे ॥ ९४ ॥

---

१ खोकल्याची उबळ. २ सोयऱ्यांला. ३ डर्या. ४ बहिरेपण. ५ पंगु. ६ अल्प. ७ शुद्ध. ८ प्रातःकाळीं, उदयीक. ९ दूर करावी. १० दिवा गेला नाहीं तोंच सर्व झांकून नीट ठेवावें. ११ ठीक. १२ भरभराटीस आली. १३ माघार घेतली. १४ बळवाच्या पावसानें. १५ शतायु. १६ तिळांची बोंडें. १७ न सांपडे. १८ जोंपर्यंत आंगावर आदळत नाहींत. १९ उपाय. २० निरिच्छ. २१ ज्या ज्यां कडेनें. २२ दोष तोंड घालतील. २३ कर्मेंद्रियांच्या छिद्रांत. २४ धोंडे. २५ तयारी. २६ वाटसरू. २७ बिऱ्हाडीं.

कां वृक्षाची साउली । वाटे जातां मिनली । घरावरी तेतुली । आस्था नाहीं ॥ ९५ ॥ साउली [2]सरिसीचि असे । परी असे हें नेणिजे जैसें । स्त्रियेचें तैसें । लोलुप्य नाहीं ॥ ९६ ॥ आणि [4]प्रजा जे जाली । तियें [5]वस्तीकरें आलीं । कां [6]गोरुवें बैसलीं । [7]रुखातळीं ॥ ९७ ॥ जो संपत्तिमाजि असतां । ऐसा गमे पांडुसुता । जैसा कां वाटे जातां । साक्षी ठेविला ॥ ९८ ॥ किंबहुना [8]पुंसा । पांजरियामाजि जैसा । वेदाज्ञेसी तैसा । बिहूनि असे ॥ ९९ ॥ येऱ्हवीं दारागृहपुत्रीं । नाहीं जया मैत्री । तो जाणपां धात्री । ज्ञानासि गा ॥ ६०० ॥ महासिंधू जैसें । ग्रीष्म वर्ष सरिसें । [10]इष्टानिष्ट तैसें । जयाच्याठायीं ॥ १ ॥ कां तीन्हीं काळ होतां । [11]त्रिधा नव्हे सविता । तैसा सुखदुःखीं चित्ता । भेदु नाहीं ॥ २ ॥ जेथ नभाचेनि पाडें । समत्वा न्यून न पडे । तेथ ज्ञान रोकडें । वोळख तूं ॥ ३ ॥

**मयि चाऽनन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

आणि मीवांचूनि कांहीं । आणिक [12]गोमटें नाहीं । ऐसा निश्चय [13]तिहीं । जय[illegible] ाचा केला ॥ ४ ॥ शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा [14]कोश । एकु मीवांचूनि व[illegible] ते। न पाहती आन ॥ ५ ॥ किंबहुना निकट [16]निजें । जयाचें जाहालें मज । तेणें आप[illegible] गयां आह्मा सेज । एकी केली ॥ ६ ॥ रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जीवीं सां[illegible] तें। तिये कांतेचेनि पाडें । [17]एकसरला जो ॥ ७ ॥ मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंग[illegible] जळ जैसें । मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥ ८ ॥ सूर्याच्या [18]होणेंया होइजे[illegible] । कां सूर्यासवेंचि जाइजे । हें [19]विकलेपण साजे । प्रभेसि जेवीं ॥ ९ ॥ पैं पाणियांचिये भू[illegible] मिळे। पाणीं [20]तळपे कौतुकें । ते लहरी ह्मणती लौकिकें । येऱ्हवीं तें पाणी ॥ ६१० ॥ जो [illegible]नन्य यापरी । मी जाहाला ही मातें वरी । तोचि तो [22]मूर्तधारी । ज्ञान पैं गा ॥ ११ ॥ आणि तीर्थें [23]धौतें तटें । तपोवनें चोखटें । आवडती [24]कपाटें । वसवूं जया ॥ १२ ॥ [25]शैलकक्षांची कुहरें । [26]जळाशयपरिसरें । [27]अधिष्ठी जो आदरें । नगरा नये ॥ १३ ॥ बहु एकांतावरी प्रीती । जया [28]जनपदाची खंती । जाण मनुष्याकारें मूर्ती । ज्ञानाची तो ॥ १४ ॥ आणि-कही पुंढती । चिन्हें गा सुमती । ज्ञानाचिये [29]निरुती- । लागीं सांगों ॥ १५ ॥

---

१ सांपडली. २ जवळ. ३ नाद. ४ मुलें. ५ वाटसरू. ६ गुरें. ७ वृक्षाखालीं. ८ पोपट. ९ स्थान. १० चांगलेंवाईट. ११ तीन प्रकारचा. १२ चांगलें. १३ काया वाचा मनांनीं. १४ शपथ. १५ वाट. १६ मन. १७ अनुसरला. १८ होण्यानें. १९ अभेद. २० हाले. २१ एकनिष्ठ. २२ साक्षात्. २३ पवित्र. २४ गुहा. २५ पर्वताच्या गुहा. २६ उदकाच्या जवळचीं स्थळें. २७ आश्रय करी. २८ वस्तीची. २९ निश्चयासाठीं.

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

तरि परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे । तें जया दिसे । ज्ञानास्तव ॥ १६ ॥ तें एक-वांचूनि आनें । जियें [1]भवस्वर्गादि ज्ञानें । तें अज्ञान ऐसा मनें । निश्चय केला ॥ १७ ॥ स्वर्गा जाणें हें सांडी । [2]भवविषयीं कान झाडी । दे अध्यात्मज्ञानीं बुडी । सद्भावाची ॥ १८ ॥ [3]भंगलिये वाटे । शोधूनियां [4]अव्हाटे । निघिजे जेवि निटें । राजपंथें ॥ १९ ॥ तैसें ज्ञानजाता करी । आघवेंचि एकीकडे सारी । मग मन बुद्धि [5]मोहरी । अध्यात्म-ज्ञानीं ॥ ६२० ॥ ह्मणे एक हेंचि आथी । येर जाणणें ते भ्रांति । ऐसी [6]निकरेंसी मती । [7]मेरु होय ॥ २१ ॥ एवं निश्चय जयाचा । द्वारीं अध्यात्मज्ञानाचा । ध्रुव देवो गगनींचा । तैसा राहिला ॥ २२ ॥ तयाचियाठायीं ज्ञान । या बोला नाहीं आन । जे ज्ञानीं बैसलें मन । तेव्हांचि तो [8]मी ॥ २३ ॥ तरि बैसलेपणें जें होये । तें बैसतांचि बोलें न होये । तरि ज्ञाना तया आहे । [9]सरिसा पाड ॥ २४ ॥ आणि तत्त्वज्ञान निर्मळ । [10]फळे जें एक फळ । ते ज्ञेयही [11]वरी [12]सरळ- । दिठी जेणें ॥ २५ ॥ येऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें । जरी ज्ञेय न दिसेचि मनें । तरि ज्ञानलाभही न मने । [13]जाहला सांतां ॥ २६ ॥ आंधळेया हातीं दिवा । देऊनि काय करावा । तैसा ज्ञाननि-श्चय आघवा । वायांचि जाय ॥ २७ ॥ जरि ज्ञानाचेनि प्रकाशें । परतत्त्वीं दिठी न [14]पैसे । ते [15]स्फूर्तीचि असे । अंध होउनी ॥ २८ ॥ ह्मणोनि ज्ञान जेतुलें दावी । तेतुली वस्तुचि आघवी । ते देखे ऐसी व्हावी । बुद्धी चोख ॥ २९ ॥ यालागीं ज्ञानें निर्दोषें । दाविलें ज्ञेय देखे । तैसेनि [16]उन्मेषें । [17]आथिला जो ॥ ६३० ॥ जेवढी ज्ञानाची वृद्धी । तेवढी जयाची बुद्धी । तो ज्ञान हें शब्दीं । करणें न लगे ॥ ३१ ॥ पैं ज्ञानाचिये [18]प्रभेसवें । जयाची मती ज्ञेयीं पावे । तो [19]हातधरणिया शिवे । परतत्त्वातें ॥ ३२ ॥ तोचि ज्ञान हें बोलतां । विस्मयो कवण पांडुसुता । काय सवितयातें सविता । ह्मणावें असे ॥ ३३ ॥ तंव श्रोते ह्मणती असो । न सांगें तयाचा अतिसो । ग्रंथोक्ति तेथ [20]आडसो । घालिसी कां हा ॥ ३४ ॥ तुझा हाचि आह्मा थोर । वक्तृत्वाचा पाहुणेर । जे ज्ञानविषो फार । निरोपिला ॥ ३५ ॥ रस होआवा अतिमात्रु । हा घेतासि [21]कविमंत्रु । तरी [22]अवंतूनि शत्रु । करितोसि कां गा ॥ ३६ ॥ [23]ठायीं बैसतिये वेळे । जे [24]रसोय घेऊनि पळे । तियेचा

---

१ संसारस्वर्ग इत्यादिकांविषयीं. २ संसाराविषयीं. ३ ओसाड, दुभागलेली. ४ आडवाटा. ५ वळवी. ६ सारांशानें. ७ दृढ. ८ मीच तो. ९ सारखी योग्यता. १० प्रसवे. ११ पर्यंत. १२ समान दृष्टीनें. १३ झाल्यासारखा. १४ न पसरे. १५ बुद्धि. १६ ज्ञानानें. १७ संपन्न झाला. १८ प्रकाशाबरोबर. १९ हातासरसा, हांहां ह्मणतां. २० अडथळा. २१ ज्ञानमंत्र. २२ आमंत्रण करून. २३ पात्रावर. २४ स्वयंपाक.

येर[1] वोडव मिळे । कोंणा अर्था ॥ ३७ ॥ आघवाचि विषयीं [2]भादी । परि [3]सांजवणी टेकों नदी । ते [4]खुरखोडी नुसधी । पोषी कवण ॥ ३८ ॥ तैसी ज्ञानीं मती न फांके । येर जल्पती नेणों [5]कैतुकें । परि तें असो निकें । केलें तुवां ॥ ३९ ॥ जया [6]ज्ञानलेशोद्देशें । क्रिजती योगादि सायासें । तें [7]धणीचें आणि तुझिया ऐसें । निरूपण ॥ ६४० ॥ अमृताची [8]सातवांकडी । लागो कां [9]अनुघडी । [10]सुखाच्या दिवसीं कोडी । गणिजेतुका ॥ ४१ ॥ पूर्णचंद्रेसीं राती । युग एक असोनि [11]पोहती । तरि काय न पाहत आहाती । चकोर ते ॥ ४२ ॥ तैसें ज्ञानाचें बोलणें । आणि येणें रसाळपणें । आतां पुरे कोण ह्मणे । [12]आकर्णितां ॥ ४३ ॥ आणि [13]सभाग्य पाहुणा ये । [14]सुभगाचि वाढती होये । तैं सरों नेणें [15]रससाये । ऐसें आथी ॥ ४४ ॥ तैसा जाहाला प्रसंग । जे ज्ञानीं आह्मासि [16]लाग । आणि तुजही [17]अनुराग । आथि तेथ ॥ ४५ ॥ ह्मणोनि यया व्याख्याना- । पासीं [18]से आली [19]चौगुणा । ना ह्मणोनयेसी देखणा । होसी ज्ञानी ॥ ४६ ॥ तरी आतां ययावरी । [20]प्रज्ञेचां [21]मोज भरीं । पदें साच करीं । निरूपणीं ॥ ४७ ॥ या संतवाक्यासरिसें । ह्मणितलें निवृत्तिदासें । माझेंही जी ऐसें । मनोगत ॥ ४८ ॥ यावरी आतां तुह्मी । आज्ञापिला स्वामी । तरि वायां [22]वाग्जाळ मी । वाढों नेदीं ॥ ४९ ॥ एवं इयें अठरा । ज्ञानलक्षणें अवधारा । श्रीकृष्णें धनुर्धरा । निरूपिलीं ॥ ६५० ॥ मग ह्मणे यानावें । ज्ञान एथ जाणावें । हें स्वमत आणि आघवे । ज्ञानियेही ह्मणती ॥ ५१ ॥ करतळावरी वाटोळा । डोलत देखिजे आंवळा । तैसें ज्ञान आह्मी डोळां । दाविलें तुज ॥ ५२ ॥ आतां धनंजया महामती । अज्ञान ऐसी [23]वदंती । तेही सांगों व्यक्ती । लक्षणेसी ॥५३॥ येऱ्हवीं ज्ञान फुडें जालिया । अज्ञान जाणवे धनंजया । जें ज्ञान नव्हे तें [24]अपैसया । अज्ञानचि ॥५४॥ पाहें पां दिवस आघवा सरे । मग रात्रीची [25]वोरी वावरे । वांचूनि कांहीं तिसरें । नाहीं जेवीं ॥ ५५ ॥ तैसें ज्ञान जेथ नाहीं । तें अज्ञानचि पाहीं । तरि सांगों कांहीं कांहीं । चिन्हें तियें ॥ ५६ ॥ तरि [26]संभावने जिये । जो मानाची वाट पाहे । सत्कारें होये । तोष जया ॥ ५७ ॥ गर्वें पर्वताचीं शिखरें । तैसा महत्वावरूनि नुतरे । तयाचियाठायीं पुरें । आज्ञान आहे ॥ ५८ ॥ आणि स्वधर्माची [27]मांगेळी । [28]बांधे वाचेच्या पिंपळीं । उभिलें जैसा देउळीं । जाणोनि कुंचा ॥ ५९ ॥ घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा । करी तेतुलें मोहरा ।

---

१ आदर. २ चांगली. ३ धार. ४ लाथाळ गाय. ५ भलभलतें. ६ ज्ञानांशाच्या उद्देशानें. ७ तृप्तीचें. ८ सात दिवसांची झड. ९ एकसारखी. १० सुखाचे दिवसांत कोटयावधि दिवस गेले तरी गणले जात नाहींत. ११ उगवलेली. १२ ऐकतां. १३ श्रीमान्. १४ सुग्रण, दैववती. १५ स्वयंपाक अशा वेळीं सरावयाचा नाहीं. १६ आवड. १७ प्रीति. १८ स्मरण. १९ चौपट. २० बुद्धीचा. २१ आधिक्य. २२ व्यर्थ बडबड. २३ प्रसिद्ध. २४ सहज. २५ पाळी. २६ प्रतिष्ठेसाठीं. २७ दिवाळी दिवशीं दोराचें वेटोळें करून मांगलोक चावडीवर ठेवतात तें. २८ जसा देवळामध्यें कुंचा उभा ठेवल्याप्रमाणें मोळांचा वेंट बांधणें.

[1]स्फीतीचिया ॥ ६६० ॥ आंग वरिवरी चर्ची । जनातें अर्चितां वंची । तो जाण अज्ञानाची । खाणी [2]एथ ॥ ६१ ॥ आणि वन्ही वनीं विचरे । तेथ जळती जैसीं जंगमस्थावरें । तैसें जयाचेनि आचारें । जगा दुःख ॥ ६२ ॥ कौतुकें जें जें [3]जल्पे । तें [4]सबळाहूनि [5]तीख रुपे । विषाहूनि संकल्पें । मारक जें ॥ ६३ ॥ तयातें बहु अज्ञान । तो अज्ञानाचें निधान । हिंसेसि [6]आयतन । जयाचें जिणें ॥ ६४ ॥ आणि फुंके भाता फुगे । [7]रेचिलिया सवेंचि [8]उफगे । तैसा [9]संयोगवियोगें । चढे वोहटे ॥ ६५ ॥ पडली वारयाचिया [10]वेळसां । धुळी चढे आकाशा । [11]हरिखें वळघे तैसा । स्तुती वेळे ॥ ६६ ॥ निंदा [12]मोटकी आइके । आणि कपाळ धरूनि ठाके । थेंबें विरे वारेनि [13]शोखे । चिखल जैसा ॥ ६७ ॥ तैसा मानापमानीं होये । जो कोण्हींचि [14]ऊर्मी न साहे । तयाच्याठायीं आहे । अज्ञान पुरे ॥ ६८ ॥ आणि जयाचिया मनीं गांठी । वरिवरी मोकळी वाचा दिठी । आंगें मिळे जीवें पाठी । [15]भलतया दे ॥ ६९ ॥ व्याधाचें चारा घालणें । तैसें [16]प्रांजळ [17]जोगावणें । चांगाचीं अंतःकरणें । विरुद्ध करी ॥ ६७० ॥ [18]गार शेवाळें गुंडाळली । कां निंबोळी जैसी पिकली । तैसी जयाची भली । बाह्यक्रिया ॥ ७१ ॥ अज्ञान तयाचियाठायीं । ठेविलें असे पाहीं । या बोला आन नाहीं । सत्य मानीं ॥ ७२ ॥ आणि गुरुकुळीं लाजे । जो गुरुभक्ति [19]उभजे । विद्या घेऊनि माजे । गुरूसींचि जो ॥ ७३ ॥ तयाचें नाम घेणें । तें वाचे [20]शूद्रान्न होणें । परि घडलें लक्षणें । बोलतां इयें ॥ ७४ ॥ आतां गुरुभक्तांचें नांव घेवों । तेणें वाचे प्रायश्चित्त देवों । गुरुभक्तांचें नाम पाहों । सूर्य जैसा ॥ ७५ ॥ येतुलेनि [21]पांगू पापाचा । निस्तरल हे वाचा । जो [22]गुरुतल्पगाचा । [23]नामीं जाला ॥ ७६ ॥ हा ठायवरी । तया नामाचें भय हरी । मग म्हणे अवधारीं । आणिकें चिन्हें ॥ ७७ ॥ तरि आंगें कर्में ढिला । जो मनें विकल्पें भरला । [24]आडवींचा [25]अवगळला । [26]कुहा जैसा ॥ ७८ ॥ तया तोंडीं [27]कांटिवडें । आंत नुसधीं हाडें । अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ॥ ७९ ॥ जैसें पोटालागीं [28]सुणें । उघडें झांकलें न म्हणे । तैसें आपलें परावें नेणे । द्रव्यालागीं ॥ ६८० ॥ इया [29]ग्रामसिंहाचियाठायीं । जैसा [30]मिळणीं ठावो अठावो नाहीं । तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारीना ॥ ८१ ॥ कर्माचा वेळ चुके । कां नित्य नैमित्तिक ठाके । तें जया न दुखे । जीवामाजी ॥ ८२ ॥ पापीं जो निसुग । पुण्याविषयीं अति [31]निलाग । जयाचिया मनीं वेग ।

---

१ प्रतिष्ठेस. २ या परमात्मविर्येत, जगांत. ३ बोले. ४ बर्ची, पाहार. ५ तीक्ष्ण. ६ घर. ७ सोडला असतां. ८ रिकामा पडे. ९ लाभालाभानें. १० वावटळींत. ११ हर्षास चढे. १२ अल्प. १३ शोषे. १४ उत्कर्ष, तरंग. १५ जीवानें भलत्यासच मिळतो. १६ निर्मळ. १७ पालन करणें. १८ शिळा. १९ त्रासे. २० शुद्रांचें अन्न भक्षणें. २१ हीनत्व. २२ मातृगमनाचा. २३ दोषी. २४ रानांतला. २५ अमंगळ. २६ विहीर. २७ कांटेरी. २८ कुत्रें. २९ कुत्र्याच्या. ३० अंगसंगास. ३१ भ्रष्ट.

विकल्पाचा ॥ ८३ ॥ तो जाण निखिळा[1] । अज्ञानाचा पुतळा । जो बांधोनि असे डोळा । वित्ताशेतें[2] ॥ ८४ ॥ आणि स्वार्थें अळुमाळें[3] । जो धैर्यापासोनि चळे । जैसें तृणबीज ढळे । मुंगियेचेनी ॥ ८५ ॥ पांवो[4] सुइलिया सवें । जैसें थिल्लर[5] कालवे । तैसा भयाचेनि नांवें । गजबजे जो ॥ ८६ ॥ मनोरथांचिया धारसा[6] । वाहणें जयाचिया मानसा । पूरीं पडिला जैसा । दुधिया पाहीं ॥ ८७ ॥ वायूचेनि सांवायें[7] । धूई[8] दिगंतरा जाये । दुःखवार्ता होये । तैसें जया ॥ ८८ ॥ वाउधणाचिया[9] परी । आश्रय कहींचि न धरी । क्षेत्रीं तीर्थीं पुरीं । थारों नेणे ॥ ८९ ॥ कां मातलिया सरडा । पुढती बुड पुढती शेंडा । हिंडेण[10] वारा कोरडा । तैसा जया ॥ ६९० ॥ जैसा रोंविल्यावीणें । रांजण थारों[11] नेणे । तैसा पडे तैं राहाणें[12] । येऱ्हवीं हिंडे ॥ ९१ ॥ तयाच्याठायीं उदंड । अज्ञान असे वितंडें[13] । जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें ॥ ९२ ॥ आणि पैं गा धनुर्धरा । जयाचिया अंतरा । नाहीं वोढोवारा[14] । संयमाचा ॥ ९३ ॥ लेंडिये[15] आला लोंढा । न मनी वाळुवेचा वेरवंडा[16] । तैसा निषेधांचिया[17] तोंडा । बिहेना जो ॥ ९४ ॥ व्रतातें आड मोडी । स्वधर्म पायें वोलांडी । नियमाची आश तोडी । जयाची क्रिया ॥ ९५ ॥ नाहीं पापाचा कंटाळा । नेणे पुण्याचा जिव्हाळा । लाजेचा पेंडेवळा[18] । खाणोनि घाली ॥ ९६ ॥ कुळेंसीं[19] जो पाठमोरा । वेदाज्ञेसीं दुऱ्हा । कृत्याकृत्यव्यापारा । निवाड[20] नेणें ॥ ९७ ॥ वसू[21] जैसा मोकाट[22] । वारा जैसा अफाट । फुटला जैसा पाट । निरंजनीं[23] ॥ ९८ ॥ आंधळें होतिरू[24] मातलें । कां डोंगरीं जैसें पेटलें । तैसें विषयीं सुटलें । चित्त जयाचें ॥ ९९ ॥ पैं उकरडां काय न पडे । मोकाट[25] कोणां नातूडे । ग्रामद्वारींचें वोडें[26] । नोलांडी कोण ॥ ७०० ॥ जैसें सत्रीं अन्न जालें । कां सोमान्या[27] बीकें[28] आलें । वार्धियेचें उंभलें[29] । कोण न रिगे ॥ १ ॥ तैसें जयाचें अंतःकरण । तयाच्याठायीं संपूर्ण । अज्ञानाची जाण । ऋद्धि आहे ॥ २ ॥ आणि विषयांची गोडी । जो जीत मेला न सांडी । स्वर्गींही खावया जोडी । एथुनीचि ॥ ३ ॥ जो अखंड भोगा जांचे[30] । जया व्यसन कामक्रीडेचें[31] । मुख देखोनि विरक्तांचें । सचैल[32] करी ॥ ४ ॥ विषो शिणोनियां राहे । परि न शिणे सावध नोहे । कुहिलीं[33] हातीं खाये । कोढी[34] जैसा ॥ ५ ॥ खरीं[35] टेंकों नेदी उडे । लातोंनि[36] फोडी नाकाडें । तऱ्हीं जोविं न काढे । माघौता खर ॥ ६ ॥ तैसा जो विषयांलागीं । उडी घाली जळते आगीं ।

---

१ सर्व. २ द्रव्यासक्तीला. ३ अल्पस्वल्प. ४ पाय घालण्याबरोबर. ५ डबकांतील पाणी. ६ धारेवर. ७ सहवासानें. ८ धूळ, धुकें. ९ वादळाच्या. १० झाडाच्या वर जावें, खालीं उतरावें. ११ परिभ्रमण. १२ स्थिरावो १३ मोठें. १४ धरबंध. १५ ओहळास. १६ बांध. १७ अधर्म. १८ मर्यादा. १९ कुळधर्माला. २० निर्णय, २१ बैल. २२ मोकळा. २३ जळीं. २४ हत्ती, २५ पोळ. २६ अटकाव. २७ वेडयेला. २८ तेज, बळ. २९ दारांत. ३० श्रम करतो. ३१ कामनिक कर्माचें. ३२ सचैल स्नान करी. ३३ कुजलेल्या. ३४ कुष्टरोगी. ३५ गाढवी. ३६ लाथांनीं.

व्यसनाची आंगीं । लेणीं मिरवी ॥ ७ ॥ फुटोनि[1] पडे तंव । मृग वाढवी हांव । परि न म्हणे ते मैव[2] । रोहिणीची[3] ॥ ८ ॥ तैसा जन्मोनि मृत्युवरी । विषयीं त्रासिता बहुतीं परी । तऱ्हीं त्रास नेघे धरी । अधिक प्रेमा ॥ ९ ॥ पहिलिये बाळदशे । आई बाहिंचि[4] पिसें । तें सरे मग स्त्री मांसें[5] । भुलोनि ठाके ॥ ७१० ॥ मग स्त्री भोगितां थावो[6] । वृद्धाप्य लागे येवों । तेव्हां तोचि प्रेमभावो । बाळकासि आणी ॥ ११ ॥ आंधळें व्यालें जैसें । तैसा बाळें[7] पैरिसे । परि जीव मरे तों न त्रासे । विषयांसि जो ॥ १२ ॥ जाण तयाच्या ठायीं । अज्ञानासि पार नाहीं । आतां आणीक कांहीं । चिन्हें सांगों ॥ १३ ॥ तरि देहचि आत्मा । ऐसेया जो मनोधर्मा । वैळघोनियां कर्मा । आरंभ करी ॥ १४ ॥ आणि उणें कां पुरें । जें जें कांहीं आचरे । तयाचेनि आविष्कारें[8] । कुंथों लागे ॥ १५ ॥ डोइये[9] ठेविलेनि भोजें । देवलविसें[10] जेंवि[11] फुंजे । तैसा विद्यावयसा माजे । उताणा चाले ॥ १६ ॥ म्हणे मीचि एक अर्थी । माझ्याचि घरीं संपत्ती । माझी आचरती रीती । कोणा आहे ॥ १७ ॥ नाहीं माझेनि पाडें पाड । मी सर्वज्ञ एकचि रूढ[12] । ऐसा सर्व तुष्टीगंड[13] । घेऊनि ठाके ॥ १८ ॥ व्याधि लागलिया माणुसा । नयेचि भोग दाऊं जैसा । निके न साहे जो तैसा । [14]पुढिलांचें ॥ १९ ॥ पैं गुण[15] तेतुला खाय । स्नेह कीं जाळित जाय । जेथ ठेविजे तेथ होय । मसी ऐसें ॥ ७२० ॥ [16]जीवनें शिंपिला तिडिंपिडी । [17]वीजिलें[18] प्राण सांडी । लागला तरी कार्डी । उरों नेदी ॥ २१ ॥ [20]अळुमाळ प्रकाश करी । तेतुलेनीच उबारा धरी । तैसिया दीपाचिया परी । सुविद्य[21] जो ॥ २२ ॥ औषधाचेनि नांवें अमृतें[22] । जैसा नवज्वर आंबुथे[23] । कां विषचि होऊनि परते । सर्पा दूध ॥ २३ ॥ तैसा सद्गुणी मत्सर । व्युत्पत्ती अहंकार । तपोज्ञानें अपार । ताठा चढे ॥ २४ ॥ अंत्यज [24]राणिवे बैसविला । अजगरें[25] थोरण[26] गिळिला । तैसा गर्वें फुगला । देखसी जो ॥ २५ ॥ जो लाटणें ऐसा न लवे । पाथर तेंवि न द्रवे । गुणियांसि[27] नागवे । [28]फोडसें जैसें ॥ २६ ॥ किंबहुना तयापासीं । अज्ञान आहे वाढीसीं[29] । हें [30]निकरें गा तुजसीं । बोलत असों ॥ २७ ॥ आणीकही धनंजया । जो गृहदेह सामग्रिया । न देखे कालचेया[31] । जन्मातें गा ॥ २८ ॥ कृतघ्ना उपकार केला । कां चोरा व्यवहार[32] दिधला । निसुग[33] स्तविला । विसरे जैसा ॥ २९ ॥ वोडावला[34] लाविलें । तें तैसेंचि कान पुंस[35] वोलें । कीं पुढती वोढाळूं आलें । सुणें[36] जैसें ॥ ७३० ॥

---

१ तोंड फुटोन. २ कपट. ३ मृगजळाची. ४ वाहूंवर. ५ अंगबळें. ६ स्पर्शे. ७ चढोन. ८ आविर्भावानें. ९ डोईवर घेतलेल्या महत्वानें. १० पुजारी, देवर्षी. ११ अभिमान धरी. १२ प्रसिद्ध. १३ गर्व. १४ दुसऱ्याचें. १५ वात. १६ पाण्यानें. १७ तडतड करी. १८ वारा घातल्यानंतर. १९ स्पर्शला. २० किंचित्. २१ ज्ञानी. २२ दुधानें. २३ प्रकोपे. २४ राज्यावर. २५ अजगरानें. २६ वाळकें काष्ठ. २७ गारुड्यास, विषवैद्यास. २८ फुरसें. २९ वाढते दशेस. ३० निश्चयानें. ३१ पुढें होणाऱ्या किंवा गत जन्मातें. ३२ व्यापारास भांडवल. ३३ निर्लज्ज. ३४ ओढाळपण करितां. ३५ शेंपूट. ३६ कुत्रें.

बेडूक सापाचिया तोंडीं । जातसे सबुडबुडीं[1] । तो मक्षिकांचिया[2] कोडी । स्मरेना कांहीं ॥ ३१ ॥ तैसीं नैवद्वीं[3] द्वारें स्रवती । आंगीं देहाची लुँती[4] जिती । जेणें जाली तें चित्तीं । सलेना जया ॥ ३२ ॥ मातेच्या उदरकुहरीं[5] । सूनि विष्टेच्या दाथरीं[6] । जठरीं नवमासवरी । उकडला जें ॥ ३३ ॥ ते गर्भींची जे व्यथा । कां जें जालें उपजतां । तें कांहींचि सर्वथा । नाठवी जो ॥ ३४ ॥ मळमूत्रपंकीं[7] । जें लोळतें बाळ अंकीं[8] । देखोनि जो न थुंकी । त्रास नेघे ॥ ३५ ॥ कालचि ना जन्म गेलें । पाहेंच[9] पुढती आलें । ऐसें हें कांहीं वाटलें । नाहीं जया ॥ ३६ ॥ आणि पैं तयाचि परी । जीविताची फैरारी[10] । देखोनि जो न करी । मृत्युचिंता ॥ ३७ ॥ जिणेयाचेनि विश्वासें । मृत्यु एक एथ असे । हें जयाचेनि मानसें । मानिजेना ॥ ३८ ॥ अल्पोदकींचा मासा । हें नाटे[11] ऐसिया आशा । न वचेचि[12] कां जैसा । अगाध डोहां ॥ ३९ ॥ कां गोरीचिंयां[13] भुली । मृग व्याधा दृष्टी न घाली । गळ न पाहतां गिळिली । उंडी[14] मीनें ॥ ७४० ॥ दीपाचिया झगमगा[15] । जाळील हें पतंगा । नेणवेचि पैं गा । जयापरी ॥ ४१ ॥ गंवार[16] निद्रासुखें । घर जळत असे तें न देखे । नेणतां[17] जेवी विखें । रांधिलें अन्न ॥४२॥ तैसा जीविताचेनि मिषें । हा मृत्यूचि आला असे । हें नेणेचि राजसें[18] । सुखें जो गा ॥ ४३ ॥ शरीरींची वाढी । अहोरात्रांची जोडी । विषयसुखप्रौढी । साचचि मानी ॥ ४४ ॥ परि बापुडा ऐसें नेणें । जे वेश्येचें सर्वस्व[19] देणें । तेंचि तें नागावणें । रूप एथ ॥ ४५ ॥ संवचोरांचें साजणें[20] । तेंचि तें प्राण घेणें । लेपीं[21] स्नपन करणें । तेंचि नाश ॥ ४६ ॥ पांडुरोगें आंग सुटलें । तें तयाचि नांवें खुंटलें । तैसें नेणे भुले । आहारनिद्रा ॥ ४७ ॥ सन्मुख शूळा[22] । धांवतया पायें चपळा । प्रतिपदीं जवळा । मृत्यु जेवीं ॥ ४८ ॥ तेवि देहा जंव जंव वाढ । जंव जंव दिवसांचा पवाड । जंव जंव सुरवाड[23] । भोगाचा यया ॥ ४९ ॥ तंव तंव अधिकाधिकें । मरण आयुष्यातें जिंके । मीठ जेवि उदकें । [24]घांसिजत असे ॥ ७५० ॥ तैसें जीवित्व जाये । तयास्तव कोळातें[25] पाहे । हें हातोहातींचें न होये । ठाउवें जया ॥ ५१ ॥ किंबहुना पांडवा । हा आंगींचा मृत्यु नित्य नवा । न देखे जो मावा[26] । विषयांचिया ॥ ५२ ॥ तो अज्ञानदेशींचा रावो । या बोला महाबाहो । न पडे गा ठावो । आणिकांचा ॥ ५३ ॥ पैं जीविताचेनि तोषें । जैसा कां मृत्यु न देखे । तैसाचि तारुण्यें [27]पोखे । जरा न गणी ॥ ५४ ॥ कडाडीं[28] लोटला गाडा । कां शिखरौनि[29] सुटला धोंडा ॥

---

१ मुळासहित. २ कोटी. ३ मुख, मलद्वार, मूत्रद्वार, नेत्र २, कान २, नासारंध्रें २. ४ कुजलेली. ५ गर्भगुहेंत. ६ डकाडयांत. ७ चिखलांत. ८ मांडीवर. ९ उजाडतांच. १० ओढाताण. ११ आटणार नाहीं. १२ जाई. १३ पारध्याच्या गाण्यास. १४ मत्स्यानें. १५ प्रकाशानें. १६ मूर्ख. १७ खाई. १८ रजोगुणसुखानें. १९ तन मन धन अर्पण करणें. २० मैत्री. २१ मातीच्या चित्राला स्नान. २२ सुळाच्या. २३ अनुकूलता. २४ घांसलें जातें. २५ यमाला. २६ भुलीनें, कपटानें. २७ पुष्ट होई. २८ डोंगराच्या कडयावर. २९ शिखरापासून.

तैसा न देखे जो पुढां । वार्धक्य आहे ॥ ५५ ॥ कां आडवोहळा[1] पाणी आलें । कां जैसें ह्मसैयाचें[2] झुंझ मातलें । तैसें तारुण्याचें चढलें ॥ भैरें[3] जया ॥ ५६ ॥ पुष्टि लागे विरिरों[4] कांति पाहे निसरों[5] । मस्तक आदरी[6] शिरों- । भागीं कंप ॥ ५७ ॥ दाढी सौउळ[7] धरी । मान हालौनि वारी । तरी जो करी । मायेचा[8] पैसु ॥ ५८ ॥ पुढील उरीं[9] आदळे । तंव न देखे जेवि आंधळें । कां डोळयावरले निगळें । आळसी तोषे ॥ ५९ ॥ तैसें तारुण्य आजिचें । भोगितां वृद्धाप्य पैहिचें । न देखे तोचि साचें । अज्ञान गा ॥७६०॥ देखे अक्षमें[10] कुंब्जे[11] । कीं विटौवूं[12] लागे[13] फुंजें । परि न ह्मणे पौहें[14] माझें । ऐसेंचि होईल ॥ ६१ ॥ आणि आंगीं वृद्धतेची । संज्ञों[15] ये मरणाची । परि जया तारुण्याची । भुली न फिटे ॥ ६२ ॥ तो अज्ञानाचें घर । हें साचचि घे उत्तर । तेवींचि नारयेसीं थोर । चिन्हें आणिक ॥ ६३ ॥ तरि वाघाचिये अडवे[16] । एकवेळ आला चरोनि दैवें । तेणें विश्वासें पुढती धांवे । वैसूं[17] जैसा ॥ ६४ ॥ कां सर्पघरीं[18]आंत । अवचटें ठेवा आणिला स्वस्थ[19] । येतुलियासाठीं निश्चित । नास्तिक होय ॥ ६५ ॥ तसेंचि अवैवेंटें[20] हें । एकदोनी वेळांचि लाहे । एथ उरगैं[20] एक आहे । हें मानीना जो ॥ ६६ ॥ वैरिया निद आली । आतां[21] द्वंद्वें माझी सरलीं । हें मानी तो[22] सपिलीं । मुकला जेवीं ॥ ६७ ॥ तसी आहारनिद्रेची उजरी[23] । रोग निवांत जोंवरी । तंव जो न करी । व्याधींची चिंता ॥ । ६८ ॥ आणि स्त्रीपुत्रादिमेळें । संपत्ती जंव जंव फळे । तेणें रंजें[24] डोळे । जाता जयाचे ॥ ६९ ॥ सैवेळेंचि[25] वियोग पडेल । [26]विळौनि विपत्ति येईल । हें दुःखैं[27] पुढील । देखेना जो ॥ ७७० ॥ तो अज्ञान गा पांडवा । आणि तोही तोचि जाणावा । जो इंद्रियें अव्हासवा[28] । चारी एथ ॥ ७१ ॥ वैयसेचेनि[29] उँबायें[30] । संपत्तीचेनि सोंवायें[31] । सेव्यासेव्य[32] जाये । सैरकटित[33] ॥ ७२ ॥ न करावें तें करी । असंभाव्य[34] मनीं धरी । चितूं नये तें विचारी । जयाची मती ॥ ७३ ॥ रिघे जेथ न रिघावें । मागे जें न घ्यावें । स्पर्शे जेथ न लैगावें[35] । आंग मन ॥ ७४ ॥ न जावें तेथ जाये । न पहावें तें जो पाहे । न खावें तें खाये । तेवींचि तोषे ॥ ७५ ॥ न धरावा तो संग । न लगावें तेथ लाग । नाचरावा तो मार्ग । आचरे जो ॥ ७६ ॥ नायकावें तें आइके । न बोलावें तें[36] बके । परि दोष होतील हें न देखे । प्रवर्ततां ॥ ७७ ॥ आंगा मनासि रुचावें । येतुलेनि कृत्याकृत्य नाठवे । जो

---

१ आडरानांतल्या ओहळास. २ रेड्याचें. ३ वेड. ४ नाश पावूं. ५ मानेला. ६ पांढरेपण. ७ विस्तार. ८ गळतें घर. ९ उद्यांचें. १० अशक्त. ११ कुबड आलेलें. १२ वेडावूं. १३ फुगाव्यानें. १४ उद्यां. १५ वृद्धत्व हेंच मरणाची खूण. १६ रानांत. १७ पोळ. १८ बिळांतून. १९ अवचित्. २० सर्प. २१ भांडणें. २२ समूळ. २३ उत्कर्ष. २४ धुळीनें. २५ तात्काळ. २६ वेळानें. २७ दुःख. २८ पाहिजेतशीं. २९ तारुण्याच्या. ३० उत्कर्षानें. ३१ साह्यानें. ३२ धर्माधर्म. ३३ सरसकट मानी. ३४ न होणारें. ३५ स्पर्शूं नये. ३६ बडबडे.

करणेंयाचेनि नांवें । भलतेंचि करी ॥ ७८ ॥ परि पाप मज होईल । कां नरकयातना येईल । हें कांहींचि पुढील । देखेना जो ॥ ७९ ॥ तयाचेनि आंगलगें । जगीं अज्ञान दाटुगें । जें सज्ञानाहीसंगें । झोंबों सके ॥ ७८० ॥ परि असो हें आइक । अज्ञानचिन्हें आणिक । जेणें तुज सम्यक । जाणवेल ॥ ८१ ॥ तरि जयाची प्रीति पुरी । गुंतली देखसी घरीं । नवगंधकेसरीं । भ्रमरी जैसी ॥ ८२ ॥ साकरेचिया राशी । बैसली नुठे माशी । तैसेनि स्त्रीचित्त आवेशी । जयाचें मन ॥ ८३ ॥ ठेला बेडूक कुंडीं । मशक गुंतला शेंबुडीं । जैसा ढोर सेंबुडबुडीं । रुतला पंकीं ॥ ८४ ॥ तैसें घरींहूनि निघणें । नाहीं जीवें मनें प्राणें । जया साप होऊनि असणें । भाटीं तिये ॥ ८५ ॥ प्रियोत्तमाचिया कंठीं । प्रेमदा घे आंठी । तैसी जीवेंसी कोंपेटी । धरूनि ठाके ॥ ८६ ॥ मधुरसोद्देशें । मधुकर जंचे जैसें । गृहसंगोपन तैसें । करी जो गा ॥ ८७ ॥ ज्ञातारपणीं जालें । रेत एक विपाइलें । तयाचें कां जेतुलें । मातापितरां ॥ ८८ ॥ तेतुलेनि पाडें पार्था । घरीं जया प्रेमआस्था । आणि स्त्रीवांचूनि सर्वथा । जाणेना जो ॥ ८९ ॥ तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडोनियां सर्वभावें । कोण मी काय करावें । कांहीं नेणे ॥ ७९० ॥ महापुरुषाचें चित्त । जालिया वस्तुगत । ठाके व्यवहारजात । जयापरी ॥ ९१ ॥ हानी लज्जा न देखे । परापवाद नाइके । जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ॥ ९२ ॥ चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेचि छंदें नाचे । माकड गारुडियाचें । जैसें होय ॥ ९३ ॥ आपणपेंहीं शिणवी । इष्टमित्र दुखवी । मग कवडाचि वाढवी । लोभी जैसा ॥ ९४ ॥ तसा दानपुण्यें खांची । गोत्रकुटुंबा वंची । परि बोइणी स्त्रियेची । उणी हों नेदी ॥ ९५ ॥ पूजितीं देवतें जोगवी । गुरुतें बोलें झकवी । माय बापा दावी । निढारपण । ॥ ९६ ॥ स्त्रियेच्या तरी विखीं । भोगसंपत्ति अनेकीं । आणी वस्तु निकी । जे जे देखे ॥ ९७ ॥ प्रेमाथिलेनि भक्तें ॥ जैसेनि भजिजे कुळदैवतें । तैसा एकाग्रचित्तें । स्त्री जो उपासी ॥ ९८ ॥ साच आणि चोख । तें स्त्रियेसीचि अशेख । येरींविषयीं जोगावणूक । तेही नाहीं ॥ ९९ ॥ इयेतें हन कोणी देखेल इयेसी वेखासें जाईल । तरि युगचि बुडेल । ऐसें जया ॥ ८०० ॥ नायटया भेण । न मोडिजे नागांची आण । तैसी पाळी उणखुण । स्त्रियेची जो ॥ १ ॥ किंबहुना धनंजया । स्त्रीचि सर्वस्व जया । आणि

---

१ समागमानें. २ दांडगें. ३ सुवासिक कमळाच्या केसरांत. ४ राहिला. ५ समूळ. ६ ओसाड जमिनींत. ७ स्त्री. ८ मिठी. ९ खोंपट. १० मध मिळण्याच्या हेतूनें ११ जाच सोशी. १२ घराचें संरक्षण. १३ मूल. १४ एकुलतें. १५ सिद्धाचें. १६ ब्रह्मगत. १७ निंदा. १८ एकाकार. १९ कानें. २० आपल्यास्वतःस २१ धनच. २२ कमी करी. २३ वायदे. २४ झोंका देतो. २५ दारिद्रता. २६ आणतो. २७ चांगली. २८ प्रेमळ. २९ कसा तरी निर्वाह. ३० विरुद्ध. ३१ नायटा होईल त्या भयानें. ३२ मनोगत.

लागीं प्रेम ॥ २ ॥ आणीकही जें समस्त । तियेचें संपत्तिजात ।
न्नी जो कां ॥ ३ ॥ तो अज्ञानासी मूळ । अज्ञाना तेणें बळ ।
चि रूप ॥ ४ ॥ आणि मैातलिया सागरीं । मोकळिलिया तरी ।
गांडोळे जेवीं ॥५॥ तेवि प्रियवस्तु पावे । आणि सुखें जो उंचावे ।
तैळवट घे ॥ ६ ॥ ऐसेनि जयाचे चित्तीं । वैषम्याची वोळखती ।
तान गा ॥७॥ आणि माझ्याठायीं भक्ती । फळालागीं जया आर्ती ।
णें जेवीं ॥ ८ ॥ ना तरी कांताच्या मानसीं । रिगोनि स्वैरिणी
। जावयालागीं ॥ ९ ॥ तैसा मातें किरीटी । भजती गा पाँडवी ।
धे सूये ॥ ८१० ॥ आणि भजिनलियासवें । तोचि विषय जरी न
आघवें । टवाळ हें ॥ ११ ॥ कुणबट कुळवाडी । तैसा आन आन
री पैरवडी । करी तया ॥ १२ ॥ तया गुरुमार्गा टेंके । जयाचा
याचा मंत्र शिके । थेर नेघे ॥ १३ ॥ प्राणिजातेंसी निष्ठुर । स्थावरीं
ीं ऐकसर । निर्वाह जया ॥ १४ ॥ माझी मूर्ती निफजवी । ते घराचे
। देवो देवीं । यात्रे जाय ॥ १५ ॥ नित्य आराधन माझें । कांजीं
वे शेषें कीजे । पूजा आना ॥ १६ ॥ माझें अधिष्ठान घरीं । आणि
री । पितृकार्यावसरीं । पितरांचा होय ॥ १७ ॥ एकादशीच्या
आह्मासीं । तेतुलाचि नागांसीं । पंचमीच्या दिवशीं ॥१८॥ चौथें
गणेशाचाचि होये । चौउदसी ह्मणे माये । तुझाचि वो दुर्गे ॥ १९ ॥
सांडी । मग बैसे नवचंडी । आदित्यवारीं वाढी । बहिरवां पात्रीं
दार पावे । आणि बेलेंसीं लिंगा धांवे । ऐसा एकलाचि आघवे ।
सा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी । अवघेन गांवद्वारीं ।
ऐसेनि जो भक्त । देखसी सैरा धांवत । जाण अज्ञानाचा मूर्त ।
। आणि एकांतें चोखटें । तपोवनें तीर्थें तटें । देखोनि जो गा
२४ ॥ जया जनपदीं सुख । गजबजेचें कवतिक । वानूं आवडे
चे ॥ २५ ॥ आणि आत्मा गोचर होये । ऐसी जे विद्या आहे ।
चाहे । विद्वांसू जो ॥ २६ ॥ उपनिषदांकडे न वैंचे । योगशास्त्र

---

खवळलेल्या. ३ होडी ४ लघुत्व. ५ चिंता. ६ व्यभिचारिणी. ७ कामना-
९ प्रकार. १० सुगरपण. ११ एकनिष्ठपणा. १२ कार्यासाठीं. १३ दुस-
१५ नवस. १६ श्राद्धकालीं. १७ चतुर्थी. १८ चतुर्दशीच्या दिवशीं.
दे. २० सेवी. २१ सर्वप्रकारें. २२ अखंडसौभाग्यवती, वेश्या. २३ स्वेच्छा.
ठ्याचें वाजविण्याचें वाद्य, तद्वत् बडबड करतो. २६ वळे.

न रुचे । अध्यात्मज्ञानीं जयाचें । मनचि नाहीं ॥ २७ ॥ [1]आत्मचर्चा एकीं आथी । ऐसिये बुद्धीची भिंती । पाडूनि जयाची मती । वोढाळ जाहाली ॥ २८ ॥ कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें । ज्योतिषीं तो ह्मणे । तैसेंचि होय ॥ २९ ॥ [2]शिल्पीं अति निपुण । [3]सूपकर्मींही प्रवीण । विधि [4]आथर्वण । हातीं आथी ॥ ८३० ॥ [5]कोकीं नाहीं ठेलें । भारत कीर ह्मणितलें । आगम [6]आपैविले । मूर्त होती ॥ ३१ ॥ नीतिजात [7]सुंझे । वैद्यकही बुझे । काव्यनाटकीं दुजें । चतुर नाहीं ॥ ३२ ॥ स्मृतींची चर्चा । [8]दंशीं जाणे गारुडींचा । [9]निघंटु प्रज्ञेचा । पाइकी करी ॥ ३३ ॥ पैं व्याकरणीं [10]चोखडा । तर्कीं अतिगाढा । परि एक आत्मज्ञानीं फुंडा । जात्यंध जो ॥ ३४ ॥ तें एकवांचूनि आघवां शास्त्रीं । सिद्धांत [11]निर्माणधात्री । परि जळो तें [12]मूळनक्षत्रीं । न पाहें गा ॥ ३५ ॥ मोरा आंगीं अशेषें । पिसें असती [13]डोळसें । परि एकली दृष्टी नसे । तैसें तें गा ॥ ३६ ॥ जरी परमाणुएवढें । [14]संजीवनीमूळ जोडे । तरि बहु काय गाडे । भरणें येरें ॥ ३७ ॥ आयुष्यावीण लक्षणें । [15]सिसेंवीण अळंकरणें । [16]वोहरेंवीण [17]बोधावणें । तो [18]विटंबु गा ॥ ३८ ॥ तैसें शास्त्रजात जाण । आघवेंचि अप्रमाण । पार्था अध्यात्मज्ञानेंविण । एकलेनी ॥ ३९ ॥ यालागीं अर्जुना पाहीं । अध्यात्मज्ञानाच्याठायीं । जया नित्यबोध नाहीं । शास्त्रमूढा ॥ ८४० ॥ तया शरीर जें जालें । तें अज्ञानाचें बीं [19]वीरूढलें । तयाचें [20]व्युत्पन्नत्व गेलें । [21]अज्ञानवेलीं ॥ ४१ ॥ तो जें जें बोले । तें अज्ञानचि फुललें । तयाचें पुण्य जें फळलें । तें अज्ञान गा ॥ ४२ ॥ आणि अध्यात्मज्ञान कांहीं । जेणें मानिलेंचि नाहीं । तो ज्ञानार्थ न देखे काई । हें बोलावें असे ॥ ४३ ॥ ऐलीचि थडी न पवतां । पळे जो माघौता । तया [22]पैलद्वीपींची वार्ता । काय होय ॥ ४४ ॥ कां [23]दारवंठाचि जयाचें । शीर रोंविलें [24]खोंचे । तो केंवि [25]परिवरींचें । ठेविलें देखे ॥ ४५ ॥ तेविं अध्यात्मज्ञानी जया । अनोळख धनंजया । तया ज्ञानार्थ देखावया । [26]विषो काई ॥ ४६ ॥ ह्मणोनि आतां विशेषें । तो ज्ञानाचें तत्त्व न देखे । हें सांगावें [27]आंखेंलेखें । न लगे तुज ॥ ४७ ॥ जेव्हां सगर्भ वाढिलें । तेव्हांचि पोटिचें धालें । तैसें मागिले पदें बोलिलें । तेंचि होय ॥ ४८ ॥ वांचूनियां वेगळें । रूपकरणें हें न मिळे । जेविं [28]अवंतिलें आंधळें । तें दुजेनसीं ये ॥ ४९ ॥ एवं [29]इयें उपरतीं । ज्ञानचिन्हें मागुती । अमानित्वादि प्रभृती । वाखाणिलीं ॥८५०॥ जे

---

१ आत्मानात्मनिरूपण. २ कलाकौशल्यांत. ३ पाककर्मांत. ४ अथर्वण वेदांत सांगितलेली. ५ कामशास्त्रांत. ६ आपलेसे केले. ७ समजे. ८ मर्म. ९ कोश. १० खरा. ११ पृथ्वीतुल्य आधारभूत. १२ मूळनक्षत्रीं जन्मल्याप्रमाणें. १३ नेत्राकार. १४ मृतसंजीवनीची मुळी. १५ मस्तकावांचून. १६ वधुवरांशिवाय. १७ वाजंत्रें वाजविणें. १८ फजीती. १९ वाढलें. २० शास्त्रज्ञान. २१ अज्ञानरूप वेलीवर. २२ परतीराची. २३ उंबऱ्यांतच. २४ दडपलें. २५ आवारांतलें, घरींचें. २६ गम्य. २७ फार विस्तारें. २८ आमंत्रणानें बोलाविलें. २९ या उलटरीत्या.

ज्ञानपदें अठरा । केलियां येरी[1] मोहरां । अज्ञान या आकारा । सहजें येती ॥ ५१ ॥ मागां श्लोकाचेनि अर्धार्धें । ऐसें सांगितलें श्रीमुकुंदें । ना उफराटीं इयें ज्ञानपदें । तेंचि अज्ञान ॥ ५२ ॥ ह्मणोनि ईया वाहणी । केली म्यां उपलवणी[2] । वांचूनि दुधा मेळऊनि पाणी । फार कीजे काई ॥ ५३ ॥ तैसें जी न बडबडीं । पदाची कोर[3] न सांडीं । मूळध्वनीचिये वाढीं । निमित्त जाहालों ॥ ५४ ॥ तंव श्रोते ह्मणती राहें । कें परिहारा[4] ठाव आहे । बिहिसी[5] कां वायें । कविपोषका ॥ ५५ ॥ तूतें श्रीमुरारी । ह्मणितलें प्रकट करीं । जे अभिप्राय गव्हरीं[7] । झांकिले आह्मी ॥ ५६ ॥ तें देवाचें मनोगत । दावित आहासी तूं मूर्त । हेंही ह्मणतां चित्त । दाटेल[8] तुझें ॥ ५७ ॥ ह्मणोनि असो हें न बोलों । परि सांविया[9] गा तोषलों । जे ज्ञानतरिये[10] मेळविलों । श्रवणसुखाचे ॥ ५८ ॥ आतां इयावरी । जे तो श्रीहरी । बोलिला तें करीं । कथन वेगां ॥ ५९ ॥ इया संतवाक्यास-रिसें । ह्मणितलें निवृत्तिदासें । जी अवधारा तरी ऐसें । बोलिलें देवें ॥ ८६० ॥ ह्मणती तुवां पांडवा । हा चिन्हसमुच्चय[11] आघवा । आयिकिला तो जाणावा । अज्ञानभाग ॥ ६१ ॥ इया अज्ञानभागा । पाठी देऊनि पैं गा । ज्ञानविखीं चांगा । दृढा होइजे ॥ ६२ ॥ मग निर्वाळिलेनि[12] ज्ञानें । ज्ञेय[13] भेटेल मनें । तें जाणावया अर्जुनें । आस केली ॥ ६३ ॥ तंव सर्वज्ञांचा रावो । ह्मणे जाणोनि तयाचा भावो । परिसें ज्ञेयाचा अभिप्रावो । सांगों आतां ॥ ६४ ॥

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥

तरि ज्ञेय ऐसें ह्मणणें । वस्तु तें येणेंचि कारणें । जें ज्ञानेंवांचूनि कवणें । उपाया नये ॥ ६५ ॥ आणि जाणितलेंयांवरौतें । कांहीं करणें नाहीं जेथें । जाणणेंचि तन्मयातें[14] । आणि जयाचें ॥ ६६ ॥ जें जाणितलेयांसाठीं । संसार काढूनियां कांटीं[15] । जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाच्या ॥ ६७ ॥ तें ज्ञेय गा ऐसें । आदि[17] जया नसे । परब्रह्म आपैसें । नाम जया ॥ ६८ ॥ जें नाहीं ह्मणों जाइजे । तंव विश्वाकारें देखिजे । आणि विश्वचि ऐसें ह्मणिजे । तरि हे माया ॥ ६९ ॥ रूप वर्ण व्यक्ति[18] । नाहीं दृश्य द्रष्टा स्थिती[19] । तरि कोण कैसें आथी । ह्मणावें पां ॥ ८७० ॥ आणि साचचि जरी नाहीं । तरि महदादि कोणेठाईं । स्फुरत[20] कैंचें काई । तेणेंविण असे ॥ ७१ ॥ ह्मणोनि आथी नाथी हे बोली ।

---

१ दुसऱ्या पक्षाकडे. २ अशा प्रकारें. ३ विस्तार. ४ कांठ. ५ निरास करण्याला. ६ व्यर्थ भितोस. ७ गुप्तस्थळीं. ८ भरून येईल. ९ सर्वथा. १० ऐकण्यास सुखकारक अशी ज्ञाननौका आह्मांस प्राप्त झाली. ११ समुदाय. १२ शुद्ध. १३ जाणण्यास योग्य वस्तु. १४ तदाकारतेस. १५ जाणलें असतां. १६ संसाराला कांटीं लावून. १७ आरंभ. १८ मूर्ति. १९ असणेपणा. २० भासमान.

जें देखोनि मुक्ती जाहाली । विचाराची मोडली । वाट जेथें ॥ ७२ ॥ जैसी भांडघटशरावीं । तदाकार असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वी । असें जे वस्तु ॥ ७३ ॥

**सर्वतःपाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥**

आघवांचि[१] देशीं काळीं । नव्हतां[२] देशकाळांवेगळी । जे क्रिया स्थूळास्थूळीं । तेचि हात जयाचे ॥ ७४ ॥ तयातें याकारणें । विश्वबाहु[४] ऐसें ह्मणणें । जे सर्वचि सर्वपणें । सर्वदा करी ॥ ७५ ॥ आणि समस्तांही ठायां । एकेकाळीं धनंजया । आलें असे ह्मणोनि जया । विश्वांघ्रि[४] नाम ॥ ७६ ॥ पैं सवितया[५] आंग डोळे । नाहींत वेगळे वेगळे । तैसें सर्वद्रष्टें[६] सकळें । स्वरूपें जें ॥ ७७ ॥ ह्मणोनि विश्वतश्चक्षु[७] । हा अचक्षूच्याठायीं पक्षु । बोलावया दक्षु[८] । जाहाला वेद ॥ ७८ ॥ जें सर्वांचे शिरावरी । जें नित्य नांदे सर्वांपरी[९] । ऐसियें स्थितीवरीं । विश्वमूर्धा ह्मणिपे ॥ ७९ ॥ पैं गा मूर्ति तेंचि मुख । हुताशना[१०] जैसें देख । तैसें सर्वपणें अशेख । भोक्ते जें ॥ ८० ॥ यालागीं तया पार्था । विश्वतोमुख[११] हे व्यवस्था । आली वाक्पथा[१२] । श्रुतीचिया ॥ ८१ ॥ आणि वस्तुमात्रीं गगन । जैसें असे संलग्न[१३] । तैसें शब्दजातीं कान । सर्वत्र जया ॥ ८२ ॥ ह्मणोनि आह्मी तयातें । ह्मणों सर्वत्र आइकतें[१४] । एवं जें सर्वातें । आवरूनि असे ॥ ८३ ॥ येऱ्हवीं तरी महामती । विश्वतश्चक्षु इया श्रुती । तयाचिये व्याप्ति । रूप केलें ॥ ८४ ॥ वांचूनि हस्त नेत्र पाये । हे भाष तेथ कें आहे । सर्व शून्यत्वाचा साहे । निष्कर्ष[१५] जें ॥ ८५ ॥ पैं कल्लोळातें[१६] कल्लोळें । ग्रसिजत असे ऐसें कळे । परि ग्रसितें ग्रासावेगळें । असे काई ॥ ८६ ॥ तैसें साचचि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक । परि बोलावया नावेक[१७] । करावें लागे ॥ ८७ ॥ पैं शून्य जैं दावावें जाहालें । तैं बिंदुलें[१८] एक केलें । तैसें अद्वैत सांगावें बोलें । तें द्वैत कीजे ॥ ८८ ॥ येऱ्हवीं तरी पार्था । गुरुशिष्यसत्पथा[१९] । आडळ[२०] पडे सर्वथा । बोल खुंटे ॥ ८९ ॥ ह्मणोनि गा श्रुती । द्वैतभावें अद्वैतीं । निरूपणाची वाहती । वाट केली ॥ ९० ॥ तेंचि आतां अवधारीं । इये नेत्रगोचरें[२१] आकारीं । तें ज्ञेय गा जयापरी । व्यापक असे ॥ ९१ ॥

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥**

तरि तें गा किरीटी ऐसें । अवकाशीं[२२] आकाश जैसें । पटीं पट होऊनि असे । तंतु

---

१ डेरा, घागर, परळ इत्यादिकांत. २ सदासर्वकाळ आणि सर्वत्र. ३ न होता. ४ ज्याचे पाय सर्वत्र आहेत. ५ सूर्याला. ६ सर्व पाहणारें. ७ सर्वत्र डोळे असणारा. ८ शहाणा. ९ सर्वप्रकारें. १० अग्नीला. ११ सर्वत्र तोंडें आहेत असा. १२ बोलण्यांत. १३ ओतप्रोत भरलेलें. १४ ऐकणारें. १५ सिद्धांत. १६ तरंगाला. १७ क्षणभर, उगाच. १८ वर्तुळ. १९ गुरुशिष्यसंप्रदायांत. २० आडखीळ. २१ डोळ्यानें दिसणारें. २२ पोकळ जागेंत.

जेवीं ॥ ९२ ॥ उदक होऊनि उदकीं । रस जैसा अवलोकीं । दीपपणें दीपकीं । तेज जैसें ॥ ९३ ॥ कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य[1] असे जयापरी । शरीर होऊनि शरीरीं । कर्म[2] जेवीं ॥ ९४ ॥ किंबहुना जैसें पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा । तैसें जें या सर्वा । सर्वांगीं असे ॥ ९५ ॥ परि असे रवेपणा[3]माजिवडें । तंव रवा ऐसें आवडे[4] । वांचूनि सोनें सांगडें[5] । सोनया जेवीं ॥ ९६ ॥ पैं गा वोघचि वांकुडा । परि पाणी उजू सुहाडा[6] । वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे कीं ॥९७॥ घटाकारें वेंटाळे । तेथ नभ गमे वाटोळें । मठीं तरी चौफळें[7] । आयें दिसे ॥ ९८ ॥ परि ते अवकाश जैसें । नोहिजतीचि आकाशें । जें विकार होऊनि तैसें । विकारी नोहे ॥ ९९ ॥ मनमुख्य इंद्रियां । सत्वादिगुणां ययां । सारिखें ऐसें धनंजया । आवडे कीर ॥१००॥ पैं गुळाची गोडी । नोहे बांधेया सांगडी । तैसीं गुण इंद्रियें फुडीं । नाहीं तेथ ॥१॥ अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे । परि क्षीरचि नोहे जैसें । कपिध्वजा ॥ २ ॥ तैसें जें इये विकारीं । विकार नोहे अवधारीं । पैं आकारा नाम [10]भोंवरी । येर सोनें तें सोनें ॥ ३ ॥ इया उघड मऱ्हाटिया । तें वेगळेपण धनंजया । जाण गुणइंद्रियां । पासोनियां ॥ ४ ॥ नामरूपसंबंध । जातिक्रियाभेद । हा आकारासीच प्र[11]वाद । वस्तूसि नाहीं ॥ ५ ॥ तें गुण नव्हे कहीं । गुणा तया संबंध नाहीं । परि तयाच्याचि ठाईं । आ[12]भासती ॥ ६ ॥ येतुलेयासाठीं । सं[13]भ्रांताच्या पोटीं । ऐसें जाय किरीटी । जे हेंचि धरी ॥ ७ ॥ तरि तें गा धरणें ऐसें । अभ्रातें जावें आकाशें । कां प्रति[14]वेंदन जैसें । आरसेनी ॥ ८ ॥ ना तरी सूर्य प्रतिमंडळ । जैसेनि धरी सलिल । कां रश्मि[15]करीं मृगजळ । धरिजे जेवीं ॥ ९ ॥ तैसें गा संबंधेंविण । यया सर्वांतें धरी निर्गुण । [16]परि तें वायां जाण । मिथ्या[17]दृष्टीं ॥ ११० ॥ आणि यापरी निर्गुणें । गुणातें भोगणें । रंका राज्य करणें । स्वप्नीं जैसें ॥ ११ ॥ ह्मणोनि गु[18]णाचा संग । अथवा गुणभोग । हा निर्गुणीं लाग । बोलों नये ॥ १२ ॥

बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥

जें चरा[19]चरभूतां- । माजि असे पांडुसुता । नाना वन्हीं उष्णता । अभेदें जैसी ॥ १३ ॥ तैसेनि अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें । व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ ॥ १४ ॥ जें एक आंत बाहेरी । जें एक जवळ दुरी । जें एकवांचूनि परी । दुजी नाहीं

---

१ सुगंध. २ क्रिया. ३ तुकड्यामध्यें. ४ वाटे. ५ समागमें. ६ हे सुहृदा. ७ चतुष्कोणाकार. ८ नाश पावती. ९ डेपीएवढी. १० बुगडी, बाजुबंद. ११ लौकिकसंज्ञा. १२ भासमान होतात. १३ अज्ञानाच्या. १४ मुखाचें प्रतिबिंब. १५ सूर्यकिरणांमुळें. १६ परंतु व्यर्थ आहे असें समज. १७ भ्रामकदृष्टीमुळें. १८ सत्व, रज, तम, या तीन गुणांचा. १९ स्थावरजंगम.

॥ १५ ॥ क्षीरसागरींची गोडी । माजि बहू थडिये थोडी । हें नाहीं तैया परवडी । पूर्ण जें गा ॥ १६ ॥ स्वेदजप्रभृती । वेगळाल्या भूतीं । जयाचिये अनुस्यूती । खोमणें नाहीं ॥ १७ ॥ पैं श्रोतमुख्यटिळका । घटसहस्रा अनेका- । माजि बिंबोनि चंद्रिका । न भेदे जेवीं ॥ १८ ॥ नाना लवणकणाचिये राशी । क्षारता एक जैसी । कां कोडी एकीं उसी । एकचि गोडी ॥ १९ ॥

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥

तैसें अनेकीं भूतजातीं । जें आहे एकी व्याप्ती । विश्वकार्या सुमती । कारण जें गा ॥ ९२० ॥ ह्मणोनि हा भूताकार । जेथूनि तेंचि तैया आधार । कल्लोळ सागर । जियापरी ॥ २१ ॥ बाल्यादि तीन्हीं वयसीं । काया एकचि जैसी । तैसें आदिस्थितिग्रासी । अखंड जें ॥ २२ ॥ सायंप्रातर्मध्यान्ह । होतां जातां दिनमान । जैसें कां गगन । पालटेना ॥ २३ ॥ अगा सृष्टीवेळे प्रियोत्तमा । जया नाम ह्मणती ब्रह्मा । स्थिती जें विष्णुनामा । पात्र जाहालें ॥ २४ ॥ मग आकार हा हारपे । तेव्हां रुद्र जें ह्मणिपे । तेही गुणत्रय जेव्हां लोपे । तें जें शून्य ॥ २५ ॥ नभाचें शून्यत्व गिळून । गुणत्रयातें नुरउन । तें शून्य तें महाशून्य । श्रुतिवचनसंमत ॥ २६ ॥

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥

जें अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन । सूर्याचे नयन । देखती जेणें ॥ २७ ॥ जयाचे उजियेडें । तारागण उघडे । महातेज सुरवाडें । राहाटे जेणें ॥ २८ ॥ आदीचें जें आदी । वृद्धीची जें वृद्धी । बुद्धीची जें बुद्धी । जीवाचा जीव ॥ २९ ॥ जें मनाचें मन । जें नेत्राचें नयन । कानाचे कान । वाचेची वाचा ॥ ९३० ॥ जें प्राणाचा प्राण । जें गतीचे चरण । क्रियेचें कर्तेपण । जयाचेनी ॥ ३१ ॥ आकार जेणें आकारे । विस्तार जेणें विस्तारे । संहार जेणें संहारे । पांडुकुमरा ॥ ३२ ॥ जें मेदिनीची मेदिनी । जें पाणी पिऊनि असे पाणी । तेजा दिवेलावणी । जेणें तेजें ॥ ३३ ॥ जें वायूचा श्वासोश्वास । जें गगनाचा अवकाश । हें असो आघवाचि भास । आभासे जेणें ॥ ३४ ॥ किंबहुना पांडवा । जें आघवेंचि असे आघवा । जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी ॥३५॥ जें देखिलियाचिसवें ।

१ मध्यें. २ त्या रीतीनें. ३ घामापासून उत्पन्न झालेला जीव. ४ व्याप्तीस. ५ कमीपणा. ६ मठि. ७ खारटपणा. ८ कोटयावधि उसांत. ९ हेतु. १० भूताकाराला. ११ उत्पत्तिस्थितिसंहारीं. १२ ब्रह्म. १३ प्रकाशक. १४ वेदानें सांगितलेले. १५ सुखानें. १६ नाश. १७ पृथ्वी.

दृश्य द्रष्टा हें आघवें । एकवट कालवे । [1]सामारस्यें ॥ ३६ ॥ मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन । जेणें [2]गमिजे स्थान । तेंहि तेंचि ॥ ३७ ॥ जैसें सरलियां लेखें[3] । आंख होती एक । तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ॥ ३८ ॥ अर्जुना जियेठाईं । न सरे द्वैताची [4]वेंही । हें असो जें हृदयीं । सर्वांच्या असे ॥ ३९ ॥

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।

मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

एवं हें तुजपुढां । आदीं क्षेत्र सुहाडा[5] । दाविलें [6]फाडोवाडां । विवंचुनी ॥९४०॥ तैसेंचि क्षेत्रापाठीं । जैसेनि देखसी दिठी । तैसें ज्ञानही किरीटी । सांगीतलें ॥ ४१ ॥ अज्ञानाही कौतुकें । रूप केलें निकें । जंव [7]आयणी तुझी टेंकें[8] । पुरे ह्मणें ॥ ४२ ॥ आणि आतां हें रोकडें । उपपत्तीचेनि [9]पवाडें । निरूपिलें उघडें । ज्ञेय पैं गा ॥ ४३ ॥ हे आघवीच विवंचना । बुद्धी भरोनि अर्जुना । मत्सिद्धि[10]भावना । माझिया[11] येती ॥ ४४ ॥ देहादिपरि-[12]ग्रहीं । संन्यास करूनियां जिहीं । जीव माझ्याठाईं । वृत्तिकें[13] केला ॥ ४५ ॥ ते मातें किरीटी । हेंचि जाणोनियां शेवटीं । [14]आपणपयां साटोवाटी । मीचि होती ॥ ४६ ॥ मीचि [15]होती परी । हे मुख्य गा अवधारीं । सोहोपी सर्वांपरी । रचिली आह्मी ॥ ४७ ॥ कडां पायरी कीजे । निराळीं माच बांधिजे । [16]अथावीं सुइजे । तरी जैसी ॥ ४८ ॥ येऱ्हवीं आघवेंचि आत्मा । हें सांगोनि वीरोत्तमा । परी तुझिया मनोधर्मा । मिळेल ना ॥ ४९ ॥ ह्मणोनि एकचि संचलें । चतुर्धा आह्मीं केलें । जें [17]अंदळपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ॥९५०॥ पैं बाळ जैं जेवविजे । तैं घांस एक विसां ठायीं कीजे । तैसें एकचि हें [18]चतुर्व्याजें । कथिलें आह्मी ॥ ५१ ॥ एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान । भाग केले अव-धान । जाणोनि तुझें ॥ ५२ ॥ आणि ऐसेनही पार्था । जरी हा अभिप्रावो तुज होता । नये तरी हे व्यवस्था । एक वेळ सांगों ॥ ५३ ॥ आतां चौंठायीं न करूं । एकही ह्मणोनि [19]नें सरूं । आत्मानात्मया धरूं । सरिसाचि पाड ॥ ५४ ॥ परि तुवां येतुलें करावें । मागों तें आह्मा देआवें । जे कानाचें नांव ठेवावें । आपणपयातें ॥ ५५ ॥ या श्रीकृष्णाचिया बोला । पार्थ रोमांचित जाहाला । तेथ देव ह्मणती भला । [20]उचंबळें ना ॥ ५६ ॥ ऐसेनि तो येतां वेग । धरूनि ह्मणे श्रीरंग । प्रकृतिपुरुषविभाग । परिसें सांगों ॥ ५७ ॥ जया

---

१ ब्रह्मरूपांत. २ जाणावें, पावावें. ३ गणना. ४ प्रतिबंध. ५ प्रियमित्रा. ६ स्पष्टपणानें. ७ इच्छा. ८ विश्रांति पावे. ९ विस्तारानें. १० माझ्या प्राप्तीच्या भावनेनें. ११ मद्भक्ताला. १२ परिवारगणांत. १३ वतनदार. १४ आपल्या मोबदल्यानें, विनियोगानें. १५ होण्याचा प्रकार. १६ खोल पाण्यांत नौका घालावी. १७ अल्पता, अदृढता. १८ चार प्रकारेंकरून. १९ न मानूं. २० तटस्थ झाला.

मार्गातें जगीं । सांख्य ह्मणती योगी । जयाचिये आटिवेलागीं । मी कापिल जाहालों ॥५८॥ तो आईक निर्दोख । प्रकृतिपुरुषविवेक । ह्मणे आदिपुरुख । अर्जुनातें ॥ ५९ ॥

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥**

तरी पुरुष अनादि आथी । आणि तेंचिलागोनि प्रकृती । सवें सरिसी दिवोराती । जयापरी ॥ ९६० ॥ कां रूप नोहे वायां । परी रूपा लागली छाया । निकण वाढे धनंजया । कणेसीं कोंडा ॥ ६१ ॥ तैसीं जाण जैवटें । दोन्हीं इयें एकवटें । प्रकृतिपुरुषें प्रकटें । अनादिसिद्धें ॥ ६२ ॥ पैं क्षेत्र येणें नांवें । जें सांगीतलें आघवें । तेंचि एथ जाणावें । प्रकृति हे गा ॥ ६३ ॥ आणि क्षेत्रज्ञ ऐसें । जयातें ह्मणितलें असे । तो पुरुष हें अनादिसें । न बोलों येई ॥ ६४ ॥ इयें आनानें नांवें । परि निरूप्य आन नोहे । हें लक्षण न चुकावें । पुढतपुढती ॥ ६५ ॥ तरी केवळ हे सत्ता । तो पुरुष गा पांडुसुता । प्रकृतीतें समस्तां । क्रिया नाम ॥ ६६ ॥ बुद्धि इंद्रियें अंतःकरण । इत्यादि विकारभरण । आणि ते तीन्ही गुण । सत्वादिक ॥ ६७ ॥ हा आघवाचि मेळावा । प्रकृति जाहाला जाणावा । हेचि हेतु संभवा । कर्मांचिया ॥ ६८ ॥

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥**

तेथ इच्छा आणि बुद्धी । घडवी अहंकारेंसीं आधीं । मग तिया लाविती वेधीं[10] । कारणाच्या ॥ ६९ ॥ तेंचि कारण ठाकावया । जें सूत्र धरणें उपाया । तया नांव धनंजया । कार्य पैं गा ॥ ९७० ॥ आणि इच्छामदाचेनि थावीं । लागली मनातें उठवी । तें इंद्रियें रहाटवी । हें कर्तृत्व पैं गा ॥ ७१ ॥ ह्मणोनि तीन्ही या जाणा । कार्य कर्तृत्व कारणा । प्रकृती मूळ हें राणा । सिद्धांचा ह्मणे ॥ ७२ ॥ एवं तिहींचेनि संमवायें । प्रकृति कर्मरूप होये । परि जया गुणा वाढे त्रायें । तयाचि सारिखी ॥ ७३ ॥ जें सत्वगुणें अधिष्ठिजे । तें सत्कर्म ह्मणिजे । रजोगुणें निपजे । मध्यम तें ॥ ७४ ॥ जे कां केवळ तमें । होती जियें कर्में । निषिद्धें[16] अधर्में । जाण तियें ॥ ७५ ॥ ऐसेनि संतासंतें । कर्म प्रकृतीस्तव होतें । तयापासोनी निर्वाळतें । सुख दुःख गा ॥ ७६ ॥ असंतीं दुःख उपजे । सत्कर्मीं सुख निफजे । तया दोहींचा बोलिजे । भोग पुरुषा ॥ ७७ ॥ सुखदुःखें जंववरी ।

१ वर्णनासाठीं. २ तेव्हांपासून. ३ कणरहित. ४ जोड गव्हासारखीं, जुळीं. ५ वेगळें. ६ न बोलतां येई. ७ वेगळाल्या. ८ कारण. ९ कर्मांच्या उत्पत्तीस. १० नादीं. ११ उन्मत्ततेच्या आश्रयानें. १२ एकत्रपणानें. १३ क्रियारूप. १४ आश्रय. १५ त्या गुणासारखी. १६ अशास्त्रीय. १७ सत् असत्. १८ निवडलें जातें.

नेफजती साचोकारीं । तंव प्रकृति उद्यम करी । पुरुष भोगी ॥ ७८ ॥ प्रकृतिपुरुषांची कुळवाडी । सांगतां असंगडी । जे आंबुली जोडी । आंबुला खाय ॥ ७९ ॥ आंबुलिया आंबुलिये । संगती ना सोये । कीं आंबुलि जग विये । चोज ऐका ॥ ९८० ॥

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

जे अनंग तो पेंधा । निकेवडा नुसधा । जीर्ण अतिवृद्धा । पासूनि वृद्ध ॥ ८१ ॥ तया आडनांव पुरुष । येऱ्हवीं स्त्री ना नपुंसक । किंबहुना एक । निश्चयो नाहीं ॥ ॥ ८२ ॥ तो अचक्षु अश्रवण । अहस्त अचरण । रूप ना वर्ण । नाम आथी ॥ ८३ ॥ अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्तार पाहीं । कीं भोगणें ऐसयाही । सुखदुःखाचें ॥ ८४ ॥ तो तरी अकर्ता । उदास अभोक्ता । परि इया पतिव्रता । भोगविजे ॥ ८५ ॥ जियेतें अळुमाळ । रूपागुणाचा चाळढाळ । ते भलतैसाही खेळ । लेखा आणी ॥ ८६ ॥ इये प्रकृती तंव । गुणमयी हेंचि नांव । किंबहुना सोवेव । गुण तेचि हे ॥ ८७ ॥ हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आघवी । जडातेंही माजवी । इयेचा माज ॥ ८८ ॥ नामें इये प्रसिद्धें । स्नेह इया स्निग्धें । इंद्रियें प्रबुद्धें । इयेचेनी ॥ ८९ ॥ कायि मन हें नपुंसक । कीं तें हिंडवी तिन्ही लोक । ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ॥ ९९० ॥ हे भ्रमाचें महाद्वीप । हे व्याप्तीचें रूप । विकार उमप । इया केले ॥ ९१ ॥ हे कामाची मांडवी । हे मोहवनींची माधवी । इये प्रसिद्धाचि देवी । माया हें नाम ॥ ९२ ॥ हे वाङ्मयाची वाडी । हे साकारपणाची जोडी । प्रपंचाची धोंडी । अभंग हे ॥ ९३ ॥ कळा येथूनि जालिया । विद्या इयेच्या केलिया । इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥ ९४ ॥ हे नादाची टांकसाळ । हे चमत्काराचें वेळाउळ । किंबहुना सकळ । खेळ इयेचा ॥ ९५ ॥ जे उत्पत्ति प्रलय होत । ते इयेचे सायंप्रात । हें असो अद्भुत । मोहन हे ॥ ९६ ॥ हे अद्वयाचें दुसरें । हे निःसंगाचें सोयरें । हे निरोळेंसि घरें । नांदत असे ॥ ९७ ॥ इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्याप्ती थोरी । म्हणोनि तया आवरी । अनावरातें ॥ ९८ ॥ तयाच्या तंव ठायीं । निपटूनि कांहींचि नाहीं । कीं तया आघवेंही । आपणचि होय ॥ ९९ ॥ तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ती । आपण

१ कुणबावा, शेतकी. २ अघटित. ३ स्त्री. ४ पति. ५ नवल. ६ निराकार. ७ लंगडा. ८ केवळ. ९ किंचित्. १० हालचाल. ११ गणतीस. १२ अवयवासह. १३ उपमारहित. १४ मंडपी. १५ वसंत ऋतु. १६ देवाची माया. १७ वेदशास्त्रांची. १८ धाड. १९ नाश न पावणारी. २० नादब्रह्माची. २१ घर. २१ दिवसरात्र. २२ निरालंबास. २३ येथवर. २४ आटोपी. २५ अजीबात. २६ उत्पत्ति.

होय स्थिती । ठावो तया ॥ १००० ॥ तया आनार्ताची आर्ती । तया पूर्णाची तृप्ती । तया अकुळाची जाती । गोत होय ॥ १ ॥ तया अचर्चाचें[3] चिन्ह । तया अपाराचें मौन[4] । तया अमनस्काचें मन । बुद्धी ही होय ॥ २ ॥ तया निराकाराचा आकार । तया निर्व्यापाराचा व्यापार । निरहंकाराचा अहंकार । होऊनि ठाके ॥ ३ ॥ तया अनामाचें नाम । तया अजाचें जन्म । आपण होय कर्म । क्रिया तया ॥ ४ ॥ तया निर्गुणाचे गुण । तया अचरणाचे चरण । तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षू । ॥ ५ ॥ तया भावातीताचे भाव । तया निरवयवाचे अवयव । किंबहुना होय सर्व । पुरुषाचें हे ॥ ६ ॥ ऐसेनि इया प्रकृति । आपुलिया सर्वव्याप्ती । तया अविकारातें विकृती । माजी कीजे ॥ ७ ॥ तेथ पुरुषत्व जें असे । तें ये प्रकृतिवशें[6] । चंद्रमा अंवसे । हरपला जेवीं ॥ ८ ॥ विंदळ बहुचोखा । मीनलिया वाला एका । कस होय पांचिका । जयापरी ॥ ९ ॥ कां साधूतें गोंधळी । संचरोनि सूये मैळीं । नाना सुदिनाच्या आभाळीं । दुर्दिनें कीजे ॥ १०१० ॥ जेविं पय पशूच्या पोटीं । कां वन्हि जैसा काष्टीं । गुंडुनि[11] घेतला पटीं । रत्नदीप ॥ ११ ॥ राजा पराधीन जाहाला । कीं सिंह रोगें रुंधला[12] । तैसा पुरुष प्रकृती आला । स्वतेजा मुके ॥ १२ ॥ जागता नर सहसा । निद्रा पाडूनि जैसा । स्वप्नीचिया सोसीं[13] । वश्य कीजे ॥ १३ ॥ तैसें प्रकृति जालेपणें । पुरुषा गुण भोगणें । उदास अंतुर्रागुणें[14] । आतुडे जेवीं ॥ १४ ॥ तैसें अजा[15] नित्या होये । आंगीं जन्म-मृत्युचे घाये । वाजती जंव लाहे । गुणसंगातें ॥ १५ ॥ परि तें ऐसें पंडुसुता । तोतलें लोह पिटितां । जेवीं वन्हीसीचि घाता । बोलती तया ॥ १६ ॥ कां आंदोळलियां उदक । प्रतिभा होय अनेक । तें नानात्व ह्मणती लोक । चंद्रीं जेवीं ॥ १७ ॥ दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा । कां कुंकुमें स्फटिका । लोहितत्व ये ॥ १८ ॥ तैसा गुण-संगमें । अजन्मा हा जन्में । पावत ऐसा गमे । येऱ्हवीं नाहीं ॥ १९ ॥ अधमोत्तम योनीं यासि ऐसिया मानी । जैसा संन्यासी होय स्वप्नीं । अंत्यजादि[21] जाती ॥ १०२० ॥ म्हणौनि केवळा पुरुषा । नाहीं होणें भोगणें देखा । एथ गुणसंगचि अशेखा- । लागीं मूळ ॥ क्रति

**उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥**

नधि- तमें । कृती-

हा प्रकृतिमाजी उभा । परि जुई[22] जैसा वोथंबा । इया प्रकृती पृथ्वीनभा । तेतुला ५ ॥

---

१ रक्षणाचें स्थान, गति. २ इच्छारहिताची. ३ अनिर्वचनीयाचें. ४ इयत्ता. ५ मनोविकी। रहिताचें. ६ प्रकृतिस्थितींत. ७ डांक, हीण. ८ हीणकस. ९ दुर्जन साधूच्या मनांत शिरून त्य न पापकर्मांत घालतो. १० मेघाच्छादित. ११ झांकून, गुंडाळून. १२ व्यापला. १३ सुखदुःख भोगास- १४ स्त्रीयोगानें. १५ जन्मरहिताला. १६ तापलेलें. १७ हाललें असतां. १८ प्रतिबिंब. १९ तांब-डेपणा. २० मानतो. २१ महार, मांग इ०. २२ वोथंबा, खांब, वेलीस आश्रयभूत काठी असते ती.

॥ २२ ॥ प्रकृतिसरितेच्या तटीं । मेरु होय हा किरीटी । माजि बिंबे परी लोटीं । लोटों नेणें ॥ २३ ॥ प्रकृति होय जाये । हा तो असतचि आहे । म्हणोनि आब्रह्मार्चे होये । शासन हा ॥ २४ ॥ प्रकृति येणें जिये । याचिया सत्ता जग विये । इयालागीं इये । वरयितु हा ॥ २५ ॥ अनंतें काळें किरीटी । जिया मिळती इया सृष्टी । तिया रिगती ययाच्या पोटीं । कल्पांतसमयीं ॥ २६ ॥ हा महद्ब्रह्म गोसावी । ब्रह्मगोलकलाघवी । अपारपणें मवी । प्रपंचातें ॥ २७ ॥ पैं या देहामाझारीं । परमात्मा ऐसी जे परी । बोलिजे तें अवधारीं । ययातेंचि ॥ २८ ॥ अगा प्रकृतिपरौता । एक आथी पंडुसुता । ऐसा प्रवाद तो तत्त्वता । पुरुष हा पैं ॥ २९ ॥

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥**

जो निखिळपणें येणें । पुरुषा यया जाणें । आणि गुणाचें करणें । प्रकृतीचें तें ॥१०३०॥ हें रूप हे छाया । पैल जळ हे माया । ऐसा निवाड धनंजया । जेवि कीजे ॥ ३१ ॥ तेणें पाडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवंचना । जयाचिया मना । गोचर जाहाली ॥ ३२ ॥ तो शरीराचेनि मेळें । करू कां कर्मे सकळें । परि आकाश धूंई न मैळे । तैसा असे ॥ ३३ ॥ ओथिलेनि देहें । जो न घेपे देहमोहें । देह गेलिया नोहे । पुनरपि तो ॥ ३४ ॥ ऐसा तया एक । प्रकृतिपुरुषविवेक । उपकार अलौकिक । करी पैं गा ॥ ३५ ॥ परि हाचि अंतरीं । विवेक भानूचियापरी । उदैजे ते अवधारीं । उपाय बहुत ॥ ३६ ॥

**ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥**

कोणी एक सुभटा । विचाराचा आगिटा । आत्मानात्माकिटौ । पुटें देउनी ॥ ३७ ॥ छत्तीसही वानी भेद । तोडोनि विर्विवाद । निवडिती शुद्ध । आपणपें ॥ ३८ ॥ तया आपणपयाच्या पोटीं । आत्मध्यानाचिया दिठी । देखती गा किरीटी । आपणपेंचि ॥ ३९ ॥ आणि पैं दैवबैगें । चित्त देती सांख्ययोगें । एक ते अंगेलगें । कर्माचेनि ॥ १०४० ॥ यया चतुर्विध प्रकारें । जे मज मिनले पुरे । तयांसि कांहीं नुरे । भोक्तव्य गा ॥ ४१ ॥

**अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।**
**तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥**

येणें येणें प्रकारें । निस्तरती सोर्भीकारें । हें भव कोंडरें । आघवेंचि ॥ ४२ ॥ परि हे

१ प्रवाहीं वाहू न शके. २ प्रवर्तक. ३ भर्ता. ४ सूत्रधार. ५ गणना करी. ६ वर्णो. ७ शुद्धपणें. ८ गुणकर्म सर्व प्रकृतिमूलक होय. ९ मृगजळ. १० धुरळ्यानें. ११ प्राप्त झालेल्या. १२ सूर्य. १३ आगींत. १४ अनात्मडाकाला. १५ कसाचे भेद. १६ दैवयोगानें. १७ आश्रयानें. १८ खरेपणानें. १९ भ्रांति, भय.

करिती ऐसें । अभिमान दवडूनि देशें । एकाचिया विश्वासें । टेंकती बोला ॥ ४३ ॥ जे हिताहित देखती । हानिक्रणवा घेपती । पुसोनि शीण हरिती । देती सुख ॥ ४४ ॥ तयाचेनि मुखें जें निघे । तेतुलें आदरें चांगें । ऐकोनियां आंगें । मनें होती ॥ ४५ ॥ तयां ऐकणें याचेनि नांवें । ठेवती गा आघवें । तया अक्षरांसी जीवें । लोण करिती ॥ ४६ ॥ तेही अंतीं कपिध्वजा । इया मरणार्णवसमाजा- । पासूनि निघती वोजा । गोमटेया ॥ ४७ ॥ ऐसैसे हे उपाये । बहुवस एथें पाहें । जाणावया होये । एकी वस्तु ॥ ४८ ॥ आतां पुरें हें बहुत । पैं सर्वार्थाचें मथित । सिद्धांतनवनीत । देऊं तुज ॥ ४९ ॥ येतुलेनि पंडुसुता । अनुभव लाहाणा आयिता । येर तंव तुज होतां । सायास नाहीं ॥ १०५० ॥ म्हणोनि ते बुद्धि रचूं । मतवाद खांचूं । सोलींव निर्वचूं[१०] । फलितार्थचि ॥ ५१ ॥

**यावत्संजायते किंचित्सत्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

तरी क्षेत्रज्ञ येणें बोलें । तुज आपणपें जें दाविलें । आणि क्षेत्रही सांगीतलें । आघवेंचि ॥ ५२ ॥ तया येरयेरांच्या मेळीं । होइजे भूतीं सकळीं । अनिलसंगें सलिलीं । कल्लोळ जैसे ॥ ५३ ॥ कां तेजा आणि उखैरा । भेटी जालिया वीरा । मृगजळाचिया पुरा । रूप होय ॥ ५४ ॥ नाना धाराधरधारीं । [१३]क्षेळंबलिया वसुंधरी । उठिजे जेविं अंकुरीं । नानाविधीं ॥ ५५ ॥ तैसें चराचर आघवें । जें कांहीं जीव एणें नांवें । तें तों उभययोगें संभवे । ऐसें जाण ॥ ५६ ॥ इयालागीं अर्जुना । क्षेत्रज्ञा प्रधाना- । पासूनि न होती भिन्ना । भूतव्यक्ति ॥ ५७ ॥

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥**

पैं पटत्व तंतू नव्हे । तरि तंतूचि तें आहे । ऐसें खोलीं डोळां पाहें । ऐक्य हें गा ॥ ५८ ॥ भूतें आघवींचि होती । एकाचीं एक आहाती । परि पैं भूतप्रतीती । वेगळाली असे ॥ ५९ ॥ यांचीं नामेंही आनानें । अनारिसीं वर्तनें । वेषही सिनाने । आघवेयांचे ॥ १०६० ॥ ऐसें देखोनि किरीटी । भेद सुसी हन पोटीं । तरि जन्माचिया कोटी । न लाहसी निघों

१ श्रद्धेनें आश्रय करितात. २ दुसऱ्याचा नाश पाहून कळवळा येणारे. ३ चांगलें. ४ ते ऐकण्याचें नांव घेतांच सर्व व्यापार ठेवून ऐकतात. ५ निंबलोण. ६ मृत्युसमुद्रसमुदाय. ७ रीतीनें. ८ प्राप्त. ९ खंडण करूं. १० सांगूं. ११ माळजमिनीवर. १२ पर्जन्यधारीं. १३ पृथ्वी भिजली असतां. १४ पुरुष प्रकृति. १५ वस्त्रपण. १६ जीवभाव. १७ भिन्नभिन्न. १८ तऱ्हतऱ्हेचे. १९ धरिशी. २० निघूं शकणार नाहींस.

॥ पैं नानाप्रयोजनशीळें । दीर्घे वक्रें वर्तुळें । होती एकीचींच फळें । तुंबिणी- ॥ ६२ ॥ होतु कां उँजू वांकुडें । परि बोरीचे हें न मोडे । तैसीं भूतें अवघडें । परि उजू ॥ ६३ ॥ अंगारकणीं बहुवसीं । उष्णता समान जैसी । तैसा नाना जीवराशीं । असे ॥ ६४ ॥ गगनभरी धारा । परि पाणी एकचि वीरा । तैसा या भूताकारा । णीं तो ॥ ६५ ॥ हे भूतग्राम विषम । परि वस्तु ते एथ सम । घटमठीं व्योमें । जिया- ॥ ६६ ॥ हा नाशतां भूताभास । एथ आत्मा तो अविनाश । जैसा केयूरादिकीं । सुवर्णाचा ॥ ६७ ॥ एवं जीवधर्महीन । जो जीवेंसीं अभिन्न । देखे तो सुनयन । यांमाजी ॥ ६८ ॥ ज्ञानाचा डोळसां- । माजि डोळस तो वीरेशा । हे स्तुति नोहे सा । भाग्याचा तो ॥ ६९ ॥

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥**

गुणेंद्रिय [१०]धोकटी । देह धातूंची त्रिकुटी । पांचमेळावा वोखटी । दारुण हे ॥१०७०॥ घड पांचवेउली [१२] । पंचधा आंगीं लागली । जीवपंचाननां [१३] सांपडली । हरिणकुटी [१४] हे १ ॥ ऐसा असोनि इये शरीरीं । कोण नित्यबुद्धीची सुरी । अनित्यभावाच्या उदरीं । चिनां [१५] ॥ ७२ ॥ परि इये देहीं असतां । जो नयेचि आपणया घाता । आणि [१६]शेखीं सुता । तेथेंचि मिळे ॥ ७३ ॥ जेथ योगज्ञानाचिया प्रौढी । वोलांडूनियां जन्मकोडी । नगों ईयां भाषा बुडी । देती योगी ॥ ७४ ॥ जें आकाराचें पैल तीर । जें नादाची मेरे [१८] । तुर्येचें माजघर । परब्रह्म जें ॥ ७५ ॥ मोक्षासगट गती । जेथें येती विश्रांती । दि अपांपती [१९] । सरिता जेवीं ॥ ७६ ॥ तें सुख येणेंचि देहें । पांयपाखाळणिया [२०] लाहे । भूतवैषम्यें नोहे । विषमबुद्धी ॥ ७७ ॥ दीपांचिया [२१]कोडी जैसें । एकाचि तेज सरिसें । जो असतचि असे । सर्वत्र ईश ॥ ७८ ॥ ऐसेनि समत्वें पंडुसुता । जिये जो देखत- [२२]ता । तो मरणा आणि जीविता । नांगवे [२३] फुंडा [२४] ॥ ७९ ॥ ह्मणोनि तो दैवागळा । ीत असो वेळोवेळां । जे साम्यसेजे डोळा । लागला तया ॥ १०८० ॥

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥**

आणि मनोबुद्धिप्रमुखें । कर्मेंद्रियें अशेखें । करी प्रकृतीचि हें देखे । साचें जो गा

---

१ अनेक कार्योपयोगी. २ भोंपळीचीं. ३ सरळ. ४ निखाऱ्यांत. ५ जीवसमुदाय. ६ वेगळालें. आकाश. ८ बाहुभूषणाच्या ठाईं. ९ जीवधर्मरहित जें ब्रह्म तें जीवाहून भिन्न नाहीं असें पाहतो त्र सुनयन, खरा डोळस. १० पिशवी. ११ त्रिधातु, वात, पित्त, कफ. १२ पांच नाग्यांची ळी, पांच पायांची. १३ जीवरूप वाघास. १४ सांपळा. १५ भोकसीत नाहीं. १६ शेवटीं. या प्रतिज्ञेनें. १८ कडा. १९ समुद्राप्रत. २० गुरुभक्तीनें. २१ कोट्यवधींत. २२ पाहत रतां. २३ न सांपडे. २४ खरोखर. २५ वर्णन करीत.

॥ ८१ ॥ घरींचीं राहटती घरीं । घर कांहीं न करी । अभ्र धांवे अंबरीं । अंबर तें उगें ॥ ८२ ॥ तैसी प्रकृति आत्मप्रभा । खेळे गुणीं विविधारंभा । येथ आत्मा तो वोथंबा । नेणे कोण ॥ ८३ ॥ ऐसेनि येणें निवाडें । जयाच्या जीवीं उजिवडे । अकर्तयातें फुडें । देखिलें तेणें ॥ ८४ ॥

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥

येऱ्हवीं तैंचि अर्जुना । होइजे ब्रह्मसंपन्ना । जैं या भूताकृती भिन्ना । दिसती एकी ॥ ८५ ॥ लहरी जैसिया जळीं । परमाणुकणिका स्थळीं । रश्मीकरमंडळीं । सूर्याच्या जेवीं ॥ ८६ ॥ ना तरी देहीं अवेव । मनीं आघवेचि भाव । विस्फुलिंग सर्व । वन्हीं एकीं ॥ ८७ ॥ तैसें भूताकारएकाचें । हें दिठी रिगे जैं साचें । तैंचि ब्रह्मसंपत्तीचें । तारूं लागे ॥ ८८ ॥ मग जया तया कडे । ब्रह्मचि दिठी उघडे । किंबहुना जोडे । अपार सुख ॥ ८९ ॥ येतुलेनि तुज पार्था । प्रकृतिपुरुषव्यवस्था । ठाये ठावो प्रतीतिपथा- । माजि जाहाली ॥ १०९० ॥ अमृत जैसें ये चुळा । कां निधान देखिजे डोळां । तेतुला जिव्हाळा । मानावा हा ॥ ९१ ॥ जी जाहालिये प्रतीती । घर बांधणें जें चित्तीं । तें आतानां सुभद्रापती । इयावरी ॥ ९२ ॥ तरि एक दोनी ते बोल । बोलिजती सखोल । देई मनातें वोल । मग ते घेई ॥ ९३ ॥ ऐसें देवें म्हणितलें । मग बोलों आदरिलें । तेथें अवधानाचेंचि केलें । सर्वांग येरें ॥ ९४ ॥

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥

तरि परमात्मा म्हणिपे । तो ऐसा जाण स्वरूपें । जळीं जळे न लिंपे । सूर्य जैसा ॥ ९५ ॥ कां जे जळा आदी पाठीं । तो असतचि असे किरीटी । माजि बिंबे तें दृष्टी । आणिकांचिये ॥ ९६ ॥ तैसा आत्मा देहीं । आथि म्हणिपे हें कांहीं । साचें तरी नाहीं । तो जेथिंचा तेथें ॥ ९७ ॥ आरिसामुख जैसें । बिंबलिया नाम असे । देहीं वसणें तैसें । आत्मतत्त्वा ॥ ९८ ॥ तया देहा म्हणती भेटी । हे सर्पायीं निर्जीव गोठी । वारिया वाळुवे गांठी । केंही आहे ॥ ९९ ॥ आगी आणि कापुसा । दोरा सुंवावा कैसा । केउता

१ घरांतील माणसें. २ आकाश. ३ आत्म्याच्या प्रकाशानें. ४ अनेक कार्यारंभास. ५ आश्रय-स्तंभ. ६ प्रकाशे. ७ अकर्त्या आत्म्याला. ८ एकरूपाकार. ९ किरणमय सूर्यमंडळांत. १० ठिणग्या. ११ दृष्टींत भरे. १२ जहाज. १३ तत्काळ, वास्तविक. १४ अनुभव. १५ ठेव सांपडावी. १६ गहाण. १७ आरशांत प्रतिबिंब पडल्यामुळें त्या मुखास आरसामुख म्हणतात, तसें. १८ संबंध. १९ सर्वथैव. २० घालावा.

सी ॥ ११०० ॥ एक निघे पूर्वेकडे । एक तें पश्चिमेकडे । तिये
ा ॥ १ ॥ उजियेडा आणि आंधारेया । जो पाड मृता
या । देहा जाण ॥ २ ॥ रात्री आणि दिवसा । कनैका आणि
सा । तैसाचि यासी ॥ ३ ॥ देह तंव पांचांचें जालें । हें कर्माचे
कीं सूदलें । जन्ममृत्यूच्या ॥ ४ ॥ हें काळानळाच्या कुंडीं ।
माशी पांखें पाखडीं । तंव हें सरे ॥ ५ ॥ हें विपायें आगींत
डे । जाहालें श्वाना वरपैंडें । तरि ते विष्ठा ॥ ६ ॥ या चुके
र्मीचा पुंजा । हा परिणाम कपिध्वजा । कश्मल गा ॥ ७ ॥ या
आत्मा तो ऐसा । पैं शुद्ध नित्य अपैसा । अनादिपणें ॥ ८ ॥
क्रिय ना क्रियाशीळ । कृश ना स्थूळ । निर्गुणपणें ॥ ९ ॥ साभास
ा अप्रकाश । अल्प ना बहुवस । अरूपपणें ॥ १११० ॥ रिता
हित । मूर्त ना अमूर्त । शून्यपणें ॥ ११ ॥ आनंद ना निरानंद ।
ना बद्ध । आत्मपणें ॥ १२ ॥ येतुला ना तेतुला । आइता ना
ला । अलक्षपणें ॥ १३ ॥ सृष्टीचा होणीं न रचे । सर्वसंहारें न
ोईचें । पंचत्व हा ॥ १४ ॥ मैंवे ना चेचें । वाढे ना खांचे ।
ग ॥ १५ ॥ एवंरूप पैं आत्मा । देहीं जें ह्मणती प्रियोत्तमा । तें
तैसें ॥ १६ ॥ तैसें तयाचिये अनुस्यूती । होती जाती देहाकृती ।
जैसा तैसा ॥ १७ ॥ अहोरात्रें जैसीं । येती जाती आकाशीं ।
नाण ॥ १८ ॥ ह्मणोनि इये शरीरीं । कांहीं करवी ना करी ।
ज न होय ॥ १९ ॥ यालागीं स्वरूपें । उणा पुरा न घेपे । हें
हा ॥ ११२० ॥

तं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।
स्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥

हीं । हें न रिघेचि कवणेठायीं । परि कायिसेनि कहीं । गाि-
सर्वत्र सर्वदेहीं । आत्मा असतचि असे पाहीं । परि संगदोषें
२ ॥ पुडतपुडती एथें । हेंचि लक्षण निरुतें । जे जाणावें क्षेत्र-
३ ॥

- ३ सुवर्णाला. ४ भेद. ५ दोऱ्यांत गुंतलें. ६ घातलें. ७ तोंडीं. ८ पंख
ास. ११ वाईट. १२ सहज. १३ भरलेला. १४ मौनी. १५ होण्यानें.
ा जात नाहीं. १८ बोलला जात नाहीं. १९ संबंधानें. २० अकृत
पीडा पावेना. २२ वारंवार.

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमंरविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

संसर्गें[1] चेष्टिजे लोहें । परि लोह भ्रामक[2] नोहे । क्षेत्रक्षेत्रज्ञां आहे । तेतुला पाड ॥ २४ ॥ दीपकाची अर्ची[3] । राहाटी[4] वाहे घरींची । परि वेगळीक कोडीची[5] । दीपा आणि घरा ॥ २५ ॥ पैं काष्ठाच्या पोटीं । वन्हि असे परि किरीटी । काष्ठ नोहे या दृष्टी । पाहिजे हा ॥ २६ ॥ अपाड[6] नभा आभाळा । रवि आणि मृगजळा । तैसाचि हाही डोळां । देखावा पैं ॥ २७ ॥ हें आववेंचि असो एक । गगनौनि जैसा अर्क[7] । प्रकटवी लोक । नावें नावें[8] ॥ २८ ॥ एथ क्षेत्रज्ञ तो ऐसा । प्रकाशक क्षेत्राभासा । यावरुतें हें न पुसा । शंका नेघा ॥ २९ ॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-
संवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

शब्दतत्त्वसारज्ञा[9] । पैं देखणी तेचि प्रज्ञा । जे क्षेत्रक्षेत्रज्ञा । अपाड देखे ॥ ११३० ॥ इया दोहींचें अंतर । देखावया चतुर । ज्ञानियांचें द्वार । आराधिती ॥ ३१ ॥ याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती । शास्त्रांचीं दुभतीं । पोषिती घरीं ॥ ३२ ॥ योगाचिया आकाशा । वेंळघिजे[10] येवढा धिंवसा[11] । याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥ ३३ ॥ शरीरादिसमस्त । मानिताति तृणवत । जीवें संतांचे होत । वोहणधर[12] ॥ ३४ ॥ ऐसैसिया परी । ज्ञानाचिया भरोवरी[13] । करूनियां अंतरीं । निरुतें[14] होती ॥ ३५ ॥ मग क्षेत्र क्षेत्रज्ञाचें । जे अंतर देखती साचें । ज्ञानें उन्मेख[15] तयांचे । वोवाळूं आह्मी ॥ ३६ ॥ आणि महाभूतादिकीं । प्रभेदलीं अनेकीं । पसरलीसे लटिकी प्रकृति जे हे ॥ ३७ ॥ जे शुकनळिकान्यायें[16] । न लगती लागली आहे । जें जैसें तैसें होये । ठाँउवें[17] जयां ॥ ३८ ॥ जैसी माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां । सर्पबुद्धि टवाळा[18] । उखी[19] होउनी ॥ ३९ ॥ का शुक्ति ते शुक्ती[20] । हे साच होय प्रतीती । रुपयाची भ्रांती । जाऊनियां ॥ ११४० ॥ तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृती जे अंतःकरणें । देखती ते मी ह्मणें । ब्रह्म होती ॥ ४१ ॥ जें

---

१ जवळ असतां हालावें. २ फिरणारें, हालणारें. ३ ज्योति. ४ व्यवहार चालवी. ५ कोट्यंशाचें अंतर. ६ वैलक्षण्य. ७ सूर्य. ८ नेहमीं. ९ शब्दांचें तात्पर्य घेणारा. १० चढावें. ११ धैर्य. १२ पादुकाधारक. १३ साधनें. १४ निश्चल. १५ ज्ञान. १६ याचें लक्षण पान ९८ अध्याय ६ ओ० ७६, ७७, ७८ पहा. १७ ठाऊक. १८ लटकी. १९ नाश. २० शिंप.

आकाशाहूनि वाड । जें अव्यक्ताची[2] पैल कड । जें भेटलिया अपाडा[3] पाड । पैडों[4] नेदी ॥ ४२ ॥ आकार जेथ सरे । जीवत्व जेथें विरे । द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ॥ ४३ ॥ तें परमतत्त्व पार्था । होती ते सर्वथा । जे आत्मानात्मव्यवस्था । राजहंस[5] ॥ ४४ ॥ ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा । उगाणा[6] दिधला जीवा । जीवाचिया ॥ ४५ ॥ थेर कैलशींचें[7] थेरीं । रिचविजे जयापरी । आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ॥ ४६ ॥ आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण । वरि अर्जुनातें श्रीकृष्ण । हा[9] मी ह्मणे ॥ ४७ ॥ परि असो तें नीथिलें । न पुसतां कां मी बोलें । किंबहुना दिधलें । सर्वस्व देवें ॥ ४८ ॥ कीं तो पार्थ जी मनीं । अझुनी तृप्ती न मनी । अधिकाधिक उतान्ही[11] । वाढवीत असे ॥ ४९ ॥ स्नेहांचिया[12] भरोवरी[13] । आंबुथिला[14] दीप घे थोरी । चाड अर्जुना अंतरीं । परिसतां तैसी ॥ ११५० ॥ तेथ सुगरणी आणि उदारे । रसज्ञ आणि जेवणारे । मिळती मग अवतरे । हात जैसा ॥ ५१ ॥ तैसें जी होतसे देवा । तया अवधानाचिया लवलवा[15] । पाहतां व्याख्यान चढलें[16] थांवा । चौगुणें[17] वरी ॥ ५२ ॥ सुवायें[18] मेघ सांवरे । जैसा चंद्रें सिंधू[19] भरे । तैसा मातला रस आदरें । श्रोतयांचेनि ॥ ५३ ॥ आतां आनंदमय आघवें । विश्व कीजेल देवें । तें रायें परिसावें । संजयो ह्मणे ॥ ५४ ॥ एवं जे महाभारतीं । श्रीव्यासें अप्रतिमती[20] । भीष्मपर्व संगतीं । ह्मणितली कथा ॥ ५५ ॥ तो श्रीकृष्णार्जुनसंवाद । नागरीबोलीं[21] विशद । सांगोनि दाऊं प्रबंध । वोवियेचा ॥ ५६ ॥ नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा । जे शृंगाराच्या माथां । पाय ठेवी ॥ ५७ ॥ दाऊं वेल्हाळदेशी[22] नवी । जे साहित्यातें वोजावी[23] । अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें ॥ ५८ ॥ बोल वेल्हावितेनि[24] गुणें । चंद्रासि घे उमाणे[25] । रसरंगा भुलवणें । नाद लोपी ॥ ५९ ॥ खेचराचियाही[26] मना । आणी सात्विकाचा पान्हा । श्रवणासवें सुमना[27] । समाधी जोडे ॥ ११६० ॥ तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेंसी विश्व भरूं । आनंदाचा ओवारू[28] । मांडूं जगा ॥ ६१ ॥ फिटो विवेकाची वोणी[29] । हो काना मना जिणीं[30] । देखो ओवडे[31] तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ६२ ॥ दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोध सुकाळा- । माजी विश्व ॥ ६३ ॥ हें निफजेल आतां

---

१ मोठें. २ प्रकृति. ३ भेदाभेद. ४ उरूं देत नाहीं. ५ विवेचन करणारे. ६ अनुभव. ७ घागरींतील पाणी. ८ ओतावें. ९ अर्जुनाकडे बोट दाखवून हाच मी आहें असें ह्मणे. १० सोडून दिलें. ११ इच्छा. १२ मैत्रीच्या. १३ भरपूर साधनानें. १४ प्रदीप्त, शिंपिला. १५ आस्थेनें. १६ बळास चढलें. १७ चौपट. १८ अनुकूल वाऱ्यानें. १९ समुद्र. २० अतिशय बुद्धिमान्. २१ उत्तम शब्दानें. २२ आवडती देशभाषा. २३ दाखवी, शिकवी. २४ शांत करणाऱ्या गुणांनीं. २५ बरोबरी करणें. २६ पिशाचाच्या. २७ निर्मळ मनाला. २८ पटांगणाचा बांध. २९ दैन्य. ३० सजीवदशा. ३१ पाहिजे तो.

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमंरविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

संसर्गें[१] चेष्टिजे लोहें । परि लोह भ्रामक नोहे । क्षेत्रक्षेत्रज्ञां आहे । तेतुला पाड ॥ २४ ॥ दीपकाची अर्ची[३] । राहाटी[४] वाहे घरींची । परि वेगळीक कोडीची[५] । दीपा आणि घरा ॥ २५ ॥ पैं काष्ठाच्या पोटीं । वन्हि असे परि किरीटी । काष्ठ नोहे या दृष्टी । पाहिजे हा ॥ २६ ॥ अपाड[६] नभा आभाळा । रवि आणि मृगजळा । तैसाचि हाही डोळां । देखावा पैं ॥ २७ ॥ हें आत्रवेंचि असो एक । गगनौनि जैसा अर्क[७] । प्रकटवी लोक । नावें[८] नावें ॥ २८ ॥ एथ क्षेत्रज्ञ तो ऐसा । प्रकाशक क्षेत्राभासा । यावरुतें हें न पुसा । शंका नेघा ॥ २९ ॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-
संवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

शब्दतत्त्वसारज्ञा[९] । पैं देखणी तेचि प्रज्ञा । जे क्षेत्रक्षेत्रज्ञा । अपाड देखे ॥ ११३० ॥ इया दोहींचें अंतर । देखावया चतुर । ज्ञानियांचें द्वार । आराधिती ॥ ३१ ॥ याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती । शास्त्रांचीं दुभतीं । पोषिती घरीं ॥ ३२ ॥ योगाचिया आकाशा । वेंळघिजे[१०] येवढा धिंवसा[११] । याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥ ३३ ॥ शरीरादिसमस्त । मानिताति तृणवत । जीवें संतांचे होत । वोहणधर[१२] ॥ ३४ ॥ ऐसैसिया परी । ज्ञानाचिया भैरोवरी[१३] । करूनियां अंतरीं । निरुते[१४] होती ॥ ३५ ॥ मग क्षेत्र क्षेत्रज्ञाचें । जे अंतर देखती साचें । ज्ञानें[१५] उन्मेख[१६] तयांचे । वोवाळूं आह्मी ॥ ३६ ॥ आणि महाभूतादिकीं । प्रभेदलीं अनेकीं । पसरलीसे लटिकी प्रकृति जे हे ॥ ३७ ॥ जे शुकनलिकान्यायें । न लगती लागली आहे । जें जैसें तैसें होये । ठौउवें[१७] जयां ॥ ३८ ॥ जैसी माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां । सर्पबुद्धि टवाळा[१८] । उखी[१९] होउनी ॥ ३९ ॥ कां शुंक्ति[२०] ते शुक्ती । हे साच होय प्रतीती । रुपयाची भ्रांती । जाऊनियां ॥ ११४० ॥ तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृती जे अंतःकरणें । देखती ते मी ह्मणें । ब्रह्म होती ॥ ४१ ॥ जें

---

१ जवळ असतां हालावें. २ फिरणारें, हालणारें. ३ ज्योति. ४ व्यवहार चालवी. ५ कोटयंशाचें अंतर. ६ वैलक्षण्य. ७ सूर्य. ८ नेहमीं. ९ शब्दांचें तात्पर्य घेणारा. १० चढावें. ११ धैर्य. १२ पादुकाधारक. १३ साधनें. १४ निश्चल. १५ ज्ञान. १६ याचें लक्षण पान ९८ अध्याय ६ ओं० ७६, ७७, ७८ पहा. १७ ठाऊक. १८ लटकी. १९ नाश. २० शिंप.

आकाशाहूनि वाड[1]। जें अव्यक्ताची[2] पैल कड। जें भेटलिया अपाडा[3] पाड। पँडों नेदी ॥ ४२ ॥ आकार जेथ सरे। जीवत्व जेथें विरे। द्वैत जेथ नुरे। अद्वय जें ॥ ४३ ॥ तें परमतत्त्व पार्था। होती ते सर्वथा। जे आत्मानात्मव्यवस्था। राजहंस ॥ ४४ ॥ ऐसा हा जी आघवा। श्रीकृष्णें तया पांडवा। उगाणा[5] दिधला जीवा। जीवाचिया ॥ ४५ ॥ थेर कैलशींचें[6] थेरीं। रिचविजे जयापरी। आपणपें तया श्रीहरी। दिधलें तैसें ॥ ४६ ॥ आणि कोणा देता कोण। तो नर तैसा नारायण। वरि अर्जुनातें श्रीकृष्ण। हा मी ह्मणे ॥ ४७ ॥ परि असो तें नीथिलें। न पुसतां कां मी बोलें। किंबहुना दिधलें। सर्वस्व देवें ॥ ४८ ॥ कीं तो पार्थ जी मनीं। अझुनी तृप्ती न मनी। अधिकाधिक उतान्ही[11]। वाढवीत असे ॥ ४९ ॥ स्नेहोंचिया[12] भरोवरी[13]। आंबुथिलें[14] दीप घे थोरी। चाड अर्जुना अंतरीं। परिसतां तैसी ॥ ११५० ॥ तेथ सुगरणी आणि उदारे। रसज्ञ आणि जेवणारे। मिळती मग अवतरे। हात जैसा ॥ ५१ ॥ तैसें जी होतसे देवा। तया अवधानाचिया लेवलवा[15]। पाहतां व्याख्यान चढलें[16] थांवा। चौगुणें[17] वरी ॥ ५२ ॥ सुवायें[18] मेघ सांवरे। जैसा चंद्रें सिंधू[19] भरे। तैसा मातला रस आदरें। श्रोतयांचेनि ॥ ५३ ॥ आतां आनंदमय आघवें। विश्व कीजेल देवें। तें रायें परिसावें। संजयो ह्मणे ॥ ५४ ॥ एवं जे महाभारतीं। श्रीव्यासें अप्रतिमती[20]। भीष्मपर्वं संगतीं। ह्मणितली कथा ॥ ५५ ॥ तो श्रीकृष्णार्जुनसंवाद। नागरीबोलीं[21] विशद। सांगोनि दाऊं प्रबंध। वोवियेचा ॥ ५६ ॥ नुसधीचि शांतिकथा। आणिजेल कीर वाक्पथा। जे शृंगाराच्या माथां। पाय ठेवी ॥ ५७ ॥ दाऊं वेल्हाळदेशी[22] नवी। जे साहित्यातें वोजावी[23]। अमृतातें चुकी ठेवी। गोडसपणें ॥ ५८ ॥ बोल वेल्हाळवितेनि[24] गुणें। चंद्रासि घे उमाणे[25]। रसरंगा भुलवणें। नाद लोपी ॥ ५९ ॥ खेचराचियाही[26] मना। आणी सात्विकाचा पान्हा। श्रवणासवें सुमना[27]। समाधी जोडे ॥ ११६० ॥ तैसा वाग्विलास विस्तारूं। गीतार्थेसी विश्व भरूं। आनंदाचा आवारू[28]। मांडूं जगा ॥ ६१ ॥ फिटो विवेकाची वाणी[29]। हो काना मना जिणीं[30]। देखो आवडे[31] तो खाणी। ब्रह्मविद्येची ॥ ६२ ॥ दिसो परतत्त्व डोळां। पाहो सुखाचा सोहळा। रिघो महाबोध सुकाळा-। माजी विश्व ॥ ६३ ॥ हें निफजेल आतां

---

१ मोठें. २ प्रकृति. ३ भेदाभेद. ४ उरूं देत नाहीं. ५ विवेचन करणारे. ६ अनुभव. ७ घागरींतील पाणी. ८ ओतावें. ९ अर्जुनाकडे बोट दाखवून हाच मी आहें असें ह्मणे. १० सोडून दिलें. ११ इच्छा. १२ मैत्रीच्या. १३ भरपूर साधनानें. १४ प्रदीप्त, शिंपिला. १५ आस्थेनें. १६ बळास चढलें. १७ चौपट. १८ अनुकूल वाऱ्यानें. १९ समुद्र. २० अतिशय बुद्धिमान्. २१ उत्तम शब्दानें. २२ आवडती देशभाषा. २३ दाखवी, शिकवी. २४ शांत करणाऱ्या गुणांनीं. २५ बरोबरी करणें. २६ पिशाचाच्या. २७ निर्मळ मनाला. २८ पटांगणाचा बांध. २९ दैन्य. ३० सजीवदशा. ३१ पाहिजे तो.

आघवें । ऐसें बोलिजेल बरवें । जे अधिष्ठिला असे परमदेवें । श्रीनिवृत्ती मी ॥ ६४ ॥ ह्मणोनि अक्षरीं सुभेदीं । उपमा श्लोक कोंदाकोंदीं । झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ॥ ६५ ॥ हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें । केलें असे श्रीमंतें । श्रीगुरुरायें ॥ ६६ ॥ तेणें जी कृपासावायें । मी बोलें तेतुलें सामायें । आणि तुमचिये सभे लाहें । गीता ह्मणों ॥ ६७ ॥ वरि तुह्मां संतांचे पाये । आजि मी लाधलों आहें । ह्मणोनि जी नोहे । अटक कांहीं ॥ ६८ ॥ प्रभु काश्मीरीं मुकें । नुपजेही कौतुकें । नाहीं उणीं सामुद्रिकें । लक्ष्मीयेसी ॥ ६९ ॥ तैसी तुह्मा संतांपासीं । अज्ञानाचीं गोठी कायसी । यालागीं नवरसीं । वरुषेन मी ॥ ११७० ॥ किंबहुना आतां देवा । अवसरू मज देयावा । ज्ञानदेव ह्मणे बरवा । सांगेन ग्रंथ ॥ ११७१ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

श्लोक ३४, ओंव्या ११७१.

---

## अध्याय १४ वा.

जयजय आचार्या । समस्तसुरवर्या । [६]प्रज्ञाप्रभातसूर्या । सुखोदया[७] ॥ १ ॥ जयजय सर्वविसांवया । सोहंभाव[८]सुहावया । नाना लोक हेलींवया । समुद्रा तूं ॥ २ ॥ आइकें गा आर्तबंधू । निरंतरकारुण्यसिंधू । विशद[११]विद्यावधू- । वल्लभा जी ॥ ३ ॥ तूं जयाप्रति लपसी । तया विश्व हें दाविसी । प्रकट तैं करिसी । आघवेंचि तूं ॥ ४ ॥ कीं पुढिलांची[१२] दृष्टी [१३]चोरिजे । हा [१४]दृष्टिबंध निफजे । परि नवल लाघव[१५] तुझें । जें आपणपें[१६] चोरे ॥ ५ ॥ जी तूंचि तूं सर्वा यया । मा कोणा बोध कोणा माया । ऐसिया आपें आप लाघविया नमों तुज ॥ ६ ॥ जाणों जगीं आप[१७] बोलें । तें तुझिया बोला सुरस जालें । तुझेनि क्षेमत्व[१८] आलें । पृथ्वीयेसी ॥ ७ ॥ रविचंद्रादि शुक्ती[१९] । उदय करिती त्रिजगती । ते तुझियें दीप्ती- । तेजें[२०]तेजा ॥ ८ ॥ जें चळवळिजे अनिळें[२१] । तें [२२]दैविकेनि जी निजबळें । नभ तुजमाजी खेळे । लपिथपि[२३] ॥ ९ ॥ किंबहुना माया[२४] अशेष । ज्ञान जी तुझेनि डोळस । असो वानणें[२५] सायास । श्रुतीसि हें ॥ १० ॥ वेद वानूनि तंवचि [२६]चांग । जंव न दिसे

---

१ दाट. २ परिपूर्ण. ३ कृपेच्या साहाय्यानें. ४ सरस्वतीच्या ठाईं. ५ सामुद्रिक लक्षणें. ६ बुद्धिरूप प्रातःकाळच्या. ७ सुखाच्या उदयकर्त्या. ८ मी ब्रह्म असा भाव सुशोभित करणाऱ्या. ९ किंवा. १० लाटा. ११ शुद्ध. १२ दुसऱ्याची. १३ बांधिजे. १४ नजरबंध. १५ नाटकीपणा. १६ आत्मस्वरूपाप्रत. १७ पाणी. १८ सहनशीलता. १९ मोठी शिंपी. २० तुझ्या दीप्तीच्या तेजाच्या तेजानें. २१ वाऱ्यानें. २२ देवाच्या. २३ लपंडाव. २४ ही अशेष माया आहे असें जें ज्ञान तें तुझ्या योगानें पाहणारें होतें. २५ वर्णन. २६ चांगलें.

तुझें आंग । मग आह्मां तया मुग । एके पोती[2] ॥ ११ ॥ जी ऐकार्णवाचे[3] ठाईं । पाहातां प्रळयमेघाचा पोड नाहीं । मा महानदी काई । निवडूं येती ॥ १२ ॥ कां उदयलिया भास्वत । चंद्र जैसा खद्योत[6] । आह्मां श्रुती[7] तुज आंत । तो पाड असे ॥ १३ ॥ आणि दुजयां थांव मोडे । जेथ परेशीं वैखरी बुडे । तो तूं मां कोणें तोंडें । वानावासि ॥ १४ ॥ यालागीं आतां । स्तुती सांडूनि निवांती । चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ॥ १५ ॥ तरि तूं जैसा आहासि तैसिया । नमो जी गुरुराया । मज ग्रंथोद्यम[12] फळावया । व्यव्हारीं[13] होईं ॥१६॥ आतां कृपा भांडवल सोडीं । भरीं माझे मतीची पोतडी । करीं ज्ञानपद्य[14] जोडी[15] । थोरा मातें ॥ १७ ॥ मग मी संसरेन[16] तेणें । संतांतें कर्णभूषणें । लेववीन सुलक्षणें । विवेकाचीं ॥ १८ ॥ जी गीतार्थनिधानें । काढू माझें मन । सुये स्नेहांजन । आपलें तूं ॥ १९ ॥ हे वाक्सृष्टी एकेवेळे । देखोतु माझे बुद्धीचे डोळे । तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्यबिंबें ॥ २० ॥ माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ । तो वसंत होयीं स्नेहाळ । शिरोमणी ॥२१॥ प्रमेयें[20] महापूरें । हे मतिगंगा ये थोरे । तैसा वर्ष[21] उदारें । दिठीवेनी[22] ॥ २२ ॥ अगा विश्वैकधामा । तुझा प्रसादचंद्रमा । करू मज पूर्णिमा । स्फूर्तीची[23] जी ॥ २३ ॥ जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं[24] भरितें । वोसंडेलें[25] स्फूर्तीतें । रसवृत्तीचें ॥ २४ ॥ तंव संतोषोनि श्रीगुरुराजें । ह्मणितलें विनति[26]थाजें । मांडिलें देखोनि दुजें[27] । स्तवनामिषें[28] ॥ २५ ॥ हें असो आतां वांर्जटा । तो ज्ञापनार्थ[29] करूनि गोमटा । ग्रंथार्थ दावीं उत्कंठा । भंगों नेदीं ॥ २६ ॥ हो कां जी स्वामी । हेंचि पाहत होतों मी । जे श्रीमुखें ह्मणा तुह्मीं । ग्रंथ सांग ॥ २७ ॥ परि हें म्यां केलें । कीं हें माझेनि जालें । ऐसें नाहीं ठविलें । वासनेमाजि ॥ २८ ॥ सहजें दूर्वेचा डिरु[30] । आंगेंचि तंव अमरु । वरी आला पूरु । पीयूषाच्या[31] ॥ २९ ॥ तरि आतां येणें प्रसादें । विन्यासें[32] विदग्धें । मूळशास्त्रपदें । वाखाणीन ॥ ३० ॥ परि जीवा आंतुलीकडे[33] । जैसी संदेहाची डोणि[34] बुडे । ना श्रवणीं तरि चाडे । वाढी दिसे ॥ ३१ ॥ तैसी बोली साचारी । अवतरो माझी मोधुरी[35] । माले[36] मागूनि घरीं । गुरुकृपेच्या ॥ ३२ ॥ तरि मागां त्रयोदशीं । अध्यायीं गोठी ऐसी । श्रीकृष्ण अर्जुनेंसी । चावळले[37]

---

१ मौन. २ वेळी. ३ समुद्रमय झालेल्यांत. ४ थोरीव. ५ सूर्य. ६ काजवा. ७ वेदाला. ८ द्वैताचें बळ मोडतें. ९ पहिल्या वाचेशीं. १० मुकाटयानें. ११ वाणी. १२ ग्रंथ उद्यम. १३ व्यापारी. १४ ज्ञानरूप कवितेची. १५ नफा. १६ सांवरेन. १७ ठेव. १८ घालीं. १९ विस्तृत. २० सिद्धांत वस्तूच्या. २१ वृष्टि कर. २२ कृपादृष्टीनें. २३ स्फुरणाची. २४ ज्ञानसमुद्रीं. २५ भरून सांडेल. २६ स्तुतीच्या मिषानें. २७ द्वैत मांडलेलें पाहून. २८ हें आतां निष्फळ बोलणें असो. २९ जाणावयाचा विषय. ३० अंकुर. ३१ अमृत. ३२ चतुर निरूपणानें, प्रशस्त बोलानें. ३३ आंत. ३४ नौका. ३५ वाचा. ३६ खंडोबाचे माले, (गळ्यांत नांगर घालून भिक्षा मागणें). ३७ बोलले.

॥ २३ ॥ जे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें । होइजे येणें जगें । आत्मा गुणसंगें । संसारिया[1] ॥ ३४ ॥ आणि हाचि प्रकृतिगतु[2] । सुखदुःख भोगि हेतु[3] । अथवा गुणातीतु[4] । केवळ हा ॥ ३५ ॥ तरि कैसा पां असंगा संग । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोग । सुखदुःखादि भोग । केविं तया ॥ ३६ ॥ गुण ते कैसे किती । बांधती कवणेरिती । ना तरी गुणातीतीं । चिन्हें काई ॥ ३७ ॥ एवं इया आघवेया । अर्था रूप[5] करावया । विषो येथ चौदाविया । अध्यायासी ॥ ३८ ॥ तरि तो आतां ऐसा । प्रस्तुत परियेसा । अभिप्राय विश्वेशा । वैकुंठिचा ॥ ३९ ॥ तो ह्मणे गा अर्जुना । अवधानाची सर्व सेना । मेळऊनि इया ज्ञाना । झोंबावें हो ॥ ४० ॥ आह्मीं मागां तुज बहुतीं । दाविलें हें उपपत्ती[6] । तरि आझुनी प्रतीती[7] । कुशीं[8] न रिघे ॥ ४१ ॥

**श्रीभगवानुवाच—परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥**

ह्मणौनि गा पुढती । सांगिजेल तुजप्रती । पर ह्मण ह्मणोन श्रुतीं । डांहारिलें[9] जें ॥ ४२ ॥ येऱ्हवीं ज्ञान हें आपुलें । परि परं ऐसेंनि जालें । [11]जे आवडोनि घेतलें । भव[12]-स्वर्गादिक ॥ ४३ ॥ अगा याचिकारणें । हें उत्तम सर्वांपरी मी ह्मणे । जे[13] वन्हि हें तृणें । [14]येरें ज्ञानें ॥ ४४ ॥ जियें भवस्वर्गातें जाणती । योग[15]चि चांग ह्मणती । पारखी[16] फुडी आथी । भेदीं[17] जयां ॥ ४५ ॥ तियें आघवींचि ज्ञानें । केलीं येणें स्वप्नें । जैसा वातोर्मी[18] गगनें । गिळिजती अंतीं ॥ ४६ ॥ कां उदितें रश्मिराजें[19] । लोपिलीं चंद्रादि तेजें । नाना प्रळयांबु[20]माजें । नदी नद ॥ ४७ ॥ तैसें येणें पोहलेया[21] । ज्ञानजात जाय लया । ह्मणोनियां धनंजया । उत्तम हें ॥ ४८ ॥ अनादि जे मुक्तता । आपली असे पंडुसुता । तो मोक्ष हाता येतां । होय जेणें ॥ ४९ ॥ जयाचिया प्रतीती । विचारवीरीं समस्तीं । नेदिजेचि संसृती[22] । माथा उर्धऊं[23] ॥ ५० ॥ मनें मन घालूनियां मागें । विश्रांति जालिया आंगें । ते देहीं देहा जोगे । होतीचि ना ॥ ५१ ॥ मग तें देहाचें बळें[24] । वोलांडुनि एकेचि वेळे । संवतुकीं[25] कांटाळें[26] । माझे जाले ॥ ५२ ॥

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।**
**सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥ २ ॥**

जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता । परिपूर्ण पूर्णता । माझियाचि ॥ ५३ ॥

---

१ संसारी. २ मायोपाधिक. ३ फलाशेनें. ४ त्रिगुणरहित. ५ स्पष्ट, उपक्रम. ६ युक्तीनें. ७ अनुभव. ८ मनांत शिरत नाहीं. ९ प्रसिद्ध केलें. १० पलीकडे. ११ ज्यामुळें. १२ संसार. १३ कारण, हें ज्ञान अग्निसारखें बाकीचीं ज्ञानें तृणासारखीं. १४ इतर. १५ यज्ञ. १६ परीक्षा. १७ भेदच श्रेय असे ज्यास. १८ वाऱ्याच्या लाटा. १९ सूर्य. २० वृद्धीनें. २१ उगविल्या. २२ संसार. २३ दर करूं. २४ देहाची आडकाठी. २५ समतोल. २६ ताजवा.

मी जैसा अनंतानंद । जैसाचि सत्यसंध[1] । तैसेचि ते भेद । उरेचिना ॥ ५४ ॥ जें मी अव्हटें जैसें । तें तेंचि जाले तैसें । घटभंगीं घटाकाशें । आकाश जेवीं ॥ ५५ ॥ ना तरि दीप मूळकी[2] । दीपशिखा[3] अनेकी । मिनलिया अवलोकीं । होय जैसें ॥ ५६ ॥ अर्जुना तयापरी । सरली द्वैताची वारी[4] । नांदे नामार्थ[5] एकाहारीं । मीतूंविणें ॥ ५७ ॥ येणेंचि पैं कारणें । जैं[6] पहिलें सृष्टीचें झुंपणें[7] । तैंही तया होणें । पडेचिना ॥ ५८ ॥ सृष्टीचिये सर्वादी । जयां देहाची नाहीं बांधी[8] । ते केंवि प्रळयावधी । निमतील[9] पां ॥ ५९ ॥ म्हणौनि जन्मक्षयां । अंतीत[10] धनंजया । मी जाले ज्ञाना इया । अनुसरोनि ॥ ६० ॥ ऐसी ज्ञानाची वाढी । वानिली देवें आवडी । तेविंचि पार्थाही गोडी । लावावया ॥ ६१ ॥ तंव तया जालें आन । सर्वांगीं निघाले कान । संपाई[11] अवधान । आंतला[12] पां ॥ ६२ ॥ आतां देवाचिया ऐसें । ओकळीजत[13] असे । वोरसें[14] । म्हणोनि निरूपण आकाशें । वेंटाळेना ॥ ६३ ॥ मग म्हणे गा प्रज्ञाकांता[15] । उजवली[16] आजि वक्तृत्वना[17] । जे बोला येवढा श्रोता । जोडलासी ॥ ६४ ॥ तरि एक मी अनेकीं । गोविजे देहपाशकीं । त्रिगुणीं लुब्धकीं[18] । कवणेपरी ॥ ६५ ॥ कैसा क्षेत्रयोगें । वियें इयें जगें । तें परिस सांगें । कवणेपरी ॥ ६६ ॥ पैं क्षेत्र येणें व्याजें[19] । यालागीं हें बोलिजे । जे मत्संगबीजें । भूतीं पिके ॥ ६७ ॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥**

येऱ्हवीं तरी महद्ब्रह्म[20] । यालागीं हें ऐसें नाम । जे महदादिविश्राम । शौळिका[21] हें ॥ ६८ ॥ विकारां बहुवस थोरी । अर्जुना हेंचि करी । म्हणोनि अवधारीं । महद्ब्रह्म ॥ ६९ ॥ अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदंती । सांख्यांचिया प्रतीतीं । प्रकृती हेचि ॥ ७० ॥ वेदांतीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया । असो किती बोलों वायां । अज्ञान हें ॥ ७१ ॥ आपला आपणपयां । विसर जो धनंजया । तेंचि रूप इया । अज्ञानासी ॥ ७२ ॥ आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे । वातीं[22] पाहतां जैसें । आंधारें कां ॥ ७३ ॥ हालविलिया जाये । निश्चळीं तरी होये । दुधीं जैसी साय । दुधाची ते ॥ ७४ ॥ पैं जागर ना स्वप्न । ना स्वरूप अवस्थान । ते सुषुप्ति कां घन । जैसी होय ॥ ७५ ॥ कां न वियतां[23] वायूतें । वांझें आकाश [23] रितें । तया ऐसें निरुतें ।

---

१ सत्यप्रतिज्ञ. २ मूळज्योतींत. ३ लहान लहान ज्योति. ४ येरझार. ५ संज्ञेचा अर्थ होऊन. ६ कल्पिल्यापूर्वीं. ७ रचणें. ८ बंधन. ९ नासतील. १० रहित. ११ संपूर्ण. १२ नटला. १३ व्यापित. १४ स्नेहभरित पान्ह्यानें. १५ बुद्धीच्या पति. १६ विवाहित झाली. १७ भाषाशैली. १८ पारध्यानें. १९ मिषानें. २० मूळमाया. २१ भूमि. २२ दिव्यानें. २३ वायु उत्पन्न होण्याचे पूर्वीं आकाशस्थिति असते ती.

अज्ञान गा ॥ ७६ ॥ पैल खांब कां पुरुख । ऐसा निश्चय नाहीं एक । परि काय नेणों [1]आलोक । दिसत असे ॥ ७७ ॥ तेविं वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे । परि कांहीं [2]अनारिसें । देखिजेना ॥ ७८ ॥ ना राती ना तेज । ते संधि जेविं सांज । तेवि विरुद्ध[3] ना निज[3] । ज्ञान आथी ॥ ७९ ॥ ऐसी कोण्ही एकी दशा । तिये वाद अज्ञान ऐसा । तया गुंड लियां प्रकाशा । क्षेत्रज्ञ नाम ॥ ८० ॥ आज्ञान थोरि आणिजे । आपणपें तरी नेणिजे । तें रूप जाणिजे क्षेत्रज्ञाचें[4] ॥ ८१ ॥ हाचि उभय योग । बुझें[5] बापा चांग । सत्तेचा नैसर्ग[6] । स्वभाव हा ॥ ८२ ॥ आतां अज्ञानसारिखें । वस्तु आपणपांचि देखे । परि रूपें अनेकें । नेणों कोणें ॥ ८३ ॥ जैसा रंक भ्रमला । ह्मणे जा रे मीं रावो आला । कां मूर्छित गेला । स्वर्गलोका ॥ ८४ ॥ तेविं लँचकलिया[7] दिठी । मग देखणें जें जें उठी । तया नाम सृष्टी । मीचि वियें पैं गा ॥ ८५ ॥ जैसें कां [8]स्वप्नमोहा । तो एकाकी देखे बहुवा । तोचि पाड आत्मया । स्मरणेंवीण असे ॥ ८६ ॥ हेंचि निभ्रांति । [9]प्रमेय [10]उंपलवूं पुढती । परि तूं प्रतीती । याची घे पां ॥ ८७ ॥ तरि माझी हे गृहिणी । अनादि तरुणी । अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ॥ ८८ ॥ इयें [11]नीहीं हेंचि रूप । [12]टोणें हें अति [13]उंमेप । हे निद्रितां समीप । [14]चेतां दुरी ॥ ८९ ॥ पैं माझेनिचि आंगें । [15]पहुडल्या हे जागे । आणि सत्तासंभोगें । [16]गुर्विणी होय ॥ ९० ॥ [17]महद्ब्रह्माउदरीं । प्राकृतीं आठै विकारीं । गर्भाची करीं । [18]पेलोवेली ॥ ९१ ॥ उभयसंगें पहिलें । बुद्धितत्त्व[19] प्रसवलें । बुद्धितत्त्वें उभारलें । होय मन ॥ ९२ ॥ तरुणी ममता मनाची । अहंकार तत्त्व रची । तेणें महाभूतांची । [20]अभिव्यक्ति होय ॥ ९३ ॥ आणि विषयेंद्रियां [21]गोसी । स्वभावें तंव भूतांसी । ह्मणोनि यती सारिसीं । तियेंही रूपा ॥ ९४ ॥ जालेनि विकारक्षोभें । पाठीं त्रिगुणाचें उभें । तेव्हां ये वासना गर्भें । ठायें[22]ठाव ॥ ९५ ॥ [23]रुखाचा [24]आवांका । जैसी बीजकणिकां । जीवीं बांधे उदका । [25]भेटतखेवों ॥ ९६ ॥ तैसी माझेनि संगें । अविद्या नाना जगें । [26]आर घेवों लागे । [27]अणियांची ॥ ९७ ॥ मग गर्भगोळा तया । कैसें रूप तें ये [28]आया । तें परियसें राया । सुजनाचिया ॥ ९८ ॥ पैं अंडजें[29] स्वेदजं[30] । उद्भिज्ज[31] जारज[32] । उमटती सहज । अवयव हे ॥ ९९ ॥ व्योमवायुवशें । वाढलेनि गर्भरसें । अंडज [33]उंससे । अवयव तो ॥ १०० ॥ पोटीं

---

१ आभास. २ वेगळें. ३ विरुद्ध=असत् आणि निज=सत् या दोहोंच्या मधील. ४ जीवात्म्याचें. ५ जाण. ६ साहजिक. ७ तरळली, चळली. ८ स्वप्नभ्रांतीनें. ९ तात्पर्य. १० विस्तारूं. ११ अभावरूपही आहे. १२ आकृति. १३ मोठी. १४ जागे होतां. १५ निजल्यावर. १६ गर्भार. १७ महद्ब्रह्मरूप उदरांत. १८ वृद्धि. १९ महत्तत्त्व. २० स्पष्टदशा. २१ शोधी. २२ वास्तविक. २३ वृक्षाचा. २४ आकार. २५ भेटतांच. २६ अंकुर. २७ अग्रयुक्त. २८ आकारास. २९ अंड्यांपासून उत्पन्न होणारे. ३० स्वेदापासून होणारे. ३१ जमिनीपासून. ३२ जरायूपासून. ३३ जीवन पावतो.

सूनि तमरजें । भोगळिका तोय तेजें । उठितां निपजे । स्वेदज गा ॥ १ ॥ आपपृथ्वी उत्कटें । आणि तमोमात्रें निकृष्टें । स्थावर उमटे । उद्भिज हा ॥ २ ॥ पांचां पांचही विरजीं । होती मनबुद्ध्यादि साजीं । हीं हेतु जारजीं । ऐसें जाण ॥ ३ ॥ ऐसें चारी हे सरळ । करचरणतळ । महाप्रकृति स्थूळ । तेंचि शिर ॥ ४ ॥ प्रवृत्ती पेलैलें पोट । निवृत्ती ते पाठि निट । सुरयोनी आंगें आठ । ऊर्ध्वाचीं ॥ ५ ॥ कंठ उल्हासता स्वर्ग । मृत्युलोक मध्यभाग । अधोदेश चांग । नितंबें तो ॥ ६ ॥ ऐसें लेंकरूं एक । प्रसवली हें देख । जयाचें तिन्ही लोक । बाळसें गा ॥ ७ ॥ चौऱ्याशीं लक्ष योनी । तियें कांडा पेरां सांदणी । वाढे प्रतिदिनीं । बाळक हें ॥ ८ ॥ नाना देह अवयवीं । नामाचीं लेणीं लेववी । मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ॥ ९ ॥ सृष्टी वेगळवेगळीया । तिया करांग्री आंगोळिया । भिन्नाभिमान सूदलिया । मुद्रिया तेथें ॥ ११० ॥ हें येकोलतें चराचर । अविचारित सुंदर । प्रसवोनि थोर । थोरावली ॥ ११ ॥ पैं ब्रह्मा प्रातःकाळ । विष्णू तो मध्यान्ह वेळ । सदाशिव सायंकाळ । बाळा यया ॥ १२ ॥ महा प्रळयसेजे । खेळोनि निवांत निजे । विषमज्ञानें उमजे । कल्पोदयीं ॥ १३ ॥ अर्जुना इयापरी । मिथ्यावृष्टीच्या घरीं । युगानुवृत्तीच्या करी । चोजें पाउलें ॥ १४ ॥ संकल्प जयाचा इष्ट । अहंकार तो विनटें । ऐसिया होय शेवट । ज्ञानें यया ॥ १५ ॥ आतां असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली । तेथ सांग जाली । माझी सत्ता ॥ १६ ॥

सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥

याकारणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता । अपत्य पंडुसुता । जगडंबर ॥ १७ ॥ आतां शरीरें बहुतें । देखोनि न भेद हो चित्तें । जे मनबुद्ध्यादि भूतें । एकेंचि येथें ॥ १८ ॥ हां गा एकचि देहीं । काय अनारिसे अवयव नाहीं । तेवि विचित्र विश्व पाहीं । एकचि हें ॥ १९ ॥ पैं उंचा नीचा डाहाळिया । विषमा वेगळालिया । येकाचि जेवीं जालिया । बीजाचिया ॥ १२० ॥ आणि संबंध तोही ऐसा । मृत्तिके घट लेंकें जैसा । कां पटत्व कापुसा । नातू होय ॥ २१ ॥ ना ना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा । आम्हा आणि चराचरा । संबंध तैसा ॥ २२ ॥ म्हणोनि वान्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ । तेवि मी गा सकळ । संबंध वोव ॥ २३ ॥ जालेनि जगें मी झांके । तरि जगत्वें कोण फांके । किळेवरी माणिकें । लोपिजे काई ॥ २४ ॥ अळंकारातें आलें । तरि सोनें-

१ आधिक्यानें. २ सहायानें. ३ सिद्ध. ४ पुढें झालें, दोंद वाढलें. ५ कमरेचा पाठीमागचा भाग. ६ अंगुलि, बोटें. ७ वेगळ्या अभिमानाचे पुरुष तेच आंगठ्या. ८ मिथ्यादृष्टि हेंच घर. ९ आवड. १० खेळगडी. ११ माया. १२ पृथक् पृथक्. १३ मुलगा. १४ व्यर्थ. १५ कांतीनें.

पण काइ गेलें । कीं कमळ फांकलें । कमळत्वा मुकें ॥ २५ ॥ सांग पां धनंजया । अवयवीं अवयविया । आच्छादिलें कीं तया । तेंचि रूप ॥ २६ ॥ विरूढलिया जोंधळा । कणिसाचा निर्वाळा । वेंचला कीं आगळा । दिसतसे ॥ २७ ॥ ह्मणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें । तैसा नोहें उखितें । आघवें मीचि ॥ २८ ॥ हा तूं साचोकारा । निश्चयाचा खरा । गांठीं बांध वीरा । जीवाचिये ॥ २९ ॥ आतां मिया मी दाखविला । शरीरीं वेगळाला । गुणीं मीचि बांधला । ऐसा आवडें ॥ १३० ॥ जैसें स्वप्नीं आपण । उठूनियां आत्ममरण । भोगिजे गा जाण । कपिध्वजा ॥ ३१ ॥ कां कँवळातें डोळे । प्रकाशूनि पिवळे । देखती तेंही काळे । तयांसीचि ॥ ३२ ॥ नाना सूर्य प्रकाशें । प्रकटीतैं अभ्र भासे । तो लोपला हेंही दिसे । सूर्येंचि कीं ॥ ३३ ॥ पैं आपणपेनि जालिया । छाया गा आपुलिया । पाहोनि बिहालियां । आन आहे ॥ ३४ ॥ तैसीं इयें नाना देहें । दाऊनि मी नाना होयें । तेथ ऐसा जो बंध आहे । तेंही देखें ॥ ३५ ॥ बंधेंचि कीं न बंधिजे । हें जाणणें मंज माझें । [१०] नेणणेनि उपजे । आपलेनि ॥ ३६ ॥ तरि कोणें गुणें कैसा । मजचि मीं बंध ऐसा । आवडे तें परियेसा । अर्जुनदेवा ॥ ३७ ॥ गुण ते किती किंधर्म । काय ययां रूपनाम । कें जाले हें वर्म । अवधारीं पां ॥ ३८ ॥

**सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।**
**निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययं ॥ ५ ॥**

तरि सत्वरजतम । तिघांसि हें नाम । आणि प्रकृति जन्म- । भूमिका ययां ॥ ३९ ॥ येथ सत्व तें उत्तम । रज तें मध्यम । तिहींमाजि तम । सावियेंधारें ॥ १४० ॥ हें एकेचि वृत्तीच्या ठायीं । त्रिगुणत्व आवडे पाहीं । वेंयसात्रय देहीं । येकीं जेविं ॥ ४१ ॥ कां मिनलेनि [१५] कीडें । जंवजंव तुंक वाढे । तंवतंव सोनें हीन पडे । पांचिकां कसीं ॥ ४२ ॥ पैं सावधपण जैसें । वाहविलें आळसें । सुषुप्ती बैसे । घेणावोनि ॥ ४३ ॥ तैसी अज्ञानांगीकारें । निगाली वृत्ति विखुरे । ते सत्वरजद्वारें । तमही होय ॥ ४४ ॥ अर्जुना गा जाण । ययां नाम गुण । आतां दाखऊं खुण । बांधती ते ॥ ४५ ॥ तरि क्षेत्रज्ञदशे । आत्मा [२०] मोटका [२१] पैसे । हें देह मी ऐसें । मुहूर्त करी ॥ ४६ ॥ आजन्ममर-

---

१ दाखला. २ उणा झाला. ३ पाहावें. ४ संपूर्ण. ५ सिद्धांत. ६ वाटे. ७ कावीळ रोग. ८ नाहींतरी. ९ भ्यालास. १० माझ्या अज्ञानानें मी बद्ध आहें किंवा अबद्ध आहें हे धर्म उत्पन्न होतात ( या दोनी गोष्टी अज्ञानमूलक आहेत ). ११ काय धर्माचे. १२ जन्मस्थान. १३ सहाच्या आधारानें. १४ बाल्य, तारुण्य व वार्धक्य. १५ डांकानें. १६ वजन. १७ हिणकटाच्या फिक्या कसानें. १८ दृढ होऊन. १९ पसरें. २० अल्प. २१ होय. २२ प्रारंभ करी.

णांतीं । देहधर्मीं समस्तीं । महत्वाची सूती[1] । घे ना जंव ॥ ४७ ॥ जैसी मीनाच्या तोंडीं । पडेना जंव उंडी । तंव गळ आसुडी[2] । जैळपारधी[3] ॥ ४८ ॥

### तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
### सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चाऽनघ ॥ ६ ॥

तेविं सत्वें लुब्धकें[4] । सुखज्ञानाचीं पाशकें[5] । वोढिजेती मग खुडके[6] । मृग जैसा ॥ ४९ ॥ मग ज्ञानें चडफडी । जाणिवेचे खुरखोडी[7] । स्वयं सुख हें धाडी । हातींचें गा ॥ १५० ॥ तेव्हां विद्यामानें तोखे[8] । लाभमात्रें हरिखे । मी संतुष्ट हेंही देखे । श्लाघों[9] लागे ॥ ५१ ॥ ह्मणे भाग्य ना माझें । आजि सुखिये नाहीं दुजे । विकाराष्टकें[10] फुंजे । सात्विकाचेनि ॥ ५२ ॥ आणि येणेंही न सरे । लांकणें लागे दुसरें । जे विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ॥ ५३ ॥ आपणचि ज्ञानस्वरूप आहे । तें गेलें हें दुःख न वाहे । कीं विषय[12]-ज्ञानें होये । गगनायेवढा ॥ ५४ ॥ रावो जैसा स्वप्नीं । रंकपणें रिघे धौंनीं[13] । तो दोंदोंणा[14] मानी । इंद्र ना मी ॥ ५५ ॥ तैसें गा देहातीता । जालेया देहवंता । हों लागे पंडुसुता । बाह्यज्ञानें ॥ ५६ ॥ प्रवृत्तिशास्त्र बुझे । यज्ञविद्या उमजे । किंबहुना सुंझे[15] । स्वर्गवरी ॥ ५७ ॥ आणि ह्मणे आजि आन । मीवांचूनि नाहीं सज्ञान । चातुर्यचंद्रा गगन । चित्त माझें ॥ ५८ ॥ ऐसें सत्व सुखज्ञानीं । जीवासि लाउनि कांनी[16] । बैलाची करी वौंनी[17] । पांगुळाचिया ॥ ५९ ॥ आतां हाचि शरीरी । रजें जियापरी । बांधिजे तें अवधारीं । सांगिजेल ॥ १६० ॥

### रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवं ।
### तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनं ॥ ७ ॥

हें रज याचि कारणें । जीवातें रंजऊं जाणें । हें अभिलाखाचें[18] तरुणें । सदान्नि गा ॥ ६१ ॥ हें जीवीं मोटकें[19] रिगे । आणि कामाच्या मदीं लागे । मग वारया वेंळंघे[20] । तृष्णेचिया ॥ ६२ ॥ घृतें आंवुखूनि[21] आगियाळें[22] । वज्राग्नीचें[23] सांतुकेलें[24] । आतां बहु थेंकुलें[25] । आहे तेथ ॥ ६३ ॥ तैसी खवळे चाड । होय दुःखासकट गोड । इंद्रश्रीहि सांकड[26] । गमों लागे ॥ ६४ ॥ तैसी तृष्णा[27] वाढिनलिया । मेरूही[28] हाता आलिया । तऱ्ही

---

१ अभिमान. २ हिसका देतो. ३ कोळा. ४ पारधीनें. ५ सौख्य अशी समजूत हाच कोणी एक पाश त्यानें ओढले जातात. ६ तडफडे. ७ लाथाळी करून. ८ सुखावे. ९ म्हणो. १० सत्वाचे अष्टविकार त्यांनीं फुगे. ११ बंधन. १२ पदार्थज्ञानानें. १३ शहरीं. १४ भिक्षेच्या दोन दाण्यांनीं फुगलेला. १५ समजे. १६ काढण्या, दाव्याची शेवटें. १७ बैलासारखा. १८ विषय भोगाची इच्छा. १९ अल्प. २० चिकटे. २१ शिंपडून. २२ अग्निकुंड. २३ वज्रासन-आधारमुद्रेच्या अग्नीचें. २४ पेटविलें. २५ थोडें. २६ संकाचित. २७ विषयेच्छा. २८ सुवर्णपर्वत.

ह्मणे एखादिया । [1]दारुणा वळघों ॥ ६५ ॥ जीविताची [2]कुरोंडी । वोंवाळूं लागे [3]कवडी । मानी तृणाचिये [4]जोडी । कृतकृत्यता ॥ ६६ ॥ आजि असतें वेंचिजेल । परि पाहे पां कीजेल । ऐसा [6]पांगी वडील । व्यवसाय मांडी ॥ ६७ ॥ ह्मणे स्वर्गा हन जावें । तरि काय तेथें खावें । इयालागीं धांवे । याग करूं ॥ ६८ ॥ व्रतापाठीं व्रतें । आचरे इष्टापूर्तें । काम्यवांचूनि हातें । शिवणें नाहीं ॥ ६९ ॥ पैं ग्रीष्मांतींचा वारा । विसांवो नेणें वीरा । तैसा न ह्मणे व्यापारा । रात्र दिवस ॥ १७० ॥ काय चंचळ मासा । कामिनीकटाक्ष जैसा । लवलाहो तैसा । विजूही नाहीं ॥ ७१ ॥ तेतुलेनि गा वेगें । स्वर्गसंसारपांगें । आगिमाजि रिगे । क्रियांचिये ॥ ७२ ॥ ऐसा देहीं देहावेगळा । [10]ले तृष्णेचिया सांखळा । खटाटोप वाहे गळां । व्यापाराचा ॥ ७३ ॥ हें रजोगुणाचें दारुण । देहीं देहियासि बंधन । परिस आतां [11]विंदाण । तमाचें तें ॥ ७४ ॥

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥**

व्यवहाराचेहि डोळे । मंद जेणें [12]पडळें । मोहरात्रीचें काळें । [13]मेहुडें जैसें ॥ ७५ ॥ अज्ञानाचें [14]जियालें । जया एका लागलें । जेणें विश्व भुललें । नाचत असे ॥ ७६ ॥ अविवेकमहामंत्र । जें [15]मौर्ख्यमद्याचें पात्र । हें असो मोहनास्त्र । जीवांसि जें ॥७७॥ पार्था तें गा तम । [16]रचूनि ऐसें [17]वर्म । [18]चौखुंरी देहात्म । [19]मानियातें ॥ ७८ ॥ हें येकचि कीर शरीरीं । माजों लागे चराचरीं । आणि तेथ दुसरी । गोठी नाहीं ॥ ७९ ॥ सर्वेंद्रियां जाड्य । मनामाजि मौढ्य । [20]माल्हाती दार्ढ्य । आलस्याचें ॥ १८० ॥ आंगें आंग मोडामोडी । कार्यजातीं अनावडी । तुसती [21]परवडी । जांभयांची ॥ ८१ ॥ उघडिया चि दिठी । देखणें नाहीं किरीटी । [22]नाळवितांचि उठी । वो ह्मणौनि ॥ ८२ ॥ पडिलिये [23]धोंडी । [24]नेणे कानी मुरडी । तयाचि परी मुरकुंडी । उकलूं नेणें ॥ ८३ ॥ पृथ्वी पाताळां जावो । कां आकाशाही वरी येवो । परी उठणें हा भावो । उपजों नेणें ॥ ८४ ॥ उचितानुचित आघवें । [25]झांसुरतां नाठवे जीवें । जेथिंचा तेथ लोळावें । ऐसी [26]मेधा ॥ ८५ ॥ उभऊनि करतळें । [27]पडिघाये [28]कपोळें । पायाचें [29]शिरियाळें । मांडूं लागे ॥ ८६ ॥ आणि निद्रेविषयीं चांग । जीवीं आथि [30]लाग । झोंपीं जातां स्वर्ग । वावो ह्मणे ॥ ८७ ॥ [31]ब्रह्मायु होइजे । मा निजे-

१ भयंकर गोष्टीला. २ ओंवाळणी. ३ कवडीकरितां. ४ लाभानें. ५ उद्यां. ६ आशेनें. ७ मोठा. ८ चपल. ९ इच्छेनें. १० घेई. ११ कौशल्य. १२ पडद्यानें. १३ मेघ. १४ जिव्हाळा. १५ मूर्खपण हेंच मद्य. १६ करून. १७ लक्षण. १८ चहूंकडून ताणून बांधी. १९ देहात्मा मानणारातें. २० आश्रय पावे, अंगिकारी. २१ आवृत्ति. २२ हाक न मारतां. २३ शिळा. २४ कोपऱ्यावर फिरणें ( कुशी वळणें ) होत नाहीं २५ आळस येतां. २६ बुद्धि. २७ ताडी. २८ गाल, डोकें. २९ चाळे. ३० प्राप्तीची इच्छा. ३१ ब्रह्मदेवाचें आयुष्य.

लियाचि असिजे । हें वांचूनि दुजें । व्यसन नाहीं ॥ ८८ ॥ कां वाटे जातां वोघें[1] । कैंल्हातां[2] ही डोळा लागे । अमृतही परी नेघे । जरी निद आली ॥ ८९ ॥ तेविंचि आक्रोशबळें[3] । व्यापारे कोणे एके वेळे । निगालें तरी आंधळें । रोषें जैसें ॥ १९० ॥ केधवां कैसें राहाटावें । कोणेसीं काय बोलावें । हें ठाकतें[4] कीं नागवे । हेंही नेणे ॥ ९१ ॥ वणवा मियां आघवा । पाँखें[6] पुसोनि घेयावा । पतंग या हांवाँ । घाली जेविं ॥ ९२ ॥ तैसा वळघे साहसा । अकरणींचि[9] धिंवसा । किंबहुना ऐसा । प्रमादु रुजे ॥ ९३ ॥ एवं निद्रालस्यप्रमादीं । तम इया त्रिबंधीं । बांधे निरुपाधि । चोखटातें[11] ॥ ९४ ॥ जैसा वन्हि काष्ठीं भरे । तैं दिसे काष्ठाकारें । व्योम घटें आवरे । तैं घटाकाश ॥ ९५ ॥ नाना सरोवर भरलें ॥ तैं चंद्रत्व तेथें बिंबलें । तैसें गुणपाशीं बांधलें । आत्मत्वगमे ॥ ९६ ॥

सत्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥
रजस्तमश्चाऽभिभूय सत्वं भवति भारत ।
रजः सत्वं तमश्चैव तमः सत्वं रजस्तथा ॥ १० ॥

पैं परिहरूनि कफवात । जैं देहीं आटोपे पित्त । तैं करी संतप्त । देह जेविं ॥ ९७ ॥ कां वर्ष[12] आतप[13] जैसें । जिणौनि शीतचि दिसे । तेव्हां होय हिंव ऐसें । आकाश हें ॥ ९८ ॥ नाना स्वप्न जागृती । लोपूनि ये सुषुप्ती । तैं क्षण एक चित्तवृत्ती । तेचि होय ॥ ९९ ॥ तैसीं रजतमें हारवी । जैं सत्व माजु मिरवी । तैं जीवाकरवीं म्हणवी । सुखिया ना मी ॥ २०० ॥ तैसेंचि सत्व रज । लोपूनि तमाचें भोजें[14] । वळघे तैं सहज । प्रमादी[15] होय ॥ १ ॥ तयाचि गा परिपाठीं । सत्व तमातें पोटीं । घालूनि जेव्हां उठी । रजोगुण ॥ २ ॥ तेव्हां कर्मावांचूनि कांहीं । आन गोमटें नाहीं । ऐसें मानी देहीं । देहराज ॥ ३ ॥ त्रिगुणनिरूपण । तीं[16] श्लोकीं सांगीतलें जाण । आतां सत्वादिवृद्धिलक्षण । सादर परियेसा ॥ ४ ॥

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्वमित्युत ॥ ११ ॥
लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।
रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥
अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।
तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥

---

१ सहज. २ कलत, उगाच. ३ बलात्कारें. ४ साध्य. ५ असाध्य. ६ पंखांनीं. ७ इच्छेनें. ८ प्रवृत्त होतो. ९ न करण्याच्या कामीं. १० धैर्य. ११ चांगल्यास. १२ वृष्टि. १३ उष्मा. १४ महत्व. १५ असावध. १६ तीन श्लोकांनीं.

यदा सत्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।
तदोत्तमविदाँल्लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥

रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।
तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥

पैं रजतमविजयें । सत्व गा देहीं इये । वाढतां चिन्हें तियें । ऐसीं होती ॥ ५ ॥ जे प्रज्ञा आंतुलीकडे । न समाती बाहेरी [1]वोसंडे । वसंतीं पद्मखंडें । द्रुती जैसी ॥ ६ ॥ सर्वेंद्रियांच्या आंगणीं । विवेक करी राबणी । साचचि करचरणीं । होती डोळे ॥ ७ ॥ राजहंसापुढें । चांचूचें आंगरडें । तोडी जेवि झगडे । क्षीरनीराचे ॥ ८ ॥ तेवि दोषादोष विवेकीं । इंद्रियेंचि होती पारखीं । नियम बारे पौंयिकीं । वोळगे तैं ॥ ९ ॥ नायिकणें तें कानचि बोळी । न पाहणें तें दिठीचि गाळी । अवाच्य तें टाळी । जीभचि गा ॥ २१० ॥ वातीपुढां जैसें । पळों लागे काळवसें । निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥ ११ ॥ धाराधरकाळें । महानदी उचंबळे । तैसी बुद्धी पघळे । शास्त्रजातीं ॥ १२ ॥ अगा पुनवेच्या दिवशीं । चंद्रप्रभा धांवे आकाशीं । ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंघ ॥ १३ ॥ वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे । मानस विटे । विषयांवरी ॥ १४ ॥ एवं सत्व वाढे । तैं हें चिन्ह फुडें । आणि निधनहीं घडे । तेव्हांचि जरी ॥ १५ ॥ कां पैं[11]हालेनि सुयौंणें । जालया पै[12]रगुणें । पढियंतें पाहुणें । स्वर्गौनि ये ॥ १६ ॥ तरि जैसीचि घरींची संपत्ती । आणि तैसीच औदार्यधैर्यवृत्ती । मा पै[13]रत्रा आणि कीर्ती । कां नोहावें ॥ १७ ॥ मग गोमटेया तया । [14]जैंवळी असे धनंजया । तेवि सत्वें जाणे देहा । कें आथि गा ॥ १८ ॥ जे स्वगुणीं उद्भट । घेऊनि सत्व चोखट । निघे सांडूनि को[15]पेंटें । भोगे[16]मोक्ष हें ॥ १९ ॥ अवचटें ऐसा जो जाये । तो सत्वाचाचि नवा होये । किंबहुना जन्म लाहे । ज्ञानियांमाजि ॥ २२० ॥ सांग पां धनुर्धरा । रावो रायपणें डोंगरा । गेलिया अपुरा । होय काई ॥ २१ ॥ ना तरि येथिंचा दिवा । नेलिया सेजियें[17] गांवा । तो तेथें तरि पांडवा । दीपचि कीं ॥ २२ ॥ तैसी ते सत्वशुद्धी । आगळी ज्ञानेंसी वृद्धी । तरंगे[18]वो लागे बुद्धी । विवेकावरी ॥ २३ ॥ पैं [19]महदादिपरिपाटी । विचारूनि शेवटीं । विचारासकट पोटीं । जिरोनि जाय ॥ २४ ॥ [20]छत्तीसां सततीसावें । चोविसां पंचवीसावें । तिन्हीं[21] नुरोनि स्वभावें । [22]चतुर्थ जें ॥ २५ ॥ ऐसें सर्व जें सर्वोत्तम । जालें असे जया सुगम । तयासवें निरुपम । लाहे देह

---

१ सांडे. २ सुवास. ३ अग्र. ४ चाकरी करण्यास. ५ दूर टाकी. ६ अंधार. ७ पर्जन्यकाळीं. ८ पुष्कळ. ९ आकुंचित होई. १० उदय पावल्यानें. ११ सुकाळ. १२ पक्वान्न, सण. १३ स्वर्ग. १४ शेजाऱ्यासारखें. १५ शरीर. १६ विषयभोगीं सामर्थ्यवान्. १७ शेजारच्या. १८ पोहूं लागे. १९ महत्तत्वादिकांचा क्रम. २० छत्तीस तत्वांला. २१ देहत्रय व अवस्थादित्रय. २२ ब्रह्म.

॥ २६ ॥ इयाचि परी देख । तमसत्व अधोमुख । [1]बैसौनि जैं आगळीक । धरी रज ॥ २७ ॥ आपलिया कार्याचा । [2]धुमाड [3]गांवीं देहाचा । माजवी तैं चिन्हांचा । उदय ऐसा ॥ २८ ॥ [4]पांजरली वाहटुळी । करी वेगळ वेंटाळी । तैसी विषयीं [5]सैरळी । इंद्रियां होय ॥ २९ ॥ परदारादिक पडे । परि विरुद्ध ऐसें नावडे । मग शेळियेचेनि तोंडें । [6]सैंघ [7]चारी ॥ २३० ॥ हा ठायवरि लोभ । करी स्वैरत्वाचा राब । वेंटाळितां अलाभ । तें तें उरे ॥ ३१ ॥ आणि आड पडलिया । उद्यमजातां भलतिया । प्रवृत्ती धनंजया । हात न काढी ॥ ३२ ॥ तेंविचि एखादा [8]प्रासाद । कां करावा अश्वमेध । ऐसा अचाट छंद । घेऊनि उठी ॥ ३३ ॥ नगरेंचि रचावीं । जळाशयें निर्मावीं । महावनें लावावीं । नानाविधें ॥ ३४ ॥ ऐसैसां अफाटीं कर्मीं । समारंभ [9]उपक्रमी । आणि [10]दृष्टादृष्टकामीं । पुरें न म्हणे ॥ ३५ ॥ सागरही [11]सांडीं पडे । आगी न लाहे तीन [12]कैवडे । ऐसें [13]अभिलाषीं जोडे । दुर्भरत्व ॥ ३६ ॥ [14]स्पृहा मना पुढां । आशेचा घे [15]दवंडा । विश्व [16]घांपे चाडा । पायांतळीं ॥ ३७ ॥ इत्यादि वाढतां रजीं । इयें चिन्हें होती [17]सौजीं । आणि ऐशा समाजीं । वेंचे जरी देह ॥ ३८ ॥ तरि आघवाचि इहीं । [18]परिवारला आनी देहीं । रिगे परि योनिही । मानुषीचि ॥ ३९ ॥ [19]सुरवाडेंसि भिकारी । वसो पां राजमंदिरीं । तरी काय अवधारीं । रावो होइल ॥ २४० ॥ बैल तेथें [20]करवाडें । हें न चुके गा फुडें । नेइजो कां वऱ्हाडें । समर्थाचेनि ॥ ४१ ॥ म्हणौनि व्यापाराच्या हातीं । [21]उसंतु [22]देहा ना रातीं । तैसयाच्चिये [23]पांतीं । जुंपिजे तो ॥ ४२ ॥ [24]कर्मजडांच्या ठायीं । किंबहुना होय देहीं । जो रजोवृत्तीच्या डोहीं । बुडोनि [25]निमे ॥ ४३ ॥ मग तैसाचि पुढती । रजसत्ववृत्ती । गिळूनि ये उन्नती । तमोगुण ॥ ४४ ॥ तेंचि जियें [26]लिंगें । देहींचीं सबाह्य सांगें । तियें परिस चांगें । श्रोत्रबळें ॥ ४५ ॥ तरी होय ऐसें मन । जैसें रविचंद्रहीन । रात्रीचें कां गगन । अंवसेचियें ॥४६॥ तैसें अंतर [27]अँसोस । होय स्फूर्तिहीन [28]उद्वस । विचाराची भाष । हारपे तैं ॥ ४७ ॥ बुद्धि [29]मेचवेना धोंडी । हा ठायवरी [30]मवाळें सांडी । आठवो देशधडी । जाला दिसे ॥ ४८ ॥ अविवेकाचेनि माजें । सबाह्यशरीर गाजे । एकलेनि घेपे दीजे । मौढ्य तेथ ॥ ४९ ॥ आचारभंगाचीं हाडें । रूपती इंद्रियांपुढें । [31]मेर जरी तणे कडे । क्रिया जाय ॥ २५० ॥ पैं आणिकही एक दिसे । जे दुष्कृतीं चित्त उल्हासे । आंधारीं देखणें जैसें । [32]डुडुळाचें ॥ ५१ ॥ तैसें निषिद्धाचेनि नांवें । भलतेही भरे हांवे । तियेविषयीं [33]धांवे ।

१ बसवून. २ धूर. ३ शरीररूप गांवांत. ४ उठलेली. ५ मोकळीक. ६ बहुत. ७ स्वेच्छाचारी वर्तन. ८ देवालयादि. ९ प्रारंभ करी. १० स्थूलसूक्ष्म. ११ पराजय पावे. १२ कवड्या. १३ अपहाराविषयीं. १४ इच्छा. १५ धांव. १६ घातलें जातें. १७ सिद्ध. १८ आशा इत्यादिक परिवारासह. १९ सुखासहित. २० कडबा. २१ विसावा. २२ दिवसा. २३ पंक्तीला. २४ कर्मांविषयीं श्रद्धाळूंच्या. २५ मरे. २६ चिन्हें. २७ गद्गद. २८ शून्य. २९ इच्छवेना. ३० मृदुपण ३१ मरेल जर तर त्या कडेनें क्रिया जाईल. ३२ घुबडाचें. ३३ धांव.

घेती केरणें ॥ ५२ ॥ मदिरा न घेतां डुले । सन्निपातेंवीण बरळे । निष्प्रेमेंचि भुले । पिसें जैसें ॥ ५३ ॥ चित्त तरी गेलें आहे । परि उन्ममी तें नोहे । ऐसें मोल्हातिजे मोहें । माजिरेनि ॥ ५४ ॥ किंबहुना ऐसैसीं । इयें चिन्हें तम पोषी । जें वाढे आयितीसी । आपुलिया ॥ ५५ ॥ आणि हेंचि होय प्रसंगें । मरणाचें जरी पडे खागें । तरि तेतुलेनि निगे । तमेंसीं तो ॥ ५६ ॥ राई राईपण बीजीं । सांठवूनियां अंग त्यजी । मग निरूढे तैं तुजी । गोठी आहे ॥ ५७ ॥ पैं होऊनि दीपकलिका । येरु आगी विझो कां । कां जेथ लागे तेथ असका । तोचि आहे ॥ ५८ ॥ म्हणोनि तमाचिये लोथें । बांधोनियां संकल्पातें । देह जाय तैं मागौतें । तमाचेंचि होय ॥ ५९ ॥ आतां काय येणें बहु बोलें । जो तमोवृद्धि मृत्यु लाहे । तो पशु कां पक्षी होये । झाडा हा कृमी ॥ २६० ॥

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलम् ।**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥**

येणेंचि पैं कारणें । जें निपजे सत्वगुणें । तें सुकृत ऐसें म्हणे । श्रौतसमो ॥ ६१ ॥ म्हणौनि तया निर्मळा । सुखज्ञानी सरळा । अपूर्व ये फळा । सात्विक तें ॥ ६२ ॥ मग राजसा जिया क्रिया । तया इंद्रीवणी फळलिया । जे सुखें चितारूनियां । फळती दुःखें ॥ ६३ ॥ कां निंबोळियेचें पिक । वरि गोड आंत विख । तैसें तें राजस देख । क्रियाफळ ॥ ६४ ॥ तामस कर्म जितुकें । अज्ञान फळेंचि पिके । विषांकुर विखें । जियापरी ॥ ६५ ॥

**सत्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥**

म्हणौनि बारे अर्जुना । येथ सत्वचि हेतु ज्ञाना । जैसा कां दिनमाना । सूर्य हा पैं ॥ ६६ ॥ आणि तैसेंचि हें जाण । लोभासि रज कारण । आपलें विस्मरण । अद्वैता जेवीं ॥ ६७ ॥ मोह अज्ञान प्रमादा । ययां मैळेया दोषवृंदा । पुढती पुढती प्रबुद्धा । तमचि मूळ ॥ ६८ ॥ ऐसे विचाराच्या डोळां । तिन्हीं गुण वेगळवेगळां । दाविले जैसा आंवळा । तळहातींचा ॥ ६९ ॥ तंव रजतमें दोन्हीं । देखिलीं प्रौढपतनीं । सत्वावांचुनि नाणी । ज्ञानाकडे ॥ २७० ॥ म्हणौनि सात्विकवृत्ती । एक जाले जन्मव्रती । सर्व त्यागें चतुर्थी । भक्ति जैसी ॥ ७१ ॥

---

१ इंद्रियें. २ मद्य, दारू. ३ मनाचा लय जेंत होतो ती पांचवी अवस्था. ४ उन्मत्त. ५ उन्मत्तपणानें. ६ सामुग्रीसहित. ७ खळें. ८ वाढे. ९ सर्व. १० गांठोड्यांत, मोटेंत. ११ बहुभाषणानें. १२ श्रुतिसमुदाय. १३ सहज. १४ कडूवृंदावन. १५ दाखवून, रंगवून. १६ असावधपणा. १७ दोषांचा समुदाय. १८ आजन्म व्रताचरण करणारे. १९ चवथी ज्ञानभक्ति.

**ऊर्ध्वं गच्छंति सत्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः ।**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः ॥ १८ ॥**

तैसें सत्वाचेनि नटनाचें । असणें जाणें जयांचें । ते तनुत्यागीं स्वर्गींचे । राय होती ॥ ७२ ॥ इयाचि परी रजें । जिहीं कां [2]जीजे मरिजे । तिहीं मनुष्य होइजे । मृत्युलोकीं ॥ ७३ ॥ तेथ सुखदुःखाचें खिचटें । जेविजे एकेचि ताटें । जेथ इये मरणवाटे । पडिलें नुठी ॥ ७४ ॥ आणि तयाचिस्थिती तमीं । जे वाढोनि निर्मती भोगक्षमीं । ते घेती नरकभूमी । मूळपत्र ॥ ७५ ॥ एवं वस्तूचिया सत्ता । त्रिगुणासि पंडुसुता । दाविली सकारणता । आघवीचि ॥ ७६ ॥ पैं वस्तु वस्तुत्वें असिकें । तें आपणंपें गुणासारिखें । देखोनि कार्यविशेखें । अनुकरें गा ॥ ७७ ॥ जैसें कां स्वमीचेनि राजे । जें परचक्र देखिजे । हारि जैत होइजे । आपणचि ॥ ७८ ॥ तैसें मध्योर्ध्व अध । जे हे गुणवृत्तिभेद । ते दृष्टिवांचुनि शुद्ध । वस्तुचि असे ॥ ७९ ॥

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टाऽनुपश्यति ।**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥**

परि हे वोहणी असो । तरि तुज आन न दिसो । परिसें ते सांगतसों । मागील गोष्टी ॥ २८० ॥ तरि ऐसें जाणिजे । सामर्थ्यें तिन्ही सहजें । होती देहव्याजें । गुणचि हे ॥ ८१ ॥ इंधनाचेनि आकारें । अग्नि जैसा अवतरे । कां आत्रवेनि तरुवरें । भूमिरस ॥ ८२ ॥ ना ना दहियाचेनि मिसें । परिणमे दूधचि जैसें । कां मूर्त होय उसें । गोड जेवीं ॥ ८३ ॥ तैसें हें सांतःकरण । देहचि होती त्रिगुण । ह्मणोनि बंधासि कारण । घडे कीर ॥ ८४ ॥ परि चोर्ज हें धनुर्धरा । जे ही गुंफिरी । मोक्षाचा संसारा । उणा नोहे ॥ ८५ ॥ त्रिगुण आपलालिया धर्में । [20]देहींचें मागुतें सीउमें । चाळितांही न [22]खोमे । गुणातीतता ॥ ८६ ॥ ऐसी मुक्ती असे सहज । तें आतां परिसऊं तुज । जे तूं ज्ञानांबुज । द्विरेफें कीं ॥ ८७ ॥ आणि गुणीं गुणाजोगें । चैतन्य नोहे मागें । बोलिलों तें [24]वागें । तेवींचि हें ॥ ८८ ॥ तरि पार्था जैं ऐसें । बोधलेनि जीवें दिसे । स्वम कां जैसें । चेइलेनि ॥ ८९ ॥ ना तरी आपण जळीं । बिंबलों [25]तीरोनि न्याहाळी । चलण

---

१ विकसितपणानें. २ वांचावें. ३ खिचडी. ४ देहच ताट त्यांत. ५ त्याचप्रमाणें. ६ मरण पावती. ७ देहीं. ८ आमंत्रणचिठी. ९ संपूर्ण. १० गुणानुकूल आत्मस्वरूप पाहून. ११ जय, पराजय. १२ गुणदृष्टीवांचून. १३ बोलणें. १४ देहाच्या निमित्तानें. १५ साकार दिसे. १६ पाणी. १७ मनासह. १८ नवल. १९ एवढयाही गुंतागुंतीनें ( बंधनानें ) मोक्षाचे वृद्धीस न्यूनता नाहीं. २० देहींचें मागचें पुढचें कर्म. २१ समोर. २२ उणीं न होणें. २३ ज्ञानकमलावरचा भ्रमर. २४ तात्पर्य. २५ तीरावर उभे राहून.

होतां कल्लोळीं । अनेकधा ॥ २९० ॥ कां नटलेनि लाघवें । नट जैसा न झकवे । तैसें गुणजात देखावें । न होनियां ॥ ९१ ॥ पैं ऋतुत्रय आकाशें । धरूनियांही जैसें । नेणिजेचि येवों वैसें । वेगळेपणा ॥ ९२ ॥ तैसें गुणीं गुणापरौतें । जें आपणवें असे आयितें । तिये अहं बैसे अहंते । मुळकेचिये ॥ ९३ ॥ पैं तेथूनि मग पाहतां । म्हणे साक्षी मी अकर्ता । हे गुणचि क्रियाजातां । नियोजित ॥ ९४ ॥ सत्वरजतमाच्या । भेदीं प्रसर कर्माचा । होत असे तो गुणांचा । विकार हा ॥ ९५ ॥ ययामाजि मी ऐसा । वनीं कां वसंत जैसा । वनलक्ष्मी विलासा । हेतुभूत ॥ ९६ ॥ कां तारांगणीं लोपावें । सूर्यकांतीं उद्दीपावें । कमळीं विकासावें । जावें तमें ॥ ९७ ॥ यया कोणाचें कांहीं । सविता जैसा देखत नाहीं । तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ॥ ९८ ॥ मी दाउनी गुण देखे । गुणता हे मियां [११]पोखे । ययाचेनि [१२]निःशेषें । उरे तें मी ॥ ९९ ॥ ऐसेनि विवेकें जया । उदय होय धनंजया । ये गुणातीतता तया । [१३]ऊर्ध्वपंथें ॥ ३०० ॥

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥**

आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणे अचुक । जे ज्ञानें केलें टीक[१४] । तयाचिवरी ॥ १ ॥ किंबहुना पंडुसुता । ऐसी तो मोंजी सत्ता । पावे जैसी सरिता । सिंधुत्व गा ॥ २ ॥ नळिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला । तैसा मूळअहंता ठाकिला । तो मी म्हणौनि ॥ ३ ॥ अगा अज्ञानाचिया निदीं । जो घोरेंत होता बदबदां । तो स्वरूपीं प्रबुद्धा । चेइला कीं ॥ ४ ॥ पैं बुद्धिभेदाचा आरिसा । तयाहातोनि पडिला वीरेशा । म्हणौनि प्रकृति-मुखाभासा । मुकला तो ॥ ५ ॥ देहाभिमानाचा वारा । आतां वाजों ठेला वीरा । तैं ऐक्य वीचिसागरां । जीवेशां हें ॥ ६ ॥ म्हणौनि मद्भावेंसीं । प्राप्ति पाविजे तेणेंसरिसी । वर्षांतीं आकाशीं । घनजात जेवीं ॥ ७ ॥ तेवि मीं होऊनि निरुता । मग देहींचि ये असतां । नागवे देहसंभूतां । गुणांसि तो ॥ ८ ॥ जैसा भिंगाचेनि घरें । दीपप्रकाश नावरे । कां न विझेचि सागरें । वडवानळ ॥ ९ ॥ तैसा आलागेला गुणाचा बोधु न मैळे तयाचा । तो देहीं जैसा व्योमींचा । चंद्र जळीं ॥ ३१० ॥ तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी । देहीं नाचविती बोंगडीं । तो पाहोंही न धाडी । अहंतेतें ॥ ११ ॥

---

१ लाटा. २ ठकबाजीनें. ३ वश्य, 'वोसे' अशा पाठीं कर्मीपणा. ४ गुणांत असून जें गुणांच्या पलीकडे आहे. ५ मूळवस्तूप्रत. ६ सर्व कर्मांला. ७ योजितात. ८ विस्तार. ९ शोभेला. १० प्रकाशावें. ११ पोसली जाते. १२ निरासानें. १३ उत्तम मार्गानें. १४ भूषण. १५ माझेप्रत. १६ अहंब्रह्म येणेंकरून. १७ निद्रेनें. १८ मी माझें म्हणणें इत्यादिरूप घोरणें. १९ जागा झाला. २० मायामुखाच्या प्रतिबिंबाला. २१ तरंगाला व समुद्राला. २२ मेघसमूह. २३ देहापासून उत्पन्न झालेले. २४ आवरत नाहीं. २५ येण्याजाण्यानें. २६ शुद्धज्ञान. २७ मळत नाहीं. २८ सोंगें.

ठायवरी । नेहटोनि ठेला अंतरीं । आतां काय वर्ते शरीरीं । हेंही नेणे ॥ १२ ॥ सांडूनि आंगींची खोळी । सर्प रिगालिया पाताळीं । ते त्वचा कोण सांभाळी । तैसें जालें ॥ १३ ॥ कां सौरभ्य जीर्ण जैसा । आमोद मिळोनि जाय आकाशा । माघारा कमळकोशा । नयेचि तो ॥ १४ ॥ पैं स्वरूपसमरसें । तयाही गा जालें तैसें । तेथ कि धर्म हें कैसें । नेणे देह ॥ १५ ॥ ह्मणौनि जन्मजरामरण । इत्यादि जे साही गुण । ते देहींच्चि ठेले कारण । नाहीं तयां ॥ १६ ॥ घटाचिया खापरिया । घटभंगीं फेडिलिया । महदाकाश अपैसैंया । जालेंचि असे ॥ १७ ॥ तैसी देहबुद्धि जाये । जैं आपणपां आठौ होये । तैं आन कांहीं आहे । तेंवांचुनी ॥ १८ ॥ येणें थोर बोधलेपणें । तयासि गा देहीं असणें । ह्मणूनि तो मी ह्मणें । गुणातीत ॥ १९ ॥ यया देवाचिया बोला । पार्थ अतिसुखावला । मेघें संबोखिला । मयूर जैसा ॥ ३२० ॥

अर्जुन उवाच—**कैर्लिगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते ॥ २१ ॥**

तेणें तोषें वीर पुसे । जी कोण्हीं चिन्हीं तो दिसे । जयामाजी वसे । ऐसा बोध ॥ २१ ॥ तो निर्गुण काय आचरे । कैसेनि गुण निस्तरे । हें सांगिजो माहेरें । कृपेचेनि ॥ २२ ॥ यया अर्जुनाचिया प्रश्ना । तो षड्गुणांचा राणा । परिहार आकर्णा । बोलत असें ॥ २३ ॥ ह्मणे पार्था तुझी नवाई । हें येतुलेंचि पुससी काई । तें नामचि तया पाहीं । साच लटिकें ॥ २४ ॥ गुणातीत जया नांव । तो गुणाधीन तरी नव्हे । ना होय तरी नागवे । गुणां यया ॥ २५ ॥ परि अधीन कां नागवे । हेंचि कैसेनि जाणावें । गुणांचिये रेंवरवे- । माजि असतां ॥ २६ ॥ हा संदेह जरी वाहसी । तरि सुखें पुसों लाहसी । परिस आतां तयासी । रूप करूं ॥ २७ ॥

श्रीभगवानुवाच—**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥**

तरि रजाचेनि माजें । देहीं कर्मांचें आणोजें । प्रवृत्ती जैं घेइजे । वेंटाळूनि ॥ २८ ॥ तैं मीचि कां कर्मठ । ऐसेनये आमोठ । कां दरिद्रलिय बुद्धी वीट । तोही नाहीं ॥ २९ ॥ अथवा सत्वेंचि अधिकें । जैं सर्वेंद्रियीं ज्ञान फांके । तैं सुविद्यतालोखें । उभेजेही ना

---

१ निश्चयानें. २ कवच. ३ अत्यंत परिमळ. ४ जिरलेला. ५ सुगंधयुक्त वारा. ६ स्वतःचे ब्रह्मस्वरूपास मिळून. ७ आपणच. ८ आठवण. ९ श्रीकृष्ण. १० तृप्त केला. ११ निवारी. १२ उत्तर. १३ ऐका. १४ गुणातीत हें नांव. १५ न सांपडे. १६ गुंताड्यामध्यें. १७ मोड, अंकुर. १८ संपत्तीचा अभिमान. १९ दारिद्यामुळें. २० अति विद्वान या वर्गानें. २१ संतोषत नाहीं.

॥ ३३० ॥ कां वाढिलेनि तमें । न गिळेजेचि मोहभ्रमें । तैं अज्ञानत्वें न श्रमें । घेणेंही नाहीं ॥ ३१ ॥ पैं मोहाच्या अवसरीं । ज्ञानाची चाड न धरी । ज्ञानें कर्मे नादरी । होतां न दुःखी ॥ ३२ ॥ सायंप्रातर्मध्यान्हा । या तिहीं काळांची गणना । नाहीं जेविं [१]तपना । तैसा असे ॥ ३३ ॥ तया वेगळाचि काय प्रकाशें । ज्ञानित्व यावें असे । कायि [२]जळार्णव पाउसें । [३]सैाजा होय ॥ ३४ ॥ ना [४]प्रवर्तलेनि कर्मे । कर्मठत्व तयां कां गमे । सांगें हिमवंत हिमें । कांपे कायि ॥ ३५ ॥ ना तरि मोह आलिया । काइ पां ज्ञाना मूकिजेल तया । महा आगीतें उन्हाळेया । जाळवत असे ॥ ३६ ॥

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**
**गुणा वर्तंत इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥**

तैसें गुणागुण कार्य हें । आघवेंचि आपण आहे । ह्मणोनि एकेका नोहे । तंडातोंडी ॥ ३७ ॥ येवढेया गा प्रतीती । तो देहा आलासे वस्ती । वाटे जातां गुंती- । [५]माजि जैसा ॥ ३८ ॥ तो जिंणता ना [६]हारवी । तैसा गुण नव्हे ना करवीं । जैसी कां [७]श्रोणवी । संग्रा-मींचि ॥ ३९ ॥ कां शरीराआंतील प्राणु । घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु । नाना चोहटांचा स्थाणू । उदास जैसा ॥ ३४० ॥ आणि गुणाचा [८]येवा जावा । ढळे चळे ना पांडवा । मृगजळाचा [९]हेलावा । मेरु जैसा ॥ ४१ ॥ हें बहुत कायि बोलिजे । व्योमवारेंनि न [१०]वीजिजे । कां सूर्य ना गिळिजे । अंधकारें ॥ ४२ ॥ स्वप्न कां गा जियापरी । जागतयातें न [११]सितरी । गुणी तैसा अवधारीं । न बंधिजे तो ॥ ४३ ॥ गुणांसि कीर नातुडे । परि दुरूनि जैं पाहे कोडें । तैं गुणदोष [१२]सोंयिखडें । [१३]सैंभ्र जैसा ॥ ४४ ॥ सत्कर्मे सात्विकीं । रज तें रजोविषयकीं । तममोहादिकीं । वर्तत असे ॥ ४५ ॥ परिस तयाचिया गा सत्ता । होती गुणक्रिया समस्ता । हें फुडें [१४]जाणे सविता । [१५]लौकिका जेविं ॥ ४६ ॥ समुद्रचि भरती । सोमकांतची द्रवती । कुमुदें विकासती । चंद्र तो उगा ॥ ४७ ॥ कां वाराचि वाजे [१६]विझे । गगनें निश्चळ असिजे । तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना जो ॥ ४८ ॥ अर्जुना येणें लक्षणें । तो गुणातीत जाणणें । परिस आतां आचरणें । तयाचीं जीं ॥ ४९ ॥

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥**

तरि वस्त्रासि पाठीं पोटीं । नाहीं सुतावांचूनि किरीटी । ऐसें सुये दिठीं । चराचर मद्रूपें ॥ ३५० ॥ ह्मणोनि सुखदुःखांसरिसें । कांटाळें आचरे ऐसें । रिपुभक्तां जैसें ।

---

१ सूर्याला. २ समुद्र. ३ ताजा. ४ करताना. ५ वेगळा. ६ अडथळा. ७ जय पावणार. ८ हरणार. ९ निशाण, भूमि. १० येण्याजाण्यानें. ११ हेलाव्यानें. १२ हाले. १३ भ्रमवी. १४ चित्र. १५ पाहणार. १६ जाणतो. १७ लोकव्यवहाराला. १८ उगा राहे. १९ समतोल. २० ताजवा.

हरीचें देणें ॥ ५१ ॥ येरवीं तरि सहजें । सुखदुःख तैंची सेविजे । देहजळीं होईजे । मासोळी जैं ॥ ५२ ॥ आतां तें तंव तेणें सांडिलें । आहे स्वस्वरूपेंसींचि मांडिलें । सैस्यांतीं निवडिलें । बीज जैसें ॥ ५३ ॥ कां वोघ सांडूनि गंगा । रिघोनि समुद्राचे आंगा । निस्तरली लगबगा । खळाळाची ॥ ५४ ॥ तेविं अपणपांचि जया । वस्ती जाली गा धनंजया । तयां देहीं अैपैसया । सुख तैसें दुःख ॥ ५५ ॥ रात्रि तैसें पैाहलें । हें धारणा जेविं एक जालें । आत्मारामा देहीं अैातलें । द्वंद्व तैसें ॥ ५६ ॥ पैं निद्रिताचेनि आंगेंसी । सैाप तैशी उर्वशी । तेविं स्वरूपस्था सरिसीं । देहीं द्वंद्वें ॥ ५७ ॥ ह्मणौनि तयाच्या ठायीं । शेणा सोनया विशेष नाहीं । रत्ना गुंडेयां कांहीं । नेणिजे भेद ॥ ५८ ॥ घरा येवो पां स्वर्ग । कां वैरिपडो वाघ । परि आत्मबुद्धीसी भंग । कदा नोहे ॥ ५९ ॥ निवँटलें न उँपवडे । जैळीनलें न विरूढे । साम्यबुद्धी न मोडे । तयापरी ॥ ३६० ॥ हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजो । कां नीच ह्मणोनि निंदिजो । परि नेणे जळों विझों । राख जैसी ॥ ६१ ॥ तैसी निंदा आणि स्तुती । नये कोण्हेचि व्यक्ती । नाहीं आंधारें कां वाती । सूर्या घरीं ॥ ६२ ॥

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥**

ईश्वर ह्मणोनि पूजिला । कां चोर ह्मणोनि गांजिला । वृँषगजीं वेढिला । केला रावो ॥ ६३ ॥ कां सुहृद पासी आलें । अथवा वैरी वैंपडे जालें । परि नेणे राती पैाहलें । तेज जेविं ॥ ६४ ॥ साही ऋतु येतां आकाशें । लिंपिजेचि ना जैसें । तेविं वैषम्य मानसें । जाणिजेना ॥ ६५ ॥ आणीकही एक पाहीं । आचार तयाच्या ठायीं । तरि व्यापारासि नाहीं । जालें दिसे ॥ ६६ ॥ सर्वारंभा उँटकलें । प्रवृत्तीचें तेथ मावळलें । जळती गा कर्मफळें । ते[18] तो आगी ॥ ६७ ॥ दृष्टादृष्टाचेनि नांवें । भावचि जीवीं नुगवे । तें सेवी जें स्वभावें । [20]पैठें होये ॥ ६८ ॥ सुखें ना शिणे । पाषाण जेणें मानें । तैसीं सैांडि मांडी मनें । वर्जिली असे ॥ ६९ ॥ आतां किती हा विस्तार । जाणें ऐसा आचार । जयाचा तोचि साचार । गुणातीत ॥ ३७० ॥ गुणातें अतिक्रैमणें । घडे उपायें जेणें । तो आतां आईक ह्मणे । श्रीकृष्णनाथ ॥ ७१ ॥

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥**

तरि व्यभिचाररहित चित्तें । भक्तियोगें मातें । सेवी तो गुणातें । जैंकळूं शके ।

---

१ धान्य मळण्याच्या प्रसंगीं. २ आत्मस्वरूपीं. ३ आपोआप. ४ दिवसाचें. ५ बुद्धीला. ६ प्राप्त झालें. ७ सुखदुःखादि. ८ सर्पाप्रमाणें. ९ दगडाला. १० प्राप्त होवो. ११ मेलें. १२ जागें होत नाहीं. १३ जळून गेलेलें. १४ उगवत नाहीं. १५ बैल हत्ती यांनीं. १६ प्राप्त. १७ दूर झालें. १८ ती आग तो आहे. १९ इहलोक व स्वर्ग. २० प्राप्त. २१ त्यागात्यागी. २२ जिंकणें. २३ एकनिष्ठेनें. २४ जिंकूं.

॥ ७२ ॥ तरि कोण मी कैसी भक्ति। अव्यभिचारा काय व्यक्ति। हे आघवीचि निरुती। होआवी लागे ॥ ७३ ॥ तरी पार्था हरियेसा। मी तंव येथ ऐसा। रत्नीं किळावो जैसा। रत्नाचि तो ॥ ७४ ॥ कां द्रवपणचि नीर। अवकाशचि अंबर। गोडी तेचि साखर। आन नाहीं ॥ ७५ ॥ वन्हि तेचि ज्वाळ। दळेंचि नांव कमळ। रूख तेंचि डाळ। फळादिक ॥ ७६ ॥ अगा हिम जें आकर्षलें। तेंचि हिमवंत जेवि जालें। नाना दूध मुरालें। तेंचि दहीं ॥ ७७ ॥ तैसें विश्व येणें नांवें। हें मीचि पैं आघवें। घेईं चंद्रबिंब सोलावें। न लगे जेवि ॥ ७८ ॥ घृताचें थिजलेपण। न मोडितां घृतचि जाण। कां नाटितां कांकण। सोनेंचि तें ॥ ७९ ॥ न उकलितां पट। तंतूचि असे स्पष्ट। न विरवितां घट। मृत्तिका जेवि ॥ ३८० ॥ म्हणोनि विश्वपण जावें। मग तें मातें घेयावें। तैसा नव्हे आघवें। सकटचि मीं ॥ ८१ ॥ ऐसेनि मातें जाणिजे। ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे। येथ भेद कांहीं देखिजे। तरि व्यभिचार तो ॥ ८२ ॥ याकारणें भेदातें। सांडूनि अभेदें चित्तें। आंपणयासकट मातें। जाणावें गा ॥ ८३ ॥ पार्था सोनयाची टिक। सोनयासी लागली देख। तैसें आपणपें आणिक। मानावें ना ॥ ८४ ॥ तेजाचा तेजौनि निघाला। परि तेजींचि असे लागला। तया रश्मी ऐसा भला। बोध होआवा ॥ ८५ ॥ पैं परमाणु भूतळीं। हिमकण हिमाचळीं। मजमाजीं न्याहाळीं। अहं तैसें ॥ ८६ ॥ हो कां तरंग लहान। परि सिंधूसीं नाहीं भिन्न। तैसा ईश्वरीं मी आन। नोहेचि मा ॥ ८७ ॥ ऐसेनि बा समरसें। दृष्टी जैं उल्लासे। ते भक्ति पैं ऐसें। आह्मीं ह्मणों ॥ ८८ ॥ आणि ज्ञानाचें चांगावें। इये दृष्टी मानावें। योगाचेंही आघवें। सर्वस्व हें ॥ ८९ ॥ सिंधु आणि जळधरा-। माजी लागली अखंड धारा। तैसी वृत्ति वीरा। प्रवर्ते ते ॥ ३९० ॥ कां कुहेसीं[15] आकाशा। तोंडीं सांदा नाहीं जैसा। तो परमपुरुषीं तैसा। एकवटे गा। ॥ ९१ ॥ प्रतिबिंबौनि बिंबवरी। प्रभेची जैसी उजरी। ते सोहंवृत्ती अवधारीं। तैसी होय ॥ ९२ ॥ ऐसेनि मग परस्परें। ते सोहंवृत्ति जैं अवतरे। तैं तियेही सकट सरे। अपैसया ॥ ९३ ॥ जैसा सैंधवाचा रवा। सिंधुमाजि पांडवा। विराल्या विरवावा। हेंही ठाके ॥ ९४ ॥ ना तरि जाळूनि तृण। वन्हिही विझे आपण। तैसें भेद नाशूनि जाण। ज्ञानही नुरे ॥ ९५ ॥ माझें पैलपण जाये। भक्त हें ऐलपण ठाये। अनादि ऐक्य जें आहे। तेंचि निवडे ॥ ९६ ॥ आतां गुणातें तो किरीटी। जिणे[17] या नव्हती गोष्टी। जे एकपणाही मिठी। पडों सरली ॥ ९७ ॥ किंबहुना ऐसी दशा। तें ब्रह्मत्व गा सुदर्शा। [19]हें तो पावे जो ऐसा। मातें भजे ॥ ९८ ॥ पुढती इहीं लिंगीं। भक्त जो माझा जगीं। हे ब्रह्मता

१ लक्षण. २ व्याख्या. ३ तेज. ४ ओलेपणा. ५ पाणी. ६ आकाश. ७ कमलपत्रालाच. ८ फांदी. ९ आटलें नाहीं तरी. १० ऐक्यानें. ११ मी असें. १२ विकासे. १३ ज्ञानालाच. १४ चांगुलपण. १५ कूप. १६ उत्कर्ष. १७ जिंकी. १८ मर्मज्ञा. १९ जो ऐशा मातें भजे, तो हें ब्रह्मत्व पावे. २० स्पष्टपणें.

तयालागीं । पतिव्रता ॥ ९९ ॥ जैसें गंगेचेनि वोघें[1] । डळमळीत जळ जें निघे । सिंधुपद[2] तयाजोगें । आन नाहीं ॥ ४०० ॥ तैसा ज्ञानाचिया दिठी । जो मातें सेवी किरीटी । तो होय ब्रह्मतेच्या मुगुटीं । चूडारत्न[3] ॥ १ ॥ यथा ब्रह्मत्वासीचि पार्था । सायुज्य ऐसी व्यवस्था[4] । याचि नांव चौथा । पुरुषार्थ गा ॥ २ ॥ वरी माझें आराधन । ब्रह्मत्वीं होय सोपान[5] । तेथ मी[6] हन साधन । गमेल[7] हो ॥ ३ ॥ तरि ह्मणीं ऐसें । तुझ्या चित्तीं पैसे[8] । पैं ब्रह्म आन नसे । मीवांचूनि ॥ ४ ॥

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ २७ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

अगा ब्रह्म या नांवा । अभिप्राय मी पांडवा । मीचि बोलिजे आघवा । शब्दीं इहीं ॥ ५ ॥ पैं मंडळ आणि चंद्रमा । दोनी नव्हती सुवर्मा[9] । तैसा मज आणि ब्रह्मा । भेद नाहीं ॥ ६ ॥ अगा नित्य जें निष्कंप । अनावृत[10] धर्मरूप । सुख जें जें उमप[11] । अद्वितीय ॥ ७ ॥ विवेक आपलें काम । सारूनि ठाकी जें धाम । निष्कर्षाचें[12] निःसीम । किंबहुना मी ॥ ८ ॥ ऐससें हो अवधारा । तो अनन्याचा[13] सोयरा । सांगतसे वीरा । पार्थासि पैं ॥ ९ ॥ येथ धृतराष्ट्र ह्मणे । संजया हें तूनें कोणें । पुसिलेंविण वायाणें[14] । कां बोलसी ॥ ४१० ॥ माझी अवसरी[15] ते फेडीं । विजयाची सांगें गुढी । येरु जीवि ह्मणे सांडी । गोठी यिया ॥ ११ ॥ संजय विस्मयमानसीं । आहा करूनि रसरसीं[16] । ह्मणे कैसें पां देवेंसीं । द्वंद्व यया ॥ १२ ॥ तरि कृपाळु तो तुष्टो । यया विवेक हा घोंटो[17] । मोहाचा फिटो । महारोग ॥ १३ ॥ संजय ऐसें चिंतितां । संवाद तो सांभाळितां । हरिखाचा[18] येत चित्ता । महापूर ॥ १४ ॥ ह्मणोनि आतां येणें । उत्साहाचेनि अवतरणें । श्रीकृष्णाचें बोलणें । सांगिजेल ॥ १५ ॥ तया अक्षरांआंतील भाव । पाववीन मी तुमचा ठाव । आइका ह्मणे ज्ञानदेव । निवृत्तीचा ॥ ४१६ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥
श्लोक २७, ओंव्या ४१६.

---

१ वाहात. २ त्यास सिंधुपदच योग्य, दुसरें योग्य नाहीं. ३ मुकुटमणी. ४ नांव. ५ जिना. ६ मला. ७ वाटेल. ८ विस्तरेल. ९ मर्मज्ञा. १० उघड. ११ अपार. १२ सिद्धांताचे. १३ एकनिष्ठेचा, अनन्यभक्तीचा. १४ व्यर्थ. १५ शंका. १६ दुःखानें. १७ मिळो. १८ हर्षाचा. १९ हृदयास.

# अध्याय १५ वा.

आतां हृदय हें आपुलें । [१]चौफाळूनियां भलें । वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरूचीं ॥ १ ॥ ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रिय [२]कुडमळीं । भरूनियां पुष्पांजुळी । अर्घ्य देवों ॥ २ ॥ [३]अनन्योदकें धुवट । वासना जे [४]तन्निष्ठ । तें लाविलेंसे बोट । चंदनाचें ॥ ३ ॥ प्रेमाचेनि भांगारें । [५]निर्वाळूनि नूपुरें । लेवऊं सुकुमारें । पदें तियें ॥ ४ ॥ [६]घणावली आवडी । अव्यभिचारें चोखडी । तिये घालूं [७]जोडी । आंगोळिया ॥ ५ ॥ [८]आनंदामोदबहुळ । [९]सात्विकाचें [१०]मुकुळ । तें उमळलें अष्टदळ । ठेऊं वरी ॥ ६ ॥ तेथें अहं हा धूप जाळूं । [११]नीहं तेजें वोवाळूं । सामरस्यें [१२]पोटाळूं । निरंतर ॥ ७ ॥ माझी तनु आणि प्राण । इया [१३]पाउवा लेऊं श्रीचरण । करूं भोग मोक्ष निंबलोण । पायां तयां ॥ ८ ॥ इया श्रीगुरुचरणसेवा । हों [१४]पात्र तया दैवा । जें सकळार्थमेळावा । [१५]पाट बांधे ॥ ९ ॥ ब्रह्मींचें [१६]विसंवणेंवरि । [१७]उन्मेष लाहे [१८]उजरी । जें वाचेतें इये करी । सुधासिंधू ॥ १० ॥ पूर्णचंद्राचिया [१९]कोडी । वक्तृत्वा [२०]घींपे कुरोंडी । तैसी आणी गोडी । अक्षरांतें ॥ ११ ॥ सूर्यें [२१]अधिष्ठिली प्राची । जगा [२२]रांणिव दे प्रकाशाची । तैशी वाचा श्रोतयां ज्ञानाची । दिवाळी करी ॥ १२ ॥ [२३]नादब्रह्म खुजें । कैवल्यही तैसें न [२४]साजे । ऐसा बोल देखिजे । जेणें [२५]देवें ॥ १३ ॥ श्रवण सुखाच्या मांडवीं । विश्व भोगी [२६]माधवी । तैसी [२७]सौरसिने बरवी । वाचावल्ली ॥ १४ ॥ ठाय न पावतां जयाचा । मनेसीं मुरडली वाचा । तो देव होय शब्दाचा । चमत्कारु ॥ १५ ॥ [२८]जें ज्ञानासि न [२९]चोजवे । ध्यानासिही जें [३०]नागवे । तें अगोचर [३१]फावे । गोठीमाजि ॥ १६ ॥ येवढें एक [३२]सौभंग । [३३]वैळघे वाचेचें आंग । श्रीगुरुपादपद्मराग । लाहे जैं कां ॥ १७ ॥ तरि बहु बोलूं काई । आजि तें आनठाईं । मा तेंवांचूनि नाहीं । ज्ञानदेव ह्मणे ॥ १८ ॥ जे [३४]तान्हेनि मियां अपत्यें । आणि माझे गुरु [३४]एकलौते । ह्मणोनि कृपेसि [३५]एकहातें । जालें तिये ॥ १९ ॥ पाहा पां [३६]भेरोवरी आघवी । मेघ चातकांसी [३७]रिचवी । मजलागीं [३८]गोसांवी । तैसें केलें ॥ २० ॥ ह्मणोनि रिकामें तोंड । करूं गेलें बडबड । कीं गीता ऐसें गोड । [३९]आतुडलें ॥ २१ ॥ होय [४०]अदृष्ट [४१]ओपेते । तैं वाळूंचि रत्नें [४२]पेरते । [४३]उजू आयुष्य तैं [४४]मारिते । लोभ करी ॥ २२ ॥

---

१ चौरंग करून. २ कळ्यांनीं. ३ अभेदरूप जळानें. ४ श्रीगुरुनिष्ठ ५ गाळून. ६ घट्ट झालेली. ७ जोडवीं. ८ आनंद हाच सुवास. ९ सत्वाचें. १० कळी. ११ निरभिमान. १२ आलिंगूं. १३ पादुका. १४ योग्य. १५ पट्टाभिषेक करूं. १६ विश्रांतीपर्यंत. १७ ज्ञान. १८ स्वच्छता. १९ कोटि. २० घालावी. २१ आश्रयिली. २२ संपत्ति. २३ वेद. २४ शोभे. २५ गुरुदेवें. २६ वसंत. २७ भराव येते. २८ जाणणें. २९ जाणवे. ३० नाटोपे. ३१ सांपडे. ३२ सौभाग्य. ३३ आश्रय करी. ३४ तान्हा जो मी बाळ तो त्या गुरूला एकुलता एक आहें. ३५ एकहाती गाय. ३६ सामुग्री. ३७ ओती. ३८ सद्गुरूनें. ३९ सांपडलें. ४० प्रारब्ध. ४१ अनुकूळ. ४२ परिणाम पावे. ४३ अखंड. ४४ मारणार.

आधणीं घातलिया हरळ[1]। होती अमृताचे तांदुळ। जरी भुकेची राखे वेळ। श्रीजगन्नाथ ॥ २३ ॥ तयापरी श्रीगुरु। करिती जैं अंगिकारु। तैं होऊनि ठाके संसारु। मोक्षमय आघवा ॥ २४ ॥ पाहा पां काई श्रीनारायणें। तया पांडवांचें उणें। कीजेचि ना पुराणें। विश्ववंद्यें ॥ २५ ॥ तैसें श्रीनिवृत्तिराजें। अज्ञानपण हें माझें। आणिलें वांजे[2]। ज्ञानाचिया ॥ २६ ॥ परि हें असो आतां। प्रेम रुळतसे[3] बोलतां। कें गुरुगौरव वाणतां। उन्मेष[4] असे ॥ २७ ॥ आतां तेणेंचि पसायें[5]। तुह्मां संतांचे मी पायें। वोळगेन[6] अभिप्रायें। श्रीगीतेचेनी ॥ २८ ॥ तरि तोचि प्रस्तुतीं। चौदाविया अध्यायाच्या अंतीं। निर्णय कैवल्यपतीं। ऐसा केला ॥ २९ ॥ जे ज्ञान जयाच्या हातीं। तोचि समर्थ मुक्ती। जैसा शतमख[7] संपत्ती। स्वर्गीचिये ॥ ३० ॥ कां शत एक जन्मा। जो जन्मोनि ब्रह्मकर्मा। करी तोचि ब्रह्मा। आन नोहे ॥ ३१ ॥ ना तरी सूर्याचा प्रकाश। लाहे जेवीं डोळस। तेवीं ज्ञानियां सौरस[8]। मोक्षाचा तो ॥ ३२ ॥ तरि तया ज्ञानालागीं। कवणा पां योग्यता आंगीं। हें पाहतां जगीं। देखिला एक ॥ ३३ ॥ जे पाताळिचेंही निधान। दावील कीर अंजन। परि होआवें लोचन। पायाळाचे ॥ ३४ ॥ तैसें मोक्ष देईल ज्ञान। येथ कीर नाहीं आन। परि तेंचि थोर[9] ऐसें मन। शुद्ध होआवें ॥ ३५ ॥ तरि विरक्तीवांचूनि कहीं। ज्ञानासि तगणें[10] नाहीं। हें विचारूनि ठाई[11]। ठेविलें देवें ॥ ३६ ॥ आतां विरक्तीची कवण परी। जे येऊनि मनातें वरी। हेंही सर्वज्ञें श्रीहरी। देखिलें असे ॥ ३७ ॥ जे विषें रांधिली रससोय[12]। जैं जेवणारा ठाउवी होये। तैं तो ताटचि सांडूनि जाये। जयापरी ॥ ३८ ॥ तैसी संसारा या समस्ता। जाणिजे जैं अनित्यता। तैं वैराग्य दवडितां। पाठीं लागे ॥ ३९ ॥ आतां अनित्यत्व या कैसें। तेंचि वृक्षाकारमिषें। सांगिजत असे विश्वेशें। पंचदशीं ॥ ४० ॥ उपडिलें कवतिकें। झाड येरिमोहरां[13] ठाके। तें वेगें जैसें सुके। तैसें हें नोहे ॥ ४१ ॥ याचि एकेपरी। रूपकाचिया कुसरी[14]। सारितसे[15] वेरीं[16]। संसाराची ॥ ४२ ॥ करूनि संसार वावो[17]। स्वरूपीं अहंतेचा[18] ठावो। होआवया अध्यावो। पंधरावा हा ॥ ४३ ॥ आतां हेंचि आघवें। ग्रंथगर्भीचें चांगावें[19]। उपलविजेल[20] जीवें। आकर्णिजो ॥ ४४ ॥ तरि महानंदसमुद्र। जो पूर्ण पूर्णिमाचंद्र। तो द्वारकेचा नरेंद्र। ऐसें ह्मणे ॥ ४५ ॥ अगा पैं पंडुकुमरा। येनां पैं स्वरूपाचिया घरा। करीतसे आडवारा[21]। विश्वाभास जो ॥ ४६ ॥ तो हा जगडंबरु। नोहे येथ संसारु। हा जाणिजे महातरु। थांवला[22] असे ॥ ४७ ॥ परि येरां रुखांसारिखा। तळीं मुळें वरी

---

१ खडे. २ चांगुलपणास. ३ दृढ होत आहे. ४ सावधान. ५ प्रसादें. ६ आश्रय करीन. ७ इंद्र. ८ गोडी. ९ स्थिर होय. १० टिकाव. ११ स्थापन केलें. १२ स्वयंपाक. १३ उलटें. १४ चतुराई. १५ दवडी. १६ येरझार. १७ मिथ्या. १८ मीपणाचा. १९ चांगुलपणें. २० विस्तारिजेल. २१ प्रतिबंध. २२ दृढ झाला, वाढला.

शाखा । तैसा नोहे ह्मणोनि लेखा । नयेचि कवणा ॥ ४८ ॥ आगी कां कुऱ्हाडी । होय [2]रिगावा जरी बुडीं । तरी हो कां [3]भलतवढी । वरिचील वाढी ॥ ४९ ॥ जे तुटलिया मुळा-पासीं । [4]उलंडेल कां शाखांसीं । परि तैसी गोष्टी कायसी । हा सोपा नव्हे ॥ ५० ॥ अर्जुना हें कवतिक । सांगतां असे अलौकिक । जे वाढी अधोमुख । रुखा यया ॥ ५१ ॥ जैसा भानु उंचि नेणों कें । रश्मिजाळ तळीं फांके । संसार हें कोंवरुखें । झाड तैसें ॥ ५२ ॥ आणि आथी नाथी तितुकें । [6]रुंधलें असे येणेंचि एकें । कल्पांतींचेनि उदकें । व्योम जैसें ॥ ५३ ॥ कां रवीच्या अस्तमानीं । आंधारेनि कोंदे रजनी । तैसाचि हा गगनीं । मांडला असे ॥ ५४ ॥ यया फळ ना [7]चुंबितां । फूल ना [8]तुरंबितां । जें कांहीं पंडुसुता । तें रुखचि हा ॥ ५५ ॥ हा ऊर्ध्वमूळ आहे । परि [10]उन्मूळिला नोहे । येणेंचि[11] हा होये । [12]शाडुळ गा ॥ ५६ ॥ आणि ऊर्ध्वमूळ ऐसें । निगदिलें कीर असे । परी अधींहीं [13]असोसें । मूळें यया ॥५७॥ प्रबळला [14]चौमेरीं । पिंपळा कां वडाचिया परी । जे पारंबि-यामाझारीं । डाहाळिया असती ॥ ५८ ॥ तैंविचि गा धनंजया । संसारतरू यया । [15]अधींचि आथी खांदिया । हेंहीं नाहीं ॥ ५९ ॥ तरी ऊर्ध्वाहीकडे । शाखांचे [16]मोंदोडे । दिसताति अपाडें । [17]सोंसिन्नले ॥ ६० ॥ जालें गगनाचि पालवीयें । कां वारा मांडला रुखाचेनि[18]आर्यें । नाना [19]अवस्थात्रयें । उदय केला असे ॥ ६१ ॥ ऐसा हा एक । विश्वाकार [20]विटंकें । उदयला जाण रुख । ऊर्ध्वमूळ ॥ ६२ ॥ आतां ऊर्ध्व या कवण । येथें मूळ तें किलक्षण । कां अधोमुखपण । शाखा कैसिया ॥ ६३ ॥ अथवा द्रुमा यया । [21]अधीं जिया मुळिया । तिया कोण कैसिया । ऊर्ध्व शाखा ॥ ६४ ॥ आणि अश्वत्थ हा ऐसी । प्रसिद्धी कायसी । [22]आत्मविदविलासीं । निर्णय केला ॥ ६५ ॥ हें आघवेंचि बरवें । तुझिये [23]प्रतीतीसि फावे । तैसेनि सांगों सोलिवे । [24]विन्यासें गा ॥ ६६ ॥ परी ऐकें गा सुभगा । हा प्रसंग असे तुजचिजोगा । कानचि करीं हो सर्वांगा । [25]हियें आथिलिया ॥ ६७ ॥ ऐसें प्रेमरसें [26]सुरफुरें । बोलिलें जंव यादववीरें । तंव अवधान अर्जुनाकारें । मूर्त जालें ॥ ६८ ॥ देव निरूपिती तें [27]थेंकुलें । येवढें श्रोतेपण फांकलें । जैसें आकाशा [28]खेंवें पसरिलें । दाहीं दिशीं ॥ ६९ ॥ श्रीकृष्णोक्तिसागरा । हा आगस्तीचि दुसरा । ह्मणौनि घोंट भरों पाहे एकसरा । अवघेयाचा ॥ ७० ॥ ऐसी [29]सोय सांडूनि खवळिली । आवडी अर्जुनीं देवें देखिली । तेथ जालेनि सुखें केली । कुरवंडी तया ॥ ७१ ॥

१ समजुतीस. २ प्रवेश. ३ केवढीही. ४ उपडेल. ५ आश्चर्यकारक. ६ व्यापलें. ७ चोखले असतां. ८ वास घेतला असतां. ९ यच्चयावत् जें कांहीं तें हा वृक्षच ह्मणून वास घेण्यास फूल नाहीं व चुंबन करण्यास फळही नाहीं. १० उपटलेला. ११ ऊर्ध्वमूळच. १२ हिरवागार. १३ पुष्कळ. १४ चहूंकडे. १५ खालीं. १६ जुंबाडे. १७ विस्तारले. १८ न्यायें. १९ तीन अवस्था उत्पन्न झाल्या. २० मोठा, निबिड. २१ खालीं. २२ आत्मज्ञान्यांनीं. २३ अनुभवास. २४ निरूपणेंकरून. २५ अंतःकरणपूर्वक. २६ भरपूर. २७ लहान. २८ आलिंगन. २९ मर्यादा.

श्रीभगवानुवाच–ऊर्ध्वमूलमधः शाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

मग ह्मणे धनंजया । तें ऊर्ध्व गा तरू यया । येणें रुखेंचि[1] कां जया । ऊर्ध्वता गमे ॥ ७२ ॥ येऱ्हवीं मध्योर्ध्व[2] अध । हे नाहीं जेथ भेद । अद्वयासीं ऐकवद[3] । जयाठायीं ॥ ७३ ॥ जो नाइकिजता नाद । जो असौरभ्य मकरंद । जो आंगाथिला[4] आनंद । सुरतेविण ॥ ७४ ॥ जया जें आऱ्हां परौतें । जया जें पुढें मागौतें । दृश्येंवीण देखतें । अदृश्य जें ॥ ७५ ॥ उपाधीचा दुसरा । घालितां वोपसरा । नामरूपाचा संसारा । होय जयातें ॥ ७६ ॥ ज्ञातृज्ञेयाविहीन । तुसधेंचि जें ज्ञान । सुखा भरलें गगन । गाळींव जें ॥ ७७ ॥ जें कार्य ना कारण । जया दुजें ना एकपण । आपणयां जें जाण । आपणचि ॥ ७८ ॥ ऐसें वस्तु जें साचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें । तेथ अंर घेणें मूळाचें । तें ऐसें असे ॥ ७९ ॥ तरी माया ऐसी ख्याती । नसतीच यया आथी । कां वांझेची संतती । वानणें जैसें ॥ ८० ॥ तैसी सत् ना असत् होय । जे विचाराचें नाम न साहे । ऐसे या परीची आहे । अनादि ह्मणती ॥ ८१ ॥ जे नाना तत्त्वांची मांदुस । जे जगद्भ्राचें आकाश । जे आकारजाताचें दुसें । घडी केलें ॥ ८२ ॥ जे भैवद्रुमबीजिका । जे प्रपंचचित्रभूमिका । विपरीतज्ञानदीपिका । सांचली जे ॥ ८३ ॥ ते माया वस्तूच्या ठायीं । असे जैसेनि नाहीं । मग वस्तुप्रभावचि पाहीं । प्रगट होय ॥ ८४ ॥ जेव्हां आपणयां आली निद । करी आपणपें जेवि मुग्ध । कां काजळी आणी मंद । प्रभा दीपीं ॥ ८५ ॥ स्वप्नीं प्रियांपुढें तरुणांगी । निदेली चेवेंउनि वेगीं । आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकाम करी ॥ ८६ ॥ तैसी स्वरूपीं जाली माया । आणि स्वरूप नेणणें जें धनंजया । तेंचि तरू यया । मूळ पहिलें ॥ ८७ ॥ वस्तूसी आपला जो अबोध । तो ऊर्ध्वीं औंदुळेजे कंद । वेदांतीं । हाचि प्रसिद्ध । बीजभाव ॥ ८८ ॥ घैनें अज्ञान सुषुप्ती । तो बीजांकुरभाव ह्मणती । येर स्वप्न ईनें जागृती । हा फळभाव तियेचा ॥ ८९ ॥ ऐसी यया वेदांतीं । निरूपणभाषाप्रतीति । परी तें असो प्रस्तुतीं । अज्ञान मूळ ॥ ९० ॥ तें ऊर्ध्व आत्मा निर्मळें । अधोर्ध्व सुंचिती मूळें । बळिया बांधोनि आळें । मायायोगाचें ॥ ९१ ॥ मग आंधिलीं संदेहांतरें । उठती जियें अपारें । तें चौपासी घेऊनि आंगारें । खोलावती ॥ ९२ ॥ ऐसें भवद्रुमाचें मूळ । हें ऊर्ध्वीं करी बळ । मग आम्रियाचें बेंबळ । अधीं दावी ॥ ९३ ॥ तेथ चिद्वृत्ती पहिलें । महतत्त्व उमललें । तें पान वोलेंदुल्हें । एक निघे ॥ ९४ ॥

---

१ वृक्षानें. २ मध्यें वर खालीं. ३ ऐक्य. ४ अंगींच असलेला. ५ रतीशिवाय. ६ आलिकडे. ७ मिना. ८ केवळ. ९ परमात्मा. १० अंकुर घेणें. ११ वर्णन करणें. १२ पेटी. १३ वस्त्र. १४ संसारवृक्षाचें बीज. १५ जागी केली. १६ अज्ञान. १७ बांधी. १८ घट्ट. १९ आणि. २० निघती. २१ पाहिलीं. २२ चहूंकडे. २३ अंकुर. २४ खालीं जाती. २५ जुंबाडा. २६ अंकुरलें. २७ अतिप्रिय.

मग सत्वरजतमात्मक । त्रिविध अहंकार जो एक । तो तिवणा[1] अधोमुख । डिरु[2] फुटे ॥ ९५ ॥ तो बुद्धीची घेऊनि आगारी[3] । भेदाची वृद्धी करी । तेथ मनाचें जळ धरी । साजेपणें ॥ ९६ ॥ ऐसा मूळाचिया गाढिंवा[4] । विकल्प[5]रस कोंवाळिका । चित्तचतुष्टय डाहाळिका । कोंभैजेतों[6] ॥ ९७ ॥ मग आकाश वायु द्योतक[7] । आप पृथ्वी हे पांच फांक[8] । महाभूतांचें सरोख[9] । सरळे होती ॥ ९८ ॥ तैसीं श्रोत्रादि तन्मात्रें[10] । तियें अंगवेंसां[11] गर्भपत्रें । लुळुळितें[12] विचित्रें । उमळती गा ॥ ९९ ॥ तेथ शब्दांकुर वरिपडी[13] । श्रोत्रावाढी देव्हडी[14] । होता करित कांडीं । आकांक्षेचीं[15] ॥ १०० ॥ अंगत्वचेचे वेलपल्लव । स्पर्शांकुरीं घेती थांव । तेथें बांबळ[16] पडे अभिनव । विकारांचें ॥ १ ॥ पाठीं रूपपत्र[17] पालोवेलीं । चक्षुलांब तें कांडें घाली । ते वेळीं व्यामोहता[18] भली । पान्हेली[19] जाय ॥ २ ॥ आणि रसाचें आगेवसें[20] । वाढतां वेगें बहुवसें । जिव्हे आर्तींची अंसोसें । निघती बेंचें[21] ॥ ३ ॥ तैसेंचि कोंभेलेनि गंधें । घ्राणाची डिरि थांव[22] बांधे । तेथ घे स्वानंदें । प्रलोभाचा ॥ ४ ॥ एवं महदहंबुद्धि । मन महाभूतसमृद्धि । इये संसाराचिया अवधि । सासनिजे[23] ॥ ५ ॥ किंबहुना इहीं आठे । आंगीं हा अधिक फांटे । परि शिंपीचियेवढें उमटे । रुपें जेविं ॥ ६ ॥ कां समुद्राचेनि पैसारें[24] । वरी तरंगता आस्तरे[25] । तैसें ब्रह्मचि होय वृक्षाकारें । अज्ञानमूळ ॥ ७ ॥ आतां याचाचि हा विस्तार । हाचि यया पैसार[26] । जैसा आपणचि स्वप्नीं परिवार । येकाकिया ॥ ८ ॥ परि तें असो हें ऐसें । कावरें[27] झाड वैसे[28] । यया महदादि आरवसें[29] । अधोशाखा ॥ ९ ॥ आणि अश्वत्थ ऐसें ययातें । ह्मणती जे जाणते । तेंही परिस हो येथें । सांगिजेल ॥ ११० ॥ तरि अश्वत्थ ह्मणिजे उंखा[30] । तोंवरी एकसारिखा । नाहीं निर्वाह यया रुखा[31] । प्रपंचरूपा ॥ ११ ॥ जैसा न लोटतां क्षण । मेघ होय नानावर्ण । कां विजू नसे संपूर्ण । निमेषभरी ॥ १२ ॥ कांपतया पद्मदळा[32] ॥ वरीलिया बैसका[33] नाहीं जळा । कां चित्त जैसें व्याकुळा । माणुसाचें ॥ १३ ॥ तैसीचि ययाची स्थिती । नासत जाय क्षणक्षणाप्रती । ह्मणौनि ययातें ह्मणती । अश्वत्थ हा ॥ १४ ॥ आणि अश्वत्थ येणें नांवें । पिंपळ ह्मणती स्वभावें । परि तो अभिप्राय नोहे । श्रीहरीचा ॥ १५ ॥ येऱ्हवीं पिंपळ ह्मणतां विखीं[34] । मियां गती देखिली असे निकी । परि तें असो काय लौकिकीं । तुह्मा काज ॥ १६ ॥ ह्मणौनि हा प्रस्तुत । अलौकिक परिसा ग्रंथ । तरि क्षणिकत्वेंचि अश्वत्थ । बोलिजे हा ॥ १७ ॥

---

१ तीनपानी. २ अंकुर. ३ लागवड, डाहाळी. ४ दृढतेनें. ५ भेद. ६ अंकुर घेतो. ७ तेज. ८ नीट सरळ गेलेलें वृक्षाचें शाखाकांड. ९ रोकडें. १० सूक्ष्मभूतें. ११ साल. १२ कोंवळीं, सुंदर. १३ प्राप्त होय. १४ दुप्पट मोठी. १५ इच्छा. १६ आधिक्य. १७ रूप हेंच पान. १८ भ्रम. १९ पान्हा फुटतो. २० फार जोरानें. २१ पानांतलें पान. २२ बळ. २३ तयार होतो. २४ प्रसारानें. २५ पघळे. २६ पसारा. २७ भ्रमात्मक, आश्चर्यकारक. २८ जीवन पावे. २९ अंकुर. ३० प्रातःकाळ. ३१ वृक्षाला. ३२ कमळ. ३३ स्थीरता. ३४ विषयीं.

आणी कांही येक थोर । यया अव्ययत्वाचा डगर[1] । आथी परी तो भीतर[2] । ऐसा आहे ॥ १८ ॥ जैसा मेघाचेनि तोंडें । सिंधु एके आंगें काढे । आणि नदी येरीकडे । भरितीचि असती ॥ १९ ॥ तेथ वोहटे ना चढे । ऐसा परिपूर्णचि आवडे । परि ते फुलीं[3] जंव तुघडे । मेघानदीची ॥ १२० ॥ ऐसेया रुखांचें होणें जाणें । न तर्के होतेंनि वेंहिलेपणें[4] । म्हणोनि ययातें लोक म्हणे । अव्यय हा ॥ २१ ॥ येऱ्हवीं दानशीळ पुरुष । वेंचकपणेंचि[5] संचक । तैसा व्ययेंचि हा रुख । अव्यय गमे ॥ २२ ॥ जातां वेगें बहुवसें । न वचे कां भूमी रुतलें असें । रथाचें चक्र दिसे । जिया परी ॥ २३ ॥ तैसें काळातिक्रमें जे वाळे । ते भूतशाखा जेथ गळे । तेथ कोडीवरी उमाळे । उठती आणिक ॥ २४ ॥ परी येकी केधवां गेली । शाखाकोडी केधवां जाली । हें नेणवे जेविं उमललीं । आषाढअभ्रें ॥ २५ ॥ महाकल्पाच्या शेवटीं । उदेलिया उमळती[6] सृष्टी । तैसींचि आणिखीचें दांग[7] उटी । सांसिन्नलें ॥ २६ ॥ संहारवातें प्रचंडें । पडतीं प्रळयांतींचीं सालडें[9] । तंव कल्पादीचीं झुंबाडें । पाल्हेजती ॥ २७ ॥ रिगे मन्वंतर मनुपुढें । वंशावरी वंशांचें [10]मांडे । जैसी इक्षुवृद्धी कांडेनकांडें । [11]जिके जेविं ॥ २८ ॥ कलियुगांतीं कोरडीं । चहूंयुगांचीं सालें सांडी । तंव कृतयुगाची पेली[12] देव्हडी[13] । पडे पुढती ॥ २९ ॥ वर्ततें वर्ष जाये । तें पुढिला मुळहारी[14] होये । जैसा दिवस जात कीं येत आहे । हें चोजवेना[15] ॥ १३० ॥ जैसा वारियाचा झुळका । सांदा ठाउवा नव्हे देखा । तैसिया उठती पडती शाखा । नेणों किती ॥ ३१ ॥ एकी देहाची [16]डिरी तुटे । तंव देहांकुरीं बहुवी फुटे । ऐसेनि भवतरु हा वाटे । अव्यय ऐसा ॥ ३२ ॥ जैसें वाहतें पाणी जाय वेगें । तैसेंचि आणिक मिळे मागें । येथ असंतचि असिजे जगें । मानिजे संत ॥ ३३ ॥ कां लागोनि डोळा उघडे । तंव [17]कोडीवरी घडे मोडे । नेणतया तरंग आवडे । नित्य ऐसा ॥ ३४ ॥ वायसा[18] एकें बुबुळें दोहीं कडे । डोळा चाळितां अपाडें[19] । दोन्ही आथी ऐसा पडे । भ्रम जेविं जगा ॥ ३५ ॥ पैं [20]भिंगोरी [21]निधिये पडली । ते गमे भूमीसीं जैसी जडली । ऐसा वेगातिशय भुली । हेतु होय ॥ ३६ ॥ हें बहु असो झडिती[22] । आधारें भोवंडितां कोलती । ते दिसे जैसी आयती[23] । चक्राकार ॥ ३७ ॥ हा संसारवृक्ष तैसा । मोडत मांडत सहसा । न देखोनि लोक पिसा । अव्यय मानी ॥ ३८ ॥ परि ययाचा वेग देखे । जो हा क्षणिक ऐसा वोळखे । जाणेकोडीवेळा निमिखें । होत जात ॥ ३९ ॥ नाहीं अज्ञानावांचूनि मूळ । ययाचें असिलेपण टवाळ । ऐसें झाड सिनसाळ[24] । देखिलें जेणें

---

१ प्रसिद्धी. २ अंतर्गत अर्थ. ३ संयोग. ४ सत्वरपणें. ५ खर्चिकपणानें. ६ उपटून पडतात. ७ अरण्यें. ८ विस्तृत. ९ साली. १० विस्तार. ११ जीववी. १२ ओली साल. १३ दुप्पट. १४ आमंत्रण. १५ जाणवेना. १६ अंकुर. १७ कोटयवधि. १८ कावळ्याला. १९ सत्वर, विलक्षणपणानें. २० वाव्टळ, भोंवरा. २१ अतिभ्रमणांत. २२ झपाटयानें. २३ विस्तृत. २४ क्षणिक.

॥ १४० ॥ तयातें गा पंडुसुता । मी सर्वज्ञही ह्मणें जाणता । पैं वाग्ब्रह्मीं सिद्धांता[2] । वंद्य तोचि ॥ ४१ ॥ योगजाताचें जोडलें । तया येकासीचि उपयोगागेलें । किंबहुना जियालें[3] । ज्ञानही तेणें ॥ ४२ ॥ हें असो बहुबोलणें । वानिजेल[4] तो कवणें । जो भवरुख जाणे । उखि ऐसा ॥ ४३ ॥

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।**
**अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥ २ ॥**

मग ययाचि प्रपंच रूपा । अधो शाखिया पादपा[6] । डाहाळिया जाती उमपा । ऊर्ध्वांही उजू ॥ ४४ ॥ आणि अधीं फांकलीं डोळें । तियें होतीं मूळें । तयांही तळीं पघळे । वेल पालव ॥ ४५ ॥ ऐसें जें आह्मीं । ह्मणितलें उपक्रमीं[9] । तेंही परिसें सुगमीं । बोलीं सांगों ॥ ४६ ॥ तरि बद्धमूळ अज्ञानें । महदादिकीं शासनें[10] । वेदांची [11]थोरवनें । घेऊनियां ॥ ४७ ॥ परि आधीं तंव स्वेदज । जरायुज उद्भिज अंडज । हें [12]बुडौनि महाभूज । उठती चारी ॥ ४८ ॥ यया एकैकाचेनि [13]आंगवटें । चौऱ्यांशीं लक्षधा फुटे । ते वेळीं जीवशाखीं फांटे । सैंघचि[14] होती ॥ ४९ ॥ प्रसवत शाख सरळिया । नानासृष्टि डाहाळिया । आड फुटती मोळिया[15] । जातीचिया ॥ १५० ॥ स्त्री पुरुष नपुंसकें । हे व्यक्तिभेदांचें [16]टकें । आंदोळती आंगिकें । विकारभारें ॥ ५१ ॥ जैसा वर्षाकाळ गगनीं । [17]पाल्हेजे नवघनीं । तैसें आकारजात अज्ञानीं । वेलीजाय[18] ॥ ५२ ॥ मग शाखांचेनि आंगभारें । लभोनि गुंफती परस्परें । गुणक्षोभाचे वारे । उदयजती ॥ ५३ ॥ तेथ तेणें अचाटें । गुणाचेनि झडझडाटें । तिहीं ठायीं हा फांटे । ऊर्ध्वमूळ ॥ ५४ ॥ ऐसा रजाचिया झुळुका । झडाडितां आगळिका । मनुष्यजातीं शाखा । थोरावती ॥ ५५ ॥ तिया [19]ऊर्ध्वां ना [20]अधीं । माझारींचि कोंदाकोंदी । आड फुटती खांदी । चतुर्वर्णाच्या ॥ ५६ ॥ तेथ विधिनिषेध [21]सपल्लव । वेदवाक्याचे [22]अभिनव । पालव डोलती [23]बरव । आपुलालियापरी ॥ ५७ ॥ अर्थ काम पसरे । अग्रवनें घेती थारे । तेथ क्षणिकें [24]पैंदांतरें । इहभोगाचीं ॥ ५८ ॥ तेथ प्रवृत्तीचेनि वृद्धिलोभें । [25]खोंकरेजती शुभाशुभें । नाना कर्मांचे खांबे । नेणों किती ॥ ५९ ॥ तेवींचि भोगक्षीणें मागिलें । पडती देहांचीं [26]बुडसळें । तंव पुढां वाढी पेले । नवेया देहांचीं ॥ १६० ॥ आणि शब्दादिक [27]सुहावे । सहज रंगें [28]हेवावे । विषयपल्लव नवे । नित्य होतीं

---

१ वेदांतील. २ सिद्धांताप्रमाणें. ३ सफळ झालें. ४ कोणाच्यानें वर्णन केला जाईल. ५ अनित्य. ६ वृक्षाला. ७ खालीं. ८ डाहाळ्या. ९ आरंभीं. १० आज्ञा. ११ मोठीं पानें. १२ बुडांतून. १३ शरीरीं. १४ बहुत. १५ आडव्या फांद्या. १६ प्रतिमा, डाहाळ्यांचीं अग्रें. १७ विस्तारे. १८ विस्तार पावे. १९ वर. २० खालीं. २१ सविस्तर. २२ नवीन. २३ उत्कृष्ट. २४ अन्य स्थानें. २५ तयारी करतात. २६ शुष्क काष्ठ. २७ चांगलेपणा, साजकतें. २८ शोभित.

। ६१ ॥ ऐसें रजोवातें प्रचंडें । मनुष्यशाखांचे मोंडोडे । वाढती तो एथ रूढे । मनुष्य-लोक ॥ ६२ ॥ तैसाचि तो रजाचा वारा । नावेक धरी ओसरा । मग वाजों लागे घोरा । तमाचा तो ॥ ६३ ॥ तेधवां याचिया मनुष्यशाखा । नीच वासना अधीं देखा । पाल्हेजती डाहाळिका । कुकर्माचिया ॥ ६४ ॥ अप्रवृत्तीचे खणुवाळे । कोंभ निघती सरळे । येत पान पालव डाळें । प्रमादाचीं ॥ ६५ ॥ बोलती निषेधनियमें । जिया ऋचा यजुःसामें । तो पाला तया धुमे । टेंकेयावरी ॥ ६६ ॥ प्रतिपादिती अभिचार । आगम जे परमार । तेहींपानीं घेती प्रसर । वासना वेली ॥ ६७ ॥ तंव तंव होती थोराडें । अकर्माचीं तेळबुडें । आणि जन्मशाखा पुढेंपुढें । घेती धांव ॥ ६८ ॥ तेथ चांडाळादि निकृष्टा । दोषजातीच्या थोर फांटा । जोळ पडे कर्मभ्रष्टां । भुलोनियां ॥ ६९ ॥ पशु पक्षी सूकर । व्याघ्र वृश्चिक विखार । हे आडशाखानिकर । थोरावती ॥ १७० ॥ परि ऐशा शाखा पांडवा । सर्वांगींही नित्य नवा । नरकभोग यावा । फळाचा तो ॥ ७१ ॥ आणि हिंसाविषयपुढारी । कुकर्मसंगें धुरेधुरी । जन्मवरी आगारी । वाढतीचि असे ॥ ७२ ॥ ऐसे होती तरुतृण । लोह लोष्ट पाषाण । इया खांदिया तेवींचि जाण । फळेंही हेंचि ॥ ७३ ॥ अर्जुना गा अवधारीं । मनुष्यालागोनी इया परी । वृद्धि स्थावरांतवरी । अधोशाखांची ॥ ७४ ॥ म्हणोनि जे मनुष्य डोळें । इयेंचि जाणवीं अधींचीं मूळें । जे एथुनि हा पघळे । संसारतरु ॥ ७५ ॥ येऱ्हवीं उर्ध्वीचें पार्था । मुद्दल मूळ पाहतां । अधींचिया मध्यस्था । शाखा इया ॥ ७६ ॥ परि तामसी सात्विकी । सुकृतदुष्कृतात्मकीं । विरूढती या शाखीं । अधोर्ध्वींचिया ॥ ७७ ॥ आणि वेदत्रयाचिया पाना । नये अन्यत्र लागों अर्जुना । जे मनुष्यावांचूनि विधाना । विषय नाहीं ॥ ७८ ॥ म्हणोनि तनुमानुषा । इया ऊर्ध्वमूळीनि जरी शाखा । तरी कर्मवृद्धीसि देखा । इयेंचि मूळें ॥ ७९ ॥ आणि आनीं तरी झाडीं । शाखा वाढतां मूळें गाढीं । मूळ गाडें तंव वाढी । पैस आथी ॥ १८० ॥ तैसेंचि इया शरीरा । कर्म तंव देहींसंसारा । आणि देह तंव व्यापारा । ना म्हणोंचि नये ॥ ८१ ॥ म्हणोनि देहें मानुषें । इयें मूळें होतीं न चुके । ऐसें जगज्जनकें । बोलिलें तेणें ॥ ८२ ॥ मग तमाचें तें दारुण । स्थिरावलेया वांउधाण । सत्वाचीं सुटे सत्राण । वाहुटळी ॥ ८३ ॥ तें याचि मनुष्याकारा । मुळीं सुवासना निघती आरा । घेऊननि फुटती कोंबारा । सुकृतांकुरीं ॥ ८४ ॥ उकलतेनि उन्मेखें । प्रज्ञाकुशलतेंचि तिखें । डिरिया निघती निमिखें । बोंबळेंजुनी ॥ ८५ ॥ मतीचे सोट वांवे । घालिती स्फूर्तीचे थांवे । बुद्धिप्रकाश घे धांवे । विवेका-

१ समुदाय. २ क्षणभर. ३ ओहट. ४ कुमार्गाचे. ५ खडबडीत. ६ डाहाळ्या. ७ हाले. ८ अग्रभागीं. ९ जारणमारण. १० परपीडा. ११ मुळें. १२ जाळें. १३ सर्प. १४ समूह. १५ पुढेंपुढें. १६ अंकुर. १७ ढेंकुळ. १८ विस्तारे. १९ वरच्या मुळांतून. २० दृढ. २१ देहाचा संसार. २२ कर्माला. २३ वादळ. २४ थोर. २५ अंकुर. २६ कोंभ. २७ तीक्ष्ण. २८ विस्तारून. २९ फोक. ३० विस्तारून. ३१ बळ.

वरी ॥ ८६ ॥ तेथ मेधारसें सगर्भ । आस्थापत्रीं संबोंब । सरळ निघती कोंभ । सद्वृत्तीचे ॥ ८७ ॥ सदाचाराचिया सहसा । टकौ उठती बहुवसा । घुमघुमिती घोषा । वेदपद्याच्या ॥ ८८ ॥ शिष्टागमविधानें । विविधयागवितानें । इये पानावरी पानें । पालेजती ॥ ८९ ॥ ऐशा यमदमीं घोंसाळिया । उठती तपाचिया डाहाळिया । देती वैराग्यशाखा कवळिया । वेल्हाळपणें ॥ १९० ॥ विशिष्टां व्रतांचे फोक । धीराच्या अणगटी तिख । जन्मवेगें ऊर्ध्वमुख । उंचावती ॥ ९१ ॥ माजि वेदाचा पाला दाट । तो करी सुविद्येचा झडझडाट । जंव वाजे अचाट । सत्वानिळ ॥ ९२ ॥ तेथ धर्मडीळ बोहाळी[12] । दिसती जन्मशाखा सरळी । तिया आड फांटती फळीं । स्वर्गादिकीं ॥ ९३ ॥ पुढां उपरति रंगें[13] [14]लोहिवी । धर्ममोक्षाची शाखा पालवी । पाल्हाजत नित्य नवी । वाढतीचि असे ॥ ९४ ॥ पैं रवि चंद्रादि ग्रहवर । पितृ ऋषि विद्याधर । हे आडशाखाप्रकार । पैस घेती ॥ ९५ ॥ याहीपासून उंचवडें । गुंढले फळाचेनि बुडें । इंद्रादिक ते [16]मांडवे । थोर शाखांचे ॥ ९६ ॥ मग तयांही उपरी डाहाळिया । तपोधनीं उंचावलिया । मरीची कश्यपादि इया । उपरी शाखा ॥ ९७ ॥ एवं माळोवाळीं उत्तरोत्तर । ऊर्ध्वशाखांचा पैसार । बुडीं साना अग्रीं थोर । फळाढ्य हा ॥ ९८ ॥ वरी उपरिशाखाही पाठीं । येती फळभार जे किरीटी । ते ब्रह्मेशांत अणगेटीं । कोंभ निघती ॥ ९९ ॥ फळाचेनि वोझेपणें । ऊर्ध्वीं वोंवांडे तुणें । जंव माघौतें बैसणें । मूळींचि होय ॥ २०० ॥ प्राकृताही तरी रुखा । जे फळें दाटली होय शाखा । ते वोवांडली देखा । बुडासि ये ॥ १ ॥ तैसें जेथुनि हा आघवा । संसारतरूचा उठावा । तिये मूळीं टेंकती पांडवा । वाढतेनि ज्ञानें ॥ २ ॥ म्हणौनि ब्रह्मेशांनापरतें । वाढणें नाहीं जीवातें । तथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं ॥ ३ ॥ परि हें असो ऐसें । ब्रह्मादिक ते आंगवसें । ऊर्ध्वमूळासरिसें[22] । न तूकती गा ॥ ४ ॥ आणिकही शाखा उपरता[23] । जिया सनकादिकनामें विख्याता । तिया फळी मूळीं नोंडळतां[24] । भरलिया ब्रह्मीं ॥ ५ ॥ ऐसी मनुष्यापासूनि जाणावी । ऊर्ध्वीं ब्रह्मादिशेषें[25] पालवी । शाखांची वाढी बरवी । उंचावे पैं ॥ ६ ॥ पार्था ऊर्ध्वींचिया ब्रह्मादि । मनुष्यत्वाचि होय आदि । म्हणौनि इयें अधीं । म्हणीतलीं मूळें ॥ ७ ॥ एवं तुज अलौकिक । हा अधोर्ध्वशाख । सांगीतला भवरूख । ऊर्ध्वमूळ ॥ ८ ॥ आणि अधिचीं[26] हीं मूळें । उपपत्ती परिसविलीं सविवेंळें । आतां परिस उन्मूळें । कैसेनि हा ॥ ९ ॥

---

१ बुद्धीनें. २ सुशोभित. ३ ठसे, अंकुर. ४ शिष्टाचार व वेदोक्त आचरण. ५ विस्तार. ६ घोंस. ७ कवळून. ८ विस्तारानें. ९ मूळया. १० सत्वरूप वारा. ११ जाडी साल. १२ विस्तार. १३ रंगानें. १४ लाल. १५ झांकले. १६ मंडप. १७ माळयामाळ्यावर. १८ ब्रह्मदेव व शिव यांपर्यंत, मुळांत. १९ लवे. २० ब्रह्मा व शिव यांपलीकडे. २१ आकृतीनें. २२ संसारवृक्षासमान गणले जात नाहींत. २३ वरच्या. २४ न स्पर्शतां. २५ समग्र. २६ खालचीं. २७ सविस्तर. २८ उपडेल.

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥**

परि तुझ्या इन पोटीं । ऐसें गमेल किरीटी । जे येवढें झाड उत्पाटी । ऐसें कायि असे ॥ २१० ॥ कीं ब्रह्मयाच्या शेवटवरी । ऊर्ध्व शाखांची थोरी । आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे ॥ ११ ॥ हा स्थावराही तळीं । फांकत असे अर्धीच्या डाळीं । माजि धांवतसे दुजा मळीं । मनुष्यरूपीं ॥ १२ ॥ ऐसा गाढा आणि अफाट । आतां कोण करी यया शेवट । तरि ह्मणि हा हेंळुवट । धरिसी भाव ॥ १३ ॥ तरि हा उन्मूळावया दोषें । येथ सायासचि कायिसे । काय बाळा बागुल देशें । दवडावा आहे ॥ १४ ॥ गंधर्वदुर्ग काय पाडावें । काय शशविषाण मोडावें । होआवें मग तोडावें । खपुष्प कीं ॥ १५ ॥ तैसा संसार हा वीरा । रूख नाहीं साचोकारा । मा उन्मूळणीं दरारा । कायिसा तरी ॥ १६ ॥ आह्मीं सांगीतली जे परी । मूळडाळांची उजरी । ते वांझेचीं घरभरी । लेंकुरें जैसीं ॥ १७ ॥ काय कीजति चेइलेपणीं । स्वप्नींचीं तियें बोलणीं । तैसी जाण ते काहाणी । दुंगळीचि ते ॥ १८ ॥ वांचूनि आह्मीं निरूपिलें जैसें । ययाचें अचळ मूळ असे तैसें । आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा ॥ १९ ॥ तरि कोणाचेनि संतानें । निपजती तया उन्मूळणें । काय फुंकिलिया गगनें । जाइजेल गा ॥ २२० ॥ ह्मणौनि पैं धनंजया । आह्मी वानिलें रूप तें माया । कासवीचेनि तुपें राया । वोगैरिलें जैसें ॥ २१ ॥ मृगजळाचीं गा तळीं । तिये दिठी दुरूनि न्याहाळीं । वांचूनि तेणें पाणियें साळी केळी । लाविसी काई ॥ २२ ॥ मूळ अज्ञानचि तंव लटिकें । मा तयाचें कार्य हें कैतुकें । ह्मणौनि संसाररुख सैत्यकें । वावोचि गा ॥ २३ ॥ आणि अंत यया नाहीं । ऐसें बोलिजे जें कांहीं । तेंही साचचि पाहीं । येके परी ॥ २४ ॥ तरि प्रबोध जंव नोहे । तंव निद्रे काय अंत आहे । कीं रात्री सरे तंव पाहे । तया औरौतें ॥ २५ ॥ तैसा जंव पार्था । विवेक नुधवी माथा । तंव अंत नाहीं अश्वत्था । भवरूपा यया ॥ २६ ॥ वाजतें वारें निवांत । न राहे जेथिचें तेथ । तंव तरंगता अनंत । ह्मणावीच कीं ॥ २७ ॥ ह्मणौनि सूर्य जैं हारपे । तैं मृगजळाभास लोपे । कां प्रभा जाय दीपें । मालवलेनि ॥ २८ ॥ तैसें मूळबीज अविद्या खाये । तें ज्ञान जैं उभे होये । तैंचि यया अंत आहे । येऱ्हवीं नाहीं ॥ २९ ॥ तंवंचि हा अनादी । ऐसी ही आथी शाब्दी । तो आंळु नोहे अनुरोधी । बोलातें यया ॥२३०॥ जे संसारवृक्षाच्याठाईं । साचोकार तंव नाहीं । मा नाहीं तया आदि

---

१ उपटी. २ ब्रह्मलोकपर्यंत. ३ बळकट. ४ क्षुद्र. ५ सशाचे शिंग. ६ आकाशपुष्प. ७ उद्देशें. ८ खरेपणाला. ९ फांद्यांची. १० समज. ११ दुर्बळ. १२ कोणा लेंकाच्यानें. १३ मेजवानी केली. १४ कितकें. १५ सत्यत्वेंकरून. १६ प्रातःकाळ. १७ अलीकडे. १८ वर न करी. १९ वार्ता. २० आळ. २१ अनुकूल नव्हे. २२ सत्यता. २३ मुळींच.

घाया। औषध चेवोचिं[1] धनंजया। तेविं अज्ञानमूळा यया। ज्ञानचि खड्ग ॥ ५४ ॥ परि तेंचि लीला पेरजवे[2]। तैसें वैराग्याचें नवें। अभंगबळ होआवें। बुद्धीसि गा ॥ ५५ ॥ उठिलेनि वैराग्यें जेणें। हा त्रिवर्ग[3] ऐसेनि सांडणें। जैसें वमुनियां[4] सुणें[5]। आ-तांचि गेलें ॥ ५६ ॥ हाठायवरी पांडवा। पदार्थजाती आघवा। विटवी तो होआवा। वैराग्य लाहु[6] ॥ ५७ ॥ मग देहाहंतेचेंदळें। सांडूनि एकेचि वेळे। प्रत्यक्बुद्धी[7] करतळें[8]। हातवसावे[9] ॥ ५८ ॥ निसंळें[10] विवेकसाहणें[11]। जे ब्रह्माहमस्मिबोधें[12] सणाणें[13]। मग पुरतेनि बोधें उटणें[14]। एकलेचि ॥ ५९ ॥ परि निश्चयाचें मुष्टिबळ। पाहावें एकदोनवेळ। मग तुळावें अति चोखाळ। मननवरी ॥ २६० ॥ पाठी हतियेरां[15] आपणयां[16]। निदिध्यासें[17] एक जालिया। पुढें दुजें नुरेल घाया-। पुरतें गा ॥ ६१ ॥ तें आत्मज्ञानाचें खांडें[18]। अद्वैत प्रभे-चेनि वाडें[19]। नेदील उरों कवणेकडे। भववृक्षासि ॥ ६२ ॥ शरदागमींचा वारा। जैसा केर फेडी अंबरा। कां उदयला रवी आंधारा। घोंट भरी ॥ ६३ ॥ नाना उपेवढ[20] होत खेवो। नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो। स्वप्रतीतिधारेचा[21] वोहो[22]। करील तैसें ॥ ६४ ॥ तेव्हां उर्ध्व कां अधोमूळ। कां अधींचें हन शाखाडाळ। तें कांहींचि न दिसे मृगजळ। चांदिणा जेविं ॥ ६५ ॥ ऐसेनि गा वीरनाथा। आत्मज्ञानाचिया खड्गलता। छेदूनियां भवाश्वत्था। ऊर्ध्वमूळातें ॥ ६६ ॥

ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तंति भूयाः।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

मग ईदंतेसि[23] वाळलें। जें मीपणेंवीण डोंहारलें[24]। तें रूप पोहिजे[25] आपलें। आपणचि ॥६७॥ परि दर्पणाचेनि आधारें। एकचि करून दुसरें। मुख पाहाती गांवरें[26]। तैसें नको हो ॥ ६८ ॥ हें हें पाहाणें ऐसें असे वीरा। जैसा नमोडलिया विहिरा। मग आपलीया उगमीं झरा। भरोनि ठाके ॥ ६९ ॥ नातरि आटलिया अंभ[27]। निजबिंबीं प्रतिबिंब। नेहटे[28] कां नभीं नभ। घटाभावीं ॥ २७० ॥ ना ना इंधनांश[29] सरलेया। वन्हि परते जेविं आपणपयां। तैसें आपेंआप धनंजया। न्याहाळणें[30] जें ॥ ७१ ॥ जिव्हे आपली चवी चाखणें। चक्षु निज बुबुळ देखणें। आहे तया ऐसें निरीक्षणें। आपुले पैं ॥ ७२ ॥ कां

---

१ जागें होणें. २ धारण करतां यावें. ३ धर्म, अर्थ आणि काम. ४ ओकुन. ५ कुत्रें. ६ सुकाळ. ७ अंतरनिष्ठबुद्धी हेंच एक. ८ कवच. ९ हातीं घ्यावें. १० पाजविलें. ११ विचाररूप सहाणेवर. १२ मीच ब्रह्म या बोधानें. १३ तीक्ष्ण झालेलें. १४ उरणें. १५ हत्याराला. १६ आपण १७ ध्यानानें. १८ शस्त्र. १९ वाढे. २० जागृति. २१ नेहमीं होणाऱ्या आत्मसाक्षात्काराचा. २२ प्रवाह. २३ बोट दाखवून हें म्हणतां येत नाहीं. २४ प्रसिद्ध झालें. २५ पाहावें. २६ गव्हार. २७ पाणी. २८ मिळे. २९ जळण. ३० पाहणें.

प्रभेसी प्रभा मिळे । गगन गगनावरी लोळे । नाना पाणी भरलें खोळे । पाणियाचिये ॥ ७३ ॥ आपणेंचि आपणयातें । पाहिजे जें अद्वैतें । तें ऐसें होय निरुत्तें । बोलिजतु असे ॥ ७४ ॥ जें [1]पाहिजतेनवीण पाहिजे । कांहीं नेणणा[2]चि जाणिजे । आद्यपुरुष ह्मणिजे । जया ठायातें ॥ ७५ ॥ तेथही उपाधीचा वोथंबा[3] । घेऊनि श्रुति उभविती जिभा । मग नामरूपाचा बडंबा[4] । करिती वायां ॥ ७६ ॥ पैं भवस्वर्गा उबगले[5] । मुमुक्षु योगज्ञाना वेंळघले[6] । पुढती नैयों[7] इया निगाले । पैजा[8] जेथ ॥ ७७ ॥ संसाराचिया पायां पुढां । पळती वीतराग[9] होडें[10] । ओलांडोनि ब्रह्मपदाचा[11] कर्म कडा । घालिती मागां ॥ ७८ ॥ अहंतादिभावां आपुलियां । झाडा देऊनि आघवेयां । पत्र [12]घेतां ज्ञानिये जया । मूळघरासी ॥ ७९ ॥ पैं जेथुनी हे येवढी । विश्वपरंपरेची विरूढी[13] । वाढती आशा जैसी कोरडी । निर्दैवाची ॥ २८० ॥ जिये कां वस्तूचें नेणणें । आणिलें थोर जगा आणणें । नाहीं तें नांदविलें जेणें । मी तूं जगीं ॥ ८१ ॥ पार्था तें वस्तु पहिलें । आपण पैं आपुलें । पाहिजे जैसें हिंवलें[14] । हिंवें[14] हिंवें ॥ ८२ ॥ आणीकही एक तया । वोळखण असे धनंजया । तरी कां जया भेटलिया । येणेंचिनाहीं ॥ ८३ ॥ परि तया भेटती ऐसे । जे ज्ञानें सर्वत्र सरिसे । महाप्रळयांबूचें जैसें । भरलेपण ॥ ८४ ॥

**निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।**
**द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥**

जया पुरुषांचें कां मन । सांडोनि गेले मोह मान[15] । वर्षांतीं[16] जैसे घन । आकाशातें ॥ ८५ ॥ निकेंवडया[17] निष्टुरा । उबगिजे[18] जेविं सोयरा[19] । तैसे नांगवती[20] विकारां । वेटाळूं जे ॥ ८६ ॥ फळली केळी उन्मूळे[21] । तैसी आत्मलाभें प्रबळें । जयाची क्रिया ढेंढाळें[22] । गळती आहे ॥ ८७ ॥ आगी लागलिया रुखीं । देखोनि सैरा पळती पक्षी । तैसें सांडिलें अशेखीं । विकल्पीं जे ॥ ८८ ॥ आइकें सकळ दोषतृणां[23] । अंकुरिजेति[24] ( जिये [25]मेदिनी । तिये भेदबुद्धीची ) काहाणी । नाहीं जयातें ॥ ८९ ॥ सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय अपैसी । गेली देहअहंता तैसी । अविद्येसवें ॥ २९० ॥ पैं आयुष्यहीना जीवातें । शरीर सांडी जेविं अवचितें । तेविं निदसुरें द्वैतें । सांडिले जे ॥ ९१ ॥ लोहाचें सांकडें[26] परिसौ[27] । न जोडे अंधार रवी[28] जैसा । द्वैतबुद्धीचा तैसा । दुकाळ सदां जया ॥ ९२ ॥

---

१ पाहणारावांचून. २ अज्ञान्यानें. ३ आश्रय. ४ गलबला. ५ कंटाळले. ६ अनुसरले. ७ न येऊं. ८ प्रतिज्ञेनें. ९ विरक्त. १० पैजेनें. ११ ब्रह्मपदाचा कडा, उल्लंघून कर्म मागें टाकतात. १२ पोंचती. १३ स्थिति. १४ जसें थंडीनें थंडीला थंडवावें तसें. १५ अभिमान. १६ पावसाळा सरल्यावर. १७ अति दरिद्र्याला. १८ तिरस्कार करतात. १९ आप्त. २० न आटोपती. २१ उपटून पडते. २२ क्रमाक्रमानें. २३ दोषरूप गवत. २४ उत्पन्न होते. २५ पृथ्वी. ( भेदबुद्धि हीच एक पृथ्वी.) २६ दुष्काळ. २७ एक दगड जो लोखंडाला लागला असतां सोनें होतें. २८ रवीला.

अगा सुखदुःखाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें । तियें जयां कां समोरें । होतीचि ना ॥ ९३ ॥ स्वमींचें राज्य कां मरण । नोहे हर्षशोकांसि कारण । उपवढलिया[1] जाण । जियापरी ॥ ९४ ॥ तैसे सुखदुःखरूपीं । द्वंद्वीं जे पुण्यपापीं । न घेपीजेती[2] सर्पीं । गरुड जैसे ॥ ९५ ॥ आणि अनात्मवर्गनीर[3] । सांडूनि आत्मरसाचें क्षीर । चरताति[4] जे सविचार । राजहंस ॥ ९६ ॥ जैसा वर्षोनि भूतळीं । आपला रस अंशुमाळी[5] । मागौता आणी रश्मिजाळीं । बिंबासीचि ॥ ९७ ॥ तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली[6] बारावाटीं । ते एकवटिती ज्ञानदृष्टीं । अखंड जे ॥ ९८ ॥ किंबहुना आत्मयाचा । निर्धारीं विवेक जयांचा । बुडाला बोध गंगेचा । सिंधुमाजि जैसा ॥ ९९ ॥ पैं आघवेंचि आपूलेपणें । तुरेचि जयां अभिलषणें । जैसें येथुनि पैल्हा[7] जाणें । आकाशा नाहीं ॥ ३०० ॥ जैसा आगीचा डोंगर । नेघे कोणी बीज अंकुर । तैसा मनीं जयांचा विकार । उदयजेना ॥ १ ॥ जैसा काढिलिया मंदराचळ । राहे क्षीराब्धी निश्चळ । तैसा तुटी जयां सळ । कामोर्मीचा[9] ॥ २ ॥ चंद्रमा कळीं धाला । न दिसे कोणें आंगीं सोसावला[11] । तेविं अपेक्षेचा अवखळा[12] । नपडे जयां ॥ ३ ॥ हें किती बोलूं असांगडें[13] । जेविं परमाणु नुरे वायुपुढें । तैसें विषयाचें नावडे । नांवचि जयां ॥ ४ ॥ एवं जे जे कोणी ऐसे । केले ज्ञानाख्यहुताशें[14] । ते तेथ मिळती जैसें । हेमीं हेम[15] ॥ ५ ॥ तेथ ह्मणिजे कवणें ठाईं । ऐसेंही पुससी कांहीं । तरि तें पद गा नाहीं । वेंचुं[16] जया ॥ ६ ॥ दृश्यपणें देखिजे । कां ज्ञेयत्वें जाणिजे । अमुकें ऐसें ह्मणिजे । तें जें नव्हे ॥ ७ ॥

न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

पैं दीपाचिया बंबाळीं । कां चंद्र हन जें उजळी । हें काय बोलों अंशुमाळी[17] । प्रकाशी जें ॥ ८ ॥ तें आघवेंचि दिसणें । जयाचें कां न देखणें । विश्व भासतसे जेणें । लपालेनी ॥ ९ ॥ जैसें शिंपीपण हारपे । तंव तंव खरें होय रुपें । कां दोरी लोपतां सापें । फार होइजे ॥ ३१० ॥ तैसीं चंद्रसूर्यादि थोरें । इयें तेजें जियें फारें । तियें जयाचेनि आधारें । प्रकाशती ॥ ११ ॥ ते वस्तु कीं तेजोराशी । सर्वभूतात्मक सरिसी[19] । चंद्रसूर्याच्या मानसीं । प्रकाशे जे ॥ १२ ॥ ह्मणौनि चंद्रसूर्य कैंडवसा । पडती वस्तूच्या प्रकाशा । यालागीं तेज जें तेजैसा[21] । तें वस्तूचें अंग ॥ १३ ॥ आणि जयाच्या प्रकाशीं ।

१ जागे झाल्यावर. २ पराजित केले जात नाहींत. ३ जड समुदायरूप जल. ४ वागतात. ५ सूर्य. ६ पसरली. ७ पलीकडे. ८ उसळा, कढ. ९ इच्छारूप लाटांचा. १० षोडश कलांनीं भरला. ११ न्यून नाहीं. १२ न्यूनता. १३ निरूपम. १४ ज्ञानरूप अग्नीनें. १५ सोनें. १६ नाश. १७ सूर्य. १८ प्रसृत. १९ समान. २० कवडसा. २१ तेजवंतास.

जग हारपे चंद्रार्कैसीं । सचंद्रनक्षत्रें जैसीं । दिनो[1]दयीं ॥ १४ ॥ ना तरी [2]प्रबोधलिये वेळे। ते स्वर्मींची [3]डिंडी मावळे । कां नुरेचि सांजवेळे । मृगतृष्णिका ॥ १५ ॥ तैसा जिये वस्तूच्या ठायीं । कोण्हीच कां आभास नाहीं । तें माझें निजधाम पाहीं । [4]पैटाचें गा ॥ १६ ॥ पुढती जे तेथ गेले । ते न घेती माघौतीं पाउलें । महोदधीं कां मि[5]नले । स्रोतें[6] जैसे ॥ १७ ॥ कां लवणाची कुं[7]जरी । [8]सुदलिया लवणसागरीं । होयचि ना मावारी । परती जैसी ॥ १८ ॥ [9]नाना गेलियां अंतराळा । न येतीचि वन्हिज्वाळा । नाहीं त[10]प्तलोहौनि जळा । निघणें जेविं ॥ १९ ॥ तेविं मजसीं एकवट । जे जाले ज्ञानें चोखट । तयां [11]पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥ ३२० ॥ तेथ प्रज्ञापृथ्वीचा रावो । पार्थ ह्मणे जी जी [12]पैसावो । परि विनंती एकी देवो । चित्त देतु ॥ २१ ॥ तरी देवेंसि स्वयें एक होती । मग माघौती जे न येती । ते देवेंसि भिन्न आथी । कीं अभिन्न जी ॥ २२ ॥ जरि भिन्नचि अनादिसिद्ध । तरी न येती हें [13]असंबद्ध । जे फुला गेले षट्पद । ते फुलेंचि होती का ॥ २३ ॥ पैं [14]लक्षाहूनि [15]अनारिसे । बाण लक्षीं शिवोनि जैसे । मागुते पडती तैसे । येतीचि ते ॥ २४ ॥ ना तरि तूंचि ते स्वभावें । तरि कोण कोणेसीं मिळावें । आपणयासीं आपण [16]रूपावें । शस्त्रें केविं ॥ २५ ॥ ह्मणौनि तुजसीं अभिन्नां जीवां । तुझा संयोगवियोग देवा । नये बोलों अवयवां । शरीरेंसीं ॥ २६ ॥ आणि जे सदा वेगळे तुजसीं । तयां [17]मिळणी नाहीं कोणें दिवसीं । मा येती न येती हे कायसी । [18]वैयर्थबुद्धि ॥ २७ ॥ तरि कोण गा ते तूतें । पावोनि न येती माघौते । हें [19]विश्वतोमुखा मातें । [20]बुझावीं जी ॥ २८ ॥ इये अपेक्षा अर्जुनाच्या । तो शिरोमणी सर्वज्ञांचा । तोषला बोध शिष्याचा । देखोनियां ॥ २९ ॥ मग ह्मणे गा महामति । मातें पावोनि न येती पुढती । ते भिन्नाभिन्न रिती । आहाती दोनी ॥ ३३० ॥ जैं विवेकें खोलें पाहिजे । तरि मी तेचि ते सहजें । ना [21]ओहाचवाहाच तरि दुजें । ऐसेंही गमती ॥ ३१ ॥ जैसें [22]पाणियावरी वेगळ । तळपतां दिसती [22]कल्लोळ । येऱ्हवीं तरी निखिळ । पाणीचि तें ॥ ३२ ॥ कां सुवर्णाहूनि आनें । [23]लेणीं गमती भिन्नें । मग पाहिजे तंव सोनें । आघवेंचि तें ॥ ३३ ॥ तैसें ज्ञानाचिये दिठी । मजसीं अभिन्नचि ते किरीटी । येर भिन्नपण तें उठी । अज्ञानास्तव ॥ ३४ ॥ आणि [24]सोंचोकारेनि वस्तुविचारें । कैंचें मज एकासि दुसरें । जें भिन्नाभिन्नव्यवहारें । उमसिजेल[25] ॥ ३५ ॥ आघवेंचि आकाश [26]सूनि पोटीं । बिंबचि जैं

---

१ सूर्य उगवल्यावर. २ जागृतीनंतर. ३ स्वारी. ४ मुख्य, अधिकाराचें. ५ मिळाले. ६ पाण्याचे प्रवाह. ७ हत्तीण. ८ घातली असतां. ९ अथवा. १० तापलेल्या लोखंडांतून. ११ पुनर्जन्माची. १२ प्रसाद. १३ वायफळ. १४ निशाणाहून. १५ भिन्न. १६ भोसकावें. १७ ऐक्य. १८ व्यर्थमति. १९ सर्वत्र मुखें आहेत ज्याला अशा श्रीकृष्णा. २० समजाव. २१ वरवरचे. २२ पाण्यावर कल्लोळ दिसतात तेव्हां वेगळेपणा भासतो. २३ अलंकार. २४ खरें पाहिलें असतां. २५ उद्भविजेल. २६ घालून.

आते खोटी[2] । तें प्रतिबिंब कें उठी । कें रश्मि शिरे ॥ ३६ ॥ कां कल्पांतींचिया पाणिया । काय वोतें[3] भरिती धनंजया । ह्मणौनि कैंचे अंश अविक्रियां[4] । एका मज ॥ ३७ ॥ परि वोघाचेनि मेळें । पाणि उजू परि वांकुडें जालें । रवी दुजेपण आलें । तोयें-बगें ॥ ३८ ॥ व्योम चौफळें कीं वाटोळें । हें ऐसें कायसया मिळे । परि घटमठीं वेटाळें । तैसेंही आथी ॥ ३९ ॥ हां गा निद्रेचोनि आधारें । काय एकलेनि जग न भरे । स्वप्नीं चोनि जें अवतरे । रायपणें ॥ ३४० ॥ कां मिनलेनि किडाळें । वानिभेदासि ये सोळें । तैसा स्वमायें वेंटाळें । शुद्ध जै मीं ॥४१॥ तें अज्ञान एक रूढे । तेणें कोहंविकल्पाचें[10] मांडें । मग विवरूनि कीजे फुडें[11] । [12]देहोहं ऐसें ॥ ४२ ॥

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**
**मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

ऐसें शरीराचियेवढें । जैं आत्मज्ञान वेगळें पडे । तैं माझा अंश आवडे । थोडेपणें ॥ ४३ ॥ समुद्र कां वायुवशें । तरंगाकार उल्लसे । तो समुद्रांश ऐसा दिसे । [13]सानिवा जेविं ॥४४॥ तेविं जडातें जीववित्ता । देह अहंता उपजविता । मीं जीव [14]गमे पंडुसुता । जीव-लोकीं ॥४५॥ पैं जीवाचिया बोधा । गोचर जो हा [15]धांदा । तो जीवलोकशब्दा । [16]अभि-प्राय ॥ ४६ ॥ अगा उपजणें निमणें । हें साचचि जें कां मानणें । तो जीवलोक मी ह्मणे । संसार हन ॥ ४७ ॥ एवंविध जीवलोकीं । तूं मातें ऐसा अवलोकीं । जैसा चंद्र कां उदकीं । उदकातीत ॥ ४८ ॥ पैं [18]काश्मीराचा रवा । कुंकुमावरी पांडवा । आणिकां गमे लोहिवा । तो तरी नव्हे ॥ ४९ ॥ तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न खंडे । परि कर्ता भोक्ता ऐसें आवडे । ते जाण गा भ्रांती ॥ ३५० ॥ किंबहुना आत्मा चोखट । होउनि प्रकृतीसि एकवट । [20]बांधे प्रकृतिधर्माचा पाट । आपणपयां ॥ ५१ ॥ पैं मनेंसी साहीं इंद्रियें । श्रोत्रादि [22]प्रकृतिकार्यें । तियें माझीं ह्मणौनि होये । व्यापारारूढ ॥ ५२ ॥ जैसें स्वप्नीं [23]परिव्राजें । आपणपयां आपण कुटुंब होइजे । मग तयाचेनि धांविजे । मोहें सैरा ॥ ५३ ॥ तैसा आपलिया विस्मृती । आत्मा आपणचि प्रकृती- । सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ॥ ५४ ॥ मनाच्या रथीं [24]वेंळघे । श्रवणाच्या द्वारें निघे । मग शब्दाचिया रिघे । रानामाजि ॥५५॥ तोचि प्रकृतीचा [25]वोगोरा । करी त्वचेचिया [26]मोहरां । आणि स्पर्शाचिया घोरा । वना जाय ॥ ५६ ॥ कोणे एके अवसरीं । रिघोनि नेत्राच्या

---

१ व्यापी. २ गोळा. ३ ओहोटी. ४ विकार न पावणाराला. ५ पाण्याच्या संबंधानें. ६ चतुष्कोण. ७ कशानें. ८ हिणकट मिश्रित झालें असतां. ९ भिन्न कसोटीस. १० मांडतें. ११ स्पष्ट. १२ देहच मीं असें तादात्म्य. १३ लहान. १४ वाटूं लागतो. १५ अखंडत्व, व्यापार. १६ हेतु. १७ मरणें. १८ स्फटिकाचा. १९ लाल. २० स्वीकारी. २१ अधिकार. २२ मायिक. २३ संन्याशानें. २४ चढे. २५ दोर, लगाम. २६ सन्मुख.

द्वारीं । मग रूपाच्या डोंगरीं । सैरा हिंडे ॥ ५७ ॥ कां रसनेचिया वाटा । निघोनि गा सुभटा । रासाचा दरकुटा । भरोंचि लागे ॥ ५८ ॥ ना तरि येणेंचि घ्राणें । मदंशें[2] करी निघणें । मग गंधाचीं दारुणें । आडवें[3] लंघी ॥ ५९ ॥ ऐसेनि देहेंद्रियनायकें । धरूनि मन जवळिकें । भोगीजती शब्दादिकें । विषयभरणें ॥ ३६० ॥

शरीरं यद्वाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।
गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥

परि कर्ता भोक्ता ऐसें । हें जीवाचें तैंचि दिसे । जैं शरीरीं कां[6] पैसे । येकाधिये ॥ ६१ ॥ जैसा आंथिला आणि विलासिया । तैंचि वोळखों ये धनंजया । जैं राजसेव्या ठाया । वस्तीसि ये ॥ ६२ ॥ तैसा अहंकर्तृत्वाचा वाढ । कां विषयेंद्रियांचा धुंमाड । हा जाणिजे तैं निवाड । जैं देह पावे ॥ ६३ ॥ अथवा शरीरातें सांडी । तऱ्हीं इंद्रियांची तांडी । हे आपणपयां सवें जोडी । घेऊनि जाय ॥ ६४ ॥ जैसा अपमानिला अतिथि । ने सुकृताची संपत्ती । कां सांइखडेयाची[13] गती । सूत्रतंतू ॥ ६५ ॥ ना ना मावळतां नि तर्पनें । नेइजती लोकांचीं दर्शनें । हें असो द्रुतीं[15] पवनें । नेइजे जैसी ॥ ६६ ॥ तेवि मनःषष्ठा[16] ययां । इंद्रियांतें धनंजया । देहराज ने देहा- । पासूनि गेला ॥ ६७ ॥

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

मग येथें अथवा स्वर्गीं । जेथ जेथ जैं देह आपंगी । तेथ तैसेंचि पुढती[19] पांगी । मनादिक ॥ ६८ ॥ जैसा मालवलिया दिवा । प्रभेसि जाय पांडवा । मग उंजळिजे[20] तेथ तेधवां । तैसाचि फांके ॥ ६९ ॥ तरि ऐसैसिया राहाटी । अविवेकियांचे दिठी । येतुलें हें किरीटी । गमेचि गा ॥ ३७० ॥ जे आत्मा देहासि आला । आणि विषय येणेंचि भोगिला । अथवा [21]देहोनि गेला । हें साचचि मानिती ॥ ७१ ॥ येऱ्हवीं येणें आणि जाणें । कां करणें हन भोगणें । हें प्रकृतीचें तेणें । मानियेलें ॥ ७२ ॥

उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।
विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥

---

१ गुहा. २ माझा अंश. ३ अरण्यें. ४ जीवानें. ५ पोषण. ६ प्रवेशे. ७ संपन्न. ८ नगराला. ९ अधिक्य. १० योग. ११ विवेचन. १२ समुदाय. १३ कळसूत्री बाहुलीची. १४ सूर्यानें. १५ सुवास. १६ मन आहे साहावें ज्यांला अशीं पांच ज्ञानेंद्रियें. १७ जीव. १८ स्वीकारी. १९ विस्तारी. २० लावावा. २१ देहांतून.

**यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥**

परि देहाचें मोटकें[1] उभें । आणि चेतना तेथ उंपलभे[2] । तिये चळवळेचेनि लोभें । आला ह्मणती ॥ ७३ ॥ तैसेंचि तया संगतीं । इंद्रियें आपलालां अर्थीं वर्तती । तया नांव सुभद्रापती । भोगणें जया ॥ ७४ ॥ पाठीं भोगक्षीण अपैसें । देह गेलिया तें न दिसे । तेथें गेला गेला ऐसें । बोभाती[3] ॥ ७५ ॥ पैं रुंख[4] डोलत देखावा । तरी वारा वाजत मानावा । रुख न दिसे तेथें पांडवा । नाहीं तो गा ॥ ७६ ॥ कां आरसा समोर ठेविजे । आणि आपणपें तेथ देखिजे । तरि तेथवांचि जालें मानिजे । काय आधीं नाहीं ॥ ७७ ॥ कां परता केलिया आरिसा । लोप जाला तया आभासा । तरी आपणपें नाहीं ऐसा । निश्चय करावा ॥ ७८ ॥ शब्द तरि आकाशाचा । परि कपाळीं पिटे मेघाचा । कां चंद्रीं वेग अभ्राचा । आरोपिजे ॥ ७९ ॥ तैसें होइजे जाइजे देहें । तें आत्मसत्ते अविक्रिये । निश्चिंती गा मोहें आंधळे ते ॥ ३८० ॥ येथ आत्मा आगयाच्या-ठायीं । देखिजे देहींचा धर्म देहीं । ऐसे देखणे ते पाहीं । आन आहाती ॥ ८१ ॥ ज्ञानें कां जयाचे डोळे । देखोनि न राहाती देहींचे खोळे । सूर्यरश्मी आणियाळे । ग्रीष्मीं जैसे ॥ ८२ ॥ तैसी विवेकाचेनि पैसें[10] । जयांची स्फूर्ती स्वरूपीं बैसे । ते ज्ञानिये देखती ऐसें । आत्मयातें ॥ ८३ ॥ जैसें तारांगणीं भरलें । गगन समुद्रीं बिंबलें । परि तें तुटोनि नाहीं पडिलें । ऐसें निवडे ॥ ८४ ॥ गगन गगनींचि आहे । हें आभासे तें वांयें[11] । तैसा आत्मा देखती देहें । गंवसिलाही[12] ॥ ८५ ॥ खळाळाच्या लगबगी[13] । फेडूनि खळाळाच्या भागीं । देखिजे चंद्रिका कां उगी । चंद्रीं जेवि ॥ ८६ ॥ कां नोंडरचि[14] भरे शोषे । सूर्य तो जैसा तैसाचि असे । देह होतां जातां तैसें । देखती मातें ॥ ८७ ॥ घट मठ घडले । तेचि पाठीं मोडले । परि आकाश तें संचलें । असताचि असे ॥ ८८ ॥ तैसें अखंडे आत्मत्ते । अज्ञनदृष्टि कल्पितें । हें देहाचि होतें जातें । जाणती फुडें[15] ॥ ८९ ॥ चैतन्य[16] चढे ना वोहटे । चेष्टवी ना चेष्टे । ऐसें आत्मज्ञानें चोखटें[17] । जाणती ते ॥ ३९० ॥ आणि ज्ञानही अपैतें[18] होईल । प्रज्ञा परमाणुही उगाणा[19] देईल । सकळ शास्त्रांचें येइल । सर्वस्व हाता ॥ ९१ ॥ परी ते व्युत्पत्ती ऐसी । जरी विरक्ती न रिगे मानसीं । तरी सर्वात्मका मजसीं । नव्हेचि भेटी ॥ ९२ ॥ पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतःकरणीं विषयांसी थारा । तरी नातुडे धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ॥ ९३ ॥ हां गा वोसंणतयाच्या[20] ग्रंथीं । काइ तुटती संसारगुंती । कीं परिवासिलिया[21] पोथी । वाचिली होय ॥ ९४ ॥ ना ना बांधोनियां डोळे । प्राणी

१ मोटकुलें, लहान. २ मिळे. ३ ह्मणतात. ४ वृक्ष. ५ मस्तकीं ठेविली. ६ निश्चय करिती. ७ पाहणारे. ८ पदरांत. ९ प्रखर. १० पसाऱ्यानें. ११ व्यर्थ. १२ आढळला. १३ वेगांत. १४ डबक. १५ स्पष्ट. १६ अज्ञ. १७ यथार्थ. १८ प्राप्त. १९ झाडा. २० स्वप्नांत बोलणाऱ्याच्या. २१ स्पर्शलिया.

लाविजती मुक्ताफळें । तरी तयांचें काय कळे । मोल मान ॥ ९५ ॥ तैसा चित्तीं अहंते ठावो । आणि जिभे सकळशास्त्रांचा सेरावो । ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परि न पविजे मातें ॥ ९६ ॥ जो एक मी कां समस्तीं । व्यापक असें भूत जातीं । ऐक तिये व्याप्ती । रूप करूं ॥ ९७ ॥

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**
**यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥**

तरी सूर्यासकट आघवी । हे विश्वरचना जे दावी । ते दीप्ति माझी जाणावी। आद्यंतीं आहे ॥ ९८ ॥ जळ शोषुनि गेलिया सविता । ओलांश पुरवीतसे जे मावोता । ते चंद्रीं पंडुसुता । ज्योत्स्ना माझी ॥ ९९ ॥ आणि दहन पाचनसिद्धी । करीतसे जे निरवधी । ते हुताशीं तेजोवृद्धी । माझीचि गा ॥ ४०० ॥

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥**

मी रिगालों असें भूतळीं । म्हणौनि समुद्र महाजळीं । हे पांसूची ढेंपुळी । विरेचिना ॥ १ ॥ आणि भूतंहि चराचरें । हे धरीतसे जिये अपारें । तियें मीचि धरीं धेरे । रिगोनियां ॥ २ ॥ गगनीं मी पंडुसुता । चंद्राचेनि मिसें अमृता। भरला जालों चालता। सरोवर ॥ ३ ॥ तेथुनी फांकती रश्मि कर । ते पोंट पेलूनि अपार । सर्वौषधींचे आगर । भरित असें मी ॥ ४ ॥ ऐसेनि सस्यादिकां सकळां । करीं धान्यजातीं सुकाळा । हें अन्नद्वारा जिव्हाळा । भूतजातां ॥ ५ ॥

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥**

आणि निपजविलें अन्न । तरि तैसें केवें दीपन । जेणें जिरूनि समाधान । भोगिती जीव ॥ ६ ॥ म्हणौनि प्राणिजातांच्या घटीं । करूनि कंदावरी आंगिठी । दीप्ति जठरींही किरीटी । मीचि जालों ॥ ७ ॥ प्राणापानाच्या जोडभातीं । फुंकफुकोनियां अहोराती । ओटीतसें नेणों किती । उदरामाजी ॥ ८ ॥ शुष्कें अथवा स्निग्धें । सुपक्कें कां विदग्धें । परि मीचि गा चतुर्विधें । अन्नें पचीं ॥ ९ ॥ एवं मीचि आघवें जन । जना निरविलें मीचि जीवन । जीवनीं मुख्यसाधन । वन्हिही मीचि ॥ ४१० ॥ आतां ऐसि-

१ अभ्यास. २ कोटयवधि. ३ स्पष्ट प्रतिपादन करूं. ४ प्रकाश. ५ उजेड, कांति. ६ भाजणें. ७ अग्नींत. ८ रजःकणांची ढेंप, पृथ्वी. ९ जमिनींत. १० ओघ करून. ११ धान्यादिकांला. १२ नाभिकंदावर. १३ शेगडी. १४ पचवीतसें. १५ भाजलेलीं. १६ निर्वाहक.

याहीवरी काई । सांगों व्याप्तीची[1] नवाई । येथ दुजें नाहींचि वोई । सर्वत्र मीचि ॥ ११ ॥ तरि केसोंनि पां वेखें[2] । सदा सुखिये येकें । येकें तियें बहुदुःखें । कांत भूतें ॥ १२ ॥ जैसीं सपाळिये पाटणीं[3] । ऐकेचि[4] दीपें दिवेलावणी । जालिया कां न देखणीं । उरलीं एकें ॥ १३ ॥ ऐसी हन ऊखिविखी[5] । करित आहासी मानसिकीं । तरि परिस तेही निकी । शंका फेडूं ॥ १४ ॥ पैं अवघा मीचि असें । येथ नाहीं कीर अनारिसें[6] । परि प्राणियांचिया उल्लासें । बुद्धिऐसा[7] ॥ १५ ॥ जैसें एकाचि आकाशध्वनीं । वाद्यविशेषीं आनानी । वाजावें पडे भिन्नीं । नादांतरीं ॥ १६ ॥ कां लोकचेष्टीं वेगळाला । जो हा एकाचि भानु[8] उगवला । तो आनानी[9] परी गेला । उपयोगासी ॥ १७ ॥ ना ना बीजधर्मानुरूप । झाडां उपजवी आंप[10] । तैसें परिणमलें स्वरूप । माझें जीवा ॥ १८ ॥ अगा नेणां[11] आणि चतुरा । पुढां नीळैयांचा[12] दुसरा[13] । नेणा सर्प जाला येरा । सुखालागीं ॥ १९ ॥ हें असो स्वातीचें उदक । शुंक्तीं[14] मोतीं व्याळीं[15] विख । तैसा सज्ञानांसी मी सुख । दुःख तों अज्ञानासी ॥ ४२० ॥

## सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
## वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥

येऱ्हवीं सर्वांच्या हृदयदेशीं । मी अमुका आहें ऐसी । जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं । ते वस्तु गा मी ॥ २१ ॥ परि संतासवें वसतां । योगज्ञानी पैसतां[16] । गुरुचरण उपासितां । वैराग्येसीं ॥ २२ ॥ येणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे[17] । जयांचें अहं विश्रामे[18] । आत्मरूपीं ॥ २३ ॥ ते आपेंआप देखोनि देखीं । मियां आत्मेनि सदा सुखी । येथें मीवांचून अवलोकीं । आन हेतु असे ॥ २४ ॥ अगा सूर्योदय जालिया । सूर्ये सूर्यचि पाहावा धनंजया । तेविं मातें मियां जाणावया । मींचि हेतु ॥ २५ ॥ ना शरीरपसतें सेवितां । संसारगौरवाचि ऐकतां । देहीं जयांची अहंता । बुडोनि ठेली ॥ २६ ॥ ते स्वर्गसंसारलाभीं । धांवतां कर्ममार्गीं । दुःखाच्या सेलेंभागीं । विभागी होती ॥ २७ ॥ परि हेंही होणें अर्जुना । मजचिस्तव तया अज्ञाना । जैसा जागताचि हेतु स्वप्ना । निद्रेतें होय ॥ २८ ॥ पैं अभ्रें दिवस हरपला । तोही दिवसेंचि जाणों आला । तेविं मी नेणोनि विषय देखिला । मजचिस्तव भूतीं ॥ २९ ॥ एवं निद्रा कां जागणिया । प्रबोधचि हेतु धनंजया । तेविं ज्ञाना अज्ञाना जीवांचिया । मीचि मूळ ॥ ४३० ॥ जैसें सर्पत्वा कां दोरा । दोरचि

---

१ व्यापकपणाची अपूर्वता. २ वेषानें. ३ नगरांत. ४ एकच उजेड जर सर्व शहरभर केला तर कोणास दिसावें व कोणास दिसूं नये असें कां बरें. ५ तर्क वितर्क. ६ वेगळें. ७ बुद्धीसारखा. ८ सूर्य. ९ भिन्नभिन्न. १० उदक. ११ अडाणी. १२ नीळमण्यांचा. १३ दोन सरांचा हार. १४ शिंपींत. १५ सपोला. १६ अभ्यासितां. १७ लय पावे. १८ शेवटीं.

मूळ धनुर्धरा । तैसा ज्ञाना अज्ञानाचिया संसारा । मियांचि सिद्धि ॥ ३१ ॥ म्हणौनि जैसा असें तैसया । मातें नेणोनि धनंजया । वेद जाणों गेला तंव तया । जालिया शाखा ॥ ३२ ॥ तरि तिहीं शाखाभेदीं । मीचि जाणिजे त्रिशुद्धी । जैसा पूर्वापरा नदी । समुद्रचि ठी ॥ ३३ ॥ आणि महासिद्धांतापासीं । श्रुति हारपती शब्देंसी । जैसिया सगंधा आकाशीं । वातलहरी ॥ ३४ ॥ तैसें समस्तही श्रुतिजात । ठाके लाजिलें ऐसें निवांत । तें मीचि करीं यथावत । प्रकटोनियां ॥ ३५ ॥ पाठीं श्रुतीसहित अशेष । जग हारपे जेथ निःशेष । तें निजज्ञानही चोख । जाणता मीचि ॥ ३६ ॥ जैसें निदेलिया जागिजे । तेव्हां स्वप्नाचें कीर नाहीं दुजें । परि एकत्वही देखों पाविजे । आपलेंचि ॥ ३७ ॥ तैसें आपलें अद्वयपण । मी जाणतसें दुजेनवीण । तयाही बोधाकारण । जाणता मीचि ॥ ३८ ॥ मग आगी लागलिया कापुरा । काजळी ना वैश्वानरा । उरणें नाहीं वीरा । जयापरी ॥ ३९ ॥ तेवि समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जैं बुडोनि जाये । तऱ्हीं नाहीं कीर नोहे । आणि न साहे असणेंही ॥ ४४० ॥ पैं विश्व घेऊनि गेला मागेसीं । तया चोरातें कवण कें गिंवसी । जे कोणी एकी दशा ऐसी । शुद्ध ते मी ॥ ४१ ॥ ऐसी जडाजडव्याप्ती । रूप करितां कैवल्यपती । ठी केली निरुपहिती । आपुल्या रूपीं ॥ ४२ ॥ तो आघवाचि बोध सहसा । अर्जुनीं उमटला कैसा । व्योमींचा चंद्रोदय जैसा । क्षीरार्णवीं ॥ ४३ ॥ कां प्रतिभिती चोखट । समोरील चित्र उमटे । तैसा अर्जुनें आणि वैकुंठें । नांदतसे बोध ॥ ४४ ॥ तरि बाप वस्तुस्वभाव । फावे तंव तंव गोडिये थांवे । म्हणौनि अनुभवियांचा राव । अर्जुन म्हणे ॥ ४५ ॥ जी व्यापकपण बोलतां । निरुपाधिक जें आतां । स्वरूप प्रसंगता । बोलिले देवो ॥ ४६ ॥ तें एकवेळ अभ्यंगवाणें । कीजो कां मज सांगणें । तेथ द्वारकेचा नाथ म्हणे । भलें केलें ॥ ४७ ॥ पैं अर्जुना आम्हाहि वोडेंकोडें । अखंड बोलों आवडे । परि काय कीजे न जोडे । पुसतें ऐसें ॥ ४८ ॥ आजि मनोरथांसि फळ । जोडलासि तूं केवळ । जे तोंड भरूनि निखळ । आलासि पुसों ॥ ४९ ॥ जें अद्वैतावरीही भोगिजे । तें अनुभवींचें तूं विरजें[१४] । पुसोनि मज माझें । देतोसि सुख ॥ ४५० ॥ जैसा आरसा आलिया जवळां । दिसे आपणपें आपला डोळां । तैसा संवादियां तूं निर्मळा । शिरोमणी ॥ ५१ ॥ तुवां नेणोनि पुसावें । मग आह्मी परिसऊं बैसावें । तो गा हा पैंड नव्हे । सोयरेया ॥ ५२ ॥ ऐसें म्हणौनि आलिंगिलें । कृपादृष्टी अवलोकिलें । मग देव काय बोलिले । अर्जुनेंसी ॥ ५३ ॥ पैं दोहीं वोठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें । तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें ॥ ५४ ॥ एवं आह्मी तुह्मी येथें । देखावें एका

---

१ विभाग. २ स्थान. ३ सुगंधयुक्त. ४ अग्नीला. ५ मागासकट. ६ शोधी. ७ उघड. ८ बिंबला. ९ क्षीरसमुद्रांत. १० आधार. ११ परिपूर्ण. १२ आवडीनें. १३ प्रश्नकर्ता. १४ निर्मळ साधन. १५ डोळ्यानें. १६ योग्यता.

अर्थातें । सांगतें पुसतें येथें । दोन्हीं एक ॥ ५५ ॥ ऐसा बोलत देव भुलला मोहें । अर्जुनातें आलिंगूनि ठाये । मग बिहाला ह्मणे नोहे । आवडी हे ॥ ५६ ॥ जाले इक्षूरसाचे ढोळ । तरि लवण देणें किडाळ । जे संवादसुखाचें रसाळ । नासेल थितें ॥ ५७ ॥ आधींच आह्मां यया कांहीं । नरनारायणासी भिन्न नाहीं । परी आतां जिरो माझ्याठाईं । वेग हा माझा ॥ ५८ ॥ इया बुद्धी सहसा । श्रीकृष्ण ह्मणे वीरेशा । पैं गा तो तुवां कैसा । प्रश्न केला ॥ ५९ ॥ जो अर्जुन श्रीकृष्णीं विरत होता । तो परतोनियां मागुता । प्रश्नावळीची कथा । ऐकों आला ॥ ४६० ॥ तेथ सद्गदें बोलें । अर्जुनें जी जी ह्मणितलें । निरुपाधिक आपुलें । रूप सांगा ॥ ६१ ॥ यया बोला तो शार्ङ्गी । तेंचि सांगावयालागीं । उपाधी दोहीं भागीं । निरूपीत असे ॥ ६२ ॥ पुसिलिया निरुपहित । उपाधि कां सांगे येथ । हें कोण्हाही प्रस्तुत । गमे जरी ॥ ६३ ॥ तरि ताकाचे अंश फेडणें । तयाचें नांव लोणी काढणें । चोखाचिये शुद्धी तोडणें । कीडचि जेवि ॥ ६४ ॥ बाबुळीचि सारावी हातें । परि पाणी तंव असे आइतें । अभ्रचि जावें गगन तें । सिद्धचि कीं ॥ ६५ ॥ वरिल कोंडियाचा गुंडाळा । झाडूनि केलिया वेगळा । कण वेतां विरंगोळा । असे काई ॥ ६६ ॥ तैसा उपाधि उपहितां । शेवट जेथ विचारितां । तें कोणातेंही न पुसतां । निरुपाधिक ॥ ६७ ॥ जैसें न सांगणेवरी । बाळा पतीसी रूपें करी । बोल लिमालिपणें विवरी । अचर्चातें ॥ ६८ ॥ पैं सांगणेयाजोगें नव्हे । तेथिचें सांगणें ऐसें आहे । ह्मणौनि उपाधिलक्षण हें । बोलिजे आदि ॥ ६९ ॥ पाडिव्याची चंद्ररेखा । निरुती दावावया शाखा । दाविजे तेवि औपाधिका । बोली इया ॥ ४७० ॥

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥

मग तो ह्मणे गा सव्यसाची । पैं इये संसार पाटणीची । वस्ती सांविया टांची । दुपुरुषीं ॥ ७१ ॥ जैसी आघवांचि गगनीं । नांदत दिवोरात्रि दोन्हीं । तैसे संसारराजधानीं । दोन्हीचि हे ॥ ७२ ॥ आणिकही तिजा पुरुष आहे । परि तो या दोन्हींचें नांव न साहे । जो उदेला गांवेंसी खाये । दोहींतें ययां ॥ ७३ ॥ परि ते तंव गोठी असो । आधीं दोन्हींचि हे परियेसों । जे संसारग्रामीं वसों । आले असती ॥ ७४ ॥ एक आंधळा वेडा पंगु । येर

---

१ भ्याला. २ रसपुट. ३ हीन. ४ जमून आलेलें. ५ श्रीकृष्ण. ६ प्रकारीं. ७ निर्गुण. ८ शेवाळ. ९ अडथळा. १० उपाधिवान. ११ कुलस्त्रियेला जवळ असलेला पतीचें नांव काय असें विचारिलें असतां ती मान खालीं करते, मौन्य हेंच पतीचें नामरूप. १२ ज्याची चर्चा करितां येत नाहीं अशाला. १३ निश्चयानें. १४ अर्जुना. १५ नगरची. १६ वस्ति सर्वथा थोडी, दोघां पुरुषांनीं. १७ गांवांत. १८ राहण्याला.

सर्वांगें पुरता चांगु । परि ग्रामगुणें संगु । घडला दोघां ॥ ७५ ॥ तया एका नाम क्षर । एकातें ह्मणती अक्षर । इहीं दोहींचि परि संसार । कोंदला असे ॥ ७६ ॥ आतां क्षर तो कवण । अक्षर तो किलक्षण । हे अभिप्राय संपूर्ण । विवंचूं गा ॥ ७७ ॥ तरी महदहंकारा- । लागुनियां धनुर्धरा । तृणांतींचा पैंगोरा । वेरि पैं गा ॥ ७८ ॥ जें कांहीं सानें थोर । चालतें अथवा स्थिर । किंबहुना गोचर[4] । मनबुद्धीसि जें ॥ ७९ ॥ जेतुलें पांचभौतिक घडतें । जें नामरूपा सांपडतें । गुणत्रयाच्या पडतें । कामठां[5] जें ॥ ४८० ॥ भूताकृतींचें नाणें । घडत आगारें[6] जेणें । काळासि जूं[7] खेळणें । जिहीं कवडां[8] ॥ ८१ ॥ जाणणेंनिचि विपरीतें । जें जें कांहीं जाणिजेतें । जें प्रतिक्षणीं निमतें । होऊनियां ॥ ८२ ॥ अगा कोंढुनि भ्रांतीचें [11]रांग । उभवी सृष्टीचें [12]आंग । हें असो बहु जग । जया नाम ॥ ८३ ॥ पैं [13]अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमिसें । जें क्षेत्रद्वारा छत्तीसें । भागीं केलें ॥ ८४ ॥ हें मागील सांगों किती । अगा आतांचि जें प्रस्तुतीं । [14]वृक्षाकार रूपकरीती । निरूपिलें ॥८५॥ तें आघवेंचि साकार । कल्पुनी आपणयां पुर । जालें असे तदनुसार । चैतन्यचि ॥ ८६ ॥ जैसा कुहां[15] आपणाचि बिंबे । सिंह प्रतिबिंब पाहतां [16]क्षोभे । मग क्षोभला समारंभें[17] । घाली तेथ ॥ ८७ ॥ कां सलिलीं असतचि असे । व्योमावरी व्योम बिंबे जैसें । अद्वैत होऊनि तैसें । द्वैत घेपे ॥ ८८ ॥ अर्जुना गा यापरी । साकार कल्पूनि पुरी । आत्मा विस्मृतीची करी । निद्रा तेथ ॥ ८९ ॥ पैं स्वप्नीं सेजार देखिजे । मग पहुडणें[18] जैसें तेथ कीजे । तैसें पुरीं शयन देखिजे । आत्मयासी ॥ ४९० ॥ पाठीं तिये निद्रेचेनि भरें । मीं सुखी दुःखी ह्मणत घोरें । अहंममतेचेनि थोरें । वोसणाये[19] सांदें[20] ॥ ९१ ॥ हा जनक हे माता । हा मी गौर हीनें[21] पुरेता[22] । पुत्र वित्त कांता । माझें हें ना ॥ ९२ ॥ ऐसिया वेंळघोनि[23] स्वप्ना । धांवत भवस्वर्गाचिया राना । तया चैतन्या नाम अर्जुना । क्षर पुरुष गा ॥ ९३ ॥ आतां ऐक क्षेत्रज्ञ येणें । नामें जयातें बोलणें । जगज्जीव कां ह्मणे । जिये दशेतें ॥ ९४ ॥ जो आपुलेनि विसरें । सर्व भूतत्त्वें अनुकरे । तो आत्मा बोलिजे क्षरें । पुरुषनामें ॥ ९५ ॥ जे तो वस्तुस्थिती[24] पुरता । ह्मणोनि आली पुरुषता । वरी देहपुरीं निदैजतां । पुरुषनामें ॥ ९६ ॥ आणि क्षरपणाचा नाथिला । आळ यया ऐसेनि आला । जे उपाधीचि आंतला[25] । ह्मणोनियां ॥ ९७ ॥ जैसी खळाळींचिया उदका । सरसीं उदाळे[26] चंद्रिका । तैसा विकारां औपाधिका । ऐसाचि गमे ॥ ९८ ॥ कां

---

१ गांवांत राहिल्यामुळें. २ भरला. ३ अग्रापर्यंत, बारीक मुळापर्यंत. ४ दिसणारे. ५ टांकसाळेंत. ६ सोन्यानें. ७ जुवा खेळ. ८ कवड्यांनीं. ९ नाश पावतें. १० घेऊन. ११ अरण्य. १२ अवयव. १३ आठ प्रकारें. १४ वृक्षाकार रूपकानें. १५ विहिरींत. १६ रागावे. १७ उडी. १८ निजणें. १९ बरळे. २० शब्दें. २१ हीनांग. २२ सांग. २३ चिकटून. २४ शरीर आहे तोंपर्यंत. २५ स्पर्शला. २६ झाले.

खव्हाळ मोटका शोषे । आणि चंद्रिका तैं सरिसीच अंशे । तैसा उपाधिभावीं न दिसे । औपाधिक ॥ ९९ ॥ ऐसें उपाधीचेनि पाडें । क्षणिकत्व यातें जोडे । तेणें खोंकरपणें घडे । क्षर हें नाम ॥ ५०० ॥ एवं जीव चैतन्य आघवें । हें क्षर पुरुष जाणावें । आतां रूप करूं बरवें । अक्षरासी ॥ १ ॥ तरि अक्षर जो दुसरा । पुरुष पैं धनुर्धरा । तो मध्यस्थ गा गिरिवरां । मेरु जैसा ॥ २ ॥ जे तो पृथ्वी पाताळ स्वर्गीं । इहीं न भेदे तिहीं भार्गीं । तैसा दोहीं ज्ञानाज्ञानांगीं । पडेना जो ॥ ३ ॥ ना यथार्थज्ञानें एक होणें । ना अनेकत्वें दुजें घेणें । ऐसें निखिळ जें नेणणें । तेंचि तें रूप ॥ ४ ॥ पांसुता निःशेष जाये । ना घटभांडादि होये । तया मृत्पिंडाऐसें आहे । मध्यस्थ जें ॥ ५ ॥ पैं आटोनि गेलिया सागर । मग तरंग ना नीर । तया ऐशी अनाकार । जे दशा गा ॥ ६ ॥ पार्था जागणें तरी बुडे । परि स्वप्नाचें कांहीं न मांडे । तैसिये निद्रे सांगडें । न्याहाळणें जें ॥ ७ ॥ विश्व आघवेंचि मावळे । आणि आत्मबोध तरी नुजळे । तिये अज्ञानदशे केवळें । अक्षरनाव ॥ ८ ॥ सर्वां कळीं सांडिलें जैसें । चंद्रपण उरे अंवसे । रूप जाणावें तैसें । अक्षराचें ॥ ९ ॥ पैं सर्वोपाधिविनाशें । हे जीवदशा जेथ पैसे । फळपाकांतीं जैसें । झाड बीजीं ॥ ५१० ॥ तैसें उपाधीसि उपहित । थोकोनि ठाके जेथ । तयातें अव्यक्त । बोलती गा ॥ ११ ॥ घन अज्ञान सुषुप्ती । तो बीजभाव म्हणती । येर स्वप्न हन जागृती । फळभाव तो ॥ १२ ॥ जयासी कां बीजभाव । वेदांतीं केला ऐसा आव । तो तया पुरुषा ठाव । अक्षराचा ॥ १३ ॥ जेथुनी अन्यथा ज्ञान । फांकोनी जागृती स्वप्न । नाना बुद्धीचें रान । रिगालें असे ॥ १४ ॥ जीवत्व जेथूनि किरीटी । विश्व उठवितचि उठी । ते उभय भेदांची मिठी । अक्षर पुरुष ॥ १५ ॥ येर क्षर पुरुष कां जनीं । देहीं खेळे जागृती स्वप्नीं । तिया अवस्था जो दोन्ही । वियाला गा ॥ १६ ॥ पैं अज्ञानघनसुषुप्ती । ऐसैसी जे कां ख्याती । थों उणी येकी प्राप्ती । ब्रह्मींची जे ॥ १७ ॥ साचचि पुढती वीरा । जरि न येता स्वप्न जागरा । तरी ब्रह्मभावो सौंचोकारा । म्हणों येता ॥ १८ ॥ परि प्रकृति पुरुष दोनी । अभ्रें जालीं जिये गगनीं । क्षेत्रक्षेत्रज्ञ स्वप्नीं । देखिला जिये ॥ १९ ॥ हें असो अधोशाखा । या संसाररूपा रुखा । मूळ तें पुरुषा । अक्षराचें ॥ ५२० ॥ हा पुरुष कां म्हणिजे । जे पूर्णपणेंचि निजे । पैं मायापुरीं पहुडिजे । तेणेंही बोलें ॥ २१ ॥ आणि विकारांची जे वारी । ते विपरीतज्ञानाची परी । नेणिजे जिये माझारीं । ते सुषुप्ती गा हा ॥ २२ ॥ म्हणौनि यया आपैसें । क्षरणें पां नसे ।

---

१ अमळसा. २ फुटकेपणें. ३ रजःकणत्व. ४ आकाररहित. ५ सारखें. ६ चांगला ठसत नाहीं. ७ प्रवेशे. ८ फल पिके तोंपर्यंत. ९ उपाधींत पडलेलें. १० गुप्त होऊन राहे. ११ दृढ. १२ डौल, आकार. १३ नाम. १४ या एका वक्ष्यमाण गोष्टीवांचून जी ब्रह्माचीच प्राप्ति. १५ खरा. १६ शयन करतो. १७ यात्रा. १८ प्रकार. १९ आपोआप. २० ज्ञानावांचून.

आणिकेंही हा न नाशे । ज्ञानाउणें ॥ २३ ॥ यालागीं हा अक्षर । ऐसा वेदांतीं डंगर । केला वेशीं थोर । सिद्धांताचा ॥ २४ ॥ ऐसें जीवकार्यकारण । जया मायासंगचि लक्षण । अक्षर पुरुष जाण । चैतन्य तें ॥ २५ ॥

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥**

आतां अन्यथाज्ञानी । या दोनी अवस्था जया जनीं । तया हरपती घनीं । अज्ञानतत्वीं ॥ २६ ॥ तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया । जैसा वन्हि काष्ठ जाळूनियां । स्वयें जळे ॥ २७ ॥ तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपणहि वस्तु देउनि गेलें । ऐसें जाणणेंनिर्वीण उरलें । जाणतें जें ॥ २८ ॥ तें तो गा उत्तम पुरुष । जो तृतीय कां निष्कर्ष । दोहींहून आणिक । मांगिला जो ॥ २९ ॥ सुषुप्ती आणि स्वप्ना-। पासूनि बहुवें अर्जुना । जागणें जैसें आना । बोधाचेंचि ॥ ५३० ॥ कां रश्मी आणि मगजळा । पासूनि अर्कमंडळा । अफाट तेविं वेगळा । उत्तम गा ॥ ३१ ॥ हें ना काष्ठांच्या काष्ठींहुनी । अनारिसा जैसा वन्ही । तैसा क्षराक्षरापासुनी । आनचि तो ॥ ३२ ॥ पैं असूनि आपली मर्यादा । एक करीत नदीनदां । उठी कल्पांतीं उदावीदा । एकार्णवाचा ॥ ३३ ॥ तैसें स्वप्न ना सुषुप्ती । ना जागराची गोठी आथी । जैसी गिळिली दिवोरातीं । प्रळयतेजें ॥ ३४ ॥ मग एकपण ना दुजें । असे नाहीं हें नेणिजे । अनुभव निर्बुजे । बुडाला जेणें ॥ ३५ ॥ ऐसें आथि जें कांहीं । तें तो उत्तम पुरुष पाहीं । जें परमात्माइही । बोलिजे नामीं ॥ ३६ ॥ तेंही येथ न मिसळतां । बोलणें जीवत्वें पंडुसुता । जैसी बुडणेयाची वार्ता । थडियेचा कीजे ॥ ३७ ॥ तैसें विवेकाचियेकांठीं । उभे ठाकलिया किरीटी । परावराचिया गोठी । करणें वेदां ॥ ३८ ॥ म्हणौनि पुरुष क्षराक्षर । दोन्ही देखोनि अैवर । यातें म्हणती पर । आत्मरूप ॥ ३९ ॥ अर्जुना ऐसिया परी । परमात्मा शब्दवरी । सूचिजे गा अवधारीं । पुरुषोत्तम ॥ ५४० ॥ येऱ्हवीं न बोलणेंनि बोलणें । जेथिचें सर्व नेणिवा जाणणें । कांहींच न होनि होणें । जे वस्तु गा ॥ ४१ ॥ सोहं तेही अस्तवलें । जेथ सांगतेंचि सांगणें जालें । द्रष्टृत्वेंसी गेलें । देखणें जेथ ॥ ४२ ॥ आतां बिंबा आणि प्रतिबिंबा-। माजि कैंची हें म्हणों नये प्रभा । जऱ्ही कैसेनि हे लाभी । जायेचिना ॥ ४३ ॥ कां घ्रोणा फुला दोहीं । द्रुती असे माझारिला ठायीं । ते न

१ नाश पावणें. २ प्रसिद्धी. ३ वेदांतांत. ४ जाग्रत्स्वप्नरूप. ५ सन्मुखपणा. ६ शेवट. ७ मागें सांगितलेल्या दोहींहून वेगळा. ८ अधिक. ९ किरण. १० वेगळा. ११ पूर्णत्व. १२ समुद्र. १३ आहे किंवा नाहीं हेंही न समजावें. १४ घाबरे. १५ मिळालें असतां. १६ किनाऱ्यावरच्यानें. १७ पलीकडे किंवा आलीकडे. १८ अलीकडचे. १९ ओळखावा. २० निमाले. २१ जाणतां येतच नाहीं. २२ नाकाला. २३ सुगंध.

े तरी नाहीं । ऐसें बोलों नये ॥ ४४ ॥ तैसें द्रष्टा दृश्य हें जाये । मग कोण म्हणे काय हे । हेंचि अनुभवें तेंचि पाहे । रूप तया ॥ ४५ ॥ जो प्रकाश्येंवीण प्रकाश । जो शतव्येंवीण ईश । आपणेंनीचि अवकाश । वसवीत असे जो ॥ ४६ ॥ जो नादें ऐकि-ता नाद । स्वादें चाखिजता स्वाद । जो भोगीजतसे आनंद । आनंदेंचि ॥ ४७ ॥ जो तिचा परिणाम । पुरुष गा सर्वोत्तम । विश्रांतीचाही विश्राम । विराला जेथें ॥ ४८ ॥ ासी सुख जोडलें । जें तेज तेजासि सांपडलें । शून्यही बुडालें । महाशून्यीं जिये ४९ ॥ जो विकासाही वरी उरता । भासातें ही भासूनि पुरता । जो बहुतें पाडें बहुतां । ूनि बहु ॥ ५५० ॥ पैं नेणतयाप्रती । रुपेपणाची प्रतीती । रुपें न होनि शुक्ती । दावी ीं ॥ ५१ ॥ कां नाना अलंकारदशे । सोने न लपत लपालें असे । विश्व न होनियां ं । विश्व जो धरी ॥ ५२ ॥ हें असो जल तरंगा । नाहीं सिनानपण जेविं गा । तेविं ताप्रकाश जगा । आपणचि जो ॥ ५३ ॥ आपलिया संकोचें विकाशा । आपणचि न वीरेशा । हा जळीं चंद्र हन जैसा । समग्र गा ॥ ५४ ॥ तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपीं केंहीं जाये । जैसा रात्रि दिवसें नोहे । द्विधा रवि ॥ ५५ ॥ तैसा कांहींचि णीकडे । कायिसेनिहिं वेंचीं न पडे । जयाचें सांगडें । जयासीचि ॥ ५६ ॥

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥

जो आपणपेंचि आपणया । प्रकाशीतसे धनंजया । काय बहु बोलों जया । नाहीं दुजें ५७ ॥ तो गा मी निरुपाधिक । क्षराक्षरोत्तम एक । म्हणोनि म्हणे वेद लोक । पुरुषो-म ॥ ५८ ॥

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

परि हें असो ऐसिया । मज पुरुषोत्तमातें धनंजया । जाणे जो पहिलेया । ज्ञानमित्रें ५९ ॥ चेइलियां आपुलें ज्ञान । जैसें नाहींचि होय स्वप्न । तैसें स्फुरतें त्रिभुवन । वो जालें ॥ ५६० ॥ कां हातीं घेतलिया माळा । फिटे सर्पाभासाचा कंटाळा । तैसा ाझोनि बोधें टवाळा । नागवे तो ॥ ६१ ॥ लेणें सोनेंचि जो जाणे । तो लेणेंपण तें वांव णे । तेविं मीं जाणोनि जेणें । वाळिला भेद ॥ ६२ ॥ मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंद । मीचि

१ कशानेंही जरी अनुभवास येत नाहीं तरी हेंचि अनुभवानें पाहणें तेंच त्याचें रूप. उदयावर. ३ वेगळेपणा. ४ अस्त. ५ उदय. ६ आकार. ७ दोन प्रकारचा. ८ तुलना. जन. १० उजाडलेल्या. ११ ज्ञानरूप सूर्य. १२ जागृत झालें असतां. १३ व्यर्थ. १४ भय. २ मिथ्याजगास. १६ टाकिला.

एक स्वतःसिद्ध । जो आपणेनसीं भेद । तेणोंनि जाणे ॥ ६३ ॥ तेणेंचि सर्व जाणितलें । हेंही ह्मणणें थेंकुलें । जें तया सर्वत्र उरलें । द्वैत नाहीं ॥ ६४ ॥ ह्मणोनि माझिया भजना । उचित तोचि अर्जुना । गगन जैसें आलिंगना । गगनाचिया ॥ ६५ ॥ क्षीरसागरा पैर-ुणें । कीजे क्षीरसागरचिपणें । अमृतचि होऊन मिळणें । अमृतीं जेवि ॥ ६६ ॥ साडे-पंधरा मिसळावें । तें साडेपंधरेंचि होआवें । तेवि मी जालिया संभवे । भक्ति माझी ॥ ६७ ॥ हां गा सिंधूसि आनी होती । तरि गंगा कैसेनि मिळती । ह्मणोनि मी न होतां भक्ती । अन्वय आहे ॥ ६८ ॥ ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळ अनन्य सागरीं । तैसा मातें अवधारीं । भजिन्नला जो ॥ ६९ ॥ सूर्या आणि प्रभे । एकवंकी जेणें लोभें । तो पाड मानूं लाभे । भजना तया ॥ ५७० ॥

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
पुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

एवं कथिलियादारभ्य । जें हें सर्वशास्त्रैकलभ्य । उपनिषदां सौरभ्य । कमळदळां जेवि ॥ ७१ ॥ हें शब्दब्रह्माचें मथितें । श्रीव्यासप्रज्ञेचेनि हातें । मथूनि काढिलें आयितें । सार आह्मीं ॥ ७२ ॥ जे ज्ञानामृताची जान्हवी । जे आनंदचंद्रींची सतरावी । विचारक्षीरार्णवींची नवी । लक्ष्मी जे हे ॥ ७३ ॥ ह्मणोनि आपुलेनि पदें वर्णे । अर्थाचेनि [13]जीवें-प्राणें । मीवांचोनि [14]हों नेणें । आन कांहीं ॥ ७४ ॥ क्षराक्षरत्वें समोर जाले । तयाचें पुरुषत्व वांळिलें । मग सर्वस्व मज दिधलें । पुरुषोत्तमीं ॥ ७५ ॥ ह्मणोनि जगीं गीता । मियां आत्मेनि पतिव्रता । जे हे प्रस्तुत तुवां आतां । आकर्णिली ॥ ७६ ॥ साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पैं संसार [18]जिणे तें शस्त्र । आत्मा अवतरवी ते मंत्र । अक्षरें इयें ॥ ७७ ॥ परि तुजपुढां सांगीतलें । तें अर्जुना ऐसें जालें । जे गौप्यधन काढिलें । माझें आजि तुवां ॥ ७८ ॥ मज चैतन्यशंभूचा माथा । जो निपजे होता पार्था । तया गौतम जालासि आस्था । निधी तूं गा ॥ ७९ ॥ चोखटिवा आपुलिया । पुढिला उगाणों घेयावया । तया दर्पणाचीचि परी धनंजया । केली आह्मां ॥ ५८० ॥ कां भरलें चंद्रतारांगणीं । नभ सिंधु आपणया-

१ अल्प. २ पाहुणचार. ३ दुसरी. ४ प्राप्ति. ५ एकच. ६ एकाकार. ७ पंधराव्या अध्यायाच्या आरंभापासून. ८ केवळ शास्त्रानेंच प्राप्त होणारें. ९ सुवास. १० सार. ११ गंगा. १२ गीतेच्या. १३ प्रेमानें. १४ होऊं. १५ स्पष्ट. १६ टाकलें. १७ आइकली. १८ जिंकणारें. १९ प्रकट करते. २० जीवशिवांचा. २१ गंगारूप ठेवा. २२ इच्छेनें. २३ चांगुलपणास. २४ अनुभव.

माजि आणी । तैसा गीतेसीं मी अंतःकरणीं । सुदला तुवां ॥ ८१ ॥ जे त्रिविधमळकटा । तूं सांडलासि सुभटा । ह्मणौनि गीतेसीं मज वैसौटा । जालासि गा ॥ ८२ ॥ परि हे बोलों काय गीता । जे हे माझी उन्मेषलता । जाणे तो समस्ता । मोहा मुके ॥ ८३ ॥ सेविली अमृतसरिता । रोग दवडूनि पंडुसुता । अमरपण उचितां । देऊनि घाली ॥ ८४ ॥ तैसी गीता हे जाणितलिया । काय विस्मय मोह जावया । परि आत्मज्ञानें आपणपयां । मिळिजे येथ ॥ ८५ ॥ जया आत्मज्ञानाच्या ठायीं । कर्म आपुलेया जीविता पाहीं । होऊनियां उतराई । लया जाय ॥ ८६ ॥ हरपलें दावूनि जैसा । माग सरे वीरविलासा । ज्ञानेंचि कळस वळंघे तैसा । कर्मप्रासादाचा ॥ ८७ ॥ ह्मणौनि ज्ञानिया पुरुषा । कृत्य करूं सरलें देखा । ऐसा अनाथाचा सखा । बोलिला तो ॥ ८८ ॥ तें श्रीकृष्णवचनामृत । पार्थी भरोनि असे वोसंडत । मग व्यासकृपा प्राप्त । संजयासी ॥ ८९ ॥ तो धृतराष्ट्राराया । सूतसे पान करावया । ह्मणौनि जीवितांतया । नोहेचि भारी ॥ ५९० ॥ येऱ्हवीं गीताश्रवण अवसरीं । आवडों लागतां अनधिकारी । परि सेखीं तेचि उजरी । पातला भली ॥ ९१ ॥ जेव्हां द्राक्षीं दूध घातलें । तेव्हां वायां गेलें गमलें । परि फळपाकीं दुणावलें । देखिलें जेवि ॥ ९२ ॥ तैसीं श्रीहरिवक्त्रींचीं अक्षरें । संजयें सांगीतलीं आदरें । तिहीं अंधु तोही अवसरें । सुखिया जाला ॥ ९३ ॥ तेंचि मऱ्हाटेनि विन्यासें । मियां उन्मेषें ठसेंठोंवसें । जी जाणें नेणे तैसें । निरोपिलें ॥ ९४ ॥ सेवंतीये अरसिकांहीं । आंग पाहतां विशेष नाहीं । परि सौरभ्य नेलें तिहीं । भ्रमरीं जाणिजे ॥ ९५ ॥ तैसें घडतें प्रमेय घेइजे । उणें तें मग देइजे । जें नेणणें हेंचि सहजें । रूप कीं बाळा ॥ ९६ ॥ तरि नेणतें जऱ्ही होये । तऱ्ही देखोनि बाप कीं माये । हर्ष केंही न समाये । चोजें करिती ॥ ९७ ॥ तैसें संत माहेर माझें । तुह्मीं मिनलिया मी लाडें जें । तेंचि ग्रंथाचेनि व्याजें । जाणिजो जी ॥ ९८ ॥ आतां विश्वात्मक माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा । तो अवधारू वाक्य पूजा । ज्ञानदेव ह्मणे ॥ ५९९ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

श्लोक २०, ओव्या ५९९.

---

१ घातला. २ काम, क्रोध व लोभ. ३ आश्रय. ४ ज्ञानवल्ली. ५ अमृताची नदी. ६ सर्व वीरांचें विलासस्थान अशा अर्जुना. ७ चढे. ८ सांडत. ९ व्यासकृपेनें. १० देत असे. ११ प्राणांतीं. १२ हवा तो. १३ उत्कर्ष. १४ द्राक्षांचे घोस आल्यावर, परिणामीं. १५ धृतराष्ट्र. १६ निरूपणें. १७ लहानमोठें. १८ सिद्धांत. १९ कौतुक. २० मिळालेत. २१ मिमित्तानें. २२ ऐको.

# अध्याय १६ वा.

मावळवीत विश्वाभास । नवल उदयला चंडांश । अद्वयाब्जिनीविकाश[1] । वंदूं आतां ॥ १ ॥ जो अविद्याराती[2] रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञानचांदणियां । जो सुदिन करी ज्ञानियां । स्वबोधाचा[3] ॥ २ ॥ जेणें विवळतिये[4] सवळे । लाहोनि[5] आत्मज्ञानाचे डोळे । सांडिती देहाहंतेचीं अविसाळें[6] । जीवपक्षी ॥ ३ ॥ लिंगदेह[7] कमळाचा । पोटीं वेर्च[8] तया चिद्भ्रमराचा[9] । बंदि[10] मोक्ष[11] जयाचा । उदैलों[12] होय ॥ ४ ॥ शब्दाचिया[13] आसकडीं[14] । भेद[15]-नदीच्या दोहीं थडीं । आरडत विरहवेडीं । बुद्धिबोध[16] ॥ ५ ॥ तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें[17] समाधान । भोगवी जो चिद्गगन[18] । भुवनदिवा ॥ ६ ॥ जेणें पाहालिये[19] पाहांटे । भेदाची चोरवेळी[20] फिटे । रिघती आत्मानुभववाटे । पांथिक योगी ॥ ७ ॥ जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांत फुणगे । दीपले जाळिती दांगें[21] । संसाराचीं ॥ ८ ॥ जयाचा[22] रश्मिपुंज निबर[23] । होतां स्वरूप[24] उखरीं[25] स्थिर । ये महासिद्धीचा पूर । मृगजळ तें ॥ ९ ॥ जो प्रत्यग्बोधाचिया[26] माथया । सोहंतेचा मध्यान्ही आलिया । लपे आत्मभ्रांति छाया । आपणपां तळीं ॥ १० ॥ ते वेळीं विश्वस्वमासहितें । कोण अन्यथामती[27] निद्रेतें । सांभाळी नुरेचि जेथें । मायाराती ॥ ११ ॥ म्हणौनि अद्वयबोधपाटणीं[28] । तेथ महानंदाची दाटणी । मग सुखानुभूतीचीं[29] घेणीं देणीं । मदौवों[30] लागती ॥ १२ ॥ किंबहुना ऐसैसें । मुक्तकैवल्य सुदिवसें । सदां लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनि ॥ १३ ॥ जो निजधामव्योमींचा रावो । उदैलोचि[31] उदैजत खेंवो । फेडी पूर्वादिदिशांसि ठावो । उदयास्ताचा[32] ॥ १४ ॥ नें[33] दिसणें दिसणेंनसीं[33] मावळवी । दोहीं[34] झांकिलें तें सैंघ पालवी[35] । काय बहु बोलों ते आघवी । उखांचि[36] आनी ॥ १५ ॥ तो अहोरात्रांचा पैलकड । कोणें देखावा ज्ञानमार्तंड[37] । जो प्रकाश्येंवीण[38] सुरवाडे[39] । प्रकाशाचा ॥ १६ ॥ तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां

---

१ अद्वैतरूप कमलिनीचा प्रकाश करणारा. २ अविद्यारूप रात्र दूर करून. ३ आत्मबोधाचा. ४ उजाडल्यावर होणाऱ्या प्रातःकाळीं. ५ प्राप्त होऊन. ६ घरटीं. ७ सूक्ष्मदेह. ८ मरण. ९ जीवचैतन्य भ्रमराचा. १० बंधन झालें असतां. ११ सुटका. १२ उदयानें. १३ बुद्धिला मोह करणाऱ्या शास्त्रादिकांच्या. १४ अडचणीच्या जाग्यांत. १५ जीवेश्वर या विषयींची भिन्न बुद्धी. १६ जीव, ईश्वर. १७ ऐक्याचें. १८ ब्रह्मरूप आकाश. १९ उजाडलेली. २० चोरवेळ. २१ अरण्यें. २२ ज्ञानसूर्यांचा. २३ तीव्र. २४ आत्मस्वरूप. २५ अज्ञानरूप माळ जमिनीवर. २६ आत्मबोधाच्या. २७ विपरीत ज्ञान. २८ शहरांत. २९ आनंदानुभवाचीं. ३० उगीं होऊं. ३१ नेहमीं उदय पावलेलाच आहे. ३२ पूर्वादि दिशांसह उदयास्त नाहींसे करितो. ३३ अज्ञान ज्ञानासकट. ३४ नामरूपांनीं. ३५ प्रकटवी. ३६ दुसरा प्रातःकाळच. ३७ सूर्य. ३८ प्रकाशित होणाऱ्या पदार्थांवांचून. ३९ सुकाळ.

नमोंचि ह्मणों पुढतपुढती। जे बाधका येइजतसे स्तुती। बोलाचिया ॥१७॥ देवाचें महिमान पाहोंनियां। स्तुती तरि येइजे चांगावया। जरि स्तव्यबुद्धीसीं लया। जाइजे कां ॥ १८ ॥ जो सर्वनेणिवा आणिजे। मौनाचिया मिठीया वानिजे। कांहींच न होनि आणिजे। आपणपयां जो ॥ १९ ॥ जया तुझियां उद्देशासाठीं। पश्यंती मध्यमा पोटीं। सूनि परेसीही पाठीं। वैखरी विरे ॥ २० ॥ तया तूतें मी सेवकपणें। लेववीं बोलकेया स्तोत्रांचें लेणें। हें उपसाहावेंही ह्मणतां उणें। अद्वयानंदा ॥ २१ ॥ परि रंकें आमृताचा सागर। देखिलिया पडे उचितांचा विसर। मग करूं धांवे पाहुणेर। शाकांचा तया ॥ २२ ॥ तेथ शाकही कीर बहुत ह्मणावा। तयाचा हर्षवेगचि तो घ्यावा। उजळोनि दिव्य तेजा हातिवा। ते भक्तीचि पांहावी ॥ २३ ॥ बाळा उचितें जाणणें होये। तरि बाळपणचि कें आहे। परि साचाचि येरी माये। ह्मणोनि तोषे ॥ २४ ॥ हां गा गांवरेसें भरलें। पाणी पाठीं पाय देत आलें। तें गंगा काय ह्मणीतलें। परतें सर ॥ २५ ॥ जी भृगूचा कैसा अपकार। कीं तो मानूनि प्रियोपचार। काय तोषेचि ना शार्ङ्गधर। गुरुत्वासी ॥ २६ ॥ कीं आंधारें खेतलें अंबर। जालें दिवसनाथा समोर। तेणें तयातें परेहा सर। ह्मणीतलें काई ॥ २७ ॥ तेवि भेदबुद्धीचिये तुळे। घालूनि सूर्यश्लेषांचें कांटाळें। तुकिलासि तें येकी वेळे। उपसाहिजो जी ॥२८॥ जिहीं ध्यानाचा डोळां पाहिलासी। वेदादिवाचा वानिलासी। जें उपसाहिलें तयांसीं। तें आह्मांही करीं ॥ २९ ॥ परि मीं आजि तुझ्या गुणीं। लांचावेलों अपराध न गणीं। भेलतें करीं परी अर्धधणीं। नुठी करा ॥ ३० ॥ मियां गीता येणें नांवें। तुझें पसायामृत सुहावें। वानूं लाधलों तें दुणेंन थावें। दैवेलों देवें ॥ ३१ ॥ माझिया सत्यवादाचें तप। वाचा केलें बहुत कल्प। तया फळाचें हें मोहाद्वीप। पातली प्रभु ॥ ३२ ॥ पुण्यें पोशिलीं असाधारणें। तियें तुझे गुण वानणें। देवुनि मज उत्तीर्णें। जालीं आजि ॥ ३३ ॥ जी जीवित्वाच्या आंडवी। आतुडलों होतों मरण गांवीं। ते अवदसाचि आघवी। फेडिली आजी ॥ ३४ ॥ जे गीता येणें नांवें नावाणिगी। जे अविद्या जिणोनि दांडुगी। ते कीर्ति तुझी आह्मा जोगी। वानावया जाली ॥ ३५ ॥ पैं निर्धनाघरीं वोनिवसें। महालक्ष्मी येऊनि बैसे। तयातें निर्धन ऐसें। ह्मणो

---

१ कारण, स्तुति ह्मटली ह्मणजे बोलाची उपाधि लागते. २ चांगुलपणाला. ३ गुरुस्तवन करण्यास योग्य अशा बुद्धीसहित. ४ चार वाणींतील दुसरी. ५ पाठीमागें घालून. ६ सहन करावें. ७ भिकाऱ्यानें. ८ योग्याचा. ९ काडवात. १० पाहवितो. ११ योग्यपणानें. १२ गटाराचें पाणी. १३ लत्ताप्रहार, अन्याय. १४ भरलें. १५ पलीकडे हो. १६ उपमेचें. १७ तराजू. १८ तोललास. १९ योग्यांनीं २० सहन केलें. २१ सवकलों. २२ पाहिजे तें कर. २३ अर्धवट तृप्त. २४ सेवावें, आवडतें. २५ दुप्पट बळानें. २६ दैववान झालों. २७ गीतानामक द्वीप. २८ आचरिलीं. २९ उतराई. ३० अरण्यांत. ३१ सांपडलों. ३२ पीडा. ३३ नामांकित. ३४ बळवान. ३५ कौतुकानें.

ये काई ॥ ३६ ॥ कां अंधकाराचिया ठाया । दैवें सूर्य आलिया । तो अंधकारचि अवघा यया । प्रकाश नोहे ॥ ३७ ॥ जया देवाची पाहतां थोरी । विश्व परमाणुही दशा न धरी । तो भावाचिये सरोबरी[1] । नव्हेचि काई ॥ ३८ ॥ तैसा मी गीता वाखाणी । हे खपुष्पाची[2] तुरंबणी[3] । परि समर्थे तुवां शिरियाणी[4] । फेडिली ते ॥ ३९ ॥ ह्मणौनि तुह्मेनि प्रसादें । मी गीतापद्यें अगाधें । निरूपीन जी विशदें[5] । ज्ञानदेव ह्मणे ॥ ४० ॥ तरि अध्यावीं पंधरावां । श्रीकृष्णें तया पांडवा । शास्त्रसिद्धांत आघवा । उगाणिला[6] ॥ ४१ ॥ जे वृक्षरूपक परिभाषा । केलें उपाधिरूप अशेषा[7] । सद्वेधें जैसें दोषा । अंगलीना[8] ॥ ४२ ॥ आणि कूटस्थ[9] जो अक्षर[10] । दाविला पुरुषप्रकार । तेणें उपाहितीही[11] आकार[12] । चैतन्या केला ॥ ४३ ॥ पाठीं उत्तमपुरुष । शब्दांचें करूनि मिष । दाविलें चोख । आत्मतत्त्व ॥ ४४ ॥ आत्मविषयीं आंतुवट[13] । साधन जें आंगवट[14] । ज्ञान हेंही स्पष्ट । बोवळला[15] ॥ ४५ ॥ ह्मणौनि इये अध्यायीं । निरूप्य[16] नुरेचि कांहीं । आतां गुरुशिष्यां दोहीं । स्नेह लोहणा[17] ॥ ४६ ॥ एवं इयेविषयीं कीर । जाणते बुझावले[18] अपार । परि मुमुक्षु इतर । सांकांक्ष[19] जाले ॥ ४७ ॥ ह्या मज पुरुषोत्तमा । ज्ञानें भेटे जो सुवर्मा[20] । तो सर्वज्ञ तोचि सीमा[21] । भक्तीचीही ॥ ४८ ॥ ऐसें हें त्रैलोक्यनायकें । बोलिलें अध्यायांत श्लोकें । तेथें ज्ञानाचि बहुतेकें[22] । वानिलें तोषें ॥ ४९ ॥ भरूनि प्रपंचाचा घोंट । कीजे देखतांचि देखतया दृष्ट । आनंदसाम्राज्यीं पाट[23] । बांधिजे जीवां ॥ ५० ॥ येवढेया लोठेपणाचा[24] उपावो । आन नाहींचि ह्मणे देवो । हा सम्यक्[25] ज्ञानाचा रावो । उपायांमाजि ॥ ५१ ॥ ऐसें आत्मजिज्ञासु[26] जे होते । तिहीं तोषलेनि चित्तें । आदरें तया ज्ञानातें । वोवाळिलें जीवें ॥ ५२ ॥ आतां आवडी जेथ पडे । तयाचि अवसरीं[27] पुढें पुढें । रिगों लागे हें घडे । प्रेम ऐसें ॥ ५३ ॥ ह्मणौनि जिज्ञासुंच्यापैकीं । ज्ञानीं प्रतीति[28] होय ना जंव निकी । तंव योगें[29] क्षेमें[30] ज्ञानविखीं । स्फुरेलचि कीं ॥ ५४ ॥ ह्मणौनि तेंचि सम्यक्ज्ञान । कैसेनि होय स्वाधीन । जालिया वृद्धियत्न । घडेल केवि ॥ ५५ ॥ कां उपजोंचि[31] जें न लाहे । जें उपजलेंही आव्हाटा[32] सूये[33] । तें ज्ञानीं विरुद्ध[34] काय आहे । हें जाणावें कीं ॥ ५६ ॥ मग आणतया[35] जें विरू[36] । तयाची वाट वाहती करूं । ज्ञानहित तें विचारूं । सर्वभावें ॥ ५७ ॥ ऐसा ज्ञानजिज्ञासु तुह्मी समस्तीं ।

---

१ भक्तीची बरोबरी. २ मिथ्या आकाशपुष्पांची. ३ वास घेणें. ४ आवड. ५ स्पष्ट. ६ सांगितला. ७ वस्तूला. ८ अंगांत मुरलेला. ९ देहांतील शुद्ध आत्मा. १० अविनाशी. ११ उपाधीला. १२ स्पष्ट केलें. १३ अंतरंग. १४ बळकट. १५ बोलला. १६ सांगण्याजोगें. १७ प्राप्त झाला. १८ समजाविले. १९ शंकित. २० मर्मज्ञ. २१ पराकाष्ठा. २२ बहुधा. २३ पट्टाभिषेक. २४ बलाढ्य साधनाचा. २५ खऱ्या. २६ आत्मज्ञानेच्छु. २७ वेळीं. २८ अनुभव. २९ अप्राप्ताची प्राप्ति. ३० प्राप्ताचें संरक्षण. ३१ विकल्पादिक. ३२ आडवाटीं. ३३ न्यावी. ३४ विघ्न करणारें. ३५ जिज्ञासूला. ३६ विरुद्ध.

भाव जो धरिला असे चित्तीं । तो पुढावाक्या लक्ष्मीपती । बोलिजेल ॥ ५८ ॥ ज्ञानादि सुजन्म जोडे । आपली विश्रांतीही वाढे । ते संपत्तीचें पवाडे । सांगेल दैवी[2] ॥ ५९ ॥ आणि अज्ञानाचेनि कैमाकारें । जे रागद्वेषांसि दे थांरें । तिये आसुरियेहि चोखें । कालिल रूप ॥ ६० ॥ सहज इष्टानिष्टकरणी । शोधींचि इया कावतुकिणी । हे नवमाध्यायीं उभारणी । केली होती ॥६१॥ तेथ सांउमा धैर्याचा उवांयो । तंव वोडवला आन प्रस्तावो । तरी तया प्रसंगें आतां देवो । निरूपीत असे ॥६२॥ तया निरूपणाचेनि नांवें । अध्याय पद सोळावें । लांवणी पाहतां जाणावें । मागिलावरी ॥ ६३ ॥ परि हें असो आतां प्रस्तुतीं । ज्ञानाच्या हिताहितीं । समर्था संपत्ती । इयाचि दोन्ही ॥ ६४ ॥ जे मुमुक्षुमार्गींची बोळावी । जे मोहरात्रीची धर्मदिवी । ते आधीं तंव दैवी । संपत्ति ऐका ॥ ६५ ॥ जेथ एक एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ येकीं[13] । संपादिजेती[14] ते लोकीं । संपत्ति म्हणिजे ॥ ६६ ॥ ते दैवी सुखसंभवी । तेथ दैवगुणें येकोपजीवी[16] । जाली म्हणोनि दैवी । संपत्ती हे ॥ ६७ ॥

श्रीभगवानुवाच—अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥

आतां तयाचि दैवगुणा- । माजि धुरेचा[17] बैसणा । बैसे तया आकर्णा । अभय ऐसें ॥ ६८ ॥ तरि ने[19] घलूनि महापुरीं । न घेपे बुडणयाची शियांरी[20] । कां रोग न गणिजे घरीं । पथ्याचिया ॥ ६९ ॥ तैसा कर्माकर्माचिया मोहरा[21] । उठूं नेदुनि अहंकारा । संसाराचा दरारा । सांडणें येणें ॥ ७० ॥ अथवा ऐक्यभावाचेनि [22]पैसें । दुजें मानूनि आत्मा[23] ऐसें । भयवार्ता देशीं । दडवणें जें ॥ ७१ ॥ पाणी बुडऊं ये मिठातें । तंव मीठचि पाणी आंतें[24] । तेवि आपण जालेनि अद्वैतें । नाशे भय ॥ ७२ ॥ अगा अभय येणें नांवें । बोलिजे तें हें जाणावें । सम्यक्ज्ञानाचें आघवें । धावणें हें ॥ ७३ ॥ आतां सत्वशुद्धी जे म्हणिजे । ते ऐशा चिन्हीं जाणिजे । तरी जळे ना विझे । राखोंडी जैसी ॥ ७४ ॥ कां पाडिवां[25] वाढी न मगे । अंवसे तुटी[26] सांडूनि मागें । माजी अतिसूक्ष्म अंगें । चंद्र जैसा राहे ॥ ७५ ॥ ना तरि [27]वांर्षिया सांडिली । ग्रीष्में नाहीं मांडिली । माजि निजरूपें निवडली । गंगा जैसी ॥७६॥ तैसी संकल्पविकल्पाचि [28]वोढी । सांडूनि रजतमाची कावडी । भोगितां निजधर्माची[29]

१ शांती. २ विवेक वैराग्यादि दैवी संपत्ती. ३ अंकितपणानें. ४ ठिकाण देतें. ५ प्रत्यक्ष. ६ घेतां यावा. ७ विचार. ८ दुसरा प्रसंग. ९ संबंध. १० मागल्यावरून. ११ सोबतीण. १२ चंद्रज्योत. १३ एके ठिकाणीं. १४ संपादन केले जातात. १५ तिला. १६ एकच आश्रय. १७ अग्रभागींचा. १८ ऐका. १९ उडी न घालून. २० भय, कंप. २१ मार्गास. २२ योगानें. २३ सर्व जग आत्मस्वरूप आहे असें मानून. २४ व्यात, पाणीमय. २५ प्रतिपदा. २६ क्षय. २७ वर्षाऋतु. २८ ओढ. २९ स्वस्वरूपधारणेची.

आवडी । बुद्धि उरे ॥ ७७ ॥ इंद्रियवर्गी राखविलिया । विरुद्ध अथवा भलीया । विसाध काहीं केलिया । तुटी चित्तीं ॥ ७८ ॥ गांवा गेलिया वल्लभ[1] । पतिव्रतेचा विरह क्षोभ । भलतेसणी[2] हानी लाभ । न मनी जेवीं ॥ ७९ ॥ तेविं सत्त्वरूप रुचलेपणें । बुद्धी जें ऐसें अनन्य होणें । ते सत्वशुद्धी ह्मणे । केशिहंता[3] ॥ ८० ॥ आतां आत्मलाभाविखीं । ज्ञानयोगामाजी एकीं । जे आपुलिया ठाकीं । हांवे भरे ॥ ८१ ॥ तेथ सगाळिये चित्तवृत्ती । त्याग करणें या रीती । निष्कामें पूर्णाहुती । हुताशीं[4] जैसी ॥ ८२ ॥ कां सुकुळीनें[5] आपुली । आत्मजा[6] सत्कुळींचि दिधली । हें असो लक्ष्मी स्थिरावली । मुकुंदीं जैसी ॥८३॥ तैसें निर्विकल्पपणें । जें योगज्ञानींच या वृत्तिक[7] होणें । तो तिजा[8] गुण ह्मणे । कृष्णनाथ ॥ ८४ ॥ आतां देहवाचाचित्तें । यथासंपन्नें वित्तें । वैरी जालियाही आर्तातें । न वंचणें[9] जें कां ॥ ८५ ॥ फुलीं फळीं छाया । मुळीं पत्रींही धनंजया । वाटेचा नवुके आलिया । वृक्ष जैसा ॥ ८६ ॥ तैसें मनौनि[10] धनवरी । विद्यमानें[11] आल्या अवसरीं[12] । श्रांतांचिये मनोहारीं[13] । उपयोगा जाणें ॥ ८७ ॥ तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन । हें असो आयिक चिन्ह । दमाचें तें ॥ ८८ ॥ तरि विषयेंद्रियमिळणी । करूनि घापे वितुटणी[14] । जैसें तोडिजे खडूळपाणी[15] । पौरकेया[16] ॥ ८९ ॥ तैसा विषयजातांचा वारा । वाजों नेदिजे इंद्रियद्वारां । इयें बांधोनि प्रत्याहारा । हातीं[17] वोपी ॥ ९० ॥ आंतुला चित्ताचे अंगेंवरी[18] । प्रवृत्ति[19] पेलूनि माघारी । सुंयिजे[20] दाहींही द्वारीं । वैराग्याची ॥ ९१ ॥ श्वासोश्वासाहुनी बहुवसें । व्रतें आचरे खरपुसें[21] । वोसंतितों[22] रात्रिदिवसें । नौराणुक जया ॥ ९२ ॥ पैं दम ऐसा ह्मणिपे । तो हा जाण स्वरूपें । यज्ञार्थही संक्षेपें । सांगों ऐक ॥ ९३ ॥ तरि ब्राह्मण करूनि धुरे[24] । स्त्रियादिक पैल मेरे । माझारीं अधिकारें । आपुलालेनि ॥ ९४ ॥ जया जें सर्वोत्तम । भजनीय देवताधर्म । तें तेणें यथागम[25] । विधी यजिजे ॥ ९५ ॥ जैसा द्विज षट्कर्में[26] करी । शूद्र तयातें नमस्कारी । कीं दोहींसिही सरोबरी[27] । निपजे याग ॥ ९६ ॥ तैसें अधिकारपर्यालोचें[28] । हें यज्ञ करणें सर्वांचें । परि विष फळाशेचें । न घापे माजी ॥ ९७ ॥ आणि मी कर्ता ऐसा भावो । नेदिजे देहाचेनि द्वारें जावों । नीं[29] वेदाज्ञेसी तरी ठावो । होइजे स्वयें ॥ ९८ ॥ अर्जुना एवं यज्ञ । सर्वत्र

---

१ पति. २ भलत्यानें, पाहिजे तेवढा. ३ केशी दैत्यास मारणारा श्रीकृष्ण. ४ अग्नींत. ५ कुलवंतानें. ६ मुलगी. ७ वतनदार. ८ तिसरा ज्ञानयोग. ९ विन्मुख करणें. १० मनापासून. ११ प्रस्तुत. १२ प्रसंगीं. १३ दमलेल्यास त्याचे मनोनुरूप. १४ वियोग. १५ निवळीच्या बियांनीं. १६ नित्यमनाच्या. १७ देतो. १८ स्थानापर्यंत. १९ फिरवून. २० घालावी. २१ प्रखर, उत्तम. २२ आचरितां, करितां. २३ विश्रांति, नसणें. २४ अग्रभागीं. २५ यथाशास्त्र. २६ (यजन १, याजन २, अध्ययन ३, अध्यापन ४, दान ५ व प्रतिग्रह ६) हीं षट्कर्में. २७ सारखेच. २८ अधिकाराप्रमाणें. २९ नाहींतर.

जाण सांग । कैवल्यमार्गीचा अभिज्ञ । सांगाती हा ॥९९॥ आतां चेंडुवें भूमी हाणिजे। हें नव्हे तो हाता आणिजे । कीं शेतीं बीं विखुरिजे । परी पिकीं लक्ष ॥ १०० ॥ ना तरि ठेविलें देखावया । आदर कीजे दिविया । कां शाखा फळें यावया । सिंपिजे मूळ ॥ १ ॥ हें बहू असो आरिसा । आपणपें देखावया जैसा । पुढतपुढती बहुवसा । उटिजे प्रीतीं ॥ २ ॥ तैसा प्रतिपाद्य जो ईश्वर । तो होवयालागीं गोचर । श्रुतीचा निरंतर । अभ्यास करणें ॥ ३ ॥ तें द्विजांसीच ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र कां नाममंत्र । आवर्तणें पवित्र । पावावया तत्त्व ॥ ४ ॥ पार्था गा स्वाध्यावो । बोलिजे तो हा म्हणे देवो । आतां तप-शब्दाभिप्रावो । आईक सांगों ॥ ५ ॥ तरी दानें सर्वस्व देणें । वेंचणें तें व्यर्थ करणें । जैसें फळोनि स्वयें सुकणें । ओषधीचें ॥ ६ ॥ ना ना धूपाचा अग्निप्रवेश । कनकीं तुकाचा नाश । पितृपक्ष पोषितां ऱ्हास । चंद्राचा जैसा ॥ ७ ॥ तैसा स्वरूपाचिया पैसरा-लागीं प्राणेंद्रियशरीरां । आटणी करणें जें वीरा । तेंचि तप ॥ ८ ॥ अथवा अनारिसें । तपाचें रूप जरी असे । तरि जाण जेंवि दुधीं हंसें । सूदली चांचू ॥ ९ ॥ तैसें देहजीवा-चिये मेळणीं । जो उदयजत सूये पाणी । तो विवेक अंतःकरणीं । जागवी जो ॥११०॥ पाहातां आत्मयाकडे । परि बुद्धीचा पैस सांकडे । सनिद्र स्वप्न बुडे । जागणीं जैसें ॥ ११ ॥ तैसा आत्मपर्या लोच । प्रवर्ते जो साच । तपाचा हा निर्वेच । धनुर्धरा ॥ १२ ॥ आतां बाळाचिया हितीं स्तन्य । जैसें नानाभूतीं चैतन्य । तैसें प्राणिमात्रीं सौजन्य । आर्जव तें ॥ १३ ॥

अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥

आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें । राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥ १४ ॥ आतां तीख होउनि मवाळ । जैसें जातीचें मुकुळ । कां तेज परी शीतळ । शशांकाचें ॥ १५ ॥ शके दावितांचि रोग फेडूं । आणि जिभे तरि नव्हे कडु । तें वोखद नाहीं मां घडु । उपमा कैंची ॥ १६ ॥ तरि मउपणें बुबुळें । झगडतांही परि नाडळे । येरवीं फोडी कोरांळें । पाणी जैसें ॥ १७ ॥ तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह । आंव्यत्वें तरि माधुर्य । पायीं घाली ॥ १८ ॥ ऐकों ठातां कौतुकें । कानातें निघती मुखें ।

---

१ सशास्त्र. २ पेरावें. ३ साफ करणें. ४ प्रत्यक्ष. ५ जप करणें. ६ अध्ययन. ७ खर्च करणें. ८ वजनांचा. ९ प्राप्तीसाठीं. १० झिजविणें, श्रम. ११ घातली. १२ जन्मतां च. १३ पाणी सोडतो, त्याग करतो. १४ आत्मविचार. १५ मार्ग अडचण पावतो. १६ निद्रेसकट. १७ आत्मावलोकन. १८ सिद्धांत. १९ मैत्री. २० वर्तणें. २१ मृदु. २२ जाईची कळी. २३ चंद्राचें. २४ तर मग देऊं. २५ दुःख देत नाहीं. २६ पर्वताचा कडा, दगड. २७ ऐकलें असतां. २८ नमस्कार करूं लावी.

तें वोचारिचेचेनि [2]बिकें । मल्हारी भेरी ॥ १९ ॥ किंबहुना प्रियपणें । कोणातेंही लकडं केलें । यथार्थ तरी सुपणें । नाहीं कवणा ॥ १२० ॥ येऱ्हवीं भोरी कीर काना गोड । परि सोंचाच्या पाखाळीं कीड । आगियेचें करणें उघड । परि जळों तें साच ॥ २१ ॥ कानीं लागतां महुर । अर्थे विभांडी जिव्हार । ते वाचा नव्हे सुंदर । लावचि पां ॥ २२ ॥ परि अहितीं कोपोनि सोपें । लालनी मउ जैसें पुष्प । तिये मातेचें स्वरूप । जैसें कां होय ॥ २३ ॥ तैसें श्रवणसुखचतुर । परिणमोनि साचार । बोलणें जें अविकार । तें सत्य येथें ॥ २४ ॥ आतां घालितांही पाणी । पाषाणीं न निघे अंणी । कां मथिलिया लोणी । कांजी नेदी ॥ २५ ॥ त्वचा पायें शिरीं । [12]शेलेयाही फडे न करी । वसंतीं ही अंबरीं । न होती फुलें ॥ २६ ॥ ना ना रंभेचेनिही रूपें । शुकीं तुटिजेचि [13]कंदर्पे । कां भस्मीं वन्हि न उद्दीपे । घृतेंही जेवि ॥ २७ ॥ तेविंचि [14]कुमारु क्रोधें भरे । तैसिया मंत्रांचीं बीजाक्षरें । तियें [16]निमितेंही अपारें । मीनलिया ॥ २८ ॥ पैं धांतयाही पायां पडतां । तुटी गेसायू पंडुसुता । तैसी तुपजे उपजवितां । क्रोधोर्मि गा ॥ २९ ॥ अक्रोधत्व ऐसें । नांव त ये दशे । जाण ऐसें श्रीनिवासें । म्हणीतलें तया ॥ १३० ॥ आतां मृत्तिकात्यागें घट । तंतुत्यागें पट । त्यजिजे जेविं वट । बीजत्यागें ॥ ३१ ॥ कां त्यजूनि भितिमात्र । त्यजिजे आघवेंचि चित्र । कां निद्रात्यागें विचित्र । स्वप्नजाळ तें ॥ ३२ ॥ ना ना जळ-त्यागें तरंग । वर्षात्यागें मेघ । त्यजिजती जैसे भोग । धनत्यागें ॥ ३३ ॥ तेविं बुद्धि-मंतीं देहीं । अहंता सांडून पाहीं । सांडिजे अशेषही । संसारजात ॥ ३४ ॥ तया नांव त्याग । म्हणे तो [19]यज्ञांग । हें मानूनि [20]सुभग । पार्थ पुसे ॥ ३५ ॥ आतां शांतीचें [21]लिंगें । तें व्यक्त मज सांग । देवो म्हणती चांग । अवधान देईं ॥ ३६ ॥ तरी गिळोनि ज्ञेयातें । ज्ञाता ज्ञानहीं माघौतें । हारपे निरुतें । ते शांति पैं गा ॥ ३७ ॥ जैसा प्रळयांबूचा [22]उभंड । बुडऊनि विश्वाचा [23]पैवाड । होय आपणपें [24]निबिडें । आपणचि ॥ ३८ ॥ मग उगम [25]ओघ सिंधू । हा तुरेचि व्यवहार भेदु । परि जलैक्याचा बोधु । तोही कवणा ॥ ३९ ॥ तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं । मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप ॥ १४० ॥ आतां [26]कदर्थवित व्याधी । [27]बळीकरणाचिया आधीं । आप पर न शोधी । सद्वैद्य जैसा

---

१ साहा शास्त्रें, व चार वेद यांच्या. २ बळानें. ३ पारध्याचें गायन. ४ शुद्ध सुवर्णांत असलेलें हीनकट स्वच्छ करून काढतो. ५ मधुर. ६ फोडी. ७ काळिज. ८ विकशी. ९ पोकळ. १० अंकुर. ११ सापाची कांत १२ हाणतां. १३ कामसुखाची इच्छा. १४ मुलगा. १५ शिव्या. १६ लय पावतात. १७ ब्रह्मदेवाच्या. १८ ज्याचें आयुष्य सरलें आहे तो. १९ श्रीकृष्ण. २० भाग्य-वान. २१ चिन्ह. २२ उमाळा. २३ विस्तार. २४ घनदाट. २५ उत्पत्तीचें स्थळ, प्रवाह व समुद्रास मिळणें. २६ कष्टी करीत. २७ निरोगी होण्याच्या.

॥ ४१ ॥ कां चिखलीं रुतली गाये । धेडभाकड न पाहे । जो तियेच्िया [2]ग्लानी होये । [3]कालाभुला ॥ ४२ ॥ ना ना बुडतयातें सकरुण । न पुसे अंत्यज कीं ब्राह्मण । काढूनि राखे प्राण । हेंचि जाणे ॥ ४३ ॥ कीं [4]मायवणी पापियें । उघडी केली विपायें । ते नेसविल्याविण न पाहे । शिष्ट जैसा ॥ ४४ ॥ तैसें अज्ञानप्रमादादिकीं । कां प्राक्तनींहीं सदोषीं । निंद्यत्वाच्या सर्वविषीं । [6]खिळिले जे ॥ ४५ ॥ तयां [7]आंगीक आपुलें । देउनियां भलें । विसरविजती [8]सलें । सलतीं तियें ॥ ४६ ॥ अगा पुढिलाचे दोष । करूनि आपुलिये दिठी चोख । मग घापे अवलोक । तयावरी ॥ ४७ ॥ जैसा पुजूनि देव पाहिजे । पेरूनि शेता जाइजे । [9]तोषौनि [10]प्रसाद घेइजे । अतिथीचा ॥ ४८ ॥ तैसें आपुलेनि गुणें । पुढिलाचें उणें । फेडुनियां पाहणें । तयाकडे ॥ ४९ ॥ वांचूनि न विंधिजे वर्मीं । नातुडविजे अकर्मीं । न बोलविजे नामीं । सदोषीं तिहीं ॥ १५० ॥ वरि कोणे एकें उपायें । पडिलें तें उभें होये । तेंचि कीजे परि घाये । नेदावे वर्मीं ॥ ५१ ॥ पैं उत्तमाचिया [11]सौटीं । [12]नीचें मानिजे किरीटी । हें वांचोनि दिठी । दोष न घेपे ॥ ५२ ॥ अगा [13]अपैशुन्याचें लक्षण । अर्जुना हें फुडें जाण । मोक्षमार्गींचें सुखासन । मुख्य हें गा ॥ ५३ ॥ आतां दया ते ऐसी । पूर्णचंद्रिका जैसी । निववितां न [14]कडसी । साने थोर ॥ ५४ ॥ तैसें दुःखितांचें शिणणें । हिरतां [15]सकणवपणें । उत्तमाधम नेणें । विवंचूं गा ॥ ५५ ॥ पैं जगीं [16]जीवनासारिखें । वस्तु [17]अंगेंवरी [18]उपखे । परि जालें जीवित राखे । तृणाचेंही ॥ ५६ ॥ तैसें पुढिलाचेनि तापें । कळवळलीये कृपें । दिधलेंही आपणपें । न्यूनचि मानी ॥ ५७ ॥ [19]निम्नें भरलिया उणें । पाणी ढळोंचि नेणें । तेविं [20]श्रांतां तोषौनि जाणें । सामोरें पां ॥ ५८ ॥ पैं पायीं कांटा [21]नेहटे । तंव व्यथा जीवीं उमटे । तैसा पोळे संकटें । पुढिलांचेनि ॥ ५९ ॥ कां [22]पांवो शीतळता लाहे । कीं ते डोळयाचिलागीं होये । तैसा परसुखें जाये । सुखावत जो ॥ १६० ॥ किंबहुना तृषितालागीं । पाणी [23]आरायिलें असे जगीं । तैसें दुःखितांचें [24]सेलेंभागीं । जिणें जयाचें ॥ ६१ ॥ तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया । मी उदयजतांचि तया । ऋणिया लाभें ॥ ६२ ॥ आतां सूर्यासि जीवें । अनुसरलिया [25]राजीवें । परि तें तो न शिवे । [26]सौरभ्य जैसें ॥ ६३ ॥ कां वसंताचिया [27]वोहाणीं । आलिया [28]वनश्रीच्या अक्षौहिणी । ते न करीतचि घेणी । निगाला तो ॥ ६४ ॥ हें असो महासिद्धीसी । लक्ष्मी

---

१ दूध देणारी किंवा न देणारी. २ दुःखानें. ३ कासावीस. ४ पतिव्रता. ५ कदाचित. ६ कष्टले. ७ सहाय. ८ दुःख. ९ संतोष करून. १० आशीर्वाद. ११ ठिकाणीं. १२ नीचालाही उत्तम असें समजतो. १३ उणें न पाहाण्याचें. १४ न परीक्षी. १५ सदयतेनें. १६ पाण्याप्रमाणें. १७ आंग वेष्टून. १८ नाश पावे. १९ सखल जागा. २० श्रमलेल्याला. २१ लागे. २२ पाय. २३ उत्पन्न केलें. २४ बन्यासाठीं. २५ कमळानें. २६ सुगंध. २७ मार्गी. २८ वनशोभेच्या.

ही आलिया पाशीं । परि महाविष्णु जैसी । न गणीच ते ॥ ६५ ॥ तैसें ऐहिकींचे[1] कां स्वर्गींचे । भोग पाइक[2] जालिया इच्छेचे । परि भोगावें हें न रुचे । मनामाजी ॥ ६६ ॥ बहुवें काय कौतुकीं । जीव नोहे विषयाभिलाखी । अलोलुप्त्वदशा[3] ठाउकी । जाण ते हे ॥ ६७ ॥ आतां माशियां जैसें मोहळ । जळचरां जेवि जळ । कां पक्षियां अंतराळ । मोकळें हें ॥ ६८ ॥ ना तरी बाळकोद्देशें । मातेचें स्नेह जैसें । कां वसंतींच्या स्पर्शें । मउ[4] मलयानिळ ॥ ६९ ॥ डोळयां प्रियांचीं भेटी । कां पिलियां कूर्मीची दिठी । तैसी भूतमात्रीं राहटी[5] । मवाळ ते ॥१७०॥ स्पर्शें अतिमृदु । मुखीं घेतां सुस्वादु । घ्राणासि सुगंधु । उजाळ आंगें ॥ ७१ ॥ तो आवडे तेवढा घेतां । विरुद्ध जरी न होता । तरी उपमे येतां । कापुर कीं ॥७२॥ परि महाभूतें पोटीं वाहे । तेवींचि परमाणुमाजि सामाये । या विश्वानुसार होये । गगन जैसें ॥ ७३ ॥ काय सांगों ऐसें जिणें[6] । जें जगाचेनि जीवें प्राणें । तया नांव ह्मणें । मार्दव मी ॥ ७४ ॥ आतां पराजयें राजा । जैसा कैदर्थिजे[7] लाजा । कां मानिया निस्तेजा । निर्कृष्टास्तव[8] ॥ ७५ ॥ ना ना चांडाळमंदिराशीं । अवचटें आलिया संन्यासी । मग लाज होय जैसी । उत्तम तया ॥ ७६ ॥ क्षत्रियां रणीं पळोनि जाणें । ते कोण साहे लाजिरवाणें । कां वैधव्यें पैंचारणें[9] । महासतीयेतें ॥ ७७ ॥ रूपसा[11] उठयलें कुष्ठ । संभाविता[12] कुंटीचें बोट । तया लाजा प्राणसंकट । होय जैसें ॥७८॥ तैसें [13]औटहातपणें । जें शव होउनि जिणें । उपजों उपजों मरणें । नावीं नावा[14] ॥ ७९ ॥ तियें गर्भमेदमुसें । रक्तमूत्ररसें । वोंतीव होऊनि असे । तें लाजिरवाणें ॥ १८० ॥ हें बहु असो देहपणें । नामरूपासि येणें । नाहीं लाजिरवाणें । तयाहूनि ॥ ८१ ॥ ऐसेसिया अवकळा । घेपे शरीराचा कंटाळा । ते लाज पैं निर्मळी[16] । निसुंगा[17] गोड ॥ ८२ ॥ आतां सूत्रतंतू तुटलिया । चेष्टाचि ठाके सायखडिया[18] । तैसी प्राणजयें कर्मेंद्रियां । खुंटे गती ॥ ८३ ॥ कीं मावळलिया दिनकर । सरे किरणांचा प्रसर । तैसा मनोजयें प्रकार । बुद्धींद्रियां ॥ ८४ ॥ एवं मनपवननियमें । होती दाही इंद्रियें अक्षमें[19] । तें अचापल्य वर्मे । येणें होय ॥ ८५ ॥

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।**
**भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥**

आतां ईश्वरप्राप्तीलागीं । प्रवर्ततां ज्ञानयोगी । धिवंसेयाच्या[20] आंगीं । वोसिवो[21] नव्हे ॥ ८६ ॥ वोखटें मरणाऐसें । तेंहीं आलें अग्निप्रवेशें । परी प्राणेश्वरोद्देशें[22] । न गणीचि

---

१ या लोकींचें. २ चाकर. ३ कोणाच्याही विषयावर आसक्त नसणें. ४ मृदु. ५ रुचिकर. ६ जगतो. ७ दुःख देतो, त्रासवितो. ८ नीचपणामुळें. ९ एकाएकीं. १० हाक मारणें. ११ रूपवंताला. १२ निंदापर, आळ. १३ साडेतीन हात. १४ पुनः पुन्हाः १५ दुश्चिन्ह. १६ साधूला. १७ कोडग्याला. १८ बाहुलीला. १९ पंगु. २० धैर्याच्या. २१ न्यूनता. २२ पतीकरतां.

सतीं ॥ ८७ ॥ तैसें आत्मनाथाचिया आधीं । लोऊनि विषयविषाची बोधी । धावों आडवे पाणधीं । शून्याचिये ॥ ८८ ॥ न ठाके निषेध आड । न पडे विधींची भींड । नुपजेचि जीवीं कोड । महासिद्धीचें ॥ ८९ ॥ ऐसें ईश्वराकडे निर्जे । धांवे आपसया सहज । तया नांव तेज । आध्यात्मिक तें ॥ १९० ॥ आतां सर्वही सोहातिया गरिमा । गर्वा नये तेचि क्षमा । जैसें देह वाहोनि रोमा । वाहणें नेणें ॥ ९१ ॥ आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्राचीनें खवळले रोग । अथवा योगवियोग । प्रियाप्रियांच ॥ ९२ ॥ यया आघवियाचाचि थोर । एके वेळे आलिया पूर । तरी अगस्त्याहूनि धीर । उभा ठाके ॥९३॥ आकाशीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगळिका । ते गिळी येकीं झुळुका । वारा जेवीं ॥९४॥ तैसें अधिभूताधिदैवां । अध्यात्मादि उपद्रवां । पातलेय पांडवा । गिळूनि घाली ॥ ९५ ॥ ऐसें चित्तक्षोभाच्या अवसरीं । उचलूनि धैर्या जें चांगावें करी । धृती म्हणिपे अवधारीं । तियेतें गा ॥ ९६ ॥ आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगेंपीयूषें । तया कलशाचिया सारिखें । शौच असे ॥ ९७ ॥ जे आंगीं निष्काम आचार । जीवीं विवेक साचार । तो सबाह्य घडला आकार । शुचित्वाचाचि ॥ ९८ ॥ कां फेडित पाप ताप । पोखीतें तीरींचे पादप । समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥ ९९ ॥ कां जगाचें अंध्य फेडित । श्रियेचीं राउळें उघडित । निघे जैसा भास्वत । प्रदक्षिणे ॥ २०० ॥ तैसीं बांधलीं सोडित । बुडालीं काढित । सांकडीं फेडित । आर्ताचिया ॥१॥ किंबहुना दिवसराती । पुढिलांचें सुख उन्नति । आणित आणित स्वार्थीं । प्रवेशिजे ॥ २ ॥ वांचूनि आपुलिया काजालागीं । प्राणिजातांच्या अहितभागीं । संकल्पाचीही आडवंगी । न करणें जें ॥ ३ ॥ पैं अद्रोहत्व ऐशिया गोष्टी । ऐकसी जिया किरीटी । तें सांगीतलें हे दिठी । पाहें ये तैसें ॥ ४ ॥ आणि गंगा शंभूच्या माथां । पावोनि संकोचली जेविं पार्था । तेविं मान्यपणें सर्वथा । लाजणें जें ॥ ५ ॥ तें हें पुढतपुढती । अमानित्व जाण सुमती । मागां सांगीतलेंसे किती । तेंचि तें बोलों ॥ ६ ॥ एवं इहीं सव्विसें । ब्रह्मसंपदा हे वसत असे । मोक्षचक्रवर्तिचें जैसें । अग्रहार होय ॥ ७ ॥ ना ना हे संपत्ती दैवी । या गुणतीर्थांची नित्य नवी । निर्विण्णसगराच्या दैवीं । गंगाचि आली ॥ ८ ॥ कीं गुण कुसुमांची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा । वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे ॥ ९ ॥ कीं सव्विसगुणज्योती । इहीं उजळूनि आरती । गीता आत्मया निजपती- ।

---

१ जाळून. २ समुदाय. ३ कांटेरी मार्गानें. ४ मन. ५ साहजिक. ६ महत्व. ७ पूर्वकर्मानें. ८ अतिशय. ९ शुद्ध करून. १० गंगोदकानें. ११ पोषीत. १२ वृक्ष. १३ पाणी. १४ आंधळेपणा. १५ वनशोभेचीं ठिकाणें, कमळें. १६ सूर्य. १७ संकटें. १८ अडथळा, कुमार्ग. १९ लाजली. २० श्रीविष्णुचें. २१ इनाम. २२ विरक्त हेंच सगर. २३ वर सांगितलेलें. २४ शोधीत.

नीरांजना[1] आली ॥ २१० ॥ उगाळिते[2] निर्मळें । गुण इयेंचि मुक्ताफळें । दैवी शुक्ती कळें[3] । गीतार्णवींची ॥ ११ ॥ काय बहु वानूं ऐसी । अभिव्यक्ति[4] ये अपैसी । केलें दैवी गुणराशि । संपत्तीरूप ॥ १२ ॥ आतां दुःखाची आंतुवटें[5] वेली । दोषकांट्याची जरी भरली । तरी निजाभिधानीं घांतली[6] । आसुरी ते ॥ १३ ॥ पैं त्याज्य[7] त्यजावयालागीं । जाणावी जरी अनु[8]-पयोगी । तरी ऐका ते चांगी । श्रोत्रंशक्ती ॥ १४ ॥ तरी नरकव्यथा थोरी । आणावया दोषीं अघोरीं[9] । मेळ केला ते आसुरी । संपत्ति हे ॥ १५ ॥ ना ना विषवर्ग एकवट । तया नांव जैसें बासट । आसुरी संपत्ती हा खोटें[10] । दोषांचा तैसा ॥ १६ ॥

**दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥**

तरी तयाचि आसुरा । दोषामाजी जया वीरा । वोडपणाचा[11] डांगोरा । तो दंभ ऐसा ॥ १७ ॥ जैसी आपुली जननी । नग्न दाविलिया जनीं । तें तीर्थचि परि पतनीं[12] । कारण होय ॥ १८ ॥ कां विद्या गुरूपदिष्टा । बोभाइलिया[13] चोहटां । तरि इष्टदाचि[14] परि अनिष्टा[15] । हेतु[16] होती ॥ १९ ॥ पैं आंगें बुडतां महा पुरीं । जे वेगें काढी पैल तीरीं । ते नावचि बांधिलिया शिरीं । बुडवी जैसी ॥ २२० ॥ कारण जें जीविता । तें वानिलें जरि[17] सेवितां । तरि अन्नचि पुंडसुता । होय विष ॥ २१ ॥ तैसा दृष्टादृष्टाचा[18] सखा । धर्म जाला तो फोकारिजे[19] देखा । तरि तारिता तोचि दोखा- । लागीं होय ॥ २२ ॥ म्हणोनि वाचेचा चौबारा[20] । घातलिया धर्माचा पसारा । धर्मचि तो अधर्म होय वीरा । तो दंभ जाणें ॥ २३ ॥ आतां मूर्खाचियें जिभे । अक्षरांचा आंबुखा[21] सुभे[22] । आणि तो ब्रह्मसभे । न रिझे जैसा ॥ २४ ॥ कां मौदुरीं[23] लोकांचा घोडा । गजपतीही मानी थोडा । कां कांटियेवरिल्या सरडा । स्वर्गही नीच ॥ २५ ॥ तृणाचेनि इंधनें । आगी धांवे गगनें । थिल्लरबळें[24] मीनें । न गणिजे सिंधू ॥ २६ ॥ तैसा माजे स्त्रिया धनें । विद्या स्तुती बहुतें मानें । एके दिवसींचेनि परान्नें । अल्पकु[25] जैसा ॥ २७ ॥ अभ्रच्छायेचिया जोडी । निदैव घर मोडी । मृगांबु देखोनि फोडी । पाणियाढे[26] मूर्ख ॥ २८ ॥ किंबहुना ऐसैसें । उतणें[27] जें संपत्तिमिसें । तो दर्प गा अनारिसें । न बोलें घेईं ॥ २९ ॥ आणि जगा वेदीं विश्वास । आणि विश्वासीं पूज्य ईश ।

---

१ आरती ओवाळावयास. २ उघडीत. ३ शकलें. ४ प्रकट. ५ आंतील. ६ आपल्या सांगण्याचे क्रमांत ओंवली. ७ टाकण्यायोग्य. ८ निरुपयोगी. ९ काळकूट. १० गोळा. ११ मोठेपणाचा. १२ दोषाला. १३ चवाठ्यावर जर उघड केली. १४ इच्छिलेले देणारी. १५ अपाय करण्याला. १६ कारण. १७ पुष्कळ खातां. १८ इहपरलोकींचा. १९ उघड कीजे. २० चवाठा. २१ शितोडा. २२ घातला. २३ चाबुकस्वाराचा. २४ माशानें. २५ दरिद्री. २६ तळें. २७ माजणें.

जगीं एक तेजस । सूर्यचि हा ॥ २३० ॥ जगस्पृहें [2]आस्पद । एक सार्वभौमपद । न मरणें निर्विवाद । जगा [3]पढियें ॥ ३१ ॥ ह्मणौनि जरी उत्साहें । यातें वानूं जाये । कीं तें आइकोनि मत्सर वाहे । फुगों लागे ॥ ३२ ॥ ह्मणे ईश्वरातें खाये । तया वेदा विष सूये । [4]गौरवांमाजी न्याये । भंगीत असे ॥ ३३ ॥ पतंगा नावडे ज्योती । खद्योता भानुची खंती । [6]टिट्टिभेनें [7]अपांपती । वैरी केला ॥ ३४ ॥ तैसा अभिमानाचेनि मोहें । ईश्वराचेंही नाम न साहे । बापातें ह्मणे मज हे । सवती जाली ॥ ३५ ॥ ऐसा मान्यतेचा पुर्ष्टगंड । तो अभिमानी परमलंड । [10]रौरवांचा [11]रूढ । मार्गचि पैं ॥ ३६ ॥ आणि पुढिलांचें सुख । देखणियांचें होय मिष । चढे क्रोधाग्नीचें विख । मनोवृत्ती ॥ ३७ ॥ [12]शीतजळाचिये भेटी । [13]तातला तेलीं [14]आगी उठी । चंद्र देखोनि जळे पोटीं । कोल्हा जैसा ॥ ३८ ॥ विश्वाचें आयुष्य जेणें उजळे । तो सूर्य उदेला देखोनि [15]सवेंळे । पापिया फुटती डोळे । [16]डुडुळाचे ॥ ३९ ॥ जगाची सुखपहांट । चोरां मरणाहूनि [17]निकृष्ट । दुधाचें काळकूट । होय [18]व्योळीं ॥ २४० ॥ अगाधें समुद्रजळें । प्राशितां अधिक जळे । वडवाग्नी न मिळे । शांति कहीं ॥ ४१ ॥ तैसा विद्याविनोद[19]विभवें । देखे पुढिलांचीं दैवें । तंव तंव रोष दुणावे । क्रोध तो जाण ॥ ४२ ॥ आणि मन सर्पाचि [20]कुंटी । डोळे [21]नाराचांची सुटी । बोलणें ते वृष्टी । इंगळांची ॥ ४३ ॥ येर जें क्रियाजात । तें [22]तिखेयाचें करवत । ऐसें सबाह्य खसखसित । जयाचें गा ॥ ४४ ॥ तो मनुष्यांत अधम जाण । [23]पौरुष्याचें [24]अवतरण । आतां आइक खुण । अज्ञानाची ॥ ४५ ॥ तरी शीतोष्णस्पर्शा । निवाड नेणें पाषाण जैसा । कां रात्री आणि दिवसा । [25]जात्यंध तो ॥ ४६ ॥ आगी उठिला [26]आरोगणें । जैसा खाद्याखाद्य न ह्मणे । कां परिस [27]पाड नेणे । सोनया लोहा ॥ ४७ ॥ ना तरि ते नानारसीं । रिघोनि [28]दर्वी जैसी । परि रसस्वादासी । चाखों नेणें ॥ ४८ ॥ कां वारा जैसा पारखी । नव्हेचि गा मार्गामार्गांविखीं । तैसें कृत्याकृत्यविवेकीं । अंधपण जें ॥ ४९ ॥ हें चोख हें मैळ । ऐसें नेणोनियां बाळ । देखे तें केवळ । मुखींचि घाली ॥ २५० ॥ तैसें पापपुण्याचें [29]खिचटें । करोनि खातां [30]बुद्धिचेष्टे । कडु मधुर न वाटे । ऐसी जे दशा ॥ ५१ ॥ तिये नाम अज्ञान । या बोला नाहीं आन । एवं साही दोषांचें चिन्ह । सांगितलें ॥ ५२ ॥ इहींच साही दोषांगीं । हे आसुरी संपत्ति [31]दाटुगी । जैसें थोर विष भुजंगीं । अंग [32]सानें ॥ ५३ ॥ कां

---

१ इच्छेचें. २ स्थान. ३ आवडतें. ४ महत्वाच्या योगानें. ५ सत्ता. ६ टिटवीनें. ७ समुद्र. ८ मोठा ताठा. ९ उन्मत्त. १० रौरव नामक नरकाचा. ११ प्रसिद्ध. १२ थंडपाणी. १३ तापलेल्या. १४ विस्तव. १५ प्रातःकाळीं. १६ घुबडाचे. १७ वाईट. १८ सर्पाच्या ठायीं. १९ ऐश्वर्यानें. २० वारूळ. २१ बाणांचें सुटणें. २२ पोलादी. २३ काठिण्याचे. २४ मूर्ति. २५ जन्मांध. २६ खावयाला. २७ साम्य. २८ पळी. २९ खिचडी. ३० बुद्धिव्यापारास. ३१ बलाढ्य. ३२ लहान.

तिंयां वन्हीच्या पंती। पाहतां थोडें ठाय गमती। परि विश्वही प्राणाहुती। करूं न पुरे ॥ ५४ ॥ धांतयाही गेलिया शरण। त्रिदोषीं न चुके मरण। तयां तिहींची दुणी जाण। साही दोष हे ॥ ५५ ॥ इहीं साही दोषीं संपूर्णीं। जाली इयेची उभारणी। ह्मणोनि आसुरी उणी। संपदा नव्हे ॥ ५६ ॥ परि क्रुरग्रहांची जैसी। मांदी मिळे एकेचि राशी। कां येती निंदकांपासीं। अशेष पापें ॥ ५७ ॥ मरणाराचें आंग। पडिघाती अवघेचि रोग। कां कुमुहूर्तीं दुर्योग। एकवटती ॥ ५८ ॥ विश्वासला आंतुडवीजे चोरा। शिणला सुईजे महापुरा। तैसें दोषीं इहीं नरा। अनिष्ट कीजे ॥ ५९ ॥ कां आयुष्य जातिये वेळे। शेळिये सातवेउळि मिळे। तैसे साही दोष सगळे। जोडती तया ॥२६०॥ मोक्षमार्गाकडे। जयाचा आंबुखा पडे। न निघे ह्मणौनि बुडे। संसारीं जो ॥ ६१ ॥ अधमां योनींच्या पैंउटीं। उतरत जो किरीटी। स्थावरांही तळवटीं। बैसणें घे ॥ ६२ ॥ हें असो तयाच्या ठायीं। मिळोनि साही दोषीं इहीं। आसुरी संपत्ति पाहीं। वाढवीजे ॥ ६३ ॥ ऐसिया या दोनी। संपत्ती प्रसिद्धा जनीं। सांगीतलिया चिन्हीं। वेगळाल्या ॥ ६४ ॥

**दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता।**
**मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥**

इया दोन्हींमाजी पहिली। दैवी जे ह्मणीतली। ते मोक्षसूर्यें पाहली। उखौंचि जाण ॥ ६५ ॥ येरी जे दुसरी। संपत्ति कां आसुरी। ते मोहलोहाची खरी। सांखळी जीवा ॥६६॥ परि हें आइकोनि ह्मणें। भय घेसी हो मनें। काय रात्रीचा दिनें। धाक धरिजे ॥ ६७ ॥ हे आसुरी संपत्ति तया। बंधालागीं धनंजया। जो साहीं दोषां ययां। आश्रय होय ॥ ६८ ॥ तूं तंव पांडवा। सांगीतलेया दैवा। गुणनिधी बरवा। जन्मलासी ॥ ६९ ॥ ह्मणोनि पार्था तूं या। दैवीसंपत्ती स्वामिया। होउनि यावें उवायां। कैवल्याचिया ॥ २७० ॥

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च।**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥**

आणि दैवां आसुरां। संपत्तिवंतां नरां। अनादिसिद्ध उजगरा। राहाटीचा आहे ॥ ७१ ॥ जैसें रात्रीच्या अवसरीं। व्यापारिजे निशाचरीं। दिवसा सुव्यवहारीं। मनुष्यादिकीं ॥ ७२ ॥ तैसिया आपलालिया राहाटीं। वर्तती दोनी सृष्टी। दैवी आणि किरीटी।

---

१ प्रळयाग्नि, विद्युताग्नि, वडवाग्नि. २ पंक्तींत. ३ अग्निदेवाला. ४ मंगळ-शनीची. ५ समुदाय. ६ व्यापिती. ७ धरिजे, सांपडे. ८ घालावा. ९ सात नांग्यांची इंगळी. १० प्रतिबंध. ११ पावलांनीं. १२ उजडविली. १३ प्रातःकाळ. १४ बंधन करण्याला. १५ सुखाप्रत. १६ जागरण.

आसुरी येथ ॥ ७३ ॥ तेवींचि विस्तारूनि दैवी । ज्ञानकथनादि प्रस्तावीं । मागीलग्रंथीं बरवी । सांगीतली ॥ ७४ ॥ आतां आसुरी जे सृष्टी । तेथिची उपलऊं गोठी । अवधानाची दिठी । दे पां निकी ॥ ७५ ॥ तरि वाद्येंवीण नाद । नेदी कवणाही साद । कां अपुष्पीं मकरंद । न लभे जैसा ॥ ७६ ॥ तैसी प्रकृति हे आसुर । एकली नोहे गोचर । जंव एकाधें शरीर । मोल्हातीं ना ॥ ७७ ॥ मग आविष्करला लांकुडें । पावक जैसा जोडे । तैसी प्राणिदेहीं सांपडे । आटोपली हे ॥ ७८ ॥ ते वेळीं जे वाढी उंसा । तेचि आंतला रसा । देहाकार होय तैसा । प्राणियांचा ॥ ७९ ॥ आतां तयांचि प्राणियां । रूप करूं धनंजया । घडले जे आसुरीया । दोषवृंदीं ॥ २८० ॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥**

तरि पुण्यालागीं प्रवृत्ती । कां पापाविषयीं निवृत्ती । या जाणणेयाची राती । तयांचें मन ॥८१॥ निगणेया आणि प्रवेशा । चित्त नेदीत आवेशा । कोशकीट जैसा । जाचिंनला पैं ॥ ८२ ॥ कां दिधलें मागुती येइल । कीं नये हें पुढील । न पाहातां दे भांडवल । मूर्ख चोरां ॥ ८३ ॥ तैसिया प्रवृत्ति निवृत्ति दोनी । नेणिजती आसुरीं जनीं । आणि शौच तें स्वप्नीं । देखती ना ते ॥ ८४ ॥ काळिमा सांडील कोळसा । वरि चोखी होईल वायसा । राक्षसही मांसा । विटों शके ॥ ८५ ॥ परि आसुरां प्राणियां । शौच नाहीं धनंजया । पवित्रत्व जेवि भांडिया । मद्याचिया ॥ ८६ ॥ वाढविती विधीची आस । कां पाहाती वडिलांची वास । कर्मे आचरती हे भाष । नेणतीचि ते ॥ ८७ ॥ जैसें चरणें शेळियेचें । कां धांवणें वारियाचें । जाळणें अग्नीचें । भलतेउतें ॥ ८८ ॥ तैसें पुढांसूनि स्वैर । आचरती ते गा आसुर । सत्येंसि कीर वैर । सदांचि तयां ॥ ८९ ॥ जरी नांगिया आपुलिया । विंचू करी गुदगुलिया । तरी साचा बोलिया । बोलती ते ॥ २९० ॥ अपनाचेनि तोंडें । जरि सुगंधा येणें घडे । तरि सत्य तयां जोडे । आसुरांतें ॥ ९१ ॥ ऐसें ते नकरितां कांहीं । आंगेंचि वोखटे पाहीं । आतां बोलती ते नवाई । सांगिजेल ॥ ९२ ॥ येऱ्हवीं करैयांच्याठायीं चांग । तें तयासि कैचें नीट आंग । तैसा असुरांचा प्रसंग । प्रसंगें परिस ॥ ९३ ॥ उंधवणीचें जेवि तोंड । उंगळी धुंवांचे उभड । हें जाणिजे तेवि उघड । सांगों ते बोल ॥ ९४ ॥

---

१ प्रसंगें. २ सांगूं. ३ शब्द, ध्वनि. ४ पुष्परस. ५ अंगीकारीना. ६ प्रकट केलेला. ७ अग्नी. ८ आवेशानें, त्वरेनें. ९ कोशकार किडा. १० शास्त्रविहित. ११ शास्त्रनिषिद्ध. १२ पांढरेपण. १३ वाट. १४ प्राङ्मुख. १५ यथेष्ट. १६ वाईट. १७ अपूर्वता. १८ उंटाच्या. १९ धुरांड्याचें. २० ओकी. २१ धुराचे. २२ लोट.

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।**
**अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥**

तरि विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता[1] ईश्वररावो । चावडिये न्यावो[2] अन्यावो । निवडी वेद ॥ ९५ ॥ वेदीं अन्यायी पडे । तो निरयभोगें[3] दंडे । संन्यायी तो सुरवाडें[4] । स्वर्गीं जिये ॥ ९६ ॥ ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था । इयेतें ह्मणती ते वृथा[5] । अवघेंचि हें ॥ ९७ ॥ यज्ञमूढ ठकिले यागीं । देवपिसे प्रतिमालिंगीं[6] । नागवले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ ९८ ॥ येथ आपलेनि बळें । भोगिजे जें जें वेंटाळे[7] । हेंवांचोनि वेगळें । पुण्य आहे ॥ ९९ ॥ ना अशक्तपणें आंगिकें । वेगळ वेंटाळीं[8] न टके । ऐसा गौंदिजे[9] वीण विषयसुखें । तेंचि पाप ॥ ३०० ॥ प्राण घेपती संपन्नांचे । तें पाप जरी साचें । तरी सर्वस्व हाता ये तयांचें । हें पुण्यफळ कीं ॥ १ ॥ बळी अबळातें खाय । हेंचि बाधितें[10] जरी होय । तरी मासयां[11] कां न होय । निसंतान ॥ २ ॥ आणि कुळें शोधूनि दोन्ही । कुमारेंचि शुभलग्नीं । मेळवीजती प्रजासाधनीं । हेतु जरी ॥ ३ ॥ तरी पशुपक्ष्यादि जाती । जयां मिति नाहीं संतती । तयां कोणें प्रतिपत्ती[13] । विवाह केले ॥ ४ ॥ चोरियेचें धन आलें । तरि तें कोणासि विष जालें । वेलभें[14] परद्वार[15] केलें । कोढी कोणी होय ॥ ५ ॥ ह्मणोनि देव गोसावी । तो धर्माधर्म भोगवी । आणि परत्राच्या[16] गांवीं । करी तो भोगी ॥ ६ ॥ परि परत्र ना देवो । न दिसे ह्मणोनि तें वावो । आणि कर्ता[17] निमे मा ठावो । भोग्यासि कवण ॥ ७ ॥ येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं । तैसाचि कृमिही नरकीं । लोळत श्लोगे[18] ॥ ८ ॥ ह्मणोनि नरक स्वर्ग । नव्हे पापपुण्यभाग । जे दोहीं ठायीं सुखभोग । कामाचाचि तो ॥ ९ ॥ याकारणें कामें । स्त्रीपुरुषयुग्में । मिळती तेथ जन्में । आघवें जग ॥ ३१० ॥ आणि जें जें अभिलोषें[19] । स्वार्थालागीं पोषे । पाठीं परस्पर द्वेषें । कामचि नाशी ॥ ११ ॥ एवं कामावांचूनि कांहीं । जगा मूळचि आन नाहीं । ऐसें बोलती पाहीं । आसुर गा ते ॥ १२ ॥ आतां असो हें किडाळ[20] । बोलीं न करूं पघळ । सांगतांचि सैफोल[21] । होतसे वाचा ॥ १३ ॥

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।**
**प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतो हिताः ॥ ९ ॥**

आणि ईश्वराचिया[22] खंती । तुसधियाचि करिती[23] बांथी । [24] हेंही नाहीं चित्तीं ।

---

१ मालक. २ न्याय, अन्याय. ३ नरक भोगानें. ४ सुखानें. ५ खोटें. ६ मूर्तींत. ७ बळानें. ८ एकवट झालेलें. ९ न भोगवे. १० दुःखेंवीण. ११ पाप. १२ मत्स्यांला. १३ विधीनें. १४ आवडीनें. १५ व्यभिचार. १६ परलोकीं. १७ मेरे. १८ संतोष मानी. १९ आसक्ती, मनोरथ. २० खोटें. २१ व्यर्थ. २२ खेद. २३ बडबड. २४ कोणाचा एक निश्चय देखील नाहीं.

निश्चय एक ॥ १४ ॥ किंबहुना उघड । आंगीं लाऊनियां पाखंड । नास्तिकपणाचें हाड । रोंविलें जीवीं ॥१५॥ ते वेळीं स्वर्गालागीं आदर । कां नरकाचा [1]अडदर । या वासनांचा अंकुर । जळोनि गेला ॥ १६ ॥ मग केवळ ये देह[2]खोडां । [3]अमेध्योदकाचा बुडबुडा । विषयपंकीं [4]सुहाडा । बुडालेगा ॥ १७ ॥ जैं [5]आटावें होती जळचर । तैं डोहीं मिळती [6]ढीवर । कां पडावें होय शरीर । तैं रोगां उदय ॥ १८ ॥ उदै[7]जगें केतूचें जैसें । विश्वा[8] अनिष्टोद्देशें । जन्मती ते तैसे । लोकां [9]आटूं ॥ १९ ॥ विरूढलिया अशुभ । फुटती तैं ते कोंभ । पापाचे कीर्त्तिस्तंभ । चालते ते ॥ ३२० ॥ आणि मागां पुढां जाळणें । वांचूनि आगी कांहीं नेणे । तैसें विरुद्धचि एक करणें । भलतेयां ॥ २१ ॥ परि तेंचि गा करणें । आदरिती संभ्रमें[10] जेणें । तो आईक पार्था ह्मणे । श्रीनिवास ॥ २२ ॥

कामाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ।
मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्ततेऽशुचिव्रताः ॥ १० ॥

तरि [11]जाळ पाणियें न भरे । आगी [12]इंधनें न पुरे । तयां [13]दुर्भरांचिये धुरे । भुक्ताकु ओ ॥ २३ ॥ तया कामाचा वोलें[14]वा । जीवीं धरूनि पांडवा । दंभमानाचा मेळावा । मेळविती ॥ २४ ॥ मातलिया कुं[15]जरा । आगळी जाली मदिरा । तैसा मदाचा ताठा तंव जरा । चढतां आंगीं ॥ २५ ॥ आणि आग्रहा तोचि ठावो । वरि मौ[16]ढ्या ऐसा [17]सांवावो । मग काय वानूं निर्वाहो । निश्चयाचा ॥ २६ ॥ जिहीं परो[18]पताप घडे । [19]परावा जीवु रगडे । तिहीं कर्मीं होउनि गाढे । जन्मवृत्ती ॥ २७ ॥ मग आपुलें केलें फो[20]कारिती । आणि जगातें धिक्कारिती । दाहीदिशीं पसरिती । [21]स्पृहाजाळ ॥ २८ ॥ ऐसेनि गा आटोपें । योरियें[22] आणिती पापें । [23]धर्म धेनु खुरपें । सुटलें जैसें ॥ २९ ॥

चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

याचि येका [24]आयती । तयाचिया कर्मप्रवृत्ती । आणि जिणि[25]यांही परौती । वाहती चिंता ॥ ३३० ॥ पाताळाहूनि निम्न[26] । जियेचिये[27] उंचिये सानें गगन । जे पाहातां त्रिभुवन । अणुही नोहे ॥ ३१ ॥ ते यो[28]गपदाची [29]मेवणी । जीवीं अनियम चिंतवणी । जे

१ भय. २ देहरूप खोड्यामध्यें. ३ अपवित्र जलाचा. ४ सुहृदा अर्जुना. ५ मारावे अशी ईश्वरीच्छा होते. ६ कोळी. ७ जगाच्या. ८ अकल्याणार्थ. ९ नाशास्तव. १० समारंभानें. ११ जाळें. १२ काष्ठांनीं. १३ बांबूच्या अग्रभागीं. १४ जिव्हाळा. १५ हत्ती. १६ मूर्खपणा. १७ मदत. १८ दुसऱ्यास ताप. १९ अन्याचा. २० प्रसिद्ध करिती. २१ इच्छेचें जाळें. २२ उंच दशेस. २३ हरळीमध्यें. २४ साधनानें. २५ जीवापलीकडील. २६ खोल. २७ ज्या चिंतेला. २८ योगबलानें रिद्धिसिद्ध्यादिक अधिकाराच्या. २९ निस्सीम आशेची धांव.

सांडूं नेणें मरणीं । वैल्लभा जैसी ॥ ३२ ॥ तैसी चिंता अपार । वाढविती निरंतर । जीवीं सूनि असार । विषयादिक ॥ ३३ ॥ स्त्रिया गाइलें आइकावें । स्त्रीरूप डोळां देखावें । सर्वेंद्रियें आलिंगावें । स्त्रियेतेंचि ॥ ३४ ॥ कुरवंडी कीजे अमृतें । ऐसें सुख स्त्रियेपरौतें । नाहींचि ह्मणौनि चित्तें । निश्चय केला ॥ ३५ ॥ मग तयाचि स्त्रीभोगा- । लागीं पाताळ स्वर्गा । धांवती दिग्विभागा । परौतेही ॥ ३६ ॥

## आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।
## ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

आँमिषकवळु थोरी आशा । न विचारितां गिळी मासा । तैसें कीजे विषयाशा । तयांसि गा ॥ ३७ ॥ वांछित तंव न पवती । मग कोरडियेचि आशेची संतती । वाढऊं वाढऊं होती । कोशंकिडे ॥ ३८ ॥ आणि पसरिला अभिलाष । अपूर्व होय तोचि द्वेष । एवं काम क्रोधाहूनि अधिक । पुरुषार्थ नाहीं ॥ ३९ ॥ दिहीं खोलैंणें रात्री जागोवा । ठाणांतरिया जैसा पांडवा । अहोरात्रिंही विसावा । भेटेचिना ॥ ३४० ॥ तैसें उंचौनि लोटिलें कामें । नेहटती क्रोधाचिये [११]ढिमें । तरी रागद्वेष प्रेमें । न माती कहीं ॥ ४१ ॥ तेंविंचि जीवींचिया हांवा । विषयवासनांचा मेळावा । केला परि तो भोगावा । अर्थें कीं ना ॥ ४२ ॥ ह्मणोनि भोगावया जोगा । पुरता अर्थ पैं गा । आणावया जगा । झोंबती सैरों[१२] ॥ ४३ ॥ एकातें साधूनि मारिती । एकाचीं सर्वस्वें हरिती । एकालागीं उभारिती । अँपाययंत्रें ॥ ४४ ॥ पाँशिकें पोतीं वैंगुरा । सुँणी ससाणे चिकाटी खोंचौरा । घेऊनि निघती डोंगरा । पारधी जैसे ॥ ४५ ॥ तें पोसावया पोट । मारूनि प्राणियांचे संघाट । आणिती ऐसें निकृष्ट । तेंही करिती ॥ ४६ ॥ परप्राणघातें । मेळविती वित्तें । मिळाल्या चित्तें । तोषणें कैसें ॥ ४७ ॥

## इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
## इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥

ह्मणे आजि मियां । संपत्ती बहुतेकांचिया । आपुल्या हातीं केलिया । धन्य ना मी ॥ ४८ ॥ ऐसा श्लाघों जंव जाये । तंव मन आणीकही वाहे । सवेंचि ह्मणे पाहें । आणिकांचेंही आणूं ॥ ४९ ॥ हें जेतुलें असे जोडिलें । तयाचेनि भांडवलें । लाभा येईन उरलें ।

---

१ स्त्री. २ घालून. ३ दाहादिशांस. ४ मांसाचे गोळे. ५ कोसले नांवाचे किडे. ६ दिवसा. ७ मुक्तद्वार. ८ जागृति. ९ देवडीवाला. १० आदळती. ११ टेंकडीवर. १२ यथेच्छ. १३ उभी करितात. १४ नाशाच्या युक्ती. १५ पाश. १६ जाळें. १७ शिकारी कुत्रीं. १८ चिकटण्या. १९ भाले. २० समुदाय. २१ स्तवन करूं.

चराचर हें ॥ ३५० ॥ ऐसेनि धना विश्वाचिया । मीचि होईन स्वामिया । मग दिठी पडे तया । उरों नेदीं ॥ ५१ ॥

**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥**

हे मारिले वैरी थोडे । आणीकही साधीन गाढे । मग नांदेन पवाडें । येकलाचि मी ॥ ५२ ॥ मग माझीं होतील कामारीं । तियेंवांचूनि येरें मारीं । किंबहुना चराचरीं । ईश्वर तो मी ॥ ५३ ॥ मी भोगभूमीचा रावो । आजि सर्वसुखासी ठावो । ह्मणोनि इंद्रही वावो । मातें पाहूनि ॥ ५४ ॥ मी मनें वाचा देहें । करीं तें कैसें नोहे । कें मजवांचूनि आहे । आज्ञासिद्ध आन ॥ ५५ ॥ तंवचि बळिया काळ । जंव न दिसें मीं अतुर्बळ । सुखाचा कीर निखिळ । रासिवा मींचि ॥ ५६ ॥

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥**

कुबेर आथिला होये । परी तो नेणे माझी सोये । संपत्ती मजसम नव्हे । श्रीनाथाही ॥ ५७ ॥ माझिया कुळाचा उजाळु । कां जातीगोतांचा मेळु । पाहातां ब्रह्माही हेळु । उणाचि दिसे ॥ ५८ ॥ ह्मणोनि मिरविती नांवें । वायां ईश्वरादि आघवे । नाहीं मजसीं सरी पावे । ऐसें कोणही ॥ ५९ ॥ आतां लोपला अभिचार । त्याचा करीन मी जीर्णोद्धार । प्रतिष्ठीन परमार । यागवरि ॥ ३६० ॥ मातें गाती वानिती । नटनाचें रिझविती । तयां देईन मागती । ते ते वस्तु ॥ ६१ ॥ माजिरा अन्नपानीं । प्रमदांच्या आलिंगनीं । मी होईन त्रिभुवनीं । आनंदाकार ॥ ६२ ॥ काय बहु सांगों ऐसे । ते आसुरीप्रकृती पिसे । तुरंबिती असोसें । गगनौळें तियें ॥ ६३ ॥

**अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥**

ज्वराचेनि आटोपें । रोगी भलतैसें जल्पे । चांवळती संकल्पें । जाण ते तैसे ॥ ६४ ॥ अज्ञाना अतुळे धुळी । ह्मणौनि आशा वाहटुळी । भोवंडीजती अंतराळीं । मनोरथांच्या ॥ ६५ ॥ अनियम आषाढ मेघ । कां समुद्रोर्मी अभंग । तैसे कामिती अनेग ।

---

१ मारीन. २ लौकिकानें. ३ सेवक. ४ व्यर्थ. ५ महा बळवान. ६ राशी. ७ संपन्न. ८ विष्णूला. ९ नांवलौकिक. १० नीच. ११ जारणमारणादि. १२ परपीडा. १३ वर्णिती. १४ संतोषविती. १५ उन्मत्त. १६ वास घेती. १७ अपरमित इच्छेनें. १८ आकाशपुष्प. १९ बडबडे. २० बरळती. २१ प्राप्त झाले. २२ वावटळ. २३ इच्छिती.

अखंड काम ॥ ६६ ॥ मग पैं कामनांचि[1] तया । जिवीं जाल्या वेलरिया[2] । वोरपिलीं[3] कांटिया । कमळें जैसीं ॥ ६७ ॥ कां पाषाणाचिया माथां । हांडी फुटली पार्था । जीवीं तैसे सर्वथा । कुटके जाले ॥ ६८ ॥ तेव्हां चढतीये रैयणीं[4] । तमाची होय पुरवणी । तैसा मोह अंतःकरणीं । वाढोंचि लागे ॥ ६९ ॥ आणि वाढे जंव जंव मोहो । तंव तंव विषयीं [5]रोहो । विषय तेथ ठावो । पातकासी ॥ ३७० ॥ पापें आपलेनि [6]थांवें । जंव करिती मेळावे । तंव जितांचि आघवे । येती नरक ॥ ७१ ॥ ह्मणौनि गा सुमती । जे कुमनोरथां पाळिती । ते आसुर येती वस्ती । तया ठाया ॥ ७२ ॥ जेथ असि[7]पत्र तरुवर । खदिरांगाराचे डोंगर । [8]तातला तेलीं सागर । उतताती ॥ ७३ ॥ जेथ यातनांची [9]श्रेणी । हे नित्य नवी यमजाचणी । पडती तिये दारुणीं । नरकलोकीं ॥ ७४ ॥ ऐसे नरकाचिये [10]सेले । भागीं जे जे जन्मले । तेही देखों भुलले । यजिती यागीं ॥ ७५ ॥ यऱ्हवीं यागादिक क्रिया । [11]ओहाणतेचि धनंजया । परि वि[12]फळती आचरोनियां । नाटकी जैसे ॥ ७६ ॥ वल्लभाचिया [13]उंजरिया । आपणयाप्रति कुस्त्रिया । जोडोनि तोषिती जैसिया । अहे[14]वपणें ॥ ७७ ॥

आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाऽविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

तैसें आपणयां आपण । मानितां महंतपण । फुगती असाधारण । गर्वें तेणें ॥ ७८ ॥ मग लवों नेणती कैसे । आटिवां लोहाचे खांब जैसे । कां [15]उंधवले आकाशें । शि[16]ळाराशी ॥ ७९ ॥ तैसे आपुलिये बरवे । आपणचि [17]रिझतां जीवें । तृणाहीहूनी आघवें मानिती नीच ॥ ३८० ॥ वरि धनाचिया मदिरा । माजूनि धनुर्धरा । कृत्याकृत्यविचारा । [18]सवतें केलें ॥ ८१ ॥ जया आंगीं [19]आयती ऐसी । तेथ यज्ञाची गोठी कायसी । तरि काय काय पिसीं । न करिती गा ॥ ८२ ॥ ह्मणौनि कोणे येके वेळे । मौढ्यमद्याचेनि बळें । यागाचींही [20]टवाळें । आदरिती ॥ ८३ ॥ ना कुंड मंडप वेदी । ना उचित साधनसमृद्धी । आणि तयांसी तंव विधि । दूंदूचि[21] सदा ॥ ८४ ॥ देवां ब्राह्मणाचेनि नांवें । आड [22]वारेनहि नोहावें । ऐसें आथी तेथ यावें । लागे कवणा ॥ ८५ ॥ पैं [23]वासरुवाचा मो[24]कैसा । गाईपुढें ठेऊनि जैसा । उगा[25]णां घेती क्षीररसा । बुद्धिवंत ॥ ८६ ॥ तैसें याग-

---

१ मनोरथांनीं. २ वेलीच्या जाळ्या. ३ ओरबडलीं. ४ रात्र. ५ वृद्धि. ६ बळानें. ७ तरवारीसारख्या पानांचे. ८ तापलेल्या. ९ शिडी. १० वांटा. ११ हानि. १२ व्यर्थ करिती. १३ आश्रयानें. १४ सौभाग्यानें. १५ उंचलले. १६ पर्वत. १७ संतोषतां. १८ वेगळें केलें. १९ सामग्री. २० टवाळक्या. २१ वैमनस्य. २२ वाऱ्यानें. २३ वासराचा. २४ पेंढा भरून जनावराचा कृत्रिम केलेला पांजरा. २५ झाडा.

चेनि नांवें । जग वेउनि[1] हांवे । नागविती आघवें । अहेरा वारी ॥ ८७ ॥ ऐशा कांहीं आपुलिया । होमिती जें उंजरिया[2] । तेणें कामिती[3] प्राणियां । सर्वनाश ॥ ८८ ॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥**

मग पुढां भेरी निशाण । लाउनी ते दीक्षितपण । जगीं फोकारिती[4] आपण । वांवो[5] वावो ॥ ८९ ॥ तेव्हां महत्त्वें तेणें अधमा । गर्वा चढे महिमा । जैसे लवे[6] दिधले तमा । काजळाचे ॥ ३९० ॥ तैसें मौढ्य घणावे[7] । औद्धत्य[8] उंचावे । अहंकार दुणावे । अविवे- कही ॥ ९१ ॥ मग दुजयाची भाष । नुरवावया निःशेष । बळियेपणा अधिक । होय बळ ॥ ९२ ॥ ऐसा अहंकार बळा । जालया येकवळा[9] । दर्पसागर मर्यादवेळा । सांडूनि उंते[10] ॥ ९३ ॥ मग वोसंडलेनि[11] दर्पें । कामाही पित्त कुरुपे[12] । तया धेंगीं[13] सेंघें[14] पोळिपे[15] । क्रोधाग्नि तो ॥ ९४ ॥ तेथ उन्हाळां आगी खरमरा । तेला तुपाचिया कोठारा । लागला आणि वारा । सुटला जैसा ॥ ९५ ॥ तैसा अहंकार बळा आला । दर्प कामक्रोधीं गूढला । या दोहींचा मेळ जाला । जयांच्या ठायीं ॥ ९६ ॥ ते आपुलिया सवेशीं[16] । मग कोणी कोणी हिंसा । या प्राणियांते विशेशा । न साधिती गा ॥ ९७ ॥ पहिलें तंव धनुर्धरा । आपुलिया मांसरुधिरा । वेंचूं[17] करिती अभिचारा[18] । लागोनियां ॥ ९८ ॥ तेथ जाळिती जियें देहें । यामाजि जो मीं आहे । तया आत्मया मज घाये । वाजती ते ॥ ९९ ॥ आणि अभिचारकीं तिहीं । उपद्रविजे जेतुलें कांहीं । तेथ चैतन्य मी पाहीं । सीण पावे ॥ ४०० ॥ आणि अभिचारावेगळें । विपायें[19] जें अवंगळे[20] । तया टाकिती इटाळें[21] । पैशुन्याचीं ॥ १ ॥ सती आणि सत्पुरुख । दानशीळ याज्ञिक । तपस्वी अलौकिक । संन्यासी जे ॥ २ ॥ कां भक्त हन महात्मे । इयें माझीं निजाचीं[22] धामें । निर्वाळिलीं[23] होम- धर्मे । श्रौतादिकीं ॥ ३ ॥ तयां द्वेषाचेनि काळकूटें । वोसटोनि[24] तिखटें । कुबोलांचीं सदटें[25] । सूति[26] कांडें[27] ॥ ४ ॥

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥**

ऐसे आघवाचि परी । प्रवर्तले माझ्या वैरीं । तया पापियां जें मी करीं । तें आइक पां

---

१ वेधून-लोभानें. २ उत्कर्षासाठीं. ३ इच्छिती. ४ प्रगट करिती. ५ व्यर्थ व्यर्थ. ६ लेप. ७ दृढ होतें. ८ उद्धटपणा. ९ ऐक्य. १० वाहूं लागतो. ११ अतिशयित भरून वाहणाऱ्या. १२ प्रकोप पावे. १३ उबाऱ्यानें. १४ अनिवार. १५ पेटे. १६ स्वेच्छा. १७ खर्च. १८ जारणादि प्रयोगासाठीं. १९ क्वचित्. २० प्राप्त झालें. २१ कोलितें. २२ आवडतीं. २३ निर्मळ केलीं. २४ माखून. २५ बळकट. २६ टोंचतात. २७ बाण.

॥ ५ ॥ तरी मनुष्यदेहाचा तागा । घेऊनि[1] हंसती जे जगा । ते पश्वी हिरोनि पैं गा । ऐसे ठेवीं ॥ ६ ॥ जे क्लेशगांवींचा उकरडा । भवपुरीचा पांनवडा । ते तमोयोनी[4] तयां मूढां । वृत्तिचि दें ॥ ७ ॥ मग आहाराचेनि नांवें । तृणही जेथ नुगवे । ते व्याघ्र वृश्चिक ओंडवे । तैसीये करी ॥ ८ ॥ तेथ क्षुधादुःखें बहुतें । तोडूनि खाती आपणयातें । मरमारों मागुते । होतचि असती ॥ ९ ॥ कां आपला गरळजाळीं । जाळिती आंगाची पेंढळी । ते सर्पचि करीं बिळीं । निरुंधैला ॥ ४१० ॥ परी घेतला श्वास धांपे । येतुलेनही मापें । विसांवा तयां नाटोपे । दुर्जनासी ॥ ११ ॥ ऐसेनि कल्पांचिया कोडी । गणितांही संख्या थोडी । तेतुला वेळ न काढीं । क्लेशौनि तयां ॥ १२ ॥ तरि तयांसि जेथ जाणें । तेथिंचें हें पहिलें पेणें[1] । ते पावोनि येरें दारुणें । न होती दुःखें ॥ १३ ॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥**

हाठायवरी चोरी । संपत्ती ते आसुरी । अधोगति अवधारीं । जोडिली तिहीं ॥ १४ ॥ पाठीं व्याघ्रादि तामसा । योनी तो अंकुमाळ ऐसा । देहाधाराचा उसासा । आथी जोही ॥ १५ ॥ तोही मी वोल्हावा हिरें । मग तमचि होती एकसरें । जेथ गेलें आधारें । कोळवंडेजे ॥ १६ ॥ जयांची पापा चिळैसी । नरक घेती विवैसी । शीण जाय मूर्छी । शिणें जेणें ॥ १७ ॥ मळ जेणें मैळे । ताप जेणें पोळे । जयाचेनि नांवें संळे । महाभय ॥ १८ ॥ पापा जयाचा कंटाळा । उपजे अमंगळ अमंगळा । विटाळही विटाळा । बिहे[16] जया ॥ १९ ॥ ऐसे विश्वाच्या बोखटेयाँ । अधम जे धनंजया । ते ते होती भोगूनियां । तामसा योनी ॥ ४२० ॥ अहा सांगतां वाचा रडे । आठवितां मन खिरडे । कैटारे मूर्खीं केवढे । जोडले निरय ॥ २१ ॥ कायिसया ते आसुर । संपत्ति पोषिती वाउंर । जिया दिधलें घोर । पतन ऐसें ॥ २२ ॥ ह्मणौनि तुवां धनुर्धरा । नोहावें गा तिया मोहेंरा । जेउता वास आसुरा । संपत्तिवंता ॥ २३ ॥ आणि दंभादिदोष साही । हे संपूण जयांच्याठायीं । ते त्यजावे हें काई । ह्मणों कीर ॥ २४ ॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥**

परि काम क्रोध लोभ । या तिहींचेंचि थोंबें[23] । थांवे तेथें अशुभ । पिकलें जाण ॥ २५ ॥

---

१ दोरा. २ जगापासून भिन्न होती. ३ पाणवाट. ४ मूढयोनि-वृक्षादि. ५ अरण्यवासी. ६ त्वचा, पृष्टि. ७ संकोचला. ८ टाकावयास. ९ मुक्काम. १० थोडासा. ११ स्वस्थता. १२ काळोख करणारे काळानें. १३ कंटाळा. १४ भयें. १५ भिये. १६ भीति पावे. १७ निकृष्ट, नाशास्तव. १८ मार्गे सरे. १९ हायरे हाय. २० वावगी. २१ मार्गी. २२ जेथें. २३ बंड.

सर्वदुःखा आपुलिया । दर्शना[1] धनंजया । पोंढाऊ[2] हे भलतया । दिधले आहाती ॥ २६ ॥ कां पापियां नरकभोगीं । सुवावया[3]लागीं जगीं । पातकांची दाटुगी । सभाचि हे ॥ २७ ॥ ते रौरव गा तंवचि वरी । आइकिजती पेटांतरीं । जंव हे तिन्ही अंतरीं । उठती ना ॥ २८ ॥ अपाय तिहीं आंशलुग । यातना इहीं सवंग । हाणी हाणी नोहे हे तिघ । हेचि हाणी ॥ २९ ॥ काय बहु बोलूं सुभटा । सांगीतलिया निकृष्टा । नरकाचा दारवंटा[7] । त्रिशंकु[8] हा ॥ ४३० ॥ या कामक्रोधलोभां- । माजि जीवें जो होय उभा[9] । तो निरयपुरींची सभा । येथ पावे ॥ ३१ ॥ म्हणौनि पुढतपुढती किरीटी । हे कामादिदोषत्रिपुटी । त्यजावीचि गा वोखटी । आघवाविषयीं ॥ ३२ ॥

**एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥**

धर्मादिकां चौंहीआंत । पुरुषार्थाची तेंचि मात । करावीजे संघात । सांडील हा ॥३३॥ हे तिन्ही जीवीं जंव जागती । तंववरी निकियांची प्राप्ती । हे माझे कान नाइकती । देवही म्हणे ॥ ३४ ॥ जया आपणपें[11] पढिये । आत्मनाशा जो बिहे । तेणें न धरावी हे सोये[12] । सावध होइजे ॥ ३५ ॥ पोटीं बांधोनि पाषाण । समुद्रीं बोंहीं[13] आंगवण । कां जियावया जेवण । काळकूटाचें ॥ ३६ ॥ इहीं कामक्रोधलोभेंसी । कार्यसिद्धि जाण तैसी । म्हणोनि ठावोचि पुर्सी[14] । ययांचा गा ॥ ३७ ॥ जैं कहीं अवचटें । हे तिकडी सांखळ तुटे । तैं सुखें आपलिये वाटे । चालों लाभे ॥ ३८ ॥ त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटीं[15] फिटलिया नगर । त्रिदाह[16] निमालिया अंतर । जैसें होय ॥ ३९ ॥ तैसा कामादिकीं तिघीं । सांडिला सुख पावोनि जगीं । संग लाहे मोक्षमार्गीं । सज्जनाचा ॥ ४४० ॥ मग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें । जन्ममृत्यूचीं निमोळें । निस्तरे रानें ॥ ४१ ॥ ते वेळीं आत्मानंदें आघवें । जें सदा वसतें बरवें । तें तैसेंचि पाटण पावे । गुरुकृपेचें ॥ ४२ ॥ तेथ प्रियांची[20] परमसीमा । तो भेटे माउली आत्मा । तंये[21] खेवीं आटे डिडिमा[22] । सांसारिक हे ॥ ४३ ॥ ऐसा जो कामक्रोधलोभां । झाडी[23] करूनि ठाके उभा । तोचि येवढिया लाभा । गोसावी होय ॥ ४४ ॥

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥**

ना हें नावडोनि कांहीं । कामादिकांच्याचि ठायीं । दाटिली[24] जेणें डोई । आत्मचोरें

---

१ दाखविण्यास. २ वाटाडे. ३ घालावया. ४ बलाढ्य. ५ परोक्षत्वें. ६ सोपे. ७ दरवाजा. ८ तीन खिळे मारलेला. ९ अनुकूळ. १० कल्याणाची. ११ स्वतः विषयींचें प्रेम. १२ मार्ग. १३ सामर्थ्य. १४ पुसून टाक. १५ चाहाडी, चोरी व शिंदळकी यांनीं. १६ त्रिविध ताप. १७ खचरट. १८ उळंघी. १९ नगर. २० आवडत्याची. २१ त्या क्षणीं. २२ गलबल. २३ झाडा. २४ घातली.

॥ ४५ ॥ जो जगीं समान सकृप । हिताहित दाविता दीप । तो अमान्य केला बाप । वेद जेणें ॥ ४६ ॥ न धरीचि विधीची भीड । न करीचि आपली चाड । वाढवीत गेला कोड । इंद्रियांचें ॥ ४७ ॥ कामक्रोधलोभांची कास । न सोडीच पाळिली भोष । स्वैराचाराचें अँसोस । वळेघला रान ॥ ४८ ॥ तो सुटकेच्चिया वाहिणीं । मग पिवों न लाहे पाणी । स्वर्गींही ते सुखकाहाणी । दूरीचि तया ॥ ४९ ॥ आणि परत्र तंव जाये । हें क्रीर तया आहे । परी ऐहिकहीं न लाहे । भोग भोगूं ॥ ४५० ॥ तरि माशालागीं भुलला । ब्राह्मण पाँणबुडा रिघाला । कीं तेथही पावला । नास्तिकवाद ॥ ५१ ॥ तैसें विषयांचेनि कोडें । जेणें परत्रा केलें उर्बडें । तंव तोचि आणिकीकडे । मरणें नेला ॥ ५२ ॥ एवं परत्र ना स्वर्ग । ना ऐहिकहीं विषयभोग । तेथ केउता प्रसंग । मोक्षाचा तो ॥ ५३ ॥ म्हणौनि कामाचेनि बळें । जो विषय सेऊं पाहे सळें । तया विषय ना स्वर्ग मिळे । ना उद्धरे तो ॥ ५४ ॥

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

याकारणें पैं बापा । जया आर्थी आपली कृपा । तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ॥ ५५ ॥ पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता । अनायासें आत्महिता । भेटेचि ते ॥ ५६ ॥ ना तरी श्रीगुरुवचना । दिठी देतु जतना । शिष्य आत्मभुवना- । माजि पैसे ॥ ५७ ॥ हें असो आपुला ठेवा । हाता आर्थी जरी यावा । तरी आदरें जैवि दिवा । पुढां कीजे ॥ ५८ ॥ तैसा अशेषांही पुरुषार्थां । जो गोसांवी हो म्हणे पार्था । तेणें श्रुतिस्मृती माथां । बैसणें घोंपे ॥ ५९ ॥ शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें । जें घेववी तें न म्हणावें । विषही विरु ॥ ४६० ॥ ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा । तरि कें आहे अनिष्टा । भेटणें गा ॥ ६१ ॥ पैं अहितापासूनि काढिती । हित देउनी वाढविती । नाहीं श्रुतीपरौती । माउली जगा ॥ ६२ ॥ म्हणौनि ब्रह्मेसीं मेळवी । तंव हे कोण्हे न सांडावी । अगा तुवांही ऐसी भजावी । विशेषेंसीं ॥ ६३ ॥ जे आजि अर्जुना तूं येथें । करावया सत्य शास्त्रें साथें । जन्मलासि बळार्थें । धर्माचेनि ॥ ६४ ॥ आणि धर्मानुज हें ऐसें । ओघेंचि आलें अपैसें । म्हणौनि अनारिसें । करूं नये ॥ ६५ ॥

---

१ आत्मप्राप्तीची इच्छा. २ शपथ. ३ स्वेच्छा आचरणाचें. ४ अतिशयेंकरून. ५ लंपट झाला, वेंघला. ६ मार्गांत. ७ कोळ्याच्या जातींत. ८ उपडें. ९ कसचा. १० बळानें. ११ अवज्ञा. १२ पावे. १३ घालावें. १४ विरुद्ध. १५ यथार्थ. १६ धर्माचें बळ तुझ्याठायीं आहे. १७ अन्यथा.

कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पोरखीं । अकृत्य तें कुडें लोकीं । वोळावें गा ॥ ६६ ॥ मग कृत्यपणें खरें निगे । तें तुवां आपलेनि आंगें । आचरोनि आदरें चांगें । सारावें गा ॥ ६७ ॥ जे विश्वप्रामाण्याची मुद्री । आजि तुझ्या हातीं असे सुबुद्धी । लोकसंग्रहासि त्रिशुद्धी । योग्य होसी ॥ ६८ ॥ एवं आसुरवर्ग आघवा । सांगोनि तेथिंचा निर्गावा । तोही देवें पांडवा । निरूपिला ॥ ६९ ॥ इयावरी तो पंडूचा । कुमर सद्भाव जीवींचा । पुसेल तो चैतन्याचा । कानीं ऐका ॥ ४७० ॥ संजयें व्यासाचिया निरोपा । तो वेळ्ळॅ फेडिला तया नृपा । तैसा मीही निवृत्तिकृपा । सांगेन तुह्मां ॥ ७१ ॥ तुह्मी संत माझिया कडा । दिठीचा कराल बुहुडा । तरि तुह्मां माने येवढा । होईन मी ॥ ७२ ॥ ह्मणोनि निज अवधान । मज वोळगे पसायदान । दीजो जी सनाथ होईन । ज्ञानदेव ह्मणे ॥ ४७३ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

श्लोक २४, ओव्या ४७३.

---

## अध्याय १७ वा.

विश्वविकासित मुद्रा । जया सोडवी तुझी योगनिद्रा । तया नमोजी गणेंद्रा । श्रीगुरुराया ॥ १ ॥ त्रिगुण त्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गीं आडिला । तो आत्मशंभूनें सोडविला । तुझिया स्मृती ॥ २ ॥ ह्मणोनि शिवेंसा कांटाळा । गुरुत्वें तूंचि आगळा । तऱ्ही हळु मायाजळा । माजि तारुनि ॥ ३ ॥ जे तुझ्याविखीं मूढ । तयांलागीं तूं वक्रतुंड । ज्ञानियांसि तरी अखंड । उजूचि आहासी ॥४॥ दैविकी दिठी पाहतां सानी । तऱ्ही मीलनोन्मीलनीं । उत्पत्ति प्रळय दोन्ही । लीलाचि करिसी ॥ ५ ॥ प्रवृत्तिकर्णाच्या चोळी । उठिलीं मदगंधानिळीं । पूजीजसी नीळोत्पळीं । जीवभृंगांच्या ॥ ६ ॥ पाठीं

---

१ ओळख. २ त्यागावें. ३ जगास प्रमाण ठेवण्यायोग्य असा शिक्का. ४ निघण्याचा प्रकार. ५ जीवात्म्याचा. ६ वेळ घालविला. ७ वर्षाव. ८ मनाचें. ९ आश्रितास. १० प्रसाद. ११ जगरूप प्रफुल्लित मायेची आकृति. १२ योगरूप अवस्था, ध्यान. १३ तारकासुराच्या तीन पुत्रांना चतुर्मुख प्रसन्न होऊन अंतरिक्षांत त्रिपुरें बांधून दिलीं होतीं. त्या तिघांनीं सर्व त्रिभुवन त्रासवून टाकिलें होतें, देव व ऋषि विष्णूस शरण गेले व त्या सर्वांनीं शिवाचें स्मरण करून त्या त्रिपुरांच्या त्रासापासून त्रैलोक्य मुक्त करविलें. त्याप्रमाणें त्रिगुणांनीं त्रासलेला जीवात्मा सद्गुरुस्मरणेंकरून शिवानें ( आत्मशंभुनें ) सोडविला. ( शिवलीमृत अ० १३ पहा ह्मणजे हें रूपक ध्यानांत येईल). १४ किल्ल्यांत. १५ शिवाबरोबर. १६ अधिक. १७ तिरस्कार करणारा. १८ दैवीदृष्टि. १९ लहान. २० उघडणें व झांकणें यांत. २१ संसारिक वृत्तीच्या. २२ हालविण्यानें. २३ वायूनें. २४ जीव हेच भ्रमर त्यांनीं युक्त नीलकमलांनीं पूजिला जातोस. २५ नंतर.

निवृत्तिकर्णताळें । ओहालली[1] ते पूजा विधुळे । तेव्हां मिरविसी मोकळें । आंगाचें लेणें ॥ ७ ॥ वामांगीचा लास्यविलास । जो हा जगद्रूप आभास । तो तांडवमिसें कैळास । हाविसी तूं ॥ ८ ॥ हें असो विस्मय दातारा । तूं होसी जयाचा सोयरा । सोइरिकेचिया व्यवहारा । मुक्तेचि तो ॥ ९ ॥ फेडितां बंधनाचा ठावो । तूं जगद्बंधू ऐसा भावो । धरूं वोळगे उवाँवो । तुझाचि आंगीं ॥ १० ॥ तुजयाचेनि नांवें तया । देहही नुरेचि पैं देवराया । जेणें तूं आपणपयां । केलासि तुजा ॥ ११ ॥ तूतें करूनि पुढें । जे उपायीं घेती दवंडे । तया ठोसी बहुवें पीडें । मार्गीचि तूं ॥ १२ ॥ जो ध्यानें [12]सूये मानसीं । तया लागीं नाहीं तूं त्याचे देशीं । ध्यानही विसरे तेणेंसीं । वोलंभ तुज ॥ १३ ॥ तूतें सिद्धचि जो नेणे । तो नांदे सर्वज्ञपणें । वेदांही येवढें बोलणें । नेघसी कानीं ॥ १४ ॥ मौन गा तुझें राशिनांव । आतां स्तोत्रीं कें बांधों हांव । दिसती तेतुली माव । भजों काई ॥ १५ ॥ दैविकें[14] सेवक हों पाहों । तरि भेदितां द्रोहचि लाहों । ह्मणोनि आतां कांहीं नोहों । तुजलागीं जी ॥ १६ ॥ जैं सर्वथा सर्वही नोहिजे । तैं अद्वया तूतें लाहिजे । हें जाणें मी वर्म तुझें । आराध्यलिंगा ॥ १७ ॥ तरि तुरोनि वेगळेपण । रैसीं भजिनलें लवण । तैसें नमन माझें जाण । बहु काय बोलों ॥ १८ ॥ आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उच्चंबळत भरोनि निगे । कां दैशीं दीपसंगें । दीपचि होय ॥ १९ ॥ तैसा तुझिया प्रेणतीं । मी पूर्ण जालों श्रीनिवृत्ती । आतां आणीन व्यक्ती । गीतार्थ तो ॥ २० ॥ तरि षोडशाध्यायशेखीं । लिये समाप्तीच्या श्लोकीं । जो ऐसा निर्णयो [20]निष्टंकीं । ठेविला देवें ॥ २१ ॥ जे कृत्याकृत्यव्यवस्था । अनुष्ठावया पार्था । शास्त्रचि एक सर्वथा । प्रमाण तुज ॥२२॥ तेथ अर्जुन मानसें । ह्मणे हें ऐसें कैसें । जे शास्त्रेंवीण नसे । सुटिका कर्मा ॥२३॥ तरी तक्षकाची फडे । ठाकोनि कैं तो मणि काढे । कैं नाकींचा केश जोडे । सिंहाचिये ॥ २४ ॥ मग तेणें तो वोविजे । तरीच लेणें पाविजे । येऱ्हवीं काय असिजे । रिक्तकंठीं ॥ २५ ॥ तैसी शास्त्रांची मोकळी । [23]यां कैं कोण वेटाळी । एकवाक्यतेच्या फळीं । पैसिजे[24] कैं ॥ २६ ॥ जालयाही एकवाक्यता । के लाभे वेळ अनुष्टितां । कैंचा पैसार जीविता । येतुलालिया ॥ २७ ॥ आणि शास्त्रें अर्थें देशें काळें । या चहूंही जें एकफळें । तो उपावो कें मिळे । आघवयांसी ॥ २८ ॥ ह्मणोनि शास्त्राचें घडतें । नाहे प्रकारें बहुतें । तरि मूर्खा मुमुक्षां येथें । काय गती पां ॥ २९ ॥ हा पुसावया अभिप्राव । जो अर्जुन

---

१ अंतर्मुख वृत्ति. २ हालली असतां. ३ नाश पावे. ४ नृत्य क्रीडा. ५ चातुर्य. ६ राहे. ७ प्रसर. ८ निराळा. ९ धांवे. १० राहसी. ११ सर्व प्रकारें. १२ घाली. १३ आवडी. १४ तूं देव अशा नात्यानें. १५ हे आराध्यमुर्ते. १६ उदकानें. १७ वात. १८ नमस्कारेंकरून. १९ स्पष्ट करीन. २० सिद्धांतीं. २१ सर्पाची. २२ अनेकत्व. २३ शास्त्रांला. २४ मार्ग सांपडे. २५ वेळ आयुष्य. २६ एकत्र होतें. २७ सर्वांला. २८ साधन.

करी प्रस्ताव । तो सतसाविया ठाव । अध्याया येथ ॥ ३० ॥ तरि सर्वविषयीं वितृष्ण । जो सकळकळीं प्रवीण । कृष्णाही नवल कृष्ण । अर्जुनत्वें जो ॥ ३१ ॥ शौर्या जोडला आधार । जो सोमवंशाचा शृंगार । सुखादि उपकार । जयाचीलीळा ॥३२॥ जो प्रज्ञेचा प्रियोत्तम । ब्रह्मविद्येचा विश्राम । सहचर मनोधर्म । देवाचा जो ॥ ३३ ॥

अर्जुन उवाच—**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः ।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥**

तो अर्जुन ह्मणे गा तमालश्यामा । इंद्रियां फाँवलिया ब्रह्मा । तुझा बोल आह्मा । साकांक्ष पैं जी ॥ ३४ ॥ जें शास्त्रेंवांचूनि आणिकें । प्राणियां स्वमोक्ष न देखे । ऐसें का कैं पखें । बोलिलासी ॥ ३५॥ तरि न मिळेचि तो देश । नव्हेचि काळा अवकाश । जो करवी शास्त्राभ्यास । तोही दुरी ॥ ३६ ॥ आणि अभ्यासीं विरजियां । होती जिया सामग्रिया । त्याही नाहीं आपैतियां । तिये वेळीं ॥ ३७ ॥ उजू नोहेचि प्राचीन । नेदीचि प्रज्ञा संवाहन । ऐसें ठेलें अपादन । शास्त्राचें जया ॥ ३८ ॥ किंबहुना शास्त्राविखीं । येकही न लाहातीचि नखीं । ह्मणुनि उंखिविखी । सांडिली जिहीं ॥ ३९ ॥ परि निर्धारूनि शास्त्रें । अर्थानुष्ठानें पवित्रें । नांदताति परत्रें । साचारें जे ॥ ४० ॥ तयां ऐसें आह्मी होआवें । ऐसी चाड बांधोनि जीवें । घेती तयांचे मागावे । आचरावया ॥ ४१ ॥ धडयाचिया आखरा । तळीं बाळ लिहे हातारा । कां पुढांसूनि पंडिकरा । अक्षम चाले ॥ ४२ ॥ तैसें सर्वशास्त्रनिपुण । तयाचें जें आचरण । तेंचि करिती प्रमाण । आपलिये श्रद्धे ॥ ४३ ॥ मग शिवादिकें पूजनें । भूम्यादिकें महादानें । अग्निहोत्रादि यजनें । करिती जे श्रद्धा ॥ ४४ ॥ तयां सत्वरजतमां- । माजि कोण पुरुषोत्तमा । गति होय ते आह्मां । सांगिजो जी ॥ ४५ ॥ तंव वैकुंठपीठिचें लिंग । जो निगमपद्माचा पराग । जियें जयाचेनि हें जग । अंगच्छाया ॥ ४६ ॥ काळ सावियाचि वाढ । लोकोत्तर प्रौढ । अद्वितीय गूढ । आनंदघन ॥४७॥ इयें श्लाघीजती जेणें बिकें । तें जयाचे आंगीं असिकें । तो श्रीकृष्ण स्वमुखें । बोलत असे ॥ ४८ ॥

श्रीभगवानुवाच—**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।**
**सात्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥**

---

१ निरिच्छ. २ काळा नसतां. ३ बुद्धीचा. ४ आवडता. ५ समागमें असणारा. ६ हें तमालपत्राप्रमाणें नीलवर्ण कृष्णा. ७ प्राप्त होण्यासारखा असतां. ८ संशययुक्त. ९ कोणच्या पक्षानें. १० गुरु. ११ सहाय. १२ स्वाधीन. १३ अनुकूळ. १४ पूर्वकर्म. १५ बुद्धि. १६ सहाय. १७ संपादन. १८ युक्ति. १९ विचार, वादविवाद. २० परलोकीं. २१ मार्ग. २२ पुढें करून. २३ डोळस. २४ अंधळा. २५ यज्ञ. २६ वांचे. २७ सांवलीनें. २८ अलौकिक. २९ शक्तीनें. ३० असे.

ह्मणे पार्था तुझा अतिसो । घेईं गा आह्मीं जाणतसों । शास्त्राभ्यासाचा आडसो । मानितोसि कीं ॥ ४९ ॥ नुसधियाचि श्रद्धा । ह्मोंबों पाहसी परमपदा । तरि तैसें हें प्रबुद्धा । सोहोपें नोहे ॥५०॥ श्रद्धा ह्मणीतलियासाठीं । पांतिजों नयें किरीटी । काय द्विज अंत्यजघृष्टीं । अंत्यज नोहे ॥ ५१ ॥ गंगोदक जरी जालें । तरि मद्यभांडा आलें । तें वेऊं नये कांहीं केलें । विचारीं पां ॥ ५२ ॥ चंदन होय शीतळु । परि अग्नीसी पावे मेळु । तैं हातीं धरितां जाळूं । न शके काई ॥ ५३ ॥ कां किंडाचिये आटतिये पुटीं । पडिलें सोळें किरीटी । घेतलें चोखटांसाठीं । नागवीना ॥ ५४ ॥ तैसें श्रद्धेचें दैळवाडें । आंगें कीर चोखडें । परि प्राणियाच्या पडे । विभागीं जैं ॥ ५५ ॥ तैं प्राणिये तंव स्वभावें । अनादिमाया प्रभावें । त्रिगुणाचेंचि आघवे । वळिले आहाती ॥ ५६ ॥ तेथही दोन गुण खांचेती । मग एक धरी उंन्नती । तैं तैसियाचि होती वृत्ती । जीवांचिया ॥ ५७ ॥ वृत्ती ऐसें मन धरिती । मना ऐसी क्रिया करिती । केलिया ऐसीं वरिती । मरोनि देहें ॥ ५८ ॥ बीज मोडे झाड होये । झाड मोडे बीजीं सामाये । ऐसेनि कल्पकोडी जाये । परी जाति न नाशे ॥ ५९ ॥ तियापरि यियें अपारें । होत जात जन्मांतरें । त्रिगुणत्व न व्यभिचरे । प्राणियांचें ॥ ६० ॥ ह्मणुनि प्राणियांच्यैंपैकीं । पैडिली श्रद्धा अवलोकीं । ते होय गुणांसारिखी । तिहीं यथा ॥ ६१ ॥ विपर्यें वाढे सत्व शुद्ध । तेव्हां ज्ञानासी करी साध्य । परि एका दोघे वोखैंद । येर आहाती ॥ ६२ ॥ सत्वाचेनि आंगलैंगें । ते श्रद्धा मोक्षफळा रिगे । तंव रज तम उगे । कां पां राहाती ॥ ६३ ॥ मोडोनि सत्वाची ऱ्हांये । रजोगुण आकाशें जाये । तेव्हां तेचि श्रद्धा होये । कैर्मकेरसुणी ॥ ६४ ॥ मग तमाची उठी आगी । तेव्हां तेचि श्रद्धा भंगी । होंलागे भोगालागीं । भलतेया ॥ ६५ ॥

सत्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥

एवं सत्वरजतमा- । वेगळी श्रद्धा सुंवर्मा । नाहीं गा जीवग्रामा- । माजी यया ॥ ६६ ॥ ह्मणोनि श्रद्धा स्वाभाविक । असे पैं त्रिगुणात्मक । रजतमसात्विक । भेदीं इहीं ॥ ६७ ॥ जैसें जीवनचि उदक । परि विषीं होय मारक । कां मिरयामाजि तीखें । ऊंसीं गोड ॥ ६८ ॥ तैसा बहुवसें तमें । जो सराचि होयें निमे । तेथ श्रद्धा परिणमे । तेचि होउनी ॥ ६९ ॥ मग काजळा आणि मसी । न दिसे विवंचना जैसी । तेवीं श्रद्धा तामसी ।

---

१ कल, हट्ट. २ प्रतिबंध. ३ विश्वासूं नये. ४ अंत्यजाच्या समागमें. ५ हिणकटाच्या. ६ ह्मणून. ७ बुडविणार नाहीं काय. ८ स्वरूप. ९ दबती. १० जोर. ११ धारण करिती. १२ नाश पावे. १३ मध्यें. १४ प्राप्त झाली. १५ कदाचित्. १६ विरुद्ध. १७ साह्यानें. १८ आश्रय. १९ कर्म करणारी. २० सुज्ञा. २१ जीवसमूहांत. २२ तिखट. २३ जन्मतो व मरतो.

सिनी[1] नाहीं ॥ ७० ॥ तैसीच राजसी जीवीं । रजोमय जाणावी । सात्विकी आघवी । सत्वाचीच ॥ ७१ ॥ ऐसेनि हा सकळ । जगडंबर[2] निखिळ । श्रद्धेचाचि केवळ । वोतला असे ॥ ७२ ॥ परि गुणत्रयवशें । त्रिविधपणाचें लासें[3] । श्रद्धे जें उठिलें असे । तें वोळख तूं ॥ ७३ ॥ तरि जाणिजे झाड फुलें । कां मानस जाणिजे बोलें । भोगें जाणिजे केलें । पूर्वजन्मींचें ॥ ७४ ॥ तैसीं जिंहीं[4] जिहीं चिन्हीं । श्रद्धेचीं रूपें तिन्हीं । देखीजती ते वानी[5] । अवधारी पां ॥ ७५ ॥

यजंते सात्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।
प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥ ४ ॥

तरि सात्विक श्रद्धा । जयांचा होय बांधा[6] । तयां बहुत करूनि मेधा[7] । स्वर्गीं आथी ॥ ७६ ॥ ते विद्याजात[8] पढती । यज्ञक्रिये निवडती । किंबहुना पडती । देवलोकीं ॥७७॥ आणि श्रद्धा राजसा । घडले जे वीरेशा । ते भजती राक्षसां । खेचरां[9] हन ॥ ७८ ॥ श्रद्धा जे कां तामसी । ते मी सांगेन तुजपाशीं । जे केवळ पापराशी । अतिकर्कशी निर्दयत्वें ॥ ७९ ॥ जीववधें साधूनि बळी । भूतप्रेतकुळें मेळीं । स्मशानीं संध्याकाळीं । पूजिती जे ॥ ८० ॥ ते तमोगुणाचें सार । काढूनि निर्मिले नर । जाण तामसियेचें घर । श्रद्धेचें तें ॥ ८१ ॥ ऐसीं इहीं तिहीं लिंगीं । त्रिविध श्रद्धा जगीं । पैं हें ययालागीं । सांगत असें ॥ ८२ ॥ जे हे सात्विक श्रद्धा । जतन धरावी प्रबुद्धा । येरी दोनी विरुद्धा । सांडाविया ॥ ८३ ॥ हे सात्विकमति जया । [10]निर्वाहति होय धनंजया । बागुल नोहे तया । कैवल्य तें ॥ ८४ ॥ तो न पढो कां ब्रह्मसूत्र । न [11]लोढो सर्व शास्त्र । सिद्धांत न होत स्वतंत्र । तयाच्या हातीं ॥ ८५ ॥ परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊन मूर्त[12] । अनुष्टानें गाजत । वडील जे हे ॥ ८६ ॥ तयांचीं आचार तीं पाउलें । पाऊनि सात्विकी श्रद्धा चाले । तो तेंचि फळ ठेविलें । ऐसें लाहे[13] ॥ ८७ ॥ पैं एक दीप लावी सायासें । आणिक तेथें लाऊं बैसे । तरि तो काय प्रकाशें । वंचिजे[14] गा ॥ ८८ ॥ कां येकें मोल अपार । वेंचोनि केलें धवळार[15] । तो सुरवाड[16] वस्तीकर । न भोगी काई ॥ ८९ ॥ हें असो जो तळें करी । तें तयाचीच तृषा हरी । कीं सुआरासीचि[17] अन्न घरीं । येरां नोहे ॥ ९० ॥ बहुत काय बोलों पैं गा । येका गौतमासीच गंगा । येरां समस्तां काय जगा । वोहाळ[18] जाली ॥ ९१ ॥ म्हणौनि आपलीया[19] परी । शास्त्र अनुष्टिती कुसरी[20] । जाणें तयातें श्रद्धाळु जो वेरी[21] । तो मूर्खही तरे ॥ ९२ ॥

---

१ वेगळी. २ सर्व जग. ३ चिन्ह. ४ ज्या ज्या. ५ वर्णन करतो. ६ देहाकृति. ७ बुद्धि. ८ सकळ विद्या. ९ पिशाचांला. १० संरक्षण. ११ पढो. १२ प्रकट. १३ प्राप्त होई. १४ फसविला काय. १५ घर. १६ सुखकर. १७ स्वयंपाक्यास. १८ ओढा. १९ आपल्यापेक्षां. २० दक्षतेनें. २१ आचरी.

**अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः ।**
**दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥**

ना शास्त्राचेनि कीर नांवें । [1]स्वीकरोंही नेणती जीवें । परि शास्त्रज्ञांही शिवें[2] । टेंकों नेदिती ॥ ९३ ॥ वडिलांचिया क्रिया । देखोनि वातां[3] वांकुलिया । पंडितां [4]डांकुलिया । वाजविती ॥ ९४ ॥ आपलेनीचि आटोपें[5] । धनित्वाचेनि दर्पें । साच्चाचि पाखंडाचीं तपें । आदरिती ॥ ९५ ॥ आपुलिया पुढिलांचिया । आंगीं घालूनि [6]कातिया । रक्तमांसाम्रणी[7]- तया । भरभरां ॥ ९६ ॥ [8]रिचविती जळतकुंडीं । लाविती चेडयाच्यां तोंडीं । नवसिया देती उंडी । बाळकाचीं ॥ ९७ ॥ अभ्रहाचिया दुर्जरियां । क्षुद्रदेवतां[11] बरियीं । अन्नत्यागें [12]सोतरिया । ठाकती येक ॥ ९८ ॥ अगा आत्मपरपीडा । बीज तमक्षेत्रीं सुहाडा[13] । पेरिती मग पुढां । तेंचि पिके ॥ ९९ ॥ बाहू नाहीं आपलिया । आणि नावेतेंही धनंजया । न धरी होय तया । समुद्रीं जैसें ॥ १०० ॥ कां वैद्यातें करी सैंळा[14] । रसें सांडी पंथ्यखाळा[15] । तो रोगिया जेवि विव्हळा[16] । सेवता होय ॥ १ ॥ ना ना पडिकाराचेनि[17] संळें[18] । काढी आपलेचि डोळे । तें वानवेसां[19] आंधळें । जैसें ठाके ॥ २ ॥ तैसें तया असुरां होये । जे निंदूनि शास्त्रांची [22]सोये । सैंघें[23] धांवताती मोहें । आडवी जे कां ॥ ३ ॥ काम करवी ते करिती । क्रोध मारवी तें मारिती । किंबहुना मातें पुरिती । दुःखाच्या गुंडीं[24] ॥ ४ ॥

**कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।**
**मां चैवांतःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥**

आपलां परावां देहीं । दुःख देती जें जें कांहीं । मज आत्मया तेतुलाही । होय सीण ॥ ५ ॥ पैं वाचेंनिही पाळवें । पापियां तया नोतळावें[25] । परि पडिलें सांगावें । त्यजावया ॥ ६ ॥ प्रेत बाहिर घालिजे । कां अंत्यज संभाषणीं त्यजिजे । हें असो हातें क्षाळिजे । [26]कश्मळातें ॥ ७ ॥ येथ शुद्धीचिया आशा । तो लपु न मनेव[27] जैसा । तयातें सांडावया तैसा । [28]अनुवाद हा ॥ ८ ॥ तरि अर्जुना तूं तयांतें । देखसी तें स्मर हो मातें । जें आन प्रायश्चित येथें । [29]मानेल ना ॥ ९ ॥ म्हणौनि श्रद्धा जे सात्विकी । पुढतीं तेचि पैं अवकीं । जतन करावी निकी । सर्वोपरी ॥ ११० ॥ तरि धरावा तैसा संग । जेणें पोखे सात्विक लाग । सत्ववृद्धीचा भाग । आहार घेपे ॥११॥ येऱ्हवीं तरी पाहीं । स्वभाववृद्धीच्या ठाईं ।

---

१ आरंभ करूं. २ हद्दीवर. ३ वेडावून दाखवितात. ४ फुटक्या. ५ व्यापानें. ६ कोयता. ७ यज्ञ-पात्रें. ८ घालितात. ९ चेटुकाच्या. १० आढ्यतेनें, उत्कर्षानें. ११ इतर लहान देवतांपासून वर प्राप्तीकरितां. १२ सात दिवसपर्यंत, एकवीस दिवसपर्यंत. १३ मुळा. १४ द्वेष. १५ काढा. १६ लाथेनें. १७ व्याकुळ. १८ स्वतः. १९ डोळसाच्या. २० स्पर्धेनें. २१ मूर्खाला. २२ मार्ग. २३ अनिवार. २४ दगडांत. २५ न स्पर्शावें. २६ पातकातें. २७ मानवे. २८ बोलणें. २९ योग्य नाहीं.

आहारावांचूनि नाहीं । बळी हेतु ॥ १२ ॥ प्रत्यक्ष पाहें पां वीरा । जो सावध घे मदिरा । तो होऊनि ठाके मैाजिरा[1] । तियेंचि क्षणीं ॥ १३ ॥ कां जो सावियां[2] अन्नरस सेवी । तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावीं । काय ज्वर जालिया निववी । पैंयादिक ॥ १४ ॥ ना तरि अमृत जयापरी । घेतलिया मरण वारी । कां आपुलिया ऐसें करी । जैसें विष ॥ १५ ॥ तेवि जैसा घेपे[4] आहार । धातु तैसाचि होय अकार । आणि धातुऐसा अंतर । भाव [6]पोखे ॥ १६ ॥ जैसें भांडियांचेनि तापें । आंतुलें उदकही तापे । तैसी धातुवशें आटोपे । चित्तवृत्ती ॥ १७ ॥ ह्मणोनि सात्विक रस सेविजे । तैं सत्वाची वाढि पाविजे । राजसा तामसा होइजे । येरीं रसीं ॥ १८ ॥ तरी सात्विक कोण आहार । राजसतामसा कायि आकार । हें सांगों करीं आदर । आकर्णनीं ॥ १९ ॥

## आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।
## यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥

आणि एकसरें आहारा । कैसेनि तिन्ही मोहरा । जालिया तेंही वीरा । रोकडें दाऊं ॥ १२० ॥ तरि जेवणासाचिया रुची । निर्ष्पत्ति कीं बोनियांची[11] । आणि जेविता तंव गुणाची । दासी येथ ॥ २१ ॥ जो जीव कर्ता भोक्ता । तो गुणास्तव स्वभावता । पावोनियां त्रिविधता । चेष्टे[12] त्रिधा ॥ २२ ॥ ह्मणौनि त्रिविध आहार । यज्ञही त्रिप्रकार । तप दान हन व्यापार । त्रिविधचि ते ॥ २३ ॥ पैं आहारलक्षण पहिलें । सांगों जें ह्मणीतलें । तें आईक गा भलें । रूप करूं ॥ २४ ॥

## आयुः सत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
## रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहारा सात्विकप्रियाः ॥ ८ ॥

तरी सत्वगुणाकडे । जैं दैवें भोक्ता पडे । तैं मधुरीं रसीं वाढे । मेचु तया ॥ २५ ॥ आंगेंचि द्रव्यें सुरसें । जे आंगेंचि [illegible] गोडसे । आंगेंचि स्नेहें बहुवसें । सुपक्कें जियें ॥ २६ ॥ आकारें नव्हती डेंगळें । [illegible]ाति निर्बळें । जिभेलागीं स्नेहाळें । स्वादें जियें ॥ २७ ॥ रसें गौडीं वरी [16]ढिलीं [illegible]ीं आथिलीं । ठायें ठाव सांडिलीं । अग्नितापें ॥ २८ ॥ आंगें सानें परिणामें थे[illegible] गुरुमुखींचें अक्षर । तैसा अल्पीं जिहीं अपार । तृप्ति राहे ॥ २९ ॥ आणि मुखीं [illegible]डें । तैसी चिहि ते आंतुलेकडे । तिये अन्नीं प्रीति वाढे । सात्विकांसी ॥ १३[illegible] लक्षण । सात्विक भोज्य जाण । आयुष्याचें

१ उन्मत्त. २ नेहमींचा. ३ दूध [illegible]वा. ५ अंतर्गत. ६ पोसे. ७ श्रवणीं. ८ एकदम. ९ तीन प्रकार झालें. १० उत्पत्ती [illegible] करणें. ११ अन्नाची. १२ वागे. १३ आवड. १४ स्वतः. १५ मोठे. १६ मऊ. [illegible] वास्तविक.

प्राण । नीच नवें हें ॥ ३१ ॥ येणें सात्त्विकरसें । जंव देही [1]मेहो वरिसे । तंव आयुष्य-नदी उससे । [2]देहाचि देहा ॥ ३२ ॥ सत्वाचिये कीर [3]पाळती । कारण [4]हाचि सुमती । दिवसाचिये उन्नती । भानु जैसा ॥३३॥ आणि शरीरा हन मानसा । बळाचा पैं [5]कुवासा । हा आहार तरी दशा । कैंची रोगां ॥ ३४ ॥ हा सात्विक होय भोग्य । तेंचि भोगावया आरोग्य । शरीरासी भाग्य । उदयलें जाणों ॥ ३५ ॥ आणि सुखाचें घेणें देणें । निकें [6]उंवाया ये येणें । हें असो वाढे [7]सौजणें । आनंदेंसी ॥ ३६ ॥ ऐसा सात्विक आहार । [8]परिणमला थोर । करी हा उपकार । सबाह्यासी ॥ ३७ ॥ आतां राजसासि प्रीती । जिहीं रसीं आथी । करूं तयाही व्यक्ती । प्रसंगें गा ॥ ३८ ॥

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

तरी मारें उणें काळकूट । तेणें मानें जें कडुवट । का चुनियाहूनि [11]दाहक । आम्ल हन ॥ ३९ ॥ कणिकीतें जैसें पाणी । तैसें मीठ [12]बांधैया आणी । तेतुलीच मेळवणी । रसांत-रांची ॥ १४० ॥ ऐसें खारट [13]अपाडें । राजसा तया आवडे । उन्हाचेनि मिषें तोंडें । आगीचि गिळी ॥ ४१ ॥ वाफेचिया [14]सिगे । वातीही लाविल्या लागे । तैसें उन्ह मागे । राजस तो ॥ ४२ ॥ वावदळ पाडूनि ठाये । सांबळ डोहारला आहे । तैसें [18]तीखें तो खाये । जें घायेविण रुपे ॥ ४३ ॥ आणि राखेहूनि कोरडें । आंत बाहेरी येकें पाडें । तो जिव्हा-दंश आवडे । बहु तया ॥ ४४ ॥ परस्परें दांतां । आदळ होय खातां । तो गा मुखीं घेतां । तोषों लागे ॥ ४५ ॥ आधींच द्रव्यें चुरमुरीं । वरी [21]परवडिजती [22]मोहरीं । जियें घेतां होती [23]धुंवारी । नाक तोंडा ॥ ४६ ॥ हें असो उगें आगीतें । म्हणें तैसें [24]रांधितें । [25]पढियें प्राणापरतें । राजसासि गा ॥ ४७ ॥ ऐसा न पुरोनि तोंडा । जिभा केला वेडा । अन्नमिषें आग्नि भडभडां । पोटीं भरी ॥ ४८ ॥ तैसाचि [26]लैंघा सुटे । मग भुईं ना सेजे [27]लोटे । पाणियाचें न सुटे । तोंडोनि पात्र ॥ ४९ ॥ तें आहार नव्हती घेतलें । व्याधिव्याळ [28]जे [29]सुतले । ते चेवैंवाया घातलें । [30]मीजवण पोटीं ॥ १५० ॥ तैसें एकमेकां [31]सैलें । रोग उठती एके वेळे । ऐसा राजस आहार फळे । केवळ दुःखें ॥ ५१ ॥ एवं

१ मेघ वर्षे. २ दिवसानुदिवस. ३ रक्षणार्थ. ४ आहार. ५ आश्रय. ६ आकारास. ७ मैत्री. ८ परिणाम पावला. ९ उघड. १० मारकपणानें मात्र कमी. ११ दाहक. १२ बांधावयास. १३ अतिशय. १४ अग्रावर. १५ दगड, वाऱ्याची वाहाटूळ, विजेचा आघात. १६ पाहार, शस्त्र. १७ प्रसिद्ध झाला. १८ तिखट. १९ तोंडीं लावणें. २० झणझणीत. २१ पसरतात. २२ राई. २३ वेदना. २४ वांग्याचें वगैरे भरीत. २५ प्रिय वाटे. २६ दाह. २७ लोळे. २८ सर्प. २९ निजले. ३० जागृत करण्याकरितां. ३१ कैफ. ३२ स्पर्धेनें.

राजसा आहारा । रूप केलें धनुर्धरा । परिणामाचाही विसुरा[1] । सांगीतला ॥ ५२ ॥ आतां तथा तामसा । आवडे आहार जैसा । तेंही सांगों चिळसा[2] । झणें तुह्मी ॥ ५३ ॥ तरि कुहिलें[3] उष्टें खातां । न मनिजे तेणें अनहिता । जैसें कां उपहिता[4] । ह्मैसी खाय ॥ ५४ ॥

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥

निपजलें अन्न तेसें । दुपाहरीं[5] कां येरें दिवसें[6] । अतिकरे[7] तें तामसें । घेइजतें ॥ ५५ ॥ ना तरि अर्ध उकडिलें । कां निर्पट[8] करपोनि गेलें । तैसेंही खाय चुकलें । रसा जें येवों ॥ ५६ ॥ जया कां आथि पूर्ण निष्पत्ती[9] । जेथ रस धरी व्यक्ती । तें अन्न ऐसी प्रतीती । तामसा नाहीं ॥ ५७ ॥ ऐसेनि कहीं विपायें[10] । सदन्ना[11] वरपडा[12] होये । तरी घाणी सुटे तंव राहे । व्याघ्र जैसा ॥ ५८ ॥ कां बहुवे दिवशीं वोलांडिलें । स्वादपणें सांडिलें । शुष्क अथवा सडलें । गाभिणेंही[13] हो ॥ ५९ ॥ तेंही बाळाचे हातवरी[14] । चिवडिलें जैसी रोंडी[15] करी । कां सवें बैसोनि नारी । गोतांबीळ[16] करी ॥ १६० ॥ ऐसेनि कश्मळें[17] जें खाय । तें तया सुखभोजन ऐसें होय । परि येणेंही न धाये[18] । पापिया तो ॥ ६१ ॥ मग चमत्कार देखा । निषेधाचा आंबुखा[19] । जया कां सदोषा । कुद्रव्यासी ॥ ६२ ॥ तया अपेयांच्या[20] पानीं । अखाद्यांच्या[21] भोजनीं । वाढविजे उतान्ही[22] । तामसें तेणें ॥ ६३ ॥ एवं तामस जेवणारा । ऐसैसी मेचु[23] हे वीरा । तयाचें फळ दुसरां[24] । क्षणीं नाहीं ॥ ६४ ॥ जे जेव्हांचि हें अपवित्र । शिवे तयाचें वक्त्र[25] । तेव्हांचि पापा पात्र । जाला तो कीं ॥ ६५ ॥ यावरतें जें जेवी । ते जेविती वोज[26] न ह्मणावी । पोटभरती जाणावी । यातना ते ॥ ६६ ॥ शिरच्छेदें काय होये । कां आगी रिघतां कैसें आहे । हें जाणावें काई पाहें । परि साक्षातचि असे ॥ ६७ ॥ ह्मणोनि तामसा अन्ना । परिणाम गा सिनाना[27] । न सांगोंचि अर्जुना । देव ह्मणे ॥ ६८ ॥ आतां ययावरी । आहाराचिया परी । यज्ञही अवधारीं । त्रिधा असे ॥ ६९ ॥ तरी तिहींमाजी प्रथम । सात्त्विकयज्ञाचें वर्म । आइक पां सुमहिम-[28] । शिरोमणी ॥ १७० ॥

अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥

---

१ तात्पर्य. २ किळस. ३ कुजलेलें. ४ आंबवण. ५ दोनप्रहर. ६ अदले दिवशीचे. ७ राहिलेलें. ८ निःशेष. ९ तयार झालेला. १० कदाचित्. ११ उत्तम अन्न. १२ प्राप्त. १३ फुगलेलें. १४ हातानें. १५ चिखल. १६ एका ताटांत सर्वांनीं जेवणें. १७ घाणेरेपणानें. १८ तृप्त होत नाहीं. १९ शिंतोडा. २० न पिण्याजोगें मद्य वगैरे. २१ खाण्याला अयोग्य. २२ इच्छा. २३ आवड. २४ तत्क्षणीं. २५ तोंड. २६ रीत. २७ वेगळाला. २८ उत्तम महिमेच्या.

तरि एक प्रियोत्तम । वांचोनि वाढों नेदी काम । जैसा कां मनोधर्म । पतिव्रतेचा ॥ ७१ ॥ ना ना सिंधूतें ठाकूनि गंगा । पुढारा न करीचि रिगा । कां आत्मा देखोनि उगा । वेद ठेला ॥ ७२ ॥ तैसें जे आपुल्या स्वहितीं । वेंचूनियां चित्तवृत्ती । नुरवितीचि अहंकृती । फळालागीं ॥ ७३ ॥ पातलेया झाडाचें मूळ । मागुतें सरों नेणेंचि जळ । जिरालें कां केवळ । तयाच्याचि आंगीं ॥ ७४ ॥ तैसें मनें देहीं । यजननिश्चयाच्याठाईं । हारपोनि जे कांहीं । वांछितीना ॥ ७५ ॥ तिहीं फळवांच्छात्यागीं । स्वधर्मावांचूनि विरागीं । कीजे जो यज्ञ सर्वांगीं । अळंकृत ॥ ७६ ॥ परि आरिसा आपणपें । डोळां जैसें घेपे । कां तळहातींचें दीपें । रत्न पाहिजे ॥ ७७ ॥ ना ना उदितें दिवाकरें । गेमावा मार्ग [6]दिठी भरे । तैसा वेद निर्धारें । देखोनियां ॥ ७८ ॥ तिथें कुंडें मंडप वेदी । आणीकही संभारसमृद्धि । ते मेळवणी जैसी विधी । आपणपां केली ॥ ७९ ॥ सकळावयव उचितें । लेणीं पातलीं जैसीं आंगातें । तैसे पदार्थ जेथिंचे तेथें । विनियोगुनी ॥ १८० ॥ काय वानूं बहुतीं बोलीं । जैसी सर्वाभरणीं भरली । ते यज्ञविद्याचि रूपा आली । यजनमिषें ॥ ८१ ॥ तैसा सांगोपांग । निपजे जो याग । नुठऊनियां लेंग । महत्त्वाचा ॥ ८२ ॥ प्रतिपाळ तरी पींटाचा । झाडीं कीजे तुळसीचा । परी फळा फुला छायेचा । आश्रय नाहीं ॥ ८३ ॥ किंबहुना फळाशेवीण । ऐसेया निगुती निर्माण । होय तो याग जाण । सात्विक गा ॥ ८४ ॥

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥

आतां यज्ञ कीर वीरेशा । करी पैं याचिऐसा । परि श्राद्धालागीं जैसा । [13]अवंतिला रावो ॥८५॥ जरि राजा घरासि ये । तरी बहुत उपयोगा जाये । आणि कीर्तीही होये । जगामाजी ॥ ८६ ॥ तैसा धरूनि ओंवांका । ह्मणे स्वर्ग जोडेल असिकां । दीक्षित होईन मान्य लोकां । घडेल याग ॥ ८७ ॥ ऐसी केवळ फळालागीं । महत्त्व फोकरावयीं जगीं । पार्था निष्पत्ति जे यागीं । राजस पैं ते ॥ ८८ ॥

विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

आणि पशुपक्षिविवाहीं । जोसी [17]कामापरौता नाहीं । तैसा तामसा यज्ञा पाहीं । आग्र-

१ वैराग्यपूर्वक. २ आरशानें. ३ डोळ्यानें आपलें स्वरूप जसें घेतलें जातें. ४ उगवलेल्या. ५ जाण्याचा. ६ डोळ्यापुढें येतो. ७ साहित्य. ८ स्वतः विधीनेंच. ९ व्यवस्थेनें मांडून. १० इच्छा. ११ उत्तम प्रकारचा. १२ युक्तीनें. १३ आमंत्रण देऊन आणला. १४ अवसान. १५ सर्वथैव. १६ प्रसिद्धीकरितां. १७ विषयसेवनाहून पलीकडे.

हृग्नि मूळ ॥ ८९ ॥ वाऱ्या वाट न वाहे । कीं मरण मुहूर्त पाहे । निषिद्धांसी विहे । आगी जसी ॥ १९० ॥ तरी तामसाचिया आचारा । विधीचा आथी ना वोढावारा । म्हणूनि तो धनुर्धरा । उत्सं[1]खळु ॥ ९१ ॥ नाहीं विधीची तेथ चाड[3] । नये मंत्रादिक तयाकड । अन्न जातां न सुये[4] तोंड । मासिये कीर्वि ॥ ९२ ॥ वैराचा[5] बोध ब्राह्मणा । तेथ कें रिगेल दक्षिणा । अग्नि जाला वांउधाणा[6] । वरपडा जैसा ॥ ९३ ॥ तैसें वायांचि सर्वस्व वेचे । मुख न देखतां श्रद्धेचें । नागविलें निपुत्रिकाचें । जैसें घर ॥ ९४ ॥ ऐसा जो यज्ञाभास[9] । तया नाम याग तामस । आइकें म्हणे निवास । श्रियेचा तो ॥ ९५ ॥ आतां गंगेचें एक पाणी । परि नेलें अंनानीं[10] वाहणीं । एक मळी एक आणी । शुद्धत्व जैसें ॥ ९६ ॥ तैसें तिहीं गुणीं तप । येथ जाहालें आहे त्रिरूप । तें एक केलें दे पाप । उद्धरी एक ॥ ९७ ॥ तरि तेंचि तिहीं भेदीं । कैसेनि पां म्हणौनि सुबुद्धी । जाणों पाहासी तरि आधीं । तपचि[11] जाण ॥ ९८ ॥ येथ तप म्हणिजे काई । तें स्वरूप दाऊं पाहीं । मग भेदिलें गुणीं तिहीं । तें पाठीं[12] बोलों ॥ ९९ ॥ तरि तप जें कां सम्यक । तेंही त्रिविध आइक । शारीर मानसिक । शाब्द गा ॥ २०० ॥ आतां या तिहीं माझारीं । शारीर तंव अवधारीं । तरि शंभू[13] कां श्रीहरी । पाडियंता होय ॥ १ ॥

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

तया प्रिय देवतालया । यात्रादिकें करावया । आठही पाहार जैसें पायां । उळिगें[14] घापे ॥ २ ॥ देवांगणमिरवणियां[15] । अंगोपचार[16] पुरवणियां । करावया म्हणियां[17] । शोभती हात ॥ ३ ॥ लिंग का प्रतिमा दिठी । देखत खेंवो अंगेष्टी[18] । लोटिजे कां काठी । पडली जैसी ॥ ४ ॥ आणि विधिविनयादिकीं । गुणीं वडील जे लोकीं । तयां ब्राह्मणाची निकी । पाइकी[19] कीजे ॥ ५ ॥ अथवा प्रवासें कां पीडा । कां शिणले जे सांकडा । ते जीव सुरवाडा[20] । आणीजती ॥ ६ ॥ सकळ तीर्थांचिये धुरे[21] । जिये कां मातापितरें । तयां सेवेसि कीर शरीरें । लोणें[22] कीजे ॥ ७ ॥ आणि संसारा ऐसा दारुण । जो भेटलाचि हरी शीण । तो ज्ञानदानीं सकरुण । भजिजे गुरु ॥ ८ ॥ आणि स्वधर्माचा आगिठा[23] । देह ओंड्याचिया[24] किटा । आवृत्तिपुटीं सुभटा । झाडी कीजे ॥ ९ ॥ वस्तु भूतमात्रीं नमिजे ।

---

१ धरबंद. २ अमर्याद. ३ गरज. ४ घाली. ५ ब्राह्मणाविषयीं वैरभाव. ६ वादळाला. ७ प्राप्त. ८ निपुत्रिकाच्या पश्चात् त्याचें घर कोणी तरी नागवावें तसें. ९ लबाडीचा यज्ञ. १० निरनिराळ्या मार्गांनीं. ११ आधीं तप सांगतों ऐक. १२ मग. १३ शिव किंवा विष्णु यांतून आवडेल त्याचें. १४ भोंवरा. १५ सुशोभित करण्यास. १६ गंधपुष्पादिक. १७ सेवा, पूजा. १८ साष्टांग. १९ चाकरी. २० सुखावस्थेस. २१ अग्रभागीं. २२ ओवाळून टाकावीं. २३ अग्नींत. २४ मळाच्या.

परोपकारीं भजिजे । स्त्रीविषयीं नियमिजे । नांवेंमांव ॥ २१० ॥ जन्मतेनि प्रसंगें स्त्रीदेहें शिवणें आंगें । तेथूनि जन्म आघवें । सांविलें कीजे ॥ ११ ॥ भूतमात्राचे नांवें । तृणही नोसुडावें । किंबहुना सांडावे । छेद भेद ॥ १२ ॥ ऐसैसी जैं शरीरीं । रा टीची पडे उजरी । तें शारीर तप ध्रुमरी । आलें जाण ॥ १३ ॥ पार्था समस्तही हें करणे देहाचेनि प्रधानपणें । ह्मणोनि यातें मी ह्मणे । शारीर तप ॥ १४ ॥ एवं शारीर जें त तयाचें दाविलें रूप । आतां आइक निष्पाप । वाङ्मय तें ॥ १५ ॥

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

तरि लोहाचें आंग तुकें । न तोडिनांचि कनक । केलें जैसें देख । परिसें तणें ॥ १ तैसें न दुखवितां सहजें । जीवळिया सुख निपजे । ऐसें साधुत्व का देखिजे । बोल जिये ॥ १७ ॥ पाणी मुळ झाडा जाये । तृण ते प्रसंगेंचि जिये । तैसें एका बोलिलें हो सर्वांहि हित ॥ १८ ॥ जोडे अमृताची सुरसरी । तैं प्राणांतें अमर करी । स्नानें पाप त वारी । गोडीही दे ॥ १९ ॥ तैसा अविवेकही फिटे । आपुलें अनादित्व भेटे । आइक रुचि न विटे । पीयूषा जैसी ॥ २२० ॥ जरी कोणी करी पुसणें । तरी होआवें ऐसें बोल ना तरी आवर्तणें । निगम का नाम ॥ २१ ॥ ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठीजती वाग्भुवनें केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा ॥ २२ ॥ ना तरि एकाधें नांव । तेंचि शैव का वैष्णव । व वसे तें वाग्भव । तप जाणावें ॥ २३ ॥ आतां तप जें मानासिक । तेंही सांगों आइक ह्मणे लोकनाथनायक- । नायकचि तो ॥ २४ ॥

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

तरि सरोवरतरंगीं । सांडिलें आकाश मेघीं । का चंदनाचें उरगीं । उद्यान जैसें ॥ २ नाना कळावैषम्यें चंद्र । का सांडिला आधीं नरेंद्र । ना तरि क्षीरसमुद्र । मंदरा ॥ २६ ॥ तैसीं नानाविकल्पजाळें । सांडूनि गेलिया सकळें । मन रहे का केवळ स्वरूपें जें ॥ २७ ॥ तपनेंवीण प्रकाश । जाड्येंवीण रस । पोकळीवीण अवका होय जैसा ॥ २८ ॥ तैसी आपली सोयें देखे । आणि आपलिया स्वभावा मुके । हि जैसी आंगिकें । हिवें नेदी ॥ २९ ॥ मग नच्चलतें कळंकेंवीण । शशिबिंब जैसें नि

१ जन्मकालींच मात्र स्त्रीस्पर्श. २ न आसडावें. ३ स्वच्छता. ४ भरपूर. ५ मुख्य ६ वाचिक. ७ आकार, वजन. ८ परकयास. ९ नदी. १० अमृतीं. ११ वेद. १२ वाचारूप मंदि १३ वेदशाळा. १४ वाचेपासून झालेलें. १५ सापांनीं. १६ बाग. १७ कमजास्त कलांनीं. १८ रा १९ सूर्यावांचून. २० मार्ग. २१ शरीरावयव.

परिपूर्ण । तैसें चोखी शृंगारपण । मनाचें जें ॥ २३० ॥ बुजाली वैराग्याची वोरप । जिराली मनाची धांप[2] कांप[3] । तेथ केवळ जाली वाफ[4] । निजबोधाची ॥ ३१ ॥ ह्मणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्र । तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरी ॥ ३२ ॥ तें स्वलाभ लाभलें लाभलेपणें । मन मैनपणाही[5] धरूं नेणें । शिवतलें जैसें लैवणें[6] । आपलें निँज[7] ॥ ३३ ॥ तेथ कें उठिती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव । घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे ते ॥ ३४ ॥ ह्मणौनि तिये मानसीं । भावशुद्धीचि असे आपैसी । रोमगुच्छि जैसी । तळहाताची ॥३५॥ काय बहु बोलों अर्जुना । जैं हे दशा ये मना । तैं मनस्तपोभि-[8]धाना । पात्र होय ती ॥ ३६ ॥ परि तें असो हें जाण । मानसतपाचें लक्षण । देवो ह्मणे संपूर्ण । सांगितलें ॥ ३७॥ एवं देहवाचाचित्तें । जें पातलें त्रिविधत्वातें । तें सामान्य तप तूतें । परिसविलें गा ॥ ३८ ॥ आतां गुणत्रयसंगें । हेंचि विशेषें त्रिविधीं[9] रिगे । तेंही आईक चांगें । प्रैज्ञाबळें[10] ॥ ३९ ॥

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्रिविधं नरैः ।**
**अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्विकं परिचक्षते ॥ १७ ॥**

तरि हेंचि तप त्रिविधा । जें दाविलें तुज प्रैबुद्धा[11] । तेंचि करीं पूर्णश्रद्धा । सांडूनि फळ ॥ २४० ॥ जैं पुरातिया सत्वशुद्धी । आचरिजे आस्तिक्यबुद्धी । तैं तयातेंचि गा प्रबुद्धीं । सात्विक ह्मणिपे ॥ ४१ ॥

**सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।**
**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥**

ना तरि तपस्थापनेलागीं । दुजेपण मांडूनि जगीं । मैहत्त्वाद्रीच्या[12] शृंगीं । बैसावया ॥४२॥ त्रिभुवनींचिया सन्माना । न वचावें ठाया आना । धुरेचियां[13] आसना । भोजनालागीं ॥४३॥ विश्वाचिया स्तोत्रीं[14] । आपण होआवया पात्रीं । विश्वें आपलिया यात्रा । करावया ॥ ४४ ॥ लोकांचिया विविधा पूजा । आश्रय न धरावया दुजा । भोग भोगावे वोजा । महत्त्वाचिये ॥ ४५ ॥ अगा बोल माखूनि तपें । विकावया आपणपें । अंगहीनें[15] पेंडपे[16] । जियापरी ॥ ४६ ॥ हें असो धनमानीं आस । वाढउनी तप कीजे सायास । तैं तेंचि तप राजस । बोलिजे गा ॥ ४७ ॥ परि पैरहुणीं[18] जें दुहिलें । तैं तें गुरूं न दुभेंचि व्यालें ।

१ उत्कंठा, इच्छा. २ धांव. ३ कंप. ४ योग्यता. ५ संकल्पविकल्प. ६ मीठ. ७ आपली मूळप्रकृति=पाणी. ८ मानस तप अशा नांवाला. ९ तीन प्रकारांत शिरतें. १० बुद्धीच्या बळानें. ११ ज्ञात्या. १२ महत्त्वपर्वताच्या शिखरावर. १३ अग्रभागींच्या. १४ स्तुतीला. १५ चांगलेपणानें. १६ वेश्या. १७ शृंगार करते. १८ ओंटी केलेली गाई विण्याच्यापूर्वी.

वोवेसीयाचे ॥ ८६ ॥ पैं केळांतर गांठीं बांधिजे । मग पुढिलांचें काज कीजे । पूंजा घेऊनि रस दीजे । पीडितांसि ॥ ८७ ॥ तैसें जया जें दान देणें । तो तेणेंचि गा जीवनें । पुढती भजावा भावें येणें । दीजे जें कां ॥ ८८ ॥ अथवा कोणी वाटे जातां । घेतलें उमचों न शकता । मिळे जैं पंडुसुता । द्विजोत्तम ॥ ८९ ॥ तरी कवड्या एकासाठीं । अशेषां गोत्रांचीच किरीटी । सर्व प्रायश्चित्तें सुये मुठी । तयाचिये ॥ २९० ॥ तेविंचि पारलौकिकें । फळें वांछिजती अनेकें । आणि दीजे तरी भुके । येकाही नाहे ॥ ९१ ॥ तेंही ब्राह्मण नेवों सरे । कीं हाणिचोनि शिणें झांसुरे । सर्वस्व जैसें चोरें । नागऊनि नेलें ॥ ९२ ॥ काय बहु सांगों सुमती । जें दीजे या मनोवृत्ती । तें दान गा त्रिजगतीं । राजस पैं ॥ ९३ ॥

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

मग म्लेंछाचे वें[10]सांटे । दांगी[11]णे हन कें[12]कटे । कां [13]शिबिरें चोहटे । नगरींचे ते ॥९४॥ [14]तेही तेही ठाईं मिळणी । समय सांजवेळ कां रजनी । तेव्हां उदार होणें [15]धेनीं । चोरियेच्या ॥ ९५ ॥ पात्रें भाट [16]नागारी । [17]सामान्य स्त्रिया कां जुवारी । जियें मूर्तिमंतें [18]भुररीं । भुले तयां ॥ ९६ ॥ नृत्याची पुरवणी । तें पुढां डोळे [19]भोरणी । गीतें[20] भाटींव तो श्रवणीं । कर्णजप ॥ ९७ ॥ तयाहींवरी [21]अळुमाळ । जैं घे फुलागंधाचा गुगुळ । तंव भ्रमाचा तो वेताळ । अवतरे तैसा ॥ ९८ ॥ तेथ [22]विभांडूनियां जग । आणिले पदार्थ अनेग । तेणें घालूं लागे [23]मातंग । [24]गेंवारीसि ॥ ९९ ॥ एवं ऐसेनि जें देणें । तें तामसदान मी ह्मणें । आणि घडे दैवगुणें । आणिकही एक ॥ ३०० ॥ विपायें [25]घुणाक्षर पडे । टाळिये [26]कांउळा सांपडे । तैसें तामसा पर्व जोडे । पुण्यदेशीं ॥ १ ॥ तेथ देखोनि तो [27]ओथिला । योग्य मार्गोही आला । तोही दर्पा चढला । भांबावे जरी ॥ २ ॥ तरी श्रद्धा न धरी जीवीं । तया माथाही न खालवी । स्वयें न करी ना करवीं । अर्घ्यादिक ॥ ३ ॥ आलिया न घली बैसों । तेथ गंधाक्षतांचा काय [28]आतिसो । हा अप्रसंग कीर असो । तामसीं नरीं ॥ ४ ॥ पैं बाळविजे रिणाइत । तैसा [29]झोंकवी तयाचा हात । तूं करणें याचा बहुत । प्रयोग तेथ ॥ ५ ॥ आणि जया जें दे किरीटी । तयातें उमाणी तयासाठीं । मग [31]कुंबालें कां लोटी ।

१ व्रत करणाराच्या. २ व्याज. ३ द्रव्य. ४ काढा. ५ आश्रयानें. ६ प्रत्युपकार करूं न शकणारास. ७ हातावर घाली. ८ भुकेपुरती. ९ झुरे. १० स्थानीं. ११ अरण्यें. १२ अपवित्र भूमी. १३ तंबू. १४ त्या त्याही. १५ लूट. १६ गारुडी. १७ वेश्या. १८ चेटकें. १९ नेत्रसुख. २० स्तुती. २१ थोडासा. २२ पराभवून. २३ मांग. २४ अन्नछत्रास. २५ किड्यानें लांकूड पोखरलें म्हणजे अक्षरासारखें दिसतें तें. २६ कावळा. २७ श्रीमान्. २८ विशेषत्व. २९ जुगारी. ३० बजावी, अपमान करी. ३१ दुष्ट शब्दांनीं.

अवहेच्या ॥ ६ ॥ हें बहु असो यापरी । मोल वेंचणें जें अवधारीं । तया नांव चराचरीं । तामस दान ॥ ७ ॥ ऐसें आपुलाल्या चिन्हीं । अळंकृतें तिन्हीं । दानें दाविलीं अभिधानीं । राजतनया ॥ ८ ॥ तेथ मी जाणत असें । विपायें तूं गा ऐसें । कल्पिसील मानसें । वि[२]चक्षणा ॥ ९ ॥ जे भ[३]वबंधमोचक । येकलें कर्म सात्विक । तरी कां वे[४]खासीं सशोख । येर बोलावीं ॥ ३१० ॥ परि [५]नोसंतितां वि[६]वंसी । भेटी नाहीं [७]निधीसी । कां [८]धूं न साहतां जैसी । दाती न लगे ॥ ११ ॥ तैसें शुद्धसत्वाआड । आहे रजतमाचें कवाड । तें भेदणेयातें कीड[९] । ह्मणावें कां ॥ १२ ॥ आह्मीं श्रद्धादिदानांत । जें समस्तही क्रियाजात । सांगीतलें कां व्याप्त । तिहीं गुणीं ॥ १३ ॥ तेथ भरवसेनि तिन्ही । न सांगोंचि ऐसें मानीं । परि सत्व दावाया दोन्हीं । बोलिलों येरें ॥ १४ ॥ जें दोहींमाजि तिजें असे । तें दोही सांडितांचि दिसे । अहोरात्रत्यागें जैसें । संध्यारूप ॥ १५ ॥ तैसें रजतमविनासें । तिजें जें उत्तम दिसे । तें सत्व हें आपैसें । फांवासि ये ॥ १६ ॥ एवं दावावया सत्व तुज । निरूपिलें तम रज । तें सांडूनि सत्वें काज । साधीं आपलें ॥ १७ ॥ सत्वेंचि येणें चो[११]खोळें । करीं यज्ञादिकें सकळें । पावसी तैं करतळें । आपलें नि[१२]जें ॥ १८ ॥ सूर्यें दाविलें [१३]सांतें । काय एक न दिसे तेथें । तेविं सत्वें केलें फळातें । काय नेदी ॥ १९ ॥ हे कीर [१४]ऑवडतांविखीं । शक्ति सत्वीं आथि निकी । परि मोक्षेंसीं एकी । मिसळणें जें ॥ ३२० ॥ तें एक आनचि आहे । तयाचा [१५]सांवावो जैं लाहे । तैं मोक्षाचाही होये । गांवीं [१६]सैरतें ॥ २१ ॥ पैं भांगार जऱ्हीं पंधरें । तऱ्ही राजावळीचीं अक्षरें । लाहे तेंचि सरें । जियापरी ॥ २२ ॥ स्वच्छें शीतळें सुगंधें । जळें होती सुखप्रदें । परि पवित्रत्व संबंधें । तीर्थाचेनि ॥ २३ ॥ [१७]नैयी हो कां भलतैसी थोरी । परि गंगा जैं अंगिकारी । तैंचि तिये सागरीं । प्रवेश गा ॥ २४ ॥ तैसें सात्विका कर्मा किरीटी । येतां मोक्षाचिये भेटी । न पडे [१८]ऑडकाठी । तें वेगळें आहे ॥ २५ ॥ हा बोल [१९]ऑयकतखेंवीं । अर्जुना [२०]आंधि न माये जीवीं । ह्मणे देवें कृपा करावी । सांगावें तें ॥ २६ ॥ तेथ [२१]कृपाळुचक्रवर्ती । ह्मणे आईक तयाची व्यक्ती । जेणें सात्विक तें मुक्ती । रत्न देखे ॥ २७ ॥

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥**

तरि अनादि परब्रह्म । जें जगदादि वि[२२]श्रांमधाम । तयाचें एक नाम । त्रिधा पैं असे ॥ २८ ॥ तें कीर [२३]अनाम अजाती । परि अविद्यावर्गाचिये राती- । माजि वोळखावया

१ कदाचित्. २ बुद्धिवंता. ३ संसार बंधाचा नाश करणारें. ४ आढेवेढे घेऊन. ५ न निवारितां. ६ समंध. ७ द्रव्याचा ठेवा. ८ धूर. ९ हीनकस, वाईट. १० प्राप्त होतें. ११ शुद्ध. १२ स्वरूप. १३ असतां. १४ सर्वथोपरी, पाहिजे त्याविषयीं. १५ साह्य. १६ वंद्य. १७ नदी. १८ विघ्न. १९ ऐकतांच. २० मनोव्यथा. २१ दयेचा सार्वभौम. २२ विश्रांतिस्थान. २३ नाम जातिरहित.

श्रुती । खुण[1] केली ॥ २९ ॥ उपजलिया बाळकासी । नांव नाहीं तयापासीं । ठेविलेनि नांवेंसीं । ओ देत उठी ॥ ३३० ॥ कष्टले संसारशिणें । जे देवा येती गाऱ्हाणें । तयां ओ दे नांवें जेणें । तो संकेतु हा ॥ ३१ ॥ ब्रह्माचा अबोला[2] फिटावा । अद्वैतत्वें तो भेटावा । ऐसा मंत्र देखिला कणवा[3] । वेदें बापें ॥ ३२ ॥ मग दाविलेनि जेणें एकें । ब्रह्म आळविलें कवतिकें । मागां असत ठाके । पुढां उभें ॥ ३३ ॥ परि निगमाचळशिखरीं[4] । उपनिषदर्थ नगरीं । आहाति जे ब्रह्माच्या येकाहारीं[5] । तयांसीच कळे ॥ ३४ ॥ हेंही असो प्रजापती । शक्ति जे सृष्टि करिती । ते जया एका आवृत्ती[6] । नामाचिये ॥ ३५ ॥ पैं सृष्टीचिया उपक्रमा[7] । पूर्वीं गा वीरोत्तमा । वेडा ऐसा ब्रह्मा । एकला होता ॥ ३६ ॥ मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टीही करूं शके । तो थोर केला एकें । नामें जेणें ॥ ३७ ॥ जयाचा अर्थ जीवीं ध्यातां । जें वर्णत्रयचि जपतां । विश्वसृजनयोग्यता[8] । आली तया ॥ ३८ ॥ तेथवां रचिलें ब्रह्मजन[9] । तयां वेद दिधलें शासन[10] । यज्ञ ऐसें वर्तन । जीविके[11] केलें ॥ ३९ ॥ पाठीं नेणों किती येर । सृजिले[12] लोक अपार । जाले ब्रह्मदत्त अग्रहार[13] । तिन्हीं भुवनें ॥ ३४० ॥ ऐसें नाममंत्रें जेणें । धातया[14] अढळाज[15] करणें । तयाचें स्वरूप आइक म्हणे । श्रीकांत तो ॥ ४१ ॥ तरि सर्वमंत्रांचा राजा । तो प्रणव[16] आदिवर्ण बुझा[17] । आणि तत्कार दुजा । तिजा सत्कार ॥ ४२ ॥ एवं ओंतत्सदाकार । ब्रह्मनाम हें त्रिःप्रकार । हें फूल तुरंबीं[18] सुंदर । उपनिषद तें ॥ ४३ ॥ येणेंसीं गा होऊनि एक । जें कर्म चाले सात्त्विक । तें करत्यातें पाइक[19] । घरिचें करी ॥ ४४ ॥ परि कापुराचे थाळवें[20] । आणुनि देईजे देवें । तरी जाणणेंचि अंडव[21] । तेथ असे बापा ॥ ४५ ॥ तैसें आदरिजेल सत्कर्म । उच्चारिजेल ब्रह्मनाम । परि नेणिजेल जरि वर्म । विनियोगाचें[22] ॥ ४६ ॥ तरि महंताचिया कोडी[23] । घरा आलियाही बोढी[24] । मानूं नेणता परवडी[25] । मुद्दल तुटे[26] ॥ ४७ ॥ कां ल्यावया चोखट । टाकें[27] भांगारें[28] एकवट । घालूनि बांधली मोट । गळां जेवीं ॥ ४८ ॥ तैसें तोंडीं ब्रह्मनाम । हातीं तें सात्त्विक कर्म । विनियोगेंवीण काम । विफळ होय ॥ ४९ ॥ अगा अन्न आणि भूक । पासीं असे परि देख । जेऊं नेणतां बाळक । लंघनचि कीं ॥ ३५० ॥ कां स्नेह[29] सूत्र वैश्वानरा । जालियाही संसारा[30] । हातवटी नेणतां वीरा । प्रकाश नोहे ॥ ५१ ॥ तैसें वेळे कृत्य पावे । तेथिचा मंत्रही आठवे । परि व्यर्थ तें

---

१ खूण. २ अनिर्वाच्यपण. ३ कृपेनें. ४ वेद हाच पर्वत त्याचे शिखरावर. ५ पंक्तीस. ६ अनुष्ठानानें, उच्चारानें. ७ आरंभाच्या. ८ उत्पत्ति करण्याचें सामर्थ्य. ९ ब्राह्मण. १० आज्ञा. ११ निर्वाहासाठीं. १२ उत्पन्न केले. १३ इनाम. १४ ब्रह्मदेवाला. १५ श्रेष्ठ. १६ ओंकार. १७ समजा. १८ हुंगी. १९ चाकर. २० अलंकार. २१ अडथळा. २२ व्यवस्थेचें. २३ कोटी. २४ ओढीनें. २५ प्रकार. २६ पुण्याचा क्षय होई. २७ अलंकारविशेष, टीका. २८ सोनें. २९ तेल, वात व आग. ३० मेळणी.

आघवें । विनियोगेंवीण ॥ ५२ ॥ म्हणौनि वर्णत्रयात्मक । जें हें परब्रह्मनाम एक । विनियोग तूं आइक । याचा आतां ॥ ५३ ॥

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**
**प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥**

तरि या नामीचीं अक्षरें तिन्हीं । कर्मा आदि मध्य निदानीं । प्रयोजावीं[2] पैं स्थानीं । इहीं तिन्हीं ॥ ५४ ॥ हेचि एकी हातवटी । घेउनी हन किरीटी । आले ब्रह्मविद[3] भेटी । ब्रह्माचिये ॥ ५५ ॥ ब्रह्मेसीं होआवया एकी । ते न वंचती[4] यज्ञादिकीं । जें चावळलें बोळखीं । शास्त्रांचिया ॥ ५६ ॥ तो आदि तंव ओंकार । ध्यानें करिती गोचिर । पाठीं आणिती उच्चार । वाचेही तो ॥ ५७ ॥ तेणें ध्यानें प्रकटे । प्रणवोच्चारें स्पष्टें । लागती मग वाटे । क्रियांचिये ॥ ५८ ॥ आंधारीं अभंग दिवा । आडवीं समर्थ बोळावा । तैसा प्रणव जाणावा । कर्मारंभीं ॥ ५९ ॥ उचितदेवोद्देशें । द्रव्यें धर्म्यें आणि बहुवसें । द्विजद्वारा हन हुताशें । यजिती पैं ते ॥ ३६० ॥ आहवनीयादि वन्हीं । निक्षेपरूपीं हवनीं । याजिती पैं विधानीं । कुंडे होउनी ॥६१॥ किंबहुना नाना याग । निष्पत्तीचें घेउनी अंग । करिती नावडतेया त्याग । उपाधीचा ॥ ६२ ॥ कां न्यायें जोडला पवित्रीं । भूम्यादिकीं स्वतंत्रीं । देशकाळशुद्ध पात्रीं । देती दानें ॥ ६३ ॥ अथवा एकांतरा कृच्छ्रीं । चांद्रायणें मासोपवासीं । शोधोनि गा धातुराशी । करिती तपें ॥ ६४ ॥ एवं यज्ञदान तपें । जियें गाजती बंधरूपें । तिहींच होय सोपें । मोक्षाचें तयां ॥ ६५ ॥ स्थळीं नावा जिया हाटिजे । जळीं तियाचि जेवीं तरिजे । तेवि बंधकीं कर्मीं सुटिजे । नामें येणें ॥ ६६ ॥ परि हें असो ऐसिया । या यज्ञदानादिक्रिया । ओंकारें सावायिलिया । प्रवर्तती ॥ ६७ ॥ तिया मोटक्रियां जेथ फळीं । रिगों पाहाती निर्हाळीं । प्रयोजिती तियेकाळीं । तच्छब्द तो ॥ ६८ ॥

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपः क्रियाः ।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥**

जें सर्वांही जगापरौतें । जें एक सर्वही देखतें । जें तच्छब्दें बोलिजे तें । पैल वस्तु ॥ ६९ ॥ ते सर्वादिकत्वें चित्तीं । तद्रूप ध्यावुनियां सुमती । उच्चारेंहीं व्यक्ती । आणिती

---

१ शेवटीं. २ योजावीं. ३ ब्रह्मज्ञानी. ४ त्यागिती. ५ बोलले. ६ प्रत्यक्ष. ७ सोबती. ८ अग्नी. ९ आहवनीय, दक्षिणाग्नि व गार्हपत्य हे अग्निहोत्राचे तीन अग्नि. १० दक्ष. ११ अहंकृतीचा. १२ एक दिवस मध्यें सोडून भोजन करणें. १३ कडेस. १४ तारूं. १५ बैसावें. १६ सांग झाल्यास. १७ अल्प. १८ पहा. १९ पलीकडे, निराळें. २० प्रकाशक.

पुढती ॥ ३७० ॥ ह्मणती तद्रूपा ब्रह्मा तया । फळेंसीं क्रिया इया । तेंचि होतु आह्मां भोगावया । कांहींचि नुरो ॥ ७१ ॥ ऐसेनि तदात्मकें ब्रह्में । तेथ उंगाणूनि कर्में । आंग झाडिती नैमेंमें । येणे बोलें ॥ ७२ ॥ आतां ओंकारें आदरिलें । तत्कारें समर्पिलें । इया रीती जया आलें । ब्रह्मत्व कर्मा ॥ ७३ ॥ तें कर्म क्षीर ब्रह्माकारें । जालें तेणेंही न सरे । जें करी तेणेंसी दुसरें । आहे ह्मणौनि ॥ ७४ ॥ मीठ आंगें जळीं विरे । परि क्षारता वेगळी उरे । तैसें कर्म ब्रह्माकारें । गमे तें द्वैत ॥ ७५ ॥ आणि दुजें जंव जंव घडे । तंव तंव संसारभय जोडे । हें देवो आपलेनि तोंडें । बोलती वेदें[3] ॥ ७६ ॥ ह्मणोनि पैरत्वें ब्रह्म असे । तें आत्मत्वें परियेंवसे । सच्छब्द या रिर्णोशेषें । ठेविला देवें ॥ ७७ ॥ तरि ओंकार तत्कारीं । कर्म केलें जें ब्रह्मशरीरीं । जें प्रशस्तादि बोलवरी । वाखाणिलें ॥ ७८ ॥ प्रशस्तकर्मीं तिये । सच्छब्दा विनियोग आहे । तोचि आइका होये । तैसा सांगों ॥ ७९ ॥

सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥

तरि सच्छब्दें येणें । आदूनि असताचें नाणें । दाविजे अव्यंगवाणें । सत्तेचें रूप ॥ ३८० ॥ जे सतचि काळें देशें । होऊं नेणेचि अैनारिसें । आपणपां आपण असे । अखंडित ॥ ८१ ॥ हें दिसतें जेतुलें आहे । तें असतपणें जें नोहे । देखतां रूपीं[11]सोये । लाभे जयाची ॥ ८२ ॥ तेणेंसी प्रशस्त तें कर्म । जें जालें सर्वात्मक ब्रह्म । देखिजे करूनि सम । ऐक्यबोधें ॥ ८३ ॥ तरी ओंकार तत्कारें । जें कर्म दाविलें ब्रह्माकारें । तें गौळूनि होइजे एकसरें । सन्मात्रचि ॥ ८४ ॥ ऐसा हा अंतरंग । सच्छब्दाचा विनियोगे[13] । जाणा ह्मणे श्रीरंग । मी न ह्मणें हो ॥ ८५ ॥ ना मीचि जरि हो ह्मणें । तरि श्रीरंगीं दुजें हेंचि उँणें । ह्मणौनि हें बोलणें । देवाचेंचि ॥ ८६ ॥ आतां आणिकीही परी । सच्छब्द हा अवधारीं । सात्त्विककर्मा करी । उपकार जो ॥ ८७ ॥ तरी सत्कर्में चांगें । चालिलीं अधिकारेंबगें । परि एकाधें कां आंगें । हिर्णावती जें ॥ ८८ ॥ तें उणें एकें अवयवें । शरीर ठाके आघवें । कां अंगहीनौं भोंडावे । रथाची गती ॥ ८९ ॥ तैसें एकेचि गुणें

---

१ समर्पून. २ माझें नाहीं ह्मणून. ३ आपलें तोंड हाच कोणी वेद त्याणें. ४ दुसरेपणें. ५ निदानास पावे. ६ कर्णोद्देशानें. ७ ब्राह्मणदेहीं. ८ ऐकण्याजोगा. ९ सांगोपांग. १० वेगळें. ११ वाट, मार्ग. १२ टाकून. १३ व्यवस्था. १४ उणीव. १५ मार्गें. १६ न्यून होती. १७ चक्रहीना. १८ बंद होते.

हीण । सतचि परी असतपण । कर्म धरी गा जाण । जिये वेळे ॥ ३९० ॥ तेव्हां ओंकार तत्कारीं । सावायिला[1] हा चांगी परी । सच्छब्द कर्मा करी । जीर्णोद्धार ॥ ९१ ॥ तें असतपण फेडी । आणी[2] सद्भावाचिये रूढी । निजसत्वाचिये प्रौढी । सच्छब्द हा ॥ ९२ ॥ दिव्यौषध जैसें रोगिया । कां सावावो[3] ये भंगलिया । सच्छब्द कर्मा व्यंगलिया[4] । तैसा जाण ॥ ९३ ॥ अथवा कांहीं प्रमादें । कर्म आपुलिये मर्यादे । चुकोनि पडे निषिद्धे । वाटे हन ॥ ९४ ॥ चालतयाचि मार्ग सांडे । पारखियाचि[5] भ्रखरें[6] पडे । राहाटीमाजि न घडे । काइ काइ ॥ ९५ ॥ ह्मणौनि तैसी कर्मा । अविचारें[7] सांडे सीमा । असाधुत्वाचिया दुर्नामा । येवों पाहे जें ॥ ९६ ॥ तेथ गा हा सच्छब्दु । येरां दोहींपरीस प्रबुद्धु[8] । प्रयोजिला करी साधु । कर्मातें यया ॥ ९७ ॥ लोहा परिसाची घृष्टी[9] । वोहळा[10] गंगेची भेटी । कां मृता जैसी वृष्टी । पीयूषाची[11] ॥ ९८ ॥ पैं असाधुकर्मा तैसा । सच्छब्दप्रयोग वीरेशा । हें असो गौरवेंचि[12] ऐसा । नामाचा यया ॥ ९९ ॥ घेऊनि येथिंचें वर्म । जैं विचारिसी[13] हें नाम । तैं केवळ हेंचि ब्रह्म । जाणसी तूं ॥ ४०० ॥ पाहेंपां ओं तत्सत् ऐसें । हें बोलणें तेथ नेतसे । जेथूनि कां हें प्रकाशे । दृश्यजात[14] ॥ १ ॥ तें तंव निर्विशिष्ट[15] । परब्रह्म चोखट । तयाचें हें आंतुवट[16] । व्यंजक[17] नाम ॥ २ ॥ परि आश्रय आकाशा । आकाशचि कां जैसा । या नामा नामीं[18] आश्रय तैसा । अभेद असे ॥ ३ ॥ उदयिला आकाशीं । रवीचि रवीतें प्रकाशी । हे नामव्यक्ती तैसी । ब्रह्मचि करी ॥ ४ ॥ ह्मणौनि त्र्यक्षर[19] हें नाम । नव्हे जाण केवळ ब्रह्म । याहीलागीं कर्म । जें जें कीजे ॥ ५ ॥

## यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
## कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥

ते याग अथवा दानें । तपादिकेंही गहनें । तियें निफजतु कां न्यूनें । होऊनि ठातु ॥ ६ ॥ परि परिसाचा वेरकलीं[21] । नाहीं चोखीकीडाची[22] बोली । तैसीं ब्रह्मीं अर्पितां केलीं । ब्रह्मचि होती ॥ ७ ॥ उणिया पुरयाची परी । नुरेचि तेथ अवधारीं । निवडू न येती सागरीं । जैसिया नदी ॥ ८ ॥ एवं पार्था तुजप्रती । ब्रह्मनामाची हे शक्ती । सांगीतली उपपत्ती । डोळसा गा ॥ ९ ॥ आणि येकें कांहीं अक्षरा । वेगळवेगळा वीरा ।

---

१ साह्यभूत असा. २ आणतो. ३ सावयवत्व. ४ न्यून झालें असतां. ५ परीक्षकास. ६ भ्रम. ७ अविचारें. ८ ज्ञाता. ९ घर्षण. १० ओह्याला. ११ अमृताची. १२ महिमा. १३ उच्चारिसी. १४ दृष्टिगोचर सर्व पदार्थ. १५ अपरिच्छिन्न. १६ अंतर्गत. १७ जाणविणारें. १८ वाच्यवाच्यकत्व. १९ तीनअक्षरी. २० उपजोत. २१ कसोटींत. २२ चांगल्यावाईटाची.

विनियोगें नागरा । बोलिलों रीती ॥ ४१० ॥ एवं ऐसें सुमहिम । ह्मणौनि हें ब्रह्मनाम । आतां जाणीतलें कीं सुवर्म । राया तुवां ॥ ११ ॥ तरी येथुनि यांचि श्रद्धा । उपलविली हो सर्वदा । जयाचें जालें बंधा । उरों नेदी ॥ १२ ॥ जिये कर्मी हा प्रयोग । अनुष्ठिजे सद्विनियोग । तेथ अनुष्ठिला सांग । वेदचि तो ॥ १३ ॥

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥**

हरिः ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

ना सांडूनि हे सोये । मोडूनि श्रद्धेची बाहे । दुराग्रहाची त्राये । वाढऊनियां ॥ १४ ॥ मग अश्वमेध कोडी कीजे । रत्नें भरोनि पृथ्वी दीजे । एकांगुष्ठींही तपिजे । तपसाहस्त्रीं ॥ १५ ॥ जळाशयाचेनि नांवें । समुद्रही कीजती नवे । परि किंबहुना आघवें । वृथाचि तें ॥ १६ ॥ पाषाणावरी वर्षलें । जैसें भस्मीं हवन केलें । कां खेंवें दीधलें । साउलिये ॥ १७ ॥ ना तरि जैसें चर्डकेणा । गगन हाणीतलें अर्जुना । तैसा समारंभ सुणा । गेलाचि तो ॥ १८ ॥ घाणा गाळिले [13]गुंडे । तेल ना पेंडी जोडे । तैसें दरिद्र तेवढें । ठेलेंचि आंगीं ॥ १९ ॥ गांठीं बांधली खापरी । येथ अथवा पलतीरीं । नेर्सेरांनि जैसी मारी । उपवासीं गा ॥ ४२० ॥ तैसें कर्मजातें तेणें । नाहीं ऐहिकींचें भोगणें । तेथ पैरत्र तें कवणें । अपेक्षावें ॥ २१ ॥ ह्मणौनि ब्रह्मनामश्रद्धा । सांडूनि कीजे जो धांदा । हें असो सिणू नुसंधा । दृष्टादृष्टीं तो ॥ २२ ॥ ऐसें कैलुषकरिकेसरी । त्रितापैतिमिरतमारी । श्रीवर-वीर-नरहरी । बोलिलें तेणें ॥ २३ ॥ तेथ निजानंदा बहुवसा । माजि अर्जुन तो सहसा । हरपला चंद्र जैसा । चांदिणेंनि ॥ २४ ॥ अहो संग्राम हा वाणिया । मार्पे नाराचांचिया आणिया । सूनि मांस घे मेवणिया । जीवितेंसी ॥ २५ ॥ ऐसिया समर्थी कर्कशें । भोगीजत स्वानंदराज्य कैसें । आजि भाग्योदय हा नसे । आणिके ठाईं ॥ २६ ॥ संजय ह्मणे कौरवराया । गुणा [24]रिझोये रिपूचिया । आणि गुरुही हा आमुचिया । सुखाचा येथ ॥ २७ ॥ हा न पुसता हे गोठी । तरि देव कां सोडिते गांठी । तरि कैसेनि आह्मां भेटी । परमार्थेंसीं ॥ २८ ॥ होतों अज्ञानाच्या आंधारां । येसंतीतें जन्मवाहरा ।

---

१ व्यवस्था. २ चांगल्या. ३ मोठ्या महिमेचें. ४ नामाची. ५ विस्तारिली. ६ जन्मबंधास. ७ मार्ग. ८ आश्रय. ९ सत्ता. १० अलिंगन. ११ थापटीनें. १२ व्यर्थ. १३ दगड. १४ कामीं न पडे. १५ परलोकचें. १६ नुसता शीण. १७ इहपर. १८ पातकरूप हत्तीला सिंह. १९ तापत्रयरूप अंधकाराचा नाश करणारा. २० व्यापार. २१ बाणाचीं अग्रें. २२ मोजणीस. २३ कठोर. २४ प्रीति उत्पन्न होते. २५ करीत. २६ येरझार.

तों आत्मप्रकाशमंदिरा । आंत आणिलें ॥ २९ ॥ येवढा आह्मां तुह्मां थोर । केला येणें उपकार । ह्मणोनि हा व्याससहोदर[1] । गुरुत्वें होय ॥ ४३० ॥ तेविंचि संजयो ह्मणे चित्तीं । हा अतिशय या नृपती । खुपेल[2] ह्मणोनि किती । बोलत असों ॥ ३१ ॥ ऐसी हे बोली सांडिली । मग येरीचि गोठी आदरिली । जे पार्थें कां पुसिली । श्रीकृष्णातें ॥ ३२ ॥ याचें जैसें कां करणें । तैसें मीही करीन बोलणें । ऐकिजो ज्ञानदेव ह्मणे । निवृत्तीचा ॥ ४३३ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

श्लोक २८, ओव्या ४३३.

---

## अध्याय १८ वा.

जयजय देव निर्मळ । निजजनाखिलमंगळ[3] । जन्मजराजलदजाळ-[4] । प्रभंजन[5] ॥ १ ॥ जयजय देव प्रबळ । विदळितामंगळकुळ[6] । निगमागमद्रुमफळ । फलप्रद ॥ २ ॥ जयजय देव सकळ । विगतविषयवत्सल[7] । कलितकाळकौतूहल[8] । कलातीत ॥ ३ ॥ जयजय देव निश्चळ । चलितचित्तपानतुंदिल[9] । जगदुन्मीलनाविरल[10] । केलीप्रिय ॥ ४ ॥ जयजय देव निष्कळ । स्फुरदमंदानंदबहळ[11] । नित्यनिरस्ताखिलमल[12] । मूळभूत ॥ ५ ॥ जयजय देव स्वप्रभ[13] । जगदंबुदगर्भनभ[14] । भुवनोद्भवारंभस्तंभ[15] । भवध्वंस[16] ॥ ६ ॥ जयजय देव विशुद्ध[17] । अविद्योद्यानद्विरद[18] । शमदमदनमदभेद[19] । दयार्णव ॥ ७ ॥ जयजय देवैकरूप[20] । अतिकृत-कंदर्पसर्पदर्प[21] । भक्तभावभुवनदीप[22] । तापापह ॥ ८ ॥ जयजय देव अद्वितीय । परिणतोपरमैकप्रिय[23] । निजजनजित भजनीय[24] । मायागम्य[25] ॥ ९ ॥ जयजय देव श्रीगुरो । अकल्प-[26]

---

१ व्यासाचा भाऊ. २ खोंचेल. ३ स्वभक्तांला सर्वथैव मंगलकारक. ४ जन्मवार्धक्यादिरूपी मेघाला. ५ नाशकर्ता वायु. ६ नाशिलीं आहेत अमंगलाचीं=अकल्याणाचीं कुळें ज्यानें. ७ विगतविषय=वैराग्यसंपन्न यांचा प्रिय. ८ कृतांतउत्साहनाशक. ९ चंचल चित्ताच्या प्राशनानें दोंदिल. १० जगास प्रकट करून त्यांत व्यापक. ११ अत्यानंद स्फुरद्रूप करणारा अशा. १२ सर्व पापांचा जेथें सर्वकाळ नाश आहे असा. १३ स्वयंप्रकाश. १४ जगद्रूप मेघाच्या आकाशा. १५ जगद्रूप उत्पत्तीचा मूळस्तंभ. १६ संसारनाशक. १७ उपाधिरहित, निर्मळ. १८ अविद्यारूप वनाचा नाश करणारा हत्ती. १९ काममदाचा शमदमेंकरून नाश करणारा. २० एक रूपच देव. २१ कामसर्पाच्या गर्वाचा तिरस्कार करणारा. २२ भाविकभक्तचित्तमंदिराचा दीप. २३ परिपक्व आहे उपरम=शांति ज्यांस त्यांला एकप्रिय=अत्यंत प्रिय, पूर्णवैराग्यशील प्रिय आहेत ज्यास असा. २४ भक्ताधीन व भजनयोग्य असा. २५ मायेस अगम्य. २६ कल्पनारहित कल्पवृक्षा, संकल्पाभावदाता.

नाकल्पतरो । स्वसंविद्द्रुमबीजप्ररो- । हणावनी ॥ १० ॥ हें काय एकैक ऐसें । नानापरि-भाषावशें । स्तोत्र करूं तुजदोषें । निर्विशेषा ॥ ११ ॥ जिहीं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तुझें । जें जाणें मी म्हणोनि लाजें । वानणा इहीं ॥ १२ ॥ परि मर्यादेचा सागर । हा तंवचि तया डगर । जंव न देखे सुधाकर । उदया आला ॥ १३ ॥ सोमकांत निर्झनिर्झरीं । चंद्रा अर्घ्यादिक न करी । तें तोचि अवधारीं । करवी कीं जी ॥ १४ ॥ नेणों कैसी वसंतसंगें । अवचितिया वृक्षाचीं अंगें । फुटतीं तें तयांही जोगें । धरणें नोहे ॥ १५ ॥ पद्मिनी रविकिरण । लाहे मग लाजे कवण । कां जळें शिवतलें लवण । आंग भुले ॥ १६ ॥ तैसा तूतें जेथ मी स्मरें । तेथ मीपण मी विसरें । मग जाकळिला ढेंकरें । तृप्त जैसा ॥ १७ ॥ मज तुवां जी केलें तैसें । माझें मीपण दवडूनि देशें । स्तुतिमिषें पांच पिसें[10] । बांधलें वाचे ॥ १८ ॥ ना येऱ्हवीं तरी आठवीं । राहोनि स्तुति जैं करावी तैं गुणागुणां धरावी । सरोभरी कां ॥ १९ ॥ तरि तूं जी एकरसाचें लिंग । केवि करूं । गुणागुणां विभाग । मोतीं फोडोनि सांधितां चांग । कीं तैसेंचि भलें ॥ २० ॥ आणि बाप तूं माय । इहीं बोलीं ना स्तुति होय । डिंभोपाधिक आहे । विटाळ तेथें ॥ २१ ॥ जी जालेनि पाइकें आलें । तें गोसावीपण केवि बोलें । ऐसें उपाधी उंशिटलें । काय वर्णूं ॥ २२ ॥ जरि आत्मा तूं एकसरा । हेंही म्हणतां शातारा । तरी आंतल तूं बाहेरा । घोंपतासी ॥ २३ ॥ म्हणूनि सत्याचि तुजलागीं । स्तुती न देखों जी जगीं । मौनावांचूनि लेणें आंगीं । सुसीना मा ॥ २४ ॥ स्तुती कांहीं न बोलणें । पूजा कांहीं न करणें । सन्निधी कांहीं न होणें । तुझ्या ठायीं ॥ २५ ॥ तरि जितलें जैसें भुली । पिसें[21] आलीप घाली । तैसें वोनूं तें माउली । उपसाहावें तुवां ॥ २६ ॥ आतां गीतार्थाची मुक्तमुद्रा । लेवर्वी माझिये वाग्वृद्धी । जेणें मानें हे सभासदीं । सज्जनाच्या ॥ २७ ॥ तेथ म्हणितलें श्रीनिवृत्ती । नको हें पुढतपुढती । परिसीं लोहा घृष्टी किती । वेळवेळा कीजे गा ॥ २८ ॥ तंव विनवी ज्ञानदेव । म्हणे हो कां जी पसाव । तरि अवधान देतु देव । ग्रंथा आतां ॥ २९ ॥ जी गीतारत्नप्रासादाचा । कळस अर्थचिंतामणीचा । सर्व गीतादर्शनाचा । पाढाऊ जो ॥ ३० ॥ लोकीं तरी आथी ऐसें । जे दुरूनि कळस दिसे । आणि भेटीचि होतसे ।

---

१ स्वकीय ज्ञानवृक्षाच्या बीजास उत्पत्तिस्थान. ( हीं सर्व संबोधनें आहेत. ) २ अनेक प्रकारच्या प्रत्ययांनीं. ३ तुझ्या हेतूनें. ४ ज्यापेक्षां विशेष कांहीं नाहीं अशा. ५ बोलावें. ६ वर्णावयास. ७ ख्याती. ८ अंगांतून पाझरलेल्या. ९ व्यापिला. १० वेड. ११ बरोबरी. १२ अखंडैकरसाची मूर्ती. १३ लेंकराच्या उपाधीचा. १४ श्रेष्ठता. १५ उष्टें. १६ एकदम. १७ सांपडतास. १८ घालीत नाहींस कीं. १९ जिंकलें. २० भ्रांतीनें. २१ श्रमलेलें. २२ बडबड करी. २३ वर्णूं. २४ सहन करावें. २५ मोत्यांची आंगठी. २६ मान्य होईल. २७ पुनःपुनः. २८ घर्षण. २९ प्रसाद. ३० देवळाचा. ३१ चिंतामणितुल्य अर्थयुक्त. ३२ बोधक संग्रह. ३३ हस्तगत होई.

देवतेची तिये ॥ ३१ ॥ तैसेंचि एथही आहे । जे एकेंचि येणें अध्यायें । आघवाची दृष्ट होये । गीतागम[1] हा ॥ ३२ ॥ मी कळस याचि कारणें । अठरावा अध्याय म्हणें । उवाइला[2] बादरायणें[3] । गीताप्रासादा ॥ ३३ ॥ नोहे कळसापरतें[4] कांहीं । प्रासादीं काम नाहीं । तें सांगतसे गीताही । संपलेपणें ॥ ३४ ॥ व्यास सहजे सूत्री[5] बळी । तेणें निगमरत्नाचळीं । उपनिषदार्थांची माळी[6]- । माजी खांडिली ॥ ३५ ॥ तेथ त्रिवर्गांचा[7] अणुआरु[8] । आडऊ[9] निघाला जो अपारु । तो महाभारतप्राकारु[10] । भोंवता केला ॥ ३६ ॥ माजि आत्मज्ञानाचे एकवट[11] । ढेंळवाडें[12] झाडूनि चोखट । घडिलें पार्थ-वैकुंठ-[13] । संवाद कुसरी[14] ॥ ३७ ॥ निवृत्तिसूत्र[15]-सोडणियां[16] । सर्वशास्त्रार्थ पुरवणिया । आंवो[17] साधिला मांडणिया । मोक्षरेखेचा[18] ॥ ३८ ॥ ऐसेनि कारितां उभारा । पंधरा अध्यायांत पंधरा । भूमी निर्वाळलियां[19] पुरा । प्रासाद जाहाला ॥ ३९ ॥ उपरि सोळावा अध्याय । तो ग्रीवे घंटेचा[20] आय । सप्तदश तो ठाय । पेंडवाणिये[21] ॥ ४० ॥ तयाहीवरी अष्टादश । तो अपैसा[22] मांडला कळस । उपरि गीतादिकीं व्यास[23] । ध्वज लागला ॥ ४१ ॥ म्हणोनि मागील जे अध्याय । ते चढते भूमीचे आय[24] । तयांचें पुरें[25] दावितांहे । आपुल्या आंगीं ॥ ४२ ॥ जालया कामा[26] नाहीं चोरी । ते कळसें होय उजरी[27] । तेवि अष्टादश विर्वरी[28] । साद्यंत गीता ॥ ४३ ॥ ऐसा व्यासें विंदाणिये[29] । गीताप्रासादु जोडणिये[30] । आणूनि राखिले प्राणिये । नानापरी ॥ ४४ ॥ एक प्रदक्षिणा जपाचिया । बाहेरोनि[31] करिती यया । एक ते श्रवणमिषें छाया । सेवितीययाची ॥ ४५ ॥ एक ते अवधानाचा पुरा । विडांपाउड[32] भीतरां । घेऊनि रिघती गाभारां[33] । अर्थज्ञानाच्या ॥ ४६ ॥ ते निजबोधें उरावरी[34] । भेटती आत्मया श्रीहरी । परि मोक्षप्रासादीं सरी[35] । सर्वांही आथी ॥ ४७ ॥ समर्थाचिये पंक्तिभोजनें । तळिल्या वरिल्या एक पक्वान्नें । तेवि श्रवणें अर्थें पठणें । मोक्षचि लाभे ॥ ४८ ॥ ऐसा गीतावैष्णव प्रासाद । अठरावा अध्याय कळस विशद[36] । त्यां म्हणितला हा भेद । जाणोनियां ॥ ४९ ॥ आतां सप्तदशापाठीं[37] । अध्याय कैसेनि उठी । तो संबंध सांगों दिठी । दिसे तैसा ॥ ५० ॥ कां गंगायमुनाउदक । वोघबळें[38]

---

१ गीताशास्त्र. २ वर्णिला, 'वायिला' या पाठीं घातला, अर्पिला. ३ श्रीवेदव्यासानें. ४ शिखरापेक्षां श्रेष्ठ. ५ श्रेष्ठ कारागीर, सुतार. ६ जमिनींत. ७ धर्म, अर्थ, काम यांचा. ८ चाराचुरा. ९ गाळ. १० आवार. ११ एकत्र. १२ चिरे वगैरे साहित्य. १३ कृष्णार्जुनसंवाद. १४ चातुर्यानें. १५ अंतर्मुखतेची कारागिरी. १६ सांडण्यानें. १७ आकार. १८ मोक्षमर्यादेचा. १९ पंधरा अध्यायरूप थरांनीं पूर्ण सिद्ध झालेल्या. २० गळमण्याचा आकार. २१ कळसाची बैठक. २२ आपोआप. २३ विस्तार. २४ लांबीरुंदीचें प्रमाण. २५ पूर्णता. २६ काम राहिलें नाहीं. २७ स्पष्ट. २८ सांगे. २९ कारागिरीनें. ३० तयार करून. ३१ नुसत्या पाठेकरून. ३२ विडावैसा. ३३ गर्भगृहांत. ३४ त्वरेनें. ३५ बरोबरी. ३६ स्पष्ट. ३७ आरंभापासून सत्तराव्या अध्यायापर्यंत. ३८ ओघाच्या बळानें.

वेगळिक । दावी होऊनि एक । पाणीपणें ॥ ५१ ॥ न मोडतां दोन्ही आकार । घडिलें एक शरीर । हें अर्धनारीनटेश्वर । रूपीं दिसे ॥ ५२ ॥ ना ना वाढली दिवसें । काळा[1] बिंबीं पैसे[2] । परि सिनाने[3] लेवे[4] जैसे । चंद्रीं नाहीं ॥ ५३ ॥ तैसीं सिनानीं चारी पैंदें[5] । श्लोकें श्लोकावच्छेदें । अध्याय अध्यायभेदें । गमे कीर ॥ ५४ ॥ परि प्रमेयांची[6] उजरी । आनान रूप न धरी । नाना रत्नमणीं दोरी । एकचि जैसी ॥ ५५ ॥ मोतियें मिळोनि बहुवें । एकावळीचा पाड आहे । परि शोभे रूप होये । एकचि तेथ ॥ ५६ ॥ फुलां फुलसरां लेख चढे । वृंतीं दुजी अंगुळी न पडे । श्लोक अध्याय तेणें पाडें । जाणावे हे ॥ ५७ ॥ सात शतें श्लोक । अध्यायां अठरांचे लेख । परी देव बोलिले एक । जें दुजें नाहीं ॥५८॥ आणि म्यांही न सांडोनि ते सोयें । ग्रंथव्यक्ती केली आहे । प्रस्तुत तेंचें निर्वाहें । निरूपण आइका ॥ ५९ ॥ तरी सतरावा अध्याव । पावतां पुरता ठाव । जे संपतां श्लोकीं देव । बोलिले ऐसें ॥ ६० ॥ अर्जुना ब्रह्मनामाच्याविखीं । बुद्धी सांडूनि आस्तिकीं । कर्में किजती तितुकीं । असतें होतीं ॥ ६१ ॥ हा ऐकोनि देवाचा बोल । अर्जुना आला डोल । ह्मणे कर्मनिष्ठा मळ । ठेविला देखों ॥ ६२ ॥ तो अज्ञानांध तंत्र बापुडा । ईश्वरचि न देखे एवढा । तेथ निविक पुढां । कां सुझे तया ॥ ६३ ॥ आणि रज तमें दोन्हीं । गेलियावीण श्रद्धा सौनी । ते कां लागे अभिधानीं । ब्रह्माचिये ॥ ६४ ॥ मग कोतीं खेवें देणें । वातेंवरीलें धांवणें । सांडीं पडे खेळवणें । नागिणीचें तें ॥ ६५ ॥ तैसीं कर्में दुवाडें । तयां जन्मांतराची कडे । दुमैळौवे येवढे । कर्मामाजी ॥ ६६ ॥ ना विपायें हें उंजू होये । तरि ज्ञानाची योग्यता लाहे । येऱ्हवीं येणेंचि जाये । निरयीलया ॥ ६७ ॥ कर्मीं हेंयवरी । आहाती बहुवा अवसरी । आतां कर्मठां कें ये वैरी । मोक्षाची हे ॥ ६८ ॥ तरी फिटो कर्मांचा पांग । कीजो अवघाचि त्याग । आदरीं जो अव्यंग । संन्यास हा ॥ ६९ ॥ कर्मबाधेंचिया कहीं । जेथ भयाची गोठी नाहीं । तें आत्मज्ञान जिहीं । स्वाधीन होय ॥ ७० ॥ ज्ञानाचे आवाहनमंत्र । जे ज्ञानपिक तें सुक्षेत्र । ज्ञान आकर्षितेसूत्र । तंतु जे कां ॥ ७१ ॥ ते दोनी संन्यास त्याग । अनुष्टूनि सुटे जग । तरी हेंचि आतां चांग । व्यक्त पुसों ॥ ७२ ॥ ऐसें ह्मणोनि

१ प्रसार पावे. २ वेगळे लेप. ३ चरण. ४ छंद. ५ विषयाची. ६ रत्नांत किंवा मण्यांत. ७ फुलांतील दोरा. ८ सुगंधींत. ९ मार्ग. १० स्पष्टीकरण. ११ श्रद्धावंतांनीं. १२ वाईट. १३ प्रेमा. १४ कर्मावर श्रद्धा ठेवणारास दोष. १५ क्षणभर. १६ समजे. १७ अल्प. १८ भाल्याला, शस्त्राला. १९ आलिंगन. २० दोरीवर, शब्दावरील. २१ मरणास कारण होय. २२ कठीण. २३ मेळ नसणें. २४ कदाचित्. २५ यथासांग. २६ नरकस्थानास. २७ येथपर्यंत. २८ समय. २९ कर्म करणाराला. ३० प्राप्ति. ३१ पराधीनता. ३२ सांगोपांग. ३३ आमंत्रणचिठी. ३४ उत्तम भूमि. ३५ ओढणारे कळदोरे. ३६ स्पष्ट.

पार्थें । त्याग संन्यासव्यवस्थे । रूप[1] होआवया जेथें । प्रश्न केला ॥ ७३ ॥ तेथ प्रत्युत्तरें बोली । श्रीकृष्णें जे चावळिली[2] । तया व्यक्ती जाली । अष्टादशा ॥ ७४ ॥ एवं जन्यजनकभावें[3] । अध्याय अध्यायातें प्रसवे । आतां ऐका बरवें । पुसिलें जें ॥ ७५ ॥ तरि पंडुकुमरें तेणें । देवाचें सरतें[4] बोलणें । जाणोनि अंतःकरणें । काणी[5] घेतली ॥ ७६ ॥ येऱ्हवीं तत्त्वविषयीं भला । तो निश्चित असे कीर जाहला । परि देवो राहे उगला[6] । तें साहावेना ॥ ७७ ॥ वत्स धालयाही[7] वरी । धेनु न वचावी[8] दुरी । अनन्य प्रीतीची परी । ऐसी आहे ॥ ७८ ॥ तेणें काजेंवीणही बोलावें । तें देखिलें तरी पाहावें । भोगितां चाड दुणावें । पढियंतयाठायीं[9] ॥ ७९ ॥ ऐसी प्रेमाची हे जाती । आणि पार्थ तंव तेचि मूर्ती । म्हणूनि करूं लाहे खंती । उगेपणाची ॥ ८० ॥ आणि संवादाचेनि मिषें । जे अव्यवहार[10] वस्तु असे । तेचि भोगिजे कीं जैसें । दर्पणीं रूप ॥ ८१ ॥ मग संवाद तोही पौरूखे[11] । तरि भोगितां भोगणें थोके[12] । हें कां सोहावेल[13] सुखें । लांचावलेया[14] ॥ ८२ ॥ यालागीं त्याग संन्यास । पुसावयाचें घेऊनि मिस । मग उपलविलें[15] हुंस[16] । गीतेचें तें ॥ ८३ ॥ अठरावा अध्याय नोहे । हे एकाध्यायी गीताचि आहे । जैं वत्सचि धेनू दुहे । तैं वेळ कायसी ॥ ८४ ॥ तैसी संपतां अवसरीं । गीता आदरविली माघारीं । स्वामि भृत्याचा न करी । संवाद काई ॥ ८५ ॥ परि हें असो ऐसें । अर्जुनें पुसिजत असे । म्हणे विनंती विश्वेशें । अवधारिजो[17] ॥ ८६ ॥

**अर्जुन उवाच–संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥**

हां जी संन्यास आणि त्याग । इयां दोहीं एके अर्थी लोंग[18] । जैसा संघात आणि संघ । संघातेंचि बोलिजे ॥ ८७ ॥ तैसेंचि त्यागें आणि संन्यासें । त्यागचि बोलिजत असे । आमचेनि तंव मानसें । जाणिजे हेंचि ॥ ८८ ॥ ना कांहीं आथी[19] अर्थभेद । तो देव करोतु विशद[20] । तेथ म्हणती श्रीमुकुंद । भिन्नचि पैं ॥ ८९ ॥ तरि अर्जुना तुझ्या मनीं । त्याग संन्यास दोनी । एकार्थ गमले हें मानीं । मीही साच ॥ ९० ॥ इहीं दोहीं कीर शब्दीं । त्यागचि बोलिजे त्रिशुद्धी[21] । परि कारण एथ भेदीं । येतुलेंचि ॥ ९१ ॥ निपटूनि[22] कर्म सांडिजे । तें सांडणें संन्यास म्हणिजे । फळ मात्र कां त्यजिजे । तो त्याग गा ॥ ९२ ॥ तरी कोणा कर्माचें फळ । सांडिजे कोण कर्म केवळ । हेंही सांगों विवळ[23] । चित्त देईं

---

१ स्पष्टीकरण. २ बोलिली. ३ कार्यकारणभावानें. ४ शेवटचें. ५ क्लेश. ६ गप्प. ७ तृप्त झाल्यावर. ८ जावी. ९ आवडत्याच्याठायीं. १० पारमार्थिक. ११ राहे. १२ थांबे. १३ सहन करवेल. १४ संवकलेल्याला. १५ विस्तार केलें. १६ तात्पर्य. १७ ऐकावी. १८ संबंध. १९ असेल. २० स्पष्ट करोत. २१ निश्चयानें. २२ सर्वथैव. २३ स्पष्ट.

॥ ९३ ॥ तरि आपैसीं दांगें[1] डोंगर । झाडें लागती अपार । तैसे लोंबे[2] राजांगर[3] । नुठिती ते ॥ ९४ ॥ न पेरितां सैंघें[4] तृणें । उठती तैसें साळीचें होणें । नाहीं गा रोंबाउणें[5] । जियापरी ॥ ९५ ॥ कां अंग जाहालें सहजें । परि लेणें उद्यमें[6] कीजे । नदी आपैसी आपाविजे[7] । विहिरी जेवि ॥ ९६ ॥ तैसें नित्य नैमित्तिक । कर्म होय स्वाभाविक । परि न कामितां[8] कामिक । न निफजे[9] ॥ ९७ ॥

श्रीभगवानुवाच–**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥**

कां कामनेचेंचि वैळवाडें[10] । जें उभारावया घडे । अश्वमेधादिक फुडे[11] । याग जेथ ॥ ९८ ॥ वापी[12] कूप आराम[13] । अग्रहारें[14] हन महाग्राम । आणीकही नानासंभ्रम । व्रतांचे ते ॥ ९९ ॥ ऐसें इष्टापूर्त[15] सकळ । जया कामना एक मूळ । जें केलें भोगवी फळ । बांधोनियां ॥ १०० ॥ देहाचिया गांवा आलिया । जन्ममृत्यूचिया सोहळया । ना ह्मणों नये धनंजया । जियापरी ॥ १ ॥ कां लल्लाटीचें[16] लिहिलें । न मोडे गा कांहीं केलें । काळेंगोरेंपण धुतलें । [17]फिटों नेणे ॥ २ ॥ केलें काम्य कर्म तैसें । फळ भोगावया धरणें बैसे । न फेडितां ऋण जैसें । वोसंडीना[18] ॥ ३ ॥ कां कामनाही न करितां । अवसांत[19] घडे पंडुसुता । तरि वायंकांड[20] झुंझतां । लागे जैसें ॥ ४ ॥ गुळ नेणतां तोंडीं । घातला देचि गोडी । आगी मानूनि राखोंडी । चेंपिला [21]पोळी ॥ ५ ॥ काम्यकर्मीं हें एक । सामर्थ्य आथी स्वाभाविक । ह्मणोनि नको कौतुक । मुमुक्षू एथ ॥ ६ ॥ किंबहुना पार्था ऐसें । जें काम्य कर्म गा असे । तें त्यजिजे विष जैसें । वोकूनियां ॥ ७ ॥ मग तया त्यागातें जगीं । संन्यास ऐसया [22]भंगीं । बोलिजे अंतरंगीं । सर्वद्रष्टा ॥ ८ ॥ हें काम्य कर्म सांडणें । तें कामनेतेंचि उपडणें । द्रव्यत्यागें देवडणें[23] । भय जैसें ॥ ९ ॥ आणि सोमसूर्यग्रहणें[24] । येऊनि करविती पार्वणें[25] । कां मातापितरमरणें । अंकित जे दिवस ॥ ११० ॥ अथवा अतिथी हन पावे । हें ऐसैसें पडे जें करावें । तें तें कर्म जाणावें । नैमित्तिक गा ॥ ११ ॥ वार्षियां[26] क्षोभे गगन । वसंतें दुणावे वन । देहा शृंगारी यौवन[27]- । दशा जैसी ॥ १२ ॥ कां सोमकांत[28] सोमें पघळे । सूर्यें फांकतीं कमळें । एथ असतेंचि पाल्हाळे[29] । आन नये

१ अरण्यें. २ पाणी घातलेलें लांबीचें भात. ३ बाग. ४ बहुत. ५ शेतांत राब घालतात त्यावांचून. ६ उद्योगानें. ७ संपादावी. ८ न इच्छितां. ९ उत्पन्न होत नाहीं. १० विस्तार. ११ स्पष्ठ. १२ पुष्करिणी. १३ बाग. १४ इनामें. १५ इष्ट = यज्ञादि, पूर्त = कूप, तलाव, बाग आदि. १६ नशिबांतील. १७ नाहींसें होऊं शकत नाहीं. १८ सोडीत नाहीं. १९ अकस्मात्. २० बाण. २१ पोळते. २२ खुणेनें. २३ घालविणें. २४ चंद्रसूर्यग्रहणादिक. २५ पर्वणीचे दिवस. २६ पर्जन्यकाळीं. २७ तारुण्य. २८ चंद्रकांतमणि चंद्रकिरणांनीं द्रवतो. २९ विस्तारे.

॥ १३ ॥ तैसें नित्य जें कां कर्म[1] । तें निमित्ताचे लाहे नियम । एथ उंचावे तेणें नाम । नैमित्तिक होय ॥ १४ ॥ आणि सायंप्रातर्मध्याह्नीं । जें कां करणीय[2] प्रतिदिनीं । परि दृष्टि जैसी लोचनीं । अधिक नोहे ॥ १५ ॥ कां नापादितां[3] गती । चरणीं जैसी आथी । ना तरी ते दीप्ती । दीपबिंबीं ॥ १६ ॥ वास नेदितां[4] जैसें । चंदनीं सौरभ्य[5] असे । अधिकारांचें[6] तैसें । रूपचि जें ॥ १७ ॥ नित्य कर्म ऐसें जनीं । पार्था बोलिजे तें मानी । एवं नित्य नैमित्तिक दोन्हीं । दाविलीं तुज ॥ १८ ॥ हेंचि नित्य नैमित्तिक । अनुष्ठेय[7] आवश्यक । ह्मणोनि ह्मणों पाहती एक । वांझ[8] ययातें ॥ १९ ॥ परी भोजनीं जैसें होये । तृप्ती लाभे भूक जाये । तैसें नित्य नैमित्तिकीं आहे । सर्वांगीं फळ ॥ १२० ॥ कीडे[9] आंगिठा पडे । तरि मळ तुटे वानी[10] चढे । यथा कर्मा तया सांगडें[11] । फळ जाणावें ॥२१॥ जे प्रत्यवाय[12] तंव गळे । स्वाधिकार बहुवें उजळे । तेथ हांतोफाळिया[14] मिळे । सद्गतीसी ॥ २२ ॥ येवढेवरी[15] ढिसाळ[16] । नित्यनैमित्तिकीं आहे फळ । परि तें त्यजिजे मूळ । नक्षत्रीं जैसें ॥ २३ ॥ लता पिके आघवी । तंव चेंयूत[17] बांधे पालवी । मग हात न लावित माधवी । सोडूनि घाली ॥ २४ ॥ तैसी नोलांडितां कर्मरेखा । चित्त दीजे नित्यनैमित्तिका । परी फळा कीजे अशेखा । वांतिचिये[18] वानी ॥ २५ ॥ यया कर्मफळत्यागातें । त्याग ह्मणतीं पैं जाणते । एवं त्याग संन्यास तूतें । परिसविले ॥ २६ ॥ हा संन्यास जैं संभवे । तैं काम्य बांधूं न पवे । निषिद्धें[19] तंव स्वभावें । निषिद्धें गेलें ॥ २७ ॥ आणि नित्यादिक जें असे । तें येणें फळत्यागें नाशे । शिर लोटलियां[20] जैसें । येर आंग ॥ २८ ॥ मग सस्य[21] फळपाकांत । तैसें निमालिया कर्मजात । आत्मज्ञान गिंवसितें[22] । अपैसें ये ॥ २९ ॥ ऐसिया निगुती[23] दोनी । त्याग संन्यास अनुष्ठानीं । पडले गा आत्मज्ञानीं । बांधती पाट[24] ॥ १३० ॥ ना तरी हे निगुती[25] चुके । मग त्याग कीजे हातितुकें[26] । तें कांहीं न त्यजे अधिकें । [27]गोवींचि पडे ॥ ३१ ॥ जें औषध व्याधी अनोळख । तें घेतलिया पुरतें[28] विख । कां अन्न न मानितां भूक । न मारी काय ॥ ३२ ॥ ह्मणोनि त्याज्य जें नोहे । तेथ त्यागातें[29] न सुंवावें[30] । त्याज्यालागीं नोहावें । लोभपर ॥ ३३ ॥ चुकलिया त्यागाचें वेझें[31] । केला सर्वत्यागही होय वोझें । निषिद्धें त्या सर्वत्र जुंझें । वीतरागि[32] ते ॥ ३४ ॥

---

१ त्रिकाळ करण्याचीं नित्य कर्में. २ करावयास योग्य. ३ न चालतां. ४ आश्रय न देतां. ५ सुगंध. ६ कर्ता, कर्म. ७ केलेंच पाहिजे. ८ निर्फळ. ९ हीण. १० अप्रीत. ११ कस. १२ प्रमाणें. १३ दोष. १४ हां हां ह्मणतां, जलदी. १५ येथवर. १६ मोठें. १७ आंब्याचें झाड. १८ ओकारीसारखें. १९ निषिद्धकर्म. २० तोडिलें असतां. २१ धान्य पिकेपर्यंतच ज्यांचें आयुष्य असतें अशा साळी वगैरे औषधी. २२ शोधीत. २३ युक्तीनें. २४ योग्यता. २५ युक्ति. २६ अटकळीनें. २७ गुंतांड्यांत. २८ होतें. २९ अत्याज्याचा त्याग व त्याज्याचा लोभ हीं नसावीं. ३० घालावें. ३१ युक्ति. ३२ वैराग्यसंपन्न.

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥**

एकां फळत्याग न[1] ठाके । तें कर्मातें ह्मणती बंधकें । जैसें आपण नग्न भांडकें[2] । जगातें ह्मणे ॥ ३५ ॥ कां जिव्हालंपट रोगिया । अन्नें दूषी धनंजया । आंगा न रुसे कोढिया[3] । मासियां कोपे ॥ ३६ ॥ तैसें फळकाम[4] दुर्बळ । ह्मणती कर्मचि किडाळ[5] । मग निर्णय देती केवळ । त्यजावें ऐसा ॥ ३७ ॥ एक ह्मणती यागादिक । करावेंचि आवश्यक । जे यावांचूनि शोधक[6] । आन नसे ॥ ३८ ॥ मनशुद्धीच्या मार्गीं । जैं विजयी व्हावें वेगीं । तैं कर्म सबळालागीं[7] । आळस न कीजे ॥ ३९ ॥ भांगार[8] आधि शोधावें । तरी आगी जेविं नुबगावें[9] । कां दर्पणालागीं सांचावें[10] । अधिक रज[11] ॥ १४० ॥ नाना वस्त्रें चोख[12] होआवीं । ऐसें आर्थी जरी जीवीं । तरी संवदणी[13] न मानावी । मलिन जैसी ॥ ४१ ॥ तैसीं कर्मे क्लेशकारें । ह्मणोनि न न्यावीं अव्हेरें[14] । कां अन्नलाभें अरुवारें[15] । रांधितिये[16] उणें ॥ ४२ ॥ इहीं इहीं गा शब्दीं । एक कर्मीं बांधती बुद्धी । ऐसा त्याग विसंवादीं[17] । पडोनि ठेला ॥ ४३ ॥ तरि विसंवाद तो फिटे । त्यागाचा निश्चय भेटे । तैसें बोलों गोमटें । अवधान देईं ॥ ४४ ॥

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥**

तरि त्याग एथें पांडवा । त्रिविध पैं जाणावा । तया त्रिविधाही बरवा । विभाग करूं ॥ ४५ ॥ त्यागाचे तीन्ही प्रकार । कीजती जरी गोचर । तरी तूं ऐश्वर्यार्थाचें[18] सार । इतुलें जाण ॥४६॥ मज सर्वज्ञाचियेही बुद्धी । जें आलोट[19] माने त्रिशुद्धी । निश्चयतत्त्व तें आधीं । अवधारीं पां ॥ ४७ ॥ तरि आपुलीये सोडवणे । जो मुमुक्षू जागों ह्मणे । तया सर्वस्वें करणें । हेंचि एक ॥ ४८ ॥

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥**

जियें यज्ञदानतपादिकें । इयें कर्मे आवश्यकें । तियें न सांडावीं पांथिकें[20] । पाउलें जैसीं ॥ ४९ ॥ हरपलें न देखिजे । तंव तयाचा मागु न सांडिजे । कां तृप्त न होतां न

---

१ साधत नाहीं. २ भांडखोर. ३ कुष्टरोगी. ४ फलेच्छु. ५ हीन. ६ शुद्धि करणारें. ७ बळकट. ८ सोनें. ९ न कंटाळावें. १० संग्रह करावें. ११ मळ. १२ स्वच्छ. १३ धोब्याचें कापडे धुण्याचें भांडें. १४ हेळसांडीनें. १५ सुंदर. १६ रांधल्याशिवाय. १७ विरुद्धवादांत. १८ तात्पर्याचें. १९ खरें. २० मार्गस्थानें.

लोटिजे । भाणें जेविं ॥ १५० ॥ नाव थडी न पवतां । न सांडिजे केळी न फळतां । कां ठेविलें न दिसतां । दीप जैसा ॥ ५१ ॥ तैसी आत्मज्ञानविखीं । जंव निश्चिती नाहीं निकी । तंव नोहावें यागादिकीं । उदासीन ॥ ५२ ॥ तरि स्वाधिकारानुरूपें । तियें यज्ञदानें तपें । अनुष्ठावींचि साक्षेपें । अधिकेंवर ॥ ५३ ॥ जें चालणें वेगौवत जाये । तो वेग बैसावयाचि होये । तैसा कर्मातिशय आहे । नैष्कर्म्यालागीं ॥ ५४ ॥ अधिकें जंव जंव औषधी । सेवायाची मांडी बांधी । तंव तंव मुकिजे व्याधी । तयाचिये ॥ ५५ ॥ तैसीं कर्मे हातोपातीं । जैं कीजती यैथानिगुती । तैं रजतमें झडती । झाडा देऊनि ॥ ५६ ॥ कां पाठोवाटीं पुटें । भांगारा खार देणें घटे । तैं कीडें झडकरी तुटे । निर्व्याज होय ॥ ५७ ॥ तैसें निष्ठा केलें कर्म । तें सांडी करूनि रजतम । सत्वशुद्धीचें धाम । डोळां दावी ॥ ५८ ॥ म्हणोनियां धनंजया । सत्वशुद्धी गिंवसीतया । तीर्थांचिया सांवाया । आलीं कर्मे ॥५९॥ तीर्थें बाह्यमळ क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे । एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंचि ॥ १६० ॥ तृषार्ता मरुदेशीं । झेंळे अमृतें वोळलीं जैसीं । कीं अंधालागीं डोळयांसीं । सूर्य आला ॥ ६१ ॥ बुडतया नदीच धाविन्नली । पडतया पृथ्वीच कळवाळिली । निमतेया मृत्यूनें दिधली । आयुष्यवृद्धी ॥ ६२ ॥ कर्मे कर्मबद्धता । मुमुक्षू सोडविले पंडुसुता । जैसा रसरीति मरतां । राखिला विषें ॥ ६३ ॥ तैसीं एकें हातवटिया । कर्मे कीजती धनंजया । बंधकेंचि सोडवावया । मुख्यें होतीं ॥ ६४ ॥ आतां तेचि हातवटी । तुज सांगों गोमटी । जया कर्मातें किरीटी । कर्मेचि रुसे ॥ ६५ ॥

**एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥**

तरि महायागप्रमुखें । कर्मे निफजतांही अचुकें । कर्तेपणाचें न ठाकें । फुंजेंणें आंगीं ॥ ६६ ॥ जो मोलें तीर्थां जाये । तया मी यात्रा करित आहें । ऐसिये श्लाघ्यतेचा नोहे । तोष जेवीं ॥ ६७ ॥ कां मुद्रा समर्थाचिया । जो एकवटु झोंबे राया । तो मी जिणेता ऐसिया । नयेचि गर्वा ॥ ६८ ॥ जो कांसे लागोनि तरे । तया पोहती ऊर्मी तुरें । पुरोहित नाविकेंरे । दातेपणें ॥ ६९ ॥ तैसें कर्तृत्व अहंकारें । नेघोनि यथा अवसरें । कृत्यजातांचे मोहरे । सारीजती ॥ १७० ॥ केल्या कर्मा पांडवा । जो आथी फळाचा यांवा । तया

१ भोजन. २ चांगली. ३ अधिक अधिक. ४ वाढत. ५ कमर बांधतो. ६ लवकर, वारंवार. ७ विधिपूर्वक. ८ एकामागें एक. ९ हीन. १० निर्दोष. ११ सत्वशुद्धीची इच्छा करण्यास. १२ बरोबरीस. १३ मारवाड देशांत. १४ उन्हाचे चटके. १५ उदकें. १६ मरणारास. १७ रसायनाप्रमाणें. १८ हातोटीनें. १९ दूर करी. २० गर्व, अहंकार. २१ स्तुतीचा. २२ एकटा. २३ जिंकणारा. २४ अभिमान. २५ आवेश न बाळगी. २६ बुद्धिबळांतील मोहऱ्यांप्रमाणें. २७ प्राप्ति.

मोहेरा हों नेदावा । मनोरथ ॥ ७१ ॥ आधींचि फळीं आस तुटिया । कर्मं आरंभावीं धनंजया । परावें[2] बाळ धायां[3] । पाहिजे जैसें ॥ ७२ ॥ पिंपरुवांचिया[4] आशा । न शिंपिजे पिंपळ जैसा । तैसिया फळनिराशा । कीजती कर्मे ॥ ७३ ॥ सांडूनि दुधाची[5] टकळी । गोंवारी[6] गांवधेनु वेंटाळी । किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे ॥ ७४ ॥ ऐसी हे हातवटी । घेऊनि जे क्रिया उठी । आपणा आपुलिया गांठीं । लाहेचि तो ॥ ७५ ॥ म्हणोनि फळीं लाग । सांडोनि देहसंग । कर्मे करावीं हा चांग । निरोप माझा ॥ ७६ ॥ जो जीवबंधें शीणला । सुटके जोंचे आपला । तेणें पुढतपुढती या बोला । आन न कीजे ॥ ७७ ॥

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥**

ना तरी आंधाराचेनि[10] रोखें । जैसीं डोळां रोविजती नखें । तैसा कर्मद्वेषें अशेखें । कर्मेचि सांडी ॥ ७८ ॥ तयाचें कर्मसांडणें । तें तामस मी म्हणें । शिसैशाचे[11] रागें लौवणें[12] । शिसचि जैसें ॥ ७९ ॥ हां गा मार्ग दुवाड[13] होये । तरी निस्तरितील[14] पाये । कीं तेचि खांडणें[15] आहे । मार्गापराधें ॥ १८० ॥ भुकेलिया पुढें अन्न । हो कां भलतैसें ऊन्ह । तरी बुद्धी न घेतां लंघन । भाणें पाँपि[16] राहाल्या ॥ ८१ ॥ तैसा कर्माचा बाँध[17] कर्मे । निस्तरिजे करितेनि वर्मे । हें तामस नेणें भ्रमें । माजविला ॥ ८२ ॥ कीं स्वभावें आलें विभागा । तें कर्मचि[18] वोसंडी पैंगा । तरि म्हणें ओतला[19] त्यागा । तामसा तया ॥ ८३ ॥

**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥**

अथवा स्वाधिकार बुझे । आपलें विहितही सुझे[21] । परि करितया उबजे[22] । निबरपणा[23] ॥ ८४ ॥ जे कर्माची ऐलीकडे[24] । नावेकें[25] दिसे दुवाड । जे वाहतिये वेळे जड । शिदोरी जैसी ॥ ८५ ॥ जैसा निंब जिभे कडवट । हिरडा पहिलें तुरट । तैसा कर्मा ऐल सेवट । खेणुवाळा[26] होय ॥ ८६ ॥ कां धेनू दुवाड शिंग । [27]शेवंतिये ओंडव[28] आंग । भोजनसुख महाग । पाक करितां ॥ ८७ ॥ तैसें पुढतपुढती कर्म । आरंभींच अतिविषम । म्हणोनि तो तें श्रम । करितां मानी ॥ ८८ ॥ येऱ्हवीं विहितत्वें मांडी । परि घालितां ओसुरवाडी[29] ।

---

१ मार्गी. २ दुसऱ्याचें. ३ दाईनें. ४ पिंपळफळाच्या. ५ इच्छा. ६ गुराख्या. ७ संबंध. ८ अभिमान. ९ काळजी धरी. १० रोषानें. ११ अर्धशिशी. १२ कापणें. १३ दुर्गम. १४ चालूं न सकतील. १५ तोडणें. १६ लाथेनें हाणावें. १७ दोष. १८ त्यागी. १९ प्राप्त झाला. २० समजे. २१ पाहे. २२ उपजे. २३ कठीणपणास. २४ प्रारंभ. २५ क्षणभर. २६ कठीण. २७ शेवंतीच्या झाडास. २८ वाईट. २९ श्रमामुळें.

तेथ पोळला ऐसा सांडी । आदरिलेंही ॥ ८९ ॥ ह्मणे वस्तु देहासारिखी । आली बहुतीं भाग्यविशेखीं । मा जोचु कां कर्मादिकीं । पापिया जैसा ॥ १९० ॥ केलें कर्मी जें जातें । तें ह्मणें मज होआवें । आजि भोगुं ना बरवे । हातिंचे भोग ॥ ९१ ॥ ऐसा शरीराचिया क्लेशा । भेणें कर्म वीरेशा । सांडी तो परियेसा । राजस त्याग ॥ ९२ ॥ येऱ्हवीं तेथही कर्म सांडे । परि तया त्यागफळ न जोडे । जैसें उतलें आगीं पडे । तें नलगेचि होमा ॥ ९३ ॥ कां बुडोनि प्राण गेले । ते अर्धोदकीं निमाले । हें ह्मणों नये जाहालें । दुर्मरणचि ॥ ९४ ॥ तैसें देहाचेनि लोभें । जेणें कर्मा पाणी सुंभे । तेणें साच न लभे । त्यागाचें फळ ॥ ९५ ॥ किंबहुना आपुलें । जैं ज्ञान होय उदया आलें । तैं नक्षत्रातें पाहिलें । गिळी जैसें ॥ ९६ ॥ तैशा सकारण क्रिया । हारपती धनंजया । तो कर्मत्याग ये जया । मोक्षफळासी ॥ ९७ ॥ तें मोक्षफळ अज्ञाना । त्यागिया नाहीं अर्जुना । ह्मणोनि तो त्याग न माना । राजसु तो ॥ ९८ ॥ तरि कोणे पां पृथ त्यागें । तें मोक्षफळ घर रिघे । हेंही आइक प्रसंगें । बोलिजेल ॥ ९९ ॥

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।**
**संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्विको मतः ॥ ९ ॥**

तरि स्वाधिकाराचेनि नांवें । जें वांटिया आलें स्वभावें । तें आचरे विधिगौरवें । शृंगारोनि ॥ २०० ॥ परि हें मी करित असें । ऐसा आठव त्यजी मानसें । तैसेंचि पाणी दे आशे । फळाचिये ॥ १ ॥ पैं अवज्ञा आणि कामना । मातेच्या ठायीं अर्जुना । केलिया दोनी पतना । कारण होती ॥ २ ॥ तरि दोनी ये त्यजावीं । मग मातेचि ते भजावी । वांचूनि मुखालागीं वाळावी । गायचि सगळी ॥ ३ ॥ आवडतियेही फळीं । असारें साली आंठोळी । त्यासाठीं अवगळी । फळातें कोण्ही ॥ ४ ॥ तैसा कर्तृत्वाचा मदु । आणि कर्मफळाचा आस्वादु । या दोहींचें नांव बंधु । कर्माचा कीं ॥ ५ ॥ तरि या दोहींच्या विखीं । जैसा बाप नातळे लेंकीं । तैसा हों न शके दुःखी । विहितीं क्रिया ॥ ६ ॥ हा तो त्याग तरुवर । जो गा मोक्षफळें ये थोर । सात्विक ऐसा डंगर । यासींच जगीं ॥ ७ ॥ आतां जाळूनि बीज जैसें । झाडा कीजे निर्वंशें । फळ त्यागूनि कर्म तैसें । त्यजिलें जेणें ॥ ८ ॥ तया लौगतखेंवो परिसीं । धातूचि गंधि[19] काळिमा जैसी ।

---

१ कशासाठीं जाच सोसूं. २ पूर्वी जें दिलें आहे तेंच मला मिळावें असें आहे. ३ ऊत आलेलें. ४ जलसमाधीसारख्या पुण्यरूप मरणानें मेले. ५ घातलें जातें. ६ सूर्योदय. ७ आपल्या वर्णाश्रमाप्रमाणें. ८ हात देणें, तिलांजलि देणें. ९ नरकपातास. १० त्यजावी. ११ बी. १२ त्यागी. १३ गर्व. १४ स्वधर्माचरणानें. १५ प्रसिद्धि. १६ वृक्षाला. १७ स्पर्शतांच. १८ परिसास. १९ अमंगळ काळिमा.

जाती रजतमें तैसीं । तुटलीं दोन्ही ॥ ९ ॥ मग सत्वें चोखाळें । उघडती आत्मबोधाचे डोळे । तेथ मृगांबु सांजवेळे । होय जैसें ॥ २१० ॥ तैसा बुद्ध्यादिकांपुढां । भसतचि विश्वाभास येव्हढा । तो न देखे कवणीकडां । आकाश जैसें ॥ ११ ॥

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**
**त्यागी सत्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥**

आणि प्राचीनाचेनि बळें । आलीं कृत्यें कुशलाकुशलें । तियें व्योमाआंगीं आभाळें । विरालीं जैसीं ॥ १२ ॥ तैसीं तयाचिये दिठी । कर्में चोखाळलीं किरीटी । म्हणोनि सुखदुःखीं उटी । पडेना तो ॥ १३ ॥ तेणें शुभकर्म जाणावें । मग तें हर्षे करावें । कां अशुभालागीं व्हावें । द्वेषिया ना ॥ १४ ॥ तरि इया विषयींचा कांहीं । तया एकही संदेह नाहीं । जैसा स्वप्नाच्या ठायीं । जागिन्नलिया ॥ १५ ॥ म्हणऊनि कर्म आणि कर्ता । या द्वैतभावाची वार्ता । नेणे तो पंडुसुता । सात्विक त्याग ॥ १६ ॥ ऐसेनि कर्में पार्था । त्याजिलीं त्यजिती सर्वथा । अधिकें बांधती अन्यथा । सांडिलीं तरी ॥ १७ ॥

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥**

आणि हांगा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची । खंती करिती कर्माची । ते गांवं- गा ॥ १८ ॥ मृत्तिकेचा वीट । घेऊनि काय करील घट । केउतें तंतू पट । सांड ॥ १९ ॥ तेवींचि वन्हित्व आंगीं । आणि उबे उबगणे आगी । कीं तो दीप प्रभेच द्वेष करील काई ॥ २२० ॥ हिंग त्रासला घाणी । तरी कैंचें सुगंधत्व आणी । द्रव स पाणी । कें राहे तें ॥ २१ ॥ तैसा शरीराचेनि आभासें । नांदत जंव असे । तंव क गाचें पिसें । काइसें तरी ॥ २२ ॥ आपण लाविजे टिळा । म्हणोनि पुसों ये अंव मा घोळीं फेडी निडळा । कां करूं येगा ॥ २३ ॥ तैसें विहित स्वयें आदरिलें । ह त्यजूंये त्यजिलें । परि कर्मेचि देह आंतलें । तें कां सांडील गा ॥ २४ ॥ जें श्वासं वरी । होत निजेलियाही वरी । कांहीं न करणेंचि परी । होती जयाची ॥ २५ ॥ राचेनि मिसेंकें । कर्मचि लागलें असिकें । जिता मेलया न ठाके । इया रिती यया कर्मातें सांडिती परी । एकीचि ते अवधारीं । जे करितां न जाइजे हारीं

१ स्वच्छ. २ मृगजळ. ३ प्रारब्ध. ४ बरीं वाईट. ५ त्यागिलीं तींच त्यजिलीं जात. ६ अडाणी. ७ मातीला कंटाळून. ८ कंटाळणें. ९ सहज. १० लावावें. ११ पुसावें. १२ कपाळ १३ व्यापलें. १४ निमित्तें. १५ कर्म करीत असतां फलाशेचे हारीं न जाणें हा एक कर्मत्यागा प्रकार होय.

शोचिये ॥ २७ ॥ कर्मफळ ईश्वरीं अर्पे । तत्प्रसादें बोधें[1] उद्दीपे । तेथ रज्जुज्ञानें लोपे । व्याळशंका ॥ २८ ॥ तेणें आत्मबोधें तैसें । अविद्येशीं कर्म नाशे । पार्था त्यजिजे जें ऐसें । तें त्यजिलें होय ॥ २९ ॥ ह्मणोनि इयापरी जगीं । कर्में त्यजी तो महात्यागी । येर मूर्छनें[2] नांव रोगीं । विश्रांति जैसी ॥ २३० ॥ तैसा कर्मीं शिणे एकीं । तो विसावों पाहे आणिकीं । दांडेयाचे घाय बुकी । धौंडणें[3] जैसें ॥ ३१ ॥ परि हें असो पुढती । तोचि त्यागी त्रिजगतीं । तेणें फळत्यागें निष्कृती[4] । नेलें कर्म ॥ ३२ ॥

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥**

येऱ्हवीं तरी धनंजया । त्रिविधा कर्मफळा गा यया । समर्थ ते कीं भोगावया । जे न सांडितीचि आशा ॥ ३३ ॥ आपणचि विऊनि दुहिता[5] । कीं न मम ह्मणे पिता । तो सुटे कीं प्रतिग्राहिता । जावाई शिरके ॥ ३४ ॥ विषाचे आगरही वाहती । ते विकितां सुटले जिती । येर निमाले जे घेती । वेंचोनि मोलें ॥ ३५ ॥ तैसें कर्ता[10] कर्म करू । अकर्ता फळाशा न धरू । एथ न शके आवरूं । दोहींतें कर्म ॥ ३६ ॥ वाटे पिकलिया वृक्षाचें । फळ अपेक्षी[11] तयाचें । तेंवि साधारण कर्माचें । फळ घेतया ॥ ३७ ॥ परि करूनि फळ नेघे । तो जगाच्या कामीं[12] न रिघे । जे त्रिविध जग अवघें । कर्मफळ हें ॥ ३८ ॥ देव मनुष्य स्थावर । यया नांव जगडंबर । आणि हे तंव तिन्ही प्रकार । कर्म-फळाचे ॥ ३९ ॥ तेंचि एक गा अनिष्ट[13] । एक तें केवळ इष्ट[14] । आणि एक इष्टानिष्ट । त्रिविध ऐसें ॥ २४० ॥ परि विषयमता[15] बुद्धी । आंगीं सूनि अविधी । प्रवर्तती जे निषिद्धीं[16] । कुव्यापारीं ॥ ४१ ॥ तेथ कृमि कीट लोष्ठ[17] । हें देह लाहती[18] निकृष्ट । तया नाम तें अनिष्ट । कर्मफळ ॥ ४२ ॥ कां स्वधर्मा मान देतां । स्वाधिकार पुढां सूतां[19] । सुकृत कीजे पुसतां । आम्नायातें[20] ॥ ४३ ॥ तैं इंद्रादिक देवांचीं । देहें लाहिजती[21] सव्यसाची । तया कर्मफळा इष्टाची । प्रसिद्धी गा ॥ ४४ ॥ आणि गोड आंबट मिळे । तेथ रसांतर फरसाळें[22] । उठी दोहीं वेगळें । दोहीं जिणतें[23] ॥ ४५ ॥ रेचकचि[24] योगवशें । होय स्तंभावेया[25] दोषें । तेंवि सत्यासत्य समरसें[26] । सत्यासत्याचि जिणिजे[27] ॥ ४६ ॥ ह्मणोनि सम-

---

१ ज्ञान प्रगटे. २ मूर्च्छनेस. ३ सोसणें. ४ निष्कर्म स्थितीस. ५ कन्या. ६ दान घेणारा. ७ बाग. ८ वांचती. ९ मेले. १० कर्म करो अथवा अकर्ता असो, कर्मफलाशा सोडील तर दोघांलाही कर्म बाधणार नाहीं. ११ अपेक्षा करणारालाच फळ मिळतें. १२ आशेंत. १३ प्रतिकूल. १४ अनुकूल. १५ विषयप्रिय. १६ कुकर्मीं. १७ मातीचें ढेकूळ. १८ प्राप्त होतीं. १९ घालितां. २० वेदाला. २१ मिळती. २२ भिन्नरुचित्व पावे. २३ मूळच्या दोहीं रसांस जिंकणारें. २४ नाकपुडीनें सोडण्याचा वायु. २५ प्रतिबंध करण्याच्या उद्देशानें. २६ ऐक्यानें. २७ जिंकावें.

भागें शुभाशुभें । मिळोनि अनुष्ठानाचें उभें । तेणें मनुष्यत्व लाभे । तें मिश्र[2] फळ ॥ ४७ ॥ ऐसें त्रिविध यया भागीं । कर्मफळ मांडलेंसे जगीं । हें न सांडी तयां भोगीं । जे सूदले[3] आशा ॥ ४८ ॥ जेथ जिव्हेच्या हातें[4] फांटे । तंव जेवितां वाटे गोमटें । मग परिणामीं शेवटें । अवश्य मरण ॥ ४९ ॥ संवचोर[5] मैत्री चांग । जंव न पविजे तें दांग[6] । सामान्या[7] भली आंग । न शिवे तंव ॥ २५० ॥ तैसीं कर्में करितां शरीरीं । लाहती महत्त्वाची फरारी[8] । पाठीं निधनीं[9] एकसरी । पावती फळें ॥ ५१ ॥ जैसा समर्थ आणि ऋणिया । मार्गीं आला बोंइणिया[10] । न लोटे तैसा प्राणिया । पडे तो भोग ॥ ५२ ॥ मग कणिसौनि[11] कण झडे । तो विरूढला[12] कणिसा चढे । पुढती भूमी पडे । पुढती उठी ॥ ५३ ॥ तैसें भोगीं जें फळ होय । तें फळांतरें वीतें[13] जाय । चालतां पायें पाय । [14]जिणिजे जैसा ॥ ५४ ॥ उताराचिये[15] सांगडी । ठाके ते ऐलीचि[16] थडी । तेवि न सूकीजती[17] वोढी । भोग्याचिये ॥ ५५ ॥ पैं साध्य साधन प्रकारें । फळभोग तो पसरे । एवं [17]गोंविलें संसारें । अत्यागी[18] ते ॥ ५६ ॥ येरवीं जातिपुष्पांचें विकसणें[19] । त्याचि नाम जैसें सुकणें । तैसें कर्ममिषें न करणें । केलें जिहीं ॥ ५७ ॥ बीजाचि [20]वरोसि वेंचे । तेथ वाडसी कुळवाडी[21] खांचे[22] । तेवि फळत्यागें कर्माचें । सारिलें काम ॥ ५८ ॥ ते सत्वशुद्धी साहाकारें । गुरुकृपामृततुषारें । सोसिन्नलेमि[23] वोसरे । द्वैत दैन्य ॥ ५९ ॥ तेव्हां जगदा-भासमिषें । स्फुरे ते त्रिविध फळ नाशे । एथ भोक्ता भोग्य अपैसें । निमालें हें ॥ २६० ॥ घडे ज्ञान प्रधान ऐसा । संन्यास जया वीरेशा । तेचि फळभोग सोसा[24] । मुकले गा ॥ ६१ ॥ आणि येणें कीर संन्यासें । जैं आत्मरूपीं [25]दिठी पैसे । तैं कर्म एक ऐसें । देखणें आहे ॥ ६२ ॥ पडोनि गेलिया भिंती । चित्रांची केवळ होय माती । कां पाहा-लेया[26] राती । आंधारें उरे ॥ ६३ ॥ जैं रूपचि नाहीं उभें । तैं छाया[27] कोह्याची[28] शोभे । दर्पणेंवीण बिंबें । वदन केंपों[29] ॥ ६४ ॥ फिटलियां[30] निद्रेचा ठाव । कैंचा स्वप्नासि प्रस्ताव[31] । मग सत्यकीं तें वाव[32] । कोण म्हणे ॥ ६५ ॥ तैसें गा संन्यासें येणें । तंव [33]अविद्येसीचि नाहीं जिणें । मा तियेचें कार्य कोणें । [34]घेपे दीपे ॥ ६६ ॥ म्हणोनि संन्यासि ये पाहीं ।

---

१ दोनी. २ परस्परांत मिसळलेलें. ३ आशेंत सांपडले. ४ रुचि घेणें वाढे. ५ सोबती चोर. ६ अरण्य. ७ वेश्या. ८ भास. ९ मरणकाळीं. १० वायद्याच्या मुदतीस. ११ कणिसांतून. १२ उगवला असतां. १३ प्रसवत. १४ जिंकावा. १५ उताराची सांगड = होडी वगैरे ज्या जागीं येईल तेथून तिला दुसऱ्या तीरीं गेलेंच पाहिजे, म्हणून तिला पलीकडचें तीर नाहीं. दोनीसमानच. १६ अं तरती. १७ गुंतलें. १८ त्याग न करणारें. १९ प्रफुल्लित होणें. २० पोटगीस. २१ उदीम. २२ नासे. २३ सिद्ध झालेले. २४ दुःख. २५ दृष्टि. २६ उजाडल्यावर. २७ साउली. २८ कशाची. २९ कोठें. ३० पुरे झाल्यावर. ३१ प्रसंग. ३२ मिथ्या. ३३ अज्ञानाला. ३४ घ्यावें व द्यावें.

कर्माची मोठी कीजेल काई । परि अविद्या आपुल्या देहीं । आहे जैं कां ॥ ६७ ॥ कर्ते-पणाचेनि थांवें । आत्मा शुभाशुभीं धांवे । दृष्टि भेदाचिये सांणिवे । रचलीसे जैं ॥ ६८ ॥ तैं तरी गा सुवर्मा । बिजावेंळीं आत्मया कर्मा । अपाडें[4] जैसी पश्चिमा । पूर्वेंसि कां ॥ ६९ ॥ ना तरी आकाशा कां आभाळा । सूर्या आणि मृगजळा । बिजावळी भूतळा । वाऊसि जैसी ॥ २७० ॥ पांघरोनि नईचें[5] उदक । असे नदीमाजि खडक । परि जाणिजे कां वेगळिक । कोडिंची[6] ते ॥ ७१ ॥ हो कां उदकाजवळी । परि सिनीचि[7] ते बाबुळीं । काय संगास्तव काजळीं । दीप ह्मणोंये ॥ ७२ ॥ जरी चंद्रीं जाला कलंक । तरि चंद्रेंसी[8] नव्हे एक । आहे दृष्टी डोळयां विवेक । अपाड[9] जेतुला ॥ ७३ ॥ नाना वाटा वांटे[10] जातया । वोघा वोघीं वाहतया । आरसा आरसां पाहतया । अपाड जेतुला ॥ ७४ ॥ पार्था गा तेतुलेनि मानें । आत्मेनिसीं कर्म सिनें । परि घेवविजे अज्ञानें । तें कीर ऐसें ॥ ७५ ॥ विकाशें[11] रवीतें उपजवी । द्रुती[12] अलीकरवीं[13] भोगवी । ते सरोवरीं कां बरवी । अळिणी[14] जैसी ॥ ७६ ॥ पुढतपुढती आत्मक्रिया[15] । अन्यकारणकाचि[16] तेशिया । करूं पांचाही तया । कारणा रूप ॥ ७७ ॥

**पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥**

आणि पांचही कारणें तियें । तूंही जाणसील विपांयें[17] । जे शास्त्रें उभऊनि बांहे[18] । बोलती जयातें ॥ ७८ ॥ वेदरायाचिया राजधानीं । सांख्यवेदांताच्या भुवनीं । निरूप-णाच्या निशाणध्वनीं । गर्जती जियें ॥ ७९ ॥ जे सर्वकर्म सिद्धीलागीं । इयेंचि मुंदलें[19] हो जगीं । तेथ न सुंवावा[20] अभंगीं । आत्मराज ॥ २८० ॥ इया बोलाचे डांगुरटी[21] । तियें प्रसिद्धी आली किरीटी । ह्मणोनि तुझ्या इन कर्णपुटीं । वसोत कां जें ॥ ८१ ॥ आणि मुखांतरीं आइकीजे । तैसें कायसें हें ओझें । मी चिद्रत्न[22] तुझें । असतां हातीं ॥ ८२ ॥ दर्पण पुढां मांडलेया । कां लोकांचिया डोळया । मान द्यावा पहावया । आपुलें निकें[23] ॥ ८३ ॥ भक्त जैसेनि जेथ पाहे । तेथ तें तेंचि होत जाये । तो मी तुझें जाहालों आहें । खेळणें आजी ॥ ८४ ॥ ऐसें हें प्रीतीचेनि वेगें । देव बोलतां से[24] नेघे । तंव आनंदामाजी आंगें । विरत पार्थ ॥ ८५ ॥ चांदिणियाचा पडिभर[25] ।

---

१ बळानें. २ ऐश्वर्यानें. ३ संबंध. ४ विपरीत. ५ नदीचें. ६ कोटीपटीची. ७ निराळीच. ८ शेवाळ. ९ विलक्षण. १० वाटसरू. ११ प्रकाशें. १२ मकरंद. १३ भ्रमराकडून. १४ कमळीण. १५ आत्म्याच्या ठायीं क्रिया. १६ इतर कारणांनीं उत्पन्न झालेली आहे. १७ कदाचित्. १८ बाहु. १९ भांडवलें. २० न घालावा. २१ दौंडी. २२ ज्ञानरत्न. २३ चांगुलपण. २४ आठवण. २५ भर.

होतां सोमकांताचा डोंगर । [1]विघरोनि सरोवर । हों पाहे जैसा ॥ ८६ ॥ तैसें सुख आणि [2]अनुभूती । या भावांची मोडूनि भिंती । [3]आंतलें अर्जुनाकृती । सुखचि जेथ ॥ ८७ ॥ तेथ समर्थ ह्मणोनि देवों । [4]अवकाश जाहला आठवा । मग बुडतयाचा धांवा । जीवें केला ॥ ८८ ॥ अर्जुना येसणें धेंडें । प्रज्ञापसरेंसीं बुडे । आलें भरतें [5]एवढें । तें [6]सावरूनि ॥ ८९ ॥ देव ह्मणे हां गा पार्था । तूं आपणपें देख सर्वथा । तंव सावरूनि येरें माथा । [7]तुकियेला ॥ २९० ॥ ह्मणे जाणसी दातारा । मी तुजसीं [8]व्यक्तशेजारा । [9]उबगला आदीं [10]एकाहारा । येवों पाहें ॥ ९१ ॥ तयाही हा ऐसा । लोभें देतसा जरी [11]लालसा । तरि कां जी घालीतसा । [12]आडें आड जीवा ॥ ९२ ॥ तेथ श्रीकृष्ण ह्मणती [13]निकें । अद्यापि नाहीं मा ठाउकें । वेड्या आणि चांद्रिके । न मिळणें आहे ॥ ९३ ॥ आणि हाही बोलोनि भावो । तुज दाऊं आह्मी [14]भिवों । जे रुसतां बांधे [15]थोंवो । तें प्रेम गा हें ॥ ९४ ॥ एथ एकमेकांचिये खुणे । [16]विसंवाद तंवाचि जिणें । ह्मणोनि असो हें बोलणें । इयेविषयींचें ॥ ९५ ॥ मग कसकसें तें आतां । बोलत होतों पंडुसुता । सर्वकर्माभिन्नता । आत्मेनिसीं ॥ ९६ ॥ तंव अर्जुन ह्मणे देवें । माझिये मनींचेंचि स्वभावें । [17]प्रस्ताविलें बरवें । [18]प्रमेय तें जी ॥ ९७ ॥ जें सकळकर्मांचें बीज । कारणपंचक तुज । सांगेन ऐसी पैज । घेतली कां ॥ ९८ ॥ आणि आत्मया एथ कांहीं । सर्वथा लाग नाहीं । हें [19]पुढारलासि तें देईं । [20]लेंहाणें माझें ॥ ९९ ॥ यया बोला विश्वेशें । ह्मणितलें तोषें बहुवसें । इयेविषयीं धरणें बैसे । ऐसें कें जोडे ॥ ३०० ॥ तरि अर्जुना निरूपिजेल । तें कीर [21]भाषेआंतुल । परि [22]मेचुये होईजेल । ह्मणिया तुज ॥ १ ॥ तंव अर्जुन ह्मणे देवो । काई विसरले मागील भावो । इये गोठी कीं राखत आहों । मीतूंपण जी ॥ २ ॥ एथ श्रीकृष्ण ह्मणती होकां । आतां अवधानाचा पसर निका । करूनियां आइका । [23]पुढारलों तें ॥ ३ ॥ तरि सत्यचि गा धनुर्धरा । सर्वकर्मांचा उभारा । होतसे [24]बाहिरबाहिरा । [25]करणींपांचें ॥ ४ ॥ आणि पंचकारण दळवाडें । जिहीं कर्माकार मांडे । ते हेतु तंव उघडे । पांच आथि ॥ ५ ॥ येर आत्मतत्त्व उदासीन । तें ना हेतु ना उपादान । ना तें अंगें करी [26]संवाहन । कर्मसिद्धीचें ॥ ६ ॥ तेथ शुभाशुभीं अंशीं । निफजतीं कर्में ऐसीं । राती [27]देवो आकाशीं । जियापरी ॥ ७ ॥ [28]तोय [29]तेजें [30]धूम । ययां वायूसीं

१ विरघळून. २ अनुभव. ३ व्यापलें. ४ देव समर्थ आहे ह्मणून त्यास आठवणीला आवकाश झाला. ५ येवढें थोर. ६ सावध होऊन. ७ डोलविला. ८ स्पष्ट. ९ आनिध्य त्रासला. १० एकत्वास. ११ लाड. १२ जीवदशेस कां आणतां. १३ खरें. १४ भितों. १५ बळ, ठिकाण. १६ परस्पर बोलणें. १७ सांगों आरंभिलें. १८ तात्पर्य. १९ बोललास. २० देणें. २१ शब्दाचें वर्म. २२ प्रातीस्तव. २३ बोललों. २४ दृष्टिगोचर. २५ पांच साधनांनीं. २६ साह्य. २७ दिवस. २८ पाणी. २९ अग्नी. ३० धूर.

संगम । जालिया होय [1]अभ्रागम । व्योम तें नेणे ॥ ८ ॥ नाना काष्टीं नाव मिळे । ते नावाडेनि चळे । चालविजे [2]अनिळें । उदक तें साक्षी ॥ ९ ॥ कां कवणे एकें पिंडें । वेंचितां [3]अवतरें भांडें । मग भंवडीजे दंडें । भ्रमे चक्र ॥ ३१० ॥ आणि कर्तृत्व [4]कुला-लाचें । तेथ काय तें पृथ्वीयेचें । आधारावांचूनि वेंचे । विचारी पां ॥ ११ ॥ हेंहीं असो लोकांचिया । राहाटी होतां आघविया । कोण काम [5]सवितया । आंगा आलें ॥ १२ ॥ तैसें [6]पांचहेतुमिळणी । पांचेंचि इहीं कारणीं । कीजे कर्मलतांची लावणी । आत्मा [7]सिना ॥ १३ ॥ आताचियें वेगळालीं । पांचही [8]विवंचूं गा भलीं । [9]तुकोनि घेतलीं । मोतियें जैसीं ॥ १४ ॥

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधा च पृथक् चेष्टा दैवं चैवाऽत्र पंचमम् ॥ १४ ॥**

तैसीं यथालक्षणें । आइकें पांचकारणें । तरि देह हें मी ह्मणे । पहिलें एथ ॥ १५ ॥ ययातें अधिष्ठान ऐसें । ह्मणिजे तें याचि [11]दोषें । जे स्व भोग्येंसी वसे । भोक्ता एथ ॥ १६ ॥ इंद्रियांच्या [12]दाहें हातीं । [13]जाचोनि [14]देवोरांती । सुखदुःखें [15]प्रकृती । जोडीजती जियें ॥ १७ ॥ तियें भोगावया पुरुखा । आन ठावोचि नाहीं देखा । ह्मणोनि अधिष्ठान [16]आंखा । बोलिजे देह ॥ १८ ॥ हें चोविसांहीं तत्त्वांचें । कुटुंबघरवस्तीचें । तुटे बंधमो-क्षाचें । गुंथाडें एथ ॥ १९ ॥ किंबहुना [17]अवस्थात्रया । हें अधिष्ठान धनंजया । ह्मणोनि देहा यया । हेंचि नाम ॥ ३२० ॥ आणि कर्ता हें दुजें । कर्माचें कारण जाणिजे । प्रति-बिंब ह्मणिजे । चैतन्याचें जें ॥ २१ ॥ आकाशचि वर्षे नीर । तें तळवटीं बांधे [20]नोंडर । मग बिंबोनि तदाकार । होय जेवि ॥ २२ ॥ कां निद्राभरें बहुवें । राया रायपण ठाउवें नव्हे । मग स्वप्नींचिये सामावे । रंकपणीं ॥ २३ ॥ तैसें आपुलेनि विसरें । चैतन्यचि देहाकारें । आभासोनि [21]आविष्करे । देहपणें जें ॥ २४ ॥ जया विचाराच्या देशीं । प्रसिद्धी गा जीव ऐसी । जेणें [22]भाष केली देहेंसी । आघवाविषयीं ॥ २५ ॥ प्रकृती करी कर्में । तो म्यां केलीं ह्मणे भ्रमें । येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीव ॥ २६ ॥ मग [23]पौतेयांच्या केशीं । एकीच उठती दिठी जैसी । मोकळी च वरी ऐसी । [24]चिरींवें गमे ॥ २७ ॥ कां घराआंतुल एक । दीपाचा अवलोक । [25]गवाक्षभेदें अनेक । [26]आवडे जेविं ॥ २८ ॥ कां एकचि पुरुष जैसा । अनुसरत नवां रसां । नवविध ऐसा । आवडों लागे ॥ २९ ॥ तेविं बुद्धीचे

---

१ ढग उत्पन्न होणें. २ वारा. ३ आकारासी ये. ४ कुंभार. ५ सूर्याला. ६ कारणें मिळाल्यानें. ७ वेगळा. ८ वेगळीं करूं. ९ वजन करून. १० आधार. ११ उद्देशें. १२ दहा हातांनीं. १३ कष्ट सोसून. १४ रात्रंदिवस. १५ प्रकृतीच्या योगानें. १६ शब्दानें. १७ जागृति, स्वप्न, सुषुप्ति. १८ ज्ञानाचें. १९ डबकें. २० ठाऊक. २१ प्रकटे. २२ प्रतिज्ञाशब्द देणें. २३ पापण्यांच्या. २४ चिरल्याप्रमाणें. २५ झरोका इत्यादिकांच्या योगानें. २६ वाटे.

एक जाणणें । श्रोत्रादिभेदें येणें । बाहेरि इंद्रियपणें । फांके जें कां ॥ ३३० ॥ तें पृथग्विध[1] करण । कर्माचें इया कारण । तिसरें गा जाण । नृपनंदना ॥ ३१ ॥ आणि पूर्वपश्चिमवाहणी[2] । निघालिया वोघाचिया मिळणी । होय नदी नद पाणी । एकचि जेवि ॥ ३२ ॥ तैसी क्रियाशक्ति[3] पवनी[4] । असे जे अनपायिनी[5] । ते पडिली नानास्थानीं । नाना होय ॥ ३३ ॥ जैं वाचे करी येणें । तैं तेचि होय बोलणें । हाता आली तरी घेणें । देणें होय ॥ ३४ ॥ अगा चरणाचिया ठायीं । तरि गती तेचि पाहीं । अधोद्वारीं[6] दोहीं । क्षरणें तेचि ॥ ३५ ॥ कंठौनि[7] हृदयवरी । प्रणवाची[8] उजरी । करितां तेचि शरीरीं । प्राण म्हणिजे ॥ ३६ ॥ मग ऊर्ध्वींचिया[9] रिगा निगा । पुढती तेचि शक्ति पैं गा । उदान[10] ऐसिया लिंगा[11] । पात्र जाहाली ॥ ३७ ॥ अधोरंध्राचेनि वाहें । अपान[12] हें नाम लाहे । व्यापकपणें होये । व्यान[13] तेचि ॥ ३८ ॥ आरोगिलेनि[14] रसें । शरीर भरी सरिसे । आणि न सांडितां असे । सर्वसंधी ॥ ३९ ॥ ऐसिया इया राहटीं । मग तेचि क्रिया पाठीं । समान[15] ऐसी किरीटी । बोलिजे गा ॥ ३४० ॥ आणि जांभई शिंक ढेंकर । ऐसैसा होतसे व्यापार । नाग[16]कूर्म कृकर । इत्यादि होय ॥ ४१ ॥ एवं वायुची हे चेष्टा । एकीचि परि सुभटा । वर्तनास्तव पालटा । येतसे जे ॥ ४२ ॥ ते भेदली वृत्तिपंथें । वायुशक्ती गा एथें । कर्मकारण चौथें । ऐसें जाण ॥ ४३ ॥ आणि ऋतु बरवा शारदु[17] । शारदीं पुढती चांदु । चंद्रीं जैसा संबंधु । पूर्णिमेचा ॥ ४४ ॥ कां वसंतीं बरवा आराम[18] । आरामीं प्रियासंगम । संगमीं आगम[20] । उपचारांचा[19] ॥ ४५ ॥ नाना कमळीं पांडवा । विकास जैसा बरवा । विकासीं ही थांवा । परागाचा[21] तो ॥ ४६ ॥ वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व[22] । रसिकत्वीं परतत्त्व[23] । स्पर्श जैसा ॥ ४७ ॥ तैसी सर्ववृत्तिवैभवीं[24] । बुद्धीचि एकली बरवी । बुद्धीही बरव नवी । इंद्रियप्रौढी ॥ ४८ ॥ इंद्रियप्रौढीमंडळा । शृंगार[25] एकचि निर्मळा । जैं अधिष्ठात्रियां[26] कां मेळा । दैवतांचा जो ॥ ४९ ॥ म्हणूनि चक्षुरादिकीं दाहें । इंद्रियां पाठीं[27] सवानुग्रहें[28] । सूर्यादिकां कां आहे । सुरांचें वृंद[29] ॥ ३५० ॥ तें देववृंद बरवें । कर्मकारण पांचवें । अर्जुना एथ जाणावें । देव म्हणे ॥ ५१ ॥ एवं[30] मानें तुझिये आयणी[31] । तैसी कर्मजातांची हे खाणी । पंचविध आकर्णीं । निरूपिली ॥ ५२ ॥ आतां हेंचि खाणी वाढे । मग कर्मांची सृष्टी घडे । जिहीं ते हे तुही उघडे । दाऊं पांचें ॥ ५३ ॥

---

१ निरनिराळें इंद्रिय. २ मार्गानें. ३ कर्तृत्वशक्ति. ४ प्राणवायूंत. ५ अविनाश. ६ मलमूत्रद्वारीं. ७ नाभीपासून हृदयापर्यंत. ८ ओंकाराची वृद्धि. ९ वरल्या रिघण्या निघण्यास. १० कंठस्थ वायु. ११ संज्ञेस. १२ गुदस्थ वायु. १३ शरीरस्थ वायु. १४ भक्षिलेल्या रसानें. १५ नाभिस्थ वायु. १६ नागादि वायु. १७ शरदृतु. १८ बाग. १९ आदर इत्यादिकांचा. २० आगमन. २१ पुष्परजांचा. २२ गोडी. २३ परब्रह्मात्मरूप. २४ ऐश्वर्यानें. २५ शोभा. २६ आश्रय करून राहणाऱ्या. २७ ठायीं. २८ स्वकृपेनें. २९ समुदाय. ३० अशा प्रकारें. ३१ आवडीसाठीं.

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥**

तरि [1]अवसांत आली [2]माधवी । ते [3]हेतु होय नवपल्लवीं । पल्लव पुष्पपुंज दावी । पुष्प फळातें ॥ ५४ ॥ कां [4]वार्षियें आणिजे मेघ । मेघें वृष्टिप्रसंग । वृष्टीस्तव भोग । [5]सस्यसुखाचा ॥ ५५ ॥ ना तरी प्राची अरुणातें विये । अरुणें सूर्योदय होये । सूर्यें सगळा [6]पाहे । दिवस जैसा ॥ ५६ ॥ तैसें मन हेतु पांडवा । होय कर्मसंकल्पभावा । तो संकल्प लावी दिवा [7]। वाचेचा गा ॥ ५७ ॥ मग वाचेचा तो दिवटा । दावी कृत्यजातांचिया वाटा । तेव्हां कर्तारिगे [8]कामठा । कर्तृत्वाच्या ॥ ५८ ॥ तेथ शरीरादिक [9]दळवाडें । शरीरादिकां हेतुचि घडे । लोहकाम लोखंडें । [10]निर्वाळिजे जैसें ॥ ५९ ॥ कां तांथु[11]वाचा ताणा । तांथु घालितां [12]वैरणा । तो ततूंचि विचक्षणा । होय पट ॥ ३६० ॥ तैसें मनवाचादेहाचें । कर्म मनादि हेतूंचि रचे । रत्नीं घडे रत्नाचें । दळवाडें जेविं ॥६१॥ एथ शरीरादिकें कारणें । तेंचि हेतु केविं हें कोणें । [13]अपेक्षिजे तरि तेणें । अवधारि जो ॥६२॥ आइका सूर्याचिया प्रकाशा हेतु कारण सूर्यचि जैसा । कां उंसाचें कांडें उंसा । [14]वाढि हेतू ॥ ६३ ॥ नाना [15]वाग्देवता वानावी । तें वाचाचि लागे [16]कामवावी । कां वेदां वेदेंचि बोलावी । प्रतिष्ठा जेविं ॥६४॥ तैसें कर्मा शरीरादिकें । कारण हें कीर ठाउकें । परि हेंचि हेतु न चुके । हेंही एथ ॥६५॥ आणि देहादिकीं कारणीं । देहादि हेतुमिळणी । होय जया उभारणी । कर्मजाता ॥६६॥ तें शास्त्रार्थें [17]मानिलेया । मार्गा अनुसरे धनंजया । तरि न्याय तो न्याया । हेतु होय ॥६७॥ जैसा पर्जन्योदकाचा लोट । विर्पायें धरी साळींचा पाट । तो जिरे परि अचाट । उपयोग आथी ॥ ६८ ॥ कां रोषें निघालें [18]अवचटें । पडिलें द्वारकेचिये वाटे । तें शिणे परि [19]सुनाटें । नवचती [20]पैरें ॥ ६९ ॥ तैसें हेतुकारणमेळें । उठी कर्म जें आंधळें । तें शास्त्राचे लाहे डोळे । तैं [21]न्याय्य म्हणिपे ॥३७०॥ ना दूध [22]वाढितां ठावो पावे । तंव उतोनि जाय स्वभावें । तोही वेंच परि नव्हे । वेंचिलें तें ॥७१॥ तैसें शास्त्रसाह्येंवीण । केलें नोहे जरी [23]अकारण । तरि लागो कां [24]नागवण । दान लेखीं ॥७२॥ अगा बावना [25]वर्णापरता । कोण मंत्र आहे पंडुसुता । कां बावन हीं नुच्चारितां । जीव आथि ॥ ७३ ॥ परि मंत्राची [26]कडसणी । जंव नेणिजे कोदंडपाणी । तंव उच्चार [27]फळावाणी । न पवे जेविं ॥७४॥ तेविं कारणहेतु योगें ।

---

१ अकस्मात्. २ वसंतशोभा. ३ कारण. ४ पावसाळ्यांत. ५ धान्याचा. ६ उजेडे. ७ मशाल. ८ व्यापारांत. ९ समुदाय. १० स्वच्छ कीजे. ११ तंतूचा. १२ थोडें थोडें घालतां. (जसें जात्यांत वगैरे थोडें थोडें वैरण घालतात.) १३ जाणण्यास इच्छी. १४ वाढण्यास. १५ सरस्वती. १६ श्रमवाकी. १७ अंगीकार करून. १८ अवचित. १९ व्यर्थ. २० पाउलें. २१ न्यायास अनुसरून. २२ उतू येत असतां. २३ व्यर्थ. २४ द्रव्यहानि. २५ अक्षरांपलिकडे. २६ विवेचन. २७ फलद्रूप.

जें बिसाटे कर्म निगे । तें शास्त्राचिये न लगे । कांसे जंव ॥ ७५ ॥ कर्म होतचि असे तेव्हांही । परि तें होणें नव्हे पाहीं । तो अन्याये गा अन्यायीं । हेतु होय ॥ ७६ ॥

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥**

एवं पंचकारणा कर्मा । पांचही हेतु हे सुमहिमा । आतां एथें पाहें पां आत्मा । सांपडला असे ॥ ७७ ॥ भानु न होनि रूपें जैसीं । चक्षुरूपातें कां प्रकाशी । आत्मा न होनि कर्मे तैसीं । प्रकटित असे गा ॥ ७८ ॥ पैं प्रतिबिंब आरिसा । दोन्हीं न होनि वीरेशा । दोहींतें प्रकाशी जैसा । न्याहाळिता तो ॥ ७९ ॥ कां अहोरात्र हे सविता । न होनि करी पंडुसुता । तैसा आत्मा कर्म कर्ता । न होनि दावी ॥ ३८० ॥ परि देहाहंमानभुली । जयाची बुद्धी देहींच औतली । तया आत्मविषयीं जाली । मध्यरात्री गा ॥ ८१ ॥ जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा । देहचि केलें परमसीमा । तया आत्मा कर्ता हे प्रमा । अलोट उपजे ॥ ८२ ॥ आत्माचि कर्मकर्ता । हाही निश्चय नाहीं तत्त्वता । देहचि मी कर्मकर्ता । मानितो साच ॥ ८३ ॥ जे आत्मा मी कर्मातीत । सर्वकर्मसाक्षिभूत । हे आपुली कहीं मात । नायकेची कानीं ॥ ८४ ॥ म्हणोनि उमपा आत्मयातें । देहचिवरी मेविजे एथें । विचित्र काई रात्रि दिवसातें । डुडुळ न करी ॥ ८५ ॥ पैं जेणें आकाशींचा कहीं । सत्य सूर्य देखिला नाहीं । तो थिल्लरींचें बिंब काई । मानूं न लाहे ॥ ८६ ॥ थिल्लराचेनि जालेपणें । सूर्यासि आणी होणें । त्याच्या नाशीं नाशणें । कंपें कंप ॥ ८७ ॥ आणि निद्रिस्ता चेवो नये । तंव स्वप्न सांच हों लाहे । रज्जु नेणतां सर्पा बिहे । विस्मो कवण ॥ ८८ ॥ जंव कवळ आथि डोळां । तंव चंद्र देखावा कीं पिंवळा । काय मृगीं ही मृगजळा । भुलावें नाहीं ॥ ८९ ॥ तैसा शास्त्रगुरूचेनि नांवें । जो वाराही टेकों नेदी सिवें । केवळ मौढ्याचेनिचि जीवें । जियाला जो ॥ ३९० ॥ तेणें देहात्मदृष्टीमुळें । आत्मया घापे देहाचें जाळें । जैसा अभ्राचा वेग कोल्हें । चंद्रीं मानी ॥ ९१ ॥ मग तया माननयासाठीं । देहबंदीशाळे किरीटी । कर्माच्या वज्रगांठीं । कळोसे तो ॥ ९२ ॥ पाहें पां बंधभावना दृढा । नळियेवरी तो बापुडा । काय मोकळेयाही चवडा । न ठकेचि पुंसों ॥ ९३ ॥ म्हणोनि निर्मळे आत्मस्वरूपीं । जो प्रकृतीचें केलें आरोपी । तो कल्पकोडीच्या मापीं । मवीचि कर्मै ॥ ९४ ॥ आतां कर्मामाजि असे । परि तयातें कर्म न स्पर्शे । वडवानळातें जैसें ।

---

१ अनियमित. २ पाहाणारा. ३ व्यापली. ४ ज्ञानरूप अशा. ५ ज्ञान. ६ कर्मरहित. ७ मापातीत. ८ देहा एवढा. ९ मोजावा. १० घुबड. ११ डबक्यांतील. १२ जागृती. १३ खरें. १४ नवल. १५ कावीळ नांवाचा रोग. १६ भुलावें. १७ हदीस. १८ वांचला. १९ देहच आत्मा अशा दृष्टीमुळें. २० घाली. २१ बळकट गांठींत. २२ बांधला जाय. २३ पाय. २४ राघू. २५ मोजी.

समुद्रोदक ।। ९५ ।। तैसेनि वेगळेपणें । जयाचें कर्मीं असणें । तो कीर वोळखावा कवणें । तरी सांगों ॥ ९६ ॥ जे मुक्तातें [१]निर्धारितां । लाभे आपलीच मुक्तता । जैसी दीपें दिसे पाहातां । आपली वस्तु ॥ ९७ ॥ ना तरी दर्पण जंव [२]उटिजे । तंव आपणपयां आपण भेटिजे । कां तोय पावतां तोय होइजे । लवणें जेविं ॥ ९८ ॥ हें असो परतोनि मागुतें । प्रतिबिंब पाहे बिंबातें । तंव पाहणें जाउनी आयितें । बिंबचि होय ॥ ९९ ॥ तैसें हारपलें आपणपें पावे । तैं [३]संतांतें पाहातां गिंवसावें । ह्मणोनि वानावे ऐकावे । तेचि सदा ॥ ४०० ॥ परि कर्मीं असोनि कर्में । जो [४]नागवे समविषमें । चर्मचक्षूचेनि चामें । दृष्टी जैसी ॥ १ ॥ तैसा सोडवला जो आहे । तयाचें रूप आतां पाहें । उपपत्तीची बाहे । उभऊनि सांगों ॥ २ ॥

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हंति न निबद्ध्यते ॥ १७ ॥**

तरि अविद्येचिया निद्रा । विश्वस्वप्नाचा हा धांदा । भोगित होता प्रबुद्धा । अनादि जो ॥ ३ ॥ तो महावाक्याचेनि नांवें । गुरुकृपेचेनि [५]थांवें । माथां हात ठेवणें नव्हे । थापटिला जैसा ॥ ४ ॥ तैसा विश्वस्वप्नेंसीं माया । नीद सांडूनि धनंजया । सहजेंचि चेइला अद्वया- । नंदपणें जो ॥ ५ ॥ तेव्हां मृगजळाचे पुर । दिसते एक निरंतर । हारपती कां [१२]चंद्रकर । फांकतां जैसे ॥ ६ ॥ कां बाळत्व निघोनि जाय । तैं बागुला नाहीं [६]बाय । पैं जळालिया इंधन न होय । रंधनें जेविं ॥ ७ ॥ ना ना चेवो [१५]आलिया पाठीं । तैं स्वप्न न दिसे दिठी । तैसी अहंममता गा किरीटी । नुरेचि तया ॥ ८ ॥ मग सूर्य आंधारालागीं । रिघो कां भलते [१६]सुरंगीं । परि तो तयाच्या भागीं । नाहींचि जैसा ॥ ९ ॥ तैसा आत्मत्वें वेष्टिला होये । तो जया तया दृश्यातें पाहे । तें दृश्य द्रष्टेपणेंसीं होत जाये । तयाचेंचि रूप ॥ ४१० ॥ जैसा वन्हि जया लागे । तें वन्हीचि जालिया आंगें । [१७]दाह्यदाह[१८]कविभागें । सांडिजे तें ॥ ११ ॥ तैसा कर्माकारा वुजेया । तो कर्तेपणाचा आत्मया । आळ आला तो गेलिया । कांहीं [१९]बांहीं जें उरे ॥ १२ ॥ तिये आत्मस्थितीचा जो रावो । मग तो देहीं इये जाणेल ठावो । काय प्रलयांबूचा [२०]उन्नाहो । वोघ मानी ॥ १३ ॥ तैसी ते पूर्ण अहंता । काई देहपणें पंडुसुता । आवरे काई सविता । बिंबें धरिला ॥ १४ ॥ पैं मथुनि लोणी वेगें । तें मागुतीं ताकीं घापे । तरि तें लिप्तपणें [२१]सिंपे । तेणेंसी काई ॥ १५ ॥ नाना

१ निश्चय करितां. २ स्वच्छ करावा. ३ संतांच्या दर्शनमात्रें करून प्राप्त होतें. ४ न सांपडे. ५ कातड्यानें. ६ बाहु. ७ निद्रा. ८ धंदा. ९ योगानें. १० बळानें. ११ जागा झाला. १२ चंद्र-किरण. १३ उपयोग. १४ पाकक्रिया. १५ जागृती. १६ भुयारांत. १७ जळणारें. १८ जाळ-णारें. १९ अवशेष. २० वृद्धि. २१ स्पर्शे.

काष्ठौनि वीरेशा । वेगळाविलिया हुताशा । राहे काष्ठाचिया मांदुसा[2] । कोंडलेपणें ॥१६॥ कां रात्रीचिया उदराआंत । रिगाला जो हा भास्वत[3] । तो रात्रीऐसी मात । ऐके काई ॥ १७ ॥ तैसें वेद्यवेदकपणेंसीं[4] । पडिलें कां जयाच्या ग्रासीं । तया देह मी ऐसी । अहंता कैंची ॥ १८ ॥ आणि आकाशें जेथें जेथुनी । जाइजे तेथ असे भरोनि । ह्मणोनि ठेलें कोंदोनी । आपेंआप ॥ १९ ॥ तैसें जें तेणें करावें । तो तेंचि आहे स्वभावें । मा कोणे कर्मीं वेष्टावें । कर्तेपणें ॥ ४२० ॥ नुरेचि गगनावीण ठावो । नोहेचि समुद्रा प्रवाहो । नुठीचि ध्रुवा[5] जावो । तैसें जाहालें ॥ २१ ॥ ऐसेनि अहंकृतिभावो । जयाचा बोधीं जाहाला वावो । तऱ्ही देह जंव निर्वाहो । तंव आथी कर्में ॥ २२ ॥ वारा जरी वाजोनि वोसरे[6] । तरी तो डोल रुखीं उरे । कां[7] संदे द्रुति[8] राहे कापुरें । वेचलेनी[9] ॥ २३ ॥ कां सरलेया गीताचा समारंभु । न वचे वांहवलेणाचा[10] क्षोभु । भूमी लोळोनि गेलिया अंबु[11] । वोल थारे ॥ २४ ॥ अगा मावळलेनि अर्कें[12] । संध्येचिये भूमिके[13] । ज्योतिरीती[14]-कौतुकें । दिसे जैसी ॥ २५ ॥ पैं लक्ष[15] भेदिलियाही वरी । बाण धांवेचि तंववरी । जंव भरली आथी उरी[16] । बळाची तया ॥ २६ ॥ नाना चक्रीं भांडें जालें । तें कुलालें परतें नेलें । परि भ्रमेंचि[17] तें मागिलें । भोंवडिलेपणें ॥ २७ ॥ तैसा देहाभिमान गेलिया । देह जेणें स्वभावें धनंजया । जालें तें अपैसया । चेष्टवीच तें ॥ २८ ॥ संकल्पेंवीण स्वप्न । न लावितां दांगीचें[18] बन । न रचितां गंधर्वभुवन । उठी जैसें ॥ २९ ॥ आत्मयाचेनि उद्यमेंवीण । तैसें देहादिपंचकारण । होय आपणयां आपण । क्रियाजात ॥ ४३० ॥ पैं प्राचीनसंस्कारशेषें[19] । पांचही कारणें सहेतुकें । कामें[20] वीजती गा अनेकें । कर्माकारें ॥ ३१ ॥ तया कर्मामाजी मग । संहरो आघवें जग । अथवा नवें चांग । अनुकारो[21] ॥ ३२ ॥ परि कुमुद[22] कैसेनि सुके । तें कमळ कैसें फांके । ये दोन्ही रवी न देखे । जया परी ॥ ३३ ॥ कां वीजु वर्षोनि[23] आभाळ । ठिकऱ्या[24] आतो भूतळ । अथवा करू शाड्वळ[25] । पर्जन्यवृष्टी ॥ ३४ ॥ तरि तया दोहींतें जैसें । नेणिजेचि कां आकाशें । तैसा देहींच जो असे । विदेहदृष्टी[26] ॥ ३५ ॥ तो देहादिकीं चेष्टीं । घडतां मोडतां हे सृष्टी । न देखे स्वप्न दृष्टी । चेइलौ[27] जैसा ॥ ३६ ॥ येऱ्हवीं चामाचे[28] डोळेवरी[29] । जे देखती देहचिवरी । ते कीर तो व्यापारी । ऐसेंचि मानिती ॥ ३७ ॥ कां तृणाचा बाहुला । जो आगरसमेरें[30] ठेविला ।

---

१ पृथक् केला असतां. २ पेटींत. ३ सूर्य. ४ जाणण्याचें वस्तु व जाणणारा. ५ ध्रुवमंडळाशीं. ६ आटोपे. ७ करंडयांत. ८ सुगंध, वास. ९ खपून गेला तरी. १० वाहवा दिल्याचा. ११ पाणी. १२ सूर्य. १३ वेळीं. १४ प्रकाश. १५ निशाण. १६ अवशिष्टता. १७ चक्र. १८ अरण्यांतलें. १९ पूर्व जन्मींच्या संस्कारानें. २० क्रिया करविती. २१ रचो. २२ कमल. २३ वीज पडून. २४ तुकडे तुकडे होवोत. २५ हिरवें तृण. २६ देहाभिमानरहित. २७ जागा झालेला. २८ चामडयाचे. २९ दृष्टीनें. ३० शेताच्या कडेस.

तो सत्य राखता कोल्हा । न मनी काई ॥ ३८ ॥ पिसें नेसलें कां नागवें । हें लोकीं येऊनि जाणावें । डोंणोरियाचे मवावे । आणिकी घाय ॥ ३९ ॥ कां महासतीचे भोग । देखे कीर सकळ जग । परि ते आगी ना आंग । ना लोक देखे ॥ ४४० ॥ तैसा स्वस्वरूपें उठिला । जो दृश्येंसी द्रष्टा ओटला । तो नेणे काय राहटला । इंद्रियग्राम ॥ ४१ ॥ अगा थोरी कल्लोळीं कल्लोळ साने । लोपतां तिरींचेनि जनें । एकाएकीं गिळिलें हें मनें । मानिजे जऱ्ही ॥ ४२ ॥ तऱ्हीं उदकाप्रति पाहीं । कोण ग्रासितसे काई । तैसें पूर्णा तुजें नाहीं । जें तो मारी ॥ ४३ ॥ सुवर्णाचिया चांडिका । सुवर्णशूळेंचि देखा । सुवर्णाचिया महिखा । नाश केला ॥ ४४ ॥ तो देवैलेंवसिया कडा । व्यवहार गमला फुडा । वांचूनि महिष शूळ चामुंडा । सुवर्णचि तें ॥ ४५ ॥ पैं चित्रींचें जळ हुताश । तो दृष्टीचाचि आभास । पटीं अग्नि वोलांश । दोन्ही नाहीं ॥ ४६ ॥ मुक्ताचें देह तैसें । हाले चाले संस्कारवशें । तें देखोनि लोक पिसे । तो कर्ता ह्मणती ॥ ४७ ॥ आणि तयां करणेयांआंत । घडो त्रैलोक्या घात । परि तेणें केला हे मात । बोलों नये ॥ ४८ ॥ अगा अंधकार देखावा तेजें । मग तो फेडिजे हें कें बोलिजे । तैसें ज्ञानियां नाहीं दुजें । तो मारील काई ॥ ४९ ॥ ह्मणोनि तयाची बुद्धी । नेणे पापपुण्याची गंधी । गंगा मीनलिया नदी । विटाळ जैसा ॥ ४५० ॥ अग्नीसि अग्नि झगटलिया । काय पोळे तो धनंजया । कीं शस्त्र रुपे आपणया । आपणचि ॥ ५१ ॥ तैसे आपणपया परतें । जो नेणे क्रियाजातातें । तेथ कांय लिपवी बुद्धीतें । तयाचिये ॥ ५२ ॥ ह्मणोनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहालें जया । नाहीं शरीरादिकीं तया । कर्मबंध ॥ ५३ ॥ जे कर्ता जीव विंदाणी । काढूनि पांचही खाणी । घडित आहे करणीं । ओडती दाहें ॥ ५४ ॥ तेथ न्यावो आणि अन्यावो । हा द्विविध साधुनि आवो । उभारिलां न लवी खेवो । कर्म भुवनें ॥ ५५ ॥ या थोरांडा कीर कामा । विरजा नोहे आत्मा । परि ह्मणसी हन उपक्रमा । हात लावी ॥ ५६ ॥ तो साक्षी चिद्रूप । कर्मप्रवृत्तीचा संकल्प । उठी तो कां निरोप । आपणचि दे ॥ ५७ ॥ तरी कर्मप्रवृत्ती ही लागीं । तया आयास नाहीं आंगीं । जे प्रवृत्तीचेही उंळिगीं । लोकचि आथी ॥ ५८ ॥ ह्मणोनि आत्मयाचें केवळ । जो रूपचि जाहाला निखिल । तया नाहीं बंदिशाळ ।

---

१ संरक्षक. २ भ्रमिष्ठ. ३ लोकांनीं. ४ युद्धीं मेलेल्यांचे. ५ व्यापला. ६ व्यवहारला. ७ इंद्रियसमुदाय. ८ लहान तरंग. ९ देवीनें. १० महिषासुर. ११ गुरवाला. १२ खरा. १३ देवी. १४ अग्नि. १५ गारठा. १६ पूर्वकर्मानें. १७ दूर करावा. १८ वार्ता. १९ भेटला असतां. २० कोणता पदार्थ. २१ कार्य, तें करणारा, व करणें. २२ कौशल्यानें. २३ हेतु. २४ इंद्रियरूप दाहा नांगरांनीं. २५ न्याय. २६ आकार. २७ क्षणही. २८ मोठ्या. २९ साह्यकर्ता. ३० आरंभास. ३१ ज्ञानस्वरूप. ३२ बेगारींत.

कर्मांची हे ॥ ५९ ॥ परि अज्ञानाच्या पटीं । अन्यथा ज्ञानाचें चित्र उठी । तेथ चिंतारणी हे त्रिपुटी । प्रसिद्ध जे कां ॥ ४६० ॥

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**
**कारणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥**

जें ज्ञान ज्ञाता ज्ञेय । हें जगाचें बीजत्रय । तें कर्माची निःसंदेह । प्रवृत्ती जाण ॥ ६१ ॥ आतां ययाची गा त्रया । व्यक्ती[2] वेगळालिया । आईकें धनंजया । करूं रूप ॥ ६२ ॥ तरि जीवसूर्यबिंबाचे । रश्मी[3] श्रोत्रादिकें पांचें । धांवोनि विषयपद्माचे । फोडित मढें[4] ॥६३॥ कीं जीवनृपाचे वारु[5] उपलाणे[6] । घेऊनि इंद्रियांचीं केंकाणें । विषयदेशींचें नागवणें । आणीत जे ॥ ६४ ॥ हें असो इहीं इंद्रियीं राहटे । जें सुखदुःखेंसीं जीवा भेटे । तें सुषुप्तिकाळीं[9] वोहटे । जेथ ज्ञान ॥ ६५ ॥ तया जीवा नांव ज्ञाता । आणि जें हें सांगीतलें आतां । तेंचि एथ पंडुसुता । ज्ञान जाण ॥ ६६ ॥ जें अविद्येचिये[10] पोटीं । उपजत[11]खेंवों किरीटी । आपणयातें वांटी । तिहीं ठायीं ॥ ६७ ॥ आपुलिये धांवे पुढां । घालूनि ज्ञेयांचा[12] गुंडा । उभारीं[13] मागिली कैंडां । ज्ञातृत्वातें ॥ ६८ ॥ मग ज्ञातया ज्ञेया दोघां । तो नांदणुकेचा बगा[14] । माजि जालेनि पैंगा । वाहे जेणें[15] ॥ ६९ ॥ टाकूनि ज्ञेयाची शिंव । पुरे जयाची धांव । सकळ पदार्थां नांव । सूतसे[16] जें ॥ ४७० ॥ तें गा सामान्य ज्ञान । या बोला नाहीं आन । ज्ञेयाचेंही चिन्ह । आईक आतां ॥ ७१ ॥ तरि शब्दस्पर्श । रूप गंध रस । हा पंचविध[17] आभास । ज्ञेयाचा तो ॥ ७२ ॥ जैसें एकेचि चूतफळें[18] । इंद्रिया वेगळवेगळें । रसें वर्णें परिमळें । भेटिजे स्पर्शें ॥ ७३ ॥ तैसें ज्ञेय तरी एकसरें । परि ज्ञान इंद्रिय द्वारें । घे ह्मणोनि प्रकारें । पांचें जालें ॥ ७४ ॥ आणि समुद्रीं वोघाचें जाणें । सरे लोणीपासीं[19] धांवणें । कां फळीं सरे वाढणें । सस्याचें[20] जेविं ॥ ७५ ॥ तैसें इंद्रियांच्या वाहवटीं[21] । धांवतया ज्ञाना जेथ ठी[22] । होय तें गा किरीटी । विषय ज्ञेय ॥ ७६ ॥ एवं ज्ञातया ज्ञाना ज्ञेया । तिहीं रूप केलें धनंजया । हे त्रिविध सर्व क्रिया । प्रवृत्ति जाण ॥ ७७ ॥ जे शब्दादि विषय । हें पंचविध जें ज्ञेय । तेंचि प्रिय कां अप्रिय । एकेपरीचें ॥ ७८ ॥ ज्ञान मोटकें[23] ज्ञातया । दावी ना जंव धनंजया । तंव स्वीकारा कीं त्यजावया । प्रवर्तेचि तो ॥ ७९ ॥ परि मीनातें[24] देखोनि बक[25] । जैसा निधानातें[26] रंक । कां स्त्री देखोनि

---

१ चित्र काढणारी. २ आकार. ३ किरण. ४ कळी. ५ घोडे. ६ खोगीर पाठीवर नसलेले घोडे. ७ नामें व रूपें. ८ सुखदुःखभोग. ९ गाढ झोंपेंत. १० अज्ञानाच्या. ११ उपजतांच. १२ जाणावयाचा विषयरूप दगड. १३ आपण मागें उभें राहून पुढें विषयवृत्ति. १४ मार्ग. १५ ज्ञानें. १६ ठेवितसे. १७ पांच प्रकारचा. १८ आम्रफळानें. १९ शेवटापाशीं. २० धान्याचें. २१ मार्गीं. २२ शेवट. २३ थोडें. २४ मत्स्याला. २५ बगळा. २६ द्रव्याला.

कामुक । प्रवृत्ति धरी ॥ ४८० ॥ जैसें खालारां धांवे पाणी । भ्रमर पुष्पांचिये घाणी[2] । ना ना सुटला सांजवणी[3] । वत्सचि पां ॥ ८१ ॥ अगा स्वर्गींची उर्वशी । ऐकोनि जेवीं माणुसीं । वेराता लावीजती आकाशीं । यागांचिया ॥ ८२ ॥ पैं पारिवा[5] जैसा किरीटी । च्वढला नभाचिये पोटीं । पारवी देखोनि लोटी । आंगचि सगळें ॥ ८३ ॥ हें ना घन-गर्जनासरिसा । मयूर बोवांडे[6] आकाशा । ज्ञाता ज्ञेया देखोनि तैसा । धांवचि घे ॥८४॥ ह्मणोनि ज्ञान ज्ञेय ज्ञाता । हे त्रिविध गा पंडुसुता । होयचि कर्मा समस्तां । प्रवृत्ति येथ ॥८५॥ परि तेंचि ज्ञेय विपायें[8] । जरी ज्ञातयाचें प्रिय होये । तरी भोगावया न साहे । क्षणही विलंब ॥ ८६ ॥ ना तरी अवचटें । तेंचि विरुद्ध होऊनि भेटे । तरि युगांत वाटे । सांडावया ॥ ८७ ॥ व्यंथाळा कां हारा । वेरपडा[11] जालेया नरा । हर्ष आणि दरारा । सर-साचि उठी ॥ ८८ ॥ तैसें ज्ञेयें[12] प्रियाप्रियें । देखिलेनि ज्ञातया[12] होये । मग त्यागस्वीकारीं साहे । व्यापारातें ॥ ८९ ॥ तेथ रांगी[13] प्रतिमल्लाचा[14] । गोसांवी सर्वदळाचा । रथ सांडूनि पायांचा[15] । होय जैसा ॥ ४९० ॥ तैसें ज्ञातेपण जें असे । तें येकर्ता ऐसिये दशे । जेवित[16] बैसलें जैसें । रंधन[17] करूं ॥ ९१ ॥ कां भंवरेंचि[18] केला मळा । वेरकस[19] जाला अकसळा[20] । ना ना देव रिगाला देउळा- । चिया कामा ॥ ९२ ॥ तैसा ज्ञेयेंचि[21] हांवा । ज्ञाता[22] इंद्रि-याचा मेळावा । राहाटवी तेथ पांडवा । कर्ता होय ॥ ९३ ॥ आणि आपण होउनी कर्ता । ज्ञाना आणि करणता[23] । तेथें ज्ञेयेंचि[24] स्वभावता । कार्य होय ॥ ९४ ॥ ऐसा ज्ञाना-चिये निजगती । पालट पडे गा सुमती । नेत्राची शोभा रातीं । पालटे जैसी ॥ ९५ ॥ कां अदृष्ट[25] जालिया उदासु । पालटे श्रीमंताचा विलासु । पूर्णिमेपाठीं शीतांशु[26] । पालटे जैसा ॥ ९६ ॥ तैसा चाळितां करणें[27] । ज्ञाता वेष्टिजे कर्तेपणें । तेथिचीं तियें लक्षणें । ऐक आतां ॥ ९७ ॥ तरि बुद्धि आणि मन । चित्त अहंकार हन । हें चतुर्विध चिन्ह । अंतःकरणाचें ॥ ९८ ॥ बाह्य त्वचा श्रवण[28] । चक्षु रसना[29] घ्राण । हें पंचविध जाण । इंद्रिय गा ॥ ९९ ॥ तेथ आंतुलें तंव करणें[30] । कर्ता कर्तव्या घे उमाणें[31] । मग तें जरी जाणें । सुखा येतें ॥ ५०० ॥ तरि बाहेरिलें तियेंही । चक्षुरादिकें दाहाही । उठौनि लवलाहीं । व्यापारा सुये[32] ॥ १ ॥ मग तो इंद्रियेंकदंब[33] । करविजे तंव राबे[34] । जंव कर्तव्याचा लाभ ।

---

१ उत्तरणीकडे. २ वासावर. ३ संध्याकाळ, धार काढण्याची वेळ. ४ शिडया. ५ पारवा पक्षी. ६ उलटे. ७ कदाचित्. ८ एकाएकीं. ९ प्रलयासारखें संकट. १० सर्पाला. ११ प्रात. १२ प्रिय किंवा अप्रिय विषय पाहून ज्ञात्याला तसें होतें. १३ प्रीति. १४ दुसऱ्या मल्लाच्या. १५ पायीं चालणें. १६ जेवणारें. १७ स्वयंपाकास. १८ भ्रमरानें. १९ कसोटी. २० धातू लावून त्याची परीक्षा करणारा. २१ विषयेच्छेनें. २२ विषयज्ञ. २३ क्रियेचें साधन. २४ शरीरादि विषय. २५ दैव. २६ चंद्र. २७ इंद्रियें. २८ कान. २९ जीभ. ३० मनादि क्रियासाधनें. ३१ माप. ३२ घाली. ३३ समुदाय. ३४ राबणूक.

हातासि ये ॥ २ ॥ ना तें कर्तव्य जरी दुःखें । फळेल ऐसें देखे । तो लावी त्यागमुखें । तियें दाहाही ॥ ३ ॥ मग फिटे दुःखाचा ठावो । तंव राहाटवी रात्रिदिवो । विक्रेणुयातें करोनो । जयापरी ॥ ४ ॥ तैसोंनि त्यागस्वीकारीं । वाहातां इंद्रियांची धुरी । ज्ञातयातें अवधारीं । कर्ता म्हणिपे ॥५॥ आणि कर्तयाच्या सर्व कर्मीं । आउतांचिया परि क्षमी । म्हणोनि इंद्रियांतें आम्हीं । करणें[6] म्हणों ॥६॥ आणि हेंचि करणेंवरी । कर्ता क्रिया ज्या उभारी । तिया व्यापें तें अवधारीं । कर्म एथ ॥ ७ ॥ सोनाराचिया बुद्धी लेणें । व्यापे चंद्रकरीं चांदिणें । कां व्यापे वेल्हाळपणें[7] । वेली जैसी ॥ ८ ॥ नाना प्रभा व्यापे प्रकाशु । गोडिया इक्षुरसु । हें असो अवकाशु । आकाशीं जैसा ॥ ९ ॥ तैसें कर्तयाचिया क्रिया । व्यापलें जें धनंजया । तें कर्म गा बोलावया । आन नाहीं ॥ ५१० ॥ एवं कर्म कर्ता करण । या तिहींचेंही लक्षण । सांगीतलें तुज विचक्षण- । शिरोमणी ॥ ११ ॥ एथ ज्ञाता ज्ञान ज्ञेय । हें कर्माचें प्रवृत्तित्रय । तैसेंचि कर्ता करण कार्य । हा कर्मसंचय[9] ॥ १२ ॥ वन्हीं ठेविला असे धूम । आथि बीजीं जेवि द्रुम । कां मनीं जोडे काम । सदां जैसा ॥ १३ ॥ तैसा कर्ता क्रिया करणीं । कर्माचें आहे जितेंवणी । सोनें जैसें खाणीं । सुवर्णाचिये ॥१४॥ म्हणोनि हें कार्य मी कर्ता । ऐसें आथि जेथ पुंडुसुता । तेथ आत्मा दूरी समस्तां । क्रियापासीं ॥ १५ ॥ यालागीं पुढतपुढती । आत्मा वेगळाचि सुमती । आतां असो हें किती । जाणतासि तूं ॥ १६ ॥

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥**

परि सांगीतलें जें ज्ञान । कर्म कर्ता हन । ते तीन्हीं तिहीं ठायीं भिन्न । गुणीं आहाति ॥ १७ ॥ म्हणोनि ज्ञाना कर्मा कर्तया । पांतेजों[11] नये धनंजया । जे [12]दोनी बांधती सोडावया [13]ऐकांचि प्रौढ ॥ १८ ॥ तें सात्विक ठाउवें होये । तो गुणभेद सांगों पाहें । जो सांख्यशास्त्रीं आहे । [14]उवाइला ॥१९॥ जें विचारक्षीरसमुद्र । स्वबोधं[15]कुमुदिनीचंद्र । ज्ञानडोळसां नरेंद्र । शास्त्रांचा जें ॥ ५२० ॥ कीं प्रकृतिपुरुष दोनी । मिसळलीं दिवो[16]रजनी । तियें निवडिता त्रिभुवनीं । [17]मार्तंड जें ॥ २१ ॥ जेथ अपारा मोहराशी । तत्त्वाच्या मार्पी चोविसीं । [18]मापें घेऊनि [19]परेशीं । [20]सुरवाडिजे ॥ २२ ॥ अर्जुना तें सांख्यशास्त्र । पढे जयाचें [21]स्तोत्र । तें गुणभेदचारित्र । ऐसें आहे ॥ २३ ॥ जे आपुलेनि [22]आंगिकें । त्रिविध-

---

१ फोलयुक्त धान्याला. २ सुपाचा वारा. ३ प्रवृत्ति. ४ नांगरादि. ५ समर्थ. ६ क्रियासाधनें. ७ विस्तारानें. ८ अथवा. ९ कर्माचें साहित्य. १० जिव्हाळा. ११ विश्वासूं नये. १२ रज व तम. १३ सत्व-समर्थ. १४ स्पष्ट केला. १५ आत्मबोधकमलास प्रफुल्लित कर्ता चंद्र. १६ दिवसरात्रीं-प्रमाणें. १७ सूर्य. १८ माप. १९ परतत्त्वाशीं. २० सुखी व्हावें. २१ स्तवन. २२ साह्यानें.

पणाचेनि अंकें । दृश्यजात तितकें । अंकित केलें ॥ २४ ॥ एवं सत्वरजतमा । तिहींची एवढी असे महिमा । जे त्रैविध्य[2] आदिब्रह्मा । अतिक्रमी ॥ २५ ॥ परि विश्वींची आघवी मांदी । जेणें भेदलेनि गुणभेदीं । पडिली तें तंव आदीं । ज्ञान सांगों ॥ २६ ॥ जे दिठी जरी चोख कीजे । तरी भलतेंही चोख सुजे । तैसें ज्ञानें शुद्धें लाहिजे । सर्वही शुद्ध ॥ २७ ॥ ह्मणोनि तें सात्विक ज्ञान । आतां सांगों दे अवधान । कैवल्यगुणनिधान । श्रीकृष्ण ह्मणे ॥ २८ ॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकम् ॥ २० ॥**

तरि अर्जुना गा तें फुडें । सात्विक ज्ञान चोखडें । जयाच्या उदयीं ज्ञेय बुडे । ज्ञातेनिसीं ॥ २९ ॥ जैसा सूर्य न देखे आंधारें । सरिता नेणिजती सागरें । कां कवळिलिया न धरे । आत्मच्छाया ॥ ५३० ॥ तयापरी जया ज्ञाना । शिवादि तृणावसाना । इया भूतव्यक्ति भिन्ना । नाडळती ॥ ३१ ॥ जैसें हातें चित्र पाहातां । होय पाणियें मीठ धुतां । कां चेवोनि[11] स्वप्नायेतां । जैसें होय ॥ ३२ ॥ तैसें ज्ञानें जेणें । करितां ज्ञातव्यातें[12] पाहाणें । जाणताना जाणणें । जाणावें उरे ॥ ३३ ॥ पैं सोनें आटूनि लेणीं । न काढिती आपुलिया औयणी[13] । कां तरंग न घेपती पाणी । गाळूनि जैसें ॥ ३४ ॥ तैसी जया ज्ञानाचिया हाता । न लगेचि दृश्यकथा । तें ज्ञान जाण सर्वथा । सात्विक गा ॥ ३५ ॥ अरिसा पाहों जातां [14]कोडें । जैसें पाहातेंचि कां रिगे पुढें । तैसें ज्ञेय लोटोनि पडे । ज्ञाताचि जें ॥ ३६ ॥ पुढती तेंचि सात्विक ज्ञान । जें मोक्षलक्ष्मीचें भुवन[15] । हें असो ऐक चिन्ह । राजसाचें ॥ ३७ ॥

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥**

तरि पार्था परियेस । तें ज्ञान गा राजस । जें भेदाची कांस । धरूनि चाले ॥ ३८ ॥ विचित्रता भूतांचिया । आपण ओतोनि[16] ठिकरिया[17] । बहु[18]चकै ज्ञातया । आणिली जेणें ॥ ३९ ॥ जैसें साचा रूपा आड । घालूनि विसराचें कवाड । मग स्वप्नाचें कोंबाड[19] । विवंरी[20] निद्रा ॥ ५४० ॥ तैसें स्वज्ञानाचिये पौळी[21] । बाहेरि मिथ्यामोहाचे खळीं । तिहीं

१ आकारानें. २ त्रैविध्यवादी. ३ मेळा. ४ समजे. ५ शुद्ध. ६ नद्या. ७ गवतापर्यंत. ८ प्राणिमात्र. ९ न दिसतीं. १० सारवून. ११ जागें होऊन. १२ विषयाचें. १३ बुद्धीनें. १४ आवडीनें. १५ मंदिर. १६ व्यापून. १७ वेगवेगळीला. १८ चकभूल, भ्रम. १९ ओझें. २० स्पष्ट करी. २१ आवार.

अवस्थांची वेह्याळी । दावी जें जीवा ॥ ४१ ॥ आळंकारुपणें झांकलें । बाळका सोनें कां वायां गेलें । तैसें नामीं रूपीं गुरावलें । अद्वैत जया ॥ ४२ ॥ अवतरली गाडग्यां[2] घडां । पृथ्वी अनोळख जाली मूढां । वन्हि जाला कौनडा[3] । दीपत्वासाठीं ॥ ४३ ॥ कां वस्त्रपणा-चेनि आरोपें । मूर्खाप्रति तंतु हारपे । ना ना मुग्धा[4] पट लोपे । दाऊनि चित्र ॥ ४४ ॥ तैसी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ती भिन्ना । ऐक्यबोधाची भावना । निमोनि[5] गेली ॥ ४५ ॥ मग इंधनीं भेदला अनळ । फुलावरी परिमळ । कां जळभेदें[6] सकळ । चंद्र जैसा ॥ ४६ ॥ तैसें पदार्थभेद बहुवस । जाणोनि लहान थोर वेष । आतलें[7] तें राजस । ज्ञान येथ ॥ ४७ ॥ आतां तामसाचेंही लिंग । सांगेन तें वोळख चांग । डावलावया मातंग । सदन जैसें ॥ ४८ ॥

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।
अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

तरि किरीटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रें हीन । श्रुति पाठमोरी नग्न । ह्मणौनि तया ॥ ४९ ॥ येरीही शास्त्रबाह्यकारीं[10] । जें [11]निंदेचे विटाळवरी । बोळविलेंसे डोंगरीं । म्लेंच्छधर्मांच्या ॥ ५५० ॥ जें गा ज्ञान ऐसें । गुण[12]ग्रहें तामसें । घेतलें भोंवे [13]पिसें । होऊनियां ॥ ५१ ॥ जें [14]सोयरिके बाध नेणे । पदार्थीं निषेध ना ह्मणे । निरोपिलें[15] जैसें [16]सुणें । शून्य[17]ग्रामीं ॥ ५२ ॥ तया तोंडीं जें नोंडळे[18] । कां खातां ज्ञे न बोळे । तेंचि येक [19]वोळे । येर घेचि तें ॥ ५३ ॥ पैं सोनें चोरितां उंदिर । न ह्मणे [20]थरविथर । नेणें मांस-[21]खाइर । काळें गोरें ॥ ५४ ॥ नाना वनामाजि बोहरी[22] कोंडस[23] । जेविं न करी । कां जीत मेलें न विचारीं । बैसतां मासी ॥ ५५ ॥ अगा [24]वोंत कां वाढेलेया । साजुक कां [25]संडलिया । विवेक कावळिया । नाहीं जैसा ॥ ५६ ॥ तैसें निषिद्ध[26] सांडूनि द्यावें । कां विहित[27] आदरें घ्यावें । हें विषयांचेनि नांवें । नेणेचि जें ॥ ५७ ॥ जेतुलें आड पडे दिठी । तेतुलें घेचि विषयासाठीं । मग तें स्त्रीद्रव्य वांटी । शिश्नोदरां ॥ ५८ ॥ तीर्थातीर्थ हे [28]भेद । उदकीं नाहीं [29]सेनोळख । तृषा बोळे[30] तेंचि सुख । वांचूनियां ॥ ५९ ॥ तयाचिपरी [31]खाद्याखाद्य । न ह्मणे निंद्यानिंद्य । तोंडा आवडे तें मेध्य[32] । ऐसाचि बोध ॥ ५६० ॥ आणि स्त्रीजात तितुकें । त्वचेंद्रियेंचि वोळखे । तियेविषईं सोय-

---

१ क्रीडा. २ घागरीमध्यें. ३ अपरिचित. ४ मूर्खास. ५ नाश पावली. ६ प्रतिबिंबत्वानें भेद. ७ व्यापलें. ८ खुण. ९ मांगाचें घर. १० विरुद्धाचरणातें. ११ निंदा करून विटाळून टाकलें. १२ तमोगुणरूप नक्रानें. १३ पिशाच. १४ शरीरसंबंधाविषयीं. १५ सोडिलें. १६ कुत्रें. १७ ओसाड गांवीं. १८ प्राप्त होत नाहीं. १९ त्यागीं. २० बरें वाईट. २१ व्याघ्रादिक. २२ अग्नि, वणवा. २३ विचार. २४ ओकलेलें. २५ कुजलेलें. २६ अपवित्र. २७ शास्त्रप्रतिपादित. २८ ह्मणणें. २९ ओळखीची. ३० हरे. ३१ भक्ष्याभक्ष्य. ३२ पवित्र.

रिके । सादरचि बहु ॥ ६१ ॥ पैं स्वार्थी जें उपकरे[1] । तयाचि नाम सोयिरें । देहसंबंध न सरे । जिये ज्ञानीं ॥ ६२ ॥ मृत्यूचें आघवेंचि अन्न । आगी आघवेंचि इंधन[2] । तैसें जगचि आपलें धन । तामसज्ञाना ॥ ६३ ॥ ऐसेनि विश्व सकळ । जेणें विषयचि[3] मानिलें केवळ । तया एक जाण फळ । देहभरण[4] ॥ ६४ ॥ आकाशपतिता[5] नीरा । जैसा सिंधुचि येक थारा । तैसें कृत्यजात उदरा । लागींचि बुझे ॥ ६५ ॥ वांचूनि स्वर्ग नरक आथी । तया हेतु प्रवृत्ति निवृत्ती । इये आघवीयेचि राती । जाणिवेची जें ॥ ६६ ॥ जें देहखंडा[6]-नाम आत्मा । ईश्वर पाषाण प्रतिमा । यया परौती प्रमा[7] । ढळों नेणे ॥ ६७ ॥ ह्मणे पडिलेनि शरीरें । केलेनिसी आत्मा सरे[8] । मा भोगावया उरे । कोण वेषें ॥ ६८ ॥ ना ईश्वर पाहातां आहे । तो भोगवी जरी हें होये । तरी देवाचि खाये । विकूनियां ॥ ६९ ॥ गांवींचे देवळेश्वर । नियामकचि[10] होती साचार । तरि देशींचे डोंगर । उगे कां असती ॥ ५७० ॥ ऐसा विपर्यें[11] देव मानिजे । तरि पाषाणमात्रचि जाणिजे । आणि आत्मा तंव ह्मणिजे । देहातेंचि ॥ ७१ ॥ येरें पापपुण्यादिकें । तें आघवेंचि करोनि लटिकें । हित मानी अग्निमुखें । चैरणें[12] जें कां ॥ ७२ ॥ जें चामाचे[13] डोळे दाविती । जे इंद्रियें गोडी लाविती । तेंचि साच हे प्रतीती[14] । फुंडी[15] जया ॥ ७३ ॥ किंबहुना ऐसी प्रथा[16] । वाढती देखसी पार्था । धूमाची वेली वृथा । आकाशीं जैसी ॥ ७४ ॥ कोरडा ना वोला । उपयोगा आथी गेला । तो वाढोनि मोडला । मेंड[17] जैसा ॥ ७५ ॥ नाना उसांचीं कणसें । कां नपुंसकें माणुसें । वन लागलें जैसें । सांबरीचें[18] ॥ ७६ ॥ ना तरी बाळकाचें मन । कां चोराघरींचें धन । अथवा गळस्तन । शेळियेचे ॥ ७७ ॥ तैसें जें वांयाणें[19] । वोसाळ[20] दिसे जाणणें । तयातें मी ह्मणें । तामस ज्ञान ॥ ७८ ॥ तेंही ज्ञान इया भाषा । बोलिजे तो भाव ऐसा । जात्यंधाचा कां जैसा । डोळा वोंड[21] ॥ ७९ ॥ कां बधिराचे नीट कान । अपेया नाम पान । तैसें आडनांव ज्ञान । तामसा तया ॥ ५८० ॥ हें असो किती बोलावें । तरि ऐसें जें देखावें । तें ज्ञान नोहे जाणावें । डोळस[22] तम ॥ ८१ ॥ एवं तिहीं गुणीं । भेदलें यथालक्षणीं[23] । ज्ञान श्रोतेंशिरोमणी । दाविलें तुज ॥ ८२ ॥ आतां याचि त्रिप्रकारा । ज्ञानाचेनि धनुर्धरा । प्रकाशें होती गोचरा[24] । कर्तयांच्या क्रिया ॥ ८३ ॥ ह्मणौनि कर्म पैं गा । अनुसरे तिहीं भागां । [25]मोहरें जालियां वोघा । तोय जैसें ॥ ८४ ॥ तेंचि ज्ञानत्रयवशें । त्रिविध कर्म जें असे । तेथ सात्विक तंव ऐसें । परिस आधीं ॥ ८५ ॥

---

१ कामास येतें. २ काष्ठ. ३ विषयच सर्व जग असें मानलें. ४ पोषण. ५ आकाशांतून पडलेलें पाणी. ६ परिच्छिन्न देहाला. ७ बुद्धि. ८ लिंगदेहासह. ९ नासे. १० एक नियंते. ११ क्वचित्. १२ फिरणें. १३ चामड्याचे. १४ अनुभव. १५ खरी. १६ स्थिति. १७ भेंडयाचा वृक्ष. १८ निवडुंगाचें. १९ निरर्थक. २० वाईट. २१ मोठा. २२ प्रत्यक्ष अंधार. २३ सर्व लक्षणांनीं युक्त. २४ प्रत्यक्ष. २५ मार्गास लागलेलें.

### नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।
### अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्विकमुच्यते ॥ २३ ॥

तरि स्वाधिकाराचेनि मार्गें । आलें जें मानिलें आंगें । पतिव्रतेचेनि परिष्वंगें । प्रियातें जैसें ॥ ८६ ॥ सांवळ्या[2] आंगा चंदन । प्रमदालोचना[3] अंजन । तैसें अधिकारासी मंडण[4] । नित्यपणें जें ॥ ८७ ॥ तें नित्यकर्म भलें । होय नैमित्तिकीं सांवाइलें[5] । सोनयासि जोडलें । सौरभ्य[6] जैसें ॥ ८८ ॥ आणि आंगा जीवाची संपत्ती । वेंचूनि[7] करी बाळाची पाळती । परि जीवें उबगणें[8] हे स्थिती । न पाहे माय ॥ ८९ ॥ तैसें सर्वस्वें कर्म अनुष्ठी । परि फळ न सुये[10] दिठी । उखिती[11] क्रिया पैठी[12] । ब्रह्मींचि करी ॥ ५९० ॥ आणि प्रियें[13] आलिया स्वभावें । शैबळ[14] उरें वेंचे ठाउवें नव्हे । तैसें सत्प्रसंगें करावें । पौरुष जरी ॥ ९१ ॥ तरि अंकरणाचेनि[16] खेदें । द्वेषातें जिवीं न बांधे । जालियाचेनि आनंदें । फुंजों[17] नेणें ॥ ९२ ॥ ऐसऐसिया हातवटिया । कर्म निफजे जें धनंजया । जाण सात्विक हें तया । गुणनाम गा ॥ ९३ ॥ ययावरी राजसाचें[18] । लक्षण सांगिजेल साचें । न करीं अवधानाचें । वोणेंपण[19] ॥ ९४ ॥

### यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।
### क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

तरि घरीं मातापितरां । धड बोली नाहीं संसारा । येर विश्व भरी आदरा । मूर्ख जैसा ॥ ९५ ॥ कां तुळशीचिया झाडा । दुरूनि न वोंपे[20] सितोडा । द्राक्षींचिया तरि बुडा । दूधचि लाविजे ॥ ९६ ॥ तैसीं नित्यनैमित्तिकें । कर्में जियें आवश्यकें । तयांचेविषीं न शके । बसला उठूं ॥ ९७ ॥ येरां काम्याचेनि तरि नांवें । देह सर्वस्व आघवें । वेंचितांही न मनवे[21] । बहु ऐसें ॥ ९८ ॥ अगा देवढी[22] वाढी लाहिजे । तेथ मोल देतां न धाइजे[23] । पेरितां पुरे न म्हणिजे । बीज जेवीं ॥ ९९ ॥ कां परिस जालिया हातीं । लोहाचिया सर्वसंपत्ती । वेंचितां न ये उन्नती[24] । साधक जैसा ॥ ६०० ॥ तैसीं फळें देखोनि पुढें । काम्यकर्म दुवाडें[25] । करी परि तें थोडें । केलेंहि मानी ॥ १ ॥ तेणें फळकामुकें[26] । यथाविधि नेटकें[27] । काम्य कीजे तितकें । क्रियाजात ॥ २ ॥ आणि तयाही केलियाचें । तोंडीं मांडी डौडीचें[28] । कर्मीं या नामश्रेष्ठाचें । वाणें सौरी[29] ॥ ३ ॥ तैसा भरे कर्माहंकारु ।

---

१ आलिंगनानें. २ श्यामवर्ण. ३ स्त्रियांच्या नेत्रांला. ४ भूषण. ५ साह्य झालें. ६ सुगंध. ७ खर्चून. ८ रक्षण. ९ त्रासणें. १० दृष्टीस न घाली. ११ अवघी. १२ अर्पिली. १३ आवडतें. १४ अप्रिय. १५ राहे. १६ न केलें याविषयींच्या. १७ गर्वास चढत नाहीं. १८ रजोगुणयुक्ताचें. १९ कमनशी. २० न घालावा. २१ मानवत नाहीं. २२ दिढी दुपटीनें वाढ. २३ तृप्त न व्हावें. २४ उत्कर्षदशेस. २५ कठीण. २६ फळाची इच्छा करणारा. २७ चांगलें. २८ प्रसिद्धीच्या. २९ व्यापारिबें करी.

मग पिता अथवा गुरु । ते न मनी काळज्वरु । औषध जैसें ॥ ४ ॥ तैसेनि साहंकारें । फळाभिलाषियें नरें । कीजे गा आदरें । जें जें कांहीं ॥ ५ ॥ परि तेंही करणें बहुवसा । [1]वळघोनि करी [2]सायासा । जीवनोपाय कां जैसा । कोल्हांटियाचा ॥ ६ ॥ एका कणालागीं उंदीर । अवघा उपसे डोंगर । कां शेवाळा दोषें दर्दुर । समुद्र [3]डहुळी ॥ ७ ॥ पैं भिकेपरतें न लाहे । तऱ्ही गारुडी साप वाहे । काय कीजे शीणाचि होये । गोड येकां ॥ ८ ॥ हें असो परमाणूचेनि लाभें । पाताळ लंघिती वोळंबे[4] । तैसें स्वर्गसुख लोभें । [5]विचंवणें जें ॥ ९ ॥ तें काम्य कर्म सक्लेश । जाणावें येथ राजस । आतां चिन्ह परिस । तामसाचें ॥ ६१० ॥

## अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।
## मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

तरि तें गा तामस कर्म । जें निंदेचें काळें [6]धाम । निषेधाचें [7]जन्म । साच जेणें ॥११॥ जें निपजविल्या पाठीं । कांहींच न दिसे दिठी । रेघ काढिलिया पोटीं । तोयाचे जेवीं ॥ १२ ॥ कां [8]कांजी घुसळलिया । कां राख फुंकिलिया । कांहीं न दिसे गाळिलिया । [9]वाळुघाणा ॥ १३ ॥ नाना [10]उपणिलिया भूंस । कां विंधिलिया आकाश । नाना मांडिलिया पाश । वारयासी ॥ १४ ॥ हें अवघेंचि जैसें । वांझें होऊनि नाशे । जें केलिया पाठीं तैसें । वायांचि जाय ॥ १५ ॥ येऱ्हवीं नरदेहाही येवढें । धन [11]आटणीये पडे । तें कर्म निफजवितां मोडे । जगाचें सुख ॥ १६ ॥ जैसा कमळवनीं फांस । काढिलिया [12]कांटेस । आपण झिजे नाश । कमळां करी ॥ १७ ॥ कां आपण आंगें जळे । आणि [13]आंधवी जगाचे डोळे । पतंग जैसा [14]सळें । दीपाचेनि ॥ १८ ॥ तैसें सर्वस्व वायां जावो । वरी स्वदेहाही होय घावो । परि पुढिलां अपावो । निफजविजे जेणें ॥ १९ ॥ माशी आपणयातें गिळवी । परि पुढिलां वांती शिणवी । तें [15]कश्मळ आठवी । आचरण जें ॥ ६२० ॥ तेंही करावया दोषें । मज सामर्थ्य असे कीं नसे । हेंही पुढील तैसें । न पाहातां करी ॥ २१ ॥ केवढा माझा उपावो । करितां कोण [16]प्रस्तावो । केलियाही [17]आवो । काय येथ ॥ २२ ॥ इये जाणिवेची सोये । अविवेकाचेनि पायें । पुसोनियां होये । [18]साटोप कर्मी ॥ २३ ॥ आपला [19]वसौटा जाळुनी । [20]खिसांटे जैसा वन्ही । कां स्वमर्यादा गिळोनि । सिंधु उठी ॥ २४ ॥ मग नेणे बहु थोडें । न पाहे मागें पुढें । मार्गामार्ग [21]येकवटे । करीत चाले ॥ २५ ॥ तैसें कृत्याकृत्य [22]सरकटित । आपपर नुरवित । कर्म होय तें निश्चित । तामस

१ आरूढ होऊन. २ कष्टास. ३ ढवळी. ४ वाळवी. ५ श्रम करणें. ६ घर. ७ अपवित्रतेचें. ८ पेज. ९ घाण्यांत वाळु घातली तरी. १० पाखडलें असतां. ११ खर्चीं. १२ कांट्यांचा. १३ आंधार करी. १४ द्वेषानें. १५ सदोष. १६ प्रसंग. १७ तात्पर्य. १८ अहंतायुक्त. १९ वसतिस्थान. २० पसरे. २१ एकत्र. २२ रगडीत.

जाण ॥ २६ ॥ ऐसी गुणत्रयभिन्ना । कर्मांची गा अर्जुना । हे केली विवंचना[1] । उपपत्तीसीं ॥ २७ ॥ आतां ययाचि कर्मा भजतां । कर्माभिमानिया कर्ता । तो जीवही त्रिविधता । पातला असे ॥ २८ ॥ चतुराश्रमवशें[2] । एकपुरुष चतुर्धा[3] दिसे । कर्तया त्रैविध्य तैसें । कर्मभेदें ॥ २९ ॥ परि तयां तिहींआंत । सात्विक तंव प्रस्तुत । सांगेन दत्तचित्त । आकर्णी[4] तूं ॥ ६३० ॥

> मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।
> सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्विक उच्यते ॥ २६ ॥

तरि फळोद्देशें[5] सांडिलिया । वाढती जैसि सरळिया[6] । शाखा कां चंदनाचिया । बांवनया[7] ॥ ३१ ॥ कां न फळतांही सार्थका । जैसिया नागलतिका[8] । तैसिया करी नित्यादिका । क्रिया जो कां ॥ ३२ ॥ परि फळशून्यता । नाहीं तया विफळता । पैं फळासीचि पंडुसुता । फळें कायिसीं ॥ ३३ ॥ आणि आदरें करी बहुवसें । परि मी कर्ता हें नुमसे[9] । वर्षाकाळींचें जैसें । मेघवृंद[10] ॥ ३४ ॥ तैसेंचि परमात्मलिंगा । समर्पावयाजोगा । कर्मकलाप पैंगा । निपजावया[11] ॥ ३५ ॥ तया काळातें नुलंघणें । देशशुद्धीही साधणें । कां शास्त्रांच्या वातीं[12] पाहणें । क्रियानिर्णय ॥ ३६ ॥ वृत्तीकरणा[13] येकवळा[14] । चित्त जावों नेदणें फळा । नियमाचिया सांखळा[15] । वाहे सदा ॥ ३७ ॥ हा निरोधु[16] साहावयालागीं । धैर्याचिया चांगाचांगी । चिंतवणी[17] जिती[18] आंगीं । वाहे जो कां ॥ ३८ ॥ आणि आत्मयाचिये आवडी । कर्मे करितां वैरपडीं[19] । देहसुखाचिये पैरवडीं[20] । येवों न लाहे ॥ ३९ ॥ ऐसा निद्रा दुरावे । क्षुधा न बोणवे[21] । सुरवाड[22] न पावे । आंगाचा ठावो ॥ ६४० ॥ तंव अधिकाधिक । उत्साह धरी आगळीक[23] । सोनें जैसें पुटीं तुक[24] । तुटलिया कसीं ॥ ४१ ॥ जरी आवडी आथी साच । तरी जीवितही सलेंच[25] । आंगीं[26] घालितां रोमांच । देखिजती सतिये ॥ ४२ ॥ मा आत्मया येवढिया प्रिया । वाळभेला[27] जो धनंजया । देहही सिरसतां[28] तया । काय खेद होईल ॥ ४३ ॥ म्हणोनि विषय सुरवाड तुटे । जंव जंव देहबुद्धि आटे । तंव तंव आनंद दुणवटे । कर्मीं जया ॥ ४४ ॥ ऐसेनि जो कर्म करी । आणि कोणे येके अवसरीं । तें ठोके[29] ऐसी सैरी[30] । वाहे जरी ॥ ४५ ॥ तरी कडाडीं[31] मोडे गाडा । तो आपणपें न मनी अव-

१ विवरण. २ ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास यांच्या योगें. ३ चार प्रकारचा. ४ श्रवण कर. ५ फलेच्छा. ६ सरळ. ७ मलयाचलसंबंधीं. ८ नागवेल. ९ नुपजे. १० समुदाय. ११ उपजण्यासाठीं. १२ शास्त्ररूपदिव्यानें. १३ इंद्रियें, वृत्ति करणें अशा पाठीं बोलणें व चालणें याला. १४ ऐक्यता. १५ प्रतिबंध. १६ अटक. १७ चिंता. १८ जागरूक. १९ प्राप्त. २० अवस्थेस. २१ अनुभवास नये. २२ सुखावस्था. २३ अधिक. २४ वजन. २५ तुच्छ. २६ आगींत उडी घालतांना सतीच्याही अंगावर भयानें रोमांच उभारतात. २७ आवडीनें युक्त झाला. २८ दुःख पावत असतां. २९ स्तब्ध राहे. ३० प्रकार. ३१ डोंगराच्या अवघड ठिकाणीं.

ड़ा । तैसा ठाकलेनिही थोडा । नोहे जो कां ॥ ४६ ॥ ना तरि आदरिलें । अव्यंग सिद्धी लें । तरि तेंही जितिलें । मिरऊं नेणे ॥ ४७ ॥ इया खुणा कर्म करितां । देखिजे जो डुसुता । तयातें म्हणिपे तत्त्वता । सात्विक कर्ता ॥ ४८ ॥ आतां राजसा कर्तेया । वोळखणें हें धनंजया । जे अभिलाषा जगाचिया । [२]वसौटा तो ॥ ४९ ॥

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥**

जैसा गांवींचिया [३]कश्मळा । उकरडा होय [४]येकवळा । कां स्मशानीं अमंगळा । आघवयांचि ॥ ६५० ॥ तया परी जो [५]अशेषा । विश्वाचिया [६]अभिलाषा । [७]पांयपाखाळणियां षा । [८]घरटा जाला ॥ ५१ ॥ म्हणोनि फळाचा लाग । देखें जिये [९]अंसलग । तिये कर्मी ांग । [११]रोहो मांडी ॥ ५२ ॥ आणि आपण जालिये [१२]जोडी । [१३]उंपेखों नेदी कवडी । णक्षणा कुरोंडी । जीवाची करी ॥ ५३ ॥ कृपणचित्तीं ठेवा आपुला । तैसा दक्ष [१४]पैरावेयां माला । बक जैसा [१५]खुंतला । मासेयासी ॥ ५४ ॥ आणि [१६]गोंवी गेलिया जवळी । [१७]गटलिया आंग [१८]फोळी । फळें तरी आंत पोकळीं । [१९]बोरांटी जैसी ॥ ५५ ॥ तैसें मनें ाचा कायें । भलतया दुःख देत जाये । स्वार्थ साधितां न पाहे । परार्चे हित ॥ ५६ ॥ विच [२०]आंगें कर्मीं । आचरण नोहे [२१]क्षेमीं । न निघे [२०]मनोधर्मीं । [२२]अरोचक ॥ ५७ ॥ [२३]कनकाचिया फळा । आंत माज बाहिरी [२४]मोळी । तैसा सबाह्य दुबळा । शुचित्वें जो ॥ ५८ ॥ आणि कर्मजात केलिया । फळ लाहे जरी धनंजया । तरि [२५]हरिखें जगा यया । वांकुलियाँ [२६]वाये ॥ ५९ ॥ अथवा जें आदरिलें । [२७]हीनफळ होय केलें । तरि शोकें तेणें [२८]जितिलें । धिक्कारों लागे ॥ ६६० ॥ कर्मी राहाटी ऐसी । जयातें होती देखसी । तोचि जाण [२९]त्रिशुद्धीसी । राजस कर्ता ॥ ६१ ॥ आतां यया पाठीं [३०]येर । जो कुकर्माचा [३१]आगर । तोही करूं [३२]गोचेर । तामस कर्ता ॥ ६२ ॥

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥**

तरि मियां लागलिया कैसें । पुढील जळत असे । हें नेणिजे [३३]हुताशें । जियापरी ॥ ६३ ॥

---

१ लहान. २ स्थान. ३ केरकचरा. ४ एक ठिकाण. ५ संपूर्ण. ६ इच्छेसाठीं. ७ पादप्रक्षालनार्थ. ८ आश्रय. ९ संबंध. १० सोपा. ११ उपक्रम. १२ लाभानें. १३ न खर्ची. १४ दुसऱ्याच्या. १५ ध्यानस्थ झाला. १६ अडकवी. १७ स्पर्श झाला असतां. १८ फाडी. १९ बोरीची ढाळी. २० अंगानें करवत नाहीं तथापि मनानें तरी त्या वाईट गोष्टीची इच्छा करतो. २१ समर्थ. २२ अरुचि. २३ धोतऱ्याच्या. २४ कांटवण. २५ हर्षानें. २६ वेडावी. २७ निर्फळ. २८ वांचणें. २९ खचीत. ३० इतर, तामस. ३१ मुख्य स्थान. ३२ प्रत्यक्ष. ३३ अग्नीनें.

पैं घाले मियां तिखटें । नेणिजे केसेनि निवटे । कां नेणिजे काळकूटें । आपलें केलें ॥ ६४ ॥ तैसा पुढीलया आपुलया । घात करीत धनंजया । आदरी वोखटिया[2] । क्रिया जो कां ॥ ६५ ॥ तिया करितां ही वेळीं । काय जालें हें न सांभाळी । चळला वायू वाहटुळी । [3]चेष्टे तैसा ॥ ६६ ॥ पैं करणिया आणि जया । मेळ नाहीं धनंजया । तो पाहूनि [4]पिसेंया । कैंची [5]थाय ॥ ६७ ॥ आणि इंद्रियांचें [6]वारिलें । चरोनि राखे जो जियालें[7] । [8]बैलातळीं लागलें । गोचिड जैसें ॥ ६८ ॥ हांसिया रुदना वेळ । नेणतां [9]ओदरी बाळ । राहटे [10]उच्छृंखळ । तयापरी ॥ ६९ ॥ जो प्रकृती [11]आंतलेपणें । [12]कृत्याकृत्यस्वाद नेणे । फुगे केरें [13]धौलेपणें । उकरडा जैसा ॥ ६७० ॥ म्हणोनि मान्याचेनि नांवें । ईश्वराही परी नें[14] खालवे । स्तब्धपणें न मनवे । डोंगरासी ॥ ७१ ॥ आणि मन जयाचें [15]कैलाली । राहाटी [16]फुंडी चोरिली । दिठी कीर ते बोली । [17]पेण्यांगनेची ॥ ७२ ॥ किंबहुना कपटाचें । देहचि वळिलें तयाचें । तें जिणें कीं जुवाराचें । टिटेघर[18] ॥ ७३ ॥ नोहे तयाचा [19]प्रादुर्भावो । सामिलाषभिल्लांचा गांवो । म्हणोनि नये येवों जावों । तया ठाया ॥ ७४ ॥ आणि आणिकाचें निकें केलें । विरु[20] होय जया आलें । जैसें अपेय [21]पैया मिनलें । लवण करी ॥ ७५ ॥ कां [22]हवि ऐसा पदार्थ । घातलिया आगी आंत । तेचि क्षणीं [23]धडाडित । अग्नि होय ॥ ७६ ॥ नाना सुद्रव्यें गोमटीं । जालिया शरीरीं पैठी[24] । होउनि [25]ठौती किरीटी । मळची जेवीं ॥ ७७ ॥ तैसें पुढीलाचें बरवें । जयाच्या भीतरीं पावे । आणि विरुद्धचि आघवें । होऊनि निगे ॥ ७८ ॥ जो गुण घे दे दोष । अमृताचें करी विष । दूध पाजिलिया देख । [26]थाळ जैसा ॥ ७९ ॥ आणि [27]ऐहिकीं जियावें । जेणें [28]परत्रा साच यावें । तें उचित कृत्य पावें । अवसरी जिये ॥ ६८० ॥ तेव्हां जया आपसी । निद्रा ये ठेविली ऐसी । [29]दुर्व्यवहारी जैसी । [30]विटाळें लोटे ॥ ८१ ॥ पैं द्राक्षरसा आम्ररसा । वेळे तोंड सडे [31]वायसा । कां डोळे फुटती दिवसा । [32]डुडुळाचे ॥ ८२ ॥ तैसा कल्याण काळ पाहे । तैं तयातें आळस खाये । ना [33]प्रमादी तरी होये । तो म्हणे तैसें ॥ ८३ ॥ जैविंचि सागराच्या पोटीं । जळे अखंड आगिठी । तैसा [34]विषाद वाहे गांठीं । जिवाचिये जो ॥ ८४ ॥ [35]लेंडोरीं आगीं धुमावधि । कां [36]अपाना आंगीं दुर्गंधि । तैसा जो जीवितावधि ।

---

१ मरे. २ वाईट. ३ हाले. ४ मूर्खाला. ५ रक्षण. ६ तोंडीं दिलें. ७ जीव. ८ हंसण्यास व रडण्यास. ९ प्रारंभी. १० यथेच्छ. ११ व्यापलेपणें. १२ कर्माकर्मांची रुचि. १३ तृप्तपणानें. १४ न लवे. १५ कपटी. १६ खरी. १७ वेश्येची. १८ चोरी, चाहाडी, शिंदळकी, या तिघावरचें घर. १९ प्रगटपण. २० विरुद्ध. २१ दुधाला. २२ घृत. २३ प्रज्वलित. २४ प्राप्त. २५ राहती. २६ सर्प. २७ या लोकीं वांचावें. २८ परलोकीं. २९ दुष्ट स्त्री. ३० विटाळशी म्हणून संग राहववी. ३१ कावळ्याला. ३२ घुबडाचे. ३३ अकल्याण होण्याचे वेळीं. ३४ खेद. ३५ लेंड्यांच्या विस्तवांत. ३६ गुदद्वारचा वारा.

षारें केला ॥ ८५ ॥ आणि कल्पांताचिया पैरा। वेगळेंही जो वीरा। सुत्र धरी व्यापारा। ाभिलाषा ॥ ८६ ॥ अगा जगाही परौती। शुचा वाहे पैं चित्तीं। करितां विषीं हातीं। ्णही न लगे ॥ ८७ ॥ ऐसा जो लोकाआंत। पापपुंज मूर्त। देखसी तो अव्याहत। ामस कर्ता ॥ ८८ ॥ एवं कर्म कर्ता ज्ञान। या तिहींचें त्रिधा चिन्ह। दाविलें तुज जन। चक्रवर्ती ॥ ८९ ॥

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं श्रृणु।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥**

आतां अविद्येच्या गांवीं। मोहाची वेढूनि मेरवी। संदेहाचीं आयवीं। लेऊनि ठेणीं ॥ ६९० ॥ आत्मा निश्चयाची बरव। जया आरिसा पाहे सावयव। तिये बुद्धीचिही ठांव। त्रिधा असे ॥ ९१ ॥ अगा सत्वादिगुणीं इहीं। काइ एक तिहीं ठायीं। न कीजेचि ग्रथ पाहीं। जगामाजी ॥ ९२ ॥ आगी न वसतां पोटीं। कवण काष्ट असे सृष्टी। तैसें तें कैचें दृश्यकोटी। त्रिविध जें न नोहे ॥ ९३ ॥ म्हणौनी तिहीं गुणीं। बुद्धी केली त्रिगुणी। धृतीसिही वांटणी। तैसिचि असे ॥ ९४ ॥ तेंचि एक वेगळालें। यथाचिन्हीं अळंकारलें। सांगिजेल उपाइलें। भेदलेपणें ॥ ९५ ॥ परि बुद्धि धृति इयां। दोहीं भागांमाजि धनंजया। आधीं रूप बुद्धीचिया। भेदासि करूं ॥ ९६ ॥ तरि उत्तम मध्यम निकृष्टा। संसारासि गा सुभटा। प्राणियां येतिया वाटा। तिनी आथी ॥ ९७ ॥ जे करणीय काम्य निषिद्ध। ते हे मार्ग तिन्ही प्रसिद्ध। संसार भय संबंध। जीवा ययां ॥ ९८ ॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये।**
**बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥**

म्हणोनि अधिकारें मानिलें। जें विधीचेनि वोघें आलें। तें येकचि येथ भलें। नित्य कर्म ॥ ९९ ॥ तेंचि आत्मप्राप्ति फळ। दिठी सूनि केवळ। कीजे जैसें कां जळ। सेविजे तोंहने ॥ ७०० ॥ येतुलेनि तें कर्म। सांडि जन्मभय विषम। करूनि दे सुगम। मोक्षसिद्धी ॥ १ ॥ ऐसें करी तो भला। संसार भयें सांडिला। करणीयत्वें आला। मुमुक्षुभागा ॥ २ ॥ तेथ जे बुद्धि ऐसा। बळिया बांधे भरंवसा। मोक्ष ठेविला ऐसा। जोडेल येथ ॥ ३ ॥ म्हणौनि निवृत्तिचि मांडली। सूनि प्रवृत्तितळीं। इये कर्मीं बुडकुळी।

---

१ पलीकडचे. २ शोक. ३ पापाचा ढीग. ४ निरंकुश. ५ वस्त्र. ६ चांगुलपणा. ७ मूर्तिमान. ८ दृश्यवर्गांत. ९ धैर्य. १० आरंभिलेलें. ११ कनिष्ठ. १२ विहित निष्काम कर्म. १३ फलेच्छायुक्त कर्म. १४ तृषाशांत्यर्थ. १५ मुक्तिलाभ. १६ संसाराचा नाश होऊन मोक्ष मिळतो म्हणून निष्काम कर्मीं बुडी मारावी. ( निष्काम कर्में करावीं. ) १७ बुडी मारणें.

धावी कीं ना ॥ ४ ॥ तृषार्ता उदकें जिणें । कां पुरीं पडलिया पव्हणें[1] । अंधकूपीं गति किरणें । सूर्याचेनी ॥ ५ ॥ नाना पथ्येसीं औषध लाहे । तरी रोगें दाटलाही[2] जिये । कां मीनां[3] जिव्हाळा होये । जळाचा जरी ॥ ६ ॥ तरि तयाच्या जीविता । नाहीं ओवें अन्यथा । तैसें कर्मी इये वर्त्तता । जोडेचि मोक्ष ॥ ७ ॥ हें करणीयाचिया कडे । जें ज्ञान आथी चोखडें । आणि अकरणीय हें फुडें । ऐसें जाण ॥ ८ ॥ जीं तियें काम्यादिकें । संसारभयदायकें । अकृत्यपणाचें आंबुखें । पाडिलें जयां ॥ ९ ॥ तियें कर्मी अकार्यीं । जन्ममरण समर्थीं । प्रवृत्ति पळवी पायीं । मागिलींचि ॥ ७१० ॥ पैं आगीमाजि न रिघवे । अर्थावीं न घलवे । धगधगीत नांगवे[10] । शूळ जेवीं ॥ ११ ॥ कां काळियानाग धुंधुवात[11] । देखोनि न घालवे हात । न वचवे खोपेभांतें[12] । व्याघ्राचिये ॥ १२ ॥ तैसें कर्म अकरणीय[13] । देखोनि महाभय । उपजे निःसंदेह । बुद्धी जिये ॥ १३ ॥ वाढिलें रांधुनि विषें । तेथ जाणिजे मृत्यु न चुके । तेवि निषेधीं कां कां देखे । बंधातें जो ॥ १४ ॥ मग बंधभयमारितीं । तियें निषिद्धीं प्राप्तीं । विनियोगें[14] जाणे निवृत्ती । कर्माचिये ॥ १५ ॥ ऐसेनि कार्याकार्य-विवेकीं । जे प्रवृत्ति निवृत्ति मापकीं[16] । खरा कुडा[17] पारखी । जिया परी ॥ १६ ॥ तैसी कृत्याकृत्यशुद्धी । बुझे जे निरवधी । सात्विक म्हणिपे बुद्धी । तेचि तूं जाण ॥ १७ ॥

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥**

आणि बकांच्या[20] गांवीं । घेपे क्षीरनीर[21] संकलवी[22] । कां अहोरात्रींची गोंवी । आंधळें नेणे ॥ १८ ॥ जया फुलाचा मकरंद फावे[23] । तो काष्ठें कोरूं धांवे । परि भ्रमरपणा नव्हे[24] । अव्हांटा जेवि ॥ १९ ॥ तैसीं इयें कार्याकार्यें । धर्माधर्मरूपें जियें । तियें न चोजवितां[25] जाये । जाणती जे कां ॥ ७२० ॥ अगा डोळांवीण मोतियें । घेतां पाड[26] मिळे विपायें[27] । न मिळणें तें आहे । ठेविलें तेथें ॥ २१ ॥ तैसें अकरणीय अवचटें[28] । नोडवे[29] तरीच लोटे । येरवीं जाणें एकवटें । दोन्हीं जे कां ॥ २२ ॥ ते गा बुद्धी चोखाविखीं[30] । जाण येथ राजसी । अक्षत टाकिली जैसी । मांदियेवरी[31] ॥ २३ ॥

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥**

---

१ पोहणें. २ व्यापला असतांही वांचतो. ३ मत्स्याला. ४ होते. ५ स्पष्ट. ६ आवरण. ७ शिरवे. ८ खोल पाण्यांत. ९ प्रखर. १० धरतां येत नाहीं. ११ फूत्कार टाकीत. १२ जाळींत. १३ निषिद्ध. १४ व्यवस्था. १५ बुद्धि. १६ मापनें. १७ खोटा. १८ समजे. १९ अत्यंत. २० बगळ्याच्या. २१ दूध व पाणी. २२ सरसकट. २३ मिळे. २४ आडवाट होत नाहीं. २५ न जाणों येतां. २६ योग्यता. २७ क्वचित्. २८ अकस्मात्. २९ प्राप्त न होय. ३० शुद्धविषयीं. ३१ सभेवर.

आाणि राजा जिया वाटा जाये । ते चोरांसि आडव[1] होये । कां राक्षसां दिवो[2] पाहे । ाति होऊनी ॥ २४ ॥ नाना निधानचि निदैवा[3]। होये कोळसयाचा उंडवा[4]। पैं असतें ापणपें जीवा । नाहीं जालें ॥ २५ ॥ तैसें धर्मजात तितकें । जिये बुद्धीसी पातकें । ाच तें लटिकें । ऐसेंचि बुझे ॥ २६ ॥ ते आघवेचि अर्थ । करूनि घाली अनर्थ । गुण ां ते व्यवस्थित । दोषचि मानी ॥ २७ ॥ किंबहुना श्रुतिजातें[7] । अधिष्ठुनि[8] केलें सरतें[9] । ातुलेंहि उपरतें[10] । जाणे जे बुद्धी ॥ २८ ॥ कोणातेंही न पुसतां । तामसी जाणावी पंडु- ुता । रात्री[11] काय धर्माथीं । साच करावी ॥ २९ ॥ एवं बुद्धीचे भेद । तिन्ही तुज विशद[12] । ांगीतले स्वबोध- । कुमुदचंद्रा[13] ॥ ७३० ॥ आतां ययाचि बुद्धिवृत्ती । निष्टंकिलां[14] कर्मजातीं । ांद मांडिजे धृती । त्रिविधा जया ॥ ३१ ॥ तिये धृतीचेही विभाग । तिन्हीं यथालिंग[17] । ांगीजति चांग । अवधान दे ॥ ३२ ॥

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ।**
**योगेनाऽव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्विकी ॥ ३३ ॥**

तरि उदेलिया दिनकर । चोरीसि थोके[18] आंधार[19] । कां राजाज्ञा अव्यवहार । कुंठवी जेवीं ॥ ३३ ॥ नाना पवनाचा सांट[20] । वाजीनलिया नीट । आंगेसीं[21] बोभाट[22] । सांडिती मेघ ॥ ३४ ॥ कां अगस्तीचेनि दर्शनें । सिंधु घेऊनी ठाती[23] मौनें । चंद्रोदयीं कमळवनें । मिटी[24] देती ॥ ३५ ॥ हें असो पावो उचलिला । मैदमुख[25] न ठेविती खालां । गर्जोनि पुढां जांला । सिंह जरी ॥ ३६ ॥ तैसा जो धीर । उठलिया अंतरें[26] । मनादिकें व्यापार । सांडिती उभीं ॥ ३७ ॥ इंद्रिया विषयांचिया गांठी । आपैसया सुटती किरीटी । मन मायेच्या पोटीं । रिगती दाही[27] ॥ ३८ ॥ अधोर्ध्व[28] गुढें काढी । प्राण नवांची पेंडी[29] । बांधोनि घाली उडी । मध्यमेमाजी[30] ॥ ३९ ॥ संकल्पविकल्पाचें लुगडें । सांडूनि मन उघडें । बुद्धि मागिलेकडे । उगीचि बैसे ॥ ७४० ॥ ऐसी धैर्यराजें जेणें । मन प्राण करणें । स्वचेष्टांचीं संभाषणें । सांडवीजती ॥ ४१ ॥ मग आघवींचि सेंडीं[31] । ध्यानाच्याआंतुल्या मढीं[32] । कोंडिजती निरवडी[33] । योगाचिये ॥ ४२ ॥ परी परमात्मया चक्रवर्ती । उगाणिती[34] जंव हातीं । तंव

---

१ अरण्य. २ दिवस उजाडे. ३ ठेवा. ४ भाग्यहीनाला. ५ ढीग. ६ वाटे. ७ वेदानें. ८ स्थापून. ९ मान्य. १० विपरीत. ११ धर्मार्थीला जी खरोखर रात्र=अभाव करणारी ती काय करावयाची. १२ स्पष्ट. १३ ज्ञानरूपकमलास प्रफुल्लित करण्याऱ्या चंद्रा. १४ निश्चयात्मक झाला. १५ वेगवेगळेपणा. १६ धैर्य. १७ जसे आहेत तसे. १८ थांबे. १९ आश्रयस्थान, अंधकार अज्ञापाठीं चोरी व अंधकार हीं दोन्हीं नाहींशीं होतात. २० वेग. २१ वीज इत्यादि. २२ गर्जना. २३ राहती. २४ मिटती. २५ हत्ती. २६ अंतरांतून. २७ दाहा इंद्रियें. २८ खालतें वरतें. २९ आवरण. ३० सुषुम्नेंत. ३१ शुद्ध. ३२ हृदयीं. ३३ कुशलतेनें. ३४ जाणती.

लांच न घेतां धृती। धरिजती जिया ॥ ४३ ॥ ते गा धृति येथें। सात्त्विक हें निरुतें। आईक अर्जुनातें। श्रीकांत ह्मणे ॥ ४४ ॥

**यया तु धमकामाथान् धृत्या धारयतेऽर्जुन।**
**प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥**

आणि होऊनियां शरीरीं। स्वर्गसंसाराच्या दोहीं घरीं। नांदे जो पोटभरी। [1]त्रिवर्गोपायें ॥ ४५ ॥ तो मनोरथांच्या सागरीं। धर्मार्थकामांच्या [2]तारुवावरी। जेणें धैर्यबळें करी। क्रिया [3]वाणिज ॥ ४६ ॥ जें कर्म भांडवला [4]ठेये। तयाची चौगुणी येती पाहे। येवढें साहस वाहे। जया धृती ॥ ४७ ॥ ते गा धृती [5]राजस। पार्था येथ परियेस। आतां आइक तामस। तिसरी जे कां ॥ ४८ ॥

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च।**
**न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥**

तरि सर्वाधमें गुणें। जयाचें कां रूपा येणें। कोळसा काळेपणें। वडला जैसा ॥ ४९ ॥ अहो प्राकृत आणि हीन। तयाही कीं गुणत्वाचा मान। परि न ह्मणिजे [7]पुण्यजन। राक्षस काई ॥ ७५० ॥ पैं ग्रहांमाजि [8]इंगळ। तयातें ह्मणिजे मंगळ। [9]तैसा तमीं धेंसाळ। गुणशब्द हा ॥ ५१ ॥ जे सर्वदोषांचा [10]वसौटा। तमचि [11]कोमाऊनि सुभटा। उभारिला [12]आंगवठा। जया नराचा ॥ ५२ ॥ तो आळस [13]सूनि असे कांखे। ह्मणौनि निद्रे कांहीं न मुके। पापें पोशितां दुःखें। न सांडिजे जेवीं ॥ ५३ ॥ आणि देहा धनाचिया आवडी। सदा भय तयातें न सांडी। विसंबूं न सके [14]धोंडी। काठिण्य जैसें ॥ ५४ ॥ आणि पदार्थजातीं [15]स्नेहो। [16]बांधे ह्मणौनि तो शोकें ठावो। केला न शके पाप जावों। [17]कृतघ्नौनि जैसें ॥ ५५ ॥ आणि असंतोष जीवेसीं। धरूनि [18]ठेला अहर्निशीं। ह्मणौनि मैत्री तेणेसीं। [19]विषादें केली ॥ ५६ ॥ लसणातें न सांडी [20]गंधी। कां अपथ्यशीळातें व्याधी। तैसी केली मरणावधी। विषादें तया ॥ ५७ ॥ आणि [21]वयसा वित्तकाम। ययाचा वाढवी [22]संभ्रम। ह्मणौनि मदें आश्रम। तोचि केला ॥ ५८ ॥ आगीतें न सांडी ताप। [23]सळातें जातीचा साप। कां [24]जगाचा वैरी [25]वासिप। अखंड जैसा ॥ ५९ ॥ ना तरि शरीरातें काळ। न विसंबे कवणे वेळ। तैसा आथि अढळ। तामसीं मद

१ धर्म, अर्थ, काम या तीन उपायांनीं. २ गलबतावर. ३ व्यापार. ४ घाली. ५ रजोगुणात्मक. ६ प्रसिद्धीस. ७ पुण्यवान लोक. ८ अग्नीसारखा क्रूर ग्रह. ९ व्यर्थ. १० वसतिस्थान. ११ सिद्ध करून. १२ आकार. १३ घालून. १४ दगड. १५ प्रीति. १६ ठेवितो. १७ अनुपकाऱ्यापासून. १८ राहिला. १९ खेदानें. २० दुर्गंध. २१ आयुष्यधन वर्धनाची इच्छा. २२ मोठेपण. २३ द्वेषाला. २४ सर्वांशीं विरुद्ध. २५ भय.

ु० ॥ एवं पांचही हे निद्रादिक । तामसाच्या ठाईं दोख । जिया धृती देख । धरिले
ाती ॥ ६१ ॥ तिये गा धृती नांवें । तामसी येथ हें जाणावें । ह्मणीतलें तेणें देवें ।
चेनि ॥ ६२ ॥ एवं त्रिविध जे बुद्धि । कीजे कर्मनिश्चयो आधि । तो धृती या
ृ । नेईजो येथ ॥ ६३ ॥ सूर्यें मार्ग गोचर होये । आणि तो चालती कीर पाये ।
चालणें तें आहे । धैर्यें जेवी ॥ ६४ ॥ तैसी बुद्धि कर्मातें दावी । तें करणसामग्री
जवी । परि निफजावया होआवी । धीरता जे ॥ ६५ ॥ ते हे गा तुजप्रति । सांगी-
त्रिविध धृति । यथा कर्मत्रया निष्पत्ति । जालिया मग ॥ ६६ ॥ येथ फळ जें एक
जे । सुख जयातें ह्मणिजे । तेंही त्रिविध जाणिजे । कर्मवशें ॥ ६७ ॥ तरि फळरूप
ुख । त्रिगुणीं भेदलें देख । विवंचूं आतां चोख । चोखीं बोलीं ॥ ६८ ॥ परि
ी ते कैसी सांगें । पैं घेवों जातां बोलैंबगें । कानींचियेही लागे । हातींचा मळ
ु९ ॥ ह्मणौनि जयाचेनि अव्हेरें । अवधानही होय बाहेरें । तेणें आइक हो आदरें ।
ाचेनि जिवें ॥ ७७० ॥ ऐसें ह्मणौनि देवो । त्रिविधा सुखाचा प्रस्तावो । मांडला
[11]निर्वाहो । निरूपित असे ॥ ७१ ॥

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥ ३६ ॥**

ह्मणे सुखत्रयसंज्ञा । सांगों ह्मणौनि प्रतिज्ञा । बोलिलों तें प्राज्ञा । ऐक आतां ॥ ७२ ॥
रे सुख तें गा किरीटी । दाविजेल तुज दिठी । जें आत्मयाचिये [13]भेटी । जीवासि
थ ॥ ७३ ॥ परि मात्रेचेनि मापें । दिव्यौषध जैसें घेपे । कां कथिलाचें कीजें रुपें ।
भावनीं ॥ ७४ ॥ नाना लवणाचें जळ । होआवया दोनि चार वेळ । देऊनि सांडि-
ती ढेंळ । तोयाचे जेवि ॥ ७५ ॥ तेवि जालेनि सुखलेशें । जीव भाविलिया अभ्यासें ।
ीवपणाचें नासे । दुःख जेथें ॥ ७६ ॥ तें येथ आत्मसुख । जालें असे त्रिगुणात्मक ।
ही सांगों एकैक । रूप आतां ॥ ७७ ॥

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥**

आतां चंदनाचें बुड । सर्पीं जैसें दुर्वाड । कां निधानांचें तोंड । विवसियीं जेवि
। ७८ ॥ अगा स्वर्गींचें गोमटें । आड येगसंकटें । कां बाळपण दाटें । त्रासकाळें

---

१ प्रत्यक्ष. २ इंद्रियार्थ. ३ उत्पन्न करी. ४ धैर्य. ५ कर्माच्या योगानें. ६ स्पष्ट शब्दांनीं.
७ शब्दाच्या मार्गानें. ८ अंतःकरणयुक्त श्रवणानें. ९ करतलमलवत्. १० विवरण. ११ व्यवस्था.
१२ बुद्धिमंता. १३ भेटीनें. १४ प्रमाणानें. १५ किमयेच्या कृतीनें. १६ पूर. १७ पाण्याचे.
१८ भयंकर. १९ विघ्नदेवतेमुळें. २० अरण्य. २१ यज्ञरूप क्लेशानें. २२ पीडाकारक.

॥ ७९ ॥ हें असो दीपान्वियें सिद्धी । अवघड धूम आधीं । ना तरि तो औषधीं । जिभेच्या ठावीं ॥ ७८० ॥ तयापरि पांडवा । जया सुखाचा रिगावा । विषम तेथ मेळावा । यमदमांचा ॥ ८१ ॥ देत सर्वस्नेहा मिठी । आंगीं ऐसें वैराग्य उठी । स्वर्गसंसारा कांठी । कोढितची ॥ ८२ ॥ विवेक श्रवणें खरपुसें । जेथ व्रताचरणें कर्कशें । करितां जाली भोंकसे । बुध्यादिकांचे ॥ ८३ ॥ सुषुम्नेचेनि तोंडें । गिळिजे प्राणापानाचे लोंढे । [10]बोहणियेसीचि येवढें । भारी जेथ ॥ ८४ ॥ जें सारसांही बिघडतां । होय वोहोंहूनि वत्स काढितां । ना भणंग दवडितां । भोंणयावरूनी ॥ ८५ ॥ पैं मायेपुढौनि बाळक । काळें नेतां एकुलतें एक । होय कां उदक । तुटतां मीना ॥ ८६ ॥ तैसें विषयांचें घर । इंद्रियां सांडितां थोर । युगांत होय तें वीर । विरंग साहाती ॥ ८७ ॥ ऐसा जया सुखाचा आरंभ । दावी काठिण्याचा क्षोभ । मग क्षीराब्धीं लाभ । अमृताचा जैसा ॥ ८८ ॥ पहिल्या वैराग्यगरळा । धैर्यशंभु वोडवी गळा । तरि ज्ञानामृतें सोहळा । पाहे जेथें ॥ ८९ ॥ पैं कोलितांहि कांपे ऐसें । द्राक्षांचें हिरवेपण असे । तें परिपाकीं कां जैसें । माधुर्य आतें ॥ ७९० ॥ तें वैराग्यादिक तसें । पिकलिया आत्मप्रकाशें । मग वैराग्येंसींही नाशे । अविद्याजात ॥ ९१ ॥ तेव्हां सागरीं गंगा जैसी । आत्मीं मीनल्या बुद्धि तसी । अद्वयानंदाची आपैसी । खाणी उघडे ॥ ९२ ॥ ऐसें स्वानुभवविश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे । तें सात्विक येणें नामें । बोलिजे सुख ॥ ९३ ॥

> विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
> परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

आणि विषयेंद्रिया । मळ होतां धनंजया । जें सुख जाय थडिया[22] । सांडूनि दोन्ही ॥ ९४ ॥ अधिकारिया[23] रिगतां[24] गांवो । होय जैसा उत्साहो । कां रिणावरी[25] विवाहो । विस्तारिला ॥ ९५ ॥ नाना रोगिया जिभेपासीं । केळें गोड साखरेसीं । कां बचनागाची जैसी । मधुरता पहिली ॥ ९६ ॥ पहिलें संव-चोराचें मैत्र । हाटभेटीचें[26] कलत्र । कां लांघवीयाचे[27] विचित्र । विनोद ते ॥ ९७ ॥ तैसें विषयेंद्रियदोखीं[28] । जें सुख जीवातें पोखी । मग उपडिला[29] खडकीं । हंस जैसा ॥ ९८ ॥ तैसी [30]जोडी आघवी आटे । जीविताचा ठाय

---

१ औषधास. २ विपरीत. ३ दांतखीळ. ४ कांटेरी. ५ दूर करीतच. ६ तीव्र. ७ कठोर. ८ ओंगाच्या कातडयाचें भोंक. ९ मध्यनाडी. १० प्रथमारंभीं. ११ चक्रवाकाच्या युग्मास. १२ कासेपासून. १३ भिकारी. १४ पात्रावरून. १५ आईच्या पुढ्यांतून. १६ विरक्त. १७ विषाला. १८ पुढें करी. १९ कोलून झुगारणारीं द्राक्षें राखतांहीं, कवलिता अशा पाठीं तक्षक. २० अज्ञानसमूह. २१ मिळाली असतां. २२ तीरें. २३ अधिकारी. २४ शिरतां. २५ कर्जानें. २६ बाजारांतील स्त्री. २७ थट्टेखोराचे. २८ विषयामुळें. २९ सांपडला. ३० संपादिलेलें.

फिटे । सुकृताचियाही सुटे । धनाची गाठी ॥ ९९ ॥ आणिक भोगिलें जें कांहीं । तें स्वप्न तैसें होय नाहीं । मग हानिचाचि [2]घांई । लोळावें उरे ॥ ८०० ॥ ऐसें [3]आपत्ती जें सुख । [4]ऐहिकीं [5]परिणमे देख । परत्रीं कीर विख । होउनि परते ॥ १ ॥ जे इंद्रियजाता लळा । दीधलिया धर्माचा मळा । जाळूनि भोगिजे सोहळा । विषयांचा जेथ ॥ २ ॥ तेथ पातकें बांधिती [6]थावो । तियें नरकीं देती ठावो । जेणें सुखें हा [7]अपावो । परत्रीं ऐसा ॥ ३ ॥ पैं नामें विष मधुरें । परि मारूनि अंतीं खरें । तैसें आदिजें [9]गोडिरें । अंतीं कडु ॥ ४ ॥ पार्था तें सुख साचें । [10]वेंळिलें आहे रजाचें । म्हणौनि न शिवें तयाचें । आंग कहीं ॥ ५ ॥

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।
निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

आणि अपेयाचेनि पानें । अखाद्याचेनि भोजनें । [11]स्वैरस्त्रीसंनिधानें । होय जें सुख ॥ ६ ॥ कां पुढिलांचेनि मारें । नातरि [12]परस्वापहारें । जें सुख [13]अवतरे । भाटाच्या बोलीं ॥ ७ ॥ जें आलस्यावरि [14]पोखिजे । निद्रेमाजी जें देखिजे । जयाच्या आद्यंतीं भूलिजे । [15]आपुली वाट ॥ ८ ॥ तें गा सुख पार्था । तामस जाण सर्वथा । हें बहु न सांगोंचि [16]जे कथा । असं[17]भाव्य हें ॥ ९ ॥ ऐसें कर्मभेदें मुदलें । फळसुखही त्रिधा जालें । तें हें यथागमें केलें । गोचर तुज ॥ ८१० ॥ तें कर्ता कर्म फळ । हे त्रिपुटी येकी केवळ । वांचूनि कांहींचि नसे स्थूळ । सूक्ष्मीं इये ॥ ११ ॥ आणि हे तंव त्रिपुटी । तिहीं गुणीं इहीं किरीटी । गुंफिली असे पटी । [18]तांतुवीं जैसी ॥ १२ ॥

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

म्हणौनि प्रकृतीच्या [19]आलोकीं । न बांधिजे इहीं सत्वादिकीं । तैसी स्वर्गीं ना मृत्युलोकीं । आथी वस्तु ॥ १३ ॥ कैंचा लोवे[20]वीण कांबळा । मातियेवीण मो[21]दळा । कां जळेंवीण कल्लोळा । होणें आहे ॥ १४ ॥ तैसें नहोनि गुणाचें । सृष्टीच्या रचना रचे । ऐसें नाहींच गा साचें । प्राणिजात ॥ १५ ॥ यालागीं हे सकळ । तिहीं गुणाचेंचि केवळ । घडलें आहे निखिळ । ऐसें जाण ॥ १६ ॥ गुणीं देवां [22]त्रयी लाविली । गुणीं लोकीं त्रि[23]पुटी पाडिली । चतुर्वर्णां घातलीं । सिनानीं [24]उळिगें ॥ १७ ॥

---

१ पुण्यरूप धन. २ घायानें. ३ विपत्तिरूप. ४ या लोकांत. ५ परिणाम पावतें. ६ बळ. ७ अपाय. ८ मधुर नांवाचें विष. ९ मधुर. १० बनविलें. ११ व्यभिचारिणीच्या संसर्गानें. १२ दुसऱ्याचें द्रव्य हरण केल्यानें. १३ प्रगटे. १४ पुष्ट होतें. १५ स्वधर्म. १६ कारण कीं. १७ नित्य. १८ तंतूनीं. १९ आभासांत. २० लोंकरीवांचून. २१ मातीचें ढेकूळ. २२ ब्रह्मा, विष्णु, महेश. २३ कर्ता, कर्म, करणें इ०. २४ कार्यें.

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥**

तेंचि चारी वर्ण । पुससी जरी कोण कोण । तरि जयां मुख्य ब्राह्मण । धुरेचे कां ॥ १८ ॥ येर क्षत्रिय वैश्य दोन्ही । तेही ब्राह्मणाच्याचि मानिजे मानीं । जे ते वैदिकें-विधानीं । योग्य म्हणौनी ॥ १९ ॥ चौथा शूद्र जो धनंजया । वेदीं लाग कीर नाहीं तया । तऱ्ही वृत्ति वर्णत्रया- । आधीन तयाची ॥ ८२० ॥ तिये वृत्तीचिया जवळिका । वर्णत्रयां ब्राह्मणादिकां । अहो शूद्रही कीं लेखा । चौथा जाला ॥ २१ ॥ जैसा फुलाचेनि सांगातें । तांतु तुरंबिजे श्रीमंतें । तैसें द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारी श्रुती ॥ २२ ॥ ऐसैसी गा पार्था । हे चतुर्वर्णव्यवस्था । करूं आतां कर्मपैंथा । यांचियां रूप ॥ २३ ॥ जिहीं गुणीं ते वर्ण चारी । जन्ममृत्यूचिये कातरी । चुकोनियां ईश्वरीं । [1]पैठे होती ॥ २४ ॥ जियें आत्मप्रकृतीचे इहीं । गुणीं सत्वादिकीं तिहीं । कर्में चौघां चहूं ठाईं । वांटिलीं वर्णां ॥ २५ ॥ जैसें बापें जोडिलें लेंकां । वांटिलें सूर्यें मार्ग [10]पांथिकां । नाना व्यापार सेवकां । स्वामीनें जैसे ॥ २६ ॥ तैसी प्रकृतीच्या गुणीं । जया कर्मांची वेल्हावणी । केली आहे वर्णीं । चहूं इहीं ॥ २७ ॥ तेथ सत्वें आपल्या अंगीं । [13]समीन-निमीन भागीं । दोघे केले [14]नियोगी । ब्राह्मण क्षत्रिय ॥ २८ ॥ आणि रज परी सात्विक । तेथ ठेविले वैश्य लोक । रजचि [15]तमें भेषक । तेथ शूद्र ते गा ॥ २९ ॥ ऐसा येकाचि प्राणिवंशा । भेद [16]चैतुर्वर्णधा । गुणींचि इहीं प्रबुद्धा । केला जाण ॥ ८३० ॥ मग आपलें ठेविलें जैसें । आइतेंचि दीपें दिसे । गुणभिन्न कर्म तैसें । शास्त्र दावी ॥ ३१ ॥ तेंचि आतां कोण कोण । वर्णविहितांचें लक्षण । हें सांगों ऐक श्रवण । [17]सौभाग्यें-निधी ॥ ३२ ॥

**शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥**

तरि सर्वेंद्रियांचिया वृत्ती । घेऊनि आपुल्या हातीं । बुद्धि आत्मया मिळे येकांतीं । प्रिया जैसी ॥ ३३ ॥ ऐसा बुद्धीचा [18]उपरम । तया नाम म्हणिपे शम । तो गुण गा [20]उपक्रम । जया कर्माचा ॥ ३४ ॥ आणि बाह्येंद्रियांचें धेंडें [21] । पिटूनि विधीचेनि दंडें । नेदिजे अधर्माकडे । कहींचि जावों ॥ ३५ ॥ तो पैं गा शमा [22]विरजा । दम गुण जेथ दुजा ।

---

१ आग्रभागींचें. २ वेदोक्तकर्में करण्याला. ३ प्रवेश. ४ जीवनोपाय. ५ वृत्तीच्या सान्निध्यानें. ६ दोरा धारण करावा. ७ या चारी वर्णांच्या कर्मविभागाचें स्पष्टीकरण. ८ कातरीस. ९ प्राप्त. १० वाटसरू लोकांस. ११ अथवा. १२ विस्तार. १३ अर्धोअर्ध, समविषमभावें. १४ स्वाधीन. १५ तमोमिश्र. १६ वर्णपरत्वें चार प्रकारचा. १७ हे भाग्यवंता. १८ विषयापासून उलटणें. १९ शांति आरंभ. २० आरंभ. २१ स्वारी. २२ साह्य.

आणि स्वधर्माचिया वोजा।[1] जिणें जें कां ॥ ३६ ॥ तेंवांचि सैंर्‍ वीचिये राती। न विसंबिजे जेंवि वाती। तैसा ईश्वरनिर्णय चित्तीं। वाइणें सदा ॥ ३७ ॥ तया नाम तप। हें तिजया गुणाचें रूप। आणि शौचहि निष्पाप। द्विविध जेथ ॥ ३८ ॥ मन भाव-शुद्धी भरलें। आंग क्रिया अळंकारिलें। ऐसें सबाह्य जियालें। साजिरें जें कां ॥ ३९ ॥ तया नाम शौच पार्था। तो कर्मी गुण जये चौथा। आणि पृथ्वीचिया परी सर्वथा। सर्व जें साहाणें ॥ ८४० ॥ ते गा क्षमा पांडवा। गुण जेथ पांचवा। स्वरामाजि सुहावा। पंचम जैसा ॥ ४१ ॥ आणि वांकडेनि वोघेंसी। गंगा वाहे उजूचि जैसी। कां पृष्ठीं वळला उसीं। गोडी जैसी ॥ ४२ ॥ तैसा विषमांहि जीवां-। लागीं[12] उजुकार बरवा। तें आर्जव गा साहावा। जेथिचा गुण ॥ ४३ ॥ आणि पाणियें प्रयत्नें माळी। अखंड[13] ओंचे झाडामुळीं। परि तें आघवेंचि फळीं। जाणें जेवी॥ ४४ ॥ तैसें शास्त्राचारें तेणें। ईश्वरचि येक पावणें। हें फुडें जें कां जाणणें। तें येथ ज्ञान ॥ ४५ ॥ तें गा कर्मी जिये। सातवा गुण होये। आणि विज्ञान हें पाहें। एवंरूप ॥ ४६ ॥ तरि सत्वशुद्धीचियें वेळे। शास्त्रें कां ध्यानबळें। ईश्वरतत्वींचि मिळे। निष्टंकबुद्धी ॥ ४७ ॥ हें विज्ञान बरवें। तें गुणरत्न जेथ आठवें। आणि आस्तिक्य जाणावें। नववा गुण ॥ ४८ ॥ पैं राजमुद्रा आथिलियां। प्रजा भजे भलतयां। तेंवि शास्त्रें स्वीकारिलिया। मार्गमात्रातें ॥ ४९ ॥ आदरें जें कां मानणें। तें आस्तिक्य मी ह्मणें। तो नववा गुण जेणें। कर्म तें साच ॥ ८५० ॥ एवं नवही शमा-दिक। गुण जेथ निर्दोष। तें कर्म जाण स्वाभाविक। ब्राह्मणाचें ॥ ५१ ॥ तो नवगुण-रत्नाकर। यया नवरत्नांचा हार। न फेडीत ले[16] दिनकर। प्रकाश जैसा ॥ ५२ ॥ नाना चांपा[17] चांपौळीं पूजिला। चंद्र चंद्रिकीं धवळला। कां चंदन निजें चर्चिला। सौरभ्यें जेवीं ॥ ५३ ॥ तेंवि नवगुणटिकंलग। लेणें ब्राह्मणाचें अभ्यंग। कहींचि न संडी आंग। ब्राह्मणाचें ॥ ५४ ॥ आतां उचित जें क्षत्रिया। तेंही कर्म धनंजया। सांगों ऐक मत्तेचिया। भैरोवरी ॥ ५५ ॥

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्॥ ४३॥**

तरि भानु हा तेजें। नापेक्षी जेवि विरंजें। कां सिंहें न पाहिजे। जावळियीं ॥ ५६ ॥

---

१ रीतीनें. २ वांचणें. ३ जन्मल्याच्या साहाव्या रात्रीं. ४ दिवा. ५ शुद्धि. ६ विचारानें. ७ विहित कार्यांनीं भूषित केलें. ८ जाहालें. ९ सुशोभित. १० पंचम नांवाचा स्वर. ११ पाठीकडे वळलें. १२ सरळ. १३ माळी नित्य झाडाच्या मुळांत पाणी घालून श्रम करितो व फळानें श्रमांचें सार्थक्य होईल असें मानितो. १४ सिद्धांतबुद्धीनें. १५ राजचिन्हें असलेल्यांला. १६ तोच नवगुणरूप रत्नांचा समुद्र व तोच त्या नवरत्नांचा हार करून ले=आपल्या आंगावर घालितो. १७ चाफ्याच्या कळ्यांनीं. १८ चांदण्यानें शुभ्र केला. १९ सुगंधानें. २० शोभिवंत. २१ सामुग्रीनें. २२ साह्य. २३ सोबती.

ऐसा स्वयंभ जो जीवें लोठ । साह्यावेंवीण उद्भट । तें शौर्य गा जेथ श्रेष्ठ । पहिला गुण ॥ ५७ ॥ आणि सूर्याचेनि प्रतापें । कोडिही[४] नक्षत्र हारपे । ना तो तरि न लोपे । सचंद्रीं तिहीं ॥ ५८ ॥ तैसेनि आपुले प्रौढिगुणें । जगा या विस्मय देणें । आपण तरी न क्षोभणें । कायसेनही ॥ ५९ ॥ तें प्रागल्भ्यरूप तेजा । जिये कर्मीं गुण दुजा । आणि धीर तो तिजा । जेथिचा गुण ॥ ८६० ॥ वरि पडलिया आकाश । बुद्धीचे डोळे मानस । झांकी ना तें परियेस । धैर्य जेथें ॥ ६१ ॥ आणि पाणी हो कां भलतेतुकें । परि तें जिणौनि पद्म फांके । कां आकाश उंचिया जिंके । आर्वडे तयातें ॥ ६२ ॥ तेवि विविधा अवस्था । पातलिया जिणौनि पार्था । प्रज्ञाफळ तया अर्था । वेंझे देणें जें ॥ ६३ ॥ तें दक्षत्व गा चोख । जेथ चौथा गुण देख । आणि जुंझ अलौकिक । पांचवा गुण ॥ ६४ ॥ आदित्याचीं झाडें । सदां सन्मुख सूर्याकडे । तेवि समोर शत्रूपुढें । होणें जें कां ॥ ६५ ॥ माहेवैंणीं प्रयत्नेंसीं । चुकविजे सेजे जैसी । रिपू पाठी नेदिजे तसी । समरंगणीं ॥ ६६ ॥ हा क्षत्रियाचेया आचारीं । पांचवा गुणेंद्र अवधारीं । चहूं पुरुषार्थां शिरीं । भक्ति जैसी ॥ ६७ ॥ आणि जालेनि फुलें फळें । शाखियें जैसी मोकळें । कां उदार परिमळें । पद्माकर ॥ ६८ ॥ ना ना आवडीचेनि मापें । चांदिणें भलतेणें घेपे । पुढिलांचेनि संकल्पें । तैसें जें देणें ॥ ६९ ॥ तें उमेप गा दान । जेथ सहावें गुणरत्न । आणि आज्ञे एकायतन । होणें जें कां ॥ ८७० ॥ पोषूनि अवयव आपुले । करविजती मातविले । तेवि पालणें लोभविलें । जग जें भोगणें ॥ ७१ ॥ तया नाम ईश्वरभावो । जो सर्वसामर्थ्याचा ठावो । तो गुणांमाजि रावो । सातवा जेथ ॥ ७२ ॥ ऐसें जें शौर्यादिकीं । इहीं सात गुणविशेखीं । अळंकृत सप्तऋखीं । आकाश जैसें ॥ ७३ ॥ तैसें सप्तगुणीं विचित्र । कर्म जें जगीं पवित्र । तें सहज जाण क्षात्र । क्षत्रियाचें ॥ ७४ ॥ ना ना क्षत्रिय नव्हे नरु । तो सत्व सोनयाचा मेरु । म्हणौनि गुण स्वर्गा आधारु । सातां यियां ॥ ७५ ॥ ना तरि सप्तगुणार्णवीं । परिवेंरली बरवी । हे क्रिया नव्हे पृथ्वी । भोगीतसे तो ॥ ७६ ॥ कां गुणाचे सातांही ओघीं । हे क्रिया ते गंगा जगीं । तया महोदधीचिया आंगीं । विलसे[१८] जैसी ॥ ७७ ॥ परि हें बहु असो देख । शौर्यादि गुणात्मक । कर्म गा नैसर्गिकें । क्षत्रजातीसी ॥ ७८ ॥ आतां वैश्याचिये जाती । उचित जें महामती । तें ऐकें निरुती । क्रिया सांगों ॥ ७९ ॥

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

तरि भूमि बीज नागर । यया भांडवलाचा आधार । घेऊनि लाभ अपार । मेळवणें

१ बळवान. २ साह्यावांचून. ३ शूर. ४ कोटयवधी. ५ कोसळल्यास. ६ कितीही. ७ जिंकून. ८ पाहिजे त्याला. ९ सूक्ष्म मार्ग. १० रजस्वला. ११ मुख्य गुण. १२ वृक्ष. १३ देतात. १४ मोठें. १५ वेदाज्ञेस एकनिष्ठ. १६ सप्तऋर्षीनीं. १७ वेष्टिली. १८ शोभे. १९ स्वाभाविक. २० यथार्थ.

जें ॥ ८८० ॥ किंबहुना [1]कृषीजिणें । गोधनें राखोनि वर्तणें । कां [2]समर्घाची विकणें । [3]महार्घ वस्तु ॥ ८१ ॥ येतुलालाचि पांडवा । वैश्यातें कर्माचा मेळावा । हा वैश्यजातिस्वभावा । आंतुला जाण ॥ ८२ ॥ आणि वैश्य क्षत्रिय ब्राह्मण । हे [4]द्विजन्मे तीन्ही वर्ण । ययांचें जें शुश्रूषण । तें शूद्र कर्म ॥ ८३ ॥ पैं द्विजसेवेपरौतें । धांवणें नाहीं शूद्रातें । एवं चतुर्वर्णोचितें । दाविलीं कर्में ॥ ८४ ॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ ४५ ॥**

आतां इयेंचि विचक्षणा । वेगळालिया वर्णा । उचित जैसें करणा । शब्दादिक ॥ ८५ ॥ ना तरि [5]जळदच्युता । पाणिया उचित [6]सरिता । सरितेसी पांडुसुता । सिंधु उचित ॥ ८६ ॥ तैसें वर्णाश्रमवशें । जें करणीय आलें असे । गोरेया आंगा जैसें । गोरेपण ॥ ८७ ॥ तया स्वभावविहिता कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा । प्रवर्तावयालागीं [7]प्रमा । अढळ कीजे ॥ ८८ ॥ पैं आपुलेंचि रत्न [8]थितें । घेपे पारखियाचेनि हातें । तैसें स्वकर्म [9]आपैतें । शास्त्रें करावें ॥ ८९ ॥ जैसी दिठी असे आपुलियाठाईं । परि दीपेंवीण भोग नाहीं । मार्गु न लाहतां काई । पाय असतां होय ॥ ८९० ॥ म्हणौनि [10]जातिवशें साचार । सहज असे जो अधिकार । तो आपुलालिया शास्त्रें गोचर । आपण कीजे ॥ ९१ ॥ मग घरींचाचि ठेवा । जेविं डोळ्यां दावी दिवा । तरी घेतां काय पांडवा । [11]ओडळ असे ॥ ९२ ॥ तैसें स्वभावें भागा आलें । वरी शास्त्रें खरें केलें । तें विहित जो आपुलें । आचरे गा ॥ ९३ ॥ परि आळस सांडुनी । फळकाम दवडुनी । आंगें जीवें मांडुनी । तेथेंचि [12]भेरु ॥ ९४ ॥ वोघीं पडिलें पाणी । नेणे [13]आनानी वाहणी । तैसा जाय आचरणीं । व्यवस्थौनि ॥ ९५ ॥ अर्जुना जो यापरी । तें विहित कर्म स्वयें करी । तो मोक्षाच्या ऐलतीरीं । [14]पैठो होय ॥ ९६ ॥ जे [15]अकरणा आणि निषिद्धा । [16]नवचेचि कांहीं संबंधा । म्हणौनि [17]भवा विरुद्धा । मुकला तो ॥ ९७ ॥ आणि काम्यकर्माकडे । न परतेचि जेथ [18]कोडें । तेथ चंदनाचेही [19]खोडे । न [20]लेचि तो ॥ ९८ ॥ येर नित्य कर्म तंव । फळत्यागें वेंचिलें सर्व । म्हणौनि मोक्षाची शिव । [21]ठोकू लाहे ॥ ९९ ॥ ऐसेनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं । [22]वैराग्य मोक्षद्वारीं । उभा ठाके ॥ ९०० ॥ जें सकळ-

---

१ शेतकीवर निर्वाह करणें. २ स्वस्त दरानें घेतलेली वस्तु. ३ महाग. ४ दोन वेळ जन्म, उपजणें हा पहिला जन्म व मुंज होणें हा दुसरा. ५ पडलेल्या मेघजळाला. ६ नदी. ७ बुद्धि. ८ असलेलें. ९ प्राप्त. १० जातीप्रमाणें. ११ अडथळा. १२ आदर. १३ निरनिराळा प्रवाहमार्ग. १४ प्राप्त. १५ मुळींच कर्म न करण्याला. १६ जातच नाहीं. १७ आत्मप्राप्तीस विरुद्ध जो संसार त्याला. १८ आवडीनें. १९ खोडा. २० स्वीकारित नाहीं. २१ प्राप्तीस लाभतो. २२ वैराग्य हें मोक्षाचें द्वार आहे.

भाग्याची सीमा । मोक्षलाभाची जें प्रेमा[1] । नाना कर्ममार्गश्रमा । शेवटु जेथ ॥ १ ॥ मोक्षफळें दिधलीं बोलें[2] । जें सुकृततरूचें[3] फूल । तये वैराग्यीं ठेवी पाउल । भंवरूं[4] जैसा ॥ २ ॥ पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा । बोधावा सांगतया अरुणाचा । उदय त्या वैराग्याचा । ठावो पावे ॥ ३ ॥ किंबहुना आत्मज्ञान । जेणें हाता ये निधान । तें वैराग्य दिव्यांजन । जीवें लें[6] तो ॥ ४ ॥ ऐसी मोक्षाची योग्यता । सिद्धी जाय तया पंडुसुता । अनुसरोनि विहिता । कर्मा यया ॥ ५ ॥ हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य[7] वोलावा । आणि हेंचि परम सेवा । मज सर्वात्मकाची ॥ ६ ॥ पैं आघवाचि भोगेंसी । पतिव्रता क्रीडे प्रियेंसीं । कीं तयाचि नामें जैसीं । तपें तियां केलीं ॥ ७ ॥ कां बाळका एकी माये- । वांचोनि जिणें काय आहे । ह्मणौनि सेविजे कीं तो होये । पोटाचा[11] धर्म ॥ ८ ॥ नाना पाणी ह्मणौनि मासा । गंगा न सांडितां जैसा । सर्वतीर्थ सहवासा । वैरपडा[12] जाला ॥ ९ ॥ तैसें आपलिया विहिता । उपाय असे न विसंबतां । ऐसा कीजे कीं जगन्नाथा । औभार[13] पडे ॥ ११० ॥ अगा जयाचें विहित । तें ईश्वराचें मनोगत । ह्मणौनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ॥ ११ ॥ पैं जीवाचे कसीं[14] उतरली । ते दासी कीं गोसांवीणें[15] जाली । तैसी सेवेची तिया मांवली[16] । वैंहि[17] जोर्वि ॥ १२ ॥ तैसें स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हेचि परमसेवा । येर तें गा पांडवा । वाणिज्य करणें ॥ १३ ॥

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥ ४६ ॥**

ह्मणौनि विहित क्रिया केली । नव्हे तयाची खूण पाळिली । जयापासूनि कां आलीं । आकारा भूतें ॥ १४ ॥ जो अविद्येचिया चिंधिया । गुंडूनी जीव बाहुलिया । खेळवीतसे त्रिगुणिया । अहंकाररज्जू ॥ १५ ॥ जेणें जग हें समस्त । आंत बाहेरी पूर्ण भरित । जालें आहे दीपजात । तेजें जैसें ॥ १६ ॥ तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची[18] वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥ १७ ॥ ह्मणौनि तिये पुजे । रिझलेनि[19] आत्मराजें । वैराग्यसिद्धि देइजे । पसाय[20] तया ॥ १८ ॥ जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशें[21] । हें सर्वही नावडे जैसें । वांत[22] होय ॥ १९ ॥ प्राणनाथाचिया आधीं[23] । विरहिणीतें जिणेंही[24] बाधी[25] । तैसें सुखजात त्रिशुद्धी । दुःखचि लागे ॥ १२० ॥ सम्यक्ज्ञान नुदैजतां । वेधेंचि[26] तन्मयता । उपजे ऐसी योग्यता । बोधाची लाहे ॥ २१ ॥

---

१ प्रमाण. २ तारण. ३ पुण्यरूपवृक्षाचें. ४ भ्रमर. ५ वार्ता, उदय. ६ घाली. ७ एकनिष्ठ. ८ जिव्हाळा. ९ पतीशीं विहार करी. १० त्याचप्रमाणें. ११ अभिलाषा. १२ प्राप्त. १३ भार. १४ कसोटीस लावली. १५ धनीण. १६ साधली. १७ हर. १८ फुलें. १९ संतुष्ट झाल्यानें. २० प्रसाद. २१ छंदानें. २२ वमन. २३ मनोव्याधि. २४ वांचणें. २५ व्यर्थ. २६ ध्यासानें.

ह्मणौनि मोक्षलाभालागीं । जो व्रतें वाहतसे आंगीं । तेणें स्वधर्म आस्था[1] चांगीं । अनुष्ठावा ॥ २२ ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥**

अगा आपला हा स्वधर्म । आचरणीं जरी विषम[2] । तरी पाहावा तो परिणाम । फळेल जेणें ॥ २३ ॥ जैं सुखालागीं आपणपयां- । निंबचि आथी धनंजया । तैं कडुवटपणा तयां- चिया । उबगिजे[3] ना ॥ २४ ॥ फळणया ऐलीकडे । केळीतें पाहातां आस[4] मोडे । ऐसी त्यजिली तरी जोडे । तैसें कें गोमटें ॥ २५ ॥ तेविं स्वधर्म सांकडु । देखोनि केला जरी कडु । तरी मोक्षसुरवाडु[5] । अंतरला कीं ॥ २६ ॥ आणि आपली माये । कुब्ज[6] जरी आहे । तरी [7]जीजेतें नोहे । स्नेह[8] कुन्हें[9] कीं ॥ २७ ॥ येरी जिया पराविया । रंभेहूनि बर- विया । तिया काय कराविया । बाळकें तेणें ॥ २८ ॥ अगा पाणियाहूनि बहुवें[10] । तुपीं गुण कीर आहे । परि मीना काय होये । असणें तेथ ॥ २९ ॥ पैं आघविया जगा जें विख । तें विख-कीडिया पीयूख । आणि गुळ[11] तें देख । मरण हे तया ॥ ९३० ॥ ह्मणौनि जें विहित जया जेणें । फिटे संसाराचें धरणें । क्रिया कठोर तऱ्हि तेणें । तेचि करावी ॥ ३१ ॥ येरा पराचारा बरविया । ऐसें होईल टेंकलेयां[12] । पायांचें चालणें डोईयां[13] । केलें जैसें ॥ ३२ ॥ यालागीं कर्म आपलें । जें जातिस्वभावें असे आलें । तें करी तेणें जिंतिलें । कर्मबंधातें ॥ ३३ ॥ आणि स्वधर्मचि पाळावा । परधर्म तो गोंळावा[14] । हा नेमही पांडवा । न कीजेचि पैं ॥ ३४ ॥ तरी आत्मदृष्ट नोहे । तंव कर्म करणें कां[15] ठाये । आणि करणें तेथ आहे । आयास आधीं ॥ ३५ ॥

**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥**

ह्मणौनि भलतिये कर्मीं । आयास जऱ्ही उपक्रमीं[16] । तरी काय स्वधर्मीं । दोष सांगें ॥ ३६ ॥ अगा उजू वाटा चालावें । तऱ्ही पायचि सिणवावे । ना आडरानें धांवावें । तऱ्ही तेंचि ॥ ३७ ॥ पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें[17] एक धनंजया । परि जें वाहातां विसावया[18] । मिळिजे तें घेपे ॥ ३८ ॥ येऱ्हवीं कणा[19] आणि भूसा[20] । कांढितांही सोसे[21]

---

१ चांगल्या आस्थेनें. २ कठीण. ३ कंटाळूं नये. ४ आशाभंग. ५ सुख. ६ कुबड आलेली. ७ जेणें वाचावें. ८ माया. ९ वांकडें. १० फार. ११ गोड. १२ आश्रय केल्यास. १३ डोक्यानें. १४ टाकावा. १५ कसें रहातें. १६ आरंभी. १७ दडपणें. १८ विश्रांतीस. १९ धान्य. २० फोल. २१ श्रम सारखाच.

सारिसा । जेंचि रंधन [2]श्वानमांसा । तेंचि [3]हवी ॥ ३९ ॥ दधी जळाचिया घुसळणा । व्यापार सारिखेचि विचक्षणा । वाळुवे तिळा घाणा । गाळणें एक ॥ ९४० ॥ पैं नित्य-होम देयावया । कां सैरीं [4]आगीं सुवावया । फुंकितां धूम धनंजया । साहणें तेंचि ॥ ४१ ॥ परी धर्मपत्नी [5]धांगडी । पोसितां जरी एकी वोढी । तरि कां [6]अपरवडी । आणावी आंगा ॥ ४२ ॥ हां गा पाठीं लागला घाई । मरण न चुकेचि पाहीं । तरि [7]समोरला काई । आगळें न कीजे ॥ ४३ ॥ कुळस्त्री दांडयाचे घाये । [9]परघर रिगालीहि जरि साहे । तरि स्वपतीतें वांयें । त्यजिलें कीं ॥ ४४ ॥ तैसे आवडतेंही करणें । न निपजे शिण-त्याविणें । तरि विहित बारे [10]कोणें । बोलें [11]भारी ॥ ४५ ॥ वरि थोडेंचि अमृत घेतां । सर्वस्व वेंचो कां पंडुसुता । जेणें जोडे जीविता । अक्षयत्व ॥ ४६ ॥ येर कांहीं मोलें वेचूनि । विष पियावें घेउनि । आत्महत्येसि निमोनि । जायिजे जेणें ॥ ४७ ॥ तैसें जाचूनियां इंद्रियें । वेचूनि आयुष्याचेनि [12]दियें । सांचले पापीं आन आहे । दुःखावां-चूनि ॥ ४८ ॥ म्हणोनि करावा स्वधर्म । जो करितां हिरोनि घे श्रम । उचित देईल परम । [13]पुरुषार्थराज ॥ ४९ ॥ याकारणें किरीटी । स्वधर्माचिये राहटी । न विसंबिजे संकटीं । सिद्धमंत्र जैसा ॥ ९५० ॥ का नाव जैसी उदधीं । महारोगीं दिव्यौषधीं । न विसंबिजे तया बुद्धी । स्वकर्म येथ ॥ ५१ ॥ मग ययाचि गा कपिध्वजा । स्वकर्माचिया महापूजा । तोषला ईश तमरजा । झाडा करूनि ॥ ५२ ॥ शुद्ध सत्वाचिया वाटा । आणी आपुली उत्कंठा । [14]भव स्वर्ग काळकूटा । ऐसे दावी ॥ ५३ ॥ जियें वैराग्य येणें बोलें । [15]मार्गा संसिद्धी रूप केलें । किंबहुना तें आपुलें । मेळवी [16]खागें ॥ ५४ ॥ मग जितिलिया हे [17]भोये । पुरुष सर्वत्र जैसा होये । कां [18]जालाहि जें लाहे । तें आतां सांगों ॥ ५५ ॥

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाऽधिगच्छति ॥ ४९ ॥

तरि देहादिक हें संसारें । सर्वही मांडलेंसे जें [19]गुंफिरें । तेथ [20]नांतुडे तो वागुरे । वारा जैसा ॥ ५६ ॥ पैं परिपाकाचिये वेळे । फळ देठें ना देठ फळें । न धरे तेसें स्नेह खुळें सर्वत्र होय ॥ ५७ ॥ पुत्र वित्त कलत्र । हे जालियाही स्वतंत्र । माझें न म्हणे पात्र । विषाचें जैसें ॥ ५८ ॥ हें असो विषयजातीं । बुद्धि पोळली ऐसी माघौती । पाउलें

---

१ शिजविण्याची खटपट. २ कुत्र्याचें मांस. ३ भात. ४ स्वेच्छ अग्नींत घालण्यास. ५ व्यभि-चारिणी. ६ अन्यायवर्तन. ७ समोरच्या घायानें. ८ ज्यास्ती. ९ दुसऱ्याचें घर. १० कोणत्या कारणानें कठीण असें म्हणावें. ११ कशाला. १२ दिवस. १३ मोक्ष. १४ इहपरसंबंधीं भोग. १५ मार्गे. १६ ठिकाण. १७ भूमि. १८ पूर्ण झालेला. १९ जाळें. २० न सांपडे. २१ जाळ्यांत. २२ वेडानें.

घेउनि एकांतीं । हृदयाच्या रिघे ॥ ५९ ॥ ऐसया अंतःकरण । बाह्य येतां तयाची आण । न मोडी समर्था भेण । दासी जैसी ॥ ९६० ॥ तैसें ऐक्याचिये मुठी । माजिवडें चित्त किरीटी । करूनि [1]वेधीं नेहटी । आत्मयाच्या ॥ ६१ ॥ तेव्हां [2]दृष्टादृष्ट स्पृहे । [3]निमणें जालेचि आहे । आगीं दडपलिया धुयें । राहिजे जैसें ॥ ६२ ॥ म्हणोनि नियमिलिया मानसीं । स्पृहा नासोनि जाय आपैसी । किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ॥ ६३ ॥ पैं [4]अन्यथाबोध आघवा । मावळोनि तया पांडवा । बोधमात्रींचि जीवा । ठाव होय ॥ ६४ ॥ [5]धरवणी वेचें सरे । तैसें भोगें [6]प्राचीन पुरे । नवें तंव [7]नुपकरे । कांहींचि करूं ॥ ६५ ॥ ऐशी कर्में साम्य दशा । होय तेथ वीरेशा । मग श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ॥ ६६ ॥ रात्रीची चौपाहरी । वेंचलिया अवधारीं । डोळयां [8]तमारी । मिळे जैसा ॥ ६७ ॥ कां येऊनि फळाचा घड । [9]पौरुषवी केळीची वाढ । श्रीगुरू भेटोनि करी [10]पांड । मुमुक्षू तैसा ॥ ६८ ॥ मग आलिंगिला पूर्णिमा । जैसा उणीव सांडी चंद्रमा । तैसें होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ॥ ६९ ॥ तेव्हां [11]अबोधमात्र असे । तो तंव तया कृपा नाशे । तेथ [12]निशिसवें जैसें । आंधारें जाय ॥ ९७० ॥ तैसी अबोधाचिये कुशी । कर्म कर्ता कार्य ऐशी । त्रिपुटी असे ते जैसी । [13]गर्भिणी मारिली ॥ ७१ ॥ तैसेंचि [14]अबोधनाशासवें । नाशे क्रियाजात आघवें । ऐसा समूळ संभवे । [15]संन्यास हा ॥ ७२ ॥ येणें [16]मूळाज्ञानसंन्यासें । दृश्याचा जेथ ठावो पुसे । तेथ [17]बुझावें तें अपैसें । तोचि आहे ॥ ७३ ॥ [18]चेइलियावरि पाहीं । स्वप्नींचिया तिये डोहीं । अपणयातें काई । काढुं जाइजे ॥ ७४ ॥ तैं मी नेणें आतां जाणेन । हें सरलें तया दुःस्वप्न । जाला [19]ज्ञातृज्ञेयाविहीन । चिदाकार ॥ ७५ ॥ मुखाभासेंसी आरिसा । परता नेलिया वीरेशा । पाहातेपणेंवीण जैसा । पाहाता [20]टेंके ॥ ७६ ॥ तैसें नेणणें जें गेलें । तेणें जाणणेंही नेलें । मग [21]निष्क्रिय उरलें । [22]चिन्मात्रचि ॥ ७७ ॥ तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया । म्हणौनि [23]प्रवाद तया । नैष्कर्म्य ऐसा ॥ ७८ ॥ तें[24] आपुलें आपणपें । [24]असतचि होऊनि हारपे । तरंग कां वायुलोपें । समुद्र जैसा ॥ ७९ ॥ तैसें न होणें निपजे । ते [25]नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे । सर्वसिद्धींत सहजें । परम हेचि ॥ ९८० ॥ देउळाचिया कामा कळस । परम गंगेसी सिंधुप्रवेश । कां सुवर्णशुद्धि कस । [26]सोळीवा जैसा ॥ ८१ ॥ तैसें आपुलें नेणणें । फेडिजे कां जाणणें ।

---

१ छंदानें. २ इहपर भोगेच्छेनें. ३ समाप्ति. ४ विपरीत ज्ञान. ५ धरून ठेविलेलें पाणी. ६ संचित. ७ आरंभ न करी. ८ सूर्य. ९ थांबवी. १० प्रकार. ११ अज्ञान. १२ रात्रीबरोबर. १३ गर्भिणी. १४ अज्ञानाच्या नाशासह. १५ कर्मत्याग. १६ मूळासह अज्ञानाचा नाश. १७ जाणावें. १८ जागे झाल्यावर. १९ जाणणारा व जाणण्याची वस्तु या भेदावांचून. २० राहे. २१ क्रिया-रहित. २२ ज्ञानस्वरूप. २३ नांव. २४ तें=जाणणें, असतचि=नेहमीं असणारें आत्मस्वरूप. २५ निष्कामकर्मता. २६ सोळा रुपये तोळा दराचा.

तेंहि गिळूनि असणें । ऐसी जे दशा ॥ ८२ ॥ तियेपरतें कांहीं । निपजणें येथ नाहीं । ह्मणौनि ह्मणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥ ८३ ॥

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाऽप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

परि हेचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि । श्रीगुरुकृपेलब्धि- । काळीं पावे ॥ ८४ ॥ उदयजतांचि दिनकर । प्रकाशचि भाते आंधार । कां दीपसंगें कर्पूर । दीपचि होय ॥ ८५ ॥ तया लवणाची कणिका । मिळतखेंवो उदका । उदकचि होऊनि देखा । ठाके जेवि ॥ ८६ ॥ कां निद्रित चेवविलियां । स्वप्नेंसी नीदे वायां । जाऊनि अपणपयां । मिळे जैसा ॥ ८७ ॥ तैसें जया कोण्हासि दैवें । गुरुवाक्य श्रवणाचिसवें । द्वैत गिळोनि विसंवे । आपणया वृत्ती ॥ ८८ ॥ तयासी मग कर्म करणें । हें बोलिजेलचि कवणें । आकाशा येणें जाणें । आहे काई ॥८९॥ ह्मणौनि तयासि कांहीं । त्रिशुद्धि करणें नाहीं । परि ऐसें जरि हें कांहीं । नव्हे जया ॥ ९९० ॥ कानां वचनाचिये भेटी- । सरिसाचि पैं किरीटी । वस्तु होऊनि उठी । कवणि एक जो ॥ ९१ ॥ येऱ्हवीं स्वकर्माचेनि वन्हीं । काम्य-निषिद्धाचिया इंधनीं । रज तम कीर दोन्हीं । जाळिलीं आधीं ॥ ९२ ॥ पुत्र वित्त पर-लोक । यया तिहींचा अभिलाख । घरीं होय पाइक । हेंही जालें ॥ ९३ ॥ इंद्रियें सैरा पदार्थीं । रिगतां विटाळलीं होतीं । तियें प्रत्याहारतीर्थीं । न्हाणिलीं कीर ॥ ९४ ॥ आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पूनि बळ । घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद ॥ ९५ ॥ ऐसी आत्मसाक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उंजरी । ते सामग्री कीर पुरी । मेळविली ॥ ९६ ॥ आणि तेचि समयीं । सद्गुरु भेटले पाहीं । तेवींचि तिहीं कांहीं । वंचिजेना ॥ ९७ ॥ परि वोखद घेतखेंवो । काय लाभे आपला ठावो । कां उदयजतांची दिवो[18] । मध्यान्ह होय ॥ ९८ ॥ सुक्षेत्रीं आणि [19]वोलटें । बीजहि पेरिलें गोमटें । तरि ओंलोट फळ भेटे । परि वेळे[21] कीं या ॥ ९९ ॥ जोडला मार्ग प्रांजळें । मिनला सुसंगाचाही मेळ । तरि पाविजे वांचूनि वेळ । लागेचि कीं ॥ १००० ॥ तैसा वैराग्यलाभ जाला । वरि सद्गुरूही भेटला । जीवीं अंकुर फुटला । विवेकाचा ॥ १ ॥ तेणें ब्रह्म एक आथि । येर आघवींचि भ्रांति । हेही कीर प्रतीति । गाढ केली ॥ २ ॥ परि तेंचि जें परब्रह्म । सर्वात्मक सर्वोत्तम । मोक्षा-

---

१ प्राप्तीच्या वेळीं. २ व्यापी. ३ मिळतांक्षणीं. ४ जागृत केला असतां. ५ निद्रा. ६ विश्रांति पावे. ७ कर्म. ८ शिष्याचा कान व गुरुवचन यांची भेट. ९ लागलाच. १० ब्रह्मस्वरूप. ११ अग्नीमध्यें. १२ काष्ठांत. १३ इच्छा. १४ नोकर. १५ ब्रह्माकारतारूप तीर्थांत. १६ उत्कर्ष-दशा. १७ प्रतारणा केली जात नाहीं. १८ दिवस. १९ ओलसर भूमींत. २० अत्यंत. २१ वेळानें. २२ स्पष्ट. २३ मिळाला. २४ साधुसंगतीचा. २५ परंतु. २६ बळकट.

चेंही काम । सरे जेथ ॥ ३ ॥ यया तिन्हीं अवस्था पोटीं । जिरवी जें गा किरीटी । तया ज्ञानासिही मिठी । दे जें वस्तु ॥ ४ ॥ ऐक्याचें एकपण सरे । जेथ आनंदकणही[1] विरे । कांहींचि नुरोनि उरे । जें कांहीं गा ॥ ५ ॥ तियें ब्रह्मीं ऐक्यपणें । ब्रह्मचि होऊनि असणें । तें क्रमेंचि करून तेणें । पाविजे पैं ॥ ६ ॥ भुकेलियापासीं । वोगरिलें[2] षड्रसीं । तो तृप्ती प्रतिग्रासीं । लाहे जेविं ॥ ७ ॥ तैसा वैराग्याचा वोलावा[3] । विवेकाचा तो दिवा । ऑंबुथितां[4] आत्मठेवा । काढीचि तो ॥ ८ ॥ तरि भोगिजे आत्मऋद्धी । येवढी योग्यतेची सिद्धी । जयाच्या आंगीं निरवधी । लेणें जाली ॥ ९ ॥ तो जेणें क्रमें ब्रह्म । होणें करी गा सुगम । तया क्रमाचें आतां वर्म । आईक सांगों ॥ १०१० ॥

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥**

तरि गुरु दाविलिया वाटा । येऊन विवेकतीर्थतटा[5] । धुऊनियां मळकटा[6] । बुद्धीचा तेणें ॥ ११ ॥ मग राहूनें उंगळिली[7] । प्रभा[8] चंद्रें आलिंगिली । तैसी शुद्धत्वें जडली । आपणयां[9] बुद्धि ॥ १२ ॥ सांडूनि कुळें[10] दोन्ही । प्रियेसी[11] अनुसरे कामिनी । द्वंद्व[12]-त्यागें स्वचिंतनीं । पडली तैसी ॥ १३ ॥ आणि ज्ञानाऐसें जिव्हार[13] । नेवों नेवों निरंतर । इंद्रियीं केले थोर । शब्दादिक जे ॥ १४ ॥ तें रश्मि[14]जाळ काढलेया । मृगजळ जाय लया । तैसें[15] वृत्तिरोधें तयां । [16]पांचांहीं केलें ॥ १५ ॥ नेणतां अधमाचिया[17] अन्ना । खादलिया कीजे वमना[18] । तैसीं ओकविलीं सवासना[19] । इंद्रियें विषयीं[19] ॥ १६ ॥ मग प्रत्यगावृत्ती[20] चोखटें । लाविलीं गंगेचेनि[20] तटें । ऐसीं प्रायश्चित्तें धुवटें । केलीं येणें ॥ १७ ॥ पाठीं सात्विकें[21] धीरें तेणें । शोधारलीं[22] तियें करणें[23] । मग मनेंसीं योगधारणें । मेळविलीं ॥ १८ ॥ तेंविचि प्राचीनें[24] इष्टानिष्टें[24] । भोगेंसी येउनी भेटे । तेथ देखिलियाही वोखटें[25] । द्वेष[26] न करी ॥ १९ ॥ नां[27] गोमटेंचि विपायें[28] । तें आणूनि पुढां सूये[29] । तयालागीं न होये । साभिलाष ॥ १०२० ॥ यापरि इष्टानिष्टीं । राग[30] द्वेष किरीटी । त्यजूनि गिरिकपाटीं[31] । निकुंजीं[32] वसे ॥ २१ ॥

---

१ वृत्तिगत आनंदाचा अंश. २ षड्रसान्न वाढिलें. ३ आश्रय. ४ उजळितां, पेटला असतां. ५ विवेकरूप तीर्थाच्या कांठीं. ६ मळ. ७ ओकलेली. ८ प्रकाश. ९ आत्मस्वरूपीं. १० सासर व माहेर. ११ पतीला स्त्री अनुसरते. १२ द्वैत सोडल्यानें. १३ मित्र. १४ किरण काढून घेतांच. १५ अंतर्मुखतेनें. १६ पंचविषयांला. १७ नीचाचें अन्न. १८ वांति. १९ वासनासहित विषय इंद्रियांकडून ओकविले. २० आत्मस्वरूपाकारवृत्ति, प्रत्यहाररूप गंगातीरीं पाठवून दिलें. २१ सत्वगुणानें. २२ शुद्ध केलीं. २३ इंद्रियें. २४ पूर्वसंस्कारानें अनुकूल व प्रतिकूल अशा. २५ अनिष्ट. २६ तिरस्कार. २७ नाहींतर. २८ कदाचित्. २९ ठेवी. ३० प्रियाप्रियता. ३१ गुहेंत. ३२ दाट झाडीच्या अरण्यांत.

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥**

गजबजा सांडिलिया । [2]वसवी वनस्थळिया । अंगाचिया [3]मांदिया । एकलेया ॥ २२ ॥ शमदमादिकीं खेळे । न बोलणेंचि [4]चावळे । गुरुवाक्याचेनि मेळें । नेणे वेळ ॥ २३ ॥ आणि आंगा बळ यावें । ना तरि [5]क्षुधा जावें । कां जिभेचें पुरावे । मनोरथ ॥ २४ ॥ भोजन करितांविखीं[6] । यया तिहींतें न लेखी । आहारीं [7]मिती संतोषीं । [8]माप न सूये ॥ २५ ॥ अनशनाचेनि पावकें । हारपतां प्राण [9]पोखे । इतुकियाचि भाग [10]मोटकें । [11]अशन करी ॥ २६ ॥ आणि परपुरुषें [12]कामिली । कुळवधू आंग न घाली । निद्रालस्या न [13]मोकली । अशन तैसें ॥ २७ ॥ दंडवताचेनि प्रसंगें । भुयीं हन अंग लागे । वांचूनि येर नेघे । [14]रोभस्य तेथ ॥ २८ ॥ देहनिर्वाहापुरतें । [15]राहाटवी हातापायांतें । किंबहुना [16]आपैतें । सबाह्य केलें ॥ २९ ॥ आणि मनाचा उंबरा । वृत्तीसी देखों नेदी वीरा । तेथ कें [17]वाग्व्यापारा । अवकाश असे ॥ १०३० ॥ ऐसेनि देहवाचा मानस । हें [18]जिर्णोनि बाह्य-प्रदेश । आकळिलें आकाश । ध्यानाचें तेणें ॥ ३१ ॥ गुरुवाक्यें उठविला । बोधीं निश्चय आला । न्याहाळी हातीं घेतला । आरिसा जैसा ॥ ३२ ॥ पै ध्याता आपणपेंचि परी । ध्यानरूप वृत्तिमाझारीं । [19]ध्येयत्वें धेहे[20] अवधारीं । [21]ध्यानरूढी गा ॥ ३३ ॥ तेथ ध्येय ध्यान ध्याता । ययां तिहीं एकरूपता । होय तंव पंडुसुता । कीजे तें गा ॥ ३४ ॥ म्हणोनि तो मुमुक्षु । आत्मज्ञानीं जाला [22]दक्षु । परि [23]पुढांसूनि [24]पक्षु । योगा-भ्यासाचा ॥ ३५ ॥ [25]अपानरंध्रद्वया- । माझारीं धनंजया । [26]पार्ष्णी पिडूनियां । [27]कांवरुमूळ ॥ ३६ ॥ [28]आकुंचूनि अध । देऊनि [29]तिन्ही बंध । करूनि एकवट । वायू भेदी ॥ ३७ ॥ [30]कुंडलिनी जागउनी । [31]मध्यमा विकाशुनी । [32]आधारादि भेदुनी । आज्ञावरी ॥ ३८ ॥ [33]सहस्रदळाचा मेघ । पीयूषें वर्षोनि चांग । तो [34]मूळवरी वोघ । आणूनियां ॥ ३९ ॥ नाच-तया [35]पुण्यगिरी । [36]चिद्भैरवाच्या खापरीं । [37]मनपवनाची खीच पुरी । वाढूनियां ॥ १०४० ॥

---

१ जनसहवास. २ वनांत स्थळ वसविलें. ३ अवयवसमुदाय. ४ बोले. ५ क्षुधा मंद व्हावी. ६ विषयीं. ७ मोजलेला. ८ माप घालीत नाहींत. ९ जठराग्नीनें, प्राण पोषण होतो. १० थोडें. ११ भोजन. १२ इच्छिली किंवा बोलाविली. १३ दवडीत नाहीं. १४ विषयसुख, अविचार. १५ उपयोग करी. १६ स्वाधीन. १७ शब्दास. १८ जिंकून. १९ ध्यान करण्यास योग्यपणानें. २० ध्यान करितो. २१ प्रकार. २२ शहाणा. २३ पुढें करून. २४ प्रकार. २५ गुदशिश्नछिद्रांच्या. २६ खोटेनें दाबून. २७ गुदशिश्नांस सांधणाऱ्या शिवणीचें मूळ. २८ आकर्षण करून. २९ गुदस्थानचा वज्रबंध, नाभिस्थान उड्डियाणबंध व कंठस्थान जालंधरबंध. ३० नाभिस्थानींची. ३१ कंठस्थानस्थ. ३२ गुदस्थानच्या आधारचक्राचा भेद करून. ३३ ब्रह्मरंध्रींचा. ३४ मूलाधार चक्रापर्यंत. ३५ द्विदलरूप कमल जें आज्ञाचक्र तद्रूप पर्वतावर. ३६ चैतन्यरूप भैरवाच्या भिक्षापात्रांत म्हणजे सहस्रदलरूप कमलांत. ३७ मनोरूप वायूची पूर्ण खिचडी.

जालिया योगाचा गाढा[1]। मेळावा सूनि[2] हा पुढां । ध्यान मागिलीकडां[3] । स्वयंभ केलें ॥ ४१ ॥ आणि ध्यानयोगद्रोनी । इयें आत्मतत्त्वज्ञानी । पैठीं[4] होआवया निर्विघ्नीं । आधींचि तेणें ॥ ४२ ॥ वीतरागते[5]सारिखा । जोडूनि ठेविला सखा । तो आघवियाचि भूमिकां[6]- । सवें चाले ॥ ४३ ॥ पहावें दिसे तंववरी । दिठीतें न संडी दीप जरी । तरी कें अवसरीं[7] । देखावया ॥ ४४ ॥ तैसें मोक्षीं प्रवर्तलया । वृत्ति ब्रह्मीं जाय लया । तंव वैराग्य आथी तया । भंग कैंचा ॥ ४५ ॥ म्हणौनि सवैराग्य । ज्ञानाभ्यास तो सभाग्य । करूनि जाला योग्य । आत्मलाभा ॥ ४६ ॥ ऐसी वैराग्याची अंगी[8] । बाणूनियां वज्रांगीं[9] । राज[10]-योगतुरंगीं । आरूढला ॥ ४७ ॥ वरि आडपडिलें दिठी । सीनें[11] थोर निवटी[12] । तें बळी विवेकमुष्टीं । ध्यानाचें खांडें[13] ॥ ४८ ॥ ऐसेनि संसाररणाआंत । आंधारीं सूर्य तैसा असे जात । मोक्ष विजयश्रिये वरैतें[14] । होआवयालागीं ॥ ४९ ॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥**

तेथ आडवावया आले । दोषवैरी जे धोपटिले । तयांमाजी पहिले । देहाहंकार ॥ १०५० ॥ जो न मोकली मारूनी । जीवों नेदी उपजवोनी । विचंबेवी[15] खोडां घालुनी । हाडांचिया ॥ ५१ ॥ तयाचा[16] देहदुर्ग[17] हा थारा । मोडोनि घेतला तो वीरा । आणि बळ हा दुसरा । मारिला वैरी ॥ ५२ ॥ जो विषयाचेनि[18] नांवें । चौगुणेंही वरी थांवे[19] । जेणें मृता-वस्था घांवें । सर्वत्र जगा ॥ ५३ ॥ तो विषयविषाचा ठावो । आघविया दोषांचा रावो । परी ध्यानखड्गाचा घावो । साहेल[20] कैंचा ॥ ५४ ॥ आणि प्रिय विषयप्राप्ती । करी जया सुखाची व्यक्ती । तेंचि घालूनि बुंथी[21] । आंगीं जो वाजे[22] ॥ ५५ ॥ जो सन्मार्गा भुलवी । मग अधर्माच्या आडवीं[23] । सूनि[24] वाघां सांपडवी । नरकादिकां ॥ ५६ ॥ तो विश्वासें[25] मारिता रिपु । निवटूनि[26] घातला दर्पु[27] । आणि जयाचा अहा कंपु । तापसांसी ॥ ५७ ॥ क्रोधा ऐसा महादोख । जयाचा देख परिपाक[28] । भरिजे तंव अधिक । रितां[29] होय जो ॥ ५८ ॥ तो काम[30] कोणेचठायीं । नसे ऐसें केलें पाहीं । कीं तेंचि क्रोधाही । सहजें आलें ॥ ५९ ॥ मुळाचें तोडणें जेसें । होय कां शाखोद्देशें । काम नाशलेनि नाशे । तैसा क्रोध ॥ १०६० ॥ म्हणौनि काम वैरी । जाला जेथ ठोणारी[31] । तेथ सरली वारी । क्रोधाचीही ॥ ६१ ॥ आणि

---

१ बळकटी. २ वर सांगितलेला समुदाय पुढें करून. ३ ब्रह्मध्यानाकडे. ४ प्राप्त. ५ वैराग्या-सारखा. ६ अवस्थांसमागमें. ७ वेळ. ८ कवच. ९ वज्राप्रमाणें बळकट. १० अद्वैतबोधरूप घोड्यावर. ११ स्थूल, सूक्ष्म. १२ संहारी. १३ खड्ग. १४ वरणारा. १५ भ्रमवी. १६ त्या अभिमानाचा. १७ देहरूप किल्ला. १८ सर्व विषयांच्या ठायीं. १९ बळावे. २० कसें सहन करील. २१ खोळ. २२ आदळे. २३ अरण्यांत. २४ घालून. २५ गुरुशास्त्रवचनीं विश्वासानें. २६ वधून. २७ गर्व. २८ परिणाम. २९ रिकामा. ३० इच्छा. ३१ युद्धकर्ता.

समर्थ आपुला खोडा[1] । [2]शिसें वाहवी जैसा होडा[3] । तैसा भुंजौनि जो गाढा । परिग्रहो[4] ॥ ६२ ॥ जो माथांचि पौलाववी[5] । अंगा अवगुण घौलवी[6] । जीवें दांडी[7] घेववी । ममत्वाची ॥ ६३ ॥ [8]शिष्यशास्त्रादिविलासें । [9]मठादिमुद्रेचेनि मिसें । घातले आहाती फांसे । [10]निःसंगी [11]जेणें ॥ ६४ ॥ [12]घरीं कुटुंबपणें सरे । तरीं वनीं [13]वन्य होउनी अवतरे । नागवीयाही शरीरें । लागला आहे ॥ ६५ ॥ ऐसा दुर्जय जो परिग्रहो । तयाचा फेडूनि ठावो । [14]भवविजयाचा उत्साहो । भोगीतसे जो ॥ ६६ ॥ तेथ अमानित्वादि आघवे । ज्ञानगुणाचे जे मेळावे । ते कैवल्यदेशींचे आघवे । राव जैसे आले ॥ ६७ ॥ तेव्हां सम्यक्ज्ञानाचिया । [15]रांणिवा [16]उंगाणूनि तया । परिवार होऊनियां । राहत आंगें ॥ ६८ ॥ प्रवृत्तीचिये [17]रांजबिदी । [18]अवस्थाभेदप्रमदीं । कीजत आहे प्रतिपदीं । सुखाचें लोण ॥ ६९ ॥ पुढां बोधाचिये [19]कांबीवरी । विवेक दृश्याची [20]मादी सांरी । योगभूमिका [21]ओंरती करी । येती जैसिया ॥ १०७० ॥ तेथ ऋद्धिसिद्धीचीं अनेगें । वृंदें मिळती प्रसंगें । तिये [22]पुष्पवर्षी आंगें । नाहातसे तो ॥ ७१ ॥ ऐसेनि ब्रह्मैक्यासारिखें । स्वराज्य येतां जवळिकें । [23]झेंळंबित आहे हरिखें । तिन्ही लोक ॥ ७२ ॥ तेव्हां वैरिया कां मैत्रिया । तयासि माझें ह्मणावया । [24]सैंमानता धनंजया । उरेचिही ना ॥ ७३ ॥ हें ना भलतेणें [25]व्याजें । तो जयातें ह्मणे माझें । तें [26]नोडवेचि कां [27]दुजें । अद्वितीय जाला ॥७४॥ पैं आपुलिया एकी सत्ता । सर्वेही [28]कवळूनियां पंडुसुता । [29]कहीं न लगती ममता । [30]धांडिली तेणें ॥ ७५ ॥ ऐसा जितिलिया [31]रिपुवर्ग । अपमानिलिया हें जग । [32]अपैसा [33]योगतुरंग । स्थिर जाला ॥ ७६ ॥ वैराग्याचें [34]गौढलें । [35]अंगत्राण होतें भलें । तेंही नावेक ढिलें । तेव्हां करी ॥ ७७ ॥ आणि [36]निर्वटी ध्यानाचें [37]खांडें । तें दुजें नाहींचि पुढें । ह्मणूनि हात [38]आंसुडे । वृत्तीचाही ॥ ७८॥ जैसें रसौषध खरें । आपुलें काज करूनि पुरें । आपणही तुरे । तैसें होतसे ॥ ७९ ॥ देखोनि [39]ठाकिता-ठांवो । धांवता [40]थिरांवे पावो । तैसा ब्रह्मसामीप्यें [41]थांवो । अभ्यास सांडी ॥ १०८० ॥ [42]घेंडतां महोदधीसी । गंगावेगसांडी जैसी । कां कामिनी कांतापासीं । स्थिर होय ॥ ८१ ॥ नाना फळतिये वेळे । केळीची वाढि [43]मोंटुळे । कां गांवापुढें वळे । मार्ग जैसा ॥८२॥ तैसा आत्मसाक्षात्कार । होईल देखोनि गोचर । ऐसा साधन[44]हतियेर ।

---

१ बेडी. २ मस्तकें. ३ पैजेनें. ४ संग. ५ डोक्यावर बसतो. ६ जडवी. ७ काठी. ८ शिष्यसंप्रदाय वाढविण्याचे बाजार. ९ मठ करणें, मुद्रा दाखविणें. १० विरक्तास. ११ ज्या परिग्रहानें. १२ घरकुटुंब त्याग करून दूर झाला. १३ वनसंबंधाचे विषयीं. १४ संसारनाशाचा. १५ स्वामित्वानें. १६ झाडा करून. १७ राजमार्गावर. १८ जागृति इत्यादिक क्रियांविषयीं. १९ धनुष्यानें. २० नाहींशी करी. २१ आरती करणाऱ्या. २२ पुष्पवृष्टीनें. २३ गुंडाळित. २४ साम्यतेनें. २५ निमित्तानें. २६ प्राप्त होत नाहीं. २७ दुसरेपणानें. २८ वेष्टून. २९ कधीं. ३० फेडिली. ३१ शत्रुसमुदाय. ३२ सहज. ३३ योगरूप घोडा. ३४ अंगावर बळकट घातलेलें. ३५ कवच. ३६ वधी. ३७ खड्ग. ३८ झुगारी. ३९ विश्रांतिस्थान. ४० पाय स्थिर होतो. ४१ बळ. ४२ मिळता. ४३ कुंठे. ४४ शस्त्र.

हळूचि ठेवी ॥ ८३ ॥ म्हणौनि ब्रह्मेंसी तया । ऐक्याचा [1]समो धनंजया । होतसे तैं उपाया । [2]वोहट पडे ॥ ८४ ॥ मग वैराग्याची [3]गोंधळुक । जे ज्ञानाभ्यासाचें [4]वार्धक्य । योगफळाचाही [5]परिपाक । दशा जे कां ॥ ८५ ॥ ते शांति पैं गा [6]सुबगा । संपूर्ण ये तयाचिया आंगा । तैं ब्रह्म होआवयाजोगा । होय तो पुरुष ॥ ८६ ॥ पुनवेहुनि चतुर्दशी । जेतुलें उणेंपण शशी । कां सोळेया [7]ऊनि जैसी । पंधरावी [8]वानी ॥ ८७ ॥ सागरींही पाणी वेगें । संचरे तें रूप गंगे । येर निश्चळ जें उगें । तें समुद्र जैसा ॥ ८८ ॥ ब्रह्मा आणि ब्रह्महोतिये । योग्यते तैसा [9]पाड आहे । तेंचि शांतीचेनि लाहे । हातें तो गा ॥ ८९ ॥ पैं [10]तेंचि होणेनवीण । प्रतीती आलें जें ब्रह्मपण । ते [11]ब्रह्महोती जाण । योग्यता येथ ॥ १०९० ॥

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥**

ते ब्रह्मभावयोग्यता । पुरुष तो मग पंडुसुता । आत्मबोध प्रसन्नता । पदीं बैसे ॥ ९१ ॥ जेणें निपजे रससोय । तो तापही जैं जाय । तैं तें[12] कां होय । प्रसन्न जैसी ॥ ९२ ॥ ना ना [13]भरतियां लगबगा । शरत्काळीं सांडिजे गंगा । कां गीत राहतां [14]उपांगा । वोहट पडे ॥ ९३ ॥ तैसा आत्मबोधीं [15]उद्यम । करितां होय जो श्रम । तोही जेथें [16]शम । होऊनि जाय ॥ ९४ ॥ आत्मबोध [17]प्रशस्ती । हे तिये दशेची ख्याती । ते भोगीतसे महामती । योग्य तो गा ॥ ९५ ॥ तेव्हां आत्मत्वें [18]शोचावें । कांहीं पावावया [19]कामावें । हें सरलें समभावें । भरितें तया ॥ ९६ ॥ उदया येतां [20]गभस्ती । नाना नक्षत्रव्यक्ती । हारवीजती दीप्ती । [21]आंगिका जेवीं ॥ ९७ ॥ तेवि उठलिया [22]आत्मप्रथा । हे भूतभेदव्यवस्था । मोडीत मोडीत पार्था । [23]वास पाहे तो ॥ ९८ ॥ पाटियेवरील अक्षरें । जैसीं पुसतां येती [24]करें । तैसीं हारपती भेदांतरें । तयाचिये दृष्टी ॥ ९९ ॥ तैसेनि [25]अन्यथाज्ञानें । जियें [26]घेपती जागरस्वप्नें । तियें दोन्ही केलीं लीनें । [27]अव्यक्तामाजी ॥ ११०० ॥ मग तेंही अव्यक्त । बोध वाढतां झिजत । [28]पुरलां-बोधीं समस्त । बुडोनि जाय ॥ १ ॥ जैसी भोजनाच्या व्यापारीं । क्षुधा जिरत जाय अवधारीं । मग तृप्तीच्या [29]अवसरीं । नाहींच होय ॥ २ ॥ नाना चालीच्चिया वाढी । वाट होत जाय थोडी । मग पातलाठायीं बुडी । देऊनि निमे[30]

१ समय. २ तूट. ३ मावळती वेळ. ४ वृद्धपणा. ५ परिणाम. ६ ऐश्वर्यवंता. ७ उणी. ८ कस. ९ साम्य. १० तें ब्रह्म झाल्यावांचून ब्रह्मपणा जो प्रतीतीस येतो ती ब्रह्म होण्याची योग्यता. ११ ब्रह्म होण्याची. १२ रससोय. १३ आपणास पूर्ण करण्याची लगबग. १४ मृदंगादि. १५ उद्योग. १६ शांत. १७ मोठेपण. १८ शोक करावा. १९ इच्छावें. २० सूर्य. २१ आंगच्या. २२ आत्मानुभव. २३ वाट. २४ हातानें पुसतां येतात तशीं. २५ विपरीत ज्ञानानें. २६ घेतलीं जातीं. २७ सूक्ष्मवृत्तींत. २८ पूर्ण बोधकाळीं. २९ समयीं. ३० नाश पावे.

॥ ३ ॥ कां जागृती जंव [1]उद्दीपे । तंव तंव निद्रा हारपे । मग जागीनलिया स्वरूपें । नाहींच होय ॥ ४ ॥ हें ना आपुलें पूर्णत्व भेटे । जेथ चंद्रासी वाडी खुंटे । तेथ शुक्लपक्ष आटे । निःशेष जैसा ॥ ५ ॥ तैसा [2]बोध्यजात गिळित । बोधबोधें ये मजआंत । मिसळला तेथ साद्यंत । [3]अबोध गेला ॥६॥ तेव्हां कल्पांताचिये वेळे । नदी सिंधूचे [4]पेंडवळें । मोडुनि भरिलें जळें । [5]आब्रह्म जैसें ॥ ७ ॥ ना ना गेलिया घट मठ । आकाश ठाके एकवट । कां जळोनि काष्टें काष्ट । वन्हीचि होय ॥ ८ ॥ ना तरि [6]लेणिंयाचे ठसे । आटोनि गेलिया [7]मुसे । नामरूपभेदें जैसें । सांडिजे सोनें ॥ ९ ॥ हेंही असो [8]चेइलया । हें स्वप्न नाहीं जालया । मग आपणचि आपणयां । [9]उरिजे जैसें ॥ ११९० ॥ तैसा मी एकवांचूनि कांहीं । तया तयाहीसकट नाहीं । हे चौथीभक्ति पाहीं । माझी तो [10]लाहे ॥ ११ ॥ येर [10]आर्त [11]जिज्ञासु [12]अर्थार्थी । हे भजती जिये पंथीं । ते तिन्ही पावोनि चौथी । ह्मणिपत आहे ॥ १२ ॥ येऱ्हवीं तिजी ना चौथी । हे पहिली ना [13]सरती । पैं माझिये [14]सहजस्थिती । भक्ति नाम ॥ १३ ॥ जे [15]नेणणें माझें प्रकाशूनि । [16]अन्यथात्वें मातें दाऊनि । सर्वेंही सर्वां [17]भजौनि । [18]बुझावितसे ॥ १४ ॥ जो जेथ जैसें पाहों बैसे । तया तेथ तैसेंचि असे । हें [19]उजियेडें कां दिसे । अखंडें जेणें ॥ १५ ॥ स्वप्नाचें दिसणें न दिसणें । जैसें आपलेंनि असलपणें । विश्वाचें आहे नाहीं जेणें । प्रकाशें तैसें ॥ १६ ॥ ऐसा हा सहज माझा । प्रकाश जो कपिध्वजा । तो भक्तियोजा । [20]बोलिजे गा ॥ १७ ॥ ह्मणौनि [21]आर्ताच्याठायीं । हें आर्ति होऊनि पाहीं । [22]अपेक्षणीय जें कांहीं । तें मीचि केला ॥ १८ ॥ [23]जिज्ञासुपुढां वीरेशा । हेंचि होऊनि जिज्ञासा । मी कां [24]जिज्ञास्यु ऐसा । दाखविला ॥ १९ ॥ हेंचि होऊनि अर्थना । मींचि माझ्या अर्थी अर्जुना । करूनि [25]अर्थाभिधाना । आणी मातें ॥ ११२० ॥ एवं घेऊनि अज्ञानातें । माझी भक्ति जे हे वर्ते । ते दावी मज [26]द्रष्टयातें । दृश्य करूनि ॥ २१ ॥ येथें मुखचि दिसे मुखें । या बोला कांहीं न चुके । परि दुजेपण हें लटिकें । आरिसा करी ॥ २२ ॥ दिठी चंद्रचि घे साचें । परि [27]येतुलें हें [28]तिमिराचें । जे एकचि असे तयाचे । दोनी दावी ॥ २३ ॥ तैसा सर्वत्र मीचि मियां । [29]घेपें तैसें धनंजया । परि दृश्यत्व हें वायां । अज्ञानवशें ॥ २४ ॥ तें अज्ञान आतां फिटलें । माझें [30]द्रष्टृत्व मज भेटलें । निजबिंबीं एकवटलें । प्रतिबिंब

---

१ प्रकाश पावे. २ सर्व बोध. ३ अज्ञान. ४ मर्यादा. ५ ब्रह्मलोकापर्यंत. ६ अलंकार घडण्याचे छाप. ७ मुशींत. ८ जागें झाल्यावर. ९ लाभे. १० पीडित. ११ ज्ञानेच्छु. १२ द्रव्येच्छु. १३ शेवटली. १४ ब्रह्मरूप स्थिति. १५ अज्ञान. १६ अन्य प्रकारें. १७ भजवून. १८ समजावीत आहे. १९ प्रकाशानें. २० भक्तीच्या रीतीनें. २१ पीडिताच्या. २२ इच्छा करण्यास योग्य. २३ ज्ञानेच्छु. २४ जाणण्याची इच्छा करण्यायोग्य. २५ अर्थादिक या नांवास. २६ सर्वसाक्षीला. २७ एवढें. २८ नेत्ररोगाचें. २९ घेतला जातो. ३० साक्षीरूपत्व.

जैसें ॥ २५ ॥ पैं जेव्हांही असें किडाळ । तेव्हांही सोनेंचि अढळ । परि तें कीडे गेलिया केवळ । उरे जैसें ॥ २६ ॥ हांगा पूर्णिमे आधीं कायी । चंद्र सावयव नाहीं । परि तिये दिवसीं भेटेपाहीं । पूर्णता तया ॥ २७ ॥ तैसा मीचि ज्ञानद्वारें । दिसें परि हस्तांतरें । मग दृष्टत्व तें सरे । मियांचि मी लाभें ॥ २८ ॥ ह्मणौनि दृश्यपथा । अतीत माझ्या पार्था । भक्तियोग चवथा । ह्मणीतला गा ॥ २९ ॥

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५ ॥**

इया ज्ञान भक्ती सहज । भक्त एकवटला मज । तो मीचि केवळ हें तुज । श्रुतही आहे ॥ ११३० ॥ जे उभऊनियां भुजा । ज्ञानियां तो आत्मा माझा । हें बोलिलों कपिध्वजा । सप्तमाध्यायीं ॥ ३१ ॥ ते हे कल्पादि भक्ति मियां । श्रीभागवतमिषें ब्रह्मया । उत्तम ह्मणौनि धनंजया । उपदेशिली ॥ ३२ ॥ ज्ञानी इयेतें स्वसंविति । शैव ह्मणती शक्ति । आह्मी परम भक्ति । आपली ह्मणों ॥ ३३ ॥ हे मज मिळातिये वेळे । तया कर्मयोगियां फळे । मग समस्तही निखिळें । मियांचि भरे ॥ ३४ ॥ तेथ वैराग्य विवेकेंसी । आटे बंध मोक्षेंसी । वृत्ती तये अवृत्तीसी । बुडोनि जाय ॥ ३५ ॥ घेऊनि ऐलपणातें । परत्व हारपे जेथें । गिळूनि चाऱ्ही भूतें । आकाश जैसें ॥ ३६ ॥ तयां परि थडथाद । साध्यसाधनातीत शुद्ध । तें मी होऊनि एकवद । भोगितो मातें ॥ ३७ ॥ घडोनि सिंधूचिया आंगा । सिंधूवरी तळपे गंगा । तैसा पाड तया भोगा । आवधारी जो ॥ ३८ ॥ कां आरिसयासि आरिसा । उटूनि दाविलिया जैसा । देखणा अतिशय तैसा । भोगणातिये ॥ ३९ ॥ हें असो दर्पणें नेलिया । तो मुखबोधही गेलिया । देखलेंपण एकलेया । आस्वादिजे जेवि ॥ ११४० ॥ चेईलया स्वप्न नाशे । आपलें ऐक्यचि दिसे । तें दुजेनवीण जैसें । भोगिजे कां ॥ ४१ ॥ तोचि जालिया भोग तयाचा । न घडे हा भाव जयांचा । तिहीं बोले कावं बोलाचा । उच्चार कीजे ॥ ४२ ॥ तयांच्या नेणों गांवीं । रवी प्रकाशी हन दिवी । कीं व्योमालागीं मांडवीं । उभिली तिहीं ॥ ४३ ॥ हां गा राजन्यत्व नव्हतां

१ डाकलग. २ स्थिर. ३ मूर्तिमंत. ४ उपाधीच्या योगानें, हाताच्या अंतरानें. ५ ज्ञान. ६ ठाऊक. ७ जग निर्माणापूर्वीं. ८ स्वकीय ज्ञानकला. ९ शिवोपासक. १० ही भक्ति ते कर्मयोगी जेव्हां माझ्याशीं ऐक्य पावतात तेव्हां त्यांस सफल होते. ११ लय पावे. १२ येरझारा. १३ त्वंपद. १४ तत्पद. १५ शुद्धस्वरूप कूटस्थ. १६ एकस्वरूप. १७ शोभे. १८ पदवी. १९ पाहतां. २० आरसा. २१ जागृतास. २२ तेंच झाला ह्मणजे त्याचा भोग घडत नाहीं असा ज्यांचा भाव आहे ते बोलानेंच बोलाचा कसा उच्चार करतात. २३ त्या प्रकाशकारांच्या गांवीं प्रकाश पाडण्यास रवि दिवा आहे असें वाटतें. २४ आकाशासाठीं मांडव. २५ उभारली. २६ राजेपणा.

आंगीं । रावो रायपण काय भोगी । कां आंधार इन आलिंगी । दिनकरातें[1] ॥ ४४ ॥ आणि आकाश जें नव्हे । तया आकाश काय जाणवे । रत्नाच्या रूपीं मिरवे । गुंजांचें लेणें ॥ ४५ ॥ म्हणोनि मी होणें नाहीं । तया मीचि आहे केंहीं[2] । मग भजेल हें कायी । बोलों कीर ॥ ४६ ॥ यालागीं तो कर्मयोगी । मी जालाचि[3] मातें भोगी । तारुण्य कां तरुणांगीं । जियापरी ॥ ४७ ॥ तरंग[4] सर्वांगीं तोय चुंबी । प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं । नाना अवकाश[5] नभीं । लुंठत[6] जैसा ॥ ४८ ॥ तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे । घनाकार[7] कां सहजें । सोनयातें जेवि ॥ ४९ ॥ कां चंदनाची द्रुती[8] जैसी । चंदनीं भजे अपैसी । कां अकृत्रिम[9] शशीं । चंद्रिका ते ॥ ११५० ॥ तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्हीं अद्वैतीं भक्ति आहे । हें अनुभवाचिजोगें नव्हे । बोलाऐसें ॥ ५१ ॥ तेव्हां पूर्वसंस्कारछंदें[10] । जें कांहीं तो अनुवादे[11] । तेणें ओळविलेनि[12] वो दे । बोलता मीचि ॥ ५२ ॥ बोलतया बोलताचि भेटे । तेथें बोलेल हें न घटे । तें मौन तंव गोमटें । स्तवन माझें ॥ ५३ ॥ म्हणोनि तया बोलतां । बोलीं बोलता मी भेटतां । मौन होय तेणें तत्त्वता । स्तवितो मातें ॥ ५४ ॥ तैसेंचि बुद्धि कां दिठी[13] । जें तो देखों जाय किरीटी । तें देखणें दृश्य लोटी[14] । देखतेंचि दावी ॥ ५५ ॥ आरिसया आधीं जैसें । देखतेंचि मुख दिसे । तयाचें देखणें तैसें । मेळवी द्रष्टें ॥ ५६ ॥ दृश्य जाऊनियां द्रष्टें । द्रष्टयासि[15]चि जैं भेटे । तैं एकलेपणें न घटे । द्रष्टेपणही ॥ ५७ ॥ तेथ स्वप्नींचिया प्रियां[16] । चेवोनि[17] खेवों[18] गेलिया । ठायिजे दोन्हीं न होनियां । आपणचि जैसें ॥ ५८ ॥ कां दोहीं काष्ठांचिये घृष्टीं[19] । माजी वन्हि येक उठी । तो दोन्हीं हे भाष[20] आटी । आपणचि होय ॥ ५९ ॥ ना ना प्रतिबिंब हातीं । घेऊं गेलिया गभस्ती[21] । बिंब-ताही असती । जाय जैसी ॥ ११६० ॥ तैसा मी होऊनि देखतें । तो घेऊं जाय दृश्यातें । तेथ दृश्या ने थितें[22] । द्रष्टृत्वेंसी ॥ ६१ ॥ रवि आंधार प्रकाशिता । नुरेचि जेवि प्रकाश्यता[23] । तेवि दृश्यीं नाहीं दृष्टता । मी जालिया ॥ ६२ ॥ मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निपजे । ते तें दर्शन माझें । सांचोकारें[24] ॥ ६३ ॥ तें भलतयाही किरीटी । पदार्थाचिया भेटीं । द्रष्टृदृश्यातीता दृष्टी । भोगितो सदा ॥ ६४ ॥ आणि आकाश हें आकाशें । दाटलें न ढळे जैसें । मियां आत्मेन आपणपें तैसें । जालें तया ॥ ६५ ॥ कल्पांतीं उदक उदकें । रुंधलिया[25] वाहों ठाके । तैसा आत्मेनि मियां येकें । कोंदला[26] तो ॥ ६६ ॥ पावो आपणपयां वोळंघे[27] । कवि वन्हि आपणपयां लागे । आपणपां पाणी

---

१ सूर्याला. २ कोठें. ३ मद्रूप होऊन. ४ लाट. ५ पोकळी. ६ लोळे. ७ लगड. ८ सुवास. ९ साहजिक. १० पूर्वपुण्यबलानें. ११ बोले. १२ विनविल्यानें. १३ दृष्टीनें. १४ पलीकडे सारी. १५ पाहणारास. १६ पतीला. १७ जागृत होऊन. १८ भेटण्यास. १९ घर्षणानें. २० बोलणें संपलें. २१ सूर्य. २२ मूळ असणारें नेतें. २३ प्रकाशकपणा. २४ खरेपणानें. २५ प्रतिबंध केला असतां. २६ भरला. २७ उलंघे.

रिघे । स्नाना कैसें ॥ ६७ ॥ म्हणोनि सर्व मी जालेपणें । ठेलें तया येणें जाणें । तेंचि गा यात्राकरणें । अद्वया मज ॥ ६८ ॥ पैं जळावरील तरंग । जरी धाविन्नला सवेग । तरी नाहीं भूमिभाग । क्रमिला तेणें ॥ ६९ ॥ जें सांडावें का मांडावें । जें चालणें जेणें चालावें । तें तोयचि ऐक आघवें । म्हणोनियां ॥ ११७० ॥ गेलियाही भलतेउता । उदकपणें पंडुसुता । तरंगाची एकात्मता । न मोडेचि जेवीं ॥ ७१ ॥ तैसा मीपणें हा लोटला । तो आघवेयाचि मज आला । या यात्रा होय भला । [2]कापडी माझ्या ॥ ७२ ॥ आणि शरीर स्वभाववशें । कांहीं येक करूं जरी बैसे । तरि मीचि तो तेणें मिषें । भेटे तया ॥ ७३ ॥ तेथ कर्म आणि कर्ता । हें जाऊनि पंडुसुता । मियां [3]आत्मेनि मज पाहतां । मीचि होय ॥ ७४ ॥ पैं दर्पणातें दर्पणें । पाहिलिया होय न पाहाणें । सोनें झांकिलिया सुवर्णें । न झांके जेवीं ॥ ७५ ॥ दीपातें दीपें प्रकाशिजे । तें न प्रकाशणेंचि निपजे । तैसें कर्म मियां कीजे । तें करणें कैचें ॥ ७६ ॥ कर्मही [4]करितचि आहे । जैं करावें हें भाष जाये । तैं न करणेंचि होये । तयाचें केलें ॥ ७७ ॥ क्रियाजात मीं जालेपणें । घडे कांहींचि न करणें । [5]तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें ॥ ७८ ॥ म्हणौनि करि तयाही [6]वोजा । तें न करणें हेंचि कपिध्वजा । निपजे तिया महापूजा । पूजी तो मातें ॥ ७९ ॥ एवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन । अद्वया मज गमन । तो चाले तेंची ॥ ११८० ॥ तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जप माझा । तो निजे तेचि कपिध्वजा । समाधी माझी ॥ ८१ ॥ जैसें [7]कनकेंसीं कांकणें । असिजे अनन्यपणें । तो भक्तियोगें येणें । मजसीं तैसा ॥ ८२ ॥ उदकीं कल्लोळ । कापुरीं परिमळ । रत्नीं [8]उजाळ । अनन्य जैसा ॥ ८३ ॥ किंबहुना तंतूसीं पट । कां मृत्तिकेसीं घट । तैसा तो येकवट । मजसीं माझा ॥ ८४ ॥ इया [9]अनन्यसिद्धा भक्ती । या आघवाचि दृश्यजातीं । मज आपणपें या सुमती । दृष्टयातें जाणें ॥ ८५ ॥ [10]तिन्हीं अवस्थांचेनिद्वारें । [11]उपाध्युपहिताकारें । भावाभावरूप स्फुरे । दृश्य जें हें ॥ ८६ ॥ तें हें आघवेंचि मी द्रष्टा । ऐसिया बोधाचा माजिवटा । अनुभवाचा सुभटा । [12]धेंडो तो नाचे ॥ ८७ ॥ [13]रज्जु दोर जालिया गोचर । आभासतां तो [14]व्याळाकार । रज्जूच ऐसा निर्धार । होय जेवीं ॥ ८८ ॥ [15]भांगारापरतें कांहीं । लेणें गुंजहीभरी नाहीं । हें आटुनियां [16]ठांयीं । कीजे जैसें ॥ ८९ ॥ उदका येकापरतें । तरंग नाहींचि हें निरुतें[17] । जाणोनि तया आकारातें । न घेपे जेवीं ॥ ११९० ॥ ना तरि स्वप्नविकार समस्ता । [18]चेऊनियां [19]उमाणें घेतां । तो आपणया परौता । नदिसे जैसा ॥ ९१ ॥

---

१ केवढाही. २ यात्रेकरू. ३ आत्मत्वानें. ४ कर्ताच. ५ त्याचेंच नांव. ६ रीतीनें, निमित्तानें. ७ सुवर्णाशीं कंकणानें. ८ चकचकाट. ९ या अद्वैतभक्तीनें. १० जागृति, स्वप्न, सुषुप्ती. ११ उपाधीनें केलेला जो आकार त्याणें. १२ सोहळा. १३ दोर. १४ सर्पाकार. १५ सोन्याहून. १६ एकत्र. १७ खरें. १८ उठून. १९ माप.

तैसें जें कांहीं [1]आथि नाथी । तेणें होय [2]ज्ञेयस्फूर्ती । तें ज्ञाताचि मी हे प्रतीती । होऊनि भोगी ॥९२॥ जाणे [3]अज मी [4]अजर । [5]अक्षय मी [6]अक्षर । [7]अपूर्व मीं अपार । आनंद मी ॥९३॥ [8]अचळ मी [9]अच्युत । [10]अनंत मी अद्वैत । [11]आद्य मी [12]अव्यक्त । व्यक्तही मी ॥ ९४ ॥ [13]ईशत्व मी [14]ईश्वर । अनादि मी अमर । अभय मी आधार । [15]आधेय मी ॥ ९५ ॥ [16]स्वामी मी सदोदित । सहज मी सतत । सर्व मी [17]सर्वगत । [18]सर्वातीत मी ॥ ९६ ॥ नवा मी [19]पुराणू । [20]शून्य मी संपूर्णू । अस्थूळ [21]अनणू । जें कांहीं तें मी ॥ ९७ ॥ [22]अक्रिय मी एक । असंग मी अशोक । व्याप्त मी व्यापक । पुरुषोत्तम मी ॥ ९८ ॥ अशब्द मी अश्रोत्र । अरूप मी अगोत्र । सम मी स्वतंत्र । ब्रह्म मी पर ॥ ९९ ॥ ऐसें आत्मत्वें मज एकातें । इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें[23] । आणि याहि बोधा जाणतें । तेंही मीचि जाणें ॥ १२०० ॥ पैं [24]चेइलेयांनंतरें । आपुलें एकपण उरे । तेंही तयावरी स्फुरे । तयाशींचि जैसें ॥ १ ॥ कां [25]प्रकाशतां अर्कें । तोचि होय प्रकाशक । तयाही [25]अभेदा द्योतक । तोचि जैसा ॥ २ ॥ तैसा [26]वेद्यांचिया विलयीं । केवळ [27]वेदकें उरे पाहीं । तेणें जाणवे तया तेंही । हेंही जो जाणे ॥ ३ ॥ तया अद्वयपणा आपुलिया । जाणती [28]ज्ञप्ती जे धनंजया । ते ईश्वरचि मी हे तया । बोधासि ये ॥ ४ ॥ मग [29]द्वैताद्वैतातीत । मीचि आत्मा एक निभ्रांत । हें जाणोनि जाणणें जेथ । अनुभवीं रिघे ॥ ५ ॥ तेथ [30]चेइलयां येकपण । दिसे जें आपुलया आपण । तेंही जातां नेणों कोण । होइजे जेवीं ॥ ६ ॥ कां डोळां देखतिये क्षणीं । स्वरूपपण सुवर्णी । [31]नोटितां होय आटणी । अळंकाराचीही ॥ ७ ॥ ना ना [32]लवण तोय होये । मग क्षारता तोयत्वें राहे । तेही जिरतां जेवि जाये । जालेपण तें ॥ ८ ॥ तैसा मी तो हें जें असे । तें [33]स्वानंदानुभवसमरसें । कालवूनियां प्रवेशे । मजचिमाजी ॥ ९ ॥ आणि तो हे [34]भाष जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे । [35]ऐसौं मी ना तो तिये [35]सामाये । माझ्याचि रूपीं ॥ १२१० ॥ तेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नाम अग्नि [36]पुरे । मग [37]उभयातीत उरे । आकाश जेवीं ॥ ११ ॥ कां [38]धांडिलिया [38]ऐका-

१ आहे व नाहीं अशा स्थितीनें. २ जाणावयाच्या पदार्थाचें स्फुरण. ३ उत्पन्न न होणारा. ४ वृद्धपणरहित. ५ नाशरहित. ६ अविनाश. ७ ज्याच्या पूर्वी कांहीं नाहीं असा. ८ चलन न पावणारा. ९ पतित न होणारा. १० अंतरहित. ११ पहिला. १२ निराकार. १३ ईशितव्य. १४ समष्टिरूप. १५ ज्या आधारावर सर्व ठेवलें जातें तें. १६ अधिपति. १७ सर्व ठिकाणीं भरून असणारा. १८ सर्वांच्या पलीकडे. १९ जुना. २० अभावरूप. २१ अणूहून भिन्न. २२ क्रियारहित. २३ सत्यतेनें. २४ जागृतीनंतर. २५ सूर्यच आपणाला प्रकाशित करतो असा जो अभेद त्यालाही जसा सूर्यच प्रकाशक तसा. २६ जाणण्यायोग्य पदार्थांच्या नाशानंतर. २७ ज्ञान. २८ ज्ञानकला. २९ दोहोंच्याही पलीकडे. ३० जागृतांस. ३१ आटविल्यावांचून. ३२ मीठ पाणी होऊन जातें. ३३ पूर्णानंदाविर्भावानें. ३४ शब्द. ३५ असाच मी नाहीं व तोही नाहीं होऊन माझ्या स्वरूपीं मिळतो. ३६ विझतो. ३७ अग्नि व कापूर यांहून भिन्न. ३८ एकांत एक वजा केला असतां बाकी शून्य.

एक । वाढे तो शून्यविशेख । तैसा आहे नाहींचा शेख । मीच्चि मग आथी ॥ १२ ॥ तेथ ब्रह्म आत्मा ईश । यया बोला मोडे [1]सौरस । न बोलणें याही [2]पैस । नाहीं तेथ ॥१३॥ न बोलणेंही न बोलोनी । तें बोलिजे तोंड भरूनी । जाणिव नेणिव नेणोनी । जाणिजेतें ॥ १४ ॥ तेथ [3]बुझिजे बोध बोधें । आनंद घेपे आनंदें । [4]सुखवरी नुसधें । सुखचि भोगिजे ॥ १५ ॥ तेथ लाभ जोडला लाभा । प्रभा आलिंगिली [5]प्रभा । वि[6]स्मय बुडाला उभा । विस्मयामाजी ॥ १६ ॥ शम तेथ [7]सामावला । विश्राम विश्रांति आला । अनुभव वेर्डावला । अनुभूतिपणें ॥ १७ ॥ किंबहुना ऐसें निखळ । मीपण जोडे तया फळ । सेवूनि वेली वेल्हाळ । कर्मयोगाची ते ॥ १८ ॥ पैं कर्मयोगा किरीटी । चक्रवर्तिच्या मुकुटीं । मी [9]चिद्रत्न तें [10]सांटोवाटीं । होय तो माझा ॥ १९ ॥ कीं कर्मयोगप्रासादाचा । कळस जो हा मोक्षाचा । तया वरील अवकाशाचा । [11]उंवावो जाला तो ॥ १२२० ॥ नाना संसार [12]आडवी । कर्मयोग वाट बरवी । जोडली ते [13]मदैक्यगांवीं । [14]पैठी जालीसे ॥ २१ ॥ हें असो कर्मयोगवोघें । तेणें [15]भक्तिचिद्गंगें । मी [16]स्वानंदोदधीवेगें । ठाकिला कीं गा ॥ २२ ॥ हा [17]ठायवरी [18]सुवर्मा । कर्मयोगीं आहे महिमा । ह्मणौनि वेळोवेळां तुह्मां । सांगतों आह्मीं ॥ २३ ॥ पैं देशें काळें पदार्थे । [19]सांधूनि घेइजे मातें । तैसा नव्हे मी आयतें । सर्वांचें सर्वही ॥ २४ ॥ ह्मणौनि माझ्याठायीं । [20]आंचावें न लगे कांहीं । मी लाभें [21]इये उपायीं । साचचि गा ॥२५॥ एक शिष्य एक गुरू । हा रूढला साच व्यवहारू । तो मत्प्राप्तिप्रकारू । जाणावया ॥ २६ ॥ अगा [22]वसुधेच्या पोटीं । निधान सिद्ध किरीटी । वन्हि सिद्ध काष्ठीं । वोहां[23] दूध ॥२७॥ परि [24]लाभे तें असतें । तया [24]कीजे उपायातें । येर सिद्धचि तैसा येथें । उपायीं मीं ॥२८॥ हा [25]फळवरी उपावो । कां पां प्रस्तावीतसे देवो । हें पुसतां तरि अभिप्रावो । येथिंचा ऐसा ॥२९॥ जे गीतार्थाचें [26]चांगावें । [27]मोक्षोपायपर आघवें । आन शास्त्रोपाय कीं नव्हे । प्रमाणसिद्ध ॥ १२३० ॥ वारा आभाळाचि फेडी[28] । वांचूनि सूर्यातें न [29]घडी । कां हात [30]बांबुळी धाडी । तोय न करी ॥ ३१ ॥ तैसा आत्मदर्शनीं [31]आडळ । असे [32]अविद्येचा जो मळ । तो शास्त्र येर निर्मळ । मीं प्रकाशें स्वयें ॥ ३२ ॥ ह्मणौनि आघवींचि शास्त्रें । [33]अविद्याविनाशाचीं पात्रें । वांचोनि न होती

---

१ अभिप्राय. २ अवकाश. ३ जाणावें. ४ सुखमय होऊन. ५ प्रकाशानें. ६ आश्चर्य. ७ विश्रांति पावला. ८ संकोच पावला. ९ चैतन्य=ज्ञानरूपरत्न. १० अदलाबदलीनें. ११ विस्तार. १२ अरण्यांत. १३ माझ्याशीं जें ऐक्य तद्रूप गांवांत. १४ प्रविष्ट. १५ भक्ति व ज्ञान एतद्रूप जी गंगा. १६ निजानंदरूप समुद्र. १७ एथपर्यंत. १८ मर्मज्ञा अर्जुना. १९ आपलासा करून. २० शिणावें लागत नाहीं. २१ ह्या कर्मयोगानें. २२ पृथ्वीच्या. २३ कांसेस. २४ असतें तेंच लाभतें, परंतु त्यास उपाय केला पाहिजे. २५ फलप्राप्तीपर्यंत. २६ चांगुलपण. २७ मोक्षप्राप्ति विषयक. २८ निवारी. २९ तयार करीत नाहीं. ३० शेवाळ दूर करी. ३१ बंध. ३२ अज्ञानाचा. ३३ अज्ञान हरणारीं साधनें.

स्वतंत्रें । आत्मबोधीं ॥ ३३ ॥ तया [1]अध्यात्मशास्त्रांसीं । जैं [2]सांचपणाची ये [3]पुसी । तै येइजे जया ठायासी । ते हे गीता ॥ ३४ ॥ भानु भूषिता [4]प्राचिया । [5]सतेजा दिशा आघविया । तैसी [6]शास्त्रेश्वरा गीताया । [6]सनाथें शास्त्रें ॥ ३५ ॥ हें असो येणें शास्त्रेश्वरें । मागां उपाय [7]बहुवे विस्तारें । सांगीतला [8]जैसा करें । घेवों ये आत्मा ॥ ३६ ॥ परि [9]प्रथमश्रवणासवें । अर्जुना [10]विपायें हें [11]फावे । हा [12]भाव [13]सकणवे । धरूनि श्रीहरी ॥ ३७ ॥ तेंचि [14]प्रमेय एकवेळ । शीष्यीं होआवया अढळ । सांगतसे [15]मुकुळ । मुद्रा आतां ॥ ३८ ॥ आणि [16]प्रसंग गीता । [16]ठांवही हा संपता । ह्मणौनि दावी [17]आद्यंता । एकार्थत्व ॥ ३९ ॥ जे ग्रंथाच्या मध्यभागीं । नाना अधिकारप्रसंगीं । निरूपण [18]अनेगी । सिद्धांतीं केलें ॥ १२४० ॥ तरि [19]तेतुलेही सिद्धांत । इये शास्त्रीं प्रस्तुत । हें [20]पूर्वापार नेणत । कोण्ही जैं मानी ॥ ४१ ॥ तैं महासिद्धांताचा [21]आवांका । [22]सिद्धांतकक्षा अनेका । [23]मिळउनि आरंभ देखा । संपवीत असे ॥ ४२ ॥ येथ अविद्यानाश हें स्थळ । तेणें [24]मोक्षोपादन फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥ ४३ ॥ हें इतुलेंचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारीं । तें आतां [25]दोहीं अक्षरीं । [26]अनुवादावें ॥ ४४ ॥ ह्मणौनि [27]उपेयही हातीं । [28]आलया उपायस्थिती । देव प्रवर्तले तें [29]पुडती । येणेंचि भावें ॥ ४५ ॥

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

मग ह्मणे गा सुभटा । तो कर्मयोगियां निष्ठा । मी होउनी होय [31]पैठा । माझ्या रूपीं ॥ ४६ ॥ स्वकर्माच्या [32]चोखौळीं । मज पूजा करूनि भली । तेणें प्रसादें आकळी । ज्ञाननिष्ठेतें ॥ ४७ ॥ ते ज्ञाननिष्ठा जेथ [33]हातवसे । तेथ भक्ति माझी उल्लासे । [34]तियां मजसीं [35]समरसे । सुखिया होय ॥ ४८ ॥ आणि विश्वप्रकाशितया । आत्मया मज आपुलिया । अनुसरे जो करूनियां । [36]सर्वत्रता हे ॥ ४९ ॥ सांडूनि आपला [37]आडळ । लवण आश्रयि जळ । कां हिंडोनि राहे निश्चळ । वायु [38]व्योमीं ॥ १२५० ॥ तैसा [39]बुद्धी

---

१ वेदांत शास्त्रांशीं. २ जेव्हां खरोखर पुसण्याचें मनांत येई. ३ साह्य. ४ पूर्वेस सूर्योदय होतांच. ५ प्रकाशमय. ६ शास्त्रांत श्रेष्ठ अशा या गीतेनें अन्य सर्व शास्त्रें समर्थ होतात. ७ बहुत. ८ आत्मा हस्तगत होईल असा. ९ श्रवणाबरोबरच. १० कदाचित्. ११ प्राप्त होईल. १२ अभिप्राय. १३ दयेनें. १४ सार. १५ संक्षिप्त स्वरूपानें. १६ गीता हा प्रसंग व हें स्थान हीं दोनीही आतां संपण्याचीं आहेत ह्मणून. १७ आरंभापासून शेवटपर्यंत एकार्थता. १८ अनेक सिद्धांतांनीं. १९ तेवढेही सर्व. २० पूर्वापार संगती ध्यानांत राहत नाहीं. २१ बळ. २२ सिद्धांताच्या युक्ति. २३ मिळवून. २४ मोक्षसंपादन. २५ संक्षेपानें. २६ पुनः बोलावें. २७ उपायानें साध्य होणारें. २८ प्राप्त झालें असतां. २९ पुनः. ३० या भावनेनें. ३१ प्रविष्ट. ३२ चोख पुष्पांनीं. ३३ हस्तगत होय. ३४ भक्तीनें. ३५ ऐक्य पावे. ३६ पांचही कोशांत. ३७ प्रतिबंध. ३८ आकाशांत. ३९ कायावाचामनेंकरून.

वाचा कायें । जो मातें आश्रऊनि ठाये । तो निषिद्धेंही विपायें । कर्मे करू ॥ ५१ ॥ परि गंगेच्या संबंधीं । विहीं[2] आणि महा नदी । ऐक्य तेवि माझ्या बोधीं । शुभाशुभांसी ॥ ५२ ॥ कां बावनें[3] आणि धुरें[4] । हा निवाड तंवचि सरे । जंव न घेपती वैश्वानरें[5] । कवळूनि दोन्ही ॥ ५३ ॥ नाना पांचिकें[6] आणि सोळें[7] । हें सोनया तंवचि आळें । जंव परिस आंगमेळें । येकवटीना ॥ ५४ ॥ तैसें शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे[8] । जंव येक न प्रकाशे । सर्वत्र मी ॥ ५५ ॥ अगा रात्रि आणि दिवो[10] । हा तंवचि द्वैतभावो । जंव न रिगिजे गांवो । गभस्तीचा[11] ॥ ५६ ॥ ह्मणौनि माझिया भेटी । तयाचीं सर्वकर्मे किरीटी । जाऊनि बैसे तो पोटीं[12] । सायुज्याच्या[13] ॥ ५७ ॥ ऐसें काळें स्वभावें । वेंचें[14] जया न संभवे । तें पद माझें पावे । अविनाश तो ॥ ५८ ॥ किंबहुना पंडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता । लाहे तेणें नें[15] पविजता । लाभ कवण असे ॥ ५९ ॥

## चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।
## बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

याकारणें गा तुवां इया । सर्व कर्मा आपुलिया । माझ्या स्वरूपीं धनंजया । संन्यास[16] कीजे ॥ १२६० ॥ परि तोचि संन्यास वीरा । कारणीयाचा[17] ह्मणें करा । आत्मविवेकीं धरा । चित्तवृत्ति हे ॥ ६१ ॥ मग तेणें विवेकबळें । आपणपें कर्मावेगळें । माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखिजेल सर्व ॥ ६२ ॥ आणि कर्माची जन्मभोये[19] । प्रकृति जे कां आहे । ते आपणयाहूनि[20] बहुवे । देखसी दुरी ॥ ६३ ॥ तेथ प्रकृति आपणयां-[21] । वेगळी नुरे धनंजया । रूपेंवीण कां छाया । जयापरी ॥ ६४ ॥ ऐसेनि प्रकृतिनाश । जालया कर्मसंन्यास । निफजेल अनायास । सकारण[22] ॥ ६५ ॥ मग कर्मजात[23] गेलया । मी आत्मा उरें आपणपयां । तेथ बुद्धि घापे[24] करूनियां । पतिव्रता ॥ ६६ ॥ बुद्धि अनन्य[25] येणें योगें । मजमाजी जैं रिगे । तैं चित्त चैत्य-[26] त्यागें । मातेंचि भजे ॥ ६७ ॥ ऐसें चैत्यजातें सांडिलें । चित्त माझ्याठायीं जडलें । ठाके तैसें वेहिलें[27] । सर्वदा करी ॥ ६८ ॥

## मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
## अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥

मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेव्हां । माझा प्रसाद जाण तेव्हां । संपूर्ण जाहाला ॥ ६९ ॥ तेथ सकळ दुःखधामें[28] । भुंजीजेती[29] जियें मृत्युजन्में । तियें दुर्ग-[30]

---

१ क्वचित्. २ ओहोळ. ३ मैलागिरी चंदन. ४ सामान्य काष्ट. ५ अग्नीनें. ६ हिनकस. ७ सोळांच्या दराचें. ८ अपवाद. ९ वाटे. १० दिवस. ११ सूर्याचा. १२ पदवीवर. १३ ब्रह्मांत लय पावणें. १४ नाश. १५ अप्राप्य असें काय आहे. १६ त्याग. १७ स्वधर्माचा. १८ ठेवा. १९ जन्मभूमि. २० स्वस्वरूपाहून. २१ आत्मस्वरूपाला. २२ कारणासहित. २३ सर्व कर्मसमुदाय. २४ घातली जाते. २५ द्वैतरहित. २६ चित्ताचे चंचलादिक धर्मत्यागानें. २७ सत्वर. २८ दुःखाचीं स्थानें. २९ भोगिलीं जातात. ३० अवघड.

मेंचि सुगमें । होती तुज ॥ १२७० ॥ सूर्याचेनि सावायें[1] । डोळा सावाइला[2] होये । तैं आंधाराचा आहे । पाड[3] तया ॥ ७१ ॥ तसा माझेनि प्रसादें । जीवेंकण[4] जयाचा उपमर्दे । तो संसाराचेनि बांधें[5] । बागुलें[6] केवीं ॥ ७२ ॥ म्हणोनि धनंजया । तूं संसारदुर्गती यया । तरसील माझिया । प्रसादास्तव ॥ ७३ ॥ अथवा हन अहंभावें[7] । माझें बोलणें हें आघवें । कानामनाचिये शिवें[8] । नेदिसी टेंकों ॥ ७४ ॥ तरि नित्यमुक्त अव्यय । तूं आहासि तें होवूनि वाय[9] । देहसंबंधाचा घाय । वाजेल[10] आंगीं ॥ ७५ ॥ जया देहसंबंधाआंत । प्रति-पदीं[11] आत्मघात । भुंजतां उसंत[12] । कहींच नाहीं ॥ ७६ ॥ येवढेनि दारुणें[13] । निर्मरणें[14]नवीण निमणें । पडेल जरी बोलणें । नेघेसी[15] माझें ॥ ७७ ॥

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥**

पथ्यद्वेषिया पोषी[16] ज्वर । कां दीपद्वेषिया अंधकार । विवेकद्वेषें अहंकार । पोषूनि तैसा ॥ ७८ ॥ स्वदेहा नाम अर्जुन । परदेहा नाम स्वजन । संग्रामा नाम मलिन । पापा-चार ॥ ७९ ॥ इया मती आपुलिया । तिघां तीन नामें ययां । ठेऊनियां धनंजया । न झुंझें ऐसा ॥ १२८० ॥ जीवामाजी निष्टंकें[17] । करिसी जो आत्यंतिक[18] । तो वायां धाडील नैसर्गिकें[19] । स्वभावचि तुझा ॥ ८१ ॥ आणि मी अर्जुन हे आत्मिक[20] । ययां वध करणें हें पातक । हे माया वांचूनि तात्त्विक[21] । कांहीं आहे ॥ ८२ ॥ आधीं झुंझारें[22] तुवां होआवें । मग झुंझावया शस्त्र घेयावें । कां न झुंझावया करावें । देवांगणें[23] ॥ ८३ ॥ म्हणोनि न झुंझणें । म्हणसी तें वायांणें[24] । ना मानुं लोकपणें । लोकदृष्टीही ॥ ८४ ॥ तऱ्ही न झुंझें ऐसें । निष्टंकिसी[25] जें मानसें । तें प्रकृति अनारिसें[26] । करवीलचि ॥ ८५ ॥

**स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥**

पैं पूर्व वाहतां पाणी । पोहिजे[27] पश्चिमेचे वोहणी[28] । तरि आमहचि[29] उर तें आणी । आपुलिया लेखां ॥ ८६ ॥ कां साळीचा कण[31] म्हणे । मी नुगवे[32] साळीपणें । तरी आहे आन करणें । स्वभावासी[33] ॥ ८७ ॥ तैसा क्षात्र संस्कारसिद्धा । प्रकृती घडिलासि प्रबुद्धा । आतां नुठीं म्हणसी हा धांदा । परि उठविजसीचि तूं ॥ ८८ ॥ पैं शौर्य तेज दक्षता । एवमादिक पंडुसुता । गुण दिधले जन्मतां । प्रकृती तुज ॥ ८९ ॥ तरि तयाचिया सम[34]-

---

१ मदतीनें. २ साह्यभूत. ३ बिशाद. ४ ज्याचा जीवांश नष्ट झाला. ५ पीडा पावेल. ६ बुझावण्यानें. ७ अहंकारानें. ८ हद्दीस. ९ व्यर्थ. १० आदळेल. ११ पावलोंपावलीं. १२ विसावा. १३ भयंकर. १४ न मरूनही मरणें. १५ घेतले नाहींस. १६ राखी. १७ शेवटचा सिद्धांत. १८ अतिशय. १९ जन्मस्वभाव. २० आपले जन. २१ तत्वदृष्टीनें. २२ युद्धकर्ता. २३ मिथ्या-निश्चय. २४ व्यर्थ. २५ निर्धारिसी. २६ निराळें. २७ पोहावें. २८ मार्गानुरूप. २९ अडथळा. ३० मार्गीस. ३१ दाणा. ३२ उगवणार नाहीं. ३३ प्रकृतिभावास. ३४ कारणानुरूप.

वाया- । अनुरूप धनंजया । न करितां उंगलियां[1] । नयेल असों ॥ १२९० ॥ ह्मणौनियां तिहीं गुणीं । बांधलासि तूं कोदंडपाणी । त्रिशुद्धि[2] निघसी वाहाणी[3] । क्षात्राचिया[4] ॥ ९१ ॥ ना हें आपुलें जन्ममूळ । न विचारीतचि केवळ । न झुंझें ऐसें अढळ । व्रत जरी घेसी ॥ ९२ ॥ तरि बांधोनि हात पाये । जो रथीं घातला होये । तो न चले[5] तरी जाये । दिगंता जेवीं ॥ ९३ ॥ तैसा तूं आपुलियाकडूनी । मीं कांहींच न करीं ह्मणौनी । ठासी[6] परि भरंवसेनी । तूंचि करिसी ॥ ९४ ॥ उत्तर वैराटिचा राजा । पळतां तूं[7] कां निघालासि झुंझा । हा क्षात्रस्वभाव तुझा । झुंझवील तुज ॥ ९५ ॥ महावीर अकरा अक्षौहिणी । तुवां येकें नागविले[8] रणांगणीं । तो स्वभाव कोदंडपाणी । झुंझवील तूतें ॥ ९६ ॥ हां गा रोग कायी रोगिया । आवडे दरिद्र दरिद्रिया । परि भोगविजे बळिया । अदृष्टें[9] जेणे ॥ ९७ ॥ तें अदृष्ट अनारिसें[10] । न करील ईश्वरवशें । तो ईश्वरही असे । हृदयीं तुझ्या ॥ ९८ ॥

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

सर्वभूतांच्या अंतरीं । हृदय महा[11]अंबरीं । चिद्वृत्तीच्या[12] सहस्रकरीं । उदयाला असे जो ॥ ९९ ॥ अवस्थात्रय[13] तिन्हीं[14] लोक । प्रकाशूनि अशेष । अन्यथादृष्टि[15] पांथिक । [16]चेवविले ॥ १३०० ॥ वेद्योदकाच्या[17] सरोवरीं । फांकतां विषय कल्हारीं[18] । इंद्रियषट्पदां[19] चारी[20] । जीवभ्रमरातें ॥ १ ॥ असो रूपक हें तो ईश्वर । सकळ भूतांचा अहंकार । पांघरोनि निरंतर । उल्हासत असे ॥ २ ॥ स्वमायेचें आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र । बाहेरी नटी[21] छायाचित्र । चौऱ्यांसीं[22] लक्ष ॥ ३ ॥ तया ब्रह्मादिकीटांतां[23] । अशेषांही भूतजातां । देहाकार योग्यता । पाहोनि दावी ॥ ४ ॥ तेथ जें देह जयापुढें । अनुरूपपणें[24] मांडे । तें भूततया[25] आरूढे । हें मी ह्मणौनी ॥ ५ ॥ सूत सूतें गुंतलें । तृण तृणेंचि बांधलें । कां आत्मबिंबा घेतलें । बाळकें जळीं ॥ ६ ॥ तयापरी देहाकारें । आपणपेंचि दुसरें । देखोनि जीव आविष्करे[26] । आत्मबुद्धी[27] ॥ ७ ॥ ऐसेनि शरीराकारीं । यंत्रीं भूतें अवधारीं ।

---

१ साहाजिक. २ खरेपणानें. ३ मार्गास. ४ क्षत्रियस्वभावाच्या. ५ चालत नसला तरी. ६ स्वस्थ राहासी. ७ तूं गोग्रहणप्रसंगीं उत्तराचा सारथि जेव्हां झालास तेव्हां तो युद्धांतून पळत असतांही तूं मुद्दाम त्याला सारथि करून युद्ध केलेंस, हा तुझा क्षात्रधर्म तुझ्याकडून युद्ध करवील. ८ पराभूत केलें. ९ प्रारब्धानें. १० वेगळें. ११ हृदयरूप महाकाशीं. १२ चैतन्यवृत्तिरूप हजारों किरणांनीं. १३ जागृती, स्वप्न, सुषुप्ति. १४ स्वर्ग, मृत्यु, पाताळ. १५ विपरीत ज्ञानानें भुललेले जीव, वाटसरू. १६ जागृत केले. १७ जाणण्यास योग्य दृश्य वस्तुरूप जलाच्या. १८ कमळांनीं. १९ भ्रमराच्या धोरणानें. २० चारतो. २१ सूत्रधाराची स्त्री. २२—२० लक्ष वृक्ष, ११ लक्ष कीटक, ३० लक्ष पशू, ९ लक्ष जलचर, १० लक्ष पक्षी, ४ लक्ष मनुष्ययोनी, मिळून एकंदर ८४ लक्ष योनी. २३ ब्रह्मयापासून कीडमुंगीपर्यंत. २४ योग्यतानुरूप. २५ भूत असें होऊन. २६ प्रगटे. २७ मीच अशा बुद्धीनें.

वाहूनि हालवी दोरी । प्राचीनाची[1] ॥ ८ ॥ तेथ जया जें कर्मसूत्र । मांडूनि ठेविलें स्वतंत्र । तें तियें गती पात्र । होंचि लागे ॥ ९ ॥ किंबहुना धनुर्धरा । भूतांतें स्वर्गसंसारा-[2] । माजि भोंवडी तृणें वारा । आकाशीं जैसीं ॥ १३१० ॥ भ्रामकाचेनि[3] संगें । जैसें लोहो वेढों[4] रिगे । तैसीं ईश्वरसत्तायोगें । चेष्टती[5] भूतें ॥ ११ ॥ जैसे चेष्टा आपुलालिया । समुद्रादिक धनंजया । चेष्टती चंद्राचिया । सन्निधी येकीं ॥ १२ ॥ तया सिंधू भरितें दाटे । सोमकांता पाझर फुटे । कुमुदां[6]चकोरांचा फिटे । संकोचु[7] तो ॥ १३ ॥ तैसीं बीजें[8]-प्रकृतिवशें । अनेकें भूतें येकें ईशें । चेष्टवीजती तो[9] असे । तुझ्या हृदयीं ॥ १४ ॥ अर्जुनपण न घेतां । मीं ऐसें जें पंडुसुता । उठतसे तें तत्वता । तयाचें रूप ॥ १५ ॥ यालागीं तो प्रकृतीतें । प्रवर्तवील हें निरुतें[10] । आणि ते[11] झुंझवील तूतें । न झुंझसी जऱ्ही ॥ १६ ॥ ह्मणोनि ईश्वर गोसांवी[12] । तेणें प्रकृति हे नेमावी । तियां[13] सुखें राबवावी[14] । इंद्रियें आपुलीं ॥ १७ ॥ तूं करणें न करणें दोन्ही । लाऊनि प्रकृतीच्या मौनीं[15] । प्रकृतीही कां अधीनी । हृदयस्था जया ॥ १८ ॥

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥**

तयां[16] अहं वाचा चित्त आंग । देऊनियां शरण रिग । महोदधी कां गांग[17] । रिगालें जैसें ॥ १९ ॥ मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांति[18]प्रमदे । कांत होऊनियां स्वानंदें । स्वरूपींच रमसी ॥ १३२० ॥ संभूति[19] जेणें संभवे । विश्रांति जेथें विसंवे । अनुभूतिही अनुभवे । अनुभवा जया ॥ २१ ॥ तिये निजात्मपदींचा रावो । होऊनि ठांकसी[20] अव्ययो । ह्मणे लक्ष्मीनाहो[21] । पार्था तूं ॥ २२ ॥

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥**

हे गीतानाम विख्यात । सर्ववाङ्मयाचें[22] मथित । आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय ॥ २३ ॥ ज्ञान ऐसीया रूढी[23] । वेदांतें जयाची प्रौढी । वानितां[24] कीर्ति चोखडी । पातली जगीं ॥ २४ ॥ बुद्ध्यादिकें डोळसें । हें जयाचें कां कडवसें[25] । मी सर्वद्रष्टाहि दिसें । पाहला[26] जया ॥ २५ ॥ तें हें गा आत्मज्ञान । मज गोप्याचेंही गुप्त धन । परि तूं ह्मणूनि आन । कावें करूं ॥ २६ ॥ याकारणें गा पांडवा । आह्मी आपला हा गुप्त ठेवा । तुज दिधला

---

१ पूर्वकर्माची. २ इहपरलोकीं. ३ लोहचुंबकाच्या. ४ वाटोळें फिरे. ५ व्यवहार करतात. ६ चंद्रविकासी कमळांला. ७ मिटलेपणा. ८ बीजासारखीं. ९ ईश्वर. १० खरें. ११ प्रकृति. १२ इंद्रियस्वामी. १३ प्रकृतीनें. १४ चेष्टवावीं. १५ ठायीं. १६ त्या हृदयस्थाला. १७ गंगोदक. १८ शांतिचा. १९ उत्पत्ति. २० राहासी. २१ लक्ष्मीपति. २२ वेदांचें. २३ प्रसिद्धि. २४ वर्णितां. २५ प्रतिबिंब. २६ उदय पावलेला.

केणवा । [2]आकाळिलेपणें ॥ २७ ॥ जैसी भुलली [3]वोरँसें । माय बोले बाळा दोषें । प्रीति ही परी तैसें । न करूंचि हो ॥ २८ ॥ येथ [4]आकाश आणि गाळिजे । अमृताही [4]साली फेडिजे । कां [5]दिव्याकरवीं करविजे । दिव्य जैसें ॥ २९ ॥ जयाचेनि अंगप्रकाशें । पाताळींचा परमाणु दिसे । तया सूर्याहि कां जैसें । अंजन [5]सुदलें ॥ १३३० ॥ तैसें सर्वज्ञेंही [6]मिया । सर्वही निर्धारूनियां । निकें होय तें धनंजया । सांगीतलें तुज ॥ ३१ ॥ आतां तूं ययावरी । निकें हें निर्धारीं । निर्धारूनि करीं । आवडे तैसें ॥ ३२ ॥ यया देवाचिया बोला । अर्जुन उगाचि ठेला । तेथ देवो ह्मणती भला । [7]अवंचक होसी ॥ ३३ ॥ वाढितया पुढें [8]भुकेला । [9]उतरोधें ह्मणे धाला । तें तोन्हि [10]पीडे आपला । आणि दोषही तया ॥ ३४ ॥ तैसा सर्वज्ञ श्रीगुरू । भेटलिया आत्मनिर्धारू । न पुसिजे जैं [11]आभारू । धरूनियां ॥ ३५ ॥ तैं [12]आपणपेंचि वंचे । आणि [12]पापही वंचनाचें । आपणयाचि साचें । चुकविलें तेणें ॥ ३६ ॥ पैं उगेपणा तुझिया । हा अभिप्रावो कीं धनंजया । जें एकवेळ [13]आवांकुनियां । सांगावें ज्ञान ॥ ३७ ॥ तेथ पार्थ ह्मणे दातारा । भलें जाणसी माझिया अंतरा । हें ह्मणों तरी दुसरा । जाणता असे काई ॥ ३८ ॥ येर [14]ज्ञेयें हें जी आघवें । तूं ज्ञाता येकचि स्वभावें । मा सूर्य ह्मणौनि वानावें । सूर्यातें काई ॥ ३९ ॥ या बोला श्रीकृष्णें । ह्मणीतलें काय येणें । हेंचि थोडें गा वानणें । जें [15]बुझतासि तूं ॥ १३४० ॥

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

तरि अवधानु [16]पघळ । करूनियां आणी एकवेळ । वाक्य माझें निर्मळ । अवधारीं पां ॥ ४१ ॥ हें [17]वाच्य ह्मणोनि बोलिजे । कां [18]श्राव्य मग आयिकिजे । तैसें नव्हे परि तुझें । भाग्य बरवें ॥ ४२ ॥ कूर्मीचिया पिलियां । दिठी[19] पान्हा ये धनंजया । आकाश वाहे [20]बापियां । घरींचें पाणी ॥ ४३ ॥ जो व्यवहार जेथ न वडे । तयाचें फळचि तेथ जोडे । काय दैवें न सांपडे । सानुकूळें ॥ ४४ ॥ येरवीं द्वैताची [21]वारी । सारूनि ऐक्याच्या [22]परिवरीं । भोगिजे तें अवधारीं । [23]रहस्य हें ॥ ४५ ॥ आणि [24]निरुपचारा प्रेमा । विषय होय जें प्रियोत्तमा । तें दुजें नव्हे कीं आत्मा । ऐसेंचि जाणावें ॥ ४६ ॥ आरिसाचिया देखिलया । गोमटें कीजे धनंजया । तें तया नोहे आपणयां । लागीं जैसें ॥ ४७ ॥ तैसें पार्था तुझेनि मिषें[25] । मी बोलें आपणयाचि [26]दोषें । माझ्या तुझ्याठाईं असे । मीतूंपण गा ॥ ४८ ॥

१ कृपेनें. २ व्याप्त झाल्यानें. ३ पान्ह्यानें. ४ आकाश गाळावें, अमृताच्या साली काढव्या व प्रकाशानें प्रकाश करावा. ५ काजळ घातलें. ६ खरें. ७ वंचना न करणारा. ८ भिडेनें. ९ तृप्त झालों. १० क्षुधेनें पीडा पावतो. ११ भय. १२ आपणाला फसविलें ह्मणून त्याला वंचनाचें पापही लागतें. १३ पूर्णपणें. १४ जाणावयाचें. १५ समजलास. १६ विस्तारलेलें असें. १७ बोलण्यासारखें. १८ श्रवण करण्यास योग्य. १९ दृष्टीनेंच. २० चातकाला. २१ निवारण. २२ घरीं. २३ गुह्य. २४ आदरयुक्त प्रेमानें. २५ निमित्तानें. २६ आपल्या उद्देशानें.

म्हणोनि जिव्हारींचें गुज । सांगतसें जीवासीं तुज । हें अनन्य गतीचें मज । आथी व्यसन ॥ ४९ ॥ पैं जळा आपणपें देतां । लवण भुललें पंडुसुता । कीं आघवें तयाचें होतां । न लजेचि तें ॥ १३५० ॥ तैसा तूं माझ्याठाईं । राखों नेणसीचि कांहीं । तरी आतां तुज काई । गौप्य मी करीं ॥ ५१ ॥ म्हणोनि आघवींचि गूढें । जें पाऊनि अति उघडें । तें गौप्य माझें चोखडें । वाक्य आइक ॥ ५२ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥**

तरि बाह्य आणि अंतरा । आपुलिया सर्व व्यापारा । मज व्यापकातें वीरा । विषय करीं ॥ ५३ ॥ आघवा आंगीं जैसा । वायु मिळोनि आहे आकाशा । तूं सर्व कर्मीं तैसा । मजसीचि असें ॥ ५४ ॥ किंबहुना आपुलें मन । करीं माझें एकायतन । माझेनि श्रवणें कान । भरूनि घालीं ॥ ५५ ॥ आत्मज्ञानें चोखडीं । संत जे माझीं रूपडीं । तेथ दृष्टि पडो आवडी । कामिनी जैसी ॥ ५६ ॥ मी सर्ववस्तीचें वसौटें । माझीं नामें जियें चोखटें । तियें जीवा यावया वाटे । वाचेचिये लावीं ॥ ५७ ॥ हातांचें करणें । कां पायांचें चालणें । तें होय मजकारणें । तैसें करीं ॥ ५८ ॥ आपुला अथवा परावा । ठायीं उपकरसी पांडवा । तेणें यजें होईं बरवा । याज्ञिक माझा ॥ ५९ ॥ हें येकैक शिकाऊं काई । पैं सेवकें आपुल्याठाईं । उरऊनि यर सर्वही । मी सेव्यचि करीं ॥ १३६० ॥ तेथ जाऊनि भूतद्वेष । सर्वत्र नमवें मीचि येक । ऐसेनि आश्रय अत्यंतिक । लाहसी तूं माझा ॥ ६१ ॥ मग भरलेया जगाआंत । जाऊनि तिजयाची मात । होऊनि ठायील एकांत । आम्हां तुम्हां ॥ ६२ ॥ तेव्हां भलतिये अवस्थे । मी तूंतें तूं मातें । भोगिसी ऐसें आइतें । वाढेल सुख ॥ ६३ ॥ आणि तिजें आडळ करितें । निमालें अर्जुना जेथें । तें मीचि म्हणोनि तूं मातें । पावसी शेवटीं ॥ ६४ ॥ जैसी जळींची प्रतिभा । जळनाशीं बिंबा । येतां गोभागोभा । कांहीं आहे ॥ ६५ ॥ पैं पवन अंबरीं । कां कल्लोळ सागरीं । मिळतां आडवारी । कोणाची गा ॥ ६६ ॥ म्हणोनि तूं आणि आम्ही । हें दिसतसे देहधर्मीं । मग ययाच्या विरामीं । मीचि होसी ॥ ६७ ॥ यया बोलामाझारीं । होय नव्हे झणें करीं । येथ आन आथी तरी । तुझीचि आण ॥ ६८ ॥ पैं तुझी आण वाहणें । हें आत्मलिंगातें शिवणें । प्रीतीची जाति लाजणें । आडवों नेदी ॥ ६९ ॥ येऱ्हवीं वेदूनि प्रपंच । जेणें विश्वाभास

१ मनांतलें. २ एकनिष्ठतेचें. ३ नटक. ४ एक स्थान. ५ वसतिस्थान. ६ दुसऱ्याचा. ७ उपयुक्त होशी. ८ सेवकाचा मात्र आपले ठिकाणीं ठेवून बाकी सर्व. ९ नमोनमः. १० अतिशय. ११ भेद. १२ प्रतिबंध. १३ गेलें. १४ शेवटीं. १५ प्रतिबिंब. १६ आकाशास. १७ लाटा. १८ अडचण. १९ निरनिराळ्या शरीरांनीं. २० अभावसमयीं. २१ करूं नको. २२ अन्यथा असेल तर. २३ आत्मस्वरूपाला. २४ लज्जा. २५ हें सर्व दृश्य जग.

हा साच । आज्ञेचा नटनाच । काळातें जिणें[२] ॥ १३७० ॥ तो देव मी सत्यसंकल्प । आणि जगाच्या हितीं[३] बाप । मा[४] आणेचा आक्षेप[५] । कां करावा ॥ ७१ ॥ परी अर्जुन तुझेनि [६]वेधें । मियां देवपणाचीं बिरुदें[७] । सांडिलीं गा मी हें आधें[८] । सगळेनि तुवां ॥ ७२ ॥ पैं काजा आपुलिया । रावो आपली आपणया । आण वाहे धनंजया । तैसें हें कीं ॥ ७३ ॥ तेथ अर्जुन ह्मणे देवें । अचाट[९] हें न बोलावें । जें आमचें काज नांवें । तुझेनि एकें ॥ ७४ ॥ यावरी सांगों बैससी । कां सांगतां भांषही[१०] देसी । या तुझिया विनोदासी[११] । पार आहे जी ॥ ७५ ॥ कमळवना विकाशू । करी रवीचा येक अंशू[१२] । तेथ आघवाचि प्रकाशू । नित्य देतो ॥ ७६ ॥ पृथ्वी निवऊनि सागर । भरीजती येवढें थोर । वर्षे तेथ मिषांतरें[१३] । चातक कीं ॥ ७७ ॥ ह्मणौनि औदार्या[१४] तुझेया । मज निमित्त ना ह्मणावया । प्राप्ति असे दानी[१५]-राया । कृपानिधी ॥ ७८ ॥ तंव देव ह्मणती राहें । या बोलाचा प्रस्तावें[१६] नोहे । पैं मातें पावसी उपायें । साचचि येणें ॥ ७९ ॥ सैंधव[१७] सिंधू पडिलिया । जो क्षण धनंजया । तेणें विरेचि कीं उरावया । कारण कायी ॥ १३८० ॥ तैसें सर्वत्र मातें भजतां । सर्वं मी होतां अहंता । निःशेष जाऊनि तत्वता । मीचि होसी ॥ ८१ ॥ एवं माझिये प्राप्तीवरी[१८] । कर्मालागोनि अवधारीं । दाविली तुज उजरी[१९] । उपायांची ॥ ८२ ॥ जे आधीं तंव पंडु-सुता । सर्व कर्में मज अर्पितां । सर्वत्र प्रसन्नता । लाहिजे माझी ॥ ८३ ॥ पैठीं[२०] माझ्या इये प्रसादीं । माझें ज्ञान जाय सिद्धी । तेणें मिसळिजे विशुद्धी । स्वरूपीं माझ्या ॥ ८४ ॥ मग पार्था तियेठाईं । साध्य साधन होय नाहीं । किंबहुना तुज कांहीं । उरेचिना ॥ ८५ ॥ तरि सर्व कर्में आपलीं । तुवां सर्वदा मज अर्पिलीं । तेणें प्रसन्नता लाधली[२१] । आजि हे माझी ॥ ८६ ॥ ह्मणौनि येणें प्रसादबळें । नवे जुंझाचेनि आडळें[२२] । न ठाकेचि येकवेळे । भाळलों[२३] तुज ॥ ८७ ॥ जें सप्रपंच[२४] अज्ञान जाये । जेणें येक मी गोचर[२५] होयें । तें उपप[२६]-त्तीचेनि उपायें । गीतारूप हें ॥ ८८ ॥ मियां ज्ञान तुज आपुलें । नानापरी उपदेशिलें । येणें अज्ञानजात सांडवलें । धर्माधर्म जें ॥ ८९ ॥

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥**

आशा जैसी दुःखातें । व्याली निंदा दुरितें[२७] । हें असो जैसें दैन्यातें । दुर्भगत्वें[२८] ॥ १३९० ॥ तैसें स्वर्गनरकसूचक । अज्ञान व्यालें धर्मादिक । तें सांडूनि[२९] घालीं अशेख । ज्ञानें येणें ॥ ९१ ॥ हातीं घेऊनि तो दोर । सांडिजे जैसा सर्पाकार । कां निद्रात्यागें घरचार[३०] ।

१ वेदाज्ञेचा प्रताप. २ जिंकी. ३ कल्याणाविषयीं. ४ मग. ५ शंका. ६ छंदानें. ७ चिन्हें. ८ अर्धें. ९ अद्भुत. १० वचन. ११ मौजेस. १२ किरण. १३ निमित्तांतर. १४ उदारपणाला. १५ महादात्या. १६ प्रसंग. १७ मीठ. १८ प्राप्तीपर्यंत. १९ स्पष्टता. २० पूर्वी. २१ प्राप्त झाली. २२ अटकावानें. २३ तुझ्या स्वाधीन झालों. २४ प्रपंचासह. २५ साक्षात. २६ युक्तीच्या. २७ पातकें. २८ दुर्दैवपणा. २९ सोडून दे. ३० प्रपंच.

स्वर्मींचा जैसा ॥ ९२ ॥ ना ना सांडिलेनि [1]कंवळें । चंद्रींचें [2]धुपें पिवळें । व्याधित्यागें [3]कडुवाळें- । पण मुखाचें ॥ ९३ ॥ अगा दिवसा पाठी देउनी । मृगजळ घापे त्यजूनी । कां काष्ठत्यागें वन्ही । त्यजिजे जैसा ॥ ९४ ॥ तैसें धर्माधर्माचें [4]टवाळ । दावी अज्ञान जें कां मूळ । तें त्यजूनि त्यजीं सकळ । धर्मजात ॥ ९५ ॥ मग अज्ञान [5]निमालिया । मीचि येक असे अपैसया । [6]सनिद्र स्वप्न गेलयां । आपणपें जैसें ॥ ९६ ॥ तैसा मी एकवांचूनि कांहीं । मग भिन्नाभिन्न आन नाहीं । सोऽहंबोधें [7]तयाच्या ठायीं । अनन्य होय ॥ ९७ ॥ पैं आपलेनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥ ९८ ॥ जैसें घटाचेनि नाशें । ग[8]गनीं गगन प्रवेशे । मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥ ९९ ॥ सुवर्णमणि सोनयां । ये कल्लोळ जैसा पाणियां । तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥ १४०० ॥ वांचूनि सागराच्या पोटीं । वडवानळ शरण आला किरीटी । जाळूं न ठके तया गोठी । [9]वाळूनि दे पां ॥ १ ॥ मजही शरण रिघिजे । आणि जीवत्वेंचि असिजे । धिग् बोलीं यिया न [10]लजे । प्रज्ञा केवीं ॥ २ ॥ अगा [11]प्राकृताही राया । आंगी पडे जें धनंजया । तें [12]दासिरूहि कीं तया । समान होय ॥ ३ ॥ मा मी विश्वेश्वर भेटें । आणि [13]जीवग्रंथी न सुटे । हे बोल नको [14]वोखटे । [15]कानीं लाऊं ॥ ४ ॥ ह्मणौनि मी होऊनि मातें । सेवणें आहे आयितें । तैसें करीं हाता येतें । ज्ञानें येणें ॥ ५ ॥ मग [16]ताकौनियां काढिलें । लोणी [17]माघौतें ताकीं घातलें । परि न घेपेचि कांहीं केलें । तेणें जेवीं ॥ ६ ॥ तैसें अद्वयत्वें मज । शरण रिघालिया तुज । धर्माधर्म हे सहज । लागतील ना ॥ ७ ॥ लोह उभें खाय माती । तें परिसाचिये संगती । सोनें जालया पुढती । न शिविजे मळें ॥ ८ ॥ हें असो काष्ठापासोनी । मथूनि घेतलया वन्ही । मग काष्ठेंही कोंडोनी । [18]न ठके जैसा ॥ ९ ॥ अर्जुना काय दिनकर । देखत आहे आंधार । कीं [19]प्रबोधीं होय [20]गोचरें । स्वप्नभ्रम ॥ १४१० ॥ तैसें मजसीं येकवटलेया । मी सर्वरूप वांचूनियां । आन कांहीं उरावया । कारण असे ॥ ११ ॥ ह्मणौनि तयाचें कांहीं । [21]चिंतीं ना आपुल्याठाईं । तुझें पापपुण्य पाहीं । मीचि होईन ॥ १२ ॥ तेथ [22]सर्वबंधलक्षणें । पापें उरावें दुज्ञेपणें । तें माझ्या बोधीं [23]वांयाणें । होऊनि जाईल ॥ १३ ॥ जळीं पडिलिया लवणा । सर्वही जळ होय [24]विचक्षणा । तुज मी अनन्यशरणा । होईन तैसा ॥ १४ ॥ येतुलेनि अपैसया । सुटलाचि आहासि धनंजया । घेईं मज [25]प्रकाशोनियां । सोडवीन तूतें ॥ १५ ॥ याकारणें पढती । हे [26]आधी न वाहें चित्तीं । मज एकासि ये सुमती । जाणोनि शरण ॥ १६ ॥ ऐसें [27]सर्वरूपरूपसें ।

---

१ कावीळ रोगानें. २ चांदणें. ३ कडवटपणा. ४ बंड. ५ नाश पावल्यावर. ६ निद्रेसह. ७ भिन्नाभिन्न जें द्वैत त्याच्याठाईं. ८ घटाकाश आकाशांत मिळतें. ९ टाकून दे. १० लाजत नाहीं. ११ यःकश्चित् राजाच्या. १२ बटकूर. १३ जीवदशा. १४ वाईट. १५ ऐकूं. १६ ताकांतून. १७ पुनः. १८ न राहे. १९ जागृतींत. २० प्रत्यक्ष. २१ चिंतूं नको. २२ सर्वथैव बंधाला कारण अशा. २३ व्यर्थ. २४ हे सुज्ञा. २५ प्रकट होऊन. २६ मनोव्यथा. २७ सर्व रूपें ज्याच्या योगानें रूपवान् होतात.

सर्व दृष्टि डोळसें । सर्व देशनिवासें । बोलिले श्रीकृष्णें ॥ १७ ॥ मग सांवळा सकंकण[1] । बाहु पसरोनि दक्षिण । आलिंगिला स्वशरण[2] । भक्तराज तो ॥ १८ ॥ न पवतां जयातें । काखे सूनि बुद्धीतें । बोलणें मागौतें । वोसरलें[3] ॥ १९ ॥ ऐसें जें कांहीं येक । बोला बुद्धीसिही अटक[4] । तें द्यावया मिष[5] । खेंवाचें केलें ॥ १४२० ॥ हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें । द्वैत न मोडितां केलें । आपणा ऐसें अर्जुना ॥ २१ ॥ दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंग[7] तो जाला । द्वैष न मोडितां केला । आपणपें पार्थ ॥ २२ ॥ तेव्हां सुखाचा मग तया । पूर आला जो धनंजया । तेथ वाड[8] तऱ्हीं बुडोनियां । ठेला देव ॥ २३ ॥ सिंधु सिंधूतें मावों[9] जाये । तें पावणें ठाके दुणा होये । वरी रिगे पुरवणिये । आकाशही ॥ २४ ॥ तैसें तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें । किंबहुना श्रीनारायणें । विश्व कोंदलें[10] ॥ २५ ॥ एवं वेदाचें मूळसूत्र । सर्वाधिकारैकपवित्र[11] । श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें ॥ २६ ॥ येथ गीता मूळ वेदां । ऐसें केवि पां आलें बोधा । हें ह्मणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति[12] सांगों ॥ २७ ॥ तरी जयाच्या निश्वासीं[13] । जन्म झालें वेदराशी । तो सत्यप्रतिज्ञ पैजेसी[14] । बोलिला स्वमुखें ॥ २८ ॥ ह्मणौनि वेदां मूळभूत । गीता ह्मणो हें होय उचित । आणिकही येकी येथ । उपपत्ति असे ॥ २९ ॥ जें न नाशत[15] स्वरूपें । जयाचा विस्तार जेथ लपे । तें तयाचें ह्मणिपे । बीज जगीं ॥ १४३० ॥ तरि कांडत्रयात्मक[16] । शब्दराशी[17] अशेष । गीतेमाजि असे रुख[18] । बीजीं जैसा ॥ ३१ ॥ ह्मणोनि वेदांचें बीज । श्रीगीता होय हें मज । गमे[19] आणि सहज । दिसतही आहे ॥ ३२ ॥ जे वेदांचे तिन्हीं भाग । गीते उमटले असती चांग । भूषणरत्नीं सर्वांग । शोभलें जैसें ॥ ३३ ॥ तियेंचि कर्मादिकें तिन्हीं । कांडें कोणकोणे स्थानीं । गीते आहाति तें नयनीं । दाखऊं आइक ॥ ३४ ॥ तरि पहिला जो अध्याव । तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्ताव । द्वितीयीं सांख्यसद्भाव । प्रकाशिला ॥ ३५ ॥ मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र । येतुलालें[20] दुजीं सूत्र । उभारिलें ॥ ३६ ॥ मग अज्ञानें बांधलेया । मोक्षपदीं बैसावया । साधनारंभ तो तृतीयाध्यायीं बोलिला ॥ ३७ ॥ जे देहाभिमानबंधें । सांडूनि काम्यनिषिद्धें । विहित परि अप्रमादें । अनुष्ठावें ॥ ३८ ॥ ऐसेनि सद्भावें कर्म करावें । हा तिजा अध्यायीं देवें । निर्णय केला तें जाणावें । कर्मकांड येथ ॥ ३९ ॥ आणि तेंचि नित्यादिक । अज्ञानाचें आवश्यक । आचरतां मोचक । केंवी होय पां ॥ १४४० ॥ ऐसी अपेक्षा[21] जालिया । बद्ध मुमुक्षुते[22] आलिया । देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया । सांगीतली ॥ ४१ ॥ जे देह वाचा मानसें । विहित

१ हस्तभूषणयुक्त. २ केवळ आपल्यालाच शरण आलेला. ३ मागें हटलें. ४ दुःखप्रवेश्य. ५ आलिंगनाचें निमित्त केलें. ६ दोघांचे देह तसेच असतां. ७ आलिंगन. ८ मोठा. ९ साह्मास. १० भरलें. ११ सर्व अधिकारांतं अतिशुद्ध. १२ सयुक्तिक कारण. १३ श्वासोच्छ्वासांपासून. १४ प्रतिज्ञेवर. १५ न नासतां. १६ कर्म-उपासना-ज्ञानरूप. १७ वेद. १८ वृक्ष. १९ वाटे. २० अशा प्रकारें. २१ इच्छा. २२ मोक्षेच्छुस्थितीला.

निपजे जें जैसें । तें येक ईश्वरोद्देशें । कीजे म्हणीतलें ॥ ४२ ॥ हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचें खागें । आदरिलें शेषभागें । चतुर्थाचेनी ॥ ४३ ॥ तें विश्वरूप अकरावा । अध्याय संपे जंव आघवा । तंव कर्में ईश भजावा । हें जें बोलिलें ॥ ४४ ॥ तें अष्टाध्यायीं उघड । जाण येथें देवताकांड । शास्त्र सांगतसे- ओड । मोडूनि बोले ॥ ४५ ॥ आणि तेणेंचि ईशप्रसादें । श्रीगुरुसंप्रदायलब्धें । साच ज्ञान उद्बोधे । कोवळें जें ॥४६ ॥ तें अद्वेष्टादिप्रभृतिकीं । अथवा अमानित्वादिकीं। वाढविजे म्हणोनि लेखीं । बारावा गणूं ॥ ४७॥ तो बारावा अध्याय आदी । आणि पंधरावा अवधी । ज्ञानफळपाकसिद्धी । निरूपणासी ॥ ४८ ॥ म्हणोनि चहूंही इहीं । ऊर्ध्वमूळांतीं अध्यायीं । ज्ञानकांड ये ठायीं । निरूपिजे ॥ ४९ ॥ एवं कांडत्रयरूपिणी । श्रुतीच हे कोडिसवाणी । गीतापद्यरत्नाचीं लेणीं । लेयिली आहे ॥ १४५० ॥ हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फळ येक । बोभावे जें आवश्यक । ठाकावें म्हणोनी ॥ ५१ ॥ तयाचेनि साधन ज्ञानेंसीं । वैर करी जो प्रतिदिवशीं । तो अज्ञानवर्ग षोडशीं । प्रतिपादिजे ॥ ५२ ॥ तोचि शास्त्राचा बोळींवा । घेवोनि वैरी जिणावा । हा निरोप तो सतरावा । अध्याय येथ ॥ ५३ ॥ ऐसा प्रथमालागोनी । सतरावा लौणी करूनी । आत्मनिश्वास विवरूनी । दाविला देवें ॥ ५४ ॥ तया अर्थ जातां अशेषा । केला तात्पर्याचा आंवांका । तो हा अठरावा देखा । कळशाध्याय ॥ ५५ ॥ एवं सकळ सांख्यसिंधू । श्रीभगवद्गीताप्रबंधू । हा औदार्यें आगळा वेदू । मूर्त जाण ॥ ५६ ॥ वेद संपन्न होय ठाईं । परि कृपण ऐसा आनें नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णाच्याची ॥ ५७ ॥ येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । अनवसर मांडूनियां । राहिला आहे ॥५८॥ तरी मज पाहातां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेद वेठेला भलतेणें । सेव्य होआवया ॥ ५९ ॥ ना हें अर्थें रिगोनि मनीं । श्रवणें लागोनि कानीं । उपमिषें वदनीं । वसोनियां ॥ १४६० ॥ ये गीतेचा पाठ जो जाणे । तयाचेनि सांगातीपणें । गीता लिहोनि वाहणें । पुस्तकमिषें ॥ ६१ ॥ ऐसेसा मीसकटा । संसाराचा चोहटां । मोवादि घालीत चोखटा । मोक्षसुखाची ॥ ६२ ॥ परि आकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया । रविदीप्ती राहाटावया । आवार नभ ॥ ६३ ॥ तैंवि उत्तम अधम ऐसें । सोवितां कवणातेंही न पुसे । कैवल्यदानें सरिसें । निवर्वीत जगा ॥ ६४ ॥ यालागिं मागिली कुटी- । भ्याला वेद गीतेच्या पोटीं । रिगाला आतां गोमटी । कीर्ति

१ ठिकाण. २ आठ अध्यायांत. ३ उपासनाकांड. ४ गीताशास्त्र. ५ प्रतिबंध निवारून. ६ गुरु संप्रदायानें मिळालेलें. ७ गणनेंत. ८ पंधराव्याच्या. ९ लहानशी. १० गर्जून सांगे. ११ सोबती. १२ जिंकावा. १३ शेवट. १४ वेद. १५ विचार. १६ शिखररूप. १७ प्रकृतिपुरुषांचें विवेचन ज्यानें केलें जातें तो सांख्यशास्त्र. १८ ग्रंथ. १९ प्रत्यक्ष. २० समर्थ. २१ कदर्य. २२ संसाराचें दुःख. २३ अनधिकारी. २४ मला ( ज्ञानदेवाला ) असें वाटतें कीं. २५ आकारला. २६ भलत्या कोणासही. २७ मजसहित. २८ चवाठ्यावर. २९ सत्र. ३० फिरण्याला. ३१ अवकाश. ३२ मोक्षदानानें. ३३ मागल्या निंदेला भ्याला.

पातला ॥ ६५ ॥ ह्मणोनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता । श्रीकृष्णें पंडुसुता । उपदेशिली ॥ ६६ ॥ परि वत्साचेनि वोरसें[1] । दुभतें होय घरा उद्देशें । जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥ ६७ ॥ चातकाचिये कणवे[2] । मेघ पाणियेंसिं[3] धांवे । तेथ चराचर आघवें । निवालें[4] जेवीं ॥ ६८ ॥ कां अनन्यगती-कमळा-[5] । लागीं सूर्य ये वेळोवेळा । कीं सुखिया होइजे डोळा । त्रिभुवनीचा ॥ ६९ ॥ तैसें अर्जुनाचेनि व्याजें[6] । गीता प्रकाशूनि श्रीराजें । संसारायेवढें थोर ओझें । फेडिलें[7] जगाचें ॥ १४७० ॥ सर्वशास्त्ररत्नदीप्ती । उजळिता हा त्रिजगती । सूर्य नव्हे लक्ष्मीपती । वक्त्राकाशींचा[8] ॥ ७१ ॥ बापकुळ तें पवित्र । जेथिंचा पार्थ या ज्ञाना पात्र । जेणें गीता केलें स्वतंत्र । आवार[9] जगा ॥ ७२ ॥ हें असो मग तेणें । सद्गुरु-श्रीकृष्णें । पार्थाचें मिसळणें[10] । आणिलें द्वैता ॥ ७३ ॥ पाठीं ह्मणतसे पांडवा । शास्त्र हें मानलें कीं जीवा । तेथ येरू ह्मणे देवा । आपुलिया कृपा ॥ ७४ ॥ तरि निधान[11] जोडावया । भाग्य घडे गा धनंजया । परि जोडिलें भोगावया । विपायें[12] होय ॥ ७५ ॥ पैं क्षीरसागरायेवडें । अविरजी[13] दुधाचें भांडें । सुरां असुरां केवढें । मथितां जालें ॥ ७६ ॥ तें सोहसही[14] फळा आलें । जें अमृतही डोळां देखिलें । परि वरिचिल चुकले । जतनेतें[15] ॥ ७७ ॥ तेथ अमरत्वा वोगरिलें[16] । तें मरणाचिलागीं जालें । भोगों नेणतां जोडलें । ऐसें आहे ॥ ७८ ॥ नहुष स्वर्गाधिपति जाला[17] । परी राहाटीं[18] भांबावला । तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी ॥ ७९ ॥ ह्मणौनि बहुत पुण्य तुवां । केलें तेणें धनंजया । आजि शास्त्रराजा ईया[19] । जालासि विषय ॥ १४८० ॥ तरि ययाचि शास्त्राचेनी । संप्रदायें पांघुरौनी[20] । शास्त्रार्थ हा निकेनी[21] । अनुष्ठीं हो ॥ ८१ ॥ येऱ्हवीं अमृतमथना- । सारिखें होईल अर्जुना । जरि रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ॥ ८२ ॥ गाय धड जोडे गोमटी । ते तैंचि पैये[22] रे किरीटी । जैं जाणिजे हातवटी । सांजवणीची[23] ॥ ८३ ॥ तैसा श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर लाहे । परि ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥ ८४ ॥ ह्मणौनि शास्त्रीं जो इये । उचित संप्रदाय आहे । तो ऐक आतां बहुवें- । आदरेंसी[24] ॥ ८५ ॥

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥**

---

१ ममतेमें. २ दयेनें. ३ पाण्यासहित. ४ शांत झालें. ५ एकनिष्ठ अशा कमळासाठीं. ६ निमित्तानें. ७ दूर केलें. ८ मुखरूप आकाशींचा. ९ वसतिस्थान. १० आलिंगन. ११ गुप्तधन. १२ क्वचित्. १३ न विरजलेलें. १४ जिवावर उदार होऊन झटणें. १५ संभाळण्याला. १६ वाढिलें. १७ नहुष राजाला कांहीं दिवस स्वर्गाचें आधिपत्य मिळालें तेव्हां. १८ वर्तणुकींत चुकला. १९ ह्या गीतेला. २० धारण करून. २१ चांगलेपणानें. २२ दूध देते. २३ दूध काढण्याची. २४ आस्थापूर्वक.

तरि तुवां हें जें पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था । तें तपोहीनां सर्वथा । सांगावें ना हो ॥ ८६ ॥ अथवा तापस ही जाला । परि गुरुभक्तीं जो ढिला । तो वेदीं अंत्यज वाळिला[3] । तैसा वाळीं[4] ॥ ८७ ॥ ना तरि पुरोडाशु[5] जैसा । न घापे वृद्ध तरी वायसा[6] । गीता नेदी तैसी तापसा । गुरुभक्तिहीना ॥ ८८ ॥ कां तपही जोडे देहीं । भजे गुरुदेवांच्या ठाईं । परि आकर्णनीं[7] नाहीं । चाड[8] जरी ॥ ८९ ॥ तरि मागील[9] दोहीं आंगीं । उत्तम होय कीर जगीं । परि या श्रवणालागीं । योग्य नोहे ॥ १४९० ॥ मुक्ताफळ भलतैसें । हो परि मुखं नसे । तंव गुण[11] प्रवेशे । तेथ कायी ॥ ९१ ॥ सागर गंभीर होये । हें कोण ना ह्मणत आहे । परि वृष्टी वायां जाये । जाली तेथ ॥ ९२ ॥ धालिया[12] दिव्यान्न सुवावें[13] । मग जें वायां धोंडावें[14] । तें आर्तीं[15] कां न करावें । उदारपण ॥ ९३ ॥ ह्मणोनि योग्य भलतैसे । होत परी चाड नसे । तरि ह्मण[16] वानिवसें[17] । देसी हें तयां ॥ ९४ ॥ रूपाचा सुजाण डोळा । वोईवूं ये कायि परिमळा[18] । जेथ जें माने तें फळा । तेथचि गा ॥ ९५ ॥ ह्मणोनि तपीं भक्ति । पाहावे ते सुभद्रापती । परि शास्त्रश्रवणीं अनासक्ती[20] । वाळावेचि[21] ते ॥ ९६ ॥ ना तरी तपभक्ती । होऊनि श्रवणीं आर्ती । आथी ऐसी ही आयती[22] । देखसी जरी ॥ ९७ ॥ तरी गीताशास्त्रनिर्मिता । जो मी सकळलोकशास्ता[23] । तया मातें सामान्यता । बोलेल जो ॥ ९८ ॥ माझ्या सज्जनेंसि मातें । पैशून्याचेनि[24] ओल्हातें । येक आहाती तयांतें । योग्य न ह्मण ॥ ९९ ॥ तयांची येर आघवी । सामग्री ऐसी जाणावी । दीपेंवीण ठाणदिवी । रात्रीची जैसी ॥ १५०० ॥ अंग गोरें आणि तरुणें । वरि लेयिलें आहे लेणें । परि येकलेनि प्राणें । सांडिलें जेवीं ॥ १ ॥ सोनयाचें सुंदर । निर्वाळिलें[25] होय घर । परि सर्पांगना[26] द्वार । रुंधलें[27] आहे ॥ २ ॥ निपजे दिव्यान्न चोखट । परि माजी काळकूट । असो मैत्री कपट[28] । गर्भिणी जैसी ॥ ३ ॥ तैसी तपभक्तिमेधा[29] । तयाची जाण प्रबुद्धा[30] । जो माझ्यां भक्तांची कां निंदा । माझीचि करी ॥ ४ ॥ याकारणें धनंजया । तो भक्त मेधावी तपिया । तरि नको बापा इया । शास्त्रा ओतळों[31] देवों ॥ ५ ॥ काय बहु बोलों निरुका । योग्य सृष्टि[32]याहीसारिखा । गीता हे कवतिका- । लागीं ही नेदीं ॥ ६ ॥ ह्मणोनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गाडोरा[33] । वरि गुरुभक्तीचा पुरा । प्रासाद[34] जो जाला ॥ ७ ॥ आणि श्रवणेच्छेचा पुढां । दारवंटा[35] सदा उघडा । वरी कळस चोखडा । अनिंदारत्नांचा ॥ ८ ॥

१ अनुष्ठानादिरहिताला. २ उदासीन. ३ दूर केला. ४ टाक. ५ यज्ञाचा अवशेष चरु. ६ कावळ्याला. ७ श्रवणीं. ८ इच्छा. ९ कर्मानुष्ठानांत. १० छिद्र. ११ दोरा. १२ तृप्ताला. १३ वाढावें. [illegible] दवडावें. १५ क्षुधिताला. १६ कदाचित्. १७ कौतुकानें. १८ पुढें करूं येईल. १९ सुगंध. [illegible]वड नसलेले. २१ त्यागावें. २२ सामुग्री. २३ शासन करणारा. २४ ताडणानें. २५ प्रका[illegible] [illegible] नागिणीनें. २७ कोंडलें. २८ कापटयरूप. २९ केवळ तपाविषयींच बुद्धि. ३० बुद्धि[illegible]. ३२ ब्रह्मदेवासारखा. ३३ दगडाचा पाया. ३४ देवालय. ३५ दरवाजा.

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥**

ऐशा भक्तालयीं चोखटीं । गीतारत्नेश्वर हा [1]प्रतिष्ठीं । मग माझिया [2]संवेसाटी । [3]तुकसी जगीं ॥ ९ ॥ कां जे एकाक्षरपणेंसी । त्रि[4]मात्रेकेचिये कुशी । [5]प्रणव होता गर्भवासीं । सां[6]कडला ॥ १५१० ॥ तो गीतेचिया [7]बाहळीं । वेदबीज गेलें पा[8]हाळीं । कीं गायत्री फुलींफळीं । श्लोकांच्या आली ॥ ११ ॥ ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्ता । [9]अनन्यजीवना माता । बाळका जैसी ॥ १२ ॥ तैसी भक्तां गीतेसीं । भेटी करी जो आदरेंसी । तो देहा पाठीं मजसीं । येकाचि होय ॥ १३ ॥

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥**

आणि देहाचेंही लेणें । लेऊनि वेगळेपणें । असे तंव जीवें प्राणें । तोचि [10]पंढिये ॥ १४ ॥ ज्ञानियां कर्मठां तापसां । यया खुणेंचिया माणुसां- । माजि तो एक गा जैसा । [10]पंढिये मज ॥ १५ ॥ तैसा भूतळीं आघवा । आन न देखें पांडवा । जो गीता सांगे मेळीवां । भक्तजनाचा ॥ १६ ॥ मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां [12]आक्षोभें । जो मं[13]डन होय सभे । संतांचिये ॥ १७ ॥ नवपल्लवीं रोमांचित । मंदानिळें[14] कांपवित । [15]आमोदजळें वोलवित । फुलांचे डोळे ॥ १८ ॥ कोकिळा [16]कलरवाचेनि मिषें । सद्गद बोलवीत जैसें । वसंत कां प्रवेशे । मद्भक्त[17]आरामीं ॥ १९ ॥ कां जन्माचें फळ चकोरां । होत जैं चंद्र ये अंबरा । ना ना [18]नव घन मयूरां । वो देत पावे ॥ १५२० ॥ तैसा सज्ज- नाच्या [19]मेळापीं । गीतापद्यरत्नीं [20]उमपीं । वर्षे जो माझ्या रूपीं । हेतु ठेऊनी ॥ २१ ॥ मग तयाचेनिपाडें । [21]पढियंतें मजफुडें । नाहींचि गा मागेंफुडें । न्याहाळितां ॥ २२ ॥ अर्जुना हा ठायवरी । मीं तयातें सूयें [22]जिव्हारीं । जो गीतार्थाचें करी । [23]पैंगुणें संतां ॥ २३ ॥

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥**

---

१ स्थापन कर. २ साम्यतेस. ३ योग्य होशील. ४ अकार, उकार व मकार या तीन मात्रांच्या. ५ ओंकार. ६ संकुचित होऊन राहिला. ७ विस्तारामध्यें. ८ वृक्षरूपानें उंच. ९ मातेच्या स्तना- वांचून अन्य जीविकेचें साधन नाहीं अशा. १० अत्यंत प्रिय. ११ समुदायाला. १२ स्थिरचित्तानें. १३ भूषणरूप. १४ मंदवायु. १५ सुगंधोदकानें. १६ मधुर स्वराच्या. १७ बगीचांत. १८ नूतन मेघ. १९ समुदायांत. २० पुष्कळ. २१ आवडतें. २२ हृदयांत ठेवतों. २३ मेजवानी.

पैं माझिया तुझिया मिळणीं । वाढीनली जे हे काहाणी । मोक्षधर्म का आलासे जेथें ॥ २४ ॥ तो हा सकळार्थप्रद । आह्मां दोघांचा संवाद । न करित भेद । पाठेंचि जो पढे ॥ २५ ॥ तेणें ज्ञानानळीं प्रदीप्तीं । मूळ अविद्येचिया अ तोषविला होय सुमती । परमात्मा मी ॥ २६ ॥ घेऊनि गीतार्थ उंगाणा । ज्ञानि विचक्षणा । टाकिती तें गांणावाणा । गीतेचा तो लाहे ॥ २७ ॥ गीतापाठकासि फळ अर्थज्ञाचिसरिसें । गीता माउलिये कीं नसे । जाणेंतान्हें ॥ २८ ॥

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**
**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥**

आणि सर्वमार्गीं निंदा । सांडूनि आस्था पैं शुद्धा । गीताश्रवणीं श्रद्धा । जो ॥ २९ ॥ तयाच्या श्रवणपुटीं । गीतेचीं अक्षरें जंव पैठीं । होतीं ना तंव उठा पळेचि पाप ॥ १५३० ॥ अटवीयेमाजि जैसा । वन्हि रिघतां सहसा । लंघिती कां वनौकें तियें ॥ ३१ ॥ कां उदयाचळकुळीं । झळकतां अंशुमाळी । तिमिरें राळीं । हारपती ॥ ३२ ॥ तैसा कानाच्या महाद्वारीं । गीता गजर जेथ करी सृष्टीचिये आदिवरी । जायचि पाप ॥ ३३ ॥ ऐसी जन्मवल्ली धुवट । होय पु चोखट । याहीवरी अचाट । लाहे फळ ॥ ३४ ॥ जे यिये गीतेचीं अक्षरें । जेतुलीं कर्णद्वारें । रिघती तेतुले होती पुरे । अश्वमेध कीं ॥ ३५ ॥ ह्मणौनि श्रवणें पापें आणि धर्म धरी उन्नती । तेणें स्वर्गराज्य संपत्ती । लाहेचि शेखीं ॥ ३६ ॥ मज यावयालागीं । पहिलें पेणें करी स्वर्गीं । मग आवडे तंव भोगी । पाठीं मिळे ॥ ३७ ॥ ऐसी गीता धनंजया । ऐकतया आणि पढतया । फळे महानंदें बहु काय बोलों ॥ ३८ ॥ याकारणें हें असो । परि जयालागीं शास्त्रातिसो । के तंव तुज पुसों । काज तुझें ॥ ३९ ॥

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**
**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥**

तरि सांग पां पांडवा । हा शास्त्रसिद्धांत आघवा । तुज एकचित्तें फावा- । आहे ॥ १५४० ॥ आह्मीं जैसें जया रीतीं । उगाणिलें कानांच्या हातीं । येरीं ते

---

१ समागमांत. २ जगण्यास. ३ पदच्छेदादिक न करितां केवळ श्लोकांचा पाठ. ४ प्र ज्ञानाग्नींत. ५ अज्ञानाच्या. ६ गीतेचा अर्थ अनुभवून जें ज्ञान्याला प्राप्त होतें तेंच गीतेच्या नें प्राप्त होतें. ७ आहे. ८ जाणतें नेणतें. ९ प्रविष्ट. १० दाट अरण्यांत. ११ वनचरें, इत्यादि. १२ सूर्य. १३ अंधकार. १४ आधींचें. १५ जन्माची परंपरारूप वेल. १६ १७ शेवटीं. १८ मुक्काम. १९ अतिशय. २० समजून चुकला. २१ पदरीं घातलें.

तुझ्या चित्तीं। पैठें केलें कीं ॥ ४१ ॥ अथवा माझारीं। गेलें सांडी विखुरी। किंवा उपेक्षेवरी। वाळुनि सांडिलें ॥ ४२ ॥ जैसें आह्मीं सांगीतलें। तैसेंचि हृदयीं फांवलें। तरी सांग पां वहिलें। पुसेन तें मी ॥ ४३ ॥ तरि स्वाज्ञानजनितें। मागिले मोहें तूतें। भुलविलें तो येथें। असे कीं नाहीं ॥ ४४ ॥ हें बहु पुसों काइ। सांगें तूं आपुल्याठाइं। कर्माकर्म कांहीं। देखतासी ॥ ४५ ॥ पार्थ स्वानंदैकरसें। विरेल ऐसा भेदरसे। आणिला येणें मिषें। प्रश्नाचेनी ॥ ४६ ॥ पूर्णब्रह्म जाला पार्थ। तरि पुढील साधावया कार्यार्थ। मर्यादा श्रीकृष्णनाथ। उल्लंघों नेदी ॥ ४७ ॥ येऱ्हवीं आपुलें करणें। सर्वज्ञ काय तो नेणें। परि केलें पुसणें। याचिलागीं ॥ ४८ ॥ एवं करोनियां प्रश्न। नसतेंचि अर्जुनपण। आणूनियां जालें पूर्णपण। तें बोलवी स्वयें ॥ ४९ ॥ मग क्षीराब्धीतें सांडित। गगनीं पुंजे मंडित। निवडे जैसा न निवडित। पूर्णचंद्र ॥१५५०॥ तैसा ब्रह्म मी हें विसरे। तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे। हेंही सांडी तरी विरे। ब्रह्मपणही ॥५१॥ ऐसा मोडत मांडत ब्रह्में। तो दुःखें देहाचिये सीमे। मी अर्जुन येणें नामें। उभा ठेला ॥ ५२ ॥ मग कांपतां करतळीं। दडपूनि रोमावळी। पुलिका स्वेदजळीं। जिरऊनियां ॥ ५३ ॥ प्राणक्षोभें डोलतया। आंगा आंगचि टेकया-। सूनि स्तंभ चाळया। भुलौनियां ॥ ५४ ॥ नेत्रयुगुळाचेनि वोतें। आनंदामृताचें भरितें। वोसंडत तें मागुतें। काढूनियां ॥ ५५ ॥ विविधा औत्सुक्यांची दाटी। चीपें दाटत होती कंठीं। ते करूनियां पैठी। हृदयामाजी ॥ ५६ ॥ वाचेचें वितुळणें। सांवरूनि प्राणें। अक्रमाचें श्वसणें। ठेऊनि ठायीं ॥ ५७ ॥

अर्जुन उवाच—**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥**

मग अर्जुन ह्मणे काय देवो। पुसताति आवडे मोहो। तरि तो सकुटुंब गेला जी ठावो। घेऊनि आपला ॥ ५८ ॥ पांसीं येऊनि दिनकरें। डोळ्यातें आंधारें। पुसिजे हें कायि सरे। कोणें गांवीं ॥ ५९ ॥ तैसा तूं श्रीकृष्णराया। आमुचिया डोळ्यां। गोचर हेंचि कांयिसया। न पुरे तंव ॥ १५६० ॥ वरि लोभें मायेपासुनी। तें सांगसी तोंड भरुनी। जें कांयीसेंनिही करुनी। जाणूं नये ॥ ६१ ॥ आतां मोह असे कीं नाहीं। हें

१ लवंडून. २ चालढकलीवर. ३ झुगारून दिलें. ४ प्रविष्ट झालें. ५ सत्वर. ६ स्वकीय अज्ञानापासून उत्पन्न. ७ निजानंदरूप सामरस्यानें. ८ ओलांडूं देत नाहीं. ९ झालेलें पूर्णपण. १० सोडीत. ११ तारागणाला शोभवीत. १२ विरघळे. १३ कांपऱ्या तळहातानें. १४ रोमांच. १५ प्राण्याच्या वाढीनें. १६ टेंका देण्यास ठेवून. १७ चाळ्याला. १८ अश्रुप्रवाहानें. १९ उसळत. २० स्वरभंग. २१ प्रविष्ट. २२ क्रियारहितपणाचें. २३ आवडता होतो. २४ समीप. २५ शिरके. २६ हेंच कोणत्या गोष्टीला पुरणार नाहीं? सर्व इतक्यानेंच होईल. २७ कळवळयानें. २८ कशाही प्रयासानें.

ऐसें जी पुससी काई । कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझेपणें[1] ॥ ६२ ॥ गुंतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त झालों तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ॥ ६३ ॥ मी तुझेनि प्रसादें । लाधलेनि[2] आत्मबोधें । मोहाचे तया कादें[3] । नेदीच उरों ॥ ६४ ॥ आतां करणें कां न करणें । हें जेणें उठी दुजेपणें । तें तूंवांचूनि नेणें । सर्वत्र गा ॥ ६५ ॥ येविषयीं माझ्याठायीं । संदेहाचें नुरेचि कांहीं । त्रि[4]शुद्धी कर्म जेथ नाहीं । तें मी जालों ॥ ६६ ॥ तुं[5]झेनि मज मी पावोनी । कर्तव्य गेलें निपटुनी । परि आज्ञा तुझी-वांचोनी । आन नाहीं प्रभो ॥ ६७ ॥ कां जें दृश्य[6] दृश्यातें नाशी । जें दुं[7]जें द्वैतातें ग्रासी । जें एक परि सर्वदेशीं । वसवी सदां ॥ ६८ ॥ जयाचेनि संबंधें बंध फिटे । जयाचिया आशा[8] आस तुटे । जें भेटलयां सर्व भेटे । आपणपांची ॥ ६९ ॥ तें तूं गुरु[9]लिंग जी माझें । जें येकलेपणीचें [10]विरजें । जयालागीं वोलांडिजे । अद्वैत बोध ॥ १५७० ॥ आपणचि होऊनि ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्याचें काम । मग कीजे कां निःसीम । सेवा जयाची ॥ ७१ ॥ गंगा सिंधु सेवूं गेली । पावतांचि समुद्र जाली । तेविं भक्तां सेलें[11] दिधली । निज-पदाची ॥ ७२ ॥ तो तूं माझा जी निरुप[12]चारू । श्रीकृष्णा सेव्य सद्गुरू । मा ब्रह्मतेचा उपकारू । हाचि मानीं ॥ ७३ ॥ जें मज तुह्मां आड । होतें भेदाचें कवा[13]ड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ ७४ ॥ तरि आतां तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा । करीन देयीं अनु[14]ज्ञा । भलतियेविषयीं ॥ ७५ ॥ यया अर्जुनाचिया बोला । देव नाचे सुखें भुलला । ह्मणे विश्वफळा जाला । फळ हा मज ॥ ७६ ॥ [15]उणेनि उमचला सुधाकर । देखुनी आपला कुं[16]मर । मर्यादा क्षीरसागर । विसरेचिना ॥ ७७ ॥ ऐसें संवादाचा बहु[17]लां । लग्न दोघांचिया आं[18]तुलां । लागलें देखोनि जाला । निर्भर संजय ॥ ७८ ॥ तेणें ह्मणतसे संजयो । बाप कृपानिधीरावो । तो आपुला मनोभावो । अर्जुनेंसीं केला ॥ ७९ ॥ तेणें उ[19]चंबळलेपणें । संजय धृतराष्ट्रातें ह्मणे । जी कैसें बा[20]दरायणें । रक्षिलों दोघे ॥ १५८० ॥ आजि तुमतें आवधारा । नाहीं चर्म[21]चक्षुही संसारा । कीं ज्ञानदृष्टी व्यवहारा । आणिलेती ॥ ८१ ॥ आणि र[22]थींचिये राहाटी । घेइ जो घोडेयासाटीं । तया आह्मां या गोष्टी । गोचरा होती ॥ ८२ ॥ जुं[23]झींचें निर्वाण । मांडलें असे दारुण । दोहीं[24] हारीं आपण ।

---

१ त्वद्रूपत्वानें. २ प्राप्त झालेल्या. ३ गड्डे. ४ खरेपणानें. ५ तुझ्या योगानें मी माझ्या स्वरूपीं मिळून. ६ जें दृश्य प्रत्यक्ष होतांच. ७ द्वैत, गुरुशिष्यभाव. ८ आशा कुंठित होते. ९ गुरुमूर्ति. १० साह्य. ११ वांटा. १२ आदराचा. १३ प्रतिबंधक. १४ हुकूम. १५ कलंकयुक्त जाणला, क्षीरसागर आपला कुमार चंद्र याला पाहून आनंदित व्हावें त्याहून कमी आनंद पावला ( भरून आला तरी मर्यादेपर्यंतच.) १६ बहुल्यावर. १७ हृद्गत खुणेनें. १८ गर्हिवरून. १९ व्यासानें. २० व्यावहारिक दृष्टीनें. २१ अर्जुनाच्या रथाची राहटी चालली पाहिजे ह्मणून घोड्यांची संगति ज्यानें केली त्याच्या गोष्टी आह्मांस प्रत्यक्ष होतात. २२ युद्धप्रकरण. २३ उभय पक्ष.

हारपिजे जैसें ॥८३॥ येवढा जिये सांकडां[1] । कैसा अनुग्रहो पैं गाढा । जे ब्रह्मानंद उघडा । भोगवीतसे ॥ ८४ ॥ ऐसें संजय बोलिला । परि न द्रवे येरू[2] उगला । चंद्रकिरणीं शिवतला । पाषाण जैसा ॥ ८५ ॥ हे देखोनि तयाची दशा । मग करीचिना सरिसा । परि सुखें जाला पिसा । बोलतसे ॥ ८६ ॥ भुलविला हर्षवेगें । ह्मणौनि धृतराष्ट्रा सांगे । येऱ्हवीं नव्हे तथाजोगें । हें कीर जाणें ॥ ८७ ॥

संजय उवाच–इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥

मग ह्मणे पैं कुरुराजा । ऐसा भ्रौतृपुत्र तो तुझा । बोलिला तें अधोक्षजा । गोड जालें ॥ ८८ ॥ अगा पूर्वापर सागर । यया नामासीचि सिनोर । येर आघवें तें नीर । एक जैसें ॥ ८९ ॥ तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें । हें आंगाचिपासीं दिसे । मग संवादीं जी नसे । कांहींचि भेद ॥ १५९० ॥ पैं दर्पणाहूनि चोखें । दोन्ही होती सन्मुखें । तेथ येरीं येर देखे । आपणपें जैसें ॥९१॥ तैसा देवेंसी पंडुसुत । आपणपें देवीं देखत । पांडवेंसीं देखे अनंत । आपणपें पार्थीं ॥ ९२ ॥ देव देवा भक्तालागीं । जिये विवर[7] देखे आंगीं । येरु तियेचिही भागीं । दोन्ही देखे ॥ ९३ ॥ आणिक कांहींचि नाहीं । ह्मणौनि करिती काई । दोघे येकपणें पाहीं । नांदताती ॥ ९४ ॥ आतां भेद जरी मोडे । तरी प्रश्नोत्तर कां घडे । ना भेदचि तरि जोडे । संवादसुख कां ॥ ९५ ॥ ऐसें बोलतां दुजेपणें । संवादीं द्वैत-गिळणें । तें ऐकिलें बोलणें । दोघांचें मियां ॥ ९६ ॥ उटूनि दोन्ही आरसे । वोडविलीयां[8] सरिसे । कोण कोणा पाहातसे । कल्पावें पां ॥९७॥ कां दीपासन्मुख । ठेविलया दीपक । कोण कोणा अर्थिक[9] । कोण जाणे ॥ ९८॥ ना ना अर्कापुढें अर्क[10] । उदयलिया आणिक । कोण ह्मणे प्रकाशक । प्रकाश्य कवण ॥ ९९ ॥ हें निर्धारूं जातां फुडें । निर्धारासि ठेंक[11] पडे । ते दोघे जाले येवढे । संवादें सरिसे ॥ १६०० ॥ जी मिळतां दोन्ही उदकें- । माजि लवण वारूं[12] ठाके । कीं तयासीही निमिखें[13] । तेंचि होय ॥ १ ॥ तैसें श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं । धरितां मजही वानी[14] । तेंचि होतसे ॥ २ ॥ ऐसें ह्मणे ना मोटकें । तंव हिरोनि सात्विकें । आठव नेला नेणोकें । संजयपणाचा ॥ ३ ॥ रोमांच जंव फरके[16] । तंव तंव आंग सुरके[17] । स्तंभें[18] स्वेदातें जिके । एकला कंप ॥ ४ ॥ अद्वयानंदस्पर्शें । दिठीं रसमय[19] जाली असे । ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वची[20] ॥ ५ ॥ नेणों काय

---

१ संकटांत. २ धृतराष्ट्र. ३ संबंध. ४ पुतण्या (अर्जुन.) ५ वेगळेपण. ६ देहभिन्नतेच्या दृष्टीनें. ७ छिद्र. ८ समोरासमोर ठेविलें असतां. ९ इच्छा करणार. १० सूर्य. ११ स्तब्धता. १२ निवारण करण्यास राहे. १३ क्षणांत. १४ लवणाप्रमाणें. १५ थोडें बोलतो न बोलतो तों. १६ उभारे. १७ संकोच पावे. १८ स्तब्धता व घाम यांस. १९ ब्रह्ममय. २० पाझरच.

माय पोटीं । काय नेणों गुंफे[1] कंठीं । वागर्था[2] पडत मिठी । उसस्याचिया[3] ॥ ६ ॥ किंबहुना सात्विका आठां[4] । चाचर मांडता उमेठा[5] । संजय आहालासे चोहटां । संवादसुखाचा ॥ ७ ॥ तया सुखाची ऐसी जाती । जे आपणचि धरी शांती । मग पुढती देहस्मृती । लाधली तेणें ॥ ८ ॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

तेव्हां[6] बैसतेनि आनंदें । म्हणे जी जें उपनिषदें[7] । नेणती तें व्यासप्रसादें । ऐकिलें मियां ॥ ९ ॥ ऐकतांचि ते गोठी । ब्रह्मत्वाची पडिली मिठी । मीतूंपणेसीं[8] दिठी । विरोनि गेली ॥ १६१० ॥ हे आघवेंचि कां योग । जयाठाया[9] येते मार्ग । तयाचें वाक्य सवंग । केलें मज व्यासें ॥ ११ ॥ अहो अर्जुनाचेनि मिषें । आपणपेंचि दुजें ऐसें । नटोनि आपणया उद्देशें । बोलिले जें देव ॥ १२ ॥ तेथ कीं माझें श्रोत्र । पैठाचें जाले जी पात्र । काय वानूं स्वतंत्र । सामर्थ्य श्रीगुरूचें ॥ १३ ॥

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

राया हें बोलतां विस्मित होय । तेणेंचि मोडींवला ठाये[10] । रत्नीं कीं रत्नकिळा[11] ये । झांकोळित जैसी ॥ १४ ॥ हिमवंतीचीं सरोवरें । चंद्रोदयीं होतीं कांश्मीरें[12] । मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ये ॥ १५ ॥ तैसा शरिराचिया स्मृती । तो संवादें संजय चित्तीं । धरी आणि पुढती । तेचि[13] होय ॥ १६ ॥

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥

मग उठोनि म्हणे नृपा । श्रीहरीचिया विश्वरूपा । देखिलया उगा कां पां । असों लाहसी ॥ १७ ॥ न देखणेंनि जें दिसे । नाहींपणेंचि जें असे । विसरें आठवे तें कैसें । चुकऊं आतां ॥ १८ ॥ देखोनि चमत्कार । कीजे तो नाहीं पैसारें[14] । मजही सकट महापुर । नेत आहे ॥ १९ ॥ ऐसा श्रीकृष्णार्जुन- । संवादसंगमीं स्नान । करूनि देतसें तिळदान । अहंतेचें ॥ १६२० ॥ तेथ असंवरें आनंदें । अलौकिकही कांहीं[15] दुंफुदे[16] । श्रीकृष्ण

१ कंठरूप गुंफेंत. २ शब्दार्थास. ३ श्वासोच्छ्वासाच्या. ४ आठ सात्विक भावांस. ५ बोबडी वळली असतां. ६ अतिशय. ७ उपनिषत्सारसंवाद. ८ हारपली. ९ योग्यतेचें. १० हिरमुसला होऊन राहे. ११ चकाकील. १२ स्फटिकाकार. १३ शरीराच्या स्मृतीला संवादानें कांहीं वेळ आवरलें पण पुनः तीव्र स्मृति झाली. १४ प्रसार. १५ न सांवरणाऱ्या. १६ उसासा टाकी.

ह्मणे सद्गदें । वेळोवेळां ॥ २१ ॥ या अवस्थांची कांहीं । कौरवातें पैरी[1] नाहीं । ह्मणोनि रायें तें कांहीं । कल्पावें जंव ॥ २२ ॥ तंव जाला सुखलाभ । आपणपां करूनि स्वयंभ । बुझाविला[2] अवष्टंभ[3] । संजयें तेणें ॥ २३ ॥ तेथ कोणी येकी अवसरी[4] । होआवी ते करूनि दुरी । रावो ह्मणे संजया पैरी[5] । कैसी तुझी गा ॥ २४ ॥ तेणें तूतें येथें व्यासें । बैसविलें कौयसा[6] उद्देशें । अप्रसंगामाजि[7] ऐसें । बोलसी काई ॥ २५ ॥ रानीचें राउळा नेलिया[8] । दाही दिशा मानी सुनिया । कां रात्री होय पाहलया । निशाचरा[9] ॥ २६ ॥ जो जेथिचें गौरव नेणें । तयासि तें भिंगुळवाणें । ह्मणौनि अप्रसंग तेणें । ह्मणावा कीं तो ॥ २७ ॥ मग ह्मणे सांगें प्रस्तुत । उदयलेंसे जें उत्कंठित[10] । तें कोणासि बारे जैत[11] । देईल शेखीं ॥ २८ ॥ येऱ्हवीं विशेषें बहुतेक । आमुचें ऐसें मानसिक । जे दुर्योधनाचें अधिक । प्रताप सदा ॥ २९ ॥ आणि येरांचेनि[12] पाडें । दळेंही[13] याचें देव्हडें[14] । ह्मणौनि जैत फुडें । आणील ना तें ॥ १६३० ॥ आह्मां तंव गमे ऐसें । मा तुझें जोतीष[15] कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां ॥ ३१ ॥

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवानीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥**

हरिः ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगो नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

यया बोला संजयो ह्मणे । जी [16]येरयेरांचें मी नेणें । परि आयुष्य तेथें जिणें[17] । हें फुडें कीं गा ॥ ३२ ॥ चंद्र तेथें चंद्रिका[18] । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका[19] । असणें कीं जी ॥ ३३ ॥ रावो[20] तेथें कटक[21] । सौजन्य तेथें सोइरीक । वन्हि तेथें दाहक[22] । सामर्थ्य कीं ॥ ३४ ॥ दया तेथें धर्म । धर्म तेथें सुखागम । सुखीं पुरुषोत्तम । असे जैसा ॥ ३५ ॥ वसंत तेथें वनें । वन तेथ सुमनें[23] । सुमनीं पालिंगनें[24] । सारंगांचीं[25] ॥ ३६ ॥ गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान । आथि जैसें ॥ ३७ ॥ भाग्य तेथ विलास[26] । सुख तेथें उल्हास । हें असो तेथ प्रकाश । सूर्य जेथें ॥ ३८ ॥ तैसे सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी कां सनाथ । तो श्रीकृष्ण रावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ ३९ ॥ आणि आपलेनि कांतेसीं[27] । ते जगदंबा जयापासीं । अणिमादिकी[28] काय दासी । नव्हती तयातें ॥ १६४० ॥

---

१ अनुभव. २ जिरविला. ३ सात्विकाहंकार. ४ प्रसंग. ५ रीत. ६ कोणत्या. ७ अवधान सोडून. ८ उजाडलें असतां. ९ भयंकर. १० ज्याची मला उत्कंठा तें. ११ विजय. १२ इतर जे पांडव त्यांच्या योग्यतेस. १३ सैन्य. १४ अधिक. १५ गणित, भाकीत. १६ परस्परांचें. १७ जगणें. १८ चांदणें. १९ ज्ञानाला. २० राजा असेल तिकडे. २१ सैन्य. २२ जाळण्याचें. २३ पुष्पें. २४ समुदाय. २५ भ्रमरांचीं. २६ सुखोपभोग. २७ पतीसह. २८ अष्टसिद्धि.

कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तें जय लागवेगें । तेथेंचि आहे ॥ ४१ ॥ विजयी नामें अर्जुन विख्यात । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथ । [1]श्रियेसीं विजय निश्चित । तेथेंचि असे ॥ ४२ ॥ तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूतें [2]होडी । न जिणावें कां येवढीं । मायबापें असतां ॥ ४३ ॥ ते पाषाणही आघवे । [4]चिंतारत्नें कां नोहावे । तिये भूमिके कां न यावें । सुवर्णत्व ॥ ४४ ॥ तयाचिया गांवी-चिया । नदी अमृतें वाहाविया । नवल काय राया । विचारीं पां ॥ ४५ ॥ तयाचे बिसाट शब्द । सुखें ह्मणों येती वेद । [6]सदेह सच्चिदानंद । कां नोहावे ते ॥ ४६ ॥ पैं [7]स्वर्गापवर्ग दोन्हीं । इयें पदें तया अधीनीं । श्रीकृष्ण बाप जननी । [8]कमळा जया ॥ ४७ ॥ ह्मणौनि [9]जिया बाहीं उभा । तो लक्ष्मीयेचा [10]वल्लभा । तेथ सर्वसिद्धि स्वयंभा । येर मी नेणें ॥ ४८ ॥ आणि समुद्राचा मेघ । उपयोगें तयाहूनि चांग । तैसा पार्थीं आजि [11]लाग । आहे तये ॥ ४९ ॥ [12]कनकत्वदीक्षागुरू । लोहा [13]परीस होय कीरू । परि जगा पोसिता व्यवहारू । तेंचि[14] जाणें ॥ १६५० ॥ येथ गुरुत्वा येतसे उणें । ऐसें [15]झणें कोण्ही ह्मणे । वन्हिप्रकाश दीपपणें । प्रकाशी आपला ॥ ५१ ॥ तैसा [16]देवाचिया शक्ती । पार्थ [17]देवोंसीच वहुती । परी माने इये स्तुती । गौरव असे ॥ ५२ ॥ आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा शिरोंणी । तरी ते शार्ङ्गपाणी । फळा आली ॥ ५३ ॥ किंबहुना ऐसा नृपा । पार्थ जालासे कृष्णकृपा । तो जयाकडे [19]सोक्षेपा । रीती आहे ॥ ५४ ॥ तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज कोण संदेहो । तेथ नये तरी [20]वांवो । विजयोचि होय ॥ ५५ ॥ ह्मणौनि जेथ श्री तेथ श्रीमंत । जेथ तो पंडुचा सुत । तेथ विजय समस्त । [21]अभ्युदय तेथ ॥ ५६ ॥ जरी व्यासाचेनि [22]सांचें । [23]धिरे मन तुमचें । तरी या बोलाचें । [24]ध्रुवचि माना ॥ ५७ ॥ जेथ तो श्रीवल्लभ । तेथ [25]भक्तकदंब । तेथ सुख आणि लाभ । [26]मंगळाचा ॥ ५८ ॥ या बोला आन होये । तरि व्यासाचा [27]अंकें न वाहें । ऐसें [28]गाजोनि बाहे । उभिली तेणें ॥ ५९ ॥ एवं भारताचा [29]आवांका । आणूनि [30]श्लोकीं येका । संजयें कुरुनायका । दीधला हातीं ॥ १६६० ॥ जैसा नेणो केवढा वन्ही । परि [31]गुणाग्रीं ठेउनी । आणिजे सूर्याची [32]होनी । निस्तरावया ॥ ६१ ॥ तैसें शब्दब्रह्म अनंत । जालें सवालक्ष भारत । भारताचें

---

१ लक्ष्मीसह. २ पैज मारी. ३ न जिंकावें. ४ चिंतामणी. ५ भलतें, अव्यवस्थित. ६ ते मूर्तिमंत सच्चिदानंदरूप कां न व्हावे, आहेतच. ७ स्वर्गमोक्ष. ८ लक्ष्मी. ९ ज्या पक्ष्याकडे. १० पति. ११ संबंध. १२ सुवर्णपणा येण्याची दीक्षा देणारा गुरु. १३ लोखंडाला सुवर्ण करणारा परिस आहे. १४ सुवर्णच. १५ कदाचित्. १६ या स्तुतीनें देवालाच महत्व आहे. १७ प्रकारें. १८ इच्छा. १९ पक्षपातपूर्वक. २० विजयाचें विजयत्व व्यर्थ होईल. २१ पुण्य. २२ खरेपणानें. २३ विश्वासे. २४ अढळत्वच. २५ समुदाय. २६ कल्याणाचा. २७ शिष्यत्व. २८ असें मोठ्यानें बोलून हात उभारला. २९ मतलब. ३० 'यत्र योगेश्वरः कृष्णो' या शेवटच्या श्लोकांत. ३१ वातीच्या अग्रीं. ३२ नाश दूर करायास.

शतें सात । सर्वस्व गीता ॥ ६२ ॥ तयाही सातां शतांचा । इत्यर्थ हा [1]श्लोकशेषींचा । व्याससिष्य संजयाचा । पूर्णोद्गार जो ॥६३॥ येणें येकेंचि श्लोकें । राहे तेणें [2]असकें । अविद्याजाताचें निकें । जितिलें होय ॥ ६४ ॥ ऐसे श्लोकशतें सात । गीतेचीं पदें आंगें वाहत । पदें ह्मणों कीं परमामृत । [3]गीताकाशींचें ॥ ६५ ॥ कीं आत्मराजाचिये सभे । गीते वोडवले हे खांबे । मज श्लोक [4]प्रतिभे । ऐसे येत ॥६६॥ कीं गीता हे सप्तशती । मंत्रपतिपाद्य भगवती । [5]मोहेमहिषा मुक्ती । आनंदली असे ॥ ६७ ॥ ह्मणौनि मनें कायें वाचा । जो सेवक होईल इयेचा । तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती [6]करी ॥ ६८ ॥ कीं अवि[7]द्यातिमिररोखें । श्लोक सूर्यातें पैजा जिंके । ऐसे प्रकाशिले गीतामिषें । रायें श्रीकृष्णें ॥ ६९ ॥ कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली आहे गीता । संसारपथ-श्रांता । विसंवावया ॥ १६७० ॥ कीं सभाग्यसंतीं भ्रमरीं । सेविले ते श्लोक [8]कल्हारीं । श्रीकृष्णाख्यसरोवरीं । [9]सासिन्नली हे ॥ ७१ ॥ कीं श्लोक नव्हती आन । गमे गीतेचें महिमान । वाखाणिते [10]बंदिजनें । उदंड जैसे ॥७२॥ कीं श्लोकांचिया आवारा । सात शतें करूनि सुंदरा । [11]सर्वागम गीतापुरा । वसों आले ॥ ७३ ॥ कीं निजकांता आत्मया । आवडी गीता मिळावया । श्लोक नव्हती बाह्या । पसर कां जो ॥ ७४ ॥ कीं गीता कमळींचे [12]भृंगे । कीं हे गीतासागरतरंग । कीं हरीचे हे [13]तुरंग । गीतारथींचे ॥ ७५ ॥ कीं श्लोक सर्व तीर्थसंघात । आला श्रीगीतेगंगे आंत । जे अर्जुन सिंहस्थ । जाला ह्मणौनी ॥ ७६ ॥ कीं नोहे हे [14]श्लोकश्रेणी । [15]अचिंतचित्तचिंतामणी । कीं निर्विकल्पां लावणी । कल्पतरूंची ॥ ७७ ॥ ऐसिया शतेंसातश्लोका । परी आगळा येकयेका । आतां कोण वेगळिका । [16]वानावा पां ॥ ७८ ॥ तान्हीं आणि [17]पारठी । इया कामधेनूतें [18]दिठी । सूनि जैसिया गोठी । कीजती ना ॥ ७९ ॥ दीपा [19]आगिलें मागिल । सूर्य धाकुटा वडील । अमृतसिंधू खोल । उथळ कायसा ॥ १६८० ॥ तैसे पहिले [20]सरते । श्लोक न ह्मणावे गीते । [21]जुनीं नवीं पारिजातें । आहाती काई ॥ ८१ ॥ आणि श्लोका पाड नाहीं । हें कीर समर्थू काई । येथ वाच्य वाचकही । भाग न धरी ॥ ८२ ॥ जे इये शास्त्रीं येक । श्रीकृष्णचि वाच्य वाचक । हें प्रसिद्ध जाणें लोक । भलताही ॥ ८३ ॥ येथें अर्थे तेचि पाठें ।

---

१ 'यत्र योगेश्वरः कृष्णो' ह्या शेवटच्या श्लोकांत. २ संपूर्ण. ३ गीता हीच काशी तिचें, स्वर्गीचें. ४ अनुभवास येतात. ५ भ्रांति महिषासुराची मुक्तता निरास केल्यानें. ६ होईल. ७ अज्ञानांधकार आडवून. ८ कमळांनीं. ९ सिद्ध झाली. १० स्तुतिपाठक. ११ वेदशास्त्रादि. १२ भ्रमर. १३ घोडे. १४ शिडी. १५ अचिंत=विरक्त यांच्या चित्ताला चिंतामणि. १६ वर्णावा. १७ शुष्क. १८ दृष्टि देऊन. १९ पुढचामागचा. २० शेवटले. २१ परिजात जुना असो नवा असो, परिमळ सारखाच.

जोडे येवढें निधडें[1] । वाच्यवाचक येकवटें । साधितें शास्त्र ॥ ८४ ॥ ह्मणोनि मज कांहीं । समर्थनीं[2] आतां विषय नाहीं । गीता जाणा हे वाङ्मयी[3] । श्रीमूर्ति प्रभूची ॥ ८५ ॥ शास्त्र वाच्यें अर्थे फळे । मग आपण मावळे । तैसें नव्हे हें सगळें । परब्रह्मची ॥ ८६ ॥ कैसा विश्वाचिया[4] कृपा । करूनि महानंद सोपा । अर्जुनव्याजें[5] रूपा[6] । आणिला देवें ॥ ८७ ॥ चकोराचेनि निमित्तें । तिन्हीं भुवनें संतप्तें । निववीलीं कळावंतें । चंद्रें जेवीं ॥ ८८ ॥ कां गौतमाचेनि मिषें । कळिकाळ ज्वरितोद्देशें[7] । पाणिढाळ[8] गिरीशें । गंगेचा केला ॥ ८९ ॥ तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें । दुभीनली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ॥ १६९० ॥ येथें जीवें जरी न्याल । तरी हेंच कीर होआल । ना तरि पाठमिषें तिंबाल[9] । जीभचि जरी ॥ ९१ ॥ तरि लोह एके[10] अंशें । झगटलिया परिसें । येरीकडे अपैसें । सुवर्ण होय ॥ ९२ ॥ तैसी पाठाची ते वाटी । श्लोक पाद लावावा जंव वोठीं । तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल आंगा ॥ ९३ ॥ ना येणेंसीं मुख वांकुडें । करूनि ठाकाल कानवडें[11] । तरि कानींही घेतां पडे । तेचि लेखें[13] ॥ ९४ ॥ जे हे श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षाआरौतें । जैसा समर्थ दाता कोण्हातें । नास्ति[12] न ह्मणे ॥ ९५ ॥ ह्मणोनि जाण-तया सवा । गीताचि येकी सेवा । काय कराल आघवां । शास्त्रीं येरीं ॥ ९६ ॥ आणि कृष्णार्जुनीं मोकळी[14] । गोठी चावळिली[15] जे निराळीं[16] । ते श्रीव्यासें केली करतळीं । घेवों ये ऐसी ॥ ९७ ॥ बाळकातें वोरसें[17] । माय जैं जेवऊं बैसे । तैं तया ठाकती तैसे[18] । घांस करी ॥ ९८ ॥ कां अफाटा समीरणा[19] । आंपैतें-पण[20] शाहाणा । केलें जैसें विंजणा[21] । निर्मूनियां ॥ ९९ ॥ तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनियां अनुष्टुभें । स्त्रीशूद्रादिप्रतिभे[22] । सामाविलें ॥१७००॥ स्वातीचेनि पाणियें । न होतीं जरी मोतियें । तरि आंगीं सुंदराचियें । कां शोभतीं तियें ॥ १ ॥ नाद वाद्या न येतां । तरि कां गोचर होता । फुलें[23] न होतां घेपता । आमोद कैसी ॥ २ ॥ [24]गोडी न होती पक्वान्नें । तरि कां फावती रसनें । दर्पणावीण नयनें । नयन कां दिसे ॥३॥ द्रष्टा[25] श्रीगुरुमूर्ती । न रिगता दृश्यपंथीं[26] । तरि कां ह्या उपास्ती[27] । आकळता तो ॥ ४ ॥ तैसें वस्तु जें असंख्यात । तया संख्या शतें सात । न होतीं तरि कोणा येथ । फावों[28] शकतें ॥ ५ ॥ मेघ सिंधूचें पाणी

१ मोठ्या पराक्रमानें प्राप्त होण्याजोगें. २ प्रतिपादनाला. ३ वाणीरूप. ४ जगावर कृपा करून. ५ अर्जुनाच्या निमित्तानें. ६ प्रत्यक्षतेस. ७ कलिकालरूप जो ज्वर त्यानें पीडित. ८ पायउतार. ९ भिजवाल. १० एका अंगावर. ११ प्रकार. १२ नाहीं. १३ ज्ञात्याबराबर. १४ स्पष्ट. १५ बोलिली. १६ आकाशांत. १७ पान्हा दाटून आल्यानें, अति ममतेनें. १८ सोईस पडतील तसे. १९ वाऱ्याला. २० वश्यता. २१ पंखा. २२ प्रतिबिंबांत. २३ फुलें उत्पन्न झालीं नसतीं तर सुगंध कसा घेतां येता. २४ पक्वान्नें गोड झालीं नसतीं तर जिभेला गोड कां लागतीं. २५ साक्षी. २६ साकार झाला नसता. २७ उपासनेला. २८ मिळूं शकतें.

वाहे । तरी जग तयातेंचि पाहे । कां जें [1]उमप तें नोहे । ठाकतें कोण्हा ॥ ६ ॥ आणि [2]वाचा जें न पवे । तें हे श्लोक न होते बरवे । तरि [2]कानें मुखें फावे । ऐसें कां होतें ॥ ७ ॥ ह्मणोनि श्रीव्यासाचा हा थोर । विश्वासि जाला उपकार । जे श्रीकृष्ण उक्ती आकार । ग्रंथाचा केला ॥ ८ ॥ आणि तोचि [3]हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पाहातां पाहातां । आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ ९ ॥ व्यासादिकांचे [4]उन्मेख । राहाटती जेथ [5]सांशंक । तेथ मीही रंक येक । [6]वाचाळी करीं ॥ १७१० ॥ परि गीता ईश्वर भोळा । ले [7]व्यासोक्तिकुसुममाळा । तरि माझिया दूर्वादळा । ना न ह्मणे कीं ॥ ११ ॥ आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती [8]गजघटा । तेथ काय [9]मुरकुटा । वारिजत असे ॥ १२ ॥ [10]पांख-फुटे पाखिरूं । तुडे तरी नभींच स्थिरू । गगन आक्रमी सत्वरू । तो [10]गरुडही तेथ ॥ १३ ॥ राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया [11]शोहाणें । आणिकें काय कोणें । चालावेंचि ना ॥ १४ ॥ जी [12]आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे [12]कलशें । चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे ॥ १५ ॥ दिवटीच्या आंगीं थोरी । तरि ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परी । आणीच कीं ना ॥ १६ ॥ जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाश आभासे । थिल्लरीं थिल्लरा ऐसें । बिंबेचि पैं ॥ १७ ॥ तेविं [13]व्यासादिक महामती । वावरों येती इये ग्रंथीं । मा आह्मी [13]ठाकों हे युक्ती । न मिळे कीर ॥ १८ ॥ जिये सागरीं जळचरें । संचरती [14]मंदराकारें । तेथ देखोनि [15]शफरें येरें । पोहों न लाहती ॥ १९ ॥ अरुण [16]आंगीं जवळिके । ह्मणोनि सूर्यातें देखे । मा भू तळींची न देखे । मुंगी काई ॥ १७२० ॥ यालागीं आह्मां प्राकृतां । [17]देशिकारें बंधे गीता । ह्मणणें हें [18]अनुचिता । कारण नोहे ॥ २१ ॥ आणि बाप पुढां जाये । ते घेत [19]पाउलाची सोये । बाळ ये तरि न लाहे । पावों कायी ॥ २२ ॥ तैसा व्यासाचा [20]मागोवा घेत । भाष्यकारातें वाट पुसत । अयोग्यही मी [21]नेपवत । [22]कें जाइन ॥ २३ ॥ आणि पृथ्वी जयाचिया [23]क्षमा । [24]नुबगे स्थावर जंगमा । जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ॥ २४ ॥ जयाचें [25]आंगिकें असिकें । तेज लाहोनि अर्कें । आंधाराचे [26]सांवाइकें । [27]लोटिजत आहे ॥ २५ ॥ समुद्रा

१ अगणित. २ जर हे श्लोक चांगले झाले नसते तर कानांला व मुखाला प्राप्त कसे झाले असते. ३ ग्रंथ. ४ ज्ञानोद्गार. ५ अनिश्चित. ६ बडबड. ७ व्यासोक्तिरूप फुलांची माळा. ८ गजसमुदाय. ९ चिलटाला. १० पंख फुटणारें पांखरूं व गरूड आपआपल्या सामर्थ्यानुरूप आकाशांत उडतात. सीमा दोघांलाही नाहीं. ११ सुंदर. १२ कलश अगाध जलांत गेला तरी त्याच्या मोकळीइतकेंच पाणी त्यांत रहातें. १३ तसे व्यासादि या ग्रंथांत वावरतात. आम्ही मात्र हात टेंकावे हें जुळत नाहीं. १४ पर्वता एवढाली. १५ लहान मत्स्य. १६ अगदीं जवळ राहणारा. १७ देशभाषेनें. १८ अयोग्यपणाला. १९ पावलट. २० भाग घेत घेत. २१ न पावतां. २२ कोणीकडे. २३ सहनशक्तीमुळें. २४ न कंटाळे. २५ संपूर्ण साह्य. २६ संपूर्ण ऐहिक. २७ दूर करीत आहे.

जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनी ॥ २६ ॥ पवना जयाचें बळ । आकाश जेणें पैघळ । ज्ञान जेणें उज्वळ । चक्रवर्ती ॥ २७ ॥ वेद जेणें सुभास । सुख जेणें सोल्लास । हें असो रूपैस । विश्व जेणें ॥ २८ ॥ तो सर्वोपकारी समर्थ । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथ । राहटत असे मजहीआंत । रिघोनियां ॥ २९ ॥ आतां आयती गीता जगीं । मीं सांगें मऱ्हाठिया भंगीं । येथ कें विस्मयालागीं । ठाव आहे ॥ १७३० ॥ श्रीगुरुचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती । तेणें कोळियें त्रिजगती । येकवेद केली ॥ ३१ ॥ चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें । वसिष्ठें मांडली कीं भांडें । भानुसीं शाटी ॥ ३२ ॥ मा मी तंव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला । जो दिठीवेनि[11] आपुला । बैसवी पदीं ॥ ३३ ॥ आधींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी । तें न दिसे ऐसी गोठी । कैंची आहे ॥ ३४ ॥ म्हणोनि माझे नित्य नवे । श्वासोश्वासही प्रबंध होआवे । श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेव म्हणे ॥ ३५ ॥ याकारणें मियां । श्रीगीतार्थ मऱ्हाठिया । केला लोकां यया । दिठीचिया विषो ॥ ३६ ॥ परि मऱ्हाठे बोलरंगें । कवळितां पैं गीतांगें । तें गातयाचेनि पैंगें । येकाढ्यता नोहे ॥ ३७ ॥ म्हणोनि गीता गावों म्हणे । तें गाणिव होती लेणें । ना मोकळें तरि उणें । गीताही आणित ॥ ३८ ॥ सुंदर आंगीं लेणें न सूये । तें तो मोकळा शृंगार होये । ना लेइलें तरि आहे । तैसें कें उचित ॥ ३९ ॥ कां मोतियांची जैसी जाती । सोनयाही मान देती । ना तरि मानवती । अंगेंचि सैंडीं ॥ १७४० ॥ ना ना गुंफिलीं कां मोकळीं । उणीं न होती परिमळीं । वसंतागमींचीं वाटोळीं । मोगरीं जैसीं ॥ ४१ ॥ तैसा गाणीवेनें मिरवी । गीतेवीणेंही रंग रावी । तो लाभाचा प्रबंध वोवीं । केला मियां ॥ ४२ ॥ तेणें आबाळसुबोधें । वोवियेचेनि प्रबंधें । ब्रह्मरससुस्वादें । अक्षरें गुंथिलीं ॥ ४३ ॥ आतां चंदनाच्या तरुवरीं । परिमळालागीं फुलवरी । पारुखणें जियापरी । लागेना कीं ॥ ४४ ॥ तैसा प्रबंध हा श्रवणीं । लागतखेंवो समाधि आणी । ऐकिलियाही वाखाणी । काय व्यसन न लवी ॥ ४५ ॥ पाठ करितां व्याजें । पांडित्यें येती वेषजें । तें अमृतातें नेणिजे । फावलिया ॥ ४६ ॥ तैसेनि आइतपणें । कवित्वा जालें हें उपणें । मनन निदिध्यास श्रवणें । जितिलें आतां ॥ ४७ ॥ हे स्वानंद भोगाची सेलें । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रियां पोषवील । श्रवणाकरवीं ॥ ४८ ॥ चंद्रातें

---

१ विस्तार. २ चांगलें बोलणारा. ३ प्रकाशित. ४ भाषेच्या रीतीनें. ५ एकत्र. ६ इतर झाडें चंदनसहवासानें त्याच्या तुलनेस येतात. ७ भांडणाच्या निवाड्यासाठीं. ८ छाटी. ९ चित्त सद्गुरुमय झालेला. १० धनी. ११ दृष्टिमात्रानें. १२ पाठीराखा. १३ काव्यग्रंथ. १४ दृष्टिगोचर. १५ आधीनपणानें. १६ एकदेशित्व. १७ गाणीं. १८ नुसतीं. १९ गाण्यावांचून. २० आबालवृद्धांस सुगम. २१ सुवासासाठीं, फूल येण्यापर्यंत. २२ वाट पाहणें. २३ लागण्याबरोबर. २४ व्याख्यानरूपानें. २५ स्पष्ट. २६ प्राप्त झाल्यास. २७ विश्रांतिस्थान. २८ विभाग.

आंगेवणें । भोगूनि चकोर शाहाणे । परि [२]फावे जैसें चांदिणें । भलतयाही ॥ ४९ ॥ तैसें [३]अध्यात्मशास्त्रीं यिये । अंतरं[४]गाचि अधिकारियें । परि लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ १७५० ॥ ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें । ग्रंथ नोहे हें कृपेचें । वैभव तियें ॥ ५१ ॥ क्षीरसिं[५]धूपरिसरीं । [६]शक्तीच्या कर्णकुहरीं । नेणों कैं श्रीत्रिपुरारीं । सांगी-तलें जें ॥ ५२ ॥ तें क्षीर [७]कल्लोळाआंत । म[८]करोदरीं गुप्त । होता तयाचा हात । [९]पैठें जालें ॥ ५३ ॥ तो मत्स्येंद्रसप्तशृंगीं । [१०]भग्नावयवा चौरंगीं । भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥ ५४ ॥ मग समाधी [११]अव्यत्यया । भोगावी [१२]वासना यया । ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली [१३]मीनीं ॥ ५५ ॥ तेणें योगा[१४]ब्जिनीसरोवर । विष[१५]यविध्वंसैकवीर । तिये पदीं कां सर्वेश्वर । अभिषेकिले ॥ ५६ ॥ मग तिहीं तें [१६]शांभव । अद्वयानंदवैभव । संपादिलें सं[१७]प्रभव । श्रीगैणीनाथा ॥ ५७ ॥ तेणें [१८]कळिकाळित भूतां । आला देखोनि नि[१९]रुता । ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥ ५८ ॥ ना आदि गुरु शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा सं[२०]सरा । जाला जो आमुतें ॥ ५९ ॥ तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जीवां । सर्व प्रकारीं धां[२१]वीं । करीं पां वेगीं ॥ १७६० ॥ आधींच तंव तो कृपाळू । वरि गुरुआज्ञेचा बोलू । जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघां ॥ ६१ ॥ मग [२२]आर्ताचेनि वोरसें । गी[२३]तार्थग्रंथनमिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथ ॥ ६२ ॥ तेथ पुढां मीं बापि[२४]यां । मांडला आर्ती आपुलिया । कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥ ६३ ॥ एवं [२५]गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावीं मज ॥६४॥ वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणें स्वामीची । ऐशिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ॥ ६५ ॥ परि साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥ ६६ ॥ तऱ्ही पुरोहि[२६]तगुणें । मी बोलिलों पुरें उणें । तें तुह्मीं माउ-लीपणें । [२७]उपसाहिजो जी ॥ ६७ ॥ शब्द कैसा घडिजे । [२८]प्रमेयीं कैसें पां चढिजे । अळं-कार ह्मणिजे । काय तें नेणें ॥ ६८ ॥ [२९]सांयिखडेयाचें बाहुलें । चालवित्या सूत्राचेनि चालें । तैसा मातें दावीत बोलें । स्वामी तो माझा ॥ ६९ ॥ यालागीं मी गुणदोष । विषीं

---

१ आपल्या शक्तीनें. २ प्राप्त होय. ३ या आत्मानात्मविचारशास्त्रीं. ४ अंतर्मुख. ५ सन्निध-भागीं. ६ पार्वतीच्या कानांत. ७ लाटांमध्यें. ८ माशाच्या पोटांत. ९ प्राप्त. १० हातपाय तुट-लेल्या चौरंगी नांवाचा योगी. ११ निर्विघ्न. १२ या वासनेनें. १३ मत्स्येंद्रनाथांनीं. १४ योगरूप कमलिनीचें. १५ विषयनाशाला मुख्य कारण. १६ अध्यात्मविद्या. १७ मुळापासून. १८ कलीनें ग्रस्त अशा. १९ खरा. २० विस्तार. २१ धांवून रक्षणें. २२ पीडिताच्या पान्ह्यासाठीं. २३ ग्रंथ करण्याच्या निमित्तानें. २४ चातक. २५ गुरुपरंपरेनें. २६ परस्वाधीनपणानें. २७ क्षमा करा. २८ अर्थान्वयांत. २९ कळसूत्री बाहुली.

क्षमाविना विशेष । जे मी संजात ग्रंथलों देख । आश्चर्यें कीं ॥ १७७० ॥ आणि[2] तुह्मां संतांचिये सभे । जें उणिवेसीं ठाके उभें । तें पूर्ण नोहे तैं लोभें । तुह्मांसीच्चि कोपों ॥ ७१ ॥ सिंवतलियाही परिसें । लोहत्वाच्चिये अवस्से । न मूकिजे आयसें । तें कवणा बोल ॥ ७२ ॥ वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग टाकावें । मगही गंगा जरी नोहावें । तैं तो काय करी ॥ ७३ ॥ ह्मणोनि भाग्ययोगें बहुवे पां हे । तुह्मां संतांचे मी पाये । पातलों आतां के लाहे । उणें जगीं ॥ ७४ ॥ अहो जी माझेनि स्वामी । मज संत जोडूनि तुह्मीं । दिध-लेति तेणें सर्वकामीं । परिपूर्ण जालों ॥ ७५ ॥ पाहा पां मातें तुह्मां सांगडें । माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें आळियाडें । सिद्धी गेलें ॥ ७६ ॥ जी कनकाचें निर्खळ । वोतूं येईल भूतळ । चिंतारत्नीं कुळाचळ[11] । निर्मूं येती ॥ ७७ ॥ सातांही हो सागरांतें । सोपें भरितां अमृतें । दुर्वाड[12] नोहे तारांतें । चंद्र करितां ॥ ७८ ॥ कल्पतरूचे आराम । लावितां नाहीं विषम । परी गीतार्थाचें वर्म । निवडूं नये ॥ ७९ ॥ तो मी येक सर्व मुका । बोलोनि मऱ्हाटिया भाषा । करीं डोळवरी[15] लोकां । घेवों ये ऐसें जें ॥ १७८० ॥ हा ग्रंथसागर येव्हडा । उतरोनि पैलीकडा । कीर्तिविजयाचा धेंडा । नाचे जें कां ॥ ८१ ॥ गीतार्थाचा आवारू । कळशेंसी महामेरू । रचूनि माजी श्रीगुरु- । लिंग जें पूजीं ॥ ८२ ॥ गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें वाय । तें मीयपूतां भेटि होय । हा धर्म तुमचा ॥ ८३ ॥ तुह्मां सज्जनांचें केलें । आकळूनि जी मी बोलें । ज्ञानदेव ह्मणे येकुलें । तैसें नोहे ॥८४॥ काय बहु बोलों सकळां । मेळविलों जन्मफळा । ग्रंथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ॥ ८५ ॥ मियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा । ते पुरऊनि जी बहुवसा । आणिलों सुखा ॥ ८६ ॥ मजलागीं ग्रंथाची स्वामी । दुजी सृष्टी जे हे केली तुह्मीं । ते पाहोनि हांसों आह्मीं । विश्वामित्रातेंही ॥ ८७ ॥ जे असोनि त्रिशंकुदोषें । धातयाही आणावें[21] वोसें । तें नासतें कीजे कीं ऐसें । निर्मावें नाहीं ॥ ८८ ॥ शंभू उपम-न्यूचेनि मोहें । क्षीरसागरही केलों[22] आहे । येथ तोही उपमेसरी नोहे । जे विषगर्भ कीं ॥ ८९ ॥ अंधकार निशाचरा । गिळितां सूर्यें चराचरा । धांवा केला तरी खरा । ताउनी कीं तो ॥ १७९० ॥ तांतलिया[23] जगाकारणें । चंद्रें वेंचिलें चांदिणें । तया सदोषा कोवि ह्मणें । सारिखें हें ॥ ९१ ॥ ह्मणोनि तुह्मीं मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं । उप-योग केला तो पुढसी । निरुपम जी ॥ ९२ ॥ किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी

---

१ ग्रंथयुक्त बोललों, ग्रंथच मी झालों आहें. २ कोपूं लागेन. ३ स्पर्शलेल्या. ४ वाईट स्थितीला. ५ लोहानें. ६ प्रवाहानें. ७ तुमच्यासारखें. ८ अनुकूल. ९ हट्ट. १० सर्व. ११ पर्वत. १२ कठिण. १३ बाग. १४ विपरीत. १५ प्रत्यक्ष. १६ देऊळ. १७ व्यर्थ. १८ आईलेकरांस. १९ तुह्मी संतांनीं केलेल्याचा विचार करून हें माझें बोलणें आहे केवळ ग्रंथ निमित्तानें ज्ञानेश्वराचेंच यत्किंचित् बोलणें नव्हे. २० त्रिशंकुराजाच्या हेतूनें. २१ उणें. २२ दिला. २३ तप्त झालेल्या.

नेलें । येथ माझें जी उरलें । पाईकपण ॥ ९३ ॥ आतां विश्वात्मकें देवें । येणें [2]वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । [3]पसायदान हें ॥ ९४ ॥ जे खळांची [4]व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ ९५ ॥ दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ९६ ॥ वर्षत सकळ-मंगळीं । [5]ईश्वरनिष्ठांची [6]मांदियाळी । [7]अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ९७ ॥ [8]चलां कल्पतरूंचे [9]अरव । [10]चेतनां चिंतामणीचे गांव । बोलते जे [11]अर्णव । पीयूषाचे ॥ ९८ ॥ चंद्रमे जे [12]अलांछन । [13]मार्तंड जे तापहीन । ते सर्वांहीं सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ९९ ॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥ १८०० ॥ आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इये । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥ १ ॥ येथ ह्मणे श्रीविश्वे[14]श्वरावो । हा होईल [15]दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला ॥ २ ॥ ऐसें युगीं [16]परि कलीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीच्या [17]कूलीं । दक्षिणिलीं ॥ ३ ॥ त्रिभुवनैकपवित्र । अनादि [18]पंचक्रोशक्षेत्र । जेथ जगाचें जीवनसूत्र । श्री[19]महालया असे ॥ ४ ॥ तेथ [20]यदुवंशविलास । जो सकळकळानिवास । न्यायातें पोषी क्षितीश । श्रीरामचंद्र ॥ ५ ॥ तेथ [21]महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिना[22]थसुतें । केलें ज्ञान-देवें गीतें । देशी[23]कारलेणें ॥ ६ ॥ एवं भारताच्या गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णा-र्जुनीं बरवी । गोठी जे केली ॥ ७ ॥ जें उपनिषदांचें सार । सर्वशास्त्रांचें माहेर । पर-महंसीं सरोवर । सेविजे जें ॥ ८ ॥ तिये गीतेचा [24]कलश । संपूर्ण हा अष्टादश । ह्मणे निवृत्तिदास । ज्ञानदेव ॥ ९ ॥ [25]पुढती पुढती पुढती । इयां ग्रंथपुण्यसंपत्ती । सर्वसुखीं सर्व-भूतीं । संपूर्ण होइजे ॥ १८१० ॥ शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहाला ॥ १८११ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायामष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

इति श्रीभावार्थदीपिका समाप्ता ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्लोक ७८, ओंव्या १८११.

---

१ सेवकत्व. २ ग्रंथरूप यज्ञानें. ३ प्रसाद. ४ वक्रदृष्टी. ५ भगवज्जनांची. ६ समुदाय. ७ सर्व. काळ. ८ चालत्या. ९ कोटी, अंकुर. १० जिवंत. ११ समुद्र. १२ लांछनरहित. १३ सूर्य. १४ श्रीगुरु. १५ दानप्रसाद. १६ कलियुगांत. १७ दक्षिणभागाच्या तीरीं. १८ पांच कोश विस्तृत. १९ मोहनीराजदेव. २० माधव. २१ आदिनाथपरंपरासंभूत, शिवसंप्रदाय. २२ शिष्यानें. २३ देश-भाषाग्रंथ. २४ कळस. २५ उत्तरोत्तर.

श्रीशकेपंधराशें बारोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं । येकाजनार्दन अत्यादरीं । गीता ज्ञानेश्वरीप्रति शुद्ध केली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥ ३ ॥ बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रमासकपिलाषष्टी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठी संपूर्ण जाली ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरीपाठीं । जो वोवी करील मऱ्हाटी । तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥

---

१ या प्रकारें.